-काव्यसंग्रह-ग्रंथमाला-

महाराष्ट्रकविवर्यमोरोपंतकृत

# महाभारत.

## १. आदिपर्व.






किंमत २) रुपये.

'Kāvya-sangraha'-Series.-

# THE MAHABHARATA OF MOROPANTA.

(THE GREAT MARĀTHĪ POET OF THE MAHĀRĀSHTRA.)

## I. ĀDIPARVA.

This history is called 'Jaya' (victory); it should be heard by those that desire victory. (*Ādiparva-62-20.*)

Second Edition.

Revised and enlarged with critical and explanatory Notes, Introduction and Appendices &c.

BY

DĀMODAR KESHAVA OKA, B. A.
Superintendent, Normal School, Nagpur,
and
Member of the Court and the Committee of Reference, Nagpur University; Sometime Examiner in Marathi Language, Universities of Allahabad, Nagpur, and the Osmania University, Hyderabad-Deccan, &c.

PUBLISHED
BY
PĀNDURANG JĀWAJĪ,
Proprietor of the 'Nirṇaya-Sāgar' Press,
BOMBAY.

1935.

*Price 2¼ Rupees.*

-काव्यसंग्रह-ग्रंथमाला-

महाराष्ट्रकविवर्यमोरोपंतकृत

# महाभारत.

## १. आदिपर्व.

'जयो नामेतिहासोऽयं श्रोतव्यो विजिगीषुणा ।'
( आदिपर्व-६२।२० )

( द्वितीयावृत्ति. )

हें


दामोदर केशव ओक, बी. ए.
सुपरिंटेंडेंट, नार्मल स्कूल, नागपुर,
आणि
नागपुर विश्वविद्यालयाच्या कोर्टाचे व रेफरन्स कमिटीचे मेंबर,
उस्मानिया विश्वविद्यालय, हैद्राबाद, नागपुर व अलाहाबाद
येथील विश्वविद्यालयें यांतील मराठी भाषेचे परीक्षक


यांनीं
शोधून, अर्थनिर्णायक व अवांतर माहितीच्या विपुल टीपा देऊन
व उपोद्घात, परिशिष्टें वगैरे जोडून तयार केलें.

तें


मुंबईत 'निर्णयसागर' छापखान्याचे मालक पांडुरंग जावजी
यांनीं छापून प्रसिद्ध केलें.

सन १९३५.

किंमत २॥ रुपये.

महाराष्ट्रभाषेचा आस्थापूर्वक अभ्यास

करूं इच्छिणाऱ्यांस

ही अल्पसेवा

सप्रेम व सादर अर्पण केली आहे.

दा. के. ओक.

# प्रस्तावना.

**तुमच्या आशीर्वादें जन्मोजन्मीं घडो अशी सेवा।**
**हे वाङ्मनःशरीरें करितों विज्ञापना सदा देवा.॥**

(पंतकृत कृष्णविजय, अध्याय ८३।२१०).

**'निर्णयसागर'** छापखान्याचे मालक कै० **जावजी दादाजी चौधरी,** जे. पी. यांनीं इ. स. १८९० च्या जानेवारी महिन्यांत प्राचीन मराठी काव्यांच्या प्रकाशनासाठीं **'काव्यसंग्रह'** नामक १०० पृष्ठांचें मासिक पुस्तक सुरू केलें. त्याच्या संपादनाचा भार कै० **जनार्दन बाळाजी मोडक,** बी. ए. यांनीं स्वीकारिला होता. परंतु ते लगेच सुमारें तीन महिन्यांनीं विषमज्वरानें मृत्यु पावले. त्यांच्या प्रत्यक्ष देखरेखीखालीं 'संग्रहा'चे फक्त तीन अंक निघाले, व त्यांनीं तयार करून ठेविलेल्या सामग्रीचा उपयोग करून आणखी तीन अंक काढण्यांत आले. त्यानंतर कै० **वामन दाजी ओक** यांनीं सदरहू मासिकाच्या संपादनाची जबाबदारी पतकरिली.

२. **'काव्यसंग्रहा'**स सुरुवात झाली, तेव्हां त्यांत **मोरोपंत, वामनपंडित, मुक्तेश्वर, आनंदतनय, अमृतराय** इत्यादि कवींचीं काव्यें खंडशः प्रसिद्ध होऊं लागलीं. प्रस्तुत पर्व हें त्यांपैकींच एक होय. त्यास प्रत्येक अंकांत १६ पृष्ठें दिलीं जात असत आणि अशा रीतीनें पहिलीं ९६ पृष्ठें म्हणजे साधारणपणें पहिले १५ अध्याय कै० **मोडक** यांनीं संशोधिले होते व पुढील सर्व भागाचें संशोधन आमचे पितृव्य व गुरु ती० कै० **वामन दाजी ओक** यांच्या हातून झालें होतें.

३. स्वतंत्रपणें प्रसिद्ध होणाऱ्या ग्रंथांत जो एकसूत्रीपणा असतो, तो एकाद्या नियतकालिकांत ठरीव पृष्ठसंख्येस अनुसरून कित्येक दिवसपर्यंत चालू असलेल्या ग्रंथांत न आढळणें साहजिकच आहे. त्यांतही दुर्दैवानें संपादकीय व्यवस्थेंत फेरबदल झाला, तर एकतंत्रीपणांत खंड पडणें अपरिहार्यच असतें. तसाच थोडासा प्रकार प्रस्तुत पर्वावरील टीपांच्या बाबतींत झाला होता. पण तो दूर करण्याचा यथामति प्रयत्न आम्हीं केला आहे.

४. प्रस्तुत पर्व खंडशः प्रसिद्ध होऊन तें इ. स. १८९१ मध्यें पूर्ण झालें. त्याच्या १००० प्रती इ. स. १९०० मध्यें काढण्यांत आल्या होत्या. परंतु मुंबई येथील विश्वविद्यालयानें व आणखी कांहीं विद्यापीठांनीं हें पर्व वेळोवेळीं आपापल्या उच्च विद्यालयीन परी-

क्षांस 'पाठ्य-पुस्तक' म्हणून नेमिल्यामुळें त्या सर्व प्रती संपण्याचा सुयोग प्राप्त झाला, आणि म्हणूनच ही आवृत्ति तयार करवून ती छापण्याचें धाडस 'निर्णयसागर'चे मालक मोठ्या आनंदानें करीत आहेत. हींत अर्थद्योतक टीपा पूर्वींपेक्षां ज्यास्त दिल्या असून प्रसंगविशेषीं कठीण पद्यांचा अर्थही दिला आहे. ह्याखेरीज मुख्य मुख्य अलंकारांचा निर्देश, पुराणेतिहासविषयक कथासंदर्भ, समानार्थक उतारे, काव्यगुणावगुण इत्यादि बाबींसंबंधाच्या संक्षिप्त पण विपुल व विवेचक टीपाही दिल्या आहेत. तसेंच उपोद्धातांत प्रस्तुत पर्वांत वर्णिलेल्या गोष्टींसंबंधीं ऊहापोह केला असून शेवटीं अकरा परिशिष्टें जोडिलीं आहेत. ह्या सर्व साहित्याचा उपयोग विश्वविद्यालयीन विद्यार्थ्यांस व जिज्ञासु वाचकांस थोडाबहुत होईल, अशी आशा आहे. पण आमचा हा समज कितपत खरा आहे, हें ठरविण्याचें काम आमचें नसून, आमच्या वाचकांचें आहे, हें उघडच आहे.

५. प्रस्तुत पर्वाचे भूतपूर्व संपादक कै० मोडक व कै० ओक यांच्या जीवनचरित्रासंबंधीं थोडीफार माहिती आपणास असावी, असें प्रत्येक वाचकास वाटणें साहजिक आहे, आणि म्हणून आम्हीं ती थोडक्यांत दिली आहे. ह्यापेक्षां ज्यास्त माहिती प्रस्तुत प्रसंगीं देणें शक्य नाहीं. याबद्दल आम्हांस फार दिलगिरी वाटते.

६. पंतांच्या काव्यांत ठिकठिकाणीं व्यवहारज्ञान देणारीं, नीतिमार्गास लावणारीं व उदात्त विचारांनीं भरलेलीं अनेक सुंदर वचनें आहेत, तशींच तीं प्रस्तुत पर्वांतही आहेत. तीं कथासंदर्भापासून वेगळीं काढिलीं, तरी त्यांतील बोधाचें स्वारस्य कमी होत नाहीं, म्हणून तीं सर्व एकत्र करून परिशिष्टांत द्यावीं, असा आमचा विचार होता. परंतु तेणेंकरून पृष्ठसंख्या वाढली असती, व तीं अगदीं शेवटीं असल्यामुळें त्यांच्याकडे वाचकांचें विशेष लक्ष गेलें नसतें. यामुळें तीं त्यांच्या मूळ ठिकाणींच मुद्दाम ठळक अक्षरांत छापलीं आहेत. अशा रीतीनें पृष्ठसंख्या न वाढतां, मूळ ग्रंथ वाचीत असतांच त्यांच्याकडे वाचकांचें लक्ष जाईल. इतकेंच नाहीं, तर पुस्तकाचीं पानें सहज चाळीत असतांही वाचकांचीं मनें वेधलीं जाऊन त्यांतील उपदेशाचा ठसा त्यांच्या मनावर खात्रीनें उमटेल. ही योजना 'निर्णयसागरां'तील ठळक अक्षरमुद्रांच्या वैपुल्यामुळें करितां आली, हें उघडच आहे.

७. ही आवृत्ति तयार करण्याच्या कामीं आम्हांस आमचे मित्र रा० नामदेव श्रीधर मुळे, सेवानिवृत्त शिक्षक, नार्मल स्कूल, उमरावती ( श्रीभानुदासमहाराजांच्या ओंवीबद्ध चरित्राचे कर्ते व अनेक शालोपयोगी पुस्तकांचे लेखक), आणि येथील एक प्रसिद्ध साहित्यसेवक व महानुभावपंथीय वाङ्मयाचे संशोधक–'काव्यसंग्रहग्रंथमालें'तील पंतकृत हरिवंशाच्या पूर्वार्धाच्या प्रस्तावनेंत 'नागपुरस्थ पदवीधर मित्र' असा ज्यांचा उल्लेख करण्यांत आला आहे, ते आमचे वयस्य–रा० नीलकंठ बळवंत भवाळकर, बी. ए. बी. एल्. हायकोर्ट वकील, ह्या मार्मिक व रसिक पंतभक्तांचें आम्हांस सहाय्य झालें. त्यांनीं अनेक दुर्ज्ञेय पद्यांचा अर्थ लावण्याच्या व 'अधिक टीपा' हें परिशिष्ट तयार करण्याच्या कामीं आम्हांस अमूल्य सहाय्य केलें व इतर महत्वाच्या बाबतींत किंत्येक सूचना केल्या. मूळ

## कै० जावजी दादाजी चौधरी, जे. पी.

'निर्णयसागर' छापखान्याचे मालक.



जन्म-इ. स. १८३९ मृत्यु-इ. स. १८९२

पंतकृतींत अशुद्धें राहूं नयेत, अशी आम्हीं काळजी घेतली आहे. ह्या कामीं पंतवंशज रा. रा. रामकृष्ण दत्तात्रय पराडकर यांनीं प्रसिद्ध केलेल्या प्रतीचा आम्हांस फार उपयोग झाला. तसेंच आम्हांस अनेक ग्रंथकारांचे लेख मार्गदर्शक झाले. यास्तव आम्ही ह्या सकल सज्जनांचे अत्यंत कृतज्ञतापूर्वक आभार मानितों.

८. आह्मीं पंतकृत कर्णपर्वाच्या संपादनाच्या बाबतींत रा० पराडकर यांनीं पंतांनीं स्वहस्तानें लिहून ठेविलेल्या पोथीबरहुकूम छापलेल्या प्रतींतील पाठ व लेखनपद्धति हीं कायम ठेविलीं आहेत. परंतु प्रस्तुत पर्वाच्या बाबतींत आह्मीं सदहू प्रतीचा फक्त पाठशुद्धी-पुरताच उपयोग केला असून लेखनपद्धति 'काव्यसंग्रह'–प्रतींतीलच कायम ठेविली आहे. असें करण्याचें कारण पंतांच्या लेखनपद्धतींत धरसोड बरीच आढळते, हें होय. शिवाय मूळ हस्तलिखित पोथीवरून छापण्यासाठीं नक्कल करणारे लेखक, छापखान्यांतील मुद्रक व पूर्वमुद्रितें तपासणारे यांची दृष्टी प्रचलित लेखनपद्धतीवर बसलेली असल्यामुळें त्यांचें बऱ्याच ठिकाणीं पोथींतील लेखनपद्धतीकडे दुर्लक्ष झालें असावें, अशी शंका आल्यावांचून राहात नाहीं, व तशा अर्थाच्या टीपा दोन्ही पर्वांत आह्मीं कित्येक ठिकाणीं दिल्या आहेत. तथापि पंतांच्या लेखनपद्धतीची माहिती ज्या कोणास करून घ्यावयाची असेल, त्यानें आह्मीं संशोधिलेल्या कर्णपर्वाच्या उपोद्घातांतील 'पंतांच्या लेखनांतील विशेष' हें सदर पाहावें. तेथें आम्हीं जे 'विशेष' दर्शविले आहेत, तेच ह्या पर्वांतही आढळतात. तेव्हां त्या ठिकाणचें तें सदर प्रस्तुत पर्वाच्या वाचकांसही मार्गदर्शक होईल, अशी आशा आहे.

९. ह्या कामास इ. स. १९३२ च्या आरंभींच सुरुवात झाली होती, व त्या दृष्टीनें हें ह्यापूर्वीच संपावयास पाहिजे होतें. परंतु हें हातांत घेतल्यापासून आमच्या प्रापंचिक अडचणींस सुरुवात झाली. आमचे वडील बंधु १९३२ च्या मे महिन्यांत स्वर्गवासी झाले. त्यानंतर १९३३ च्या आक्टोबरमध्यें आमच्या सूनबाईनीं आपल्या पाठीमागें आपल्या दोन बाल-प्रतिमा ठेवून परलोकीं गमन केलें. ह्या आमच्या सूनबाई वयानें लहान पण गुणांनीं फार मोठ्या होत्या, आणि म्हणूनच ह्या सुशील, सुविनीत व सद्गुणी मुलीसंबंधीं, '...लोकद्वय-हित सुतचि नव्हे काय, वद, नवा, सून ?' ( आदिपर्व, अध्याय ३०।५७ ) अशी आमची सर्वांची भावना होती.

सूनबाईनीं आमच्या स्वाधीन केलेल्या आपल्या दोन बालप्रतिमांपैकीं एक–आमचा 'बहिश्चर प्राण'च असा पुण्यात्मा पौत्र **शशिमोहन**–गेल्या आषाढी एकादशीस ( तारीख २२।७।३४ रोजीं ) वैकुंठवासी झाला. अशा ह्या आपत्तींमुळें वेळोवेळीं आमचें मनःस्वास्थ्य व शरीरस्वास्थ्य नाहींसें होऊन हें काम पूर्ण होण्यास इतका कालावधि लागला. परंतु ह्या सर्व अडचणींतून आम्हांस श्री० रा० पांडुरंग जावजी शेट, जे. पी. यांनीं सहानुभूतिपूर्वक सांभाळून घेतलें, ह्याबद्दल आम्ही त्यांचे अत्यंत आभारी आहों. आम्हीं मराठी कवींच्या सेवेस सुरुवात केल्यापासून म्हणजे सुमारें गेल्या ३० वर्षांत अशी दुःखदायक संकटपरंपरा आमच्यावर आली नव्हती ! ईश्वरेच्छा बलीयसी !

१०. प्रस्तुत पर्वे **'काव्यसंग्रहां'**त छापून झाल्यानंतर सुमारें एक वर्षानें रा० **श्रीधर विष्णु परांजपे**, बी. ए. यांनीं एक पत्र ( तारीख ८-५-९२ ) पाठवून त्यांत कांहीं शंका व नजरचुकीचीं स्थळें दर्शविलीं होतीं. सदर्हू पत्र 'संग्रहा'ची पुरवणी म्हणून त्या वेळीं प्रसिद्ध केलेलें होतें. आम्हीं त्या पत्राचा उपयोग करून घेतला असून त्यांतील शंकांचें निरसन यथामति केलें आहे. तसेंच सदर्हू प्रतींत क्वचित् चुकून राहिलेले अपपाठ व मुद्रणदोष ह्या आवृत्तींत राहूं नयेत, असा आम्हीं शक्य तितका प्रयत्न केला आहे. तथापि अद्यापही कोणास कांहीं दोष आढळल्यास ते आमच्या नजरेस आणण्याची मेहरबानी करावी. तसेंच आम्हांस न लागलेल्या पद्यांचे अर्थ कोणास लावितां आल्यास तेही त्यांनीं आम्हांस अवश्य कळवावे, म्हणजे ह्या सर्व सूचनांचा विचार पुढील आवृत्तीच्या वेळीं करण्यास सोयीचें होईल.

सीताबर्डी, नागपुर
१८-४-१९३५

**दा० के० ओक.**

# ‘आदिपर्वा’च्या भूतपूर्व संपादकांचें स्मरण.

**मरावें परी कीर्तिरूपें उरावें.।**

रामदास.

## कै० जनार्दन बाळाजी मोडक, बी. ए.

**जनार्दनपंत मोडक** यांचा जन्म ता० ३१ डिसेंबर १८४५ रोजीं रत्नागिरी जिल्ह्यांतील दापोली तालुक्यांत **पंचनदी** गांवीं झाला. यांचे वडील रा० **बळवंतराव कृष्ण मोडक** हे मूळचे मुरूड येथले राहणारे. हे गरिबीमुळें पोटाच्या धंद्यासाठीं कोंकण सोडून पुणें येथें येऊन एका इंजिनियराचे घरीं राहिले व मोजणीचें काम शिकून त्यांनीं मोजणी खात्यांत नोकरी पत्करली. पुढें ते वाढत वाढत मामलेदार झाले व पेन्शन घेतल्यावर जत संस्थानचे कारभारी झाले. नंतर पुढें कोल्हापुर दरबारांतून त्यांस रेकार्डकीपरची नेमणूक मिळाली. तेथेंच ते शेवटपर्यंत होते. जनार्दनपंत यांची आई ते लहान असतांच वारली. ह्यामुळें यांचें पालनपोषण यांच्या चुलत्यांस करावें लागलें. ते पुणें येथें राहत असल्यामुळें जनार्दनपंतांस तेथें राहून अभ्यास करण्यास सोयीचें झालें. मराठी शाळेंतील अभ्यास झाल्यावर पुणें हायस्कुलांत राहून यांनीं १८६६ सालीं म्याट्रिक्युलेशनची परीक्षा दिली व पुढें डेक्कन कॉलेजांत राहून ते १८७० सालीं बी. ए. झाले. मध्यंतरीं कॉलेजांत असतांना त्या वेळचे मराठी ट्रान्स्लेटर मेजर **क्यांडी** साहेब यांच्या आफिसांत ट्रान्स्लेशन एक्झिबिशनरचें कामही यांनीं थोडीं वर्षें केलें. त्याबद्दल त्यांस ४० रुपये दरमहा मिळत असे. शिवाय हायस्कुलांत व कॉलेजांत असतांना यांनीं बऱ्याच स्कॉलरशिपा व बक्षिसें मिळविलीं होतीं. यावरून यांच्या अभ्यासाचा भार यांच्या वडिलांवर फारसा पडला नाहीं, असें म्हटल्यास चालेल. सन १८७१ त त्यांस नासिक हायस्कूलचे फर्स्ट् असिस्टंट मास्टर नेमिलें, पण तेथील हवा त्यांस न मानवल्यामुळें त्यांनीं आपली बदली रत्नागिरीस डेप्युटी एज्युकेशनल इन्स्पेक्टरच्या जागेवर करून घेतली. तें काम त्यांनीं १८७७ पर्यंत केलें. पुढें पुणें येथें त्याच हुद्यावर त्यांची बदली झाली, व त्या जागीं १८८२ पर्यंत त्यांनीं काम केलें. नंतर त्यांस ठाणें येथील हायस्कूल्च्या हेडमास्टरची जागा मिळाली. हेंच काम ते शेवटपर्यंत

कै० जनार्दन बाळाजी मोडक, बी. ए.

महाराष्ट्र 'काव्यसंग्रहा'चे संपादक व ठाणें येथील हायस्कुलाचे हेडमास्तर.



जन्म-इ. स. १८४५ मृत्यु-इ. स. १८९०

करीत होते. हें हायस्कूलही यांनीं बरेंच लौकिकास आणलें. मध्यंतरीं १८८५।८६ मध्यें धुळें हायस्कूलच्या हेडमास्टरचें कामही यांनीं केलें होतें.

जनार्दनपंत यांस मराठी कविता वाचण्याचा नाद लहानपणापासून होता. पुण्यास असतां ते व कै० परशुरामपंततात्या गोडबोले हे जवळ जवळ राहत असत. त्यामुळें यांस त्यांच्याकडे मराठी कविता उत्तम प्रकारें वाचावयास चांगली संधी सांपडली. पुढें यांनीं पुष्कळ काव्यें, बखरी वगैरे हस्तलिखित ग्रंथांचा संग्रह करून १८७८ च्या जानेवारी-पासून पुणें येथें 'काव्येतिहाससंग्रह' नांवाचें मासिक पुस्तक सुरू केलें. त्यांतील मराठी कवितेच्या प्रकाशनाचें काम यांनीं आपलेकडे घेतलें व कै० विष्णुशास्त्री चिपळूणकर व रा० ब० काशिनाथ नारायण साने यांच्याकडे अनुक्रमें संस्कृत कविता व इतिहास हे भाग सोंपविले. ह्याप्रमाणें कामाची वांटणी होऊन तीप्रमाणें सुरळितपणें चार वर्षें काम चाललें. परंतु पुढें विष्णुशास्त्री यांनीं 'काव्येतिहाससंग्रहां'तून आपलें आंग काढून घेतल्यावर त्यांतील संस्कृत भागही रा० मोडक यांसच तपासणें प्राप्त झालें. तो भाग 'निर्णयसागर' छापखान्याचे मालक शेट जावजी दादाजी यांनीं इ. स. १८८६ त 'काव्यमाला' नांवाचें स्वतंत्र संस्कृत मासिक पुस्तक काढण्यास आरंभ केल्यामुळें इ. स. १८८७ पासून त्यांनीं आपले पुस्तकांतून अजीबात गाळून टाकला व फक्त मराठी कविता व इतिहास हे दोन भाग चालू ठेवले. सदहू मासिक पुस्तक "सुरू झालें तेव्हां त्याची अपूर्वाई असल्यामुळें, पुष्कळ लोक त्याचे वर्गणीदार झाले, व ते वर्गणीही वेळच्या वेळीं देत असत. त्यामुळें पुस्तकही वेळच्या वेळीं निघे. पण पुढें वर्गणीदारांकडून वर्गणी येण्यास जसजसा विलंब होऊं लागला, तसतसें हें पुस्तक मागासत चाललें.......वर्गणीही वर्गणीदारांकडे फार थकली. एकंदर हिशेब पहातां...दीड हजार रुपयांवर वर्गणी थकली.... अशा स्थितींत हें पुस्तक चालू ठेवणें प्रशस्त न वाटल्यामुळें [त्याचा] शेवटचा म्हणजे इ. स. १८८८ च्या डिसेंबरचा अंक काढून" तें मासिक पुस्तक रा० मोडक यांनीं बंद केलें. त्यांत महाराष्ट्राच्या इतिहासासंबंधीं बखरी व कागदपत्रें, आणि संस्कृत, मराठी व व्रजभाषेंतील काव्यें मिळून सुमारें ६० ग्रंथ प्रसिद्ध झाले आहेत. ते ग्रंथ पूर्वी लोकांस ऐकूनही माहीत नव्हते. पण केवळ रा० मोडक यांच्या परिश्रमांमुळें त्यांचा उद्धार होऊन त्यांचा संग्रह करणें शक्य झालें. परंतु सध्यां तर ते छापलेले ग्रंथही दुर्मिळ होत चालले आहेत.

कै० जावजी शेट यांनीं 'काव्यमाला' सुरू केल्यापासून तशा धर्तीवर महाराष्ट्रकाव्य-ग्रंथांच्याही उद्धारार्थ एकादें मासिक पुस्तक काढावें, अशा सूचना अनेक महाराष्ट्रभाषाभि-मानी विद्वानांकडून त्यांस करण्यांत आल्या. त्याप्रमाणें उत्तम उत्तम काव्यग्रंथ सामान्य वाचकांस शक्य तितक्या कमी किंमतींत प्राप्त करून देण्याच्या हेतूनें त्यांनीं महाराष्ट्र 'काव्यसंग्रह' नांवाचें १०० पृष्ठांचें मासिक पुस्तक सुरू करावें, असें ठरविलें. परंतु हें काम योग्य रीतीनें पार पाडील असा कोणी विद्वान गृहस्थ बरेच दिवस त्यांच्या लक्षांत आला

---

१. काव्येतिहाससंग्रह-शेवटची विज्ञापना, तारीख १ डिसेंबर १८८९.

नाहीं. तथापि गुणी जनांची पारख करण्याचें कौशल्य त्यांच्या अंगीं भरपूर असल्यामुळें त्यांनीं रा० मोडक यांची अचूक निवड केली आणि शेटजींचा शब्द खालीं पडूं न देतां त्यांनीं ग्रंथसंशोधनाचें, अर्थनिर्णायक व अवांतर माहितीच्या टीपा देण्याचें आणि कवींचीं चरित्रें वगैरे लिहिण्याचें काम पतकरिलें. यामुळें शेटजींनीं उपरिनिर्दिष्ट मासिक पुस्तक १८९० च्या जानेवारीपासून सुरू केलें. परंतु रा० मोडक यांच्या अकालमृत्यूमुळें त्यांच्या हातून त्याचे फक्त तीनच अंक निघाले !

रत्नागिरीस असतां जनार्दनपंतांस ज्योतिषशास्त्राची गोडी लागली व ह्या शास्त्रांत बरीच पारंगतता मिळविल्यावर यांनीं 'भास्कराचार्य व तत्कृत ज्योतिष' आणि 'वेदांग ज्योतिषा'चें मराठी भाषांतर हीं दोन पुस्तकें प्रसिद्ध केलीं. या विषयांत यांची इतकी गति झाली कीं, सायन पंचांग व निरयन पंचांग यांच्या संबंधानें यांनीं प्रसिद्ध 'स्फुटवक्ता अभियोगी' यांच्या साह्यानें एक मोठा वाद उपस्थित करून निरयन पद्धतीनें केलेलें हल्लींच्या पंचांगांतील गणित चुकलेलें आहे व त्यांत फेरफार करणें आवश्यक आहे, असें सिद्ध करून दाखविलें.

यांचा स्वभाव निष्कपटी व निरभिमानी असे. यांच्यासारखे मेहनती, उद्योगी, सदाचारी व सरळ स्वभावाचे पुरुष फारच विरळा. ह्यांस निरुपयोगी वेळ दवडणें आवडत नसे. शाळेंतील काम आटपून घरीं आले म्हणजे हे स्वस्थ न बसतां आपल्या आवडीच्या विषयांवर लेख लिहीत बसत. हे लेख म्हणजे 'विविधज्ञानविस्तार' मासिक पुस्तकांतून प्रसिद्ध झालेलें भास्कराचार्यकृत 'लीलावती'चें मराठी भाषांतर, 'कविचरित्र' व अनेक प्रसंगीं प्रसिद्ध झालेले ज्योतिषशास्त्रासंबंधीं लेख हे होत. 'बालबोध' व 'सृष्टिज्ञान' मासिक पुस्तकांतील ज्योतिष-संबंधीं लेख यांच्याच साहाय्यानें लिहिले गेले आहेत. 'निबंधमाला' व 'निबंधचंद्रिका' या मासिक पुस्तकांत 'ज० बा० मो०' या सहीनें यांचीं नानाविषयविवेचक कित्येक पत्रें प्रसिद्ध झालीं आहेत. 'अरुणोदय', 'इंदुप्रकाश' वगैरे वृत्तपत्रांतूनही यांचे बरेच लेख प्रसिद्ध झाले आहेत. हेमंतोत्सव व वसंतोत्सव ह्या व्याख्यानमालिकेंतही यांनीं व्याख्यानें दिलीं आहेत. 'जगाचा इतिहास' या नांवाचा एक भाषांतररूप ग्रंथही यांनीं तयार केला आहे. बांबेग्याझेटियरच्या आधारें 'ठाणें जिल्ह्याचा इतिहास' यांनीं लिहिला आहे, व तो छापून प्रसिद्ध झाला आहे. लोकांमध्यें शास्त्रीय ज्ञानाची अभिरुची उत्पन्न होण्याकरितां 'लघुशास्त्र-ग्रंथमाला' या नांवाची एक पुस्तकमालिका लिहावी या हेतूनें यांनीं जे. नॉर्मन् लॉकियर-कृत ज्योतिषशास्त्र व पिंगलमुनिकृत छंदःशास्त्र या दोन ग्रंथांचीं मराठी भाषांतरें केलीं आहेत. या सर्व ग्रंथांवरून व लेखांवरून यांचें मराठी कविता व ज्योतिषशास्त्र यांविषयींचें ज्ञान किती अगाध होतें, हें स्पष्ट होतें. असे हे दीर्घोद्योगी विद्वान् गृहस्थ ता० १९ मार्च १८९० रोजीं विषमज्वरानें एकाएकीं मृत्यु पावले.

---

# कै० वामन दाजी ओक.

**कष्टें काया झिजवावी। उत्कट कीर्ति उरवावी।**
**चटक लावुनी सोडावी। कांहीं एक.॥**

रामदास.

**वामनरावजीं**चा जन्म रत्नागिरी जिल्ह्यांतील चिपळूण तालुक्यांतल्या **हेदवी** नांवाच्या खेड्यांत इ० स० १८४५ या वर्षी झाला. या गांवीं **दाजी काशिनाथ ओक** या नांवाचे खाऊन पिऊन सुखी व चांगले संभावित गृहस्थ रहात होते. त्यांच्या मुलांपैकीं **वामनरावजी** हे पांचवे. यांच्या बालपणच्या गोष्टी सांप्रत फारशा उपलब्ध नाहींत. परंतु इतकें मात्र कळतें, कीं लहानपणीं घरगुती पंतोजीच्या हाताखालीं हळू हळू थोडा बहुत विद्याभ्यास झाल्यावर, त्यांच्या वडिलांनीं त्यांस रत्नागिरीच्या हायस्कुलांत इंग्रजी शिकावयास पाठविलें. तेथें त्या वेळीं डॉ० सर **रामकृष्ण गोपाळ भांडारकर** हे हेडमास्तर होते. **वामनरावजीं**चा ओढा शिकण्या-कडे स्वाभाविकच होता, आणि त्यांस डॉ० **भांडारकरां**सारखे गुरु मिळाले; तेव्हां त्यांचा अभ्यास उत्तम व्हावा यांत कांहीं नवल नाहीं. इतर विषयांपेक्षां संस्कृताकडे **वामनराव-जीं**चें लक्ष फार असे. ज्याचा ज्या विषयांत भर असतो त्याची त्या विषयांत चांगली गति होते आणि तोच विषय शिकविणारा जर उत्तम गुरु मिळाला, तर ती गति फारच त्वरित होते. डॉ० **भांडारकर** यांस संस्कृताची आवड फार असून या विषयांत ते चांगले निष्णात होते, व हा विषय आपल्या विद्यार्थ्यांस शिकविण्यास त्यांस फारच आनंद वाटे. **वामनरावजी** संस्कृत मोठ्या उत्सुकतेनें शिकत, म्हणून त्यांजवर त्यांच्या गुरूंचा फारच लोभ जडला व त्यांनीं संस्कृतांत चांगलें प्रावीण्य संपादन केलें. पुढें इ० स० १८७० या सालीं त्यांची म्याट्रिक्युलेशनची परीक्षा उतरली. या परीक्षेकरितां मातृभाषेखेरीज अन्य भाषा घ्यावी लागते ती **वामनरावांनीं** आपल्या आवडीची संस्कृत भाषा घेतली होती. तींत ते प्रवीण असल्यामुळें पहिले येऊन, त्यांस **जगन्नाथ शंकरशेटची** २५ रुपये दरमहाची स्कॉलरशिप मिळाली; यामुळें संस्कृतासंबंधानें त्यांचा विशेष लौकिक झाला. ही बहुमानाची स्कॉलरशिप संपादून **वामनरावजी** कांहीं दिवस मुंबईतील एल्फिन्स्टन् कॉलेजांत व नंतर तेथल्याच विल्सन कॉलेजांत शिकत होते. परंतु त्यांचा विश्वविद्यालयांतील अभ्यासक्रम फार दिवस चालला नाहीं. कांहीं घरगुती अडचणींमुळें त्यांस तो सोडून द्यावा लागला, आणि त्यानंतर त्यांनीं मध्यप्रांतांतील नागपुर येथील सिटी स्कुलांत इ. स. १८७५ या वर्षी उपगुरूची जागा स्वीकारिली. सदरहू हायस्कुलांत ६ वर्षेपर्यंत वरिष्ठांस संतोष होण्याजोगें काम केल्यावरून, त्याच शाळेंत त्यांस हेडमास्तरची जागा मिळाली. त्या जागेवर त्यांनीं २-२॥ वर्षें काम केलें. या ७-८ वर्षांच्या मुदतींत त्यांचा व 'निबंधमाला'जनक **विष्णुशास्त्री चिपळूणकर** यांचा लेखनरूपी मोठ्या कडाक्याचा वाद झाला. तो नीट पाहिला असतां असें आढळून येईल कीं,

## कै० वामन दाजी ओक.

महाराष्ट्र 'काव्यसंग्रहा'चे संपादक व रायपुर येथील हायस्कुलाचे हेडमास्तर.



जन्म-इ. स. १८४५ मृत्यु-इ. स. १८९७

शास्त्रीबोवांपेक्षां कित्येक गोष्टींत वामनरावांनींच मोरोपंतांचें काव्यरचनासामर्थ्य अधिक प्रकट केलें आहे. वामनरावांच्या ह्या लेखांमुळें मोरोपंतांविषयीं आपण केलेल्या विधानांत आपले कांहीं दोष झाले असावे, असें शास्त्रीबोवांस पुढें वाटूं लागलें, असें त्यांच्या पुढल्या लेखांवरून दिसून येतें. शास्त्रीबोवांस आपले दोष कबूल करावयास लावल्यामुळें महाराष्ट्र-काव्यांच्या मार्मिक ज्ञानाबद्दल वामनरावांची कीर्ति सर्वत्र पसरली.

नागपुरच्या सिटी स्कुलांतील हेडमास्तरची जागा त्यांनीं इ० स० १८८४ या सालीं सोडिली. नंतर एक वर्षपर्यंत ते नागपुर येथील मेल नॉर्मलस्कूलचे सुपरिंटेंडेंट होते. नंतर संबलपुर हायस्कुलावर ते पांच वर्षेपर्यंत हेडमास्तर होते. येथेंही त्यांनीं पूर्वींप्रमाणेंच वरिष्ठांस पसंत पडण्यासारखें काम केलें.

महाराष्ट्र काव्यांवर टीपा देऊन व तीं सुबोध करून 'काव्यसंग्रह' नांवाच्या मासिक पुस्तकाच्या द्वारें प्रसिद्ध करण्याचें काम, जनार्दनपंत मोडक हे करीत होते. ते सदर्हू मासिकाचे फक्त तीन अंक निघाल्यावर म्हणजे इ० स० १८९० च्या मार्च महिन्यांत निवर्तले. तत्पूर्वींच वामनरावजींची महाराष्ट्रकाव्यज्ञाननिपुणतेबद्दल प्रसिद्धी झाली होती. म्हणून, 'काव्यसंग्रहा'चे मालक रा० जावजी दादाजी शेट यांनीं वामनरावजींस कै० मोडक यांचें काम चालविण्यास विनंति केली. आपलें आवडतें काम आपणास करावयास मिळत आहे, हें आपलें मोठें भाग्य होय, असें समजून त्यांनीं शेटजींची विनंति मान्य केली व हा लोक सोडून जाईपर्यंत त्यांनीं 'काव्यसंग्रहा'चें काम विद्वान व रसिक यांस मान्य होईल असें मोठ्या आस्थेनें व झटून केलें. श्रमाच्या मानानें त्यांस मोबदला मिळत नव्हता, म्हणून 'देणावळ तशी धुणावळ' असा जर त्यांनीं प्रकार केला असता, तर 'काव्यसंग्रहा'कडे जसें लोकांचें लक्ष्य लागलें होतें, तसें कधींच लागतेंना. 'काव्यसंग्रहा'चें काम त्यांच्या आवडीच्या कामांपैकीं असल्यामुळें, मोबदल्याकडे न पाहतां, मोठे श्रम घेऊन त्यांनीं तें केलें. केवळ द्रव्यसंपादक लेखकास वामनरावजींनीं आस्थापूर्वक केलेलें काम कधींही करितां यावयाचें नाहीं. पुष्कळ मराठी काव्यें, त्यांचा अर्थ न कळल्यामुळें लोकांस दुर्बोध वाटत होतीं. तीं वामनरावजींच्या टीपांमुळें लोकांस सुलभ झालीं. शास्त्रीबोवांच्या प्रयत्नानें मयूरादि कवींची योग्यता लोकांस कळली; परंतु त्यांच्या काव्यांची खरी योग्यता त्यांस वामनरावांच्या हातच्या टीपा मिळाल्यामुळेंच कळली. तेव्हां जीं मराठी काव्यें पूर्वीं टाकाऊ वाटत होतीं, तींच विश्वविद्यालयांच्याही परीक्षांत नेमण्यासारखीं आहेत, असें मोठमोठ्या महाराष्ट्रकाव्यानभिज्ञ विद्वानांसही वाटूं लागलें. हा सर्व परिणाम केवळ वामनरावजींच्या प्रयत्नांचा आहे.

इ० स० १८९१ या वर्षीं वामनरावजींची बदली रायपुर येथील हायस्कूलच्या हेडमास्तरच्या जाग्यावर झाली. ते अखेरपर्यंत त्या जागीं होते. या जाग्यावर असतां लोकशिक्षणाचीं महत्त्वाचीं दोन कामें ते करीत होते. एक विद्यालयांतील हेडमास्तरचें काम केवळ विद्यार्थ्यांस शिकवावयाचें हें होतें. दुसरें काम म्हटलें म्हणजे 'काव्यसंग्रहा'चें. शिक्षकाच्या नात्यानें पहिलें काम ते करीत होते, व दुसरें काम शिक्षकांचे शिक्षक या नात्यानें त्यांनीं चालविलें होतें. हेडमास्तर ह्या नात्यानें त्यांनीं केलेलें काम किती प्रशंसनीय होतें, हें त्यांच्या

मृत्यूनंतर लगेच मे० **अलेक्झांडर मनरो**, एम्. ए., मध्यप्रांताच्या शाळाखात्याचे डायरेक्टर यांनीं मुद्दाम एक पत्र नागपुर येथील 'न्यायसुधा' नांवाच्या साप्ताहिकास पाठवून त्यांत त्यांच्या गुणांचें व कर्तबगारीचें जें वर्णन केलें आहे, त्यावरून दिसून येतें. ते शिस्तीचे मोठे भोक्ते होते. परंतु त्यांचा सरळ स्वभाव व शुद्ध आचरण यांमुळें त्यांच्या हाताखालील शिक्षक व विद्यार्थी यांस त्यांच्याविषयीं फार पूज्यबुद्धि वाटत असे. 'काव्यसंग्रहा'च्या द्वारें त्यांनीं महाराष्ट्रीयांची व मराठी भाषेची जी बहुमोल सेवा बजावून अलौकिक कीर्ति मिळविली आहे, तिच्या संबंधीं जितकें विस्तारपूर्वक लिहावें तितकें थोडेंच होईल. म्हणून त्या बाबतींत येथें कांहीं प्रयत्न न करणेंच बरें, असें आम्हांस वाटतें.

**वामनरावजींचें** हें दुसरें म्हणजे काव्यार्थप्रकटीकरणाचें काम फार कठीण होतें. एकाद्यास काव्यार्थ समजला म्हणजे तो दुसऱ्यास समजावितां येईलच असें कांहीं नाहीं. कित्येक शिक्षकांस कांहीं गोष्टी चांगल्या समजलेल्या असतात; परंतु, दुसऱ्यास त्या नीट समजावून देतां येत नाहींत. कित्येकांस कांही गोष्टी दुसऱ्यास नीट समजावून सांगण्याचें सामर्थ्य असतें; परंतु, त्या गोष्टींचें मर्म त्यांना स्वतःलाच कळलेलें नसतें. या दोन्ही प्रकारच्या शिक्षकांची योग्यता तितपतच असते. परंतु जे शिक्षक स्वतः एकाद्या गोष्टीचें मर्म जाणून, ती दुसऱ्यास उत्तम रीतीनें शिकवितात ते उत्तम शिक्षक होतात. एवढेंच नव्हे, तर ते शिक्षकांचे शिक्षक किंवा गुरूंचेही गुरू होत. **वामनरावजी** अशा उच्च प्रतीचे गुरु होते.

येथवर **वामनरावजींनीं** केलेलें अध्ययन व अध्यापन या दोन गोष्टींचा विचार झाला. आतां त्यांच्या ग्रंथकर्तृत्वगुणांसंबंधानें थोडक्यांत विचार करावयाचा आहे. **वामनरावजींस** मराठी भाषा फारच मार्मिक रीतीनें लिहितां येत होती. ही गोष्ट, 'निबंधमाले'त **शास्त्री**बोवांशीं वाद करण्यास्तव त्यांनीं लिहिलेलीं जीं पत्रें प्रसिद्ध आहेत, त्यांवरून व 'काव्यसंग्रहां'तील त्यांच्या हातच्या समर्पक टीपांवरून सहज कळण्यासारखी आहे. लहानपणापासून त्यांस लेखनव्यवसायाची फार आवड असे. त्यांचे कित्येक लेख सर्वमान्य 'विविधज्ञानविस्तार,' 'दंभहारक,' 'अबलामित्र,' 'सद्धर्मदीप,' या मासिक पुस्तकांत आणि 'इंदुप्रकाश'सारख्या प्रमुख व 'नागपुरसमाचार'सारख्या स्थानिक वृत्तपत्रांत आलेले आहेत. हे भिन्न भिन्न नियतकालिकांत प्रसिद्ध झालेले निबंध कोणी पुस्तकरूपानें एकत्र ग्रथित करील, तर त्या पुस्तकापासून वाचकांस मोठा लाभ होईल. **वामनरावजींनीं** लॉर्ड **बेकन** या प्रख्यात शास्त्रज्ञाचें चरित्र मराठींत फारच प्रौढ आणि सरस भाषेनें लिहिलें आहे. याखेरीज त्यांनीं **बाबा नानक** यांचें चरित्र, वासवदत्ताकथासार, कादंबरीकथासार, यांसारखीं छोटेखानी पुस्तकेंही लिहिलीं आहेत. तसेंच त्यांनीं 'इंदुप्रकाशा'ची 'सरलार्थबोधिनी गीता' कांहीं दिवस चालविली होती, तिचे कित्येक अंक उपलब्ध आहेत. या सर्व गद्य लेखांवरून त्यांस मराठी भाषा किती साध्य झाली होती, याची सहज अटकळ करितां येईल. त्यांनीं श्रीमन्माधवनिधन, गणपतिनिधनविलाप, आर्याशतक, श्लोकशतक, कृष्णकुमारी ( अप्रसिद्ध ) इत्यादि काव्यें रचलीं आहेत. त्यांखेरीज आणखी कांहीं किरकोळ कविताही त्यांनीं रचिल्या आहेत. त्या काव्यांचें पर्यालोचन

केलें असतां, केवळ काव्यांचें मर्म लोकांस स्पष्ट करून दाखविण्यांतच ते पटु होते असें नव्हे, तर तसलीं काव्यें रचण्यासही ते समर्थ होते, असें दिसून येतें.

वामनरावजी जसे ग्रंथकार होते, तसेच ग्रंथपरीक्षकही उत्तम होते. आधुनिक कविमंडळीनें जळगांव येथें चालविलेल्या 'काव्यरत्नावली' नामक मासिकाच्या परीक्षकमंडळांतील ते एक उत्तम परीक्षक होते. ते केवळ परीक्षक होते असें नव्हे, तर उत्तम टीकाकारही होते. पुस्तकांतील गुण आणि दोष मोठ्या मार्मिकपणानें ते आपल्या टीकेंत वर्णीत. त्यांच्या टीकेची भाषा अगदीं गंभीर व भारदस्त असे, व तींत जागजागीं उपयुक्त व मार्गदर्शक सूचना भरलेल्या असून, ग्रंथकारांस उत्तेजन देण्याकडे तिचा कल असे. यामुळें ग्रंथलेखकांस आपल्या चुका सुधारण्याचा प्रयत्न करण्यास व दुसरे ग्रंथ लिहिण्यास फार उत्तेजन मिळत असे.

वामनरावजींना मराठी काव्यांसंबंधीं जें महत्त्व व आस्था वाटत असे तितकीच महाराष्ट्राच्या इतिहासाविषयीं देखील वाटत असे. ह्या त्यांच्या कळकळीचें दृश्य फळ म्हणजे त्यांनीं मोठ्या प्रयासानें मिळवून व अर्थनिर्णायक वगैरे टीपा देऊन 'नागपुरकर भोंसल्याची बखर' व 'नागपुरकर भोंसल्यांसंबधीं कागदपत्र' हे 'काव्येतिहाससंग्रहां'त प्रसिद्ध केलेले दोन ग्रंथ होत. ह्या ग्रंथांच्या छापील प्रती देखील सध्यां दुर्मिळ असून वामनरावजींनीं मूळ मोडी लिपींतील कागदपत्रांचा परामर्श त्या वेळीं घेतला नसता, तर तीं काळाच्या भक्ष्यस्थानीं पडलीं असतीं, व नागपुरकर भोंसल्यांच्या उज्वल पराक्रमांवर प्रकाश पाडणारीं हीं अत्यंत महत्वाचीं साधनें नामशेष झालीं असतीं. पण तीं वामनरावजींनीं प्रकाशित करून ठेवल्यामुळें आज भोंसल्यांच्या इतिहासाच्या बाबतींत इतिहाससंशोधकांस आधारभूत व मार्गदर्शक झालीं आहेत. सारांश, इतिहासाच्या बाबतींतही त्यांनीं मोठी महत्वाची कामगिरी करून ठेविली आहे.

वामनरावजी संबलपुर येथें असतांना त्यांचें लक्ष तेथील जुन्या पंडितांच्या संग्रहीं असलेल्या उडिया (उत्कल) लिपींत ताडपत्रांवर लिहिलेल्या संस्कृतग्रंथांकडे वेधलें. त्यासाठीं ते मुद्दाम ती भाषा शिकले व त्यांनीं कांहीं अप्रसिद्ध ग्रंथांच्या नकला देवनागरी (बाळबोध) लिपींत करून त्या 'निर्णयसागर' छापखान्यांत प्रसिद्ध होत असलेल्या 'काव्यमाला' नामक मासिकाचे संपादक कै॰ पंडित दुर्गाप्रसाद यांच्याकडे पाठविल्या. त्यांपैकीं कृष्णानंदविरचित 'सहृदयानंद' काव्य प्रसिद्ध झालें आहे. आणखी कोणकोणते ग्रंथ त्यांनीं लिहून घेऊन पाठविले होते, हें समजण्यास कांहीं साधन उपलब्ध नाहीं.

अशीं अनेक प्रकारचीं लोकोपयोगी व अत्यंत महत्वाचीं परंतु फारच दगदगीचीं व त्रासाचीं कामें निरपेक्षबुद्धीनें व निरलसतेनें केवळ विद्येचा व लोकहिताचा छंद म्हणून ते करीत असत.

'काव्यसंग्रहां'त प्रसिद्ध करावयाच्या काव्यांचें मर्म जाणून टीपा लिहिल्या कीं आपलें काम आटपलें, असें त्यांचें धोरण नसे. कारण त्यांची दृष्टि केवळ पैशावर नव्हती. 'काव्यसंग्रहा'चें काम हें आपलें घरचेंच काम आहे, असें त्यांस वाटे. म्हणूनच जिवापाड श्रम करून, त्यास अधिकाधिक ग्राहक मिळविण्याच्या शोधांत ते असत. तसेंच ज्या मोरोपंतांचे ते निस्सीम

भक्त होते, त्यांचीं काव्यें पंढरपुरास त्यांच्या वंशजांकडे मिळण्याचा संभव असल्यामुळें तीं मिळविण्याकरितां, उन्हाळ्याच्या सुटींत पंढरपुरास जावें म्हणून ते भुसावळेपलीकडे मायजीपर्यंत गेले होते. परंतु ते आगगाडींत तापानें आजारी पडले, यामुळें त्यांस आपला उद्देश तेथेंच ठेवून मागें परतावें लागलें. नागपुरास परत आल्यावर त्यांचें दुखणें फारच वाढलें व इ. स. १८९७ च्या जून महिन्याच्या तेराव्या तारखेस रात्रीं त्यांचें देहावसान झालें. ते रायपुरपर्यंत जाऊन आपल्या मुलाबाळांस भेटूंही शकले नाहींत !

वामनरावजी यांच्या आंगच्या अनेक गुणांचें वर्णन करणें इष्ट असलें, तरी तें विस्तरभयास्तव येथें शक्य नाहीं. तथापि त्यांच्या आंगचा अविरत विद्याव्यासंग, उद्योगसातत्य, कर्तव्यतत्परता, सौजन्य, विनयशीलता, निर्लोभता इत्यादि बहुमोल व अनुकरणीय गुणांचा नुसता नामनिर्देश करून आम्ही आपली लेखणी थांबवितों.[1]

---

१ ती. के. वामन दाजी ओक हे इ. स. १८८४-८५ मध्यें ज्या शाळेचे सुपरिटेंडेंट होते त्याच शाळेंत त्याच हुद्यावर इ. स. १९११ ते १५ व १९३२ ते ३५ मध्यें काम करण्याचा योग आला व त्याच शाळेंतून आम्ही सेवानिवृत्त होत आहों, हें आमचें महद्भाग्य होय. कै० ओक यांचें एक मोठें छायाचित्र नुकतेंच आम्ही सदहू शाळेस नजर केलें. त्याचा उद्घाटनसमारंभ कर्नल कृष्णाजी विष्णु कुकडे, सी. आय्. ई, आय्. एम्. एस्, रिटायर्ड इन्स्पेक्टर ऑफ सिव्हिल हॉस्पिटल्स, मध्यप्रांत व वऱ्हाड, नागपुर, यांच्या हस्तें तारीख १८-३-३५ रोजीं झाला. सदहू समारंभाकरितां कै० ओक यांचा जो चरित्रात्मक लेख तयार केला होता, त्यांतील महत्वाचा भाग वर दिला आहे.

कै० ओक यांच्या मृत्यूनंतर थोड्याच वर्षांनीं त्यांचें एक छायाचित्र त्यांच्या शिष्यांनीं सिटी स्कुलास नजर केलें, तें त्या शाळेंत आहे.

दा. के. ओक.

# उपोद्घात.

[ त्या ] श्रीव्यासप्रभुला वंदुनि, मी भारतेतिहास-रस ।
पाजीन तुम्हा श्रोत्यां, अमृतरसाहूनि फार हा सरस. ॥
( आदिपर्व, अध्याय ८ गीति ४९ )

**महाभारत** हा आपला एक अत्यंत पूज्य व महत्वाचा असा राष्ट्रीय ग्रंथ आहे. यांत धर्म व व्यवहार यांची यथोचित सांगड घातलेली असून इतिहास व काव्य यांचें अत्यंत मधुर मीलन झालेलें आहे. हा ग्रंथ प्रथम महर्षि **व्या**सांनीं रचिला व पुढें त्याच्या सुधारून वाढविलेल्या आवृत्ति **वै**शंपायन व **सौ**ती यांनीं तयार केल्या. यांत मुख्यतः **कौ**रव व **पां**डव यांचें जें मोठें घनघोर युद्ध झालें त्याचें वर्णन असून प्रसंगोपात्त अनेक विषयांचें विवरणही केलेलें आहे.

**व्या**स हे **कौ**रव**पां**डवांचे पितामह होते. ते भारती युद्धाच्या वेळीं हयात होते व त्या युद्धानंतर सुमारें तीन वर्षेपर्यंत सतत परिश्रम करून त्यांनीं हा ग्रंथ रचिला. आपल्या दुर्योधनादि दुष्ट व दुराग्रही नातवांनीं केलेल्या 'भाऊबंदकी'चा परिणाम त्यांस कसा भोंवला इत्यादि इतिहास वर्णन करून त्यांनीं तो आपल्या भावी वंशजांस व इतर लोकांस मार्गदर्शक व्हावा, अशी या ग्रंथाच्या द्वारें योजना करून ठेविली आहे. **पां**डवांनीं **कौ**रवांवर जय मिळविला, ह्या गोष्टीचें निदर्शक 'जय' हें नांव व्यास त्यांनीं दिलेलें आढळतें, व तें अन्वर्थकही आहे. क्वचित् '**नर-नारायण**विजय' म्हणजे **कृष्णा**र्जुनांचा विजय, असेंही नांव ह्या ग्रंथास दिलेलें आढळतें.

---

१. त्रिभिर्वर्षैः सदोत्थायी कृष्णद्वैपायनो मुनिः । महाभारतमाख्यानं कृतवानिदमद्भुतम्. ॥ ( मूळ आदिपर्व, अध्याय ६२।५२ ). तसेंच 'त्रिभिर्वर्षैर्लब्धकामः कृष्णद्वैपायनो मुनिः' ( अध्याय ६२।४१ ) असें वचन आहे.

२. 'जयो नामेतिहासोऽयम्' ( अध्याय ६२।२० ) असें वचन आहे. तथापि ह्या ग्रंथास 'भारतकथा' व 'महाभारत' अशीं अन्य नांवें होतीं, असें पुढील उल्लेखांवरून दिसतें:-(१) पुण्यां च 'भारतकथां' शृणुयाच्च नित्यम्. । ( अध्याय २।३९५ ), व (२) भरतानां महज्जन्म 'महाभारत'मुच्यते. ( अध्याय ६२।३९ ). पण हे उल्लेख मूळ व्यासरचित 'जय' ग्रंथांतीलच आहेत कीं काय हें समजणें शक्य नाहीं.

व्यासरचित मूळ 'जय' ग्रंथाची पद्यसंख्या किती होती हें समजण्यास कांहीं साधन नाहीं. पण पांडवांचा नातू जनमेजय यानें केलेल्या सर्पसत्राच्या वेळीं व्यासशिष्य वैशंपायन यांनीं त्याची संख्या २४,००० पर्यंत वाढविली. पुढें तोच कथाभाग, त्यांत आणखी आख्यानें व उपाख्यानें यांची भर घालून सौतीनें त्या काळचें सनातन धर्माचें केंद्र जें अयोध्याप्रांतांतील गंगेच्या कांठचें नैमिषारण्य, त्यांत द्वादशवार्षिक सत्र करीत असलेल्या शौनकादि ऋषींस सांगितला. अशा रीतीनें ह्या ग्रंथाची पद्यसंख्या १,००,००० पर्यंत वाढली, अशी समजूत आहे, आणि म्हणूनच प्रत्येक अध्यायाच्या शेवटीं 'शतसाहस्र्यां संहितायां' अमुक 'अध्याय' असा उल्लेख आढळतो. तथापि ह्या ग्रंथाच्या ज्या निरनिराळ्या प्रती सध्यां उपलब्ध आहेत, त्यांत कमींत कमी ८४,००० व ज्यास्तींत ज्यास्त ९६,००० पद्यें आढळतात. हरिवंश हा देखील महाभारताचाच एक भाग असें समजतात. तेव्हां त्याची ग्रंथसंख्या १२,००० ही हिशेबांत धरल्यास सर्व ग्रंथाची पद्यसंख्या सरासरी एक लक्ष किंवा त्यापेक्षां थोडी ज्यास्त होते. परंतु श्रीधरस्वामींनीं आपल्या 'पांडवप्रतापां'त 'हरिवंशासमवेत । अवघें सवा लक्ष भारत ।' (अध्याय ११५१) असें म्हटलें आहे. यावरून महाराष्ट्रांत निरनिराळ्या काळीं निरनिराळ्या प्रती प्रचारांत होत्या, असें दिसतें.

भारती युद्धानंतर केवळ तीन वर्षांतच व्यासांनीं हा ग्रंथ निर्माण केला, तेव्हां त्यांत सदर्हू युद्धानंतरच्या तीन वर्षांच्या काळांत घडलेल्या घटनांचेंच वर्णन असलें पाहिजे, हें उघडच आहे. यावरून असें म्हणतां येईल, कीं व्यासरचित 'जय' नामक ग्रंथांत फक्त शांतिपर्वापर्यंत किंवा अनुशासनपर्वापर्यंत पर्वें असावीं, अर्थात् त्याच्या पुढील पर्वें त्यांच्या शिष्यांनीं कथापूर्ततेसाठीं मागाहून रचिलीं असावीं, असें निःसंदिग्धपणें म्हणावयास हरकत नाहीं. कारण सदर्हू युद्ध झाल्यावर युधिष्ठिरानें ३५ वर्षें राज्य केलें व नंतर त्यानें द्रौपदी व आपले बंधु यांसह स्वर्गारोहण केलें. तेव्हां हा कथाभाग युद्धानंतर तीन वर्षांत रचिलेल्या ग्रंथांत वर्णिला जाणें शक्य नाहीं, हें स्पष्टच आहे.

---

१. 'लेखकाचा मेहनताना' हें लेखकाचा लिहिणावळीचा आकार दर्शविणारें पेशवेकालीन टिपण भारत-इतिहास-संशोधन-मंडळाच्या त्रैमासिकांत (वर्ष ७ अंक १-४, पृष्ठ ६२) छापलें आहे. त्यांत—"यादी भारत......दरहजारीं दोन प्रमाणें २२०" रुपये आकार दिलेला आहे. यावरून सदर्हू लेखकाच्या प्रतींत महाभारताची हरिवंशासह ग्रंथ-संख्या एक लक्ष दहा हजार (किंवा जवळ जवळ तितकी) होती, असें दिसतें.

२. वाल्मीकिरामायणासंबंधीं असाच प्रकार झालेला आहे. ह्या महाकाव्याची प्रचलित प्रत सप्तकांडात्मक आहे. परंतु त्यांतील उत्तरकांड हें वाल्मीकिप्रणीत नसून तें मागाहून रचिलें गेलें असावें, असें विद्वानांचें मत आहे. मे० आर्. टी. एच्. ग्रिफिथ. एम्. ए. सी. आय्. ई. यांनीं रामायणाच्या पहिल्या सहाच कांडांचें कवितावद्ध इंग्रजी भाषांतर केलें आहे व उत्तरकांड ही रामायणाला मागाहून जोडलेली पुरवणी होय, असें त्यांनीं आपलें मतही नमूद करून ठेविलें आहे. पंतांनीं रचिलेल्या रामायणांपैकीं अनुष्टुभ् रामायणांत त्यांनीं उत्तरकांडाचा समावेश केलेला नाहीं. यावरून पंतांचीही या बाबतींत अशीच कल्पना असावी, असें म्हणण्यास थोडासा आधार मिळतो.

'व्यासकृत महाभारत लक्ष ग्रंथ' ( आदिपर्व, अध्याय १।९ ) अशी ज्याची प्रसिद्धी आहे, व ज्यांत विविध विषयांची चर्चा केलेली आहे, असा हा प्रचंड ग्रंथ आमूलाग्र वाचणें फारच थोड्या लोकांस शक्य आहे. शिवाय तो गीर्वाणभाषेंत लिहिलेला असल्यामुळें तर तो सामान्य वाचकाच्या अगदीं आटोक्याबाहेरचा आहे, यांत संशय नाहीं. ह्या दोनही अडचणी दूर करण्याच्या हेतूनें पंतांपूर्वी होऊन गेलेल्या मुक्तेश्वर, विष्णुदास नामा, श्रीधर, माधव, नरहरि मोरेश्वर, रामचंद्रबोवा रामदासी, शिवकल्याण, जिवाशिवा, मालोनाथ, कृष्णदास मुद्गल, गोपाळ, शुभानंत, चंद्रात्मज रुद्र, मोरेश्वर, मैराळ, पद्मनाभ, शंभुदास भानु इत्यादि अनेक मराठी कवींनीं भारतावर ग्रंथरचना केली आहे. परंतु ते सर्व ओंवीवृत्तांत असून तेही जितके संक्षिप्त, सुबोध व सुटसुटीत असावे तसे नाहींत. शिवाय त्यांतील कांहीं अपूर्ण राहिले व कांहीं लोकादरास पात्र न झाल्यामुळें अज्ञातवासांतच पडून राहिले. यामुळें पंतांनीं सर्व महाभारत मराठींत निर्माण करण्याचें योजिलें व स्वतः परिणतप्रज्ञ झाल्यावर सतत दहा वर्षें ( इ. स. १७७२–१७८२ ) खपून तें कार्य अत्यंत यशस्वी रीतीनें पार पाडिलें. पंतांनीं निरनिराळ्या पुराणेतिहासविषयक व इतर स्वतंत्र विषयांवर काव्यरचना केली आहे. परंतु 'महाभारत' हा त्यांतील एक महत्वाचा ग्रंथ होय. ह्याच्या रचनेच्या बाबतींत पंतांनीं आपल्यास दोन बंधनांनीं बांधून घेतलें होतें. ते म्हणतातः—

व्यासकृत महाभारत लक्ष ग्रंथ प्रसिद्ध हा भारी ।<br>
आर्यावृत्तें रचितों, स्वल्पांतचि आणितों कथा सारी. ॥<br>
( आदिपर्व, अध्याय १–९ ).

अर्थात् तीं दोन बंधनें म्हणजे ओंवीवृत्तांतील नावीन्य नाहींसें झालेलें असल्यामुळें 'आर्या' नामक एका नवीनच वृत्तांत ग्रंथाची रचना करणें व तीही शक्य तितकी 'स्वल्पांत' करणें—हीं होत. पंतपूर्वकालीन मराठी कवींपैकीं कोणींही ह्या वृत्तांत रचना केलेली आढळत नाहीं. हें वृत्त पंतांनींच लोकादरास पात्र करून त्याची महती वाढविली आहे, हें आबालवृद्धांस माहीतच आहे, आणि म्हणूनच—

---

१. हरिभक्तिपरायण ल. रा. पांगारकर यांचा 'महाभारताचे मराठी अवतार' हा लेख पहावा.

२. मध्वमुनीश्वरांच्या ( निर्याणकाल शके १६५३ ) एका भूपाळींत 'महाभारताचा केला अर्थ विशद । [ तो ] चौधरी गोविंद दीक्षित ।' असा उल्लेख आहे. यावरून ह्या गोविंद दीक्षितांनींही महाभारतावर ग्रंथरचना केली असावी, असें दिसतें.

३. मुक्तेश्वरकृत आदिपर्वाची ग्रंथसंख्या ७,००० पेक्षां थोडी ज्यास्त आहे. पद्मनाभकृत उद्योगपर्वाचे अध्याय ९० असून ग्रंथसंख्या सुमारें ९,००० आहे! ( हें पर्व अद्यापि अप्रकाशित आहे ).

४. पंत म्हणतातः-( गीत्यर्धे ) आर्येला मानियलें बहु, पाहुनि सज्जनीं चमत्कृतिला ! । ( सभापर्व, अध्याय ५।११५ ).

प्रकटी प्रथम भगीरथनृप लोकीं सुरनदीस ती आर्या ।
तशि हे मयूर नाहीं तरि सर्वांला न दीसती 'आर्या'. ॥
( नामार्या-गीति १११ ).

ही पंतोक्ति अगदीं खरी असून त्यांना 'आर्यापति' अशी जी पदवी देण्यांत येते ती सार्थ आणि स्वारस्यपूर्ण नाहीं, असें कोणासही म्हणतां यावयाचें नाहीं.

येथें असा एक प्रश्न उपस्थित होतो, तो हा कीं, पंतांनीं ज्या वृत्ताला 'आर्या' असें नांव दिलें आहे, तें खरोखर 'आर्या' च आहे काय? छंदःशास्त्रांत दिलेल्या लक्षणानुसार तें वृत्त 'आर्या' नसून 'गीति' आहे, हें स्पष्टच आहे. असें जर आहे, तर प्रत्येक ठिकाणीं पंत गीतीलाच 'आर्या' असें म्हणतात व "मी नसतों तर तुम्हांला 'आर्या' दिसलीच नसती" असे आत्मगौरवपर उद्गार काढतात. तेव्हां ही पंतांची चूक नसून 'गीती'लाच 'आर्या' म्हणण्यांत त्यांचा कांहींतरी हेतु असावा, यांत कांहीं संशय नाहीं.

छंदःशास्त्रांत पांच प्रकारचीं मात्रागणवृत्तें सांगितलेलीं आहेत. त्यांचीं नांवें व लक्षणेंः—

१. आर्या-प्रथमार्ध, मात्रा ३० ( १२, १८ );
द्वितीयार्ध, मात्रा २७ ( १२, १५ ).
२. गीति-प्रथमार्ध, मात्रा ३० ( १२, १८ );
द्वितीयार्ध, मात्रा ३० ( १२, १८ ).
३. उपगीति-प्रथमार्ध, मात्रा २७ ( १२, १५ );
द्वितीयार्ध, मात्रा २७ ( १२, १५ ).
४. उद्गीति-प्रथमार्ध, मात्रा २७ ( १२, १५ );
द्वितीयार्ध, मात्रा ३० ( १२, १८ ).
५. आर्यागीति-प्रथमार्ध, मात्रा ३२ ( १२, २० );
द्वितीयार्ध, मात्रा ३२ ( १२, २० ).

ह्या पांच प्रकारांपैकीं 'आर्या' हीच मुख्य असल्यामुळें सर्व मात्रागणवृत्तांना संस्कृतांतही कधीकधीं 'आर्या' असेंच म्हणतात. शिवाय अक्षरगणवृत्तांतील कोणत्याही पद्याला त्याचें वृत्त कोणतेंही असलें तरी, 'श्लोक' ह्या सामान्य नांवानें संबोधण्यांत येतें, तोच न्याय येथें पंतांनीं मात्रागणवृत्तांच्या बाबतींत लागू केलेला दिसतो. 'आर्या' ही जाति व गीत्युपगीत्यादि तिचेच प्रकार असल्यामुळें संस्कृतांतही सर्व मात्राछंदांना 'आर्या' असें म्हणण्याचा प्रघात आहे व तोच प्रघात पंतांनीं मराठींत रूढ केला आहे. सारांश, सर्वसामान्य संज्ञा म्हणून 'आर्या' हें नांव प्रचारांत आणून 'गीति' ह्या त्याच्या पोटभेदाला 'प्राधान्येन व्यपदेशा भवन्ति' ह्या न्यायानें 'आर्या' हेंच नांव पंतांनीं दिलें व तें आतां लोकमान्य होऊन बसलें आहे. पंतांनीं आर्येच्या पांचही प्रकारांचा आपल्या काव्यांत उपयोग केला आहे, पण त्यांतील गीतिवृत्तच अखेरीस त्यांना पसंत पडून त्यांनीं त्यांतच पुष्कळ काव्यरचना केली आहे. ही 'गीति' म्हणजेच आपली मराठींतील 'आर्या' होय. एकंदरींत ह्या सर्व बारकाईवरून पंतांचें छंदःशास्त्राचें अध्ययन किती सूक्ष्म होतें, हें दिसून येतें.

आपल्या आर्याभारताच्या रचनेस सुरुवात करण्यापूर्वी पंतांनीं आपली रचना सुसंबद्ध व सुसंघटित व्हावी म्हणून कांहीं तरी आराखडा आंखून ठेविला असावा व त्या धोरणानें त्यांनीं आपल्या आर्याभारतरूपी मंदिराची उभारणी केली असावी. परंतु त्यासंबंधीं कांहीं तपशील आज उपलब्ध नाहीं, ही मोठ्या दुःखाची गोष्ट होय. पंतांस वाचनाची मोठी गोडी असून ग्रंथांचा संग्रह करण्याची हौसही मोठी असे. त्यांनीं पुष्कळ ग्रंथ स्वतः लिहून घेऊन व कांहीं दुसऱ्याकडून लिहवून घेऊन आपल्या संग्रहीं ठेविले होते. शिवाय, पंत पुष्कळसे ग्रंथ नुसते वाचून ज्याचे त्यास परत करीत असत. त्यांनीं स्वहस्तानें लिहून घेतलेल्या संस्कृत ग्रंथांच्या यादींत अनंतकविकृत चंपूभारताचें नांव आढळतें. तसेंच पंतांसारख्या व्यासंगी व ग्रंथसंग्रहकारी रसिकाच्या नजरेखालून काश्मीरदेशांतील क्षेमेंद्रकृत भ[1]ारतमंजरी व श्रीमदमरचन्द्रसूरिप्रणीत बालभारत हे दोन संस्कृत संक्षेपग्रंथ गेले असावे व ते त्यांना बरेच मार्गदर्शक झाले असावे, असें वाटतें. ह्याखेरीज त्यांनीं भारतेतिहासविषयक आणखी कांहीं संस्कृत व मुक्तेश्वर-श्रीधरादिकांचे मराठी ग्रंथ पाहिले असावे, असें म्हटल्यास तें अगदींच निराधार ठरावयाचें नाहीं. सारांश, पंतांनीं संस्कृत महाभारताचें काळजीपूर्वक आलोडन करून, त्यावरील नील[2]कंठ चतुर्धर, मणिग[3]र्भ व अर्जुनमिश्र यांच्या टी[4]कांचें सहाय घेऊन, त्यासंबंधाचे संदर्भग्रंथ पाहून व संक्षेपग्रंथांचें सूक्ष्म निरीक्षण करून हा ग्रंथ रचिला आहे, असें दिसतें.

पंतांनीं हा जो भारतेतिहासविषयक ग्रंथ निर्माण करावयाचा असें योजिलें, त्यास सरळ 'भारत' असेंच म्हणावें किंवा दुसरें कांहीं चित्ताकर्षक व कुतूहलोत्पादक नांव द्यावें, याविषयीं प्रारंभीं त्यांचा कांहींच विचार पक्का ठरलेला नव्हता, असें दिसतें. पण त्यांची इच्छा त्यास 'पांडवचरित्र' असें नांव द्यावें अशी असून, तसा त्यांचा विचारही जवळ जवळ पक्का झाला होता, असें पुढील गीतीवरून दिसतें:—

हरि ज्यांचा कैवारी त्या पांडुसुतांसि वंदितों भावें ।
वाटे '**चरित्र त्यांचें**' कांहीं, आपण तरावया, गावें. ॥
(आदिपर्व, अध्याय १।८)

---

१. ह्यांतील आदिपर्वाची ग्रंथसंख्या १३९७ आहे व बालभारतांतील आदिपर्वाची ग्रंथ-संख्या १३११ आहे.

२. महाभारतावर ज्या टीका आहेत, त्यांत नीलकंठाची टीका प्रमुख व आदरणीय मानली जाते. हा टीकाकार महाराष्ट्रीय होता. तो सुमारें ४०० वर्षांपूर्वी होऊन गेला.

३. आदिपर्व, अध्याय ४ गीति ५७ पहा.

४. पंतकृत सभापर्व, अध्याय ६ गीति ४९-५० वरील टीपा पहा.
(निर्णयसागर-प्रत, पृष्ठ ७५ टीप २१).

पंत जन्मास येण्यापूर्वी नुकतेच समाधिस्थ झालेले भारतरचनाकार नाझरेकर श्रीधर-स्वामी यांनीं आपल्या ग्रंथास 'पांडवप्रताप' असें अन्वर्थक नांव दिलें आहे व तें पाहून पंतांना आपल्या ग्रंथास 'पांडवचरित्र' असें नांव द्यावें, असें वाटलें असावें. पण, शेवटीं त्यांनीं 'भारत' हेंच साधें, सुटसुटीत व मूळचेंच नांव कायम ठेवावयाचें निश्चित केलें, हें उघडच आहे. तथापि प्रस्तुत ग्रंथाच्या नामकरणासंबंधीं कांहीं तरी निरनिराळया कल्पना त्यांच्या मनांत घोळत होत्या, असा आमचा अंदाज आहे.

पंतांनीं स्वकृत भीष्मपर्वाच्या शेवटीं 'विजयग्रंथ' व कर्णपर्वाच्या शेवटीं 'नरनारायण-विजयग्रंथ' असा उल्लेख केला आहे. पण श्रीधरस्वामींनीं 'विजय' संज्ञक ग्रंथ,–अर्थात् राम-विजय व हरिविजय हे–पूर्वीच रचिलेले असल्यामुळें व पंतांनीं स्वतः देखील एक 'विजय'-ग्रंथ अर्थात् कृष्णविजय हा पूर्वीच रचिला होता, इत्यादि कारणांमुळें 'विजय' ह्या नांवांतही त्यांस कांहीं स्वारस्य वा नावीन्य न वाटल्यामुळें त्यांनीं ती कल्पना सोडून दिली असावी, हें संभवनीय दिसतें. सारांश, पंतांना प्रस्तुत ग्रंथास कांहीं चमत्कृतिजनक व नावीन्यपूर्ण नांव देतां आलें नाहीं, एवढें खरें !

पंतांनीं स्वहस्तानें लिहून ठेविलेल्या प्रस्तुत ग्रंथाच्या कांहीं पर्वांच्या व त्यांतील अध्यायांच्या शेवटीं 'इति श्रीमदार्याभारते…' असा शेरा लिहिलेला आढळतो. यावरून 'आर्याभारत' ह्या विशिष्ट नांवानें हा ग्रंथ प्रसिद्ध व्हावा, अशी त्यांची मनीषा होती, असें दिसतें. परंतु सर्व ठिकाणच्या अन्तिमलेखांत एकवाक्यता नसल्यामुळें ह्या बाबतींत कांहीं निश्चित अनुमान काढणें शक्य नाहीं. तथापि ह्या ग्रंथाचें वैशिष्ट्य व आर्यावृत्ताचें महत्त्व हीं दर्शविलीं जावीं म्हणून ह्यास 'आर्याभारत' असें म्हणणेंच इष्ट व सयुक्तिक होईल, असें आम्हास वाटतें. शिवाय, 'आर्याभारत' हें नांव प्रस्तुत ग्रंथास सर्व प्रकारें साजेसेंच आहे, यांत कांहीं संशय नाहीं.

आतां आपण 'आदिपर्वा'कडे वळूं, व त्याच्या वाचनानें आपणास कोणकोणत्या गोष्टी कळतात तें पाहूं.

---

१. श्रीधरस्वामी शके १६५० ( इ. स. १७२८ ) मध्यें समाधिस्थ झाले व मोरोपंत शके १६५१ ( इ. स. १७२९ ) मध्यें अवतीर्ण झाले. हा एक विलक्षण योगायोगच होय! [ हे शक आम्ही 'नवनीता' वरून घेतले आहेत. परंतु रा० श्री. वि. परांजपे, बी. ए. यांनीं 'केकावली' च्या परिशिष्टांत श्रीधरस्वामींचें निर्याण व पंतांचा जन्म शके १६५१ मध्यें झाला, असें लिहिलें आहे ].

२. [ बा ! ] या 'विजय'ग्रंथीं हरिहरजनसत्कथा, दुजी थोडी. । ( अध्याय १२ गीति ७५ )

३. या साधुसंगमुदिरें मुदितश्रीरामसुतमयूर कृती ।
'नरनारायणविजय'ग्रंथ करी व्हावया सुखी सुकृती. ॥
( अध्याय ५० गीति ७५ )

४. पंतानीं आपल्या आर्याभारताच्या रचनेस शके १६९४ मध्यें सुरुवात केली. त्यापूर्वींच्या सात आठ वर्षांच्या काळांत त्यांनीं मंत्ररामायण ( मराठी ), कृष्णविजय, भीष्मभक्तिभाग्य, आर्या-केकावली इत्यादि अनेक लहान मोठीं सुरस व प्रतिभायुक्त काव्यें रचून तयार केलीं होतीं.

# आदिपर्व.

शास्त्रांमाजी वेदान्त । कीं देवांमाजी वैकुंठनाथ ।
आनंदवन क्षेत्रांत । पर्वांत **आदिपर्व** तैसें हें. ॥
शस्त्रांमाजी सुदर्शन । नव ग्रहांत सूर्यनारायण ।
कीं विष्णुक्षेत्रांत जाण । पंढरी पावन जैशी कीं. ॥
तैसें पर्वांत **आदिपर्व** । नवरसयुक्त अति अपूर्व ।
जो महाराज **व्यास**देव । तेणें पूर्वीं कथियेलें. ॥
( श्रीधरकृत पांडवप्रताप, अध्याय १४ ओंव्या १७१-७२ )

**म**हाभारताचीं मुख्य पर्वें अठरा असून उपपर्वें शंभर आहेत. मुख्य पर्वांपैकीं प्रस्तुत पर्व हें पहिलें आहे, व त्याचीं पोटपर्वें एकोणवीस आहेत. ( परिशिष्ट १० पहा ). मूळ संस्कृत पर्वाच्या सध्यां उपलब्ध असलेल्या प्रतींत त्याची ग्रंथसंख्या पुढें दर्शविल्याप्रमाणें आढळते:—

| | प्रत | अध्याय | श्लोक |
|---|---|---|---|
| १ | महाराष्ट्रीय प्रत | २३७ | ८,८८४ |
| २ | कलकत्ता प्रत | २२७ | ८,८८४ |
| ३ | मद्रास प्रत | २१८ | ९,८८४ |
| ४ | कुंभकोण प्रत | २२७ | ८,८८४ |
| ५ | चिकित्सितप्रत, पुणें | २१८ | ७,९८४ |
| ६ | स्वाध्यायमंडळ, औंध | २३६ | ८,७०९ |
| ७ | भारताचार्य नानासाहेब वैद्य | २३४ | ८,७०९ |
| ८ | गोपाळ नारायण आणि कंपनी | २३४ | ८,८१९ |
| ९ | गणपत कृष्णाजी यांच्या छापखान्यांतील प्रत | २३४ | ८,४६६ |
| १० | 'पांडवप्रताप'कार श्रीधरस्वामी | २३० | १८,९८४ |

मूळ पर्वाच्या दुसऱ्या अध्यायांत ह्या पर्वाचे अध्याय २२७ व ग्रंथसंख्या ८,८८४[१] असल्याचा स्पष्ट उल्लेख आहे. तेव्हां वर दर्शविल्याप्रमाणें निरनिराळ्या प्रतींत अध्याय व श्लोक यांच्या बाबतींत फरक कां आढळतो, हें पाहाणें महत्त्वाचें आहे. तथापि ह्या प्रश्नाची चर्चा करण्याचें हें स्थळ नव्हे. मद्रासकडील एका प्रतींत २६० अध्याय असून श्लोकसंख्या

१. अध्यायानां शते द्वे तु संख्याते परमर्षिणा ।
सप्तविंशतिरध्याया व्यासेनोत्तमतेजसा. ॥ १३० ॥
अष्टौ श्लोकसहस्राणि अष्टौ श्लोकशतानि च ।
श्लोकाश्च चतुराशीति मुनिनोक्ता महात्मना. ॥ १३१ ॥

१०,९९८ आढळते व पुणें येथील 'भांडारकर ओरिएँटल रीसर्च इन्स्टिटयूट' ह्या संस्थेनें प्रसिद्ध केलेल्या 'चिकित्सित' प्रतींत अध्याय २१८ असून ग्रंथसंख्या ७,९८४ आहे. अर्थात् मद्रासकडील प्रतींत प्रक्षिप्त भाग पुष्कळच आहे व 'चिकित्सिक' प्रतींतून प्रक्षिप्त म्हणून समजला गेलेला भाग गाळून टाकण्यांत आला आहे, म्हणून ह्या दोन प्रतींत एवढी तफावत दिसून येते. बाकीच्या प्रतींतील अध्याय व ग्रंथसंख्या हीं मूळांत सांगितलेल्या संख्यांशीं, अगदीं तंतोतंत जरी नाहींत, तरी बऱ्याच अंशीं जुळतात.

श्रीधरस्वामी आपल्या 'पांडवप्रतापां'त मूळ आदिपर्वाची ग्रंथसंख्या १८,९८४ असल्याचें सांगतात, पण ती तितकी असणें शक्य दिसत नाहीं. 'पांडवप्रतापां'त 'आठ सहस्र' ह्या पाठाबद्दल 'अठरा सहस्र' असा पाठ लेखकप्रमादानें पडला असावा व तोच चुकीचा पाठ प्रचलित झाला असावा.

एवढ्या मोठ्या विस्तृत पर्वातील महत्त्वाचा भाग पंतांनीं केवळ २,४७९ गीतींत समाविष्ट केला आहे. त्यांनीं ठिकठिकाणीं वर्णनसंक्षेप केला आहे व वर्ण्य विषयाशीं–अर्थात् पांडवांच्या चरित्राशीं–विशेष संबंध नसलेले कांहीं भाग तर त्यांनीं अजीबात गाळिले आहेत. महाभारतासारख्या अवाढव्य ग्रंथाची रचना आपल्या हातून पूर्ण व्हावी, असें पंतांस वाटणें साहजिक आहे, कारण त्यांनीं ह्या ग्रंथाच्या रचनेस आपल्या वयाच्या ४३ व्या वर्षी म्हणजे इ. स. १७७२ त सुरुवात करून इ. स. १७८२ च्या सुमारास–साधारणतः उतार वयांत–तो पूर्ण केला. ह्या वेळीं पंतांस 'कृतांतकटकामलध्वजजरा' जरी दिसूं लागली नसली, तरी 'भरंवसा घडीचा नसे' ह्या सिद्धांताचा बराच परिणाम त्यांच्या मनावर झाला असावा, असें वाटतें. पंतांच्या काव्यरचनेचा मुख्य हेतु स्वोन्नत्यर्थ भगवद्यशोवर्णन करणें हा असल्यामुळें जणूं काय कमींत कमी वेळांत ज्यास्तींत ज्यास्त भगवच्चरित्रवर्णन करण्यांत ते गुंग होऊन गेले होते आणि म्हणूनच त्यांनीं मोठ्या मार्मिकपणानें ठिकठिकाणीं वर्णनसंक्षेप केला आहे. शिवाय, आपण आपलीं काव्यें विस्तृत केलीं तर प्राकृत ( मराठी ) वाचक कंटाळतील,

---

१. व्यासभारताचे अध्याय विशेष । दोन शत आगळे तीस ।
अवघे मिळोनी श्लोक सुरस । किती मर्यादा ऐका ते. ॥ १७४ ॥
'अठरा सहस्र' नव शत । चौऱ्यायशीं श्लोक विशेष परिमित ।
इतुकी गणना नेमस्त । वैशंपायनें केली असे. ॥ १७५ ॥

( पांडवप्रताप–अध्याय १४ ).

येथें 'व्यासभारताचे अध्याय' म्हणजे व्यासकृत महाभारतांतील आदिपर्वाचे अध्याय–असा अर्थ उद्दिष्ट आहे.

२. पंतांचे 'हरिवंशां'तील पुढील उद्गार पहा:—

( १ ) सुकुमारबुद्धि वक्ते श्रोते जे, त्यांसि कीर्तनश्रवण ।
व्हाया, स्वल्पाचि कथा लिहिन रसिकसाधुरंजनप्रवण. ॥

( अध्याय १ गीति ७ )

अशी भीति पंतांस वाटत होती यांत कांहीं शंका नाहीं. पंतांनीं क्वचित् प्रसंगीं वर्णन-विस्तार केला आहे, नाहीं असें नाहीं. तथापि असे प्रसंग विरळाच, व तेही

विस्तर भय दे, नाहीं तरि काळाचेंहि भय नसे गातां ! ।

(अध्याय ३४ गीति १०)

अशा प्रकारचा धाक मनांत बाळगूनच ! पण पंत 'मी लेशचि गातों' कारण 'जग लेशेंही महद्यशें तरतें' (अध्याय ९।१) असें जें म्हणतात, तेंच त्यांच्या विस्तारभीरुत्वाचें खरें कारण असावें.

पंतांनीं आपलें आर्याभारत वर दर्शविलेल्या मूळ महाभारताच्या प्रतींपैकीं कोणत्या प्रतीच्या आधारें रचिलें हें खात्रीपूर्वक सांगणें कठीण आहे. पंतांनीं ज्या प्रतीवरून हा ग्रंथ रचिला ती प्रत उपरिनिर्दिष्ट प्रतींहून निःसंशय निराळीच असली पाहिजे, किंवा पंतांनीं आपल्या मार्मिकपणाच्या व चौकसबुद्धीच्या जोरावर मूळ ग्रंथांत आढळून येणारी चुकी दुरुस्त केली असावी. मूळांत शकुंतलाख्यान प्रथम आलें असून (अध्याय ६८–७४) त्याच्या पुढें ययात्युपाख्यान (अध्याय ७५–९३) आहे. पण वस्तुतः ययात्युपाख्यान प्रथम यावयास पाहिजे होतें. कारण दुष्यंत हा ययातिपुत्र पूरूचा वंशज होय. (पुढें परिशिष्ट ११ पहा) शकुंतलाख्यानाच्या शेवटीं (अध्याय ७४ श्लोक १३५–३७) 'या भरताच्या कुळांत देवतुल्य, महापराक्रमी, तसेंच ब्रह्मासारखे पुष्कळ राजश्रेष्ठ उत्पन्न झाले…… त्यांची माहिती मी तुला सांगतों' असें वैशंपायन म्हणतात आणि लगेच पुढच्याच अध्यायांत भरताचा (१६।१७ पिढ्यांपूर्वींचा) पूर्वज ययाति याचें आख्यान सुरू करितात, हें चमत्कारीक दिसतें. पण पंतांनीं खुद्द सौतीच्या अनवधानामुळें किंवा निरनिराळया लेखकांच्या

---

(२) पुष्करसंभव अमृतचि, वाटेना काय हो मला गावा ? ।
परि, बहु विस्तर होतां भाषाग्रंथीं, न गोड लागावा. ॥

(अध्याय ४५।१)

तसेंच पंतांचे 'उद्योगपर्वां'तील उद्गार पहा:—

तें बहु असोचि, विस्तरवद्ग्रंथ प्राकृतीं न वाचि कवी. ।

(अध्याय ३ गीति ७३)

'पांडवप्रताप' कर्ते श्रीधरस्वामी सुद्धां असेंच म्हणतात:—

श्रोते बोलती कुशळ । सांडोनि आतां सर्व पाल्हाळ ।
बोलें भारत रसाळ । आदिपर्वापासोनी. ॥
आधींच भारतग्रंथ थोर । तो तूं बोलसी सविस्तर ।
तरी ग्रंथ होईल जैसा समुद्र । श्रोते चतुर वीटती. ॥

(अध्याय १ ओव्या ४१–४२)

अंगीं असणाऱ्या चिकित्सकपणाच्या अभावामुळें राहून गेलेला व्युत्क्रम टाळला आहे, हें पाहून पंतांच्या सूक्ष्म निरीक्षणाचें कौतुक वाटतें.

व्यासकृत 'जय' ग्रंथ हा निःसंशय इतिहास होता. त्यांत पुढें कालांतरानें सौतीनें आख्यानें, उपाख्यानें इत्यादि समाविष्ट करून त्याचें रूप बदललें, तथापि प्रस्तुत प्रचलित असलेल्या 'महाभारतां'त इतिहासाचा भाग पुष्कळच आहे. भारतीय युद्ध किती शतकांपूर्वी झालें, हा मोठा वादग्रस्त प्रश्न आहे. तथापि इ. स. पू. ३१०१ हा युद्धाचा काळ लोकमतास मान्य झालेला आहे. तेव्हां सुमारें ५,००० वर्षांपूर्वी रचिलेल्या ग्रंथावरून आपणास कोण-कोणत्या गोष्टी कळतात, किंवा आपण कोणकोणतीं अनुमानें काढूं शकतों, हें थोडक्यांत पहावयाचें आहे. अर्थात् आपणास हा विचार येथें आदिपर्वापुरताच करावयाचा आहे व तोही विशेषतः मूळ आदिपर्वाचें प्रतिबिंब जें पंतविरचित आदिपर्व त्याच्या साहाय्यानें करावयाचें आहे.

वेदांची झालेली अव्यवस्था मोडून व त्यांचे विभाग पाडून त्यांची नीट व्यवस्था लावल्या-नंतर, भारतेतिहासाच्या रचनेविषयीं व्यासांनीं आपल्या मनांत आराखडा तयार केला. परंतु तो ग्रंथ लिहून तयार झाल्याशिवाय आपल्या शिष्यांस कसा पढवितां येणार व लोकांत त्याची प्रसिद्धी कशी होणार, अशी त्यांस चिंता पडली. अशा प्रकारें ते सचिंत असतां, त्यांचा हेतु पूर्ण करण्याच्या इराद्यानें तेथें ब्रह्मदेव आले. व्यासांनीं त्यांस आपल्या ग्रंथाच्या मांडणीविषयीं व त्यांत येणाऱ्या विविध विषयांसंबधीं संपूर्ण माहिती दिली आणि हा ग्रंथ लिहून काढणारा लेखक ह्या पृथ्वीवर कोणी दिसत नाहीं, असें त्यांस सांगितलें. तेव्हां ब्रह्मदेवांनीं गणपतीचें स्मरण करावयास व्यासांस सुचविलें. त्याचें स्मरण करितांच तो व्यासांकडे आला. तेव्हां त्यांनीं त्यास सांगितलें—

लेखको भारतस्यास्य भव त्वं गणनायक ।
मयैव प्रोच्यमानस्य मनसा कल्पितस्य च[३] ॥

(आदिपर्व, अध्याय १।७८)

हें ऐकून गणपतीनें उत्तर केलें, कीं, 'मी लिहीत असतां माझी लेखणी क्षणभरही थांबतां कामा नये. ही अट मान्य असल्यास मी लेखकाचें काम करण्यास तयार आहें'.

---

१. श्रीमद्भागवताच्या नवम स्कंधाच्या १८ व १९ ह्या अध्यायांत ययातिकथा वर्णिलेली असून पुढील अध्यायांत दुष्यंतशकुंतलाचरित्र आहे. यावरून हा जो फेरफार पंतांनीं केला तो भागव-ताच्या अनुरोधानें केला असावा, असा आमचा तर्क आहे. पंतांचा भागवतावरील व्यासंग दांडगा होता व त्यांचें मंत्रभागवत व कृष्णविजय हे दोन 'भागवती' ग्रंथ प्रसिद्धच आहेत.

२. भारतीय युद्धाच्या वेळच्या ग्रहस्थितीवरून केलेल्या गणितानें चालू शकाच्या पूर्वी ७१६६ वर्षें म्हणजे ९०२० वर्षांपूर्वी हें युद्ध झालें, असें कांहीं विद्वानांचें मत आहे.

३. गणनायका ! मी हा भारतग्रंथ मनानें जुळवून ठेविला आहे. तो मीच तोंडानें सांगत असतां तूं त्याचा लेखक हो.

तेव्हां व्यासांनीं त्यास सांगितलें, कीं, 'तूं अर्थ समजल्याशिवाय कांहींही लिहूं नकोस.' ही व्यासांची अट गणपतीनें मान्य केली. पण त्यानें आपलें काम मध्येंच सोडून जाऊं नये; म्हणून त्यांनीं ग्रंथाची रचना मधून मधून इतकी गूढ केली, कीं गणपति सर्वज्ञ असूनही त्यास अर्थ लक्षांत घेण्यासाठीं वारंवार विचार करीत बसावें लागे. तेवढ्या वेळांत व्यासही पुष्कळ श्लोक रचीत. ही आख्यायिका महाभारतांतच असल्यामुळें तिच्या खरेपणाविषयीं शंका घेण्याचें कारण नाहीं. ह्या आख्यायिकेंत सांगितल्याप्रमाणें व्यासांनीं आपल्या ग्रंथांत कित्येक कूट स्थळें मुद्दाम ठेविलीं आहेत व तीं सोडविणें अद्यापही शक्य झालेलें नाहीं. शिवाय ह्यांत कांहीं असंभाव्य वाटणाऱ्या घटनांचीं वर्णनेंही आहेत. ह्या असंभाव्य दिसणाऱ्या गोष्टी मूळ स्वरूपांत कशा असाव्या, ही जिज्ञासा प्रत्येक मनुष्यास असतेच व ती पूर्ण करण्याचें काम विवेचक ग्रंथकर्त्याचें आहे, हें उघडच आहे. तथापि अशा गोष्टींपैकीं कांहींच्या संबंधीं आम्ही आपले कल्पना-तरंग थोडक्यांत पुढें मांडीत आहों:—

## रूपकें.

महाभारतांत रूपकात्मक वर्णनें व कथानकें (Allegorical incidents and descriptions) आढळतात. पण तीं मूळ ऐतिहासिक कथानकांशीं इतकीं खुबीनें जोडण्यांत आलीं आहेत, कीं तीं त्यांशीं जणूं काय अगदीं एकजीव झालीं आहेत आणि यामुळें तीं शोधून काढणें व त्यांचें स्पष्टीकरण करणें हें काम अत्यंत बिकट झालें आहे.

**च्यवनऋषी**चा उल्लेख अध्याय ३ मध्यें आलेला आहे. हा ऋषी वेदवेदांगांमध्यें अत्यंत प्रवीण होता. ह्याचें तप इतकें दीर्घकालीन होतें, कीं बसलेल्या ठिकाणावरून न उठल्यामुळें त्याच्या आंगावर वारूळ वाढलें होतें. एकदां असें झालें, कीं हा ज्या वनांत तप करीत होता, तेथें **शर्याति**राजा आपल्या सैन्यासह आला व बरेच दिवस राहिला. एकदां त्याची कन्या **सुकन्या** ही आपल्या सख्यांसह क्रीडा करीत फिरत असतां तिनें याचे वारुळाच्या तोंडाशीं चमकणारे डोळे पाहिले. परंतु तिला ह्या ऋषीच्या अस्तित्वाविषयीं कांहींच कल्पना नसल्यामुळें तिनें एक कंटक घेऊन त्यानें वेध केला. पुढें **सु**कन्या व **च्यवन**ऋषी यांचा विवाह झाला, इत्यादि कथा आहे (भागवत, स्कंध ९ अध्याय ३ पहा). ह्या कथेसंबधीं पुढील उतारा मननीय आहे:—

"अंधारमय खांचेंत पडलेला **च्यव**न हा [संशोधकांच्या] मतें निस्तेज झालेला सूर्य होय व त्याला अश्विनांनीं वर काढिलें म्हणजे वसंतारंभीं सूर्य पुन्हां सतेज झाला."

(आर्यलोकांचें मूलस्थान, पृष्ट २२१).

**अमृतमथनकथा** अध्याय ४ मध्यें आलेली आहे. ती कथा म्हणजे एक रूपकच होय, ह्या गोष्टीची जाणीव पंतांस होती, असें पुढील गीतीवरून दिसून येतें:—

तम सिंधु, मनचि मंदर कथिलें, शम-काम जे, सुरासुर ते।
अभ्यास हेंचि मंथन, युक्ति सुधा, जाणती सुधा पुरते. ॥

(हरिवंश, अध्याय ४५।२८).

**दीर्घतमा** नांवाच्या ऋषीचा उल्लेख अध्याय १५ गीति १५ मध्यें आलेला आहे. ह्या कथेसंबंधीं पुढील उतारा पहाः—

"दीर्घतम्याची कथा, ध्रुवाजवळील प्रदेशांतल्या 'शुक्र अर्णावर' (७,६०,४) म्हणजे तेजोमय समुद्रावर (क्षितिजावर) आल्यावर तेथें मानुषा युगा म्हणजे दहा महिने राहून पुन्हां समुद्रांत जाणाऱ्या" सूर्यावरील रूपक आहे.

(आर्यलोकांचें मूलस्थान, पृष्ठ १४६).

**सरमेचा** उल्लेख अध्याय २ गीति २ मध्यें आलेला आहे. **पुरूरव्याचा** उल्लेख अध्याय ९ गीति ४ मध्यें आहे. परंतु **पंतांनीं** विस्तरभयास्तव **उर्वशीचा** उल्लेख तेथें करणें इष्ट असून केला नाहीं. तथापि **सरमा** व **उर्वशी** यांच्यासंबंधीं पुढील उतारा महत्त्वाचा आहेः—

"पणींनीं चोरलेल्या गाई शोधून काढण्यासाठीं गेलेली **सरमा** [व] **पुरूरव्यापासून** दूर जाणारी **उर्वशी** हीं उषेचींच स्वरूपें होत."

(आर्यलोकांचें मूलस्थान, पृष्ठ १८८)

**श्रुतिमती** नदीची कथा अध्याय ८ मध्यें आहे. ती सुद्धां एक रूपकच होय. त्या नदीच्या प्रवाहाला **कोलाहलपर्वतामुळें** अडथळा होत होता. यामुळें पर्वताचा कांहीं भाग खणून काढून **उपरिचरवसूनें** पाणी जाण्यास वाट मोकळी करून दिली, हा त्या कथेचा इत्यर्थ होय. अशाच प्रकारची दुसरी कथा **भगीरथासंबंधीं** प्रचलित आहे. त्यानें गंगेस स्वर्गांतून खालीं आणिलें म्हणजे तिचा उत्तरेकडे तिबेटांत जाणारा प्रवाह मोठ्या प्रयत्नानें फिरवून हिमालयाच्या दक्षिणेस वाहता राहील, अशी योजना केली, हा इत्यर्थ.

**श्रुतिमती** नदीला पर्वतापासून झालेलीं अपत्यें म्हणजे ती नदी व तो पर्वत यांच्या आसपासच्या प्रदेशांत राहाणाऱ्या लोकांचीं मुलें होत, हें कोणाच्याही लक्षांत सहज येण्यासारखें आहे.

लेखक कांहीं विशिष्ट हेतूनें किंवा केवळ चमत्कृति उत्पन्न करण्याकरितां एकाद्या गोष्टीचें वर्णन सरळपणें न करितां वळसा घेऊन करितात. त्यामुळें पुष्कळदां मूळ गोष्टीचें खरें स्वरूप लक्षांत येत नाहीं. पुष्कळदां शब्दयोजनाही भ्रमोत्पादक असते. उदाहरणार्थ—

बाळार्थ हरिस भजला **मनु** शतवर्षें वरूनि **यमुनेतें** ।
जो स्वयशासि म्हणे शिर अघमर्षणविवरधरुनियमुनेतें. ॥

(**पंतकृत** मंत्रभागवत, स्कंध ९ गीति १८).

ह्या गीतींतील 'वरूनि **यमुनेतें**' ह्या शब्दांच्या अर्थासंबंधीं वाचकांच्या मनांत चुकीची कल्पना उत्पन्न झाल्यास कांहीं नवल नाहीं. पण प्रस्तुत स्थळीं **यमुनेचा** स्वीकार करून म्हणजे '**यमुनेच्या** तीरीं राहून' असा खरा अर्थ आहे. सारांश, क्वचित् गैरसमज उत्पन्न

---

१. शुकरंभासंवाद हें एक रूपकच आहे, असें आम्ही पूर्वीं अन्यत्र दर्शविलें आहे. (काव्यसंग्रह–ग्रंथमाला–मुक्तेश्वरकृत स्फुट काव्यें, प्रस्तावना–पृष्ठ १० पहा).

होण्यासारखी वर्णनपद्धति किंवा शब्दयोजना असली, तरी वाचकांनीं त्यांतील तत्त्वार्थाकडे लक्ष देणें इष्ट व अवश्य आहे.

आतां आपण **असंभाव्य वाटणाऱ्या गोष्टीं**कडे वळूं:—

## १. सदेह स्वर्गास जाणें.

प्रस्तुत पर्वांत ययातिराजा आपल्या पुण्याईच्या बळावर स्वर्गांत गेला व तेथें तो कित्येक वर्षें राहिला. परंतु आपली बढाई सांगण्यामुळें तो तेथून च्युत होऊन परत मृत्युलोकीं आला, वगैरे कथाभाग ( अध्याय ११ ) आहे. विचित्रवीर्य 'सकाय' स्वर्गास गेल्याचा उल्लेख आहे ( अध्याय १४।१८ ). तसेंच पांडु स्वर्गलोकीं जाण्याकरितां निघाला होता ( अध्याय १९।३० ) परंतु त्यानें पितरांचें ऋण फेडलेलें नसल्यामुळें तो तिकडे जाऊं शकला नाहीं, असेंही वर्णन आहे. उर्वशी नामक अप्सरेला मित्रावरुणांच्या शापामुळें मृत्युलोकीं यावें लागलें व तिला पुरूरव्यापासून सहा पुत्र झाल्यानंतर ती परत स्वर्गलोकीं गेली, असें श्रीमद्भागवतांत वर्णिलेलें आहे. ( स्कंध ९ अध्याय १४–१५ ). तसेंच नारदऋषींचा संचार स्वर्ग, मृत्यु व पाताळ ह्या तिन्ही लोकांत अगदीं अप्रतिहतपणें होत असे व कित्येक ऋषी वारंवार स्वर्गांत जात असत व तेथून परत येत असत, असें अनेक प्राचीन ग्रंथांत सांगितलेलें आहे. हीं वर्णनें काल्पनिक आहेत, अशी सर्वसाधारण समजूत आहे. परंतु ती कितपत खरी किंवा खोटी आहे, हें येथें पाहावयाचें आहे.

स्वर्ग, स्वर्गभूमि किंवा स्वर्भूमि हें पृथ्वीवरील एका प्रदेशाचें नांव असून तेथें देवांची वसती होती व त्या प्रदेशाला देवलोक, परलोक ( पर=श्रेष्ठ ) अशींही आणखी नांवें होतीं. हा प्रदेश म्हणजे उत्तरध्रुवप्रदेश अर्थात् उत्तरध्रुवाच्या आसपासचा प्रदेश होय. ह्याचें वर्णन संस्कृत वनपर्वाच्या २६१ व्या अध्यायांत आहे. त्याचा सारांश असा:—पृथ्वीच्या अगदीं उत्तरेकडील पृष्ठभाग म्हणजे स्वर्भूमि अथवा स्वर्ग होय. तेथें विमानांत बसून देव इतस्ततः संचार करीत असतात. तेथें सिद्ध, विश्वेदेव, यम, गंधर्व, अप्सरा इत्यादि वास करितात. तेथें सुंदर उपवनें व पुष्पवाटिका, स्वच्छ, शीतल व सुगंधी जलानें परिपूर्ण अशीं तळीं, क्रीडावनें, भव्य व सुंदर मंदिरें इत्यादि सुखोपभोगांचीं साधनें विपुल असून तेथें मोठमोठीं व दाट वस्तीचीं अनेक पुरें आहेत; वगैरे. यावरून व्यासांना व पर्यायानें भारतीय युद्धकालापर्यंत साधारणतः सर्व जनतेला ह्या प्रदेशासंबंधीं वास्तविक व निश्चित कल्पना होती, असें स्पष्ट दिसून येतें. तेथें आपले पुण्यशील व पराक्रमी पूर्वज सदेह म्हणजे जीवंतपणीं जात असत. तेथें जाऊन राहणें हें एक उच्च ध्येय त्या काळीं समजलें जात असे. प्रसंगविशेषीं दुष्यंतासारखे बलाढ्य राजे दैत्यांविरुद्ध इंद्रास सहाय्य करण्यास जात असत व देवांच्या शत्रूंचा पाडाव करून येत असत.

अज्ञात प्रदेशांचा शोध लावूं इच्छिणाऱ्या अनेक अर्वाचीन संशोधकांनीं उत्तरध्रुवप्रदेशावर जाण्याचे धाडसी प्रयत्न करून सदरहू प्रदेशासंबंधीं पुष्कळच माहिती मिळविली आहे. तिच्यांतील सार पुढील उताऱ्यांत संगृहीत केलेलें आहे:—'आपले आर्यपूर्वज अगदीं

प्राचीन काळीं उत्तरध्रुवाकडे रहात असत. त्या वेळीं त्या प्रदेशांतील हवापाणी प्राणी-संवर्धनास आणि वसाहतीस सर्व दृष्टींनीं योग्य असेंच होतें. आजच्या बर्फांकित परिस्थिती-मध्येंही उन्हाळ्यांत ध्रुवप्रदेशाची उष्णाई ४८ फॉरिनहैट अंशापर्यंत जाते; हिंवाळा अत्यंत भयंकर म्हणजे ३७ अंश शीतळाईचा असतो. तथापि हिंवाळ्यांतही पश्चिम महासागरावरून येणाऱ्या वाऱ्यामुळें शीतळाई प्रसंगविशेषीं पुष्कळच कमी होते. म्हणजे शीतोष्णाईच्या मानानें ध्रुवप्रदेश आजही अगदीं वसतीहीन आहे किंवा वसतीक्षम नाहीं, असें नाहीं. ध्रुवप्रदेशांत कोळसा, अभ्रक, तांबडी गार, काळा फत्तर, अल्युमिनिअम्, शिसें, रुपें इत्यादि धातु आणि अधातु भूगर्भांमधून सांपडतात. सपुष्प व अपुष्प वनस्पति सुमारें २,००० वर सांपडतात. ध्रुवापासून ९ अंशांवर वनस्पतिगर्भ चुना आणि देवदार्वादि वृक्षांचे अवशेष सांपडतात. अशी आजची अर्धसंशोधित परिस्थिति जर आढळते, तर मग त्या प्राचीन काळीं–सुमारें १० ते २० हजार वर्षांपूर्वी—ह्याच उत्तरध्रुवप्रदेशांत नंदनवनवायु खेळत असल्यास किंवा नंदनवनश्री मुग्धतेनें विहरत असल्यास, ॐ ॐ ॐ तो पृथ्वीच्या विशाल इतिहासामध्यें मोठा चमत्कार म्हणून मानण्याचें विशेष कारण नाहीं. पाहिजे तेवढी शीतळाई, जरूर तितकीच उष्णाई, अखंड सुंदर हवापाणी, मधुर वनस्पति—पुष्प—पक्षीसृष्टि आणि सर्वेच प्रकारची संपन्नता, समृद्धि यांहीं करून त्या वेळचा उत्तर—ध्रुव-प्रदेश केवळ सर्व सुखमय स्वर्ग बनून राहिला होता. ( चित्रमयजगत्, आगष्ट १९३२ )

कालांतरानें उत्तरध्रुवावरील हवामानांत भयंकर फेरफार होऊन हिमवर्षावाचा जोर वाढला आणि तेथील आपल्या पूर्वजांच्या वसाहती उध्वस्त झाल्या. यामुळें त्यांना तेथें राहणें अशक्य होऊन ते मध्यआशियांत येऊन राहिले. पुढें ते हळू हळू दक्षिणेकडे येत येत कांहीं गांधार ( कंदाहार ) देशांत व कांहीं पंजाबांत येऊन राहिले. ही घटना इ. स. पूर्वी ५,००० ते ६,००० वर्षे घडली असावी, असें लोकमान्य टिळकांचें मत आहे.

प्राणघातक संकटांस तोंड देण्यास न भितां डॉ० नॅन्सेन, सर कमॅन्डर पेरी, शाकल्टन, कॅ. स्काट व कॅ० अमुन्डसेन इत्यादि प्रवासप्रिय व साहसी नाविक नरवीरांनीं ध्रुवप्रदेशांचा शोध लावण्याची महत्त्वाकांक्षा बाळगून आपल्या प्रयत्नांची शिकस्त केली आहे. डॉ० नॅन्सेन याला उत्तरध्रुवबिंदु गाठतां आला नाहीं, तथापि तो ज्या ठिकाणापर्यंत पोंचला होता तेथून तो ध्रुवबिंदु केवळ १६० मैल अंतरावर होता. यावरून आज नाहीं, उद्यां ध्रुवबिंदु गांठतां येणें शक्य आहे, हें सिद्ध होतें.

सारांश, प्राचीन काळीं सदेह स्वर्गास जाणें, म्हणजे उत्तरध्रुवावरील नितांत सुंदर व सौख्य आणि समृद्धि यांनीं परिपूर्ण अशा वसाहतींत जाऊन राहाणें, तेथून परत येणें किंवा तेथें कायमचीच वसती करून राहणें ह्या गोष्टी काल्पनिक किंवा असंभाव्य नसून अगदीं सत्य

१. पंतांनीं रामदास व तुकाराम यांच्यासंबंधीं पुढील उद्गार काढिले आहेत. पण त्यांतील 'तनुसह' 'सतनु' व 'सकाय' ह्या शब्दांचा अक्षरशः अर्थ घ्यावयाचा नाहीं. ते शब्द संत-द्वयाच्या केवळ गौरवार्थ योजिले आहेत, हें उघडच आहे:—

सृष्टींतील होत्या, यांत कांहीं संशय नाहीं. आपणास ह्या गोष्टीच्या सत्यतेसंबंधीं शंका येण्याचें कारण स्वर्ग म्हणजे काय ह्याविषयीं तत्कालीन लोकांच्या व आपल्या कल्पनाच भिन्न आहेत, हें होय.

## २. ययातिराजाची जरा व तत्पुत्र पूरूचें तारुण्य यांची अदलाबदल.

ययातीनें आपली जरा आपला पुत्र पूरु यास देऊन त्याचें तारुण्य आपण घेतलें, अशी कथा आहे ( अध्याय ११ पहा ). ती कितपत खरी असावी यासंबधीं आपण विचार करूं.

सुज्ञ पुरुष कांहीं विशिष्ट हेतूनें एकाद्याची परीक्षा विशेष प्रकारानें पाहातात. ययातीनें आपल्या पुत्रांची परीक्षा पाहाण्याकरितां अशाच प्रकारची ही युक्ति लढविली असावी, असें वाटतें. ह्या पूरु-ययातींच्या गोष्टीवरून आम्हाला समर्थ रामदासस्वामींच्या अशाच एका आख्यायिकेची आठवण होते. आपल्या शिष्यांची आपल्याविषयीं कितपत निष्ठा आहे, हें पाहाण्याच्या हेतूनें स्वामींनीं आपल्या पायाला एक मोठा मधुर आंबा बांधून गळू झाल्याची बतावणी केली व ते कण्हत बसले. 'स्वामींना काय झालें?' वगैरे चौकशी शिष्यांनीं केली व कांहीं उपचार करावयाची आवश्यकता असल्यास ते करण्याचीही त्यांनीं उत्सुकता दर्शविली. तेव्हां स्वामींनीं सांगितलें, कीं, 'हें गळू कोणी चोखून त्यांतील पू काढील, तरच मी बचावेन. पण तो चोखणारा मरेल.' हें ऐकतांच हळूहळू एकेका शिष्यानें काढता पाय घेतला. बिचारा कल्याण मात्र तें गळू चोखण्यास तयार झाला. पण समर्थांनीं त्यास पुन्हा पुन्हा बजाविलें, कीं, 'बाबा! तूं असें करिशील तर प्राणास मुकशील.' तथापि गुरुभक्त कल्याणानें आपल्या प्राणांची पर्वा न करितां तें गळू चोखलें व अशा अढळ निष्ठेच्या बळावर तो त्यांचा पट्टशिष्य बनला.

आपले पुत्र आपल्या शब्दाला कितपत मान देतात, त्यांपैकीं खरा पितृभक्त कोण आहे व आपल्या पाठीमागें राज्याधिकारी होण्यास सर्व प्रकारें योग्य कोण आहे, हें पारखतां यावें ह्या हेतूनेंच ययातीनें आपली जरा पुत्रास देण्याचा व त्याचें तारुण्य स्वतःसाठीं घेण्याचा प्रस्ताव केला असावा.

---

( १ ) त्या नमन, वर्णुनी रघुपदयुगुलीला, स्वभक्तवशगेला ।
जो रामदास, तनुसह वैकुंठातें करूनि यश गेला. ॥
( सन्मणिमाला-गीति ३६ )

( २ ) कर जोडितों, सुटाया तनुरूपा, तापहेतु कारा, मी ।
कीं सतनु मुक्त झाला, योगाची सिद्धि हे तुकारामीं. ॥
( सन्मणिमाला—गीति ४७ )

( ३ ) श्रीराम तसा, गेला वैकुंठाला सकाय, हा कांहीं ।
महिमा न भीरु, करणें दुष्टांच्या यास काय हाकांहीं ! ॥
( तुकारामस्तुति—गीति २६ )

तारुण्य व जरा परस्परांस देण्याघेण्याचा प्रसंग खरोखरच घडला, असें आपण गृहीत धरलें, तरी त्यांत अशक्य व असंभाव्य असें कांहींच नाहीं. आधुनिक काळांत जे शोध लावण्यांत येत आहेत व शस्त्रक्रियेच्या जोरावर मनुष्यप्राण्याच्या सुखांत भर घालण्याचे जे प्रयत्न करण्यांत येत आहेत,—त्यांच्याकडे पाहिलें असतां, प्राचीन काळीं सुद्धां असे कांहीं उपाय प्रचारांत असावे, असें वाटतें. प्रसिद्ध जर्मन डाक्टर व्होरोनॉफ हा एका जातीच्या माकडावर शस्त्रक्रिया करून त्याच्या अंगांतील कांहीं विशिष्ट ग्रंथी काढून त्या उतार वयाच्या तारुण्येच्छु माणसांच्या ( स्त्री व पुरुष दोघांच्याही ) शरीरांत बसवितो व अशा रीतीनें तो डाक्टर त्यांना तरुण बनवितो, म्हणजे नवजीवन देणारी शक्ति त्यांच्या शरीरांत वृद्धिंगत होते, हें आतां सर्वांस माहीत झालेलें आहे.

अशा प्रकारें शस्त्रक्रियेच्या द्वारें एकाद्याचें तारुण्य दुसऱ्यास देणें शक्य आहे, हें खरें. तथापि ययातीच्या बाबतींत ही गोष्ट घडली असेल असें वाटत नाहीं, कारण त्या काळीं लोकांची नीतिमत्ता केवढी जाज्वल्य होती, हें कचाच्या उदाहरणावरून स्पष्ट दिसून येतें ( अध्याय १० पहा ). त्याला शुक्राचार्यांच्या पोटांतून बाहेर पडावें लागलें होतें. यामुळें तो आपणास देवयानीचा 'सहोदर' बंधु असें मानूं लागला व यामुळेंच त्यानें तिचें पाणिग्रहण करण्याचें नाकारिलें. अशा त्या काळीं शस्त्रक्रियेसारखा नाजूक प्रसंग ययाति व पूरु यांच्या बाबतींत घडला असता, तर तें कृत्य अत्यंत गर्हणीय समजलें गेलें असतें. कारण पूरूच्या तारुण्याच्या जोरावर देवयानीशीं विषयसुख भोगणें म्हणजे पर्यायानें पूरूनें मातृसंगासारखें महापातक केल्याप्रमाणेंच झालें असतें. असा प्रकार देवयानीला मान्य झाला नसता व ययातीला असा अधर्म करण्याचें धाडस झालें नसतें. ह्या दोघांनीं असें कांहीं नीतिबाह्य वर्तन करावयाचें योजिलें असतें, तर त्यांस असुरगुरु शुक्राचार्यांनीं शाप दिला असता! सारांश, 'जरा दिली' व 'तारुण्य घेतलें' ह्या शब्दांनीं दिग्दर्शित होत असलेल्या वरवरच्या अर्थाकडे लक्ष न देतां, त्यांतील इंगित काय आहे, तें आपण ताडलें पाहिजे. पूरूनें ययातीची 'जरा घेतली' याचा सरळ व खरा अर्थ असा दिसतो, कीं त्यानें राज्यकारभार कसा करावयाचा, प्रजापालन कसें करावयाचें इत्यादि बाबतींत पोक्तपणाचा सल्ला आपल्या पित्यापासून घेतला व त्याच्या अनुपस्थितींत एकाद्या वयोवृद्ध राजाप्रमाणें त्यानें वागावयाचें असें ठरविलें आणि याच्या उलट ययातीनें एकाद्या उच्छृंखल तरुणाप्रमाणें आपली विषयेच्छा तृप्त करण्याकरितां वनोपवनांत जाऊन राहावयाचें असें योजिलें. अशा रीतीनें पूरु कसोटीस उतरला व त्यास राज्यप्राप्ति झाली आणि ययातिही राज्यकारभारांतून मोकळा झाला. सारांश, दोघांचाही कार्यभाग साधून प्रजेलाही चांगला धनी मिळाला.

दुसरी गोष्ट, ययातीला केवळ तारुण्यच पाहिजे असतें, तर त्या काळीं वैद्यशास्त्र अगदीं पूर्णत्वास पोंचलें असल्यामुळें अश्विनीकुमारांस प्रसन्न करून तें त्यास मिळवितां आलें असतें. जराग्रस्त व शुष्ककाष्ठवत् ज्याचें शरीर झालेलें होतें अशा च्यवनऋषींस अश्विनीकुमारांनीं प्रसन्न होऊन तारुण्य व सुंदर रूप दिलें, ही कथा प्रसिद्धच आहे ( श्रीमद्भागवत, स्कंध ९ अध्याय ३ पहा ). यावरून ययातीस तारुण्य पाहिजे होतें, असें नसून आपल्या

पाठीमागें आपल्या पुत्रांतून दौलतीस लायक धनी कोणता, हें ठरवून ठेवावयाचें होतें, हें दिसून येतें.

## ३. कपटरूप धारण करणें.

भृगुऋषीच्या पुलोमा नांवाच्या पत्नीचें पुलोमाराक्षसानें वराहाचें रूप धारण करून हरण केलें, अशी कथा आहे ( अध्याय ३ गीति १० पहा ). ह्यासंबंधानें मूळांत असें वर्णन आहे:—

अग्नेरथ वचः श्रुत्वा तद्रक्षः प्रजहार ताम् ।
ब्रह्मन् ! वराहरूपेण मनोमारुतरंहसा. ॥

( अध्याय ६ श्लोक १ )

ह्यांतील 'वराहरूपेण' हा शब्द महत्त्वाचा आहे. 'रूप' शब्दाचे ( १ ) अनुरूप, साजेसें, व ( २ ) मूळधर्म, स्वभाव–असे अर्थ आहेत. यांतील कोणत्याही अर्थाचा स्वीकार केला, तरी वस्तुस्थितीवर प्रकाश पडतो व कथेंतील इंगित ध्यानांत येतें. येथें 'वराहरूपेण' म्हणजे डुकराला साजेसें वर्तन करून, अर्थात् डुकरासारखी मुसंडी मारून–असा अर्थ समजणें इष्ट आहे. पण असें न समजतां इसापनीतींतील वाघाचें कातडें पांघरणाऱ्या गाढवाप्रमाणें पुलोमाराक्षसानें डुकराचें कातडें आपल्या आंगावर घेतलें होतें, असें समजणें म्हणजे पोरकटपणाची कमालच होय !

अशीच दुसरी कथा किंदमऋषी व त्याची पत्नी यांच्या संबंधानें आहे ( अध्याय १९ गीति १–३ पहा ). हीं उभयतां मृगरूप घेऊन अरण्यांत विहार करीत असतां पांडूनें त्यांचा वध केला. या कथेंतील तात्पर्य एवढेंच कीं पांडु शिकार करीत असतां दुरून त्याला तीं दोघें हरिणांसारखीं भासलीं व त्यानें त्यांच्यावर बाण मारून त्यांस ठार मारिलें.

अशाच प्रकारची चुकी श्रीकृष्णाच्या बाबतींतही झाली, असें श्रीमद्भागवतांत सांगितलेलें आहे ( स्कंध १२ पहा ). बळरामाचें निर्याण झालेलें पाहून भगवान् श्रीकृष्ण एका अश्वत्थवृक्षाखालीं सचिंत बसले होते. इतक्यांत जरा नांवाचा व्याध शिकारीचा शोध करीत अरण्यांत फिरत होता, त्याच्या दृष्टीस श्रीकृष्ण पडले व त्यास तो एक मृग आहे असा भास झाला. यामुळें व्याधानें लांबून एक बाण मारिला तो भगवंतांच्या डाव्या पायाला लागला.

सांप्रत काळीं असे अनेक प्रकार घडतात, हें वृत्तपत्रांच्या वाचकांस विदितच आहे. सारांश, किंदमऋषी व त्याची पत्नी यांनीं मृगरूप धारण केलें होतें, ही केवळ कविकल्पना होय. कदाचित् पांडूच्या दोषाला सौम्यरूप देण्यासाठीं किंवा त्याच्या दोषावर पांघरूण घालण्याच्या हेतूनें त्याच्या चहात्यांपैकीं एखाद्या धूर्तानें ही अशा प्रकारची मखलाशी केली असावी.

---

१. ( सौति म्हणाला ) हे ब्रह्मन् ! अग्नीचें असें भाषण ऐकतांच त्या पुलोमा राक्षसानें मनाच्या व वायूच्या वेगानें रानडुकराचें रूप घेऊन, पुलोमेचें हरण केलें.

अशाच प्रकारच्या आणखी एका गोष्टींतील तथ्य काय आहे तें आपण पाहूं:—

मंदपाल नांवाचा धर्मवेत्त्यांमध्यें वरिष्ठ, तपश्चर्या करणारा, तीव्र व्रतें आचरणारा आणि विद्वान असा एक महर्षि होता. पण त्यास संतति नसल्यामुळें त्याच्या तपश्चर्येचें फळ त्यास मिळेना. म्हणून त्यानें शार्ङ्गकें पक्षी होऊन जरिता नांवाच्या शार्ङ्गिकेशीं संग केला व तिच्या पोटीं त्यानें चार ब्रह्मवादी पुत्रांना जन्म दिला–अशी कथा आहे. (पुढें पृष्ठ ३२६ टीप १० पहा). परंतु ह्या गोष्टीवर कितपत विश्वास ठेवावा, हा प्रश्नच आहे. कारण एकाद्या माणसानें आपला मानवी देह सोडून पक्षी होणें शक्य नाहीं. तसेंच एकाद्या मनुष्यानें मनुष्येतर योनींतील स्त्रीशीं (मादीशीं) संग करून प्रजोत्पत्ति करणें, हेंही संभवनीय नाहीं. प्रस्तुत प्रसंगीं सौतीनें मूळ गोष्टीचा विपर्यास केला आहे, यांत संशय नाहीं. ह्यासंबंधीं मनुस्मृतींतील पुढील श्लोक पहाः—

अक्षमाला वशिष्ठेन संयुक्ताऽधमयोनिजा ।
शारङ्गी मन्दपालेन जगताभ्यर्हणीयताम्. ॥
(अध्याय ९ श्लोक २३)

यावरून शार्ङ्गी किंवा शार्ङ्गिका ही पक्षीण नसून ती एक हीन जातीची स्त्री होती, हें स्पष्ट दिसून येतें. वस्तुस्थिति अशी असतां मंदपालानें सृष्टिक्रमाच्या विरुद्ध भलतीसलती गोष्ट केली, असल्या भाकडकथांवर विश्वास ठेवणें म्हणजे आपल्या चित्ताला विभ्रम झाला आहे, अशी कबुली देणेंच होय!

सध्यां शिक्षणाचा इतका प्रसार झाला असतांही 'रावणानें सीतेचें हरण केलें' म्हणजे त्यानें कांहींतरी जादू टोणा करून सीतेला हरण (हरीण) बनविलें, असें समजणारे जडबुद्धी अद्यापही आढळतात! सारांश, 'गतानुगतिको लोको न लोकः पारमार्थिकः' हेंच खरें, असें म्हणणें भाग आहे!

## ४. नाग व सर्प हे सरपटणारे प्राणी होते काय?

प्रस्तुत पर्वांत ज्या अनेक घटनांचें वर्णन आहे त्यांतील बऱ्याच घटनांशीं नाग व सर्प यांचा संबंध आलेला आहे. तक्षकानें क्षपणकाचें रूप घेऊन पौष्यराजाकडून उत्तंकानें मिळविलेल्या कुंडलांचें हरण केलें (अध्याय २), वासुकीची भगिनी जरत्कारू हिचा जरत्कारु नामक ऋषीबरोबर विवाह व त्यांच्या पोटीं आस्तिकाचा जन्म (अध्याय ५),

---

१. स चिन्तयन्नभ्यगच्छत्सुबहुप्रसवान्खगान् ।
शार्ङ्गिकां शार्ङ्गको भूत्वा जरितां समुपेयिवान् ॥
तस्यां पुत्रानजनयच्चतुरो ब्रह्मवादिनः ॥
(मूळ आदिपर्व, अध्याय २२९ श्लोक १६).

२. अक्षमाला नांवाची नीच योनींत उत्पन्न झालेली एक स्त्री वशिष्ठाशीं आणि शार्ङ्गी नामक एक स्त्री मंदपाल मुनीशीं संयोग पावून या जगीं पवित्रता पावली.

सर्पसत्र ( अध्याय ७ ), नागकन्या उलूपीचा अर्जुनाशीं विवाह, खांडववनदहनप्रसंगांतून तक्षकसुत अश्वसेनाचें संरक्षण ( अध्याय ३८ ) इत्यादि कथाभाग प्रसिद्धच आहेत.

आपली समजूत अशी आहे, कीं महाभारतांत ज्यांचा वारंवार उल्लेख आलेला आहे ते नाग किंवा सर्प हे भुजंग होते व त्यांचा देह अर्धवट मनुष्यासारखा व अर्धवट सापासारखा म्हणजे कंबरेच्या वरील भाग माणसासारखा व खालचा भाग सर्पाकृति असे.

आर्यलोक हिंदुस्थानांत आले त्या काळीं मूळच्या रहिवाशांपैकीं जे एका जातीचे लोक येथें राहात असत, ते नागांची पूजा करीत असत व त्यामुळें त्यांस नागजातीचे लोक असें म्हणूं लागले. त्यांची वसाहत गंगानदीच्या उत्तर तीरावर[१] असून ते आसपासच्या अरण्यांत राहात असत. पांडवांनीं आपलें राज्यही ह्याच प्रदेशांत स्थापन केल्यामुळें त्यांचा व नागांचा झगडा चालू राहाणें क्रमप्राप्तच होतें. अर्जुनानें यमुनानदीच्या कांठचें खांडववन जाळलें तें आपल्या राज्याची मर्यादा वाढविण्याकरितां हें उघडच आहे. ह्या प्रदेशांतील नागांचा राजा तक्षक होता व इंद्र त्याचा पक्षपाती होता, इत्यादि कथा काल्पनिक नसून ऐतिहासिक आहे, हें निरनिराळ्या पुराव्यांनीं सिद्ध झालेलें आहे.

तक्षकानें अळीचें रूप घेऊन परीक्षितराजाच्या वाड्यांत प्रवेश केला व त्यानें एकदम मोठें रूप धारण करून त्यास दंश केला ( अध्याय ५ पहा ). याचा अर्थ एवढाच, कीं त्यानें एकाद्या हलक्या दर्जाच्या नोकरासारखा पोषाक करून राजमंदिरांत प्रवेश केला व राजा गैरसावध असतां त्यास मारणें नीतीस सोडून असल्यामुळें तक्षक प्रकट झाला व नंतर त्यानें राजाचा वध केला असावा.

अर्जुन तीर्थयात्रा करीत फिरत असतां त्यानें उलूपी नामक नागकन्येस वरिलें, तसेंच आस्तीक हा नागकन्येच्या पोटीं जन्मला, इत्यादि गोष्टींवरून नाग हे मनुष्य होते हेंच सिद्ध होतें. कारण मनुष्याचा विवाह मानवेतर स्त्रीशीं होणें शक्यच नाहीं. तसेंच श्रुतश्रवापुत्र सोमश्रवा हा खरोखरच 'व्याली'पुत्र ( अध्याय २ गीति ९।१० ) असता, तर तो जनमे-

---

१. बहूनि नागवेश्मानि गङ्गायास्तीर उत्तरे ।
( गंगानदीच्या उत्तर तीरावर नागांची पुष्कळ मंदिरें आहेत ).
( मूळ आदिपर्व, अध्याय ३।१३६ ).

२. पुढील वचनांवरून जरत्कारू व उलूपी ह्या 'नागिणी' होत्या, अशीच सौतीची समजूत असावी, असें दिसतें:—

( १ ) अवमानः प्रयुक्तोऽयं त्वया मम भुजङ्गमे! ॥ २५ ॥
( २ ) न मे वागनृतं प्राह गमिष्येऽहं भुजङ्गमे! ॥ ३१ ॥
( मूळ आदिपर्व, अध्याय ४७. ).
( ३ ) ऐरावतकुले जातः कौरव्यो नाम पन्नगः ।
तस्याऽस्मि दुहिता राजन्नुलूपी नाम पन्नगी. ॥ १८ ॥
( मूळ आदिपर्व, अध्याय २१४ ).

जयाचा पुरोहित होऊं शकता काय¹? अर्थात् तो नागवंशीय कन्येच्या पोटीं जन्मास आला होता, म्हणजे त्याची माता मानव जातीची होती, हेंच खरें.

आधुनिक काळांत बाप्पा रावळ यानें नागकन्येशीं विवाह केला होता, असा उल्लेख आढळतो.

नाग व सर्प ह्या दोन जाती होत्या असें श्रीमद्भगवद्गीतेंतील 'सर्पाणामस्मि वासुकिः' व 'अनंतश्चास्मि नागानां' ( अध्याय १० श्लोक २८–२९ ) ह्या उल्लेखांवरून दिसतें. कदाचित् एकाच जातीच्या लोकांचे हे पोटभेद असावे. पण ह्या गोष्टीशीं आपणास कांहीं कर्तव्य नाहीं. सारांश, सर्प व नाग हे मनुष्य होते, यांत कांहीं संशय नाहीं.

## ५. सरमा ही कुत्री होती काय ?

जनमेजयराजा 'बहुवार्षिक' सत्र करीत असतां तेथें एक कुत्रा आला व त्याला राजबंधूंनीं मारिलें. त्या कुत्र्याची माता सरमा नामक देवशुनी होती व तिच्या पुत्राला ताडण केल्यामुळें तिनें संतापून जनमेजयराजाला 'तुझ्यावर कांहींतरी अकल्पित संकट येईल' असा शाप दिला, अशी कथा आहे ( अध्याय २ गीति १–५ ). आतां ही कथा अक्षरशः खरी मानावयाची किंवा कालांतरानें तिच्यावर चढलेला गंज पुसून काढून तिच्यांतील तत्त्वार्थ शोधून काढावयाचा हा आपल्यापुढें प्रश्न आहे.

पशु, पक्षी व मानवेतर प्राणी मानवांच्या भाषेंत मानवांबरोबर बोलतांना आपण फक्त इसापनीतींत पाहतों. परंतु त्या सर्व कथा कल्पित आहेत, हेंही आपणास माहीत आहे. मानवेतर प्राण्यांस मानवांच्या भाषेंत बोलतां येणें सत्य सृष्टींत तरी शक्यतेच्या पलीकडचें आहे, यांत शंका नाहीं.

नागजातीय लोक पूर्वीं अस्तित्वांत होते, त्याप्रमाणेंच शुनक जातीचे लोकही अस्तित्वांत असणें संभवनीय आहे. सरमा ही त्या जातीची स्त्री असावी. शुनक ह्या शब्दाचा अर्थ कुत्रा असा होतो हें खरें, पण भृगुकुलोत्पन्न रुरु नामक ऋषीस प्रमद्वरा नांवाच्या अप्सरेपासून शुनक ह्या नांवाचा पुत्र झाला होता ( अध्याय ३ गीति २ पहा ). ह्या शुनकाला शौनक नांवाचा पुत्र होता. हा ऋग्वेद जाणणाऱ्या ऋषींत श्रेष्ठ होता, अशी प्रसिद्धी आहे. प्रस्तुत पर्वांत शुनक नांवाच्या एका राजाचाही उल्लेख आहे ( मूळ आदिपर्व, अध्याय ६७।३८ ). तसेंच शौनक नामक एक सोमवंशीय राजाही होता.

भगवान श्रीकृष्ण निजधामास गेल्यानंतर कोणकोणत्या राजांनीं राज्य केलें त्याचें वर्णन श्रीमद्भागवत, स्कंध १२ यांत आहे. त्यांत मार्जारी नामक एका राजाचा व शुनक नामक

---

१. काश्यः कुशो गृत्समद इति गृत्समदादभूत् ।
शुनकः शौनको यस्य बह्वृचप्रवरो मुनिः ॥
( श्रीमद्भागवत, स्कंध ९, अध्याय १७ । ३ ).

अमात्याचा उल्लेख आहे. तसेंच गर्दभी व गरुड वंशांतील दहा दहा राजांनीं राज्य केल्याचें वर्णन आहे. ( पंतकृत मंत्रभागवत, द्वादशस्कंध, गीति ३, ४, १९ व २१ पहा ).

सांप्रत कुत्रे, लांडगे, वाघ, कोल्हे, गरुड, श्वान इत्यादि आडनांवें ज्यांचीं आहेत, अशीं कित्येक घराणीं आहेत. त्यांतील व्यक्ती ह्या त्या त्या जातीचे निरनिराळे मनुष्येतर प्राणी आहेत असें समजणें असमंजसपणाचें आहे, हें स्पष्टच आहे.

वरील सर्व गोष्टींचें बारकाईनें निरीक्षण केल्यास, व सरमा ही जनमेजयासारख्या समर्थ राजास शाप देऊं शकेल अशी तेजस्वी होती इत्यादि गोष्टींवरून ती कुत्री नसून जिच्या आंगीं निग्रहानुग्रहशक्ति होती अशी एक मनुष्यजातीची स्त्री होती, यांत कांहीं शंका नाहीं. सौतीसारखे भोळे भाबडे पुराणिक व 'बाबावाक्यं प्रमाणं' समजणारे श्रोते यांची जोडी जमली म्हणजे केवळ शब्दसादृश्यावरून अर्थाचा अनर्थ कसा होतो, त्याचें हें एक उदाहरण आहे.

## ६. सूर्य व कुंती यांची भेट.

कुंतीला दुर्वासऋषींच्या कृपेनें वशीकरणविद्या प्राप्त झाली होती व तिचा अनुभव पाहाण्याकरितां आपणास सूर्यानें दर्शन द्यावें म्हणून तिनें त्या मंत्राचा जप केला. जप करितांक्षणींच सूर्यानें तिला भेट दिली व त्या भेटीचा परिणाम म्हणजे कर्णाचा जन्म होय-इत्यादि कथा प्रसिद्धच आहे ( अध्याय १७ पहा ).

कुंती ही एक मानवी व्यक्ती होती, असें असतां तिचा व सूर्याचा समागम घडणें शक्य आहे काय ? हा विचार करण्यासारखा प्रश्न आहे. प्रकाश आणि उष्णता उत्पन्न करणारा[1] भगवान सूर्यनारायण कोमलांगी कुंतीच्या भेटीसाठीं आला आणि त्यानें 'भीरु ! भय त्यजुनि, मिठी घालीं माझ्या गळ्यांत बाहूंनीं' ( गीति १२ ) व 'कां जाणसि आमुची न कोमळता ?' ( गीति १३ ) अशा प्रकारें त्या बिचारीची कितीही मनधरणी केली, अशी आपण कल्पना केली, तरी त्या दोघांचा संबंध घडला असेल, असें समजणें हास्यास्पद होय.

सूर्य म्हणजे आकाशांत दिसणारा तेजोगोल होय, असें आपण समजतों. परंतु तो पृथ्वीपासून किती अंतरावर आहे व त्याची उष्णता किती प्रखर आहे, हें आपणास माहीतच आहे. ह्या सर्व गोष्टींचा विचार करितां आम्हाला असें वाटतें, कीं ज्याच्या अंगीं तेजाचा व प्रभावाचा विलक्षण सांठा होता असा हा सूर्य नांवाचा कोणीतरी कुंतीचा समकालीन व समवयस्क तरुण असावा व तो 'एकांतीं गंगेच्या तीरीं' ( गीति ७ ) तिला भेटला असावा.

श्रीसमर्थ रामदासस्वामींचे वडील सूर्याजीपंत होते, हें आपणास माहीतच आहे. पण आकाशस्थ सूर्याच्या पोटीं समर्थ जन्मास आले, असें त्यांच्या गौरवार्थ किंवा दुसऱ्या

---

१. प्रकाशकर्ता तपनः सम्बभूव तया सह ।

( मूळ आदिपर्व, अध्याय १११-१८ ).

कोणत्या हेतूनें, जर कोणी म्हणूं लागला, तर तें आपणास पटणें शक्य आहे काय? ह्याच न्यायानें, कुंतीला भेट देणारा सूर्य ही एक मानवी व्यक्ती होती, असें मानणें अपरिहार्य आहे. तसेंच चंद्रवंशाचा मूळपुरुष चंद्र हा 'चंद्र नांवाचा आकाशस्थ गोल' नव्हे, तर तो अत्रिऋषीचा पुत्र होय, हेंही आपण लक्षांत ठेविलें पाहिजे.

संवरणराजानें सूर्यकन्या तपती हिला वरिलें ( अध्याय ३३ ). ह्या कथेंतील तपती ही सूर्य नांवाच्या कोणा मनुष्याची कन्या असावी. पण तो राजा होता, कीं कोणी सामान्य दर्जाचा मनुष्य होता हा मुद्दा महत्त्वाचा नाहीं.

कुंती व माद्री यांना भेट देऊन त्यांची मनःकामना पूर्ण करणारे देव ( अध्याय १९ गीति ६३-९८ ) हे खरोखर देवच होते, कीं गौतमरूपानें अहल्येचें धर्षण करणाऱ्या इंद्राप्रमाणें कोणी फसव्ये किंवा तोतये ( Impostors ) होते, हें त्यांचें त्यांनाच माहीत! परंतु एकाद्या स्त्रीनें बोलाविल्याबरोबर देव येत असत, असें समजणें, म्हणजे त्यांच्या नीतिविषयक उच्चतेची अभिज्ञता व शुद्धाचरण यांविषयीं आपली कल्पना अगदीं संकुचित आहे, अशी कबुली देणेंच होय. ही आख्यायिका देवांच्या नांवावर पसरविण्यांत कुंती व माद्री यांच्या आप्तेष्टांचा कांहीं हेतूही असण्याचा संभव आहे.

वशीकरणविद्या ही एकादी वास्तविक विद्या आहे, कीं ती काल्पनिक आहे, ह्यासंबंधीं चर्चा करण्याचें हें स्थळ नव्हे. परंतु आपल्या दोषावर पांघरूण घालण्याच्या हेतूनें किंवा निदान त्याची तीव्रता कमी भासावी, म्हणून ज्या अनेक युक्त्या योजण्यांत येतात, त्यांपैकींच ही एक असावी, असें आम्हाला वाटतें.

## ७. गर्भधारणेची कालमर्यादा.

ह्या बाबतींत प्रस्तुत पर्वांत निरनिराळ्या ठिकाणीं निरनिराळे उल्लेख आढळतात. महाभारतकाळीं देखील स्त्रिया दहाव्या महिन्यांत प्रसूत होत असत ( अध्याय ८ गीति २४ ). परंतु गांधारी दोन वर्षें गरोदर होती ( अध्याय १८ गीति ७ ) व शकुंतला तीन वर्षें[1] गरोदर होती. इतकेंच नाहीं, तर सौदासराजाची पत्नी मदयंती बारा वर्षें[2] गरोदर असूनही

---

१. त्रिपु वर्षेपु पूर्णेषु दीप्तानलसमद्युतिम् ।
रूपौदार्यगुणोपेतं दौष्यन्तिं जनमेजय ! ॥
( आदिपर्व, अध्याय ७४।२ ).

२. ततोऽपि द्वादशे वर्षे स जज्ञे पुरुषर्षभः ।
अश्मको नाम राजर्षिः पौदन्यं यो न्यवेशयत्. ॥
( आदिपर्व, अध्याय १७७।४८ ).

पण तो गर्भ मदयंतीच्या उदरांत सात वर्षें होता, असें श्रीमद्भागवतांत सांगितलेलें आहे:—

सा वै सप्त समा गर्भमबिभ्रन्न व्यजायत ।
जघ्नेऽश्मनोदरं तस्याः सोऽश्मकस्तेन कथ्यते. ॥
( स्कंध ९, अध्याय ९।३९ ).

प्रसूत होईना. तेव्हां तिनें आपलें पोट दगडानें फोडून मुलास बाहेर काढिलें. तोच अश्मक नांवाचा राजा होय.

मनुष्याचें वसतिस्थान बदललें व त्याच्या राहाणीमध्यें कितीही फेरबदल झाला, तरी गरोदरावस्थेचा काळ इतका लांबणें शक्य आहे कीं काय, हा एक विचार करण्यासारखा प्रश्न आहे. एकाद्या स्त्रीचा गर्भ वायूच्या योगानें किंवा इतर कारणांनीं बारा महिनेपर्यंत वाढूं शकतो, असें आपल्या वैद्यकशास्त्रावरून[1] दिसतें, पण तो गर्भ मातेच्या पोटांत विकार उत्पन्न करितो.

बापाच्या मरणानंतर जें मूल दोन वर्षांच्या आंत जन्मास येतें तें औरस समजलें जावें, असा मुसलमानी कायद्यांत नियम आहे, म्हणजे गर्भाची पूर्ण वाढ होण्यास क्वचित् दोन वर्षे लागतात, असा त्याचा अर्थ आहे. तथापि एकंदरींत विचार करितां गांधारी, शकुंतला व मदयंती ह्यांचीं उदाहरणें सामान्य नियमास अपवादरूप होत, असें गृहीत धरून चालणें भाग आहे.

## ८. अमोघवीर्य.

प्राचीन काळीं आश्रमधर्म अगदीं कडकपणें पाळले जात व ब्रह्मचर्यपालनाचें महत्व त्या काळच्या लोकांस पटलें होतें. यामुळें वीर्यनाश न व्हावा म्हणून योग्य ती काळजी घेतली जात असे. त्याचा परिणाम समाजास मोठा हितप्रद होत असे. प्रत्येक पुरुष आपलें वीर्य अमोघ असावें, अशी महत्वाकांक्षा धारण करीत असे व ती सफळ व्हावी याकरितां जपत असे.

श्रुतश्रवा ऋषीचें रेत स्खलन पावलें व तें एक 'व्योली'[2] प्याली. तेणेंकरून तिच्या पोटीं सोमश्रव्याचा जन्म झाला. ( अध्याय २ गीति ७–१० );

वसुराजानें श्येनाबरोबर पाठविलेलें आपलें वीर्य त्याच्या स्त्रीपर्यंत न पोंचतां यमुनेच्या कांठीं राहाणाऱ्या अद्रिका नामक अप्सरेनें गिळिलें व तिच्या पोटीं दोन बालकें जन्मास आलीं ( अध्याय ८ गीति १५–२६ ); व्युषिताश्वराजा निपुत्रिक मरण पावला. तेव्हां त्याच्या भद्रा नामक राणीनें, आकाशवाणीच्या द्वारें राजानें सांगितल्याप्रमाणें, ऋतुस्नात असतां त्याच्या शवासह[3] शयन केलें व तिला सात पुत्र झाले ( अध्याय १९ गीति ४०–४३ ); गौतमपुत्र शरद्वान नामक ऋषीचा तपोभंग व्हावा, म्हणून इंद्रानें जानपदी नांवाच्या

---

१. वाग्भटकृत अष्टांगहृदय, शारीरस्थान, अध्याय १।६७

२. मूळांत 'पुत्रोऽयं मम सर्प्यां जातो महातपस्वी स्वाध्यायसंपन्नो मत्तपोवीर्यसंभृतो मच्छुक्रं पीतवत्यास्तस्याः कुक्षौ जातः' ( अध्याय ३।१६ ) असें आहे. यांतील 'सर्पी' व 'शुक्रं पीतवती' हे शब्द मननीय आहेत.

३. सा तेन सुषुवे देवी शवेन भरतर्षभ ।
त्रीन्छाल्वांश्चतुरो मद्रान्सुतान्भरतसत्तम. ॥
( आदिपर्व, अध्याय १२१।३७ ).

अप्सरेस पाठविलें होतें. तिच्या दर्शनानें त्याचें रेत पतन पावलें. त्यापासून कृप व कृपी यांचा जन्म झाला ( अध्याय २२ गीति १-५ ); घृताची नामक अप्सरेच्या दर्शनानें भरद्वाजमुनींचें रेत स्खलन पावलें व तें त्यानें द्रोणांत ठेविलें. त्यापासून द्रोणाचार्यांची उत्पत्ति झाली ( अध्याय २३ गीति १-४ ); कल्माषपादराजाच्या मदयंती नामक राणीशीं वशिष्ठ ऋषींनीं आपल्या पुण्याचा क्षय न व्हावा म्हणून दिव्य विधीनें संग करून, वंशवृद्धि करणारा पुत्र ( अश्मक ) उत्पन्न केला ( अध्याय ३४ गीति ६८ ) इत्यादि कथा प्रस्तुत पर्वांत आहेत.

ह्या कथा काल्पनिक आहेत असें आपणास वाटलें, तर त्यांत कांहीं नवल नाहीं. परंतु सध्यां भौतिकशास्त्रांत जे निरनिराळे शोध लागले आहेत, त्यांच्याकडे बारकाईनें पाहिलें असतां उपरिनिर्दिष्ट कथांत सांगितल्याप्रमाणें प्रजोत्पत्ति होणें अगदींच अशक्य आहे, असें वाटत नाहीं. कदाचित् भारतांतील तपशिलांत अतिशयोक्तीचा कांहीं भाग असेल, नाहीं असें नाहीं. परंतु सध्यां स्त्री व पुरुष यांचा प्रत्यक्ष समागम न घडतां अमेरिकेंत कांहीं स्त्रियांना अपत्यप्राप्ति झाली आहे व अशा प्रकारचे प्रयोग तिकडे चालू आहेत, हें वृत्त वाचून महाभारतांतील कथांविषयीं शंका वाटण्याचें कांहीं कारण दिसत नाहीं. पुरुष-स्त्रीसंयोगाशिवाय होणाऱ्या मुलांस तिकडे Test-tube babies असें म्हणतात². वीर्य अमोघ असल्याखेरीज अशा प्रकारचे प्रयोग यशस्वी होणें शक्य आहे, असें वाटत नाहीं.

## ९. आकाशवाणी.

प्रस्तुत पर्वांत बऱ्याच ठिकाणीं 'आकाशवाणी'संबंधानें उल्लेख आढळतो.

महर्षि कश्यपांनीं शकुंतलेस पुत्रासह दुष्यंताकडे पाठविलें असतां त्यानें तिचा स्वीकार केला नाहीं व तो तिला दुरुत्तरें बोलूं लागला. यामुळें ती संतापली व तीही त्याची निर्भर्त्सना करूं लागली. तेव्हां त्या दोघांचें भांडण विकोपास जाऊं नये म्हणून आकाशस्थ देवतांनीं 'अशरीरिणी वाणी' उत्पन्न करून कश्यपाच्या आश्रमांत घडलेल्या गोष्टीचें त्यास स्मरण करून दिलें. तेव्हां 'आपण सर्वांनीं हें देवदूताचें भाषण ऐकलें ना?' असें त्यानें आपल्या दरबारांतील लोकांस उद्देशून म्हटलें व शकुंतला व भरत यांचा स्वीकार केला ( अध्याय १२ गीति ७९-८२ ).

---

१. महर्षिः संविदं कृत्वा सम्बभूव तया सह ।
देव्या दिव्येन विधिना वशिष्ठः श्रेष्ठभागृषिः ॥
( आदिपर्व, अध्याय १७७।४५ ).

२. ह्यासंबंधीं पुढील उतारा वाचनीय आहे:—

"The successful test-tube production of eight babies, including a pair of twins, was announced to-day by Drs. Frances Seymour and Alfred Koerner obsterricians who have developed the science of providing children to women who, by necessity or choice, are unmated".

व्युषिताश्वराजा स्वर्गवासी झाल्यामुळें त्याची भद्रा नांवाची राणी शोकग्रस्त झाली, तेव्हां तो 'नभांत बोलिला वाणी' ( अध्याय १९ गीति ४१ ) असें वर्णन आहे.

अर्जुन जन्मास येतांच आकाशवाणी झाली व तिनें त्याच्या अंगच्या अनेक गुणांचें वर्णन करून पांडु व कुंती यांच्या पोटीं असा भाग्यशाली व पराक्रमी पुत्र उत्पन्न झाला, याबद्दल त्यांचें अभिनंदन केलें ( अध्याय १९ गीति ८० व ८५ ).

द्रौपदीच्या जन्मकाळीं आकाशवाणी झाली, कीं 'ही सर्व स्त्रियांत श्रेष्ठ होईल व ही देवांचें कार्य सिद्धीस नेण्याकरितां अवतरली आहे' ( अध्याय ३२ गीति २० ).

प्राचीन काळीं भरतखंडांतील लोक मोठे ज्ञानसंपन्न व प्रयत्नशील होते आणि अनेक शास्त्रज्ञ व संशोधक अग्नि व विद्युच्छक्ति यांच्या बळावर निरनिराळ्या सुखसोयी निर्माण करण्यांत गढलेले असत. रामायण व महाभारतादि प्राचीन ग्रंथांत अनेक शस्त्रास्त्रांचीं वर्णनें आढळतात. पण तीं सर्व काल्पनिक असावीं, असें एका काळीं आपणास वाटत असे. त्याचें कारण, मध्यंतरींच्या अनेक अज्ञेय घडामोडींमुळें ते सर्व शोध लुप्त झाले होते. परंतु सध्यां भौतिक शास्त्रांची प्रगति झपाट्यानें होत आहे व अनेक शास्त्रज्ञ आपल्या बुद्धिवैभवानें व उद्योगसातत्यानें पूर्वकालीन सर्व शस्त्रास्त्रादि साधनांचें पुनरुज्जीवन करीत आहेत. रेडियो, बोलपट, बिनतारी संदेश, अग्न्यस्त्रें, वायवास्त्रें, अश्रु काढणारा किंवा ओकाऱ्या आणणारा धूर, निरनिराळ्या प्रकारचीं आकाशयानें इत्यादि-पांचपंचवीस वर्षांपूर्वीं अज्ञात असलेल्या— गोष्टी आतां आपण प्रत्यक्ष पाहात आहों. तेव्हां महर्षि कण्व व तत्कालीन शास्त्रपारंगत व अधिकारी महात्म्यांजवळ आकाश-लहरींनीं उत्पन्न केलेली 'आकाशवाणी' ऐकण्याची किंवा आकाशसंदेश पाठविण्याची कांहीं योजना असणें शक्य आहे.

आकाशवाणी कशी आणि कोणत्या साधनांनीं उत्पन्न होत असे, किंवा उत्पन्न केली जात असें, हें महाभारतांत कोठें सांगितलेलें आढळत नाहीं. परंतु विद्युच्छक्तीनें व आकाश-लहरींनीं ( Ether waves ) किंवा तत्सदृश साधनोपायांनीं ती उत्पन्न होत असली पाहिजे. सध्यां यूरोपांत व अमेरिकाखंडांत घरोघरीं प्रचारांत असलेली Wireless telephony म्हणजेच पूर्वीची 'आकाशवाणी' होय, असें म्हणावयास हरकत नाहीं.

## १०. आणखी कांहीं किरकोळ गोष्टी.

तक्षकानें आपल्या उग्र विषाच्या योगानें एका वटवृक्षास दंश करून भस्मसात् केलें व कश्यप नांवाच्या ब्राह्मणानें आपल्या विद्येच्या बळानें तो वृक्ष पूर्वीं होता तसाच पुन्हां केला-इत्यादि कथा आहे ( अध्याय ५ गीति ६१-७२ ). तिच्यांतील अतिशयोक्तीचा भाग आपण वगळला म्हणजे विषानें दग्ध ( पीडित ) झालेलें झाड कश्यपानें आपल्या औषधि-ज्ञानाच्या ( किंवा मंत्राच्या ) बळावर पूर्ववत् केलें, एवढी सरळ गोष्ट शिल्लक राहाते व तिच्या सत्यतेविषयीं शंका घेण्याचें कांहीं कारण दिसत नाहीं. कारण, कांहीं कारणानें वठलेलीं झाडें पावसाळ्यांत किंवा क्वचित् अन्य ऋतूंतही अनुकूळ परिस्थिति प्राप्त होतांच पुन्हां नवांकुरित झालेलीं आपण पाहातों, तशाच प्रकारचें हें एक उदाहरण समजावें.

गांधारीनें शंभर पुत्र व एक कन्या यांस एकदम जन्म दिला, असें वर्णन आढळतें (अध्याय १८). यांतील 'शतकुंभरक्षणाचा विधि' (गीति ७-१२) इत्यादि भागासंबंधीं शारीरशास्त्रवेत्त्यांनीं विचार करणें इष्ट आहे. तो भाग सोडून गांधारीस १०१ अपत्यांची प्राप्ती झाली, एवढ्या भागाचा विचार केल्यास तीं एकदम जन्मास येणें असंभवनीय आहे, हें खरें असलें, तरी त्या काळचें आयुर्मान, स्त्रीपुरुषांच्या शरीरांची योग्य रीतीनें होणारी जोपासना व पति-पत्नींचें योग्य वय होण्यापूर्वी त्यांचा समागम न होणें वगैरे गोष्टी लक्षांत घेतां एका स्त्रीस इतकीं मुलें होणें शक्य आहे, असें वाटतें. [१]

स्त्रियांची प्रसवक्षमता निरनिराळ्या कारणांनीं कमीज्यास्त होऊं शकते आणि या दृष्टीनें हा एक अभ्यसनीय विषय आहे.

हिडंब (अध्याय ३०) व बकासुर (अध्याय ३१) वगैरे पर्वतासारख्या अवाढव्य व धिप्पाड शरीराच्या व ज्यांचा आहार 'एक महिष, एक पुरुष, शाल्योदनराशि' (अध्याय ३१।३७) आहे, अशा राक्षसांचीं वर्णनें आढळतात. अशा वर्णनांत अतिशयोक्तीचा भाग बराच असावा, हें उघडच आहे. तथापि सध्यां निरनिराळ्या कारणांनीं मनुष्यप्राण्याची जी अवनति होत आहे, ती विचारांत घेतल्यास, प्राचीन काळीं ज्यांचीं शरीरें मोठीं अजस्र होतीं, अशा व्यक्ती असणें असंभवनीय वाटत नाहीं. कारण असे माणसांचे सांगाडे क्वचित् आढळतात. [२]

निसर्गाच्या लहरी लीलांचे उल्लेखही कोठें कोठें आढळतात. उदाहरणार्थ–ऋष्यशृंग ऋषी (अध्याय १९ गीति ५). पण सशृंग व्यक्ती आजकालही आढळतात. तेव्हां पूर्वकालीन ऋष्यशृंग ऋषीच्या अस्तित्वासंबंधीं शंका घेण्याचें कांहीं कारण नाहीं. [३]

---

१. सौ० बिॲट्रिस हिचिन्स ह्या तेवीस वर्षें वयाच्या बाईनें एकदम चार मुलांस जन्म दिला. ...बोगाटा येथील एका बाईला एकदम सात मुलगे झाले...पण ह्या विषयांत पहिली ढाल शिकागोच्या एका बाईनें मिळविली आहे. तिला एकदम आठ मुलें झालीं! हळूहळू गांधारीला मान खालीं घालावी लागणार कीं काय? (केसरी, ता० २२-६-३४).

२. जबलपुरापासून आठ मैलांवरील एका खेड्यांत एक शेतकरी खणीत असतां, त्याला एका सांगाड्याचा भाग आढळला. तेव्हां त्यानें आणखी माणसें मदतीला बोलाविलीं व तो सांगाडा जमिनींतून खणून काढला. तो माणसाच्या सांगाड्यासारखा दिसतो. त्याची उंची २१॥ फूट आहे. त्याच्या नुसत्या पायांचीच लांबी १० फूट आहे. हा सांगाडा इतका जड आहे, कीं तो उचलावयास ३ माणसें लागलीं. (नागपुर, महाराष्ट्र-तारीख १९-८-३४).

३. जयपुर संस्थानांतील मोहनपुरा नांवाच्या एका खेड्यांतील बाईस डोक्यावर २॥ इंच लांबीचीं शिंगें असलेलें मूल झालें होतें. जन्मल्याबरोबरच तें आपल्या पायांवर उभें राहिलें. पुढें १९ तासांनीं......मरण पावलें. (केसरी, ता० १४-८-३४).

बिलासपुर येथें गेल्या आठवड्यांत एका आधुनिक शृंगऋषीच्या डोक्यावर आलेलें ६ इंच लांब व ३ इंच जाड शिंग डॉक्टरांनीं कापून काढिलें! सदर शिंग त्या इसमाच्या डोक्यावर २० व्या वर्षीं उगवलें व पांच वर्षांत त्याची इतकी वाढ झाली....(नागपुर, महाराष्ट्र-तारीख ५-१२-३४).

आणखीही कांहीं बारीकसारीक गोष्टींचा उल्लेख करितां येण्यासारखा आहे, पण विस्तरभयास्तव येथेंच थांबणें इष्ट आहे.

आतांपर्यंत आपण असंभाव्य वाटणाऱ्या गोष्टींसंबंधानें बराच ऊहापोह केला. आतां आपण राजकीय व सामाजिक परिस्थिति, तत्कालीन लोकांचे आचार व विचार, त्यांच्या चालीरीती इत्यादि बाबींकडे वळूं.

## राजकीय परिस्थिति.

ह्या सदराखालीं देण्यासारखी विशेष माहिती प्रस्तुत पर्वांत नाहीं. कारण महाभारतांत वर्णिलेल्या सर्व घडामोडींचा केवळ आरंभच ह्या पर्वांत झालेला आहे. शिवाय, कौरवांनीं पांडवांस वेळोवेळीं जो निरनिराळया प्रकारें त्रास दिला, त्यांत राजकीय डावपेंचांपेक्षां 'भाऊबंदकी'च ज्यास्त होती, असें आम्हांस वाटतें.

प्राचीन काळीं राज्यें फार लहान असत व त्यामुळें राजा व प्रजा यांच्यांत आत्मीय भाव विशेष असे, आणि राजेही न्यायानें व नीतीनें प्रजापालन करीत असत. दुष्यंतासारखे प्रजापालनदक्ष राजे अनेक होऊन गेले. त्यांचें ध्येय 'प्रजाः प्रजाः स्वा इव' हें असे. दुष्यंताच्या राज्यांत प्रजेला चोरांचें थोडें सुद्धां भय नसे, क्षुधेचें भय नसे व व्याधींचेंही भय नसे. सर्व वर्णांचे लोक आपापलीं नियत कर्में करून सुखांत कालक्रमणा करीत असत.

अमुकच पद्धतीनें राज्यकारभार चालविला जात असे, असें दिसून येत नाहीं. तथापि महत्वाच्या बाबतींत राजा प्रजेची संमति घेत असे. इतकेंच नाहीं, तर कधीं कधीं प्रजाजन आपण होऊन एखादी गोष्ट राजास सुचवीत असत, असें 'युधिष्ठिरास आम्ही राज्याभिषेक करूं' इत्यादि जें त्यांनीं एकमतानें धृतराष्ट्रास सांगितलें, त्यावरून दिसून येतें (अध्याय २९ गीति ५).

ययातीनें आपला कनिष्ठ पुत्र पूरू यासच राज्याभिषेक कां करावयाचा हें प्रजाजनांस समजावून देऊन त्याच्या अंगच्या गुणांची जाणीव त्यांस करून दिली होती व अशा रीतीनें त्यांच्या संमतीनें त्यास राज्यपद प्राप्त झालें.

आजकालच्या बऱ्याच राजांप्रमाणें कांहीं तत्कालीन राज्यकर्तेही विलासांत दंग असत. संवरण राजा तपतीच्या प्रेमपाशांत बद्ध होऊन बारा वर्षें आपल्या राज्याच्या बाहेर राहिला होता (अध्याय ३३), व तेणेंकरून त्याच्या राज्यांत अंदाधुंदी माजली व दुष्काळ पडला. राजा विचित्रवीर्य 'कामात्मा' होऊन सात वर्षें विलासांत रममाण झाल्यामुळें क्षयानें मरण पावला! (अध्याय १४) व त्याच्या स्त्रियांच्या पोटीं नियोगपद्धतीनें पुत्रोत्पत्ति करविण्याचा प्रसंग आला!

सज्जन आणि दुर्जन हे एकाच वेळीं व एकाच ठिकाणीं असावयाचेच. त्याप्रमाणें युधिष्ठिरविदुरादि सज्जनांच्या जोडीला शकुनीसारखे कारस्थानी व कणिकासारखे कपटपटु दुरात्मे

१. मूळ अध्याय ६८ श्लोक ३-१४ पहा. २. मूळ अध्याय ८५ श्लोक २३-३५ पहा.

होतेच. परंतु त्यांचे डावपेंच यशस्वी न होतां 'जय कैंचा साधुजनविरोधानें?' ही पंतोक्तीच (कर्णपर्व, अध्याय ४७ गीति २२) खरी ठरली.

प्रजेचें कल्याण होणें वा न होणें हें राजाच्या शीलावर आणि त्याच्या दंडनीतीवर अवलंबून असतें, म्हणून पंत म्हणतातः—

ते **साधु भूप,** देती सुख साधुजनासि, दुःख चोरा जे।

(अध्याय ३८ गीति ३०)

सु-प्रभु ताट सुधेचें, कुप्रभु वांतान्नपूर्ण खापर तें।

(अध्याय २९ गीति ५)

पूर्वी असे अनेक प्रजाहितैषी राजे होऊन गेले. पांडवांचा पणतू जनमेजयराजा कसा होता पहाः—

बाळपणींच सुमति तो जनमेजय रंजवी प्रजा, माता—।
तात तसा पाळी, ज्या गुरु-धन-सत्कार्य विप्र जामाता. ॥

(अध्याय ५ गीति ९०)

एकंदरींत त्या काळीं प्रजा बरीच सुखांत आणि समाधानांत होती, असें दिसतें. तथापि त्या काळीं देखील संपत्तीची वांटणी फारच विषम प्रमाणांत झालेली होती, असें म्हणावें लागतें. नाहींतर द्रोणाचार्यांना अत्यंत दारिद्र्यांत दिवस काढावे लागून अश्वत्थाम्यावर दुधाच्या ऐवजीं पिठाचें पाणी पिण्याचा प्रसंग न येता! (अध्याय २४ गीति २७). राजे लोकांकडे हजारों गायींचे कळप असूनही द्रोणाचार्यांना एक देखील गाय दान देण्याची बुद्धि कोणास झाली नाहीं, हें कदाचित् त्यांचें व त्यांच्या पुत्राचें दुर्दैव असेल!

निरनिराळ्या राष्ट्रांतील राजपुत्र व राजकन्या यांच्या विवाहाच्या मूळाशीं कांहीं तरी राजकीय हेतु असे. धृतराष्ट्र व गांधारी ह्यांचा विवाह हें एक अशा प्रकारचें उदाहरण होय. तसें नसतें तर आंधळ्या राजपुत्राला मोठ्या संतोषानें कोणत्या राजानें आपली कन्या अर्पण केली असती? भीष्मानें सुबलराजाजवळ गांधारीकरितां मागणी घातली, तेव्हां धृतराष्ट्र अंध असल्यामुळें त्यास कन्या द्यावी कीं न द्यावी, असा त्याला मोठा पेंच पडला, व त्या बाबतींत पुष्कळ खल झाला. अखेरीस शक, बाल्हीक इत्यादि देशाचे राजे गांधारदेशास नेहमीं उपद्रव देत असत ही गोष्ट लक्षांत घेऊन भीष्मासारख्या पराक्रमी वीराची सहानुभूति संपादन करणें स्वदेशसंरक्षणाच्या दृष्टीनें सुबलराजास इष्ट आणि अपरिहार्य वाटलें. तसेंच शकुनी व गांधारी हीं बहीणभावंडें मोठीं धोरणी व 'अर्थविशारद' होतीं. त्यांनाही ह्या परिस्थितीची जाणीव होती. यामुळें धृतराष्ट्र अंध असला तरी तो 'प्रज्ञाचक्षु'

---

१. गांधारराजपुत्रोऽभूच्छकुनिः सौबलस्तथा।
दुर्योधनस्य जननी जज्ञातेऽर्थविशारदौ. ॥
(मूळ अध्याय ६३ श्लोक ११२).

आहे, अशी त्याची प्रसिद्धि असल्यामुळें सुबलादि सर्वत्रांनीं भीष्माच्या मागणीस रुकार दिला व आपला कार्यभाग साध्य करून घेतला.

बहुपतिकत्व मान्य नसतां द्रुपदराजानें द्रौपदीचा पांच पांडवांशीं विवाह केला, अर्थात् अशा प्रकारचा विवाह त्यास नाइलाजास्तव कांहींतरी अंतस्थ हेतूनें करावा लागला असावा. अर्जुनानें 'पण' जिंकला होता, तेव्हां वस्तुतः द्रौपदीचा विवाह त्याच्याशींच व्हावयास पाहिजे होता. परंतु वडील भावाचें लग्न अद्याप झालें नसल्यामुळें आपण त्याच्या आधीं विवाहबद्ध कसें व्हावें, असें अर्जुनास वाटलें असावें, हें साहाजिक आहे. तथापि एका जुन्या व विशेष प्रचारांत नसलेल्या चालीच्या आधारें द्रौपदीचा विवाह पांचही पांडवांशीं झाला. वस्तुतः ही अनिष्ट चाल मोडण्याच्या कामीं कोणीतरी पुढाकार घ्यावयास पाहिजे होता, आणि द्रुपदानें ही जबाबदारी आपल्यावर घेण्यासारखी त्याची परिस्थितीही होती. कारण तो कांहीं कोणी परस्वाधीन व दुसऱ्याच्या आश्रयावर अवलंबून राहाणारा गरीब मनुष्य नव्हता, पण त्याच्या आंगीं तेवढी धडाडी नव्हती, हें खरें. यामुळें पराक्रमी पांच पांडवांपैकीं फक्त एकास आपला आप्त व इष्ट करून घेऊन बाकीच्या चौघांस आपले 'अनिष्ट' बनविण्यापेक्षां पांचही पांडवांच्या ठिकाणीं आत्मीयता उत्पन्न करणें त्यास इष्ट व अवश्य वाटलें असावें. अर्जुनाच्या पराक्रमाचा अनुभव त्यास पूर्वींच आला होता ( अध्याय २७ पहा ). इतर पांडवही तसेच बलशाली होते. तेव्हां 'बुडत्यास काडीचा आधार' ह्या न्यायानें बहुपतिकत्वाच्या चालीचा द्रुपदानें फायदा घेऊन आपला राजकीय हेतु साधून घेतला असावा.

# सामाजिक परिस्थिति.

## विवाहपद्धति

महाभारतकाळीं चातुर्वर्ण्य प्रचारांत होतें. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र हे वर्ण मुख्य असून, त्यांचे अनेक पोटभेदही त्या काळीं प्रचारांत होते. तथापि हें चातुर्वर्ण्य 'जन्मसिद्ध' नसून 'कर्मगुणसिद्ध' होतें, असें अनेक प्रमाणांवरून दिसून येतें. तसेंच विवाहविषयक निर्बंधही फारसे कडक नव्हते, हें पुढील उदाहरणांवरून दिसून येतें:—

( १ ) देवयानी ( ब्राह्मणकन्या ) व ययाति ( क्षत्रिय )
( २ ) शकुंतला ( ब्राह्मणकन्या ) व दुष्यंत ( क्षत्रिय )
( ३ ) द्रौपदी ( क्षत्रियकन्या ) व अर्जुन ( ब्राह्मणवेषधारी )
( ४ ) सत्यवती ( दाशकन्या ) व शंतनु ( क्षत्रिय )

याप्रमाणें अनुलोम व प्रतिलोम विवाह झाल्याचीं अनेक उदाहरणें आढळतात.

शकुंतला ही ब्राह्मणकन्या कीं क्षत्रियकन्या यासंबंधीं शंका उत्पन्न होणें साहाजिक आहे. परंतु पूर्वीं कोणाएका मुनीनें शकुंतलेच्या जन्मासंबंधीं कण्वाजवळ चौकशी केली असतां त्यानें जी हकीकत सांगितली ती शकुंतलेनें स्वतः ऐकिली होती. पुढें तिची व दुष्यंताची भेट झाली, तेव्हां तिनें ती जशीच्या तशीच त्याला सांगितली ( अध्याय १२ गीति १२–३५ ). त्यांत मेनका विश्वामित्राकडे जाण्यास कां धजत नव्हती, याचीं जीं कारणें सांगि-

तर्ली आहेत त्यांत तो क्षत्रियकुलोत्पन्न असूनही तपश्चर्येच्या बळावर ब्राह्मण झाला आहे, तेव्हां तो मला जाळून भस्म करील–हें एक सांगितलेलें आहे. यावरून विश्वामित्र ब्रह्मर्षि झाल्यानंतर त्याची व मेनकेची भेट झाली व तदनंतर शकुंतला जन्मास आली, असें सिद्ध होतें.

देवयानीचे वडील शुक्राचार्य हे ब्रह्मर्षि होते व ययाति क्षत्रिय होता. असें असतां देवयानी व ययाति यांचा विवाह–अर्थात् प्रतिलोम विवाह–कसा झाला ? असा परीक्षित् राजानें शुकाचार्यांस प्रश्न केला आहे ( श्रीमद्भागवत, स्कंध ९ अध्याय १८ श्लोक ५ पहा ). ह्यावरून अशा प्रकारचा म्हणजे उच्च वर्णीय वधू व कनिष्ठ वर्णीय वर यांचा–विवाह गौण समजला जात असे, हें उघड दिसून येतें. तसेंच द्रौपदीनें कर्णाला वरण्याचें नाकारलें, याचें कारण तो सूतपुत्र ( कनिष्ठ वर्णाच्या कुळांत जन्मलेला ) होता, हेंच होय ( अध्याय ३५ गीति ३३ ).

द्रौपदीच्या स्वयंवरप्रसंगीं अर्जुनानें ब्राह्मणवेष धारण केला होता व तो ब्राह्मणमंडळींत जाऊन बसला होता, अर्थात् तो ब्राह्मणयुवक आहे, अशीच सर्वांची समजूत असावी. तथापि 'पण' जिंकावयास उठतांना त्यास कोणी अडथळा केला नाहीं. कारण तो ( क्षत्रियापेक्षां ) उच्च वर्णाचा होता आणि उच्च वर्णाचा वर व कनिष्ठ वर्णाची वधू यांचा विवाह प्रशस्त समजला जात असे.

सत्यवती धीवरकन्या होती. पण तिच्याशीं विवाह करण्याच्या वेळीं तिच्या जातीचा वा वर्णाचा प्रश्न शांतनूनें किंवा दुसऱ्या कोणी उपस्थित केलेला आढळत नाहीं. शिवाय, तिच्या पोटीं जन्मलेली संतति 'क्षत्रिय' समजली गेली, हें विशेष होय.

---

१. महाभागं वशिष्ठं यः पुत्रैरिष्टैर्व्ययोजयत् ।
क्षत्रजातश्च यः पूर्वमभवद्ब्राह्मणो बलात्. ॥

( मूळ अध्याय ७१ श्लोक २९ )

अर्थः—पूर्वी त्यानें ( विश्वामित्रानें ) वशिष्ठांच्या लाडक्या पुत्रांस मारून त्या पितापुत्रांचा वियोग केला. क्षत्रियकुळांत जन्म झाला असतांही तो [ तपश्चर्येच्या ] बळानें ब्राह्मण झाला.

शकुंतला दुष्यंताकडे गेली, तेव्हां त्यानें तिची निर्भर्त्सना करितांना 'विश्वामित्रो ब्राह्मणत्वे लुब्धः कामवशं गतः' । ( मूळ अध्याय ७४ श्लोक ७६ ) म्हणजे–विश्वामित्र ब्राह्मण्यावर लुब्ध झाला होता, तरी कामवश झाला–असें म्हटलें आहे.

पण श्रीमद्भागवतकारांच्या मतें शकुंतला क्षत्रियकन्या असावी असें दिसतें:—

व्यक्तं राजन्यतनयां वेद्म्यहं त्वां सुमध्यमे ! ।
नहि चेतः पौरवाणामधर्मे रमते क्वचित् ॥

( स्कंध ९ अध्याय २० श्लोक १२ )

अर्थः—हे सुंदरि ! मला तर उघड दिसतें, कीं तूं कोणी राजकन्या आहेस. कारण पूरूच्या कुळांत जन्मलेल्या पुरुषांचें मन अधर्माकडे केव्हांही वळत नाहीं.

5

सवर्ण विवाह हा अत्यंत प्रशस्त होय. प्राचीन काळीं सवर्ण विवाहास प्राधान्य दिलें जात असे, हें खरें. तथापि असवर्ण विवाहही घडून येत असत व त्यांस समाजाची संमतीही मिळत असे. परंतु भिन्नवर्णीय विवाहाचे अनिष्ट परिणाम शास्त्रज्ञांस दिसूं लागल्यामुळें त्यांनीं विवाहांच्या बाबतींत भेद दर्शवून त्यांची श्रेष्ठकनिष्ठता ठरविली आणि सवर्ण विवाह हा अत्यंत इष्ट; उच्च वर्णाचा वर व कनिष्ठ वर्णाची वधू यांचा विवाह म्हणजे 'अनुलोम' विवाह हा त्याहून गौण; व उच्च वर्णीय वधू व कनिष्ठ वर्णीय वर यांचा विवाह म्हणजे 'प्रतिलोम' विवाह हा हीन समजावा, असा त्यांनीं दंडक घालून दिला. परंतु विवाहाचा हेतु चांगली शीलवान् व सशक्त आणि प्राज्ञ व प्रतिभासंपन्न संतति उत्पन्न व्हावी हा आहे. हा साध्य होत असल्यास पूर्वीप्रमाणें सवर्णेतर विवाह करण्यास प्रत्यवाय नसावा, असें सध्यां कांहीं लोकांस वाटूं लागलें आहे व तदनुसार संस्कृतिदृष्ट्या ( संस्कृति हा शब्द इतका व्यापक आहे, कीं त्याचा अर्थ ठरविणें फारच कठीण आहे ) समान अशा भिन्नवर्णीय वधूवरांचे विवाह करण्यास प्रतिबंध नसावा, असें प्रतिपादन करण्यांत येत असतें. तें कितपत इष्ट आहे, हा सद्यःस्थितींत विचार करण्यासारखा प्रश्न आहे. तथापि 'संकरो नरकायैव कुलघ्नानां कुलस्य च' ( भगवद्गीता, अध्याय १ श्लोक ४२ ) ह्या भगवंतोक्तीचें विस्मरणही आपण होऊं देतां कामा नये. आजकाल, तुकारामानें म्हटल्याप्रमाणें 'कानडीनें केला मराठा भ्रतार । एकाचें उत्तर एका न ये' । अशा प्रकारचीं जोडपीं आढळतात, पण त्यांच्या संततीची 'मातृ'भाषा कोणती, हा विचार करण्यासारखा प्रश्न आहे. दुर्दैवाची गोष्ट ही, कीं अशा प्रकारचीं मुलें लहानपणापासून 'मोडकी तोडकी' इंग्रजी भाषा बोलतात व 'न हिंदु र्न यवनः' अशीं संस्कृतिहीन बनतात !

## सगोत्र विवाह.

प्राचीन काळीं सगोत्र विवाह होत असत, हें वाचून तर आमच्या ह्या विधानाच्या सत्यतेविषयीं कोणासही शंका येणें साहाजिक आहे. परंतु ययातीचा ज्येष्ठ पुत्र यदु याच्या कुळांतील शूर नामक राजाची कन्या पृथा[१] ( कुंती ) व त्याचाच कनिष्ठ पुत्र पूरु याच्या

---

१. पृथा ही कुंतिभोज राजास दत्तक दिली गेली होती, अशी समजूत आहे. परंतु शास्त्रोक्त दत्तविधान झालें होतें, असें दिसत नाहीं:—

शूरो नाम यदुश्रेष्ठो वसुदेवपिताऽभवत् ।
तस्य कन्या पृथा नाम रूपेणाऽप्रतिमा भुवि ॥
पितृष्वस्त्रीयाय स तामनपत्याय भारत ! ।
अग्र्यमग्रे प्रतिज्ञाय स्वस्याऽपत्यं स सत्यभाक् ॥
अग्रजामथ तां कन्यां शूरोऽनुग्रहकाङ्क्षिणे ।
प्रददौ कुंतिभोजाय सखा सख्ये महात्मने. ॥

( मूळ अध्याय १११ श्लोक १-३ ).

यावरून तीं एकगोत्री होतीं, असेंच दिसून येतें.

वंशांतील पांडु; तसेंच अर्जुन हा पांडूचा पुत्र व सुभद्रा ही शूरराजाची नात; तेव्हां हे दोन्ही विवाह सगोत्र होत, हें निःसंदिग्धपणें सिद्ध होतें.

मुसलमान लोकांत सख्ख्या बहिणीखेरीज इतर कोणत्याही मुलीशीं विवाह करण्यास प्रत्यवाय नसतो. परंतु हिंदुलोकांत ह्या बाबतींत पुष्कळच निरनिराळे निर्बंध घालण्यांत आले आहेत. हे निर्बंध घालण्यांत शास्त्रकारांचा कांहीं उच्च हेतु असला पाहिजे, हें उघड आहे. परंतु सद्यःस्थितींत इतक्या कडक निर्बंधांची आवश्यकता आहे कीं काय?—हा एक मोठा महत्त्वाचा प्रश्न आहे. विवाहविषयक निर्बंधांच्या बाबतींत मुसलमान लोक एका टोंकास गेले आहेत, तर हिंदुसमाज अगदीं उलट अशा दुसऱ्या टोंकास गेला आहे. एकाच घराण्यांतील (एकाच आडनांवाचे) लोक कांहीं पिढ्यांनंतर जननाशौच व मृताशौच मानीत नाहींत, त्याप्रमाणेंच शेंकडों पिढ्यांनंतर एकाच गोत्रांतील मुलांमुलींचे विवाह करण्यास सुप्रजाजननशास्त्राच्या दृष्टीनें खरोखरच कांहीं हरकत आहे कीं काय?—हा समाजाच्या हिताच्या दृष्टीनें विचार करण्यासारखा व अत्यंत महत्त्वाचा प्रश्न आहे.

**प्रौढविवाह.**

विवाहसमयीं मुली प्रौढ वयाच्या असत. पण त्यांच्या वयाची निश्चित मर्यादा स्पष्टपणें कोठें सांगितलेली नाहीं. तथापि त्या 'उपवर' असत हें कुंती, माद्री, द्रौपदी, सुभद्रा इत्यादि स्त्रियांच्या विवाहांचीं वर्णनें वाचलीं असतां दिसून येतें. योग्य वेळीं विवाह न झाल्यामुळेंच कुंतीवर कौमार्यभंगाचा प्रसंग आला, आणि 'आपला हा अनाचार भाऊबंदांपासून गुप्त राहावा म्हणून भिऊन कुंतीनें तो अत्यंत बलवान् कुमार [ कर्ण ] उदकप्रवाहांत सोडून दिला' ( मूळ अध्याय १११ श्लोक २२ ). अशा रीतीनें बिचारीला अपत्यप्रेमाला—अपत्याला नव्हे—मूठमाती द्यावी लागली. असाच प्रसंग सत्यवतीवरही आला होता ( अध्याय ८ ). 'प्रसवें कन्याभाव न मळला' ( अध्याय ८ गीति ४१ ) व 'आली जाणों प्रसूतिची आळ' ( अध्याय १७ गीति १५ ) हीं विधानें कितपत विश्वसनीय आहेत, यासंबंधीं चर्चा न करणेंच बरें.

साधारणतः मुलीचें वांकडें पाऊल पडण्याचे प्रसंग कमीच येत असावे, कारण कन्यादूषण करणाराला राजदंड सांगितला असून मुलीचें कौमार्य भंग न पावावें, अशाविषयीं समाज योग्य ती खबरदारी घेत असे, असें मनुस्मृतीवरून स्पष्ट दिसून येतें:—

योऽकामां दूषयेत्कन्यां स सद्यो वधमर्हति ।
सकामां दूषयंस्तुल्यो न वधं प्राप्नुयान्नरः ॥
( अध्याय ८ श्लोक ३६४ )

---

१. राम व सीता ह्यांचा जन्म सूर्यवंशाच्या दोन शाखांमध्यें झालेला होता. यामुळें त्यांचा विवाह सगोत्रच होय. तसेंच रामाच्या तिन्ही भावांचे विवाह सीतेच्या चुलत बहिणींशीं झाले होते, यामुळें तेही विवाह सगोत्रच होत.

२. कन्येची इच्छा नसतांना तिला दूषित करणाऱ्या पुरुषाला वधाची शिक्षा द्यावी आणि तिच्या संमतीनें हें कृत्य करणाऱ्या पुरुषास वधावांचून इतर शिक्षा द्यावी.

पूर्वी कन्या उपवर झाली म्हणजे तिचा स्वयंवर होत असे. परंतु 'स्वयंवर' शब्दाच्या अर्थास अनुसरून आपल्या पतीची निवड आपण स्वतःच करण्याचें भाग्य तिला क्वचितच लाभत असे. कारण तिच्या पित्यानें वा पालकानें 'पण' जाहीर करावा, आणि जो कोणी तो पण जिंकील, त्याच्या गळयांत त्या मुलीनें निमूटपणें माळा घालावी, असा प्रघात असे. काशिराजाच्या कन्या अंबा, अंबिका व अंबालिका ह्या तिघी एकाच वेळीं स्वयंवर करीत आहेत, असें भीष्माच्या कानावर येतांच त्यानें त्यांस जिंकून आणिलें (अध्याय १४) व त्यांचा विवाह विचित्रवीर्याशीं करण्याचें ठरविलें. तेव्हां अंबिका व अंबालिका ह्या विचित्रवीर्य हा पति आपणास अनुरूप आहे, असें मानून प्राप्त झालेल्या परिस्थितीस सादर झाल्या; पण अंबेनें शाल्वास आधींच मनानें वरिलें असल्यामुळें तिनें विचित्रवीर्यास वरण्याचें नाकारिलें व भीष्मानें तिला जिंकून नेलें होतें म्हणून तिचा स्वीकार शाल्वानें केला नाहीं. अशा रीतीनें अंबेच्या झालेल्या प्रेमभंगाची करुण कहाणी तत्कालीन स्त्रीसमाजाच्या दुर्दशेची निदर्शक आहे. एकंदरींत आपला पति वरण्याच्या बाबतींत स्त्रियांना 'निर्णयस्वातंत्र्य' नसे व वधूवरांत 'परस्परसमता' व 'अनुरूपता' असेलच अशी खात्री नसे. सारांश, विवाहाच्या बाबतींत प्रेमापेक्षां पराक्रमालाच ज्यास्त महत्त्व दिलें जात असे, असें म्हणावयास हरकत नाहीं.

गांधारीला कोणत्या कारणामुळें दृष्टिहीन धृतराष्ट्रास वरावें लागलें, हें वर सांगितलेंच आहे.

मुली उपवर झाल्या असून योग्य वेळीं त्यांचे विवाह न झाल्यास क्वचित् प्रसंगीं 'कानीन' (पुढें पृष्ठ १४१ टीप १४ पहा.) पुत्रांस प्रसवण्याची पाळी त्यांच्यावर येणें साहाजिक आहे. बिचाऱ्या सत्यवती व कुंती यांच्यावर ही आपत्ति ओढवली व आपल्या अपत्यांचा त्याग करण्याचा दारुण प्रसंग त्यांच्यावर आला. यापेक्षां त्यांची आणखी दुर्दशा झाली नाहीं. यावरून तत्कालीन समाजाच्या सहिष्णुतेची व थोर मनाची साक्ष वाटते. वस्तुतः अशा मुलींच्या जन्मदात्यांच्या व घरांतील वडीलधाऱ्या माणसांच्या अदूरदृष्टीचा परिणाम अशा अर्भकांस भोगावयास लावणें अगदीं अन्याय्य होय. शिवाय समाजाच्या हिताच्या दृष्टीनें वेदांचे विभाग पाडून त्यांची व्यवस्था लावणारे विद्वान् व्यास व

सूतो[1] वा सूतपुत्रो वा यो वा को वा भवाम्यहम् ।
दैवायत्तं कुले जन्म मदायत्तं तु पौरुषम् ॥

(वेणीसंहार नाटक, अंक ३–३२)

अशी गर्जना करणारा स्वाभिमानी व पराक्रमी वीर कर्ण यांच्यासारख्या कधीं काळीं अवतरणाऱ्या कुलहीन पण कीर्तिमान व प्रभावशाली व्यक्तींचा नाश होऊं देणें अगदीं अयोग्य होय.

---

१. मी सूत असेन वा सूतपुत्र अथवा कोणीही असेन. सत्कुलांत जन्मास येणें हें दैवाधीन असतें, पण पराक्रम हा माझ्याच स्वाधीन आहे.

राजदंडाची भीति व समाजाकडून होणारा निषेध हीं त्या काळचीं अमोघ शस्त्रें होत, व त्यांचा इष्ट परिणाम होत असे.

### कन्याशुल्क.

कन्येस कोणीं मागणी घातली असतां त्या कन्येबद्दल तिच्या पित्याला किंवा पालकाला कांहीं द्रव्य द्यावें लागत असे ( अध्याय १७ गीति २३-२५ ). **भीष्मानें मद्रराजाजवळ पांडुराजाकरितां माद्रीला** मागणी घातली, तेव्हां त्यानें सांगितलें, कीं ह्या वरापेक्षां दुसरा कोणी वर श्रेष्ठ आहे, असें मला वाटत नाहीं. तथापि तुम्ही आम्हांला शुल्क द्या, कारण शुल्क घेण्याचा प्रघात आमच्या कुळांत प्राचीन काळापासून चालत आहे आणि तो कुळाचार आम्हीं सोडूं इच्छीत नाहीं. तेव्हां **भीष्मानें** सोन्याच्या हजारों लगडी, मोहरा, अलंकार, दुर्मिळ रत्नें, हत्ती, घोडे, रथ, वस्त्रें इत्यादि अनेक वस्तु **मद्रराजाला** अर्पण केल्या ( मूळ अध्याय ११३ ). अद्यापही ही चाल कांहीं जातींत आढळते. पण **मद्रराजासारख्या** थोरामोठ्यानें शुल्क घ्यावें, ह्या गोष्टीचें मोठें आश्चर्य वाटतें.

विवाहाचे आठ प्रकार आहेत. त्यांपैकीं हा आसुर विवाह होय. शास्त्रकारांनीं हा सर्वांत अधम मानिला आहे.

### मातुलकन्यापरिणय.

सगोत्र विवाह जसा वर्ज्य आहे, तसाच मातेच्या संबंधाच्या पांच पिढ्यांपर्यंत विवाह वर्ज्य आहे. परंतु **सुभद्रा** ही **अर्जुनाची** मामेबहीण असूनही वधूवरांकडील मंडळीच्या संमतीनें त्या दोघांचा विवाह झाला. यावरून मातुलकन्यापरिणयास विशेष प्रत्यवाय त्या काळीं नसे, असें दिसतें. अजूनही देशस्थ व कऱ्हाडे ब्राह्मणांत ही चाल कोठें कोठें प्रचारांत असलेली आढळते.

### नियोगविधि.

एकाद्या पुरुषास संतति नसल्यास त्याच्या संमतीनें त्याच्या पत्नीनें आपल्या दिराशीं किंवा वडील माणसांच्या मतें अनुरूप असलेल्या दुसऱ्या कोणा पुरुषाशीं संग करून प्रजोत्पादन करावें, अशा प्रकारची चाल प्राचीन काळीं प्रचारांत होती ( पुढें पृष्ठ १४२ टीप १६ पहा ). ह्या प्रकार आज आपणास ऐकावयासही कसासाच वाटतो, पण त्या काळीं हा व्यवहार धर्म्य समजला जात असे.

**विचित्रवीर्य** अपत्यहीन मरण पावल्यामुळें त्याच्या दोन्ही स्त्रियांच्या पोटीं **व्यासांनीं** संतति निर्माण केली ( अध्याय १५ ); **कल्माषपादपत्नी मदयंतीच्या** पोटीं **वशिष्ठांनीं** संतति उत्पन्न केली ( अध्याय १९ गीति ५६ ); **बळिराजानें** आपल्या **सुदेष्णा** नामक राणीच्या पोटीं **दीर्घतमा** नामक ऋषीकडून **अंगवंगादि** पांच पुत्र निर्माण करविले ( अध्याय १५ गीति १५-१७ ); **पांडुराजा** शापामुळें प्रजोत्पत्ति करण्यास असमर्थ झाल्यामुळें त्यानें **कुंती** व **माद्री** यांस नियोगविधीनें संतानोत्पत्ति करावयास सांगितलें व **युधिष्ठिरादि** पांच **पांडव**

अशाच मार्गानें जन्मास आले होते (अध्याय १९), इत्यादि कथा प्रस्तुत पर्वांत आढळतात.

ही पद्धति प्रचारांत येण्याचें मुख्य कारण असें दिसतें, कीं समाजाच्या प्रथमावस्थेंत 'बळी तो कान पिळी' ह्या तत्त्वानुसार सर्व व्यवहार चालत असल्यामुळें आपल्या कुटुंबांत शक्य तितकें ज्यास्त मनुष्यबळ असणें इष्ट आहे, असें कुटुंबांतील कर्त्या पुरुषास वाटत असावें. अर्थात् ज्या कुटुंबाचें मनुष्यबळ ज्यास्त, तें इतरांपासून आपलें संरक्षण करण्यास ज्यास्त समर्थ व्हावें हा हेतु. पुढें कालांतरानें कुटुंबाचे कंपू (टोळया) बनले, तरी प्रत्येक कंपूचें ध्येय हेंच राहिलें असावें. शिवाय त्या काळीं पडित जमीन मुबलक असल्यामुळें लोकसंख्या वाढली, तरी तिचा उदरनिर्वाह कसा होईल, ह्यासंबंधीं काळजी करावयाचें कारणच पडत नसे. सारांश, ज्यांच्या अंगीं जीवनसामर्थ्य अधिक असेल, त्यांनीं जगावें व ज्यांच्या अंगीं तें इतरांपेक्षां कमी असेल त्यांनीं नष्ट व्हावें, हा जो सृष्टिक्रम चाललेला आहे, तो ही चाल उत्पन्न होण्यास कारणीभूत झालेला असावा, असें वाटतें.

ही चाल अत्यंत दुष्ट म्हणून प्रसिद्ध असलेल्या वेनराजाच्या कारकीर्दींत प्रथम रूढ झाली. 'तो सर्व पृथ्वीचें राज्य करीत असतां कामानें उन्मत्त होऊन हा नियोगरूप वर्णसंकर प्रवृत्त करिता झाला', असें मनुस्मृतींत सांगितलें आहे व हा केवळ 'पशुधर्म' होय, असें म्हणून त्याच्याविषयीं तिरस्कार दर्शविला आहे (अध्याय ९ श्लोक ६६–६७ पहा.) यावरून ही चाल महाभारतकाळीं विशेष प्रचारांत नसावी, केवळ आपद्धर्म म्हणून व 'संतति नसतां, स्वर्गी पितरांसि वसावया नसे ठाव ।' (अध्याय ४ गीति ५) अशी समजूत असल्यामुळें क्वचित् काळीं तिचा स्वीकार केला जात असे. नियोगविधि आचरण्यासंबंधानें पांडूनें कुंतीजवळ गोष्ट काढिली असतां तिनें ती केवळ नाइलाजास्तव मान्य केली, असें पांडु व कुंती यांच्या संवादावरून उघड दिसून येतें (अध्याय १९ पहा), व यावरूनच ह्या चालीस समाजाचा पाठिंबा नसे, हें सिद्ध होतें. सारांश, पातिव्रत्याच्या उच्च कल्पनेमुळें ही चाल बंद पडली असावी, असें दिसतें.

फार प्राचीन काळीं 'अनियंत्रित' व्यभिचाराला आडकाठी नसे (अध्याय १९ गीति ४७–५१) पण त्यानंतरच्या काळांत समाजाच्या स्त्रीपुरुषविषयक संबंधाच्या कल्पनांत व आचारविचारांत निरनिराळीं स्थित्यंतरें होऊन हा नियोगविधि म्हणजे एक प्रकारें 'नियंत्रित' व्यभिचार रूढ झाला असावा.

---

१. रथीतर नामक राजा संतति न होतांच मरण पावला. म्हणून त्याच्या स्त्रीच्या ठिकाणीं अंगिरस ऋषीनें ब्रह्मतेजानें युक्त असे पुत्र उत्पन्न केले, अशी कथा आहे. (श्रीमद्भागवत, स्कंध ९ अध्याय ६ श्लोक २ पहा).

२. मनुस्मृति हा ग्रंथ महाभारताच्या पूर्वींचा असावा, कारण त्यांत महाभारत व भगवद्गीता यांचा उल्लेख कोठेंच आलेला नाहीं. कदाचित् हा महाभारतकालीन असेल, पण त्यानंतरचा खात्रीनें नव्हे–असें विद्वानांचें मत आहे.

## बहुपतिकत्वाची चाल.

द्रौपदीचा विवाह पांचही पांडवांबरोबर झाला होता ( अध्याय ३६ ). यावरून महाभारतकाळीं बहुपतिकत्वाची चाल प्रचारांत असावी, असें वाटण्याचा संभव आहे. परंतु तत्कालीन समाजांत अशा प्रकारचें हें एकच उदाहरण आढळतें. त्याच्या पूर्वी गौतमऋषीची कन्या जटिला हिचा सात ऋषींबरोबर व वार्क्षी नामक सतीचा दहा प्रचेत्यांबरोबर विवाह झाला होता ( गीति ५७ ). द्रुपदानें तरी द्रौपदीचा विवाह पांचही पांडवांबरोबर केवळ नाइलाज म्हणूनच केला होता ( गीति ५५ ).

अशा प्रकारें बहुपतिकत्वाचा उल्लेख क्वचित् आढळला, तरी तें बहुपत्नीकत्वासारखें विशेष रूढ नव्हतें, असें 'एकस्य बह्वयो जाया भवन्ति नैकस्यै बहवः सहपतयः' ह्या श्रुतिवचनावरून उघड दिसून येतें.

बहुपतिकत्वाची चाल ही प्रथमावस्थेंतील कौटुंबिक पद्धतीची निदर्शक असावी. शिवाय, लोकांच्या कल्पना, समजुती व आचारविचार यांमध्यें कालान्तरानें फरक पडत जातो. तसेंच लोकांचीं राहाण्याचीं ठिकाणें व त्यांचे नित्यव्यवसाय ह्यांत बदल होत गेल्यामुळें त्यांच्या समजुतींतही बदल होतो. अशा रीतीनें सामाजिक स्थिति जसजशी सुधारत जाते, व समाजास स्थैर्य येतें तसतशी वैवाहिक नीति देखील उन्नत होत जाते.

समाजाच्या प्रथमावस्थेंत स्त्रीपुरुषांचे संबंध फार शिथिल असतात, हें दीर्घतम्याच्या कथेवरून दिसून येतें ( अध्याय १५ गीति १५–१६ ). परंतु तशा व्यवहाराचे दुष्परिणाम दिसूं लागल्यामुळें व कडू फळें भोगावीं लागल्यामुळें, स्त्रीपुरुषांच्या अनियंत्रित व्यवहारावर उद्दालकमुनिपुत्रासारख्या समाजसुधारकाकडून नियंत्रण घातलें गेलें ( अध्याय १९ गीति ४६–५५ ) आणि अशा रीतीनें अनेक पुरुष 'पति' म्हणून वरण्याची[1] चाल ही अनियमित व्यवहाराच्या पुढची पायरी म्हणून कांहीं काळपर्यंत मान्य केली गेली असावी. पुढें कालान्तरानें बहुपतिकत्वापासून होणारे दुष्परिणाम दृष्टोत्पत्तीस आल्यामुळें बहुधा स्त्रियांनींच ह्या अनिष्ट प्रकारास आळा घालण्याचा निश्चय करून 'बहुपतिकत्व' हें अत्यंत निंद्य व त्याज्य ठरवून अत्यंत उच्च भावनांनीं युक्त असें 'पातिव्रत्य आणि पावित्र्य' हें आपलें ध्येय ठरविलें असावें, आणि तें कित्येक शतकांपासून सर्व सुसंस्कृत समाजांत मान्य झालेलें आहे.

ह्या विषयासंबंधानें कांहीं विद्वानांचें मत असें आहे, कीं ज्याप्रमाणें सध्यां नायरलोक, ब्रह्मी लोक व हिमालयांतील पहाडी लोक यांच्यांत क्वचित् मातृप्रधान ( Matriarchical ) समाज दिसून येतो, त्याप्रमाणें प्राचीन काळीं सर्व समाज स्त्रीप्रधान व स्त्रीसत्ताक असावा आणि यामुळेंच बहुधा त्या काळीं सर्व स्त्रीसमाज पूर्णपणें स्वतंत्र होता. परंतु त्या स्वातंत्र्याचा परिणाम त्यांच्या स्वैरवृत्तींत व स्वैराचारांत होऊं लागल्यामुळें तत्कालीन पुरुषवर्गाला ह्या त्यांच्या वर्तनाची चीड आली व त्यामुळेंच त्यांनीं त्यांच्यावर 'एकपतिकत्वा'चें

---

१. हिमालयाच्या खिंडींत राहाणारे लडाखी व चांफा म्हणून लोक आहेत, त्यांच्यामध्यें ही चाल अद्याप चालत आहे, असें समजतें.

व स्त्रियांच्या बाबतींत अन्याय होऊं नये म्हणून पुरुषांवर 'एकपत्नीकत्वा'चें नियंत्रण घातलें ( अध्याय १९ गीति ५३ ). अशा रीतीनें उन्नत समाजांतील स्त्रीचें पूर्ण स्वातंत्र्य नाहींसें होऊन सर्व समाज पुरुषप्रधान बनला आणि यामुळेंच आजकाल सुधारलेले सर्व समाज पितृसत्ताक ( Patriarchical ) असलेले आपणांस आढळतात.

तत्कालीन स्त्रियांसंबंधीं बहुपतिकत्व व नियोगविधि ह्या दोन गोष्टी आपणास विलक्षण वाटतात. ह्या दोन चालींमुळेंच भारतीयुद्ध समाजघटना स्थिर होण्यापूर्वी अनेक शतकें झालें होतें, हें सिद्ध होतें.

## प्रकाशमैथुन.

पराशर व सत्यवती आणि उतथ्यपुत्र दीर्घतमा यांच्या कथांवरून प्राचीन आर्यलोकांत सर्वांसमक्ष उघड्यांत स्त्रीपुरुषांचा समागम घडत असे. अशा प्रकारच्या व्यवहारास प्रत्यवाय नव्हता व अशा प्रकारचें आचरण करण्यांत कांहीं पाप किंवा अनीति आहे, असें ते समजत नसत–अशी चुकीची समजूत थोड्याबहुत प्रमाणांत सध्यां प्रचलित आहे.

पराशर व सत्यवती यांचा समागम दिवसा, यमुनेच्या दोन्ही तीरांवर लोक वावरत असतां, उघड्या नौकेंत घडला व तो लोकांस दिसूं नये म्हणून पराशरानें ( योगमायेनें ) धुकें निर्माण केलें (अध्याय ८।३३) असें वर्णन आहे. त्या काळीं जें शास्त्रीय ज्ञान तत्कालीन लोकांस होतें, त्याच्या बळावर पराशरानें धुकें उत्पन्न केलें असल्यास त्यांत कांहीं आश्चर्य किंवा अशक्यता वाटण्याचें कारण नाहीं. कदाचित् त्या वेळीं धुकें अचानकही पडलें असेल. दुसरी गोष्ट, यमुना नदींतील एका नौकेच्या तळाशीं घडलेला व्यवहार दूर दोन्ही कांठावर असलेल्या लोकांस दिसणें कितपत शक्य आहे, हा प्रश्नच आहे.

हा प्रसंग उघड्यांत कोणाची भीडमर्यादा न धरितां घडला असता, तर तो तेव्हांच जगजाहीर झाला असता. तसें असतें तर विचित्रवीर्य निपुत्रिक मरण पावल्यामुळें त्याच्या स्त्रियांनीं नियोगविधि करावा इत्यादि सत्यवतीचें जें भीष्माशीं भाषण झालें त्या वेळीं 'पराशराची स्वानुभूत कथा' सांगतांना तिला लाज वाटली नसती ( अध्याय १५ गीति २० ). परंतु ती मागची सर्व हकीकत तिनें भीष्माला मोठ्या नाइलाजानें व संकोचानें अडखळत अडखळत सांगितली ( मूळ अध्याय १०५ श्लोक ३ पहा ). शिवाय पराशर तिला 'मज अंगसंग दे' ( अध्याय ८ गीति ३१ ) असें म्हणाला, तेव्हां तिनें दिलेल्या उत्तरावरूनच ह्या प्रश्नाचा निकाल लागतोः—

> ती त्यासि म्हणे, 'दोहीं तीरीं सर्वत्र [ लोक ] आहेत ।
> दिवसा, अशा प्रकाशीं, तुमचा कैसा घडेल हा हेत ?॥
>
> ( अध्याय ८ गीति ३२ )

आतां आपण दीर्घतम्याच्या वागणुकीसंबंधीं विचार करूं. पहिली गोष्ट, तो जन्मांध होता. त्यास दिवस व रात्र यांतील फरक कळतच नव्हता, तेव्हां तो 'प्रकाशमैथुनदोषी' होता ( अध्याय १५ गीति १५ ) असें त्यास म्हणण्यांत कांहींच अर्थ नाहीं. दुसरी गोष्ट,

त्याचें अमर्याद आचरण त्याच्या शेजारीं राहाणाऱ्या ऋषींस पसंत नव्हतें ( पुढें पृष्ठ १४० टीप १२ पहा ). इतकेंच नाहीं, तर त्याची स्त्री त्याच्या नीतिबाह्य वर्तनास कंटाळून त्याचा द्वेष करीत असे. यामुळेंच त्यास त्याच्या पुत्रांनीं एका नावेंत घालून गंगानदींत सोडून दिलें !

सारांश, प्रकाशमैथुन निंद्य आणि नीतिबाह्य समजलें जात असे, हें स्पष्ट दिसून येतें.

## रीतिभाती.

पूर्वी **सतीची चाल** प्रचारांत होती. तथापि प्रत्येक विधवेनें सती गेलेंच पाहिजे, असा कडक निर्बंध नव्हता. हें **पांडू**च्या मरणानंतर **माद्री**च एकटी सती गेली, **कुंती**नें सहगमन केलें नाहीं ( अध्याय २० गीति १६ ), यावरून दिसून येतें.

**मद्यपान** हें पंचमहापातकांपैकीं एक समजलें जात असे. तथापि सर्व वर्णांच्या लोकांना मद्यप्राशनाच्या बाबतींत कोणताही प्रत्यवाय नव्हता. पण त्याच्या योगानें समाजावर घडून येणाऱ्या अनिष्ट परिणामांमुळें व प्रत्यक्ष **शुक्राचार्यां**स अत्यंत कटु अनुभव आल्यामुळें त्यांनीं मद्यप्राशनाचा निषेध केला, पण तो फक्त सर्व वर्णांचे गुरु जे ब्राह्मण त्यांसच होय. ( अध्याय ९ गीति ५३ ). यावरून मद्यपान व निरनिराळ्या वर्णांस करावे लागणारे उद्योगधंदे ह्यांमध्यें बराच संबंध असावा, असें दिसतें.

**देवयानी** व **शर्मिष्ठा** ह्या आपल्या सख्यांसह वनक्रीडा करीत असतां त्या सर्वजणी मोठ्या आनंदानें मधुवृक्षापासून झालेल्या मदिरेचें पान करीत होत्या, असें मूळांत वर्णन आहे. यावरून तत्कालीन समाजांत ह्या व्यसनाचा प्रसार किती झालेला होता, हें दिसून येतें.

**पडद्याची चाल** प्रचारांत असावी, असें दिसत नाहीं. कारण अशी चाल असती तर **शकुंतला** **दुष्यंता**च्या दृष्टीस पडलीच नसती. तसेंच **धृष्टद्युम्ना**नें **द्रौपदी**चा हात धरून तिला स्वयंवराकरितां आलेल्या मंडळींत नेलें नसतें, व तदनंतर ती निःशंकपणें **पांडवां**बरोबर गेली नसती. **सुभद्रा** तरी **अर्जुना**च्या दृष्टीस गोषाची चाल नसल्यामुळेंच पडली असावी आणि म्हणूनच तिला पळवून नेणें त्याला शक्य झालें.

---

१. अहोऽयं भिन्नमर्यादो नाऽऽश्रमे वस्तुमर्हति ।
तस्मादेनं वयं सर्वे पापात्मानं त्यजामहे. ॥
( मूळ अध्याय १०४ श्लोक २८ )

२. भारतीयुद्धानंतर कोणी स्त्रिया सती गेल्याचा उल्लेख आढळत नाहीं. सर्वसंगपरित्याग करून सौभरिमुनी वनांत गेले व तेथें उग्र तप करून परब्रह्मस्वरूपांत लीन झाले. तेव्हां त्यांच्या स्त्रियांनीं अग्नींत देहसमर्पण केलें–असा श्रीमद्भागवतांत उल्लेख आढळतो ( स्कंध ९, अध्याय ६ श्लोक ५५ ).

३. ताभिः सखीभिः सहिता सर्वाभिर्मुदिता भृशम् ।
क्रीडन्त्योऽभिरताः सर्वाः पिबन्त्यो मधुमाधवीम्. ॥
( अध्याय ८१ श्लोक ३ ).

पांडव कुंभाराच्या गोव्यांत राहिले होते (अध्याय ३५ गीति २–३), सत्यवती ही कोळ्याची मुलगी होती (अध्याय १३), पुरोचन हा जातीनें यवन होता (अध्याय २० गीति ३७), विदुराला म्लेच्छांची भाषा येत होती (अध्याय २९ गीति ४६), जतुगृहांत आपल्या पांच मुलांसह एक निषादी जळून मेली (अध्याय २९ गीति ३६), इत्यादि उल्लेखांवरून पूर्वी निरनिराळ्या **जाती** व त्यांचे निरनिराळे **धंदे** होते, हें स्पष्ट होतें. प्रत्येकाला आपापल्या धंद्याविषयीं–मग तो कोणत्याही प्रकारचा असो–मोठा अभिमान वाटत असे, असें दाशपतीच्या भाषणावरून दिसून येतें (अध्याय १३ गीति ८०). यासंबंधानें भगवंतांनीं तर स्पष्टच सांगितलें आहे, कीं 'सहजं कर्म कौन्तेय! सदोषमपि न त्यजेत्[1]' (भगवद्गीता, अध्याय १८।४८). परंतु त्या काळीं हे निर्बंध इतके कडक नसत, एका वर्णांतील व्यक्ति दुसऱ्या वर्णांत सहज जाऊं शकत असे, हें विश्वामित्रादिकांच्या उदाहरणांवरून दिसून येतें.

## शिक्षणपद्धति.

ह्या विषयासंबंधीं विशेष तपशील आढळत नाहीं. तथापि जी कांहीं थोडीफार माहिती आढळते, ती संकलित करीत आहों.

धौम्यमुनि व त्यांचे शिष्य उपमन्यु, आरुणि व वेद हे होते, आणि वेदाचे उत्तंकप्रभृति अनेक शिष्य होते (अध्याय २); कचानें गुरुगृहीं राहून संजीविनीविद्या प्राप्त करून घेतली (अध्याय ९), द्रोणाचार्य व द्रुपदराजा गुरुबंधु होते (अध्याय २३), द्रोणाचार्यांनीं कौरवपांडवांस शस्त्रास्त्रविद्या शिकविल्या (अध्याय २४), एकलव्यानें द्रोणाचार्यांच्या पुतळ्यास आपला गुरु मानून धनुर्वेदपठन केलें (अध्याय २५) इत्यादि कथा आढळतात, व त्यांवरून आपणास कांहीं अनुमानें काढतां येतात.

'वर्णानां ब्राह्मणो गुरुः' ह्या वचनानुसार सर्व वर्णांच्या मुलांस ब्राह्मणच शिक्षण देत असत. ह्या ब्राह्मणगुरूंचे मोठमोठे आश्रम असत व अशा प्रत्येक आश्रमांत कित्येक शिष्य असून तेथें ते निरनिराळ्या विषयांचें अध्ययन करीत. विद्यार्जनासाठीं फार लांबून विद्यार्थी येत व ते सर्व गुरुगृहींच रहात. एकंदरींत प्रत्येक आश्रम म्हणजे हल्लींची एक एक युनिव्हर्सिटीच असे[2].

राजपुत्रांकरितां व थोरामोठ्यांच्या किंवा गोरगरिबांच्या मुलांकरितां वेगवेगळ्या शाळा नसत. सर्व दर्जाच्या शिष्यांस गुरुजींच्या आश्रमांतच राहावें लागे. त्यांस गुरुजींच्या घरचीं कामें करावीं लागत. इतकेंच नाहीं, तर त्यांस गुरुजींकरितां भिक्षा देखील मागून आणावी लागे. गुरुजींना राजसत्तेकडून वा पालकांकडून कांहीं ठरीव वेतन मिळत नसे. विद्याभ्यास पूर्ण

---

१. कौंतेया! स्वभावसिद्ध जें कर्म, त्यामध्यें जरी दोष असला, तरी त्या कर्माचा त्याग करणें योग्य नाहीं.

२. कण्वाच्या आश्रमाचें वर्णन मूळ अध्याय ७० श्लोक २५–५१ यांत आहे. तें पाहिलें असतां तेथें चाललेल्या अध्ययन–अध्यापनादि कार्याचा व्याप किती मोठा होता, हें कळून येतें.

झाल्यानंतर शिष्यांकडून गुरुजींस कांहीं गुरुदक्षिणा मिळत असे, व क्वचित् प्रसंगीं राजसत्तेकडूनही त्यांचा गौरव होत असे. प्रसंगविशेषीं एकाद्यास गुरुदक्षिणेची माफीही मिळत असे. तसेंच दक्षिणा देण्याच्या बाबतींत एकाद्यास फारच कष्ट पडत व संकटें सोसावीं लागत, असें उत्तंक व एकलव्य यांच्या उदाहरणांवरून दिसून येतें. पण असे एकनिष्ठ शिष्य हर प्रयत्नानें आपल्या गुरुजींचें इच्छित पूर्ण करीत असत.

शिष्यानें गुरुगृहीं राहावें असा नियम होता. परंतु शंभर कौरव, पांच पांडव व आणखी कांहीं शिष्य मिळून एकाच घरचे अनेक शिष्य असल्यास त्यांच्यासाठीं घरींच एकादा स्वतंत्र शिक्षक ठेवण्याचा प्रघात होता, असें द्रोणाचार्यांच्या उदाहरणावरून दिसून येतें.

साधारणपणें गुरु आपल्या व आपल्या कुटुंबाच्या चरितार्थाकरितां दुसऱ्यावर अवलंबून राहात नसत, कारण त्यांची राहाणी अत्यंत गरिबीची असून त्यांच्या गरजा फारच थोड्या असत, व त्यामुळें त्यांना कोणाची भीडमुर्वत बाळगावी लागत नसे. द्रोणाचार्यांजवळ एक देखील दुभती गाय नव्हती व त्यामुळें पाण्यांत पीठ कालवून तें दूध म्हणून अश्वत्थाम्यास द्यावें लागत असे ( अध्याय २४ गीति २७ ), या गोष्टीवरून गुरुजींच्या दारिद्र्याची कल्पना कोणासही सहज होण्यासारखी आहे. ते दरिद्री असले, तरी जसे ते तपोधन असत, तसे ते मानधनही असत, व 'साधी राहाणी व उच्च विचारसरणी' हें त्यांचें ध्येय असे. यामुळें राजसत्तेकडून त्यांस मानमान्यता मिळत असे, हें शुक्राचार्य व वृषपर्वा यांच्या कथेवरून स्पष्ट दिसून येतें ( अध्याय १० ). गुरुजी निरिच्छ असल्यामुळें त्यांचें स्वातंत्र्य लुप्त न होतां त्यांचें राजसत्ता व जनता यांवर चांगलें वजन असे. अशा प्रकारच्या तेजस्वी, जितेंद्रिय व वैराग्यशील गुरुजींचें थोडक्यांत वर्णन करावयाचें असल्यास—

अग्रतश्चतुरो वेदाः पृष्ठतः सशरं धनुः ।
इदं ब्राह्ममिदं क्षात्रं शापादपि शरादपि. ॥

असें करितां येईल. ते अत्यंत निस्पृहतेनें वागत व 'असंतुष्टा द्विजा नष्टाः' हें त्यांचें ब्रीदवाक्य असे.

प्रत्येक त्रैवर्णिकानें विद्याध्ययन केलेंच पाहिजे, असा नियम असे. यामुळें ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य ह्या तिन्ही वर्णांचे लोक सुशिक्षित, सदाचारसंपन्न व व्यवहारपटु असत. तथापि सार्वत्रिक शिक्षणप्रसाराची एकादी योजना प्रचलित होती, असें दिसत नाहीं.

राजपुत्र व इतर विद्यार्थी आश्रमांत एकत्र शिक्षण घेत व ते आपापसांत मिळूनमिसळून वागत. या त्यांच्या सहवासाचा परिणाम परस्परांवर चांगला होत असावा. कारण तेणेंकरून सामान्य जनतेच्या अडीअडचणी व सुखदुःखें यांची राजपुत्रांस पूर्ण जाणीव होत असे, आणि ह्या अनुभवाचा उपयोग पुढें ते सिंहासनारूढ झाल्यावर त्यांस बराच होत असे, असें समजावयास हरकत नाहीं. तसेंच 'आपणासारिखे करिती तत्काळ' अशा सच्छील गुरूंच्या सहवासांत व देखरेखीखालीं राजपुत्रादि शिष्य असल्यामुळें त्यांच्या मनावर गुरुजींच्या शीलाचा व चारित्र्याचा अत्यंत इष्ट व हितप्रद परिणाम घडून येत असावा.

साधारणतः सर्व गुरु सरळ स्वभावाचे व निष्कपटी असत व 'वितरति गुरुः प्राज्ञे विद्यां यथैव तथा जडे' अशी त्यांची वृत्ति असे. परंतु सर्व शिष्यांना पाणी आणावयास पाठवितांना द्रोणाचार्य अश्वत्थाम्यास रुंद तोंडाचें भांडें देत, यामुळें तें भांडें भरून घेऊन तो लवकर लवकर परत येई व तेवढ्या वेळांत त्याला एकादें रहस्य सांगत. तसेंच निषादपुत्र एकलव्य आपल्या इतर शिष्यांहून धनुर्विद्येंत वरचढ होऊं नये म्हणून त्याचा त्यांनीं शिष्यत्वानें स्वीकार केला नाहीं, व त्या बिचाऱ्याला विद्या न शिकवितां त्याच्याजवळ गुरुदक्षिणा म्हणून त्याचा उजवा आंगठा तोडून मागितला ( अध्याय २५ गीति ४३–४९ पहा ). या गोष्टींवरून द्रोणाचार्य तत्कालीन इतर गुरूंसारखे अगदीं भोळे-भाबडे व धोपट मार्गानें जाणारे नव्हते, हें दिसून येतें.

तत्कालीन स्त्रियांस शिक्षण दिलें जात असे, असें दिसत नाहीं. तथापि ब्राह्मण व क्षत्रिय वर्णांच्या स्त्रियांचीं मनें आनुवंशिक संस्कारानें व घरांतल्या घरांत मिळणाऱ्या शिक्षणानें सुसंस्कृत झालेलीं असत. देवयानी 'शहाणी' होती ( अध्याय ९ गीति ३५ ) असें तिला पंतांनीं प्रशस्तिपत्र दिलें आहे. पण ती 'विदुषी' किंवा 'पंडिता' देखील होती, असें 'धर्माचें तत्त्व बरें जाणतसे हे सुबुद्धि कविजा तें' ( गीति ४६ ) इत्यादि तिच्या दर्पोक्तीवरून म्हणावयास हरकत नाहीं. ( अध्याय १० गीति ४६–४९ पहा ). क्षत्रिय-कन्यांना शस्त्रें वापरण्यासंबंधीं कांहीं शिक्षण दिलें जात असे, असा शर्मिष्ठेच्या उदाहरणा-वरून व तिच्या देवयानीशीं झालेल्या भाषणावरून तर्क करावयास जागा आहे.[1] स्त्रिया निसर्गतःच[2] मोठ्या हुशार व चलाख असतात, ह्या नियमास अनुसरून गांधारी मोठी बुद्धिवान व धोरणी होती, हें मागें ( पृष्ठ ४७ ) आपण पाहिलेंच आहे.

स्त्रिया शिकोत वा न शिकोत, त्यांची 'गुरु' ह्या नात्यानें योग्यता फार मोठी आहे. कारण माता ह्याच आपल्या बालकांच्या निसर्गदत्त 'गुरु' होत. त्या शिशूंना शिक्षणप्रदानाचें काम पिढ्यान् पिढ्या करीत आहेत व त्यांची शिकविण्याची पद्धतीही बालबालिकांच्या अत्यंत आवडीचीच असतेः—

स्तन पाजितां, निजवितां, हालवितां, बाळकासि खेळवितां ।
दे बोध, जो सुदुर्लभ थोरांसि सहस्र कल्प मेळवितां. ॥

( पंतकृत मदालसाख्यान, अध्याय ५।१३ )

---

१. अनायुधा सायुधाया रिक्ता क्षुभ्यसि भिक्षुकि ! ॥
( हे भिक्षुकाचे पोरी ! मी सशस्त्र असून तूं शस्त्ररहित आहेस. तूं फुकट रागावतेस ! )
( मूळ अध्याय ७८ श्लोक ११ )

२. स्त्रियो हि नाम खल्वेता निसर्गादेव पंडिताः ।
पुरुषाणां तु पाण्डित्यं शास्त्रैरेवोपदिश्यते. ॥
( मृच्छकटिक, अंक ४।१९ ).

तसेंच कालिदासकृत अभिज्ञानशाकुंतल, अंक ५ श्लोक २२ पहा.

यावरून स्त्रिया गुरुगृहीं जाऊन किंवा अन्य रीतीनें पुरुषांप्रमाणें ज्ञान संपादन करीत नसत. तथापि घरच्या घरीं,–देवयानी शुक्राचार्यांच्या जवळ राहून जशी शहाणी झाली, त्याप्रमाणें–त्या आपल्या नेहमींच्या व्यवहारास अवश्य असणारें ज्ञान प्राप्त करून घेत असत व त्या साधारणतः सुशिक्षित व सुसंस्कृत असत, असें म्हणावयास हरकत नाहीं.

कच देवयानीला गायन, वादन व नृत्य यांनीं प्रसन्न ठेवीत असे व उलट ती देखील गाऊन व खेळून त्याचें मनोरंजन करीत असे, असा उल्लेख आहे. यावरून आश्रमांत ह्या कलांचें थोडेंफार शिक्षण दिलें जात असे, असें म्हणावयास हरकत नाहीं.

कच कृतविद्य होऊन स्वगृहीं परत जावयास निघाला, त्या वेळीं आपलें पाणिग्रहण करण्याविषयीं देवयानीनें त्यास विनविलें. परंतु गुरुकन्येशीं विवाह करूं नये, असा निर्बंध असल्यामुळें त्यानें तिचा स्वीकार केला नाहीं ( अध्याय १० गीति ११ ). यावरून आश्र-मांतील शिस्त व एकंदर वागणुकीसंबंधीं नियम फारच कडक असत, हें उघड आहे.

कच शत्रुपक्षीय असूनही तो विद्यादानास सत्पात्र असल्यामुळें शुक्राचार्यांनीं त्यास स्वपक्षीयांच्या विरोधास न जुमानतां अमृतसंजीविनी विद्या शिकविली. यावरून तत्कालीन गुरू कोणाच्या भीडेभाडेस बळी न पडतां आपलें कर्तव्यकर्म बजाविण्यांत दक्ष असत, हें सिद्ध होतें. तसेंच त्यांची निरपेक्षबुद्धि व मनाचा मोठेपणा हीं दिसून येतात.

तत्कालीन शिष्य मोठे सुज्ञ व व्यवहारज्ञ असत. तसेंच 'धर्मगति महागहना 'असली, तरी नीतींतील तारतम्य व इंगित हीं जाणण्यांत ते मोठे कुशल असत, आणि 'बलवानिन्द्रियग्रामो विद्वांसमपि कर्षति' ह्या गोष्टीची त्यांस पूर्ण जाणीव असे. ते नुसते 'पढतमूर्ख' आहेत कीं 'विदग्ध' आहेत हें पाहाण्याच्या हेतूनें क्वचित् प्रसंगीं लाघवी भाषणानें व मानभावीपणानें त्यांची परीक्षा घेतली जात असे. उत्तंकाच्या गुरूजींनीं बाहेर गांवीं जातांना त्यास सांगि-तलें होतें कीं, 'माझ्या पाठीमागें घरांत कांहीं न्यून पडल्यास तें तूं पूर्ण कर.' तेव्हां आश्रमांतील स्त्रियांनीं 'गुरुपत्नीचा ऋतुकाळ व्यर्थ जाऊं देऊं नकोस' असें त्यास सांगून व गुरुजींच्या आज्ञेचें त्यास स्मरण करून देऊन तो कसोटीस उतरतो किंवा नाहीं, हें पाहिलें. पण तो सत्प्रवृत्त उत्तंक कांहीं कच्च्या गुरूचा चेला नव्हता. त्यानें असलें अधर्म्य

---

१. कच देवयानीला गुरूपेक्षांही श्रेष्ठ ( 'गुरोर्गुरुतरा'–मूळ अध्याय ७७ श्लोक १२ ) मानीत असे. २. मूळ अध्याय ७६ श्लोक २४–२५ पहा. ३. मूळ अध्याय ७७।१८ पहा. ४. उत्तं-काच्या गुरुजींनीं आपली कन्या त्यास अर्पण केली होती, असा उल्लेख आहे ( परिशिष्ट ४ पहा ). पण असे प्रसंग कांहीं विशेष कारणामुळेंच क्वचित् घडून येत व ते सामान्य नियमास अपवाद-रूपच समजले जात. ५. गुरुपत्नीशीं शिष्यानें कसें वागावें ह्यासंबंधीं मनुस्मृतींत जें सांगितलें आहे, तें प्रत्येकानें अवश्य पहावें ( अध्याय २ श्लोक २१०–२१२ पहा ). 'गुरुस्त्रीला शिष्यांनीं स्पर्श देखील करूं नये' असा त्या सर्व नियमांचा निष्कर्ष आहे. गुरुस्त्रीगमनाबद्दल 'देहान्त'प्रा-यश्चित्त सांगितलेलें आहे ( अध्याय ११ श्लोक १०३ ).

कृत्य अर्थात् पंचमहापातकांतील एक करावयाचें साफ नाकारिलें ( परिशिष्ट ९ पृष्ठ २७-अध्याय २ गीति ७१ वरील अधिक टीपा पहा ). सारांश, आश्रमांतील शिक्षणाचें ध्येय पंडित व महापंडित तयार करणें हें नसून शिष्यांनीं मनोनिग्रहपूर्वक ब्रह्मचर्यव्रताचें परि-पालन करून आपल्या शीलाचें संवर्धन करावें, हें असें. हेंच वरील गोष्टींवरून दिसून येतें.

## काव्यगुणदोषविवेचन.

आतां आपण **आर्याभारत**रूप महाकाव्याचें **आदिपर्व** हें जें एक खंड, त्याच्याकडे 'काव्य' ह्या दृष्टीनें पाहून त्यांतील गुणदोषांचें विवेचन अगदीं थोडक्यांत करूं.

१. पंत हे भाषांतरकार होते, त्यांनीं महाभारताचें मराठींत भाषांतर केलें, असें म्हण-णारे पुष्कळ आढळतात. त्यांचें हें विधान कितपत खरें किंवा खोटें आहे, हें ठरविण्याच्या कामीं आमच्या वाचकांस प्रस्तुत पर्वाच्या शेवटीं जोडलेल्या परिशिष्टांतील पहिलें 'पंतांची कविता भाषांतररूप आहे काय?' हें बरेंच उपयोगी पडेल. तसेंच दहावें परिशिष्ट 'मूळ आदिपर्व व पंतकृत आदिपर्व यांची तुलना' हें निःसंशय मार्गदर्शक होईल आणि तें बार-काईनें चाळून पाहिल्यास व मूळांतील साडेआठ हजार ग्रंथसंख्येंतील निवडक महत्वाचा कथाभाग पंतांनीं सरासरी अडीच हजार गीतींत ग्रथित केला आहे, ह्या गोष्टीकडे नीटपणें लक्ष पुरविल्यास **पंत भाषांतरकार नव्हेत,** असें कोणासही कबूल करावें लागेल.

आम्ही पंतप्रतिभादर्शक स्थळांचें दिग्दर्शन कित्येक ठिकाणीं टीपांतून केलें आहे, तेंही आमच्या ह्या विधानास पाठिंबाच देणारें आहे.

पंतांच्या मनांतून केवळ भाषांतरच करावयाचें असतें, तर त्यांनीं मूळाप्रमाणेंच कित्येक पिढ्यांनंतरच्या वंशजाची कथा प्रथम वर्णून मागाहून त्याच्या पूर्वजाची कथा वर्णिली असती! ( मागें पृष्ठ २८ पहा ); तसेंच त्यांनीं मूळांतील असंभाव्य व अतिशयोक्तिपूर्ण वर्णनांस फांटा दिला नसता! ( पृष्ठ ९७ टीप ९ पहा ); आणि लांबलचक, नीरस व कंटाळवाणीं कथानकें व वर्णनें छाटून आटोपशीर व आकर्षक केलीं नसतीं! ( पृष्ठ ३२६ टीप १३ पहा ).

ह्या मुद्यासंबंधानें आमची आमच्या वाचकांस अशी विनंति आहे, कीं कोणीही आपलें मन पूर्वग्रहदूषित होऊं न देतां किंवा दुसऱ्या कोणाच्या म्हणण्यावर विसंबून न राहातां, स्वतः पंतांच्या काव्यकृतीचें परिशीलन करून मग आपलें मत बनविणें, हेंच न्याय्य होईल.

---

१. ब्रह्महत्या सुरापानं स्तेयं गुर्वङ्गनागमः ।
महान्ति पातकान्याहुः संसर्गश्चापि तैः सह ॥
( मनुस्मृति, अध्याय ११।५४ ).

२. कच गुरुगृहीं हजार वर्षें होता, असें पंतांनीं सांगितलें आहे ( अध्याय ९।५४ ) व तें मूळाप्रमाणें बरोबर आहे ( अध्याय ७६।७२ ). येथें पंतांनीं केवळ अनवधानामुळें मूळचीच संख्या कायम ठेविली, असें दिसतें. पण तेथें वर्ष ह्मणजे दिवस असा अर्थ अभिप्रेत आहे, असें विद्वानांचें मत आहे.

हा मुद्दा केवळ आदिपर्वापुरताच विचारांत घ्यावयाचा नसून तो पंतांच्या रामायण-महाभारत-पुराणेतिहासविषयक सर्वच काव्यांस लागू आहे. अर्थात् तो मोठा व्यापक आहे, म्हणून आम्ही येथें त्या विषयासंबंधानें विशेष चिकित्सा करूं इच्छीत नाहीं.

२. पंतांनीं महाराष्ट्र-भाषाभूमींत अठरा पर्वांच्या इक्षुदंडाची लावणी केली व त्याची उत्तम प्रकारें मेहनतमशागत व जोपासना करून त्यांत विपुल रस व माधुर्य हीं उत्पन्न केलीं. तीं सर्वच पर्वें आपापल्या परी उच्च दर्जाचीं आहेत. तथापि त्यांची परस्परांशीं तुलना करावयाची असल्यास 'प्रतिपर्व रसावहं'[१] असेंच म्हणावें लागेल. उगमाच्या ठिकाणीं नदी जशी अगदीं लहानशी असते, पण ती पुढें पुढें मोठी होत जाऊन तिच्या पाण्याचा ओघ मोठ्या जोरानें वाहातो, तसाच प्रकार पंतांच्या सरस्वतीचा आर्याभारताच्या बाबतींत झालेला आहे. पंतांनीं अनेक सुंदर व रसपरिप्लुत काव्यें रचिलीं व तेणेंकरून त्यांना आपल्या भाषाप्रभुत्वाची खात्री पटल्यानंतर त्यांनीं आपल्या आर्याभारतास सुरुवात केली हें खरें, परंतु आदिपर्वाच्या पूर्वार्धांत त्यांची जी कवितादुहिता एखाद्या लज्जावती व विनयशील नववधूप्रमाणें संकोचित वृत्तीनें वावरतांना आढळते, तीच उत्तरार्धांत एखाद्या प्रौढ गृहस्वामिनीप्रमाणें अगदीं मोकळेपणानें कवितादेवीच्या मंदिरांत वावरून रसिकांचें स्वागत करितांना आढळते.

३. पंतांनीं यात्रादिकांच्या निमित्तानें हिंदुस्थानाच्या बऱ्याच मोठ्या भागांत प्रवास केला होता, व तो करीत असतां त्यांनीं निरनिराळ्या प्रादेशिक बोली, आचारविचार, रीतिभाती इत्यादि गोष्टींचें सूक्ष्म निरीक्षण केलें होतें. यामुळें त्या त्या बाबींचें प्रतिबिंब त्यांच्या काव्यांत उमटलेलें दिसतें. पंत जसे जबरे प्रवासी होते, तसेच ते मोठे विद्याव्यासंगी व ग्रंथसंग्रहकारी होते. त्यांचें वाचनही दांडगें होतें. याखेरीज काशीनाथबाबा पाध्ये, विठोबादादा इत्यादि विद्वान् व सज्जन मंडळीच्या सहवासांत त्यांचा बराच वेळ जात असे. यामुळें त्यांचें प्रवासांतील निरीक्षण, ग्रंथांचें सूक्ष्मावलोकन व विद्वज्जनसमागम यांचा योग्य तो परिपाक होऊन त्यांच्या आंगीं बहुश्रुतपणा व व्यवहारचातुर्य हे गुण उत्पन्न झाले व या गुणांमुळेंच त्यांना आपल्या काव्यांच्या मांडणींत शास्त्र व व्यवहार यांची सांगड घालतां आली. पंतांच्या काव्यांतील शब्दांची योजना, अर्थाचें गौरव, पदरचनेचें चातुर्य इत्यादि गुणांप्रमाणेंच त्यांचा आटोपशीरपणा हा देखील त्यांच्या लोकप्रियतेस पुष्कळ अंशीं कारणीभूत झालेला आहे.

---

१. पुढील सुभाषित पहा:—

> भारतं चेक्षुदण्डं च कलानाथं च वर्णय ।
> कालिदासः कविर्ब्रूते प्रतिपर्व रसावहम्. ॥

अर्थ:-( भोजराजानें कालिदासास म्हटलें ), 'कविराज ! भारत, इक्षुदंड (ऊंस) आणि चंद्र या तिहींचें एकदम वर्णन करा ! कालिदासानें उत्तर केलें, 'तिहींचा रस प्रतिपर्वीं चढतो'.

'पर्व' शब्द श्लिष्ट आहे. त्याचा पहिला अर्थ-अर्थात् भारताचा एक विभाग-हा प्रसिद्धच आहे. दुसरा-( उंसाचें ) पेर आणि तिसरा-पर्वणी.

४. पंतांची भाषा संस्कृत शब्दांच्या प्राचुर्यामुळें क्वचित् बोजड व कृत्रिम असली, तरी ती एकंदरींत सरळ व सुबोध असून प्रौढ व भारदस्तही आहे. इतकेंच नाहीं, तर तिच्यांतील अर्थही मोठा गंभीर व प्रसादपूर्ण असतो. त्यांचें कल्पनावैभव खरोखरच फार विशाळ व अफाट आहे. त्यांच्या काव्यांत सरस व रम्य कल्पना, सहृदयाल्हादकारक अलंकार, कर्णमधुर पदलालित्य व चमत्कृतिजनक अर्थवैचित्र्य इत्यादि विपुलतेनें आढळतात. त्यांना श्लेषाची आवड विशेष असावी, असें वाटत नाहीं. तथापि त्यांच्या काव्यांत मधून मधून शब्दांवर श्लेष (परिशिष्ट तिसरें व सातवें पहा) व क्वचित् शब्दांवर कोट्या (अध्याय ३७ गीति ७८ पहा) आढळतात. प्रस्तुत पर्वांत, सबंध पद्यभर श्लेष असलेल्या फक्त दोनच गीति आढळतात. (अध्याय १० गीति ९ व अध्याय १८ गीति २१ पहा). श्लेषाचीं जीं स्थळें आम्ही नमूद केलीं आहेत, तीं अत्यंत सुबोध, स्वाभाविक व मार्मिक आहेत. यावरून असें दिसून येतें, कीं पंतांनीं श्लेषाच्या नादीं लागून आपलीं काव्यें निष्कारण दुर्बोध व रसापकर्षक केलीं नाहींत.

५. पंतांच्या उपमा मोठ्या हृदयंगम असतात. आपल्या वाचकांवर ते सहज लीलेनें त्यांचा वर्षाव करीत आहेत, असें वाटतें. उपमांच्या बाबतींत 'उपमा कालिदासस्य' अशी संस्कृत वाङ्मयांत प्रसिद्धी आहे. त्याप्रमाणेंच मराठींत 'उपमा रामपुत्रस्य' असें म्हणण्याचा प्रघात पडणें इष्ट आहे. कारण पंतांच्या उपमा अगदीं निर्दोष व अत्यंत रमणीय असून त्या निःसंशय संस्कृतांतील तोडीच्या असतात. पंतांच्या उत्प्रेक्षाही मोठ्या मोहक व मोददायी असतात व त्यांचें कल्पनाचापल्य अशा प्रसंगींच दृग्गोचर होऊन त्यांच्या तरल कल्पनांच्या नानाविध छटांची जाणीव आपणास होते.

६. पंत कोणत्याही विषयाचें वर्णन करितांना प्रत्येक गोष्टीचें स्वरूप कोणत्या ना कोणत्या तरी अलंकारानें नटवितात व तेणेंकरून तें विशेष उठावदार व चटकदार बनतें. त्यांच्या सर्व गीतींचीं उत्तरार्धे बहुतकरून अलंकारयुक्त असतात आणि यामुळेंच त्यांच्या काव्यांत उपमा व उत्प्रेक्षा यांखेरीज रूपक, अतिशयोक्ति, अप्रस्तुतप्रशंसा, दृष्टांत इत्यादि अनेक सुंदर, समर्पक व मनोहर अलंकारांचें वैपुल्य आढळतें. क्वचित् एकाद्या पद्यांत दोन दोन तीन तीन अलंकार साधून त्या त्या ठिकाणीं पंतांनीं विस्मयोत्पादक चमत्कृति व अलौकिक रमणीयता हीं उत्पन्न केलीं आहेत.

७. पंतांच्या काव्याचें खरें वैशिष्ट्य हें आहे, कीं त्यांच्यापुढें नव रस जणूं काय मूर्तिमंत उभे असतात व त्यांच्या सहाय्यानें वर्ण्य विषय वाचकांसमोर प्रत्यक्षच घडत आहे, असा भास होतो.

---

१. 'कच' शब्दावरील श्लेष पंतांचा मोठा आवडता दिसतो (कर्णपर्व, अध्याय ३२।१६ व अमृतमथन, अध्याय १।११ पहा).

२. पुढील सुभाषित प्रसिद्धच आहेः—

उपमा कालिदासस्य भारवेरर्थगौरवम्।
दंडिनः पदलालित्यं माघे सन्ति त्रयो गुणाः॥

पंतांच्या शृंगाररसाचा आविर्भाव मोठा बहारीचा असतो, पण त्या वर्णनांत मर्यादातिक्रम कोठेंही होत नाहीं. शर्मिष्ठा व ययाति यांचा संवाद ( अध्याय ११ ), दुष्यंत-शकुंतलाख्यान ( अध्याय १२ ), कुंती व सूर्य यांची भेट ( अध्याय १७ ), पांडु व माद्री यांचा आत्मनाशावह भोगविलास ( अध्याय २० ), इत्यादि प्रसंग पंतांनीं किती हलुवारपणें व किती सफाईनें वर्णिले आहेत ते पहावे. अशा प्रसंगांचीं त्यांचीं वर्णनें मोठीं मधुर, मोहक व मर्यादशील असतात. मराठी कवींपैकीं शृंगाररसांत न वहावणारे असे एकटे पंतच ! 'होती करीत कंदुककेलि, मधुर गान मोहिनी' ( अध्याय १२।३० ) इत्यादि मेनकेचें; आणि 'पुष्पावचयव्याजें, जैसी चपळा घनीं, वनीं चपळ' ( अध्याय ३८।१६ ) इत्यादि तिलोत्तमेचें वर्णन हीं एखाद्या मार्मिक चित्रकारास अत्यंत चेतोहर चित्रें काढण्याच्या कामीं खात्रीनें स्फूर्तिदायक होतील.

करुणरसाचा उत्तम मासला पहावयाचा असल्यास तो बकासुराख्यांत ब्राह्मण व त्यांच्या कुटुंबांतील माणसें यांच्या भाषणांत आढळेल ( अध्याय ३१ ). तेथील निरनिराळ्या व्यक्तींचीं भाषणें सहृदय वाचकांच्या मनास चटका लावणारीं आहेत. धेनुहरणाख्यानांतील गायीचे हंबरडे व वशिष्ठमुनींची सून अदृश्यंती हिचें गहिंवरयुक्त भाषण ( अध्याय ३४ ) यांतील कांहीं गीतींत करुणरस ओतप्रोत भरलेला आहे.

पंतांचा स्वभाव प्रायः प्रौढ व गंभीर असल्यामुळें ते हास्यविनोदास फारसें महत्व देत नाहींत. यामुळें त्यांच्या काव्यांत हास्यरस क्वचितच आढळतो. तथापि ब्राह्मणबालकाचे बोबडे बोल ( अध्याय ३१ गीति ३१–३३ ) वाचून ज्यास हंसूं येणार नाहीं, असा मनुष्य विरळाच ! सुंदोपसुंदांच्या मरणामुळें तुंदिलतनु गणपतीच्याच काय ?—पण कोणाच्याही पोटांत हास्यातिरेकामुळें कळ उठल्याशिवाय कशी राहील ? ( अध्याय ३८।२३ ). अशा प्रकारचे नमुने पंचपक्वान्नांच्या भोजनांत रुचकर व चवदार चटण्या-कोशिंबिरींप्रमाणें काव्यास खमंग व लज्जतदार बनवितात.

पंतांच्या काव्यांत शांतरसाचीं उदाहरणें अनेक आढळतात. कण्वाश्रमाचें वर्णन ( अध्याय १२ गीति ५–७ ) हा ह्या रसाचा एक उत्तम नमुना होय.

वीररसाची भट्टी तर पंतांस अप्रतिम साधली आहे. परंतु प्रस्तुत पर्वांत वीररस वर्णन करण्यासारखे महत्वाचे प्रसंगच कोठें नसल्यामुळें ह्या रसाच्या बाबतींत 'वीरकवींच्या नायका'चा नाइलाज होऊन त्याला वाचकांची निराशा करावी लागली आहे. पण त्याची भरपाई त्यानें पुढील पर्वांत—विशेषतः भीष्म-द्रोण-कर्णादि पर्वांत—सव्याज केली आहे.

---

१. पंतांच्या वीररसवर्णनाच्या प्रावीण्यासंबंधानें पुढील पद्य प्रसिद्ध आहेः—

आर्या-छंदें जोडुनि रामायण-भारतादि आयकवी ।
नायक वीर-कवींचा ऐसा होईल अन्य काय कवी ? ॥

( विठोबाअण्णा दप्तरदार )

प्रस्तुत पर्वांत इतर आणखीही कांहीं रस आढळत नाहींत, हें खरें. पण ह्या बाबतींत पंतांची पराधीनताच जबाबदार आहे. मूळांत जे जे प्रसंग आहेत, ते ते उठावदार रीतीनें व थोडक्यांत वर्णन करावयाचे एवढेंच त्यांच्या हातीं होतें. तें काम त्यांनीं शक्य तितक्या उत्तम रीतीनें बजावलें आहे, यांत संशय नाहीं.

८. पंतांच्या काव्यांतील व्यक्तींचीं भाषणें नेहमींच प्रसंगानुरूप मोठीं खुबीदार, बाणेदार व समर्पक आढळतात. संभाषणांच्या बाबतींतील पंतांचें चातुर्य तर केवळ अप्रतिम आहे. तसेंच त्यांच्या काव्यांत हृदयंगम वर्णनांचाही सुकाळ झालेला आढळतो.

शर्मिष्ठेनें केलेलें शिशुपालनसौख्याचें वर्णन ( अध्याय ११।३ ), ययातिराजानें आपला स्वीकार करावा म्हणून शर्मिष्ठेनें केलेली त्याची मनधरणी ( अध्याय ११ गीति ८–१५ ), विश्वामित्राचा तपोभंग करावयास जाण्यासंबंधीं इंद्र व मेनका यांचा संवाद ( अध्याय १२ गीति १९–२६ ), दुष्यंत व शकुंतला यांचें त्यांच्या प्रथम भेटीच्या वेळीं झालेलें भाषण ( अध्याय १२ गीति ३७–४४ ), माद्रीनें अश्विनीकुमारांस दिलेलें मार्मिक उत्तर ( अध्याय १९।९७ ), विचित्रवीर्यराजाची कामवशता ( अध्याय १४ गीति १४–१५ ), द्रुपद-शासन ( अध्याय २७ गीति २५–३२ ), शस्त्रविद्यापरीक्षा व तत्समयीं दुर्योधनानें कर्णाला अंगदेशाचें राज्य दिल्यामुळें त्यास कर्णानें दिलेलें वचन इत्यादि ( अध्याय २६ ), उपवर द्रौपदीचें वर्णन ( अध्याय ३५ गीति १३–१६ ), ओळख पटल्यावर दुष्यंतानें शकुंतलेजवळ केलेली क्षमेची याचना ( अध्याय १२ गीति ८५–८८ ), तिलोत्तमेच्या पाणिग्रहणासंबंधीं सुंदोपसुंदांचा वादविवाद ( अध्याय ३८ गीति १७–२३ ) इत्यादि प्रसंग आमच्या विधानाची सत्यता पटविण्यास पुरेसे आहेत.

९. स्त्रियांच्या व मुलींच्या स्वभावरेखनाच्या बाबतींत पंत फारच कुशल आहेत. गरिबाची लाडकी लेंक देवयानी व शिस्तींत वाढलेली राजकन्या शर्मिष्ठा यांच्या भाषणाचे नमुने ( अध्याय १० व ११ पहा ) त्या त्या प्रसंगांस अनुरूप आहेत. स्त्रियांना दागिन्यांची आवड अनादि कालापासून असलेली दिसते. उत्तंकाच्या गुरुपत्नीची इच्छा आपण पौष्यस्त्री-तार्टकें[१] घालून 'श्रीसमान साजावें' व 'विप्रांतें वाढावें' ( अध्याय २।७७ ) ही स्त्रीस्वभावास साजेशीच आहे. अर्जुनाचा सुभद्रेशीं विवाह झाल्यामुळें द्रौपदीस सवतीमत्सर वाटणें सहाजिक होतें, त्या प्रसंगाचें वर्णन पंतांनीं मोठ्या मार्मिकपणें करून द्रौपदीला अर्जुनाविषयीं वाटत असलेलें प्रेम, पण घरांत सवत आणल्याबद्दल आलेला राग, या संमिश्र भावनांचें त्यांनीं केलेलें चित्रण मोठें हृदयंगम आहे. ( अध्याय ३८ गीति ७१–७३ ) ह्या व अशाच आणखी उदाहरणांवरून पंतांचें निरीक्षण किती सूक्ष्म होतें हें दिसून येतें.

१०. पंतांच्या भाषेचा मोठा गुण व्याकरणशुद्धता हा होय. ह्याचा अर्थ त्यांनीं वाक्यशुद्धि आणि शब्दशुद्धि ह्यांच्याकडे फार बारकाईनें लक्ष पुरविलें आहे. संस्कृतांतून शब्द घेतांना

---

१. स्त्रियांच्या कानांतील तार्टकाप्रमाणेंच पुरुषांच्या कानांतील कुडकी हें एक महत्वाचें कर्ण-भूषण होतें, असें दिसतें ( अध्याय २।३९ ).

व समास बनवितांना त्यांनीं व्याकरणाचे नियम पूर्णपणें पाळिले आहेत. तसेंच मराठी शब्दांच्या बाबतींत देखील त्यांनीं शक्य तितकी काळजी घेतली आहे. पंतांची वाक्यरचनाही व्याकरणाच्या नियमांस अनुसरून असून प्रत्येक वाक्याचा अर्थ सुसंगत व सरळ होतो. पण पंतांच्या पूर्वीच्या कवींनीं–वामनपंडितांसारख्या जाड्या विद्वानांनीं देखील–ह्या गोष्टीकडे फारसें लक्ष दिलेलें नाहीं, आणि म्हणूनच ह्या बाबतींत पंतांना धन्यवाद द्यावे तेवढे थोडेच! पंतांनीं भाषाशुद्धीचा जो धडा घालून दिला, तोच आपण गिरवीत आहों.

११. पंतांचें लेखन देखील असेंच व्याकरणशुद्ध आहे. त्यांनीं आपल्या ग्रंथांत योजिलेल्या संस्कृत शब्दांचीं रूपें मूळचींच कायम ठेविलीं आहेत. प्राकृत भाषेंत संस्कृत शब्दांपासून 'तद्भव' शब्द तयार करितांना 'ह'–कारप्रथमाक्षरें 'ह'–कारद्वितीय करावीं असा प्राकृतव्याकरणाचा नियम आहे. परंतु तो नियम संस्कृत शब्दांस लागू करण्यापेक्षां ते संस्कृतांत जसे लिहिले जातात तसेच ते लिहिणें इष्ट होय. पंत ब्रह्म, ब्राह्मण इत्यादि शब्दांतील 'म्ह' असा म्हणजे 'ह' कारद्वितीय न लिहितां संस्कृताप्रमाणेंच 'ह्म' असा म्हणजे 'ह्'कारप्रथम लिहितात, तें योग्यच होय.

१२. पंतांनीं छंदःशास्त्राचें अध्ययन अत्यंत मननपूर्वक व मोठ्या बारकाईनें केलेलें आहे. 'सानुस्वारो विसर्गान्तो दीर्घो युक्तपरश्च यः' ह्या वृत्तरत्नाकरांतील नियमानें संयुक्ताक्षरांच्या पूर्वाक्षरांस गुरुत्व येतें. परंतु छंदोमंजरींतील 'प्र-ह्रैवेति पुनः पिंगलमुनैर्विकल्पविधायकं सूत्रम्' ह्या नियमास अनुसरून 'प्र' व 'ऱ्ह' ह्या संयुक्ताक्षरांच्या पूर्व अक्षरांस विकल्पेंकरून म्हणजे वृत्ताच्या सोयीप्रमाणें कधीं गुरुत्व येतें व कधीं येत नाहीं. पंतांनीं पुढील स्थळीं ह्या विकल्पविधायक सूत्राचा आधार घेतला आहेः—

( अ ) 'ऱ्ह'—अध्याय १०।७५, २६।४२, व ३०।१३

( आ ) 'प्र'—अध्याय २५।४७, १२।४६ ( टीपेंतील पाठ ), ९।३१, ९।१६, ९।५३, १०।९, १०।१४, १०।५४, १०।८३ इत्यादि.

तसेंच 'पादान्तगो वर्णो लघुर्गुरुर्भवेद्वा' ( छंदोमंजरीटीका ) म्हणजे–चरणाच्या शेवटचें अक्षर दीर्घ असलें तरी लघु व लघु असलें तरी दीर्घ मानावें. हा नियमही पंतांनीं पाळलेला आढळतोः—

अध्याय १०।७१, ७४ व ७५ आणि अध्याय ३०।७४ इत्यादि, यांतील द्वितीय व चतुर्थ पादांतील अक्षरें ऱ्हस्व आहेत, तथापि उपरिनिर्दिष्ट नियमानुसार तीं दीर्घच मानिलीं पाहिजेत.

सारांश, पंतांच्या छंदःशास्त्राच्या सूक्ष्म परिचयाची साक्ष पटावयास आणखी ज्यास्त पुराव्याची कांहीं आवश्यकता आहे, असें नाहीं.

१३. पंतांस एकादी सुंदर कल्पना सुचली, तर एकाद्या आंगठींत मौल्यवान खडा बसवावा त्याप्रमाणें ती यमकबंधांत सहज ग्रथित करण्याचें कौशल्य त्यांच्या अंगीं होतें. छंदःशास्त्रांत सांगितलेलीं सर्व प्रकारचीं यमकें त्यांच्या काव्यांत आढळतात व तेणेंकरून

त्यांच्या काव्यांचें सौंदर्य वाढलें आहे. त्यांच्या यमकाधीनत्वामुळें दूरान्वय व रसभंग झाल्याचीं उदाहरणें क्वचित् आढळतात, पण एकंदरींत अशीं स्थळें फारच विरळ आहेत.

१४. आर्याभारत रचीत असतां पंतांनीं इतर कांहीं कविता रचिली असावी, असें वाटत नाहीं. तथापि 'अमृतमथना'चा प्रसंग प्रस्तुत पर्वांत आहे (अध्याय ४ पहा). तो वर्णन करीत असतां भागवतांतील त्याच प्रसंगावर आपण एकादें सुंदर काव्य रचावें, अशी त्यांना इच्छा झाली असावी, आणि प्रस्तुत पर्वांतील प्रसंगावरील पद्यें रचीत असतां त्यांनीं आपलें 'अमृतमथन' हें काव्य रचिलें असावें. ह्या स्फुटकाव्याच्या १५८ गीति असून त्यांत पंतांनीं आपल्या स्वतंत्र प्रतिभेचा प्रभाव दाखविला आहे. (काव्यसंग्रह-ग्रंथमाला, मोरोपंत-कृत स्फुट काव्यें-भाग २, पृष्ठें १९६-२१९ पहा).

महाभारतांतील ज्या कथा श्रीमद्भागवतांतही आहेत, त्यांसंबंधानें एक गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे. ती ही कीं, पंतांनीं त्या कथांचें कोणत्या तरी एकाच ठिकाणीं विस्तृत वर्णन केलें असून दुसऱ्या ठिकाणीं वर्णनाचा संकोच केला आहे. वाचकांनीं त्या त्या ठिकाणच्या कथानकांची तुलना करून पहावी, म्हणून तीं खालीं नमूद करितों:—

| | आदिपर्वांतील कथा. | मंत्रभागवतांतील कथा. |
|---|---|---|
| १ | अमृतमथन, अध्याय ४ गीति ३७-६३ | स्कंध ८ गीति ३१-७० |
| २ | च्यवनकथा, अ० ३ गीति १२-२४ | स्कंध ९ ,, २७-४२ |
| ३ | ययातिकथा, अध्याय १० व ११ | ,, ,, २५३-२८० |
| ४ | दुष्यंतकथा, अध्याय १२ | ,, ,, २८१-२९० |
| ५ | सौदासकथा, अध्याय ३४ गीति ४१-६८ | ,, ,, १३१-१४० |
| ६ | सुभद्राहरण, अ० ३८ गीति ४२-८० | ,, १० ,, १०३७-४८ |
| ७ | परीक्षिन्नृपनिर्याण व सर्पसत्र, अ० ६।७ | स्कंध ११ गीति ११२-१२० |

पंतांनीं आपल्या बृहद्दशम (कृष्णविजय) नामक काव्याच्या ८६ व्या अध्यायांत 'सुभद्राहरण' वर्णिलें आहे. प्रस्तुत पर्वांतील वर्णन व मंत्रभागवतांतील वर्णन यांत थोडा फरक आहे. ह्या तिन्ही ठिकाणचा रसही निरनिराळा आहे.

१५. पंतांनीं आपली अंतर्बाह्यगुणान्विता कवितादुहिता अनेक अलंकारांनीं नटविली आहे आणि तिच्या बांधेसूदपणाकडे व शरीरसौष्ठवाकडे एकाद्या कुशल मूर्तिकाराप्रमाणें लक्ष पुरविलें आहे. तथापि तिच्या ठिकाणीं क्वचित् कांहीं वैगुण्येंही आढळतात. अर्थात् हे बारीकसारीक दोष म्हणजे गालबोटवजाच होत. आपल्या कविताकन्येस दृष्ट लागूं नये असाच ते दोष राहूं देण्यांत किंवा ते काढून टाकण्याच्या कामीं चालढकल करण्यांत त्यांचा हेतु असावा. कवींचें निरंकुशत्व (Poetic license) प्रसिद्धच आहे. परंतु अशा रीतीनें कवींस मिळणाऱ्या सवलतींचा फायदा पंत अगदीं काटकसरीनें घेतात व त्यांच्या काव्यविस्तराच्या मानानें तो केवळ 'सिंधूंत बिंदु' ह्या न्यायानेंच होय:—

( १ ) **अग्राह्य समास**—विषसर्पिशर्कराकणिक ( अध्याय २८।५ ), कपटींद्र ( अध्याय २८।१२ ) मृगपोर ( अध्याय ३७।१६ ), शिष्य-असी ( अ० २।५४ )

( २ ) **यतिभंग**—मागे सुधेविणें अजरा-मरता ( अ० ४।१५२ ), शोधूं, बरें करू, कर-णें तें ( अ० ३५।८० )

( ३ ) **यमकासाठीं शब्दांची ओढाताण**—सौती=सवती ( अ० १।२२ ), तरुनि=तारुनि ( अ० १३।६४ ) परागंधा=परागंदा ( अ० ३०।१८ ), आजाबा=आजोबा ( अ० ३४।७२ ), विषीं=विषयीं ( अ० २४।१२ ), नातुंड ( अ० ३४।५८ ), रिण ( अ० १९।३२ )

( ४ ) **ऱ्हस्वासाठीं दीर्घ**—वासरमणी (अ० १७।१४ ), शकुनी ( अ० १६।१४ ), हानी ( अ० २६।३४ ), रवी ( अ० १।१ ), प्रभू ( अ० ७।४० ).

( ५ ) **दीर्घासाठीं ऱ्हस्व**—मनिं=मनीं ( अ० ८।३३ ), मनीं-मानीं ( अ०१२।५९ )

( ६ ) **वर्तमानकाळवाचक धातुसाधितानेंच पूर्णवर्तमानाचा अर्थ साधणें**—हें मनांत आणित मीं ( अ० २५।१४ ), वर देत ( अ० ३३।५५ ).

( ७ ) **अनुस्वारव्यत्ययदोष**—गमसी-मसीं ( १२।७६ ), जेंवीं-जेवीं ( अ० १९। २३ ), वनीं तें-नवनीतें ( अ० ३०।७ ), अवनी-अवनीं ( अ० ८।४८ ), कामी-धामीं ( अ०१९।४९ ), भू-तरणी-पूत रणीं ( अ० १९।६७ ), तज्जननीं-तज्जननी ( अ० १९। ७१ ), कांहीं-नाहीं ( अ० १९।३६ ).

( ८ ) **अयोग्य उपमा**—साधुमतिमक्षिका ( अ० ३३।३४ ).

( ९ ) **व्याकरणदोष**—आम्हीं कळलों ( अ० ३६।८ ), नाहीं=नाहींत ( अ० १।७ ), विषतोयराशिशोक् ( अ० ३४।६२ ), **श्रम** ( अ० ३७।८४ )-हा शब्द निरंतर अनेकवचनी योजिला जातो. पण **पं**तांनीं तो एकवचनी योजिला आहे. **पं**तांनीं कर्णपर्वांतही असाच प्रयोग केला आहेः—झाला श्रम मजहि चित्त आवरितां ( अध्याय २१।४४ ). **पुनीते** ( अ० ३८।१३ )-ह्यासंबंधानें पृष्ठ ३१३ टीप ५ पहा. **अनुष्ठितुम्** ( अ० ३१।२७ )-हें पद **पं**तांच्या हातून नजरचुकीनें किंवा विस्मरणामुळें पडलें असावें. कारण त्यांनीं संस्कृतामध्येंही कित्येक सरस काव्यें लिहिलीं आहेत, पण त्यांत अशा प्रकारचे दोष नाहींत. ( पृष्ठ २३७ टीप ४ पहा ).

( १० ) **सदभिरुचीला सोडून वर्णनें व शब्दयोजना**—**पं**तांनीं 'थान' हा ग्राम्य शब्द अनेक ठिकाणीं योजिला आहे. तसेंच 'विणें' ह्या क्रियापदाचा उपयोग मनुष्यांच्या बाबतींत केला आहे. पण असा प्रयोग करणें अप्रशस्त होय. रिपुदारजनीं **चोळी नुरवी** ( अ० ३८।५२ )-शत्रूच्या स्त्रियांस [ वैधव्य प्राप्त झाल्यामुळें ] चोळयांचा त्याग करावा लागला-हें वर्णन शिष्टसंमत मर्यादेस सोडून आहे. अध्याय ३४।७३ मधील हीच कल्पना **पं**तांनीं किती भारदस्त भाषेंत मांडली आहे बरें ! 'भ्राते झाले चेतोहर कोणत्या नगरतीचे ?' ( अ० ३८।७८ )-हें वर्णनही सभ्याचार व मर्यादा यांस सोडूनच आहे. गरतीच्या

मनःपावित्र्याची पंतांनीं चांगलीच प्रशंसा केली आहे! फळणें (अ० २।१३१, १३।२८, २४।२६)-ह्या क्रियापदाचा उपयोग शिष्टसंप्रदायास सोडूनच आहे, असें आम्हांस वाटतें.

(११) कालविपर्यासदोष—प्राचीन काळीं विधवांचें वपन केलें जात असे, असा उल्लेख कोठें आढळत नाहीं. यामुळें 'न रहावेंचि सतीनें पळभरिहि "विरूपकाय" होऊन' (अ० ३१।२३) हें वर्णन पंतांच्या वेळच्या चालीचें निदर्शक आहे, हें उघडच आहे. महाभारतकाळीं स्त्रिया चोळया घालीत असत (अ० ३८।५२) किंवा नसत, याविषयीं शंका आहे. तेव्हां हें देखील कालविपर्यासाचेंच उदाहरण समजावें.

प्रस्तुत पर्वांत आढळणाऱ्या दोषांचें दिग्दर्शन वर केलें आहे, व त्यांचीं कांहीं उदाहरणेंही दिलीं आहेत. त्यांवरून पंतांच्या काव्यांतील दोषांचें प्रमाण किती अल्प आहे, हें दिसून येतें, आणि असे कांहीं बारीकसारीक दोष त्यांच्या काव्यांत असले तरी तेणेंकरून त्यांच्या गीर्वाण-भाषाप्रावीण्यास, गाढ विद्वत्तेस व काव्याच्या रमणीयत्वास मुळींच बाध येत नाहीं, हें स्पष्ट होतें.

# उपसंहार.

**महाभारत** हा एक अत्युच्च नीतितत्त्वांचा संग्रह आहे व **आदिपर्व** हा जरी मूळ ग्रंथाचा एक लहानसा भाग असला, तरी त्यांतही अशीं अमोल रत्नें कांहीं कमी नाहींत. गुरु-शिष्य, पिता-पुत्र, राजा-प्रजा, बंधु-भगिनी, पति-पत्नी, मित्र, सहाध्यायी इत्यादिकांचीं कर्तव्यें काय आहेत यांचे दाखले त्यांत ठिकठिकाणीं आढळतात. पण त्यांतही विशेषतः आपल्या आयुष्यांतील चार आश्रमांपैकीं प्रथमाश्रमांतील कुमार व कुमारी यांचीं चरित्रें वर्तमानकाळांतील कुमार व कुमारी यांस आदर्शभूत होतील अशीं आहेत.

धौम्यमुनीचे शिष्य उपमन्यु, आरुणि व वेद यांनीं विद्यासंपादनाच्या बाबतींत घेतलेले कष्ट व केलेली गुरुसेवा हीं प्रशंसनीय आहेत. गुरुजींनीं जरी त्यांची कसोटी पाहिली, तरी त्यांचें आपल्या शिष्यांवर अत्यंत प्रेम असे. उत्तंकानें गुरुदक्षिणा देण्यासाठीं केवढें साहस केलें, किती संकटांस तोंड दिलें, हें आपणांस माहीतच आहे. अर्जुन, कर्ण, अश्वत्थामा हे 'शिष्यादिच्छेत्पराजयम्' अशा तोडीचे होते. एकलव्यानें तर सर्व शिष्यांवर ताण करून आपल्या (मानलेल्या) गुरूंस (द्रोणाचार्यांस) चकित करून सोडिलें. पंतांनीं कचासंबंधीं 'कवणाला न प्रिय तें गुणमणिमय केलिमंदिर श्रुतिचें?' (अध्याय ९।१६) असे जे उद्गार काढिले आहेत, ते निःसंशय सार्थ आहेत. तसेंच त्याच्या अंगीं 'सुविद्यता' व 'शुचिता' (अध्याय १० गीति १) इत्यादि अनेक प्रशंसनीय गुण होते. विद्यार्जनासाठीं परदेशांत गेलेल्या विद्यार्थ्यांनीं तेथें गुरुगृहीं वा आपल्या आश्रयदात्याच्या घरीं कसें सावधगिरीनें व आपल्या चारित्र्यास कलंक लागू न देतां वागावें, हें कचाच्या उदाहरणानें सद्यःकालीन विद्यार्थ्यांनीं शिकण्यासारखें आहे. महाभारतरूपी महासागरांत अवगाहन करणाऱ्यांच्या हातीं अशीं कितीतरी अनर्घ्य शिष्यरत्नें लागतील.

भारतकालीन कुमारिकांचा स्वार्थत्याग-नव्हे, आत्मयज्ञ-अतुल आणि अवर्णनीय आहे. त्यांनीं हें आत्मबलिदान स्वसंतोषानें केवळ 'माहेर व्यसनीं न बुडो' (अध्याय ७।१२) अशा उदात्त भावनेनें केलेलें आहे. खरोखर धन्य आहे त्या सुकन्यांची!

वासुकीनें आपली भगिनी जरत्कारी ही आपल्या कुळाच्या रक्षणार्थ जरत्कारूस दिली. तिनेंही तीर्थाटन करणाऱ्या तामसी वृत्तीच्या व अकिंचन अशा जरत्कारूस त्याच्या—

पोषण न करीन तिचें, स्वल्पहि न तदर्थ वित्त जोडीन।
होतांचि गर्भधारण, संग तिचा, मी स्वतंत्र, सोडीन ॥
(अध्याय ४ गीति १३)

अशा कडक अटींचा स्वीकार करून वरिलें. जरत्कारी त्याला इतकी जीवापलीकडे जपत असतांही हे 'घरजांवई' पतिराज तिचा त्याग करून निघून गेलेच! पण ह्या सर्व अडचणी केवळ आपल्या 'माहेरा'च्या कल्याणाकरितां तिनें सोसल्या.

शर्मिष्ठा ही राजप्रासादांत वाढलेली व राजवैभवांत लोळणारी एका मोठ्या राजाची लाडकी लेंक. पण शुक्राचार्य आपल्या वडिलांचा पक्ष सोडून गेल्यास आपल्या ज्ञातीचा नाश होईल तो होऊं नये म्हणून व 'पात्र असोत जयसुखा ज्ञाती' (अध्याय १०।६५) ह्या उदात्त हेतूनें तिनें देवयानीचें दास्य पत्करिलें. आपली केवढी मानहानी होत आहे, याची पर्वा न करितां, तिनें—

**कुळजेनें व्यसनकरीं प्राणहि द्यावे, परंतु न ज्ञाती।**
(अध्याय १० गीति ६९)

अशी घोषणा करून, देवयानीच्या सर्व अटी मान्य केल्या, व आपलें राजवैभव सोडून तिच्या पित्याच्या आश्रमांतील पर्णकुटींत राहावयास गेली. शर्मिष्ठेचा पोक्त विचार, धीर व गंभीर स्वभाव आणि आपल्या ज्ञातीच्या कल्याणाची कळकळ हीं अवर्णनीय आहेत.

गांधारीचाही स्वार्थत्याग कांहीं कमी प्रतीचा नाहीं. तिचा भाऊ शकुनी यानें तिचा धृतराष्ट्रासारख्या जन्मांधाशीं विवाह करून दिला तो केवळ राजकीय हेतूनेंच. तसेंच द्रौपदीवर पांच पतींशीं विवाह करण्याचा प्रसंग केवळ आपल्या मातृभूमीच्या सुरक्षितपणासाठींच आला, हें पूर्वीं सांगितलेंच आहे.[1] (मागें पृष्ठें ४७–४८ पहा).

पूर्वी रजपुत राजांच्या मुलींना 'स्व'कुळाच्या व 'स्व'राज्याच्या बचावासाठींच मोंगलबादशहांशीं लग्नें लावावीं लागलीं होतीं. शिवाजीमहाराजांनींही आपलें धोरण 'स्वदेशसंरक्षण' ह्या ध्येयास पोषक होईल, असेंच आंखलें होतें. त्यांनीं आपले खासगी संबंधही राजकारणी दृष्टीनेंच जोडिले होते. स्वतः त्यांनीं जीं लग्नें केलीं, त्यांत तर हें धोरण होतेंच. पण

१. प्रस्तुत स्थळीं च्यवनऋषींची पत्नी जी सुकन्या तिचें स्मरण झाल्याशिवाय राहात नाहीं. ती शर्यातिराजाची कन्या होती. तिचाही स्वार्थत्याग असामान्य व अवर्णनीय होता (श्रीमद्भागवत, स्कंध ९ अध्याय ३ पहा).

शिवाय त्यांनीं आपल्या मुलांमुलींचे विवाह करितांना तेंच धोरण आपल्या दृष्टीपुढें ठेविलें होतें. स्वराज्याच्या कामीं आलेल्या **प्रतापराव गुजराची** मुलगी त्यांनीं आपली सून म्हणून करून घेतली. तसेंच शुद्धीकृत **बजाजी निंबाळकराच्या** मुलाला आपली मुलगी दिली. हे संबंध घडवून आणण्यांत महाराजांची दूरदृष्टी दिसून येते. अशा रीतीचें धोरण आंखण्याची स्फूर्ति त्यांना महाभारताच्या वाचनानें वा श्रवणानें झाली असावी, असा तर्क केल्यास तो चुकीचा होईल, असें वाटत नाहीं.

**शाहूनें** आपल्या धाकट्या राणीची ( **सगुणाबाईची** ) चुलतबहीण **नागपुरकर रघूजी भोंसले** यांस देववून आपला नातेसंबंध दृढ केला. असा संबंध जुळवून आणण्यांत राजकीय हेतु होताच. ह्या सर्व उदाहरणांवरून 'इतिहासाची पुनरावृत्ति होते' असें जें म्हणतात तें खरें दिसतें. **पांडवांवरील** संकटें व त्यांचें लाक्षागृहांतून निसटून जाणें इत्यादि गोष्टींचें **शिवाजीमहाराजांवरील** संकटें व त्यांनीं **औरंगजेबाच्या** नजरकैदेंतून युक्तीनें करून घेतलेली सुटका यांत पुष्कळच साम्य आहे.

कोणत्याही प्रसंगीं गर्वाचें भाषण करूं नये किंवा आत्मप्रौढी मिरवूं नये, ही गोष्ट **ययातीच्या** कथेवरून स्पष्ट होते. त्यानें **इंद्राच्या** कपटी भाषणाच्या जाळ्यांत गुंतून 'देवेंद्रा! कोणीही स्वतपें मत्तुल्य जन असेना कीं' ( अध्याय ११।७८ ) असें म्हणतांच तो स्वर्गातून खालीं पडला. त्यानें **इंद्राला** हें सरळपणानें व अगदीं भीतभीतच सांगितलें, पण तेणेंकरून त्याचें अधःपतन झालें, म्हणून **पंतांनीं**—

**आत्मस्तोत्र कुगतिची पदवी।**

( अध्याय ११ गीति ७६ )

असें जें म्हटलें आहे, तें आबालवृद्धांनीं सदैव लक्षांत ठेवणें इष्ट आहे.

**गरुडानें** स्वर्गांत जाऊन देवांस जिंकून अमृत आणिलें व तें आपले शत्रु जे नाग त्यांस दिलें. असें करण्यांत स्वजनांचा द्रोह करण्याचा किंवा स्वतःचा स्वार्थ साधण्याचा त्याचा हेतु नव्हता. त्यास आपल्या परम पूज्य मातेच्या दास्यविमोचनाकरितां असें करणें अवश्य होतें. पण आपल्या शत्रूंना अमृत देऊन त्यांना अमर होऊं देणें इष्ट नसल्यामुळें त्यानें वकीली

---

१. 'गर्वाचें घर खालीं' ही म्हण प्रत्येकानें आपल्या हृत्पटलावर सुवर्णाक्षरांनीं लिहून ठेवण्यासारखी आहे. **पांडव** आपल्या राज्याची निरवानिरव करून महाप्रस्थानास निघाले असतां वाटेंत **सहदेव, नकुळ, अर्जुन** व **भीम** हे आपापल्या आंगच्या गर्विष्ठपणामुळें पतन पावले. **नकुळाला** वाटे, 'मीच काय तो शहाणा'; **सहदेवाला** वाटे, 'माझेंच रूप अप्रतिम आहे'; **अर्जुनाला** वाटे, 'सर्व धनुर्धरांत मीच श्रेष्ठ'; व **भीमाला** वाटे, 'सर्व मनुष्यसृष्टींत मीच बलवान्.' हा सर्व उद्बोधक कथाभाग जिज्ञासूंनीं मूळांतच वाचावा, अशी आमची सूचना आहे. ( मोरोपंतकृत महाप्रस्थानिकपर्व, अध्याय २ गीति १–२१ पहा ). ह्याच पर्वांत 'बहु पतना पात्र भूमिधव मानीं' ( अध्याय १।१६ ) असें पंतांनीं म्हटलें आहे, तेंही लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

डावपेंच लढवून त्यांस चकविलेंच! (अध्याय ४ पहा). यांत त्याची मातृभक्ति व व्यवहारचातुर्य हीं दिसून येतात.

इंद्राशीं झालेल्या युद्धांत गरुडानें एवढा मोठा पराक्रम केला, कीं त्याच्यापुढें इंद्राच्या वज्राचें कांहीं चालूं शकलें नाहीं. पण तो वज्र दधीचिऋषींच्या अस्थींपासून बनविलेला होता म्हणून त्या सत्पुरुषाविषयीं आदर दाखविण्याच्या हेतूनें त्यानें आपल्या पंखांतील एक लहानसें पीस काढून टाकिलें–जणूं काय त्या वज्रामुळेंच तें पीस निघालें. ह्या गोष्टीवरून गरुडाच्या आंगच्या लीनता, शालीनता इत्यादि सद्गुणांची साक्ष पटते.

तसेंच शृंगीच्या शापाची बाधा आपणास होऊं नये म्हणून परीक्षितराजा एकस्तंभप्रासादांत जाऊन राहिला. सात दिवसपर्यंत त्याचे सचिवादि आप्तेष्ट त्याला जपले. आपलें मरण आतां टळलें असें राजाला वाटलें, पण 'शृंगीवचन न पाहिजे मळलें' म्हणून 'कृमि कंठीं डसवावा' (गीति ८३) असा त्यानें विचार केला व त्या गोष्टीला सचिवादिकांनीं संमतीही दिली. कारण—

**न करावा शब्द साधुचा लटिका।**

(अध्याय ५ गीति ८४)

पूज्य आणि महनीय व्यक्तींविषयीं केवढा हा आदर! प्रसंगीं आपल्याकडे कमीपणा घेऊनही पूज्य व्यक्तींविषयीं आदर दाखविणें, हेंच उच्च मनोवृत्तीचें दर्शक आहे. सारांश, व्यक्ति जितकी मोठी तितकी तिच्या ठिकाणीं लीनता मोठी, हेंच खरें.

गांधारी म्हणजे पातिव्रत्यधर्माचा एक सुंदर आदर्श होय. तिचा आत्यंतिक त्याग, तिची पतिनिष्ठा, तिच्या मनाचा मोठेपणा, तिची साधी राहाणी, धृतराष्ट्रास वेळोवेळीं सदुपदेश करून त्यानें पांडवांबरोबर सरळ आणि न्याय्य रीतीनें वागावें म्हणून तिनें चालविलेली खटपट इत्यादि गुणांनीं ती 'सती' ह्या पदवीस पात्र झाली आहे.

द्रौपदी ही प्रातःस्मरणीय पंचकन्यांतील एक पतिव्रता होय. तिच्या पातिव्रत्यासंबंधानें निरर्गल प्रलाप काढणारा क्वचित् एखादा आधुनिक पंडित आढळतो, पण असें करितांना तो भारतकालीन आचारविचार, लोकांत रूढ असलेल्या समजुती व नीतिविषयक कल्पना यांच्यासंबंधानें आपलें गाढ अज्ञान मात्र प्रगट करितो! आजकाल प्रचलित असलेल्या नीतिकल्पनांच्या मापानें तत्कालीन नीतिकल्पना मापणें अगदींच गैर होय, असें आम्हांस वाटतें.

जरत्कारी देखील मोठी पतिव्रता होती. साधारणतः 'जनककुळाहुनि पतिकुळ अधिक असावें' (हरिवंश, अध्याय ३५।७१) अशी मुलींची इच्छा असते. परंतु जरत्कारीचा तपोधन पण द्रव्यहीन पतीशीं विवाह झाला असतांही तिची पतिनिष्ठा अढळ होती. पतीची एकनिष्ठपणें सेवा करून त्याला संतुष्ट ठेवण्याविषयीं ती अत्यंत दक्ष असे. तो तिचा त्याग करून निघून गेला यांत त्या बिचारीचा अपराध मुळींच नव्हता.

अदृश्यंती ही एक आदर्श स्नुषा होती. ती बिचारी स्वतः वैधव्यदुःखसागरांत बुडालेली असूनही आपलें स्वतःचें दुःख बाजूस सारून आपल्या वयोवृद्ध व शतपुत्रांच्या मरणामुळें

7

दुःखाग्नींत पोळत असल्याकारणानें जीवास कंटाळलेल्या आपल्या श्वशुरास ( वसिष्ठास ) परोपरीनें कशी जपत असे व त्याची किती मनोभावानें शुश्रूषा करीत असे, हें पाहिलें असतां 'सून म्हणजे एक नवीन मुलगाच होय' ( अध्याय ३०।५७ ) ही पंतोक्ति किती यथार्थ आणि सार्थ आहे, तें कळून येतें.

उपरिनिर्दिष्ट व्यक्तींच्या आंगचे सद्गुण व त्यांनीं केलेलीं हितपरिणामी कृत्यें यांचें आपणांस सदैव स्मरण व्हावें व त्यांचा इतिहास आपल्या मनःश्चक्षूंपुढें उभा राहावा ह्या हेतूनें आह्मी हा इतका विस्तार केला आहे. ज्या वस्तूंचीं वा व्यक्तींचीं चित्रें आपण दर्शनीय म्हणून पुढें ठेवितों त्यांच्या योगानें आपली मनोभूमि तयार होते व त्यांच्याकडे पाहून आपल्या मनाची चालना सुरू होते, या नियमास अनुसरून आमच्या वाचकांना आपल्या कर्तव्याचा मार्ग दिसून येईल व ते व्यवहारदक्ष होतील, अशी आशा आहे.

प्रस्तुत पर्वांत अशीं आणखीही उज्वल कथानकें व महनीय व्यक्तींचीं चरित्रें आहेत. पण त्या सर्वांसंबंधीं येथें ज्यास्त कांहीं लिहिणें शक्य नाहीं, कारण हा लेख अंदाजापेक्षां फारच मोठा झाला असून आतां हात आंखडता घेणें भाग आहे. म्हणून वाचकांनीं स्वतःच पंतकृति-जी त्यांनीं 'देतो पुत्रासि जसि पिता ठेवी' ( अध्याय २।२१ ) ह्या न्यायानें मोठ्या प्रेमानें व निरपेक्षबुद्धीनें आपल्या स्वाधीन केली आहे ती-वाचून तिच्यांतील बोधामृताचें पान करावें व काव्यरसाचा आस्वाद घ्यावा, अशी विनंति आहे.

शेवटीं—

**धर्मे मतिर्भवतु वः सततोत्थितानाम् ।**
**स ह्येक एव परलोकगतस्य बन्धुः ॥[१]**
( आदिपर्व, अध्याय २ श्लोक ३९१ )

ह्या व्यासोक्तीकडे आमच्या प्रियवाचकांचें नम्रतापूर्वक लक्ष वेधून प्रापंचिक अडचणीं-मुळें आम्हांस आलेल्या मनोदौर्बल्यांतून पार पडण्याचें सामर्थ्य पंतांसारख्या वागीश्वरांच्या कृपेनें लाधलें, हें कृतज्ञतापूर्वक नमूद करून व आम्ही वर जें काय लिहिलें आहे त्यांत कांहीं न्यूनाधिक्य आढळल्यास त्याबद्दल क्षमेची याचना करून वाचकांची तूर्त रजा घेतों.

चैत्र शुद्ध १५, शके १८५७
( श्रीमयूरपुण्यतिथि १४१ )

**दा० के० ओक.**

---

१. नेहमीं उत्थान ( पराक्रम ) करीत जा आणि असें करितांना तुमची बुद्धि धर्मांत ( स्थिर ) राहो; कारण परलोकीं गेल्यावर तुमचा तो एकच बंधु ( मित्र ) आहे.

*

# अनुक्रमणिका.

| अध्याय | विषय | ग्रंथ-संख्या | पृष्ठांक |
|---|---|---|---|
| ३३ | व्यास व पांडव यांची भेट व व्यास द्रौपदीचें पूर्ववृत्त सांगून तिच्या प्राप्तीसाठीं द्रुपदपुरास जावयास सांगतात ( १–८ ), पांडवांचें गंगातीरीं आगमन, वाटेंत अंगारपर्ण गंधर्व व पार्थ यांचें युद्ध, गंधर्वपराभव व त्याच्याकडून पार्थास चाक्षुषीविद्येची प्राप्ति ( ९–२६ ), अर्जुनगंधर्वसंवाद ( २७–३२ ), पांडवांस 'तापत्य' असें म्हणण्याचें कारण, व कुरुपिता संवरण व तपती यांची विवाहकथा ( ३३–५९ ). | ५९ | २४८–२५६ |
| ३४ | गंधर्व अर्जुनास वशिष्ठकथा सांगतो–विश्वामित्रकृत धेनुहरणप्रयत्न ( १–३२ ), विश्वामित्राचा उद्वेग व ब्राह्मण होण्याचा प्रयत्न ( ३३–४० ), कल्माषपादहस्तें वशिष्ठशतसुतनाश ( ४१–५१ ), वशिष्ठप्राणत्यागप्रयत्न ( ५२–५६ ), गर्भस्थ पौत्र पराशराची कथा व वशिष्ठमरणेच्छात्याग ( ५७–६३ ), कल्माषपादावर वशिष्ठाची कृपा ( ६४–६९ ), पराशर व तन्माता यांचा संवाद ( ७०–७४ ), वशिष्ठाचा पराशरास उपदेश ( ७५–८५ ), पराशरकृत राक्षससत्र ( ८६–८७ ), पुलस्त्याचें सत्रोपशमनार्थ पराशराशीं भाषण ( ८८–९४ ), गंधर्वानुमतें पांडव धौम्यास पुरोहित करितात ( ९५–१०१ ). | १०१ | २५६–२७२ |
| ३५ | पांडव द्रुपदपुरीस येऊन कुलालशाळेंत राहातात ( १–४ ), अनेक विप्र व नृप यांचें द्रौपदीच्या स्वयंवरार्थ आगमन ( ५–११ ), धृष्टद्युम्न द्रौपदीस सभेंत आणितो, सर्वांस पण जाहीर करितो व तीस सर्व राजे दाखवितो ( १२–२२ ), कृष्ण बळिरामास पांडव दाखवितो ( २३–२८ ), कर्ण-शिशुपाल-जरासंध-शल्यादिकांचे लक्ष्यभेदप्रयत्न व अपयश ( २९–४० ), अर्जुनकृत लक्ष्यभेद व द्रौपदीप्राप्ति ( ४१–५५ ), कर्णादींचा कोप व भीमार्जुनांचें कर्णशल्यादिकांशीं युद्ध व कर्णाचा पराभव ( ५६–७८ ), सभ्यजनजिज्ञासा ( ७९–८१ ), पांडवांसह द्रौपदी कुलालशाळेस जाते व कुंतीवचनानुसार ती पांच पांडवांची पत्नी होते ( ८२–९८ ). | ९८ | २७२–२८६ |
| ३६ | बळिराम, कृष्ण व पांडव यांची भेट व रामकृष्णांचें द्वारकेस परत जाणें ( १–१७ ), धृष्टद्युम्न कुलालगृहीं जाऊन | | |

# प्रस्तावना, उपोद्धात, परिशिष्टें वगैरे.



एकूण पृष्ठसंख्या—७४+३२८+६४=४६६.

# मोरोपंतकृत महाभारत.

## आदिपर्व.

( गीतिवृत्त. )

### अध्याय पहिला.

श्री[1]मत्सद्गुरु[2] नारद[3], वाल्मीकि[4], व्यास[5], शुक[6], कवीश[7], मनीं ।
आणुनि नमितों भावें, जे मोहतमाचिया[8] रवी शमनीं[9]. ॥ १

१. **पं**तांनीं रचिलेल्या **म**हाभारताच्या प्रत्येक पर्वाच्या पहिल्या गीतीचें प्रथमाक्षर घेऊन तीं सर्व अक्षरें एकापुढें एक अशीं लिहिलीं, तर **'श्रीपांडवसहायो भगवानरविंदाक्षो जयति'** असा एक अष्टादशाक्षरी संस्कृत मंत्र निष्पन्न होतो. अशा खुबीनें सर्व पर्वांचा आरंभ करून त्या सर्व पर्वांची एक माला गुंफून टाकिल्यासारखें **पं**तांनीं केलें आहे. हा मंत्र गुरुशिष्य-संप्रदायापैकीं नसून तो **पं**तांनीं स्वतः नवीन बनविलेला आहे, आणि **म**हाभारतांतील कथान-काला अनुरूप होईल असाच तो आहे. येथील 'श्री' हें प्रथमाक्षर देवतावाचक असल्यानें मंगला-चरणाच्या दृष्टीनेंही प्रशस्त आहे. २. पूज्य, भगवान् गुरु. **पं**तांनीं आपल्या गुरूंच्या नांवांचा उल्लेख आपल्या ग्रंथांत कोठें कोठें केला आहे:—'गुरु माझे श्री**राम**—श्री**म**त्केशव—**ग**णेश—**ह**रि चवघे' ( गंगावकिली—गीति १०९ ). श्री**राम** म्हणजे **पं**तांचे वडील, **रा**माजीपंत. **ह**रि म्हणजे **ह**रिभट **ब**रेरकर. हे **पं**तांचे सौंदळचे कुलोपाध्याय. ह्यांनींच **पं**तांचें उपनयन करून त्यांना ब्रह्मकर्म व विष्णुसहस्रनामादि स्तोत्रें शिकविलीं. तसेंच बाळबोध व मोडी अक्षर ह्यांच्याच देख-रेखीखालीं **पं**तांनीं घटविलें. **के**शव व **ग**णेश म्हणजे **पं**तांच्या वेळीं कोल्हापुरप्रांतांत आपल्या विद्वत्तेबद्दल गाजलेले **के**शव **पा**ध्ये व **ग**णेश **पा**ध्ये हे होत. ह्यांच्याजवळ पन्हाळगडास राहून **पं**तांनीं संस्कृत काव्यनाटकव्याकरणालंकारादि विषयांचें अध्ययन केलें. हे दोघेही **पा**ध्येबंधु मोठे निःस्पृही व नेमनिष्ठ होते. ३. ऋषिविशेष, ब्रह्मदेवाचा पुत्र. ४. ऋषिविशेष, रामायणाचा कर्ता. ५. ऋषिविशेष, महाभारताचा कर्ता. ६. ऋषिविशेष, व्यासास घृताची नामक अप्सरेपासून झालेला पुत्र. यानें परीक्षितिराजास भागवत सांगितलें. ७. कवि+ईश=कविश्रेष्ठ, मोठमोठे कवि ( कालिदास, भवभूति, माघ इत्यादि संस्कृत कवि व ज्ञानेश्वर, एकनाथ, दासोपंत इत्यादि मराठी कवि. ) ८. मोहरूप अंधकाराच्या. मोह=अज्ञान, अविद्या. ९. नाशाविषयीं.

[1]श्रीशश्रीकंठचरण नमितों, जे सर्वसे[2]वकस्वरग. ।
भलते हि [3]वर्ण होती [4]श्रुतिमत [5]यन्निष्ठ जेविं [6]सुस्वर-ग. ॥ २
नमिला [7]गजमुख, ज्याचे सेवुनि [8]मृदु [9]मधुर बोल कानांहीं, ।
चुंबुनि, शंभु म्हणे, 'बा ! तुजसम [10]आम्नाय बोलका नाहीं.' ॥ ३
नमितों सरस्वतीतें, जी [11]कविकीरांसि पढवुनी वदवी; ।
जीचा प्रसाद देतो [12]वाचस्पतिची [13]जडास ही [14]पदवी. ॥ ४
[15]गुरुभागवतवरेंद्रप्रेरित [16]कविमुदिर [17]भारताब्धिरसा ।
प्राशिति, तृप्त कराया [18]स्वरसें [19]सद्रसिकमंडळी-सु-रसा. ॥ ५
नमिला [20]वैशंपायन, सुखवी [21]जनमेजया [22]श्रवणसक्ता. ।
तैसा चि [23]लोमहर्षणनंदन [24]उग्रश्रवा हि '[25]जय'-वक्ता. ॥ ६
ऱ्यां [26]शौनकादि साधु श्रोते नमिले, जयांसि कानांहीं ।
दोहीं [27]पूर्ति नसे; जे म्हणति, 'अहा ! [28]हे [29]उदंड कां [30]नाहीं ?' ॥ ७

---

१. लक्ष्मीचा पति म्हणजे विष्णु आणि महादेव यांचे चरण. श्री=शोभा. महादेवानें विष प्राशन केल्यामुळें त्याचा कंठ नीलवर्ण झाला व त्यास विशिष्ट प्रकारची शोभा आली म्हणून महादेवास 'श्रीकंठ' असें नामाभिधान प्राप्त झालें. २. सेवकांचे कल्पतरु. स्वर्+अग=स्वर्ग+वृक्ष=कल्पवृक्ष. ३. अक्षरें; (पक्षीं) जाती. ४. कर्णमधुर. (पक्षीं) वेदांस मान्य. **श्लेषालंकार.** ५. ज्यांची भक्ति करणारे. ६. सुस्वर+ग=उत्तम स्वरांत असलेले (गायिलेले). ७. गजानन. ८. कोमल. ९. गोड. १०. वेद. ११. कविरूप पोपटांस. १२. गुरूची, बृहस्पतीची. १३. बुद्धिमंदास, मूर्खास. १४. स्थान, योग्यता. १५. गुरु व भगवद्भक्त यांच्या वररूप इंद्रानें प्रेरणा केलेले. १६. कविरूप मेघ. १७. मूळ भारतरूप समुद्राच्या उदकास. मूळ भारत संस्कृतांत आहे, म्हणून प्राकृत जनांस तें समजत नाहीं. परंतु ही अडचण दूर करावी म्हणून पंतांनीं त्याचें रूपान्तर मराठी भाषेंत केलें आहे. १८. स्वकीय जलानें. (पक्षीं) शृंगारादि नवरसांतील प्रत्येकानें. १९. सत्+रसिक+मंडळी+सु+रसा=चांगले मार्मिक लोक हीच कोणी सुपीक जमीन. रसा=पृथ्वी. २०. ऋषिविशेष. हा इतिहास सांगण्यांत चतुर होता. २१. राजाविशेष. अर्जुनाचा पौत्र, आणि परीक्षितीचा पुत्र. २२. ऐकण्याविषयीं तत्पर अशा जनमेजयास. २३. लोमहर्षण=पुराणवक्ता सूतनामक ऋषि. २४. लोमहर्षणाचा पुत्र. यासच पुढें 'सौति' असें म्हटलें आहे. २५. जय म्हणजे भारत, तें सांगणारा (उग्रश्रवा). जय=महाभारत–असा अर्थ संस्कृत महाभारतावरील टीकाकारांनीं दिलेला आहे. पंतांनीं देखील आपल्या भारताच्या निरनिराळ्या पर्वांत ह्या शब्दाची योजना 'महाभारत' ह्याच अर्थीं केलेली आहे. २६. ऋषिविशेष. (भृगुकुलोत्पन्न रुरूचा पौत्र, व शुनकाचा पुत्र.) २७. पूर्तता, तृप्ति. २८. कान. २९. पुष्कळ. ३०. येथें 'नाहींत' असें अनेकवचनी रूप असावयास पाहिजे होतें.

हरि ज्यांचा कैवारी, त्या पांडुसुतांसि वंदितों भावें. ।
वाटे, चरित्र त्यांचें कांहीं आपण तरावया गावें. ॥ ८
व्यासकृत **महाभारत** लक्ष ग्रंथें[2] प्रसिद्ध हा भारी. ।
आर्यावृत्तें[3] रचितों; स्वल्पांत[4] चि आणितों कथा सारी. ॥ ९
श्रीरामनाममंत्र[5], श्रितचिंतामणि[6], करील हें पूर्ण; ।
चूर्ण[7] प्रत्यूहांचें[8]; रसिकांचें चित्त ही सुखी तूर्ण[9]. ॥ १०
नैमिषवनांत[10], शौनककुलपतिच्या[11] द्वादशाब्दिकीं[12] सत्रीं[13] ।
गेला सौति[14], अलि[15] जसा कमळीं सद्गंधसद्रसामत्रीं[16]. ॥ ११
नमुनि मुनींतें, अंजलि जोडुनि विनयें, तपःसमृद्धि[17] पुसे. ।
ते ऋषि त्यासि सुखविती, प्रणतासि[18] मधुस्मराद्यसद्रिपुसे[19]. ॥ १२
'कमलदलाक्षा[20] सौते ! साधो ! कोठोनि पातलासि[21] ? कसें ? ।
कोठें क्रमिलें[22] बा त्वां ?' पुसिलें एकें द्विजें[23] तयासि असें. ॥ १३

---

१. सातव्या गीतीच्या पूर्वार्धांतील 'जयांसि' व उत्तरार्धांतील 'जे' आणि आठव्या गीतीच्या पूर्वार्धांतील 'ज्यांचा' ह्या शब्दांचा संबंध 'त्या पांडुसुतांसि' ह्या शब्दांशीं आहे. २. एक ग्रंथ=बत्तीस अक्षरें. ३. आर्याछंदानें. **पं**तांनीं ज्या वृत्ताला 'आर्यावृत्त' म्हटलें आहे, तें वास्तविक पाहतां गीतिवृत्त होय. गीतीचें लक्षण 'वृत्तदर्पणां'त '**गीती**च्या प्रथमपदीं द्वादश मात्रा, तशाच तिसऱ्याला; । दुसऱ्या पादीं अठरा मात्रा असती, तशाच चवथ्याला.॥' असें दिलें आहे. आर्येचें लक्षण '**आर्ये**च्या प्रथमपदीं द्वादश मात्रा, तशाच तिसऱ्याही; । अष्टादश दुसऱ्याला, आणिक चवथ्यास पंचदश. ॥' असें आहे. यांत भेद इतकाच कीं, गीतीच्या प्रत्येक अर्धांत तीस तीस मात्रा असतात; आर्येच्या पहिल्या अर्धांत तीस व दुसऱ्यांत सत्तावीस असतात. ४. **पं**तांच्या भारतांत एकंदर १७१३३ गीति आहेत. ५. श्रीरामाचें नांव हाच मंत्र. ६. आश्रितांस चिंतामणीसारखा. चिंतामणि=इच्छित वस्तु देणारा मणि. ७. चुराडा. ८. विघ्नांचें. ९. लवकर. १०. हें वन नर्मदेच्या उत्तरेस व कुरुदेशाच्या पश्चिमेस होतें. ११. कुलपति= आश्रमाचा मुख्य ऋषि. 'मुनीनां दशसाहस्रं योऽन्नदानादि पोपणात् । अध्यापयति विप्रर्षिरसौ कुलपतिः स्मृतः.' १२. बारा वर्षांच्या (बारा वर्षांनीं संपणाऱ्या). १३. यज्ञांत. १४. सूताचा पुत्र. १५. भ्रमर. १६. उत्तम गंध आणि उत्तम रस यांच्या पात्रांत. अमत्र=पात्र, भांडें. १७. तपोवृद्धि. १८. नम्र झालेल्यास. १९. मधु+स्मर+आदि+असत्+रिपु+से=मधुदैत्य आणि मदन आदिकरून दुष्टांचे शत्रु (हरिहर) यांच्यासारखे. 'मधुदैत्य, मदन [यांचे] रिपु विष्णुशिवसे'— **पंत.** २०. कमलपत्रनयना. २१. आलास. २२. वेळ घालविलास. २३. ब्राह्मणानें.

सांगे सुवृत्त विनयें त्यांतें, अंजलि करूनियां, तो तों; ।
'[1]अहिसत्रीं जनमेजयराजर्षीच्या समीप मी होतों. ॥ १४
वैशंपायनवदनें, [2]व्यासरचितभारतेतिहासाचें ।
घडलें श्रवण; [3]नृलोकीं प्याला [4]पीयूष [5]दासें हो [6]साचें. ॥ १५
मग मी तीर्थें, क्षेत्रें, [7]पुण्यारण्यें, विलोकिता झालों; ।
[8]कुरुपांडवरण-मख-महि पाहोनि, तुम्हां पहावया आलों. ॥ १६
आज्ञा द्याल, तरि सुखें सांगेन [9]रुचेलें जें तुम्हां, स्वामी ! ।
[10]गंगातर्पण [11]गांगें, हें इच्छितसें तसें अहो बा ! मी. ॥ १७
ऋषि म्हणति, '[12]महाभारतपीयूष तुवां यथेष्ट पाजावें; ।
चंद्र चकोरांत जसा, तैसें आम्हां द्विजांत [13]साजावें. ॥ १८
[14]विश्वगुरुप्रति वंदुनि तो सौति सुखें करी [15]तदारंभीं; ।
'त्या रसिकांत [16]मुनीची [17]मनोरमाकृति गमे तदा [18]रंभा. ॥ १९
इतिहास साठ लक्ष व्यासें स्वमनीं च योजिला पहिला; ।
मग [19]विधिनें वर दिधला; [20]गणनाथें [21]भक्तवत्सलें लिहिला. ॥ २०
त्यांतूनि तीस लक्ष [22]त्रिदशांला, पंधरा चि पितरांला, ।
गंधर्वांला चौदा, एक [23]सुमनुजां दिला, न इतरांला.' ॥ २१
सांगे मुनीश्वरांला एकशतसहस्र [24]संहितों सौती. ।
[25]श्रुतिगंगासुरभींच्या त्या त्या [26]सुगुणें-करूनि ज्या [27]सौती. ॥ २२

---

१. सर्पसत्रामध्यें. २. व्यासकृत भारत या इतिहास-ग्रंथाचें. ३. मनुष्यलोकीं. ४. अमृत. ५. मी स्वतः, अर्थात् सौती. ६. खरें. ७. पवित्र अरण्यें. ८. कौरवपांडवांच्या रणयज्ञाची जागा, अर्थात् कुरुक्षेत्र. 'कुरुपांडवरणभूमी' असें पाठान्तर. ९. 'रुचेल तें' असें पाठान्तर. १०. गंगेमध्यें तर्पण जसें. ११. गंगोदकानें. १२. महाभारतरूप अमृत. १३. शोभावें. १४. जगद्गुरूस, जगांत श्रेष्ठ असा जो परमेश्वर, त्यास. १५. महाभारताच्या आरंभास. १६. शौनकाची. १७. (ऋषिपक्षीं) मनोरमा (मन जींत गुंग होतें अशी) कृति=विद्येसंबधीं जें कर्म ती, अर्थात् ग्रंथरचना; (रंभापक्षीं) मनोरमा+आकृति=सुंदर मूर्ति. श्लेषालंकार. १८. अप्सराविशेष. १९. ब्रह्मदेवानें. २०. गणपतीनें. २१. भक्तांविषयीं दयाळू असा जो (गणपति), त्यानें. २२. देवांना. २३. उत्तम मनुष्यांना. २४. ग्रंथ. २५. वेद, गंगा आणि कामधेनु यांच्या. २६. ज्ञान, पवित्रता व इष्टकामनासिद्धि हे अनुक्रमें गुण त्यांनीं. २७. सवती; अर्थात् प्रतिस्पर्धा करणाऱ्या.

# अध्याय दुसरा.



पारीक्षित[1] जनमेजय बहुवार्षिक[2] सत्र[3] करि कुरुक्षेत्रीं[4]. ।
सत्रांत श्वा[5] येतां, जनमेजयबंधु[6] ताडिती वेत्रीं[7]. ॥ १
तो सुरशुनीसुत[8] तिला[9], गेला रोदन करीत, सांगाया. ।
सरमा[10] म्हणे नृपाला, "त्वां केला व्यर्थ दंड कां गा ! या[11] ? ॥ २
म्हणतो, 'नाहीं शिवलों दृष्टिकरुनि[12] ही धराधवा[13] ! हविला[14].' ।
कां धर्म[15] व्यर्थ तुवां, गांजुनि हा निरपराध, वाहविलों[15] ? ॥ ३
अघ[16] न करितां हि दंडुनि माझ्या पुत्रास, मज दिला तापें[17]; ।
तरि तुज अतर्कित[18] चि भय येईल." असा तिणें दिला शाप. ॥ ४
देउनि शाप, क्रोधें जातां तेथूनि सुरशुनी[19] सरमा, ।
झाला विषादभाजन[20] नृप; चिंता त्यास लागली परमा[21]. ॥ ५
सत्रसमाप्ति करुनि, तो गेला मग हस्तिनापुरा राजा, ।
चिंता करी बहु; म्हणे, 'कोण निवारील शाप हा माजा[22] ?' ॥ ६
त्यावरि नृप मृगयेला[23] गेला असतां सदाश्रमा[24] पाहे; ।
नामें श्रुतश्रवा मुनि जेथें निरुपम[25] तपोनिधी राहे. ॥ ७
सोमश्रवा तयाचा सुत, तेजस्वी सुविद्य[26], त्याहूनी[27]. ।
राजा बहु आनंदे, त्या दोघां आश्रमांत पाहूनी. ॥ ८
नमुनि[28] मुनीस म्हणे नृप, 'नंदन सोमश्रवा तुझा, स्वामी ! ।
हो[29] मंत्रपुरोहित[30]; तुला वरदा[31] ! वर दास मागतों हा मी.' ॥ ९

---

१. परीक्षितीचा पुत्र. २. फार वर्षें चालणारें. ३. यज्ञ. ४. देशविशेष. (यांत कौरव-पांडवांचें युद्ध झालें होतें. याची राजधानी हस्तिनापुर.) ५. कुत्रा. ६. श्रुतसेन, उग्रसेन आणि भीमसेन हे. ७. वेताच्या काठीनें. ८. देवांची कुत्री जी सरमा, तिचा पुत्र. ९. सरमेला. १०. देवांच्या कुत्रीचें नांव. ११. या पुत्राला. १२. डोळ्यांनींही. १३. हे पृथ्वीपते. १४. होमद्रव्याला. १५. धर्म वाहविला=केलेला धर्म फुकट जाऊं दिलास. १६. पातक, अन्याय. १७. संताप. १८. अकस्मात्; ज्याची कल्पना करावयास येत नाहीं असें. १९. देवांची कुत्री. २०. चिंताक्रांत. २१. मोठी. २२. माझा. २३. शिकारीला. २४. मुनींच्या उत्तम वसतिस्थानास. २५. ज्यास उपमा नाहीं असा, अद्वितीय. २६. उत्तम विद्वान्. २७. 'बापसे बेटा सवाई' असा. २८. 'नमुनि

तो मुनि म्हणे, 'नृपाळा ! जें माझें गलित शुक्र[1] तें व्याली[2] ।
प्याली, या तेजस्विप्रवरा[3] मन्नंदनासि[4] ते व्याली[5]. ॥ १०
हा सर्व पापकृत्या[6] नाशील; न एक शंभुची कृत्या[7]; ।
रक्षील आश्रितासि व्यसनीं[8]; हर रक्षितो जसा भृत्या[9]. ॥ ११
व्रत[10] याचें एक असे, जो जें मागेल तें तया द्यावें; ।
हें चालविशील तरी स्वपुरोहित करुनियां सुखें[11] न्यावें.' ॥ १२
मान्य[12] करूनि, नृपें तो वंदुनि सोमश्रवा पुरा नेला. ।
भ्रात्यांतें हितबोध स्वपुरोहितवाक्यपालनीं[13] केला. ॥ १३
तक्षशिलादेशातें[14] जाउनि, जिंकोनि, वश[15] करी राजा, ।
दावी शत्रुजनीं बळ, दावित होता जसा पिता[16], आजा[17]. ॥ १४
होता धौम्य मुनी. त्या शिष्य तिघे, ज्यांसि गुरुपदीं च रुची. ।
उपमन्यु एक, दुसरा आरुणि, तिसरा हि वेद; सर्व शुची[18]. ॥ १५
गुरु आरुणिला सांगे, 'शालिक्षेत्रांत[19] सर्व जल जातां ।
नाशेल बीज, म्हणउनि रोधावा मार्ग वारिचा[20] बा ! त्वां[21].' ॥ १६

---

श्रुतश्रव्यातें सांगुनि निजवृत्त नृप म्हणे, 'स्वामी ! ।' असा पाठभेद आहे. २९. होवो. ३०. माझा पुरोहित. ३१. हे वरदात्या.

१. वीर्य. २. सर्पिणी. ३. तपस्विश्रेष्ठाला. ४. माझ्या पुत्रास. ५. प्रसवली. ६. पापकर्मे. 'पापकृत्यां' असें पाठान्तर. ७. एक तामसी देवता. शंभुची कृत्या एक (एकटीच) [पापकृत्या] न [नाशील], [तर] हा (सोमश्रवा) [देखील] सर्व पापकृत्या नाशील—असा अन्वय. कृत्येप्रमाणेंच हा सोमश्रवा देखील सर्व पापकर्मांचा नाश करूं शकतो—असा भाव. किंवा—हा सर्व पापकृत्या नाशील, न (नाहीं तर) एक शंभुची कृत्या [पापकृत्या नाशील.] म्हणजे सोमश्रवा व कृत्या ह्या दोघांशिवाय तुझें पापकृत्य नाशावयास दुसरा कोणी समर्थ नाहीं—असा इत्यर्थ. ८. संकटांत. ९. दासाला, भक्ताला. १०. जो (जो कोणी ) जें (जें कांहीं) मागेल तें तया द्यावें [असें] याचें एक व्रत असे—असा अन्वय. हा वाटेल त्याला वाटेल तें देईल—असा इत्यर्थ. ११. 'स्वयें' असें पाठान्तर. १२. श्रुतश्रव्याचें भाषण मान्य करून. १३. आपल्या पुरोहिताचें वचन पाळण्याबद्दल. १४. तक्षशिला ही गांधारदेशाची राजधानी. गांधारदेश म्हणजे सध्यांचें कंदाहार. १५. वश= अधीन. जनमेजय तक्षशिला देशाच्या राजाला वश करी (करिता झाला), म्हणजे—जनमेजयानें त्या देशाच्या राजाला आपलें सार्वभौमत्व मान्य करावयास लाविलें—असा भावार्थ. १६. बाप परीक्षिति. १७. आजा अभिमन्यु. १८. शुद्ध. सर्व शिष्य सच्छील होते—असा भाव. १९. साळीच्या (भाताच्या) शेतांत. २०. उदकाचा. २१. त्वां. पंतांच्या काळीं 'त्वां' ह्या शब्दाबद्दल

दुर्जयजलप्रवाहें आरुणिकृत सेतुबंधशत[1] नेलें. ।
श्रीगुरुनें योगबळें[2] शिष्यपरीक्षार्थ तें तसें केलें. ॥ १७
दुर्वारवारिमार्गीं[3] मग रचिलें शीघ्रं[4] आपुलें गात्र[5]; ।
आरुणि म्हणे, 'न नासो गुरुशालिक्षेत्र एक हें मात्र.' ॥ १८
शिष्यांप्रति धौम्य पुसे, 'आरुणि कोठें?' करूनि ते प्रणती[6] ।
'केदारखंडबंधन[7] आज्ञापुनि, धाडिला तुम्हीं,' म्हणती. ॥ १९
जाउनि केदाराप्रति आपण शिष्यासि धौम्य तो पाहे. ।
धेनु जशी निजवत्सा 'एहि[8], क्कास्यारुणे[9]!' असें बाहे[10]. ॥ २०
गुरुशब्द श्रवण करुनि, आरुणि धांवूनियां, धरी चरण. ।
पुसतां स्ववृत्त सांगे, तें करि मुनिचित्तवृत्तिचें हरण. ॥ २१
गुरुधान्यक्षेत्राहुनि ज्या ज्ञानक्षेत्र ही उणें काय[11], ।
त्या श्रीगुरुप्रसादस्वर्द्रुममूलाश्रिता[12] उणें काय? २२
त्या कर्में 'उद्दालक[13]' नाम, शिरीं पाणिपद्म[14] ही, ठेवी. ।
त्यासि वराशी[15] दे तो, देतो पुत्रासि जसि पिता ठेवी[16]. ॥ २३
झाला गुरुप्रसादें लोकत्रयमान्य[17] आरुणि कवि-वर. ।
छात्रीं[18] नुरवि तिळ हि खळदृष्टिसि गुरुराज कारुणिक[19] विवर[20]. ॥ २४
ज्ञानामृतें[21] भरुनि तो स्वस्थाना, जेविं मेघ जलधीनें[22], ।

---

'तां' असा प्रयोग करीत असत, असें दिसतें. अशा प्रकारचे प्रयोग पंतांच्या काव्यांत बरेच आढळतात.

१. पाण्याच्या ओघाला प्रतिबंध होण्याकरितां घातलेले शेंकडों बांध. २. योगसामर्थ्यानें. ३. अडवून धरण्यास कठीण अशा पाण्याच्या मार्गांत. ४. लवकर. ५. शरीर. ६. नमस्कार. ७. शेतास बांध घालणें. ८. ये. ९. क्क असि आरुणे=हे आरुणे! कोठें आहेस?. १०. हांक मारी. ११. ज्ञानोत्पादक क्षेत्र (शेत)च असें शरीर. १२. गुरुप्रसन्नतारूप कल्पवृक्षाच्या मूळाचा आश्रय करणाऱ्याला. १३. 'विदारण करणारा' असा ह्या शब्दाचा मूलार्थ आहे. १४. हस्तकमल. १५. उत्तम आशीर्वाद. १६. ठेव, राखून ठेविलेली संपत्ति. 'त्यासी आशी देतो, देतो पुत्रा जशी पिता ठेवी' असा पाठभेद आहे. १७. स्वर्ग, मृत्यु व पाताळ या तीन्ही लोकांस मान्य. १८. शिष्याचे ठायीं. १९. दयाळू. २०. छिद्र (दोष). दुष्टांना आढळून येईल असा एकही दोष धौम्यानें आरुणीच्या ठिकाणीं राहूं दिला नाहीं—असा भाव. २१. ज्ञानरूप अमृतानें. २२. समुद्रानें.

पाठविला, निववाया जग, त्या गुरुनें दयाविमलधीनें[1]. ॥ २५
उपमन्यु गुरुनिदेशें[2] धेनु वनामाजि सर्वदा रक्षी; ।
सूर्यास्तीं घेउनि ये; त्यातें गुरु, चरण वंदितां, लक्षी. २६
धौम्य म्हणे, 'रे वत्सा! भ्रमसि[3] वनीं, तदपि[3] दिससि तूं मोटा!' ।
उपमन्यु म्हणे, 'येउनि[4], भिक्षा मागोनि, तर्पितों[5] पोटा.' ॥ २७
'न निवेदितां[6] मला त्वां भिक्षा भक्षूं नये.' म्हणे धौम्य. ।
आज्ञा माथां वाहे; तैसें[7] चि करी गुरूक्त[8] तो सौम्य[9]. ॥ २८
भैक्ष्य[10] निवेदी जें तें सर्व हि घे नित्य गुरु, जसा खोटी[11]; ।
पुनरपि पुसे तयाला, 'वत्सा! दिसतोसि तूं बरा मोटा!' ॥ २९
'दुसरी भिक्षा खातों' ऐसें कथितां, म्हणे गुरु, 'प्राज्ञा! ।
अन्याय हा, न करणें परवृत्त्यवरोध[12]; हे असे आज्ञा.' ॥ ३०
भिक्षाहारनिवारण केल्यावरि ही, दिसे बरा[13] तुष्ट; ।
म्हणुनि उपाध्याय पुसे, 'वत्सा! आहेसि तूं कसा पुष्ट[14]?' ॥ ३१
उपमन्यु म्हणे, 'स्वामी! धेनूंच्या[15] सेवितों वनीं दुग्धा.' ।
धौम्य म्हणे, 'तुज आज्ञा नसतां करिसी असें कसें? मुग्धा[16]!' ॥ ३२
आज्ञा धरी शिरीं, परि उपमन्यु दिसे तथापि तो पीन[17]. ।
पुनरपि पुसे गुरु; मनीं कीं, 'मी सर्वस्व यासि ओपीन[18].' ॥ ३३
शिष्य म्हणे, 'स्तनपानीं, वत्समुखीं ये तया चि फेंसाचें ।
प्राशन करितों; स्वामी! कारण या पीनतेसि हें साचें.' ॥ ३४

---

१. दयेनें ज्याची बुद्धि शुद्ध (कपटरहित) झाली आहे अशा गुरूनें. २. गुरूच्या आज्ञेनें. ३. अरण्यांत फिरतोस तरी. 'तदपि दीससी मोटा' असें पाठान्तर. ४. नगरांत येऊन. ५. संतुष्ट करितों. ६. अर्पण करितां. ७. गुरूनें सांगितल्याप्रमाणें (पूर्वार्ध पहा). ८. गुरूची आज्ञा. ९. सात्विक वृत्तीचा, सदय, अनुग्र. १०. भिक्षान्न. ११. ढोंगी, कपटी. १२. दुसऱ्याच्या उपजीविकेस अडथळा. १३. 'दिसेचि बहु पुष्ट' असें पाठान्तर. १४. 'तुष्ट' असें पाठान्तर. १५. 'धेनूच्या' असें पाठान्तर. १६. मूढा, मूर्खा. १७. पुष्ट. १८. अर्पण करीन. उपमन्यूची गुरुभक्ति पाहून, धौम्य प्रसन्न होऊन म्हणतात कीं, मी याला माझें सर्वस्व अर्पण करीन–असा भाव.

‘हे[1] वत्स सुगुण, सकरुण, आत्मविभागीं करूनियां तोटा ।
देताति फेनपा[2]! तुज फेन बहु; अहा! अधर्म हा मोटा.’ ॥ ३५
देशिकें[3] ऐसें सांगे; ‘न करीन’ असें ‘पुन्हा’ म्हणे; तो भी[4]. ।
जठराग्निप्रशमार्थी[5] उपमन्यु तसें करी, नव्हे लोभी. ॥ ३६
मग धेनु चारितां तो क्षुद्विकळ[6] वनांत अर्कतरु[7] लक्षी. ।
त्याचीं पत्रें प्राज्य[8] क्षीर स्रवती[9] म्हणोनि बहु भक्षी. ॥ ३७
त्यांच्या तीक्ष्णविपाकें[10] झाला तत्काळ अंध; कूपांत[11] ।
आश्रमपदासि येतां पडला उपमन्यु घोररूपांत[12]. ॥ ३८
आल्या धेनु, न आला शिष्य, म्हणुनि त्यासि गुरु वनीं हुंडकी[13]; ।
‘एक’ म्हणे[14] ‘लेवविली, हा! घडितां सांडिली दुजी कुंडकी[15].’ ॥ ३९
‘एहि[16], क्वास्युपमन्यो[17]! वत्स!’ अशी हाक फोडितां थोर, ।
श्रवण करुनि उत्तर दे, दूरुनि तो, तोयदा[18] जसा मोर. ॥ ४०
‘स्वामी! हा मी आहें, कूपीं पडलों[19] पथीं न लक्षूनी; ।
झालों अंध स्वकृतें[20], अर्कार्द्रदळें[21] यथेष्ट भक्षूनी.’ ॥ ४१

---

१. हीं वांसरें. हे वत्स सुगुण [व] सकरुण [असल्यामुळें ते] आत्मविभागीं तोटा करूनियां, हे फेनपा! तुज बहु फेन देताति—असा अन्वय. ‘वत्स’ (=गोवत्स) हा शब्द संस्कृतांत पुल्लिंगी आहे. २. [दुधाचा] फेंस प्राशन करणाऱ्या! ३. गुरु. ४. भ्याला. ‘न करीन असें म्हणे, न मनिं तो भी’ असें पाठान्तर. ५. केवळ पोटाची आग (भूक) शांत करूं इच्छिणारा. ६. क्षुधेनें व्याकुळ. ७. रुईचें झाड. ८. पुष्कळ. ९. चीक प्रसवतात, चीक टाकतात. क्षीर=दूध. १०. भयंकर परिणामानें. ११. विहिरींत. पूर्वार्धाच्या शेवटीं ‘अंध कूपांत’ व उत्तरार्धाच्या शेवटीं ‘घोर कूपांत’ असे पाठ आहेत. त्यांस अनुसरून पुढीलप्रमाणें अर्थ होईल:—रुईचीं पानें खातांच तो कुंपणांतल्या कुंपणांत आंधळा झाला व आश्रमास परत येत असतां तो भयंकर विहिरींत पडला. कूप=(१) कुंपण, (२) विहीर—असे अर्थ आहेत. अंध-कूप=खोल विहीर. १२. भयंकर स्वरूपाच्या कूपांत (विहिरींत). १३. शोधी. १४. ह्याचा कर्ता—धौम्य. १५. कर्णभूषण. (एक आरुणिरूप कुडकी कर्णांत घातली, म्हणजे आरुणि कसास उतरला; पण दुसरी उपमन्युरूप कुडकी तयार होत असतांनाच सांडली, असा भावार्थ.) १६. ये. १७. क्व असि उपमन्यो?=हे उपमन्यो! [तूं] कोठें आहेस? १८. मेघाला. १९. ‘कूपीं पडलों पथा न लक्षूनी’ असा पाठ येथें असता तर अर्थ स्पष्ट झाला असता. पथीं न लक्षूनि=रस्त्यांत न दिसल्यामुळें. २०. आपल्याच कर्मानें. २१. रुईचीं ओलीं पानें ‘अर्क-द्रुदळें’ असें पाठान्तर. द्रु=द्रुम, झाड.

'तुज दृष्टि अश्विनीसुत[1] देतील, स्तुति करीं.' असें शिकवी. ।
परते करुणाघन[2] गुरु, शिष्यक्षेत्रांत संयशें[3] पिकवी. ॥ ४२
स्तवितां चि भेटले गुरुभक्ताला देववैद्य नासत्य. ।
व्यसनीं[4] गुरूपदेश चि रक्षी, दुसरा न, या जना, सत्य. ॥ ४३
जो भक्षी अर्कांचा, दास्यीं[5] वागावया वपू[6], पाला; ।
सत्व पहाया देती, त्या क्षुधिताच्या करीं, अपूपाला[7]. ॥ ४४
उपमन्यु म्हणे, 'गुरुला पुसिल्यावांचोनि, या अपूपा मी ।
खाया उत्साह मनीं पावत नाहीं, दया करा; स्वामी !' ॥ ४५
'अस्मद्वचनें, आम्ही देतां चि, अपूपसेवना, सत्य, ।
पूर्वीं करिता झाला त्वद्गुरु ही,' म्हणति देव नासत्य. ॥ ४६
तदपि, तसें चि विनवितां, गुरुभक्तप्रेमविगलदस्रांनीं[8][9], ।
देऊनि आत्मदृष्टि हि, केला तो बहुकृतार्थ दस्रांनीं[10]. ॥ ४७
'त्वद्गुरुचे कार्ष्णायस[11] दंत, हिरण्मय[12] तुझे, असोत' असें[13] ।
वदले दस्र; 'तदर्थ[14] स्वगुरुपरिस होउनी कृतार्थ[15] असें[16]. ॥ ४८
ब्रह्मज्ञ[17] गुरु नसे, परि तूं भक्तिबळेंकरूनि होशील. ।

---

१. अश्विनीकुमार (देवांचे वैद्य.) २. दयेचा मेघ. ३. चांगली कीर्ति. विद्यार्थीरूपी क्षेत्रांत (उपमन्यूशिवाय इतर शिष्यांच्या समुदायांत) कीर्तिरूप (उपमन्यूचें यश हेंच) बीज पेरून, अर्थात् उपमन्यूनें अत्यंत निष्ठापूर्वक केलेल्या आज्ञापरिपालनासंबंधीं वर्तमान शिष्यांस सांगून त्याच्या (उपमन्यूच्या) कीर्तीचा प्रसार गुरुजी करिते झाले—असा भाव. ४. संकटसमयीं. या जना (ह्या सर्व लोकांना, जगाला) व्यसनीं गुरूपदेश चि रक्षी, दुसरा [कोणी] न [रक्षी], [हें] सत्य [होय]—असा अन्वय. हें गीत्यर्ध सुभाषितरूप आहे. ५. सेवाकर्मामध्यें, सेवककृत्यांत. 'दास्या' असें पाठान्तर. दास्या=सेवा करण्यासाठीं. ६. शरीर. वपू वागावया=शरीर नीट चालावें म्हणून, प्रकृति चांगली राहावी ह्या हेतूनें. ७. अनरशाला. ८. गुरुभक्त उपमन्यूवरील प्रेमानें स्रवमाण होत आहेत नेत्रोदकें ज्यांचीं, असे जे (अश्विनीकुमार) त्यांनीं. ९. 'गुरुभक्तिप्रेमविगलदस्रांनीं' असें पाठान्तर. अस्र=अश्रु, नेत्रोदक. '**अस्रः** कोणे कचे पुंसि क्लीबाश्रुणि च शोणिते' इति मेदिनी. १०. अश्विनीकुमारांनीं. ११. पोलादी. 'कालायस' असें पाठान्तर. कालायस=काळ्या लोखंडाचे. १२. सुवर्णाचे. १३. या प्रकारें. १४. त्याकरितां, त्या बाबतींत. १५. धन्य. १६. अस, रहा. १७. गुरु ब्रह्मज्ञ नसे, परि तूं भक्तिबळेंकरूनि (भक्तिबळाच्या जोरावर) [ब्रह्मज्ञ]होशील—असा अन्वय. 'भक्तिबळें कृतार्थ होशील' असा पाठभेद.

गुरुभक्त धन्य तूं चि; च्छळ कोण असा अधन्य सोशील?' ॥ ४९
उद्धरुनि देव गेले. मग तो उपमन्यु गुरुपदीं लागे. ।
पुसतां, झालें वृत्त, प्रांजलि होऊनि, सर्व ही सांगे. ॥ ५०
धौम्य म्हणे, 'तुज यावें शास्त्रांसह [1]कंठपाठ वेदांनीं; ।
हो [2]धन्य, मज वरांच्या, प्रेमभरें, किमपि नाठवे, दानीं. ॥ ५१
जें [3]आश्विनेय वदले, त्या कल्याणासि पात्र होसील. ।
[4]शिष्यचकोरांसि तुझा अमृतें [5]मुखचंद्र नित्य पोसील.' ॥ ५२
हे उपमन्युपरीक्षा. वेदपरीक्षा हि आयका आतां. ।
[6]गुरुसेवासुकृतफळप्राप्ति गुरूपासकां असे गातां. ॥ ५३
'कांहीं काळ करावी [7]शुश्रूषा, [8]श्रेय पावशील,' असी ।
आज्ञा करि गुरु, लावी [9]सेवनशाणीं [10]गुणार्थ [11]शिष्यें-असी. ॥ ५४
[12]गुरुसदनीं वेद जसा, [13]विषयीं हि तसा न देह राबेल. ।
[14]तो दास्यरूप वाहे त्या नित्य, चुकों न दे, हरा बेल. ॥ ५५
गुरुसदन अमृतसागर, त्यामाजि [15]तरंगवृंद तें कृत्य. ।
मोटें लहान न म्हणे, सेवी [16]भवदावदग्ध तो [17]भृत्य. ॥ ५६

---

१. तोंडपाठ. २. (धौम्य म्हणतात) हे उपमन्यु! तूं धन्य हो. वरांच्या दानीं मज प्रेमभरें किमपि नाठवे–असा अन्वय. तुझ्याविषयीं माझ्या मनांत असलेल्या प्रेमातिशयामुळें, वर देण्याच्या बाबनींत मला कांहींच आठवत नाहीं म्हणजे तुला कोणते वर द्यावे, हेंच मला सुचेनासें झालें आहे–असा भाव. सारांश, उपमन्यूची निष्ठा पाहून गुरुजी अत्यंत प्रसन्न झाले. ३. अश्विनीकुमार. ४. शिष्यरूप चकोरपक्ष्यांस (हा पक्षी चंद्रांतून स्रवणाऱ्या अमृतावांचून दुसरें कांहीं भक्षण करीत नाहीं, असा कविसंकेत आहे.) ५. मुखरूप चंद्र. ६. गुरुसेवेनें मिळणाऱ्या पुण्यरूप फलाची प्राप्ति. गुरूपासकां (गुरूची सेवा करणाऱ्यांस) गातां (त्यांची कीर्ति वर्णन केली असतां) गुरुसेवासुकृतफळप्राप्ति असे (असते, प्राप्त होते)–असा अन्वय. ७. सेवा. ८. कल्याण. ९. सेवारूप साहाणेवर. १०. गुणांची परीक्षा करण्यासाठीं. ११. शिष्यरूप खड्ग. 'शिष्यासी' असें पाठान्तर. १२. गुरूच्या घरीं. १३. 'विषयीं तैसा न देह राबेल' असें पाठान्तर. १४. तो ( वेद ) दास्यरूप बेल त्या हरा (त्या धौम्यगुरुरूपी शंकराला) नित्य वाहे. [कधींही] चुकों न दे–असा अन्वय. येथील **उपमा** हृदयंगम आहे. हें गुरुसेवेचें वर्णन **पं**तनिर्मित आहे. १५. लाटांचा समुदाय. 'वृंद' हा शब्द संस्कृतांत पुल्लिंगी आहे. १६. संसाररूप वणव्यानें दग्ध असा. १७. दास.

वेद जसा गुरुभजना, यक्ष[1] कृपण हि न तसा धना जपला. ।
रात्रिंदिव[2] उत्साहें दुष्करसेवामहातपें तपला. ॥ ५७
निजपूजा चि विसरला, चुकला जठराग्निला चि तर्पाया; ।
निद्रेला[3] चि न जपला, खिजला[4] मन आळसासि अर्पाया. ॥ ५८
होय प्रसन्न बहुतां दिवसीं गुरु-वामदेव[5] वेदा त्या. ।
सर्वज्ञत्व[6] कुशलवर दे; कोण न काम[7] देववे दात्या ? ॥ ५९
प्रथमच्छात्र[8]परीक्षातात्पर्य असें चि जाणती आर्य[9]; ।
**‘अत्यल्प[10] हि निजगुरुचें साधावें, त्यजुनि देह ही कार्य.’** ॥ ६०
**‘गुरुनें अत्यावश्यक अशनादि निषेधितां चि सोडावें’.** ।
हें उपमन्युपरीक्षातात्पर्य प्रेमळें चि जोडावें. ॥ ६१
वेदपरीक्षेचें हें तात्पर्यः–**‘गुरूक्त[11]** अनुचित हि **कर्म** ।
**करितां, हिमोष्णदुःखा[12] तदनुग्रह[13] मानितां, घडे शर्म[14].** ॥ ६२
जरि गुरु सेवेसि न घे, शिष्यें अर्थें-करूनि[15] तरि त्यातें ।
प्रार्थूनि तोषवावें, अहिततमाज्ञानबीज[16] हरित्यातें[17]. ॥ ६३
गुरुदक्षिणार्थ उद्यम[18] करितां, शक्रादिदेवता तूर्ण[19] ।
होती सहाय; दुर्जनविघ्नित[20] ही कार्य होतसे पूर्ण.’ ॥ ६४

---

१. यक्ष=देवयोनींतील जातिविशेष. यक्ष हे कुबेराच्या भांडाराचे रक्षक होत. २. ‘रात्रि-दिवस’ असें पाठान्तर. ३. निद्रेला जपला चि न=झोंप मिळावी अशी त्यानें काळजी सुद्धां घेतली नाहीं, झोंपेची गोष्ट त्यानें मनांतही आणिली नाहीं. ४. सलज्ज झाला, संकोचला. ५. गुरुरूपी शंकर, गुरु हाच शंकर. वामदेव=शिव, शंकर. ६. कुशलवर (विद्वानांत श्रेष्ठ, प्रवीण) [केवळ] सर्वज्ञत्व दे (देतो); [पण] दात्या कोण (कोणता) काम न देववे–असा अन्वय. विद्वान् दुसऱ्याला फक्त सर्वज्ञता (सर्वविषयज्ञान) देतो, पण दात्याला न देतां येण्यासारखी कोणतीच गोष्ट नाहीं–असा स्पष्टार्थ. ‘सर्वज्ञत्व-कुशल-वर दे’–असा पाठ घेतल्यास वामदेवानें वेदाला सर्वज्ञत्व (तुला सर्वज्ञता प्राप्त होवो) [व] कुशल (तुझें कुशल असो) [असे] वर दिले–असा अर्थ. कुशल=कल्याण. हें गीत्यर्ध सुभाषितरूप आहे. ७. इच्छा. ८. पहिल्या शिष्याच्या (आरुणीच्या) परीक्षेंतील तात्पर्य. ९. श्रेष्ठ १०. कितीही लहान असलें तरी. ११. गुरूनें करावयास सांगितलेलें. १२. थंडी आणि उष्ण यांच्या दुःखाला. १३. त्याचा कृपाप्रसाद. १४. सुख. १५. द्रव्यादि देऊन. १६. अहित+तम+अज्ञान+बीज=अत्यंत अकल्याण करणाऱ्या अज्ञानाचें मूळ. १७. हरण करणाऱ्यास. १८. उद्योग. १९. लवकर. २०. दुर्जनांनीं विघ्न उत्पन्न केलें तरीही.

हें प्रतिपादन आहे वेदचरित्रांत; तें चि परिसा हो ! ।
गुरुभक्तांचा महिमा पापांत[1], महागजांत[2] हरिसा[3], हो[4]. ॥ ६५
वेद गुरुकुळापासुनि[5], अंबुधिपासोनि[6] जेविं चंद्र, निघे. ।
त्यास हि होते झाले उत्तंकप्रमुख[7] साधु शिष्य तिघे. ॥ ६६
सेवा न घे चि गुरुकुळवासानुभवी[8], म्हणोनि तो कांहीं. ।
शिष्यांहीं अनुभविलें लालनसुख जेविं वृद्धतोकांहीं[9]. ॥ ६७
जनमेजय पौष्यांचा[10] झाला होता पुरोहित स्ववरें[11]. ।
वेदासि कोण न म्हणे गुरु? ज्यावरि ढळति गुरुकृपाचवरें. ॥ ६८
एका समयीं ठेवुनि उत्तंकाला निजाश्रमीं, वेद ।
याज्यांप्रति[12], कुमुदांप्रति[13] विधुसा[14], गेला हरावया खेदें[15]. ॥ ६९
उत्तंकाला कांहीं सांगे स्वाभिमत[16] कार्य गुरुभार्या; ।
श्रीमदयोध्या जैशी भरता[17] गुरुभक्तिसादरा आर्या[18]. ॥ ७०
जेविं वसिष्ठाद्युक्ती[19] सांगति, 'भरता! वरीं गुरुश्रीतें[20]', ।
उत्तंकासि मुनिसत्या[21] 'स्वीकारीं' म्हणति निजगुरुस्त्री 'तें'. ॥ ७१
राम जसा भरतातें, उत्तंकातें तसा चि गुरु वेद ।
सुखवी वरप्रसादें; नाहीं गुरु, देव यांत तिळ भेदें[22]. ॥ ७२
उत्तंक म्हणे गुरुला, 'द्यावी म्यां काय दक्षिणा? सांगा'. ।
वेद वदे, 'बहु दिधलें, वत्सा! उपरोध[23] करिसि हा कां गा? ॥ ७३

---

१. पापी लोकांमध्यें. २. मोठ्या हत्तींमध्यें. ३. सिंहासारखा. ४. होय. गुरुभक्ताचा महिमा पापांचा नाश करितो–असा भाव. ५. गुरूच्या घरापासून. ६. समुद्रापासून. ७. उत्तंक आहे प्रमुख ज्यांमध्यें असे. ८. गुरूच्या घरीं राहाण्याचा ज्याला अनुभव आलेला होता असा (वेद). ९. वृद्धांच्या मुलांनीं. उतारवयांत झालेल्या मुलांचे लाड त्यांच्या बापाकडून विशेष केले जातात, हें सर्वांस माहीतच आहे. १०. पुष्यराजाच्या वंशजांचा. ११. त्यांच्या प्रार्थनेवरून. वर=विनंति, याचना. १२. आपल्या यजमान राजांकडे. 'याज्याप्रति, कुमुदाप्रति' असें पाठान्तर. १३. कमलांप्रति. १४. चंद्रासारखा. १५. दारिद्र्य, गरिबी. कुमुदें=चंद्रोदय होतांच फुलणारीं कमळें. येथें 'खेद' ह्या शब्दावर **श्लेष** आहे. (कुमुदपक्षीं)खेद=ग्लानि, पीडा (सूर्याच्या तापामुळें होणारी). १६. आपणास इष्ट. १७. दशरथपुत्र भरतास. १८. श्रेष्ठाला. १९. वसिष्ठादिकांचा उपदेश. २०. बापाच्या संपत्तीतें. २१. ऋषिपत्न्या. मुनिसत्या [व] निजगुरुस्त्री उत्तंकासि 'तें स्वीकारीं' [असें] म्हणति–असा अन्वय. तें=गुरूजवळील विद्याधन. २२. हा चतुर्थ चरण सुभाषितरूप आहे. २३. उपकार, कृपा.

त्वां मज अर्थ दिला जो, न[1] म्हणें गुरु[2] त्यापरीस हेमागा[3]; ।
पूस उपाध्यायीतें[4], जरि तूं म्हणतोसि आग्रहें मागा'. ॥ ७४
प्रार्थुनि तसें चि पुसतां त्यास उपाध्यायिनी असें मागेः—।
'पौष्यस्त्रीताटंकें[5] दे; न प्रिय अर्थ मज दुजा लागे. ॥ ७५
होणार आजपासुनि चवथे दिवशीं च पुण्यकव्रत[6]; ती ।
वेळा सांभाळीं, कीं होइल तुज इष्टदा सुरव्रतती[7]. ॥ ७६
तीं कुंडलें स्वकर्णीं घालुनि, म्यां श्रीसमान[8] साजावें; ।
वाढावें विप्रांतें; तरि सत्वर शुद्धमानसा! जावें. ॥ ७७
उत्तंका! त्या समयीं येतां तूं पावशील कल्याण. ।
नाहीं तरि तें कैंचें? तुजवरि घालील शाप पल्याण[9]'. ॥ ७८
आज्ञा घेउनि जातां पुरुष वृषारूढ[10] देखिला वाटे[11]; ।
सांगे मद्वृष-गोमयभक्षण[12]; तें त्यासि निंद्यसें वाटे. ॥ ७९
'गुरुनें हि भक्षिलें,' हें त्या पुरुषें सत्य सांगतां च, मना[13] ।
ये; भक्षी, शीघ्र निघे; उठतां उठतां करूनि आचमना. ॥ ८०
वृष धर्म; पुरुष ईश्वर; जें गोमय, मूत्र, अमृत, धर्मफळ; ।
तें मृत्युभयहर म्हणुनि, सेवन करवी प्रभू करूनि[14] बळ[14]. ॥ ८१
पौष्यनृपाप्रति जाउनि अमृतरससंस्रावि[15] कुंडलें यांची[16]; ।
तों तो, प्रसन्नचित्तें, याञ्चा[17] सफळा करावया याची, ॥ ८२
कृतपुण्यासि[18] हरि[19] जसा कल्पलतेजवळि, इष्ट साधाया ।
स्वगृहीं, स्त्रीनिकट, तसा भूप प्रेषी विशुद्धभावा यां[20]. ॥ ८३

---

१. मी न म्हणें—असा अन्वय. २. थोर. ३. सोन्याचा पर्वत जो मेरु त्याला. ४. गुरुपत्नीतें. ५. पुण्यकुलोत्पन्न ध्रुवसंधिनामक राजाच्या स्त्रियेचीं कर्णभूषणें (कुंडलें). ६. पवित्र असें एक व्रत. पतीची प्रीति होण्याकरितां व पुत्रप्राप्तीस्तव स्त्रियांनीं करण्याचें व्रतविशेष. ७. देववल्ली म्हणजे कल्पवल्ली. व्रतति=वल्ली, वेल. ८. लक्ष्मीसारखें. ९. खोगीर. शाप तुजवर खोगीर ठेवील, म्हणजे तुला शापाचा परिणाम भोगावा लागेल. सारांश—मी तुला शाप देईन—हा अर्थ. येथील भाषणसंप्रदाय चिन्त्य आहे. १०. बैलावर बसलेला. ११. मार्गावर. १२. मत्+वृष+गोमय=माझ्या बैलाचें शेण. 'सांगे तयासि गोमयभक्षण' असें पाठान्तर. माझ्या बैलाचें शेण खा—असा भाव. १३. मना ये=मनास आलें, मान्य झालें. १४. बळ करूनि=बळानें, हट्टानें. १५. अमृतरस स्रवणारीं. १६. मागे. १७. याचना. १८. ज्यानें पुण्यकर्में केलीं आहेत त्यास. १९. इंद्र. २०. या उत्तंकाला.

पाहे गृहांत परि ती, देवी[1] कोठें हि न दिसतां, क्षिप्र[2] ।
परते; म्हणे, 'नृपा ! या योग्य विनोदास हा नव्हे विप्र'. ॥ ८४
करुनि विचार नृप म्हणे, 'केला मीं शोध, म्हणसि, बहु, धामीं[3] ।
देवी न पाहिली, तरि म्हणतों, उच्छिष्ट[4] अससि बहुधा, मीं. ॥ ८५
साध्वीदर्शन दुर्लभ अशुचि[5] जनाला; करीं बरें स्मरण'. ।
ऐसें म्हणतां, स्मरला गुरुचे, चित्तांत चिंतितां, चरण. ॥ ८६
उत्तंक म्हणे, 'केलें आचमन उठोनि चालतां वाटे[6], ।
तें झालें व्यर्थ ! खरें, मज तों साध्वी च देवता वाटे'. ॥ ८७
होउनि शुद्ध यथाविधि, सदनीं जातां चि, देखिली देवी. ।
ती या सत्पात्राच्या चरणीं शिर, कुंडलें करीं, ठेवी. ॥ ८८
'सावध पथीं असावें तक्षक[7] जपतो;' असें सती शिकवी; ।
दे आशीर्वाद; निघे तो शीघ्र; पुसोनि त्यासि[8] तीसि केवी. ॥ ८९
गुणवत्[9] पात्र[10] म्हणुनि, तो भूपें श्राद्धार्थ विनवितां राहे. ।
भोजनसमयीं पात्रीं शीत[11] सकेशान्न[12] वाढिलें पाहे. ॥ ९०
कोपे[13], म्हणे 'असें हें श्राद्धीं विप्रासि अन्न वाढावें[14]? ।
हो अंध, प्रभुनें पद मत्तापासूनि शीघ्र काढावें[15]'. ॥ ९१
भूप म्हणे, 'अन्न अशुचि नसतां जरि दूषितोसि, घे शाप. ।
अनपत्य[16] हो; तुझें तुज बाधो शुद्धान्नदूषका[17] ! पाप'. ॥ ९२
विप्र म्हणे, 'अन्न पहा; पौष्या ! नससी च योग्य कोपाया, ।
जैशी असती[18] पतिला, करुनि बळें पाप; शाप ओपाया'. ॥ ९३
अन्न[19] सदोष पहातां, राया अपराध आपुला कळला. ।

---

१. पौष्यस्त्री. 'देवी कोठें न देखतां, क्षिप्र' असें पाठान्तर. २. तात्काळ. ३. घरांत. ४. अपवित्र, अशुचि. ५. 'अशुचि तयाला' असें पाठान्तर. ६. मार्गावर. ७. सर्पविशेष. ८. त्या पौष्यास. ९. ज्ञाता (उत्तंक). १०. सत्पात्र ब्राह्मण आहे असें जाणून. ११. थंड. १२. केशयुक्त अन्न. १३. रागावे. 'कोपें म्हणे' असें पाठान्तर. १४. वाढणें शोभतें काय ?– असा अर्थ. १५. जो मत्त झाला असेल त्याला ईश्वरानें पदच्युत करावें–असा अर्थ. १६. निःसंतान. १७. पवित्र अन्नास दोष देणाऱ्या. १८. व्यभिचारिणी. १९. 'अन्नग दोष' असें पाठान्तर. अन्नग=अन्नगत दोष.

शाप[1]निवृत्तिवरार्थ प्रांजलि होतां चि, विप्र तो वळला[2]. ॥ ९४
विप्र म्हणे, 'येईल चि, परि चिरं[3] न टिकेल, अंधता, राया!' ।
साधु समर्थ चि, धरितां चरण, च्छेदून बंध, ताराया. ॥ ९५
'तूं हि स्वशाप वारीं' म्हणतां विप्रासि नृप म्हणे, 'बापा ! ।
क्षत्रियहृदय क्षुरसम[4], जाणतसे द्यावयासि हें शापा. ॥ ९६
हृदय नवनीत[5] तुमचें, वचन क्षुर; आमुचें वचन लोणी, ।
चित्त क्षुर चि; सहज–गुण[6] लोकीं केला न अन्यथा कोणी.' ॥ ९७
उत्तंक म्हणे, 'राया! जरि मी शुद्धान्न दूषितों, तरि तो[7] ।
मज बाधता; तसें तों नाहीं, मग शाप काय गा! करितो?' ॥ ९८
ऐसें वदोनि त्याचा जायासि निरोप, कार्य साधुनि, घे; ।
आठवुनी मनिं आणुनि, तो, श्रीसद्गुरु सभार्य, साधु निघे[8]. ॥ ९९
क्षण[9] दृश्य[10] अदृश्य पथीं, नग्न क्षपणक[11] विलोकितां, क्षिप्र ।
धांवे[12] बुध[13]; दुःस्वप्न प्रेक्षुनि काशीपथीं तसा विप्र. ॥ १००
उदकार्थ पथीं गुंते, ताटंकें वेगळीं क्षण स्थापी; ।
क्षपणक[14]तनु तक्षक खळ तितुक्यांत चि कुंडलें हरी पापी. ॥ १०१
पळतां चि देखिला खळ; वंदुनि गुरुदेवतांसि, तो रागें ।

---

१. शापाचें निवारण व्हावें ह्यासाठीं वर मिळावा म्हणून. २. प्रसन्न झाला. ३. फार वेळ. ४. वस्तऱ्यासारखें, तीक्ष्ण. ५. लोण्यासारखें मृदु. ६. सहज–गुण (स्वभावधर्म, जन्मसिद्धगुण) लोकीं कोणी (कोणींही) अन्यथा (मिथ्या, खोटा) न केला–असा अन्वय. स्वभावधर्म बदलत नाही–असा अर्थ. क्षत्रिय व ब्राह्मण ह्यांच्या स्वभावांतील वैपरीत्याची कल्पना विश्वामित्र व वसिष्ठ यांच्या वागणुकीवरून सहज होण्यासारखी आहे (पुढें अध्याय ३४ पहा). ७. तो शाप. ८. तो साधु (उत्तंक) श्रीसद्गुरु सभार्य मनिं आणुनि [व] आठवुनी निघे–असा अन्वय. ९. 'क्षण दृश अदृश पथीं मग नग्न क्षपणक विलोकितां, क्षिप्र' असाही पाठ आहे. १०. दृग्गोचर. ११. बौद्ध संन्यासी. १२. नग्न क्षपणकाचें दर्शन अशुभदर्शक आहे, अशी समजूत आहे. एकादें दुःस्वप्न पाहिलें असतां तद्दोषक्षालनार्थ ब्राह्मण जसा काशीच्या वाटेला ताबडतोब लागतो, त्याप्रमाणें उत्तंकाला नग्न क्षपणकाचा अपशकुन झाल्यावरोबर तो पळत सुटला–असा अर्थ. किंवा–'कुंडलें हरण करण्यासाठीं तक्षक टपून बसला आहे' असें पौष्यस्त्रीनें त्याला सुचविलें होतें (गीति ८९ पहा). तें त्याच्या मनांत येऊन हा कदाचित् तक्षकच असेल, असें समजून उत्तंक पळत सुटला असेल. १३. तो विद्वान् उत्तंक. १४. यतिवेष धारण करणारा.

त्या दुष्टाच्या लागे, जैसा [1]सुमुमुक्षु मृत्युच्या, [2]मागें. ॥ १०२
विप्रें धावुनि धरितां, [3]क्षपणकवेष त्यजूनि निजरूपें ।
शिरला बिळांत तक्षक; तों क्षोभे द्विज, जसा [4]दहन तूपें. ॥ १०३
ऐसें होतां, तो मुनि, रक्षाया स्वयश आणि ताटंकें ।
झाला क्षितिला [5]दंडें, जेविं शिळेलागिं, खाणिता, [6]टंकें. ॥ १०४
तें पाहुनि [7]शक्र म्हणे, '[8]वज्रा! मुनिच्या प्रविष्ट हो दंडीं; ।
आश्रय दिला खळाला जेणें, त्या [9]भूमिकुक्षिला [10]खंडीं.' ॥ १०५
वज्रें तसें चि केलें, खणिली [11]यावद्भुजंगदेश [12]रसा. ।
गेला द्विज पाताळीं; [13]चापच्युत [14]रावणारिचा [15]शरसा. ॥ १०६
जाऊनि [16]नागलोकीं, नागांतें स्तवुनि, कुंडलें मागे. ।
परि ते त्यासि न वळले; स्तुति करितां, हात जोडितां [17]भागे. ॥ १०७
दोघी स्त्रिया [18]सित [19]असित तंतूंनीं विणिति [20]पट, असें पाहे; ।
तों [21]द्वादशार चक्र हि [22]सा शिशुंनीं फिरवितां चि जें [23]वाहे; ॥ १०८
देखे तसा चि तेथें एक पुरुष, एक त्याजवळ [24]वाजी; ।
[25]त्यातें स्तवि. पुरुष म्हणे, 'माग'. म्हणे विप्र, '[26]नाग वळवा जी!' ॥ १०९
पुरुष म्हणे, 'विप्रा! या [27]अश्वापानीं करीं अगा! [28]धमन. ।

---

१. मुक्त होऊं इच्छिणारा, मोक्षाची इच्छा करणारा. २. मरणाच्या मागें लागणें=मृत्यूला मारण्याकरितां त्याचा पिच्छा पुरविणें, मरणाला मारून टाकणें, मरणातीत होणें. ३. 'क्षपणक केशी, धरूनि' असें पाठान्तर (क्षपणकाला केश कोठले? तेव्हां हा पाठ लेखकप्रमादजन्य असावा). ४. अग्नि. ५. काठीनें. ६. टांकीनें. ७. इंद्र. ८. वज्र हें इंद्राचें आयुध. येथें **'चेतनधर्मारोपोक्ति'** नामक अलंकार आहे. जेव्हां निर्जीव पदार्थावर सजीव पदार्थांच्या गुणांचा आरोप केलेला असतो, तेव्हां 'चेतनधर्मारोपोक्ति' अलंकार होतो. वज्र निर्जीव असून त्याच्यावर चेतनत्वाचा आरोप केलेला आहे, म्हणून येथें उपरिनिर्दिष्ट अलंकार झाला आहे. ९. भूप्रदेशाला. १०. खणून टाक. 'दंडीं' असें पाठान्तर. दंडीं=शिक्षा करीं. ११. सर्पदेशा (पाताळा) पर्यंत. १२. पृथ्वी. १३. धनुष्यापासून सुटलेला. १४. रामाच्या. १५. बाणासारखा. १६. पाताळीं. १७. भागला, दमला. १८. पांढरे. १९. काळे. २०. वस्त्र. २१. बारा आरांचें. २२. सहा. २३. चालूं लागे, फिरे. २४. घोडा. २५. त्या पुरुषातें. 'त्यांतें' असें पाठांतर. २६. तक्षक. २७. अश्वाच्या गुदद्वारांत. २८. फुंकणें, म्हणजे फुंक—असा भावार्थ.

साधो! तुझें न मानू[1], त्या खलबलजलधिला[2] अगाध[3], मन.' ॥ ११०
विप्र तसेंचि अनुष्ठी[4]; तों हयवदनादिरंध्रभव[5] धूम[6], ।
मूषकबिळीं[7] जशी, तशि करि त्या नागालयांत बहु धूम[8]. ॥ १११

पाताळांत सधूम ज्वाळा शिरतां चि तापले भोगी[9]. ।
संसर्गी[10] ही भोगिति, दोषी च न दोष आपुले भोगी. ॥ ११२

'मरतों' ऐसें कळलें; व्यसनांत[11] सुचे चि ना उपाय; नतें[12] ।
नागें, मग, कुंडलयुग[13] जें, केलें मुनिपदीं उपायन[14] तें. ॥ ११३
'चुकलों; रक्षीं.' म्हणतां कर जोडुनि, लाज तक्षका नाहीं. ।
**दंडें[15] चि खळ वळे;** हें तत्व प्राशूत दक्ष[16] कानांहीं. ॥ ११४
देउनि अभय नतातें, घेउनि तीं कुंडलें, म्हणे 'आजी ।
पुण्यक[17], मी दूर; अहा! क्षोभेल गुरुप्रिया[18] मनामाजी'. ॥ ११५
तो पुरुष म्हणे, 'विप्रा! हो अश्वारूढ; दिव्य वाजिप[19] हा ।
क्षणमात्रें गुरुसदना तुज नेइल; कुतुक[20] तें हि आजि पहा.' ॥ ११६
चढतां चि[21], आणिला तो क्षणमात्रें गुरुकुळासि अश्वानें. ।
व्यसनें[22] पराभवासि न पावे गुरुभक्त; सिंह न श्वानें[23]. ॥ ११७
तैं गुरुपत्नी, न्हाउनि, वेणी करवीत बैसली होती. ।
'टळला चि अवधि[24]; द्यावा शाप;' असें जैं मनीं म्हणे हो! ती, ॥११८
तीतें वंदुनि, ठेवी कुंडलयुग तीपुढें, पुन्हा वंदी. ।
गुरुपत्नीनें केला धन्य, शिवेंदृष्टिनें[25] जसा नंदी. ॥ ११९

---

१. मन न मानू=पर्वा न करो. २. दुष्टांच्या सामर्थ्यरूप समुद्राला. ३. खोल. ४. करी. ५. घोड्याच्या मुखादि छिद्रांपासून उत्पन्न झालेला. ६. धूर. ७. उंदराच्या बिळांत. ८. धामधूम, दंगा. ९. सर्प. १०. सहवासी. हें गीत्यर्ध सुभाषितरूप आहे. ११. संकटांत. १२. नम्र झालेल्या सर्पानें. १३. कुंडलांची जोडी. १४. नजराणा. १५. शिक्षेनें. 'दंडें चि खळ वळे' हा भाग सुभाषितरूप आहे. वळे=वठणीस येतो. १६. चतुर. १७. पुण्यकनामक व्रत (मागें गीति ७६ पहा). १८. गुरुस्त्री. १९. अश्वश्रेष्ठ. २०. कौतुक. २१. घोड्यावर बसतांच. २२. संकटाच्या योगानें. '**व्यसनं** त्वशुभे सक्तौ' इति मेदिनी. 'व्यसनीं' असें पाठान्तर. २३. कुत्र्याकडून. हें गीत्यर्ध सुभाषितरूप आहे. २४. मुदत. २५. पार्वतीच्या कृपादृष्टीनें.

[1]मग अमृतघनाच्या ही जीची, हांसेल, धूलि, [2]केरकेला, ।
[3]गुरुपदयुगली नमिली; [4]ऱ्हीत जिणें [5]पारिजातकर केला. ॥ १२०
पुसतां विलंबकारण, सांगे, मग, जें विलोकिलें होतें, ।
वृषगोमयभक्षण; जें पाताळांतील ही पुसे तो [6]तें. ॥ १२१
गुरु वेद म्हणे, 'वत्सा! चिंतिति जीतें सदैव धीर, [7]चिती ।
ती एक, दुजी [8]माया [9]अमित [10]ब्रह्मांडकुंभ जी रचिती; ॥ १२२
जें [11]तंत्रें देखिलें त्वां, तें होय अनेकवासनाजाळ; ।
[12]सितें असित तंतु तीं सुखदुःखें; पट भव; तसे चि जे बाळ ॥ १२३
ते, वत्सा! तुज कथितों; एक [13]अविद्या, असें मनीं आण; ।
तैशीच [14]अस्मिता ती दुसरी, ऐसें [15]महामते! जाण; ॥ १२४
तिसरा राग; चतुर्थ द्वेष; [16]अभिनिवेश पांचवा; [17]सावी ।
ती ईश्वरमाया; हे व्हावी अध्यात्मखुण तुला ठावी. ॥ १२५
जें चक्र पाहिलें तें स्थूळ शरीर; प्रमाण हें बापा! ।
याच्या [18]संचाराचा [19]हेतु [20]अविद्यादिषट्क निष्पापा! ॥ १२६
जो पुरुष सांगसी, तो [21]अंतर्यामी **महेश**, [22]मायावी. ।
जो अश्व, जीव तो; हे दृष्टि तुला [23]साधुसत्तमा! यावी. ॥ १२७
**पौष्या**प्रति जातां, जो पुरुष वृषारूढ देखिला [24]अयनीं, ।

---

१. मग जीची (ज्या गुरूपदयुगलीची) धूलि अमृतघनाच्या ही करकेला हांसेल (उपहासील) [व] जिणें पारिजातकर ऱ्हीत केला, ती गुरुपदयुगली नमिली–असा अन्वय. २. गारेला. गारा–**पंत.** ३. गुरूचें चरणद्वय. गुरूचे पाय प्रसाद देण्यांत अमृत व कल्पतरु ह्यांपेक्षां श्रेष्ठ होते–असा भाव. ४. लज्जित. ५. कल्पवृक्षाचा हस्त. ६. तें=तेथील वृत्त. ७. चैतन्य, चित्कला. ८. दुसरी स्त्री माया–**पंत.** 'ती एक स्त्री दुसरी' असें पाठांतर. ९. असंख्य. १०. ब्रह्मांडरूपी घट. ११. माग. (तंतवो वितन्यंते यस्मिन् तत्तंत्रं=ज्यावर वस्त्र विणण्याकरितां तंतू पसरतात तें तंत्र.). 'जें वृत्त देखिलें' असें पाठांतर. १२. शुभ्र. 'जे शुक्ल कृष्ण तंतू तीं सुखदुःखें, तसे चि जे बाळ' असा पाठभेद. १३. अज्ञान. १४. अहंकार, मीपणा. १५. महाबुद्धिवान् अशा उत्तंका! १६. आग्रह, हट्ट. १७. सहावी. १८. 'या बा! संसाराचा' असें पाठांतर. संचार=फिरणें (मागें गीति १०८ पहा). १९. कारण. २०. [वरील गीतींतून वर्णिलेले] अविद्यादि सहा प्रकार. २१. अंतःकरणाचें संयमन करणारा (ईश्वर). २२ मायेचा नियंता (ईश्वर). २३. साधुश्रेष्ठा. २४. वाटेंत, रस्त्यांत. मार्गीं–**पंत.**

तो परमेश्वर; वृष, तो धर्म; वृषभरूप [1]भासला नयनीं. ॥ १२८
गोमय भक्षविलें, तें अमृत; म्हणोनी च नाग[2]गेहांत ।
तूं वांचलासि, वत्सा! विषबाधा जाहली न देहांत. ॥ १२९
परमेश्वरें अनुग्रह तुजवरि केला; स्वतत्व [3]कळवीलें. ।
त्या आम्हां जीवांच्या सुहृदें [4]दुस्तर अरिष्ट पळवीलें. ॥ १३०
आहे तुझी स्वधर्मीं सन्निष्ठा, तीच या फळा [5]फळली. ।
हो मदधिक [6]सत्संमत; जा स्वगृहा; [7]चित्कळा तुला कळली'. ॥ १३१
गुरुला नमुनि निघाला. गेला तो [8]हस्तिनापुरासि कवी. ।
[9]तक्षशिलाजयमुदिता भेटे जनमेजया; असें शिकवी, ॥ १३२
'कर्तव्य तें न करितां, राया! भलतें चि करिसि बाळकसा. ।
काय म्हणावें तुज या [10]भरतकुळीं तूं असा नृपाळ कसा?' ॥ १३३
पूजुनि त्यासि [11]नृप म्हणे, [12]प्रकृतींच्या पालनें सदा धर्म ।
रक्षितसें, भगवंता! वद जें चुकलों असेन मी कर्म'. ॥ १३४
उत्तंक म्हणे, 'केला भस्म तुझा [13]तात तक्षकें [14]अहितें; ।
आझुनि तरि फेडावें [15]गुरुचें ऋण, भस्म करुनि त्या [16]अहितें; ॥ १३५
[17]विषहरणदक्ष [18]कश्यप, धन देउनि, फिरविला; असा खोटा, ।
विघ्न करुनि [19]गुर्वर्थी, मज हि दिला ताप त्या खळें मोटा. ॥ १३६
जरि त्यासि सर्पसत्रीं [20]दहनीं तूं होमिशील, तरि तात ।

---

१. 'देखिला' असें पाठान्तर. २. पाताळांत. ३. वर सांगितलेलें रूपक मूळ भारतांत निराळ्या तऱ्हेनें सांगितलें आहे:—वृषारूढ पुरुष म्ह० इंद्र; वृष म्ह० ऐरावत; गोमय म्ह० अमृत; दोघी स्त्रिया म्ह० धाता व विधाता; सित असित तंतु म्ह० दिवस रात्री; चक्र म्ह० संसार; द्वादश अर म्ह० बारा महिने; सहा शिशु म्ह० षड्तु; पुरुष म्ह० पर्जन्य; अश्व म्ह० अग्नि. ४. अतिकठीण. ५. फळ देती झाली. ६. साधूंस मान्य. ७. चैतन्यकळा. ८. 'हास्तिनापुरासि' असा पंतलिखित प्रतींत पाठ आहे. ९. तक्षशिला देश जिकल्यामुळें आनंदयुक्त अशा. १०. दुष्यंतशकुंतलेचा पुत्र भरत, त्याच्या वंशांत. ११. 'पूजुनि त्या मुनिस' असें पाठान्तर. १२. प्रजांच्या. १३. बाप परीक्षिति. १४. शत्रूनें. १५. बापाचें. १६. सर्पातें. १७. विषनाश करण्याविषयीं दक्ष. १८. कश्यपाच्या कथेसाठीं पुढें अध्याय ५ गीति ६१ पहावी. १९. गुरूला इष्ट असलेली वस्तु संपादन करण्याच्या बाबतींत. २०. 'दहनीं जरि होमिशील' असें पाठान्तर.

स्वर्गी होईल सुखी. गुरुविप्रप्रिय[1] सुशील[2] करितात.' ॥ १३७
मुनिवाक्य श्रवण करुनि जनमेजय नृप पुसे अमात्यांतें[3]. ।
होतें चि विदित; डसला तक्षक भोगी[4] नरोत्तमा[5] त्यां[6] तें[7]. ॥ १३८

## अध्याय तिसरा.

शौनक मुनिवर्य म्हणे 'सौते! भृगुवंश आमुच्या कर्णीं ।
यावा; त्यातें चि सुखें आधीं तूं साधुसत्तमा! वर्णीं'. ॥ १
सौति ह्मणे, 'ब्रह्म्याचा भृगु पुत्र; तदीय पुत्र तो च्यवन; ।
त्याचा प्रमति; तयाचा रुरु; तत्सुत शुनक, सुमतिचें भवनें; ॥ २
तो तव पूर्वपितामह. शौनक तुज ह्मणति यामुळें. आतां ।
च्यवनत्वहेतु[8] कथितों. सुख होतें साधुवंशयश गातां. ॥ ३
भृगुची वधू पुलोमा, ती होती प्रथमगर्भिणी धामीं[9]; ।
गेला असतां तीर्थस्नानाला एकदा तिचा स्वामी, ॥ ४
दुष्ट पुलोमा राक्षस त्या भृगुच्या आश्रमांत, रामाच्या ।
रावणसा, शिरला हो! आज्ञेला शिरिं धरूनि कामाच्या[10]. ॥ ५
'घे राक्षसा! दिली तुज,' वदला होता पिता असें, रडतां, ।
तें दुःख मनीं वाहे, योगें[11] पुढें भृगुसवें तिचा घडतां. ॥ ६
अग्निगृहीं[12] अग्नीतें पाहुनि, राक्षस ह्मणे, 'अगा! आर्या! ।
वद साचें; हे माझी, किंवा भृगुची च, होय हे भार्या, ॥ ७
तातें इच्छ्या प्रथम मज, मग भृगुला हे समर्पिली, दहना! ।
देवमुखा[13]! तुज पुसतों; कीं आहे धर्मगति महागहना[14]'. ॥ ८

---

१. पिता व ब्राह्मण यांस आवडेल असें. कल्पनासादृश्यः—सत्पुत्र गुरूक्त सर्व करितात. सभापर्व, अध्याय १।५१ ). २. सच्छील पुरुष. हा भाग सुभाषितरूप आहे. ३. प्रधानांतें. ४. सर्प. ५. राजाला. ६. त्याचा ( भृगूचा). ७. गृह. ८. च्यवन असें नांव पडण्याचें कारण. ९. गृहीं. १०. मदनाच्या ( कामाच्या ) आज्ञेला शिरीं धरून=कामवश होऊन. ११. विवाहसंबंध. १२. होमशाळेंत. १३. हे अग्ने. १४. अतिशय खोल, समजण्यास कठीण. 'धर्मस्य तत्त्वं निहितं गुहायाम्' हें वचन प्रसिद्धच आहे.

अग्नि[1] म्हणे, 'प्रथम तुला शब्दें चि दिली, तुवां मनीं धरिली; ।
भृगुनें मग विधिपूर्वक, मजला साक्षी करूनि[2] हे वरिली'. ॥ ९
'प्रथम स्वस्त्री' ऐसें येतां वाक्यांत वन्हिच्या, तुष्ट ।
होउनि, सूकररूपें[3] भृगुच्या पत्नीस तो हरी दुष्ट. ॥ १०
रडतां दुःखें, कोपें गर्भ सतीचा पथीं गळाला हो! ।
तो राक्षस तत्तेजें, क्षयें-दहनें[4] शलभसा[5], जळाला हो! ॥ ११
जननीकुक्षींतूनि क्रोधें च्यवला[6], म्हणोनि तो च्यवन. ।
विधि सांत्वितां, सवत्सा धेनु तशी, पावली सती भवन[7]. ॥ १२
जे अश्रुबिंदु मार्गामाजि गळाले, तिहीं महासरिता[8] ।
झाली; तीतें ह्मणती बिंदुसरा; निववि ती अघज्वरिता[9]. ॥ १३
भृगु येतां स्त्रीस[10] म्हणे, 'कथिसी न अनर्थहेतुला कां? गे!' ।
ती कर जोडुनि, राक्षसपावकसंवाद[11] जाहला सांगे. ॥ १४
तें कळतां, मुनिवर भृगु, त्या देवाच्या शिरीं अघ[12] स्थापी ।
'हो सर्वभक्ष[13]' ऐसें कोपें सर्वामरानना[14] शापी. ॥ १५
छळविधि[15] हि सत्य म्हणतां देवमुखाला हि बाधला शाप. ।
विधिसि[16] असत्य म्हणे, जो राक्षस; झाला चि भस्म तो पाप[17]. ॥ १६
अग्नि म्हणे, 'ब्राह्मण मज मान्य, भृगो! तूं दिली[18] हि जरि शाप, ।
सुज्ञें[19] ताप सहावा; द्यावा तापप्रदासि हि न ताप. ॥ १७
रुसला भगवान् पावक, झाला गुप्त, त्यजूनि लोकांतें. ।

---

१. 'अग्नि म्हणे प्रथम तुवां शब्दें वरिली, मनांतही धरिली' असा पाठभेद आहे. २. 'साक्षी करूनिया' असें पाठान्तर. ३. डुकराच्या रूपानें. ४. प्रलयाग्नीनें. क्षय=प्रळय. तत्तेजें=त्या गर्भाच्या तेजानें. ५. पतंगासारखा. ६. पतन पावला, गळून पडला. ७. भवन पावली=घरास जाऊन पोहोंचली. ८. मोठी नदी. ९. पातकरूप ज्वरानें पीडित झालेल्यास. १०. 'तीस' असें पाठान्तर. ११. राक्षस व अग्नि यांचें संभाषण. ( मागें गीति ७–९ पहा ). १२. पातक. १३. सर्वभक्षक ( सर्वांस जाळणारा ). १४. संपूर्ण देवांच्या मुखास म्हणजे अग्नीस. १५. 'घे राक्षसा दिली तुज' ( मागें गीति ६ पहा ) असा रडणारें मूल उगी राहावें ह्या छलानें ( हेतूनें ) झालेला दानविधि. १६. धर्मास अनुसरून केलेल्या यथासांग दानविधीस. १७. पापी, मूर्तिमंत पापच असा. १८. 'तूं दिला जरी शाप' असें पाठान्तर. १९. समानार्थक पद्यांशः—दिधलें दुःख परानें उसनें फेडूं नयेचि सोसावें. ।

सोशील सत्यवादी दूषण [1]जगदेकपूज्य [2]तो कां तें? ॥ १८
झाला [3]जेव्हां [4]हुतभुक् गुप्त [5]भृगुकृतावमानजें कोपें; ।
लोकत्रय हि व्याकुळ होय [6]स्वाहास्वधाक्रियालोपें; ॥ १९
ऋषिदेवांहीं कथिला [7]विधिला निजताप, अग्निचा शाप. ।
तेव्हां तो समजावी त्या दहना, जेविं बाळका बाप. ॥ २०
‘एकाच्या कोपें कां बहुतांचा करिसि घात? शापातें ।
[8]देता भृगु; परि [9]वागुच्चारीं जें बळ [10]तुझें चि बापा! तें. ॥ २१
[11]क्रव्यादा मूर्ति तुझी, [12]अपानसंबंधिनी हि ज्या ज्वाळा ।
त्या सर्व भक्षितील, [13]स्वाहाप्राणप्रिया! [14]स्वधापाळा! ॥ २२
स्वांशें [15]अमेध्यभक्षण करितां, तुज लेश ही नसे दोष; ।
हो प्रगट जगांत पुन्हा; कांहीं चित्तीं धरूं नको [16]रोष’. ॥ २३
ऐसें सांत्वन करितां वन्हि पुन्हा प्रगटला असा [17]चंड, ।
[18]भृगुनें केला, [19]सत्याभासाला सत्य मानितां, दंड. ॥ २४
[20]च्यवनोत्पत्तिकथा हे. शुनकाच्या ही तुम्हांसि मी [21]गुरुची ।

---

१. जगामध्यें एकच ( मुख्य, श्रेष्ठ ) पूज्य असा. २. अग्नि. ३. ‘तेव्हां हुतभुग्’ असें पाठान्तर. ४. हवन केलेलें द्रव्य खाणारा ( अग्नि ). ५. भृगूनें केलेल्या अपमानापासून उत्पन्न झालेल्या. ६. स्वाहाक्रिया म्हणजे हव्य ( देवांप्रीत्यर्थ कर्म ) आणि स्वधाक्रिया म्हणजे कव्य ( पितरांप्रीत्यर्थ कर्म ). ७. ब्रह्मदेवाला. ८. देणारा. शाप देणारा भृगु, पण तो केवळ निमित्तमात्र होय. कारण त्याच्या वाचेमध्यें असणारें बल तुझेंच ( अग्नीच्या प्रसादानें प्राप्त झालेलें म्हणून अग्नीचेंच ) होय—असा भाव. ‘देतो’ असें पाठान्तर. ९. वाणी उच्चारण्याच्या समयींचें. १०. ‘तुझेंचि’ असें म्हणण्याचें कारण—भृगूनें जी अग्निसेवा केली, तीमुळें त्याच्या वाणींत तें सामर्थ्य उत्पन्न झालें होतें. ११. मांस खाणारी. अग्नीच्या अनेक मूर्ति आहेत, त्यांपैकीं येथें मांसाहार करणारी जी एक, तिचा उल्लेख केलेला आहे. १२. गुदस्थ वायूसंबंधीं असणाऱ्या. १३. स्वाहा ही अग्नीची स्त्री आहे. १४. स्वधा ही सुद्धां एक अग्नीची स्त्री आहे. १५.अमेध्य=अपवित्र. १६. क्रोध. १७. अत्यंत कोपिष्ठ असा ( प्रखर ). १८. सत्याभासाला सत्य मानितां भृगुनें दंड केला—असा अन्वय. ‘भृगुनें केल्या सत्याभासाला’ असें पाठान्तर. केल्या=केलेल्या. १९. सत्य भासविणाऱ्या वस्तूला. ‘भृगुनें केल्या सत्याभासाला’ असें पाठान्तर. २०. च्यवनऋषीच्या उत्पत्तीची गोष्ट. २१. शुनकाच्या गुरुची—रुरूची—पवित्रा कथा मी कथितों—असा अन्वय.

कथितों कथा पवित्रा, [1]प्रमतिघृताचीतनूद्भवा रुरुची. ॥ २५

[2]विश्वावसुच्या वीर्यें, प्रसवोनि सुतेसि, [3]मेनका [4]देवी ।
श्री[5]स्थूलकेशमुनिच्या [6]आश्रमनिकटीं, नदीतटीं, ठेवी. ॥ २६

[7]स्थूलकच, वनीं पाहुनि तें कन्यारत्न, आश्रमीं आणी, ।
तैसें चि तो दयाळू ब्राह्मण निजलोचनद्वयीं पाणी. ॥ २७

ती पोषिली मुनीनें; प्रमद्वरा नाम ठेविलें विधिनें; ।
वाढविली, मूर्तिमती [8]आत्मतपःसिद्धिसी, दयानिधिनें. ॥ २८

जेव्हां विलोकिली ती [9]गंधर्ववराप्सरोद्भवा [10]सुरुची, ।
झाली सर्व[11]स्मरशरलक्ष्य मनोवृत्ति तत्क्षणीं रुरुची. ॥ २९

तें निजसुतमित्रमुखें कळतां, [12]स्थूलालकाप्रति प्रमती ।
मागे प्रमद्वरेला. तो ही 'देतों' म्हणे उदारमती. ॥ ३०

निश्चय विवाहतिथिचा केला; त्यावरि तिला डसे [13]व्याळ; ।
तें कळतां, तच्छोकें रुरु एकांतीं रडे, पिटी [14]भाळ. ॥ ३१

शब्दें चि कल्पिली स्त्री मरतां, रुरु पावला महाकष्ट; ।
तात्पर्य या कथेचें हें कीं, दुःखद [15]परिग्रह स्पष्ट. ॥ ३२

'तप, दान, [16]गुरूपासन, जरि मज घडलें असेल, तरि तेणें ।
वांचो; हातीं येऊ, जें हरिलें [17]काळतस्करें [18]लेणें. ॥ ३३

जरि मी असेन [19]जन्मप्रभृति शुचि, उठो मनःप्रिया तरि, ती. ।
हा ! [20]आधिसर्पदष्टा [21]विकळा मन्मति हि विकळ मज करिती.' ॥ ३४

---

१. प्रमति व घृताची यांच्या शरीरांपासून उत्पन्न झालेल्या. २. गंधर्वविशेष ( चित्रसेन गंधर्वाचा पुत्र ). ३. अप्सराविशेष. ४. देवांगना, अप्सरा. ५. ऋषिविशेष. ६. आश्रमाच्या समीपभागीं. ७. स्थूलकेशऋषि. ८. आपल्या तपःसिद्धीसारखी. ९. गंधर्वश्रेष्ठ आणि अप्सरा यांपासून उत्पन्न झालेली अशी. १०. उत्तम कांतिमती ( लावण्यवती ). ११. मदनाच्या सर्व ( पांचही ) बाणांस वेध्य अशी. १२. स्थूलकेशनामक ऋषीप्रत. १३. सर्प. १४. कपाळ. १५. स्त्री. अर्थात् संसार. परिग्रह='पत्नीपरिजनादानमूलशापाः परिग्रहः' इत्यमरः. 'परिग्रहः कलत्रे च मूलस्वीकारयोरपि । शपथे परिवारे च राहुवक्रस्थभास्करे' इत्यजयः ॥. १६. गुरु+उपासन=गुरूची सेवा. १७. काळरूप चोरानें. १८. अलंकार. अर्थात् प्रमद्वरा. १९. जन्मापासून. २०. मनोव्यथारूप सर्पानें दंशित अशी. २१. व्याकुळ.

ऐसे करी विलाप स्त्रीशोकें प्रमतिपुत्र जो, त्यासी ।
दे[1] देवदूत दर्शन; रवि जेविं तमीं विमूढ होत्यासी[2]. ॥ ३५

दूत म्हणे, 'जो प्राणी, सरतां आयुष्य, पावला अंत[3], ।
तो न पुन्हा उठला;' हें वदति रुरो! तत्व जाणते संत. ॥ ३६

पुण्यें देशी; परि तीं, क्षणभरि हि न उठवितील मेलीला. ।
[4]गतबुद्बुदेच्छुशिशुची जशि, तशि च तुझी मला गमे लीला. ॥ ३७

तुज या [5]दयिताविरहव्यसनापासोनि व्हावया मुक्ती, ।
एक [6]भविष्यज्ञांनीं कथिली, ती सांगतों तुला युक्ती. ॥ ३८

अर्ध स्वायुष्याचें जरि तूं देशील तीस, नवरी ती ।
वांचेल; रीति पहिली ती च पहाशील[7] तूं, न नव रीती.' ॥ ३९

विप्र म्हणे, 'आयु दिलें; येणें[8] हस्तें-करोनि निजलीला ।
उठवावें, तैसें तूं उठवीं; प्रकटीं जनांत निजें[9]-लीला.' ॥ ४०

मग तो विश्वावसुसह दूत सुरांचा यमाकडे गेला; ।
स्वोक्तीचा[10] निर्वाह[11], प्रार्थुनियां त्यास, तन्मतें केला. ॥ ४१

[12]धर्में दिव्यवरकरें[13] जागविली ते प्रमद्वरा सु-रुची; ।
जशि अधनाची श्रीनें[14], त्या स्त्रीनें दृष्टि निववली रुरुची. ॥ ४२

---

१. तमीं विमूढ होत्यासी त्यासी देवदूत दर्शन दे, जेविं रवि [ तमीं विमूढ होत्यासी दर्शन दे ]–असा अन्वय. येथें विमूढ आणि तम ह्या शब्दांवर **श्लेष** आहे. विमूढ=( १ ) ज्याला मूर्च्छा आली आहे असा; ( २ ) गोंधळलेला, घाबरलेला. तम=( १ ) दुःख; ( २ ) रात्र, अंधकार. २. अत्यंत मोहयुक्त होणाऱ्यास. ३. मृत्यु. ४. गेलेल्या ( नष्ट झालेल्या ) बुडबुड्याची इच्छा करणाऱ्या बाळाची. ५. स्त्रियेच्या वियोगरूप आपत्तीपासून. 'दयिताविरहज्वलनापासोनि' असें पाठान्तर. ज्वलन=अग्नि. ६. भविष्य जाणणाऱ्यांनीं. 'भविष्यज्ज्ञांनीं' असें पाठान्तर. ७. तूं पहिली ती च रीति पहाशील [ व ] नव रीती न [ पहाशील तर तुझी नवरी उठणार नाहीं ]–असा भावार्थ. पहिली रीति=पुण्यांश देऊन प्रेत उठविणें; नवीन रीति=आपलें आयुष्य देऊन प्रेत उठविणें. ८. ह्या आयुर्दानाच्या योगानें. ९. आपली लीला. १०. आपल्या भाषणाचा. ११. पूर्णता, कोणतेंही काम तडीस नेणें. स्वोक्ताचा निर्वाह केला=आपलें भाषण सिद्धीस नेलें. १२. यमधर्मानें. १३. अत्युत्तम वररूप हस्तानें. १४. संपत्तीनें.

तत्पाणिग्रहणोत्तर[1] भार्गव[2] घे अहिवधव्रत[3] क्रोधी; ।
तो चंड दंडपाणी सर्प वधी; वारुळें, बिळें शोधी. ॥ ४३
तो एकदां वनांत भ्रमतां[4], रुरु निर्विषाहिला[5] पाहे; ।
दंड उगारूनि म्हणे, 'दुष्ट भला पुष्ट भेटला आहे !' ॥ ४४
डुंडुभ[6] म्हणे, 'वधिसि अपराध न करितां किमर्थ ? सांग मला. ।
हा अनपराधभूतद्रोह[7] अहित[8], तदपि विहित, कां गमला ?' ॥ ४५
रुरु त्यासि म्हणे, 'माझी वधिली होती प्रिया खळें[9] नागें[9], ।
त्यां व्याळवधव्रत हें त्यापासुनि[10] घेतलें असे रागें.' ॥ ४६
सर्प म्हणे, 'ते अन्य प्राणघ्न व्याळ, करिति जे दंश; ।
आकृति सम, परि त्यांच्या स्वगुणाचा[11] डुंडुभीं नसे अंश. ॥ ४७
अपराधी दंडावा, किंवा भलता चि जो अनपराधी[12] ? ।
धर्मज्ञा ! केविं तुझी झाली ही पापसाधनपरा[13] धी[14] ?' ॥ ४८
हा ऋषि, ऐसें जाणुनि[15], हेतु पुसे सर्पयोनिंचा[16] अहिला. ।
त्यास्तव सांगे रुरुला डुंडुभ वृत्तांत आपुला पहिला. ॥ ४९
'होतों ब्राह्मणसुत मी. मन्नाम सहस्रपात्. सखा माजा, ।
ज्याचें नाम खगम, तो, मुनिवृंदीं उडुगणीं[17] जसा राजा[18]. ॥ ५०
बाळपणीं, तृणसर्पें[19] भिववुनि, कोपोदयासि त्या खगमीं ।
करिता झालों, आलों तच्छापें या कुयोनिला मग मीं. ॥ ५१
खगमें कथिलें होतें, होइल भृगुच्या कुळांत, त्या रुरुचें ।
दर्शन हरील शापा, तापाला नाशितें जसें गुरुचें. ॥ ५२

---

१. प्रमद्वरेशीं विवाह केल्यानंतर २. रुरु. ३. सर्पांस मारण्याचें व्रत. ४. फिरत असतां, भ्रमण करीत असतां. ५. निर्विष (विषरहित)+अहिला (सापाला)=डुंडुभ जातीच्या सर्पास. ६. दुतोंडें. ७. निरपराधी प्राण्याचें वैर. ८. अकल्याणकारक. ९. दुष्ट अशा नागानें. १०. त्या वेळेपासून. 'तैंपासूनि' असा पाठ असता, तर अर्थ पटकन् लक्षांत आला असता. ११. स्वगुण=सहज-गुण, जन्मसिद्ध गुण, स्वभावधर्म. १२. अन्+अपराधी=निरपराधी. हें गीत्यर्ध सुभाषितरूप आहे. १३. पापाच्या साधनाविषयीं आसक्त. १४. बुद्धि. १५. हा सर्प नसून कोणीतरी ऋषि आहे, असें समजून. १६. सर्पयोनींत जन्मास येण्याचा. १७. नक्षत्रांच्या समुदायामध्यें. १८. चंद्र. राजा=शोभणारा, प्रकाशणारा. १९. गवताच्या सापानें.

तो तूं प्रमतिसुत मला मद्भाग्यें भेटलासि नवसांनीं.' ।
ऐसें वदतां झाला, शापाच्या, दिव्यरूप, अवसानीं[1]. ॥ ५३
प्राप्तस्वरूप तो मुनि मग त्या रुरुला म्हणे, 'अगा ! बापा ! ।
हिंसा तुज योग्य नव्हे, जोडिसि दाटूनि कां महापापा ? ॥ ५४
ब्राह्मणधर्म अहिंसा, सत्योक्ति, तिजी[2] क्षमा, मनीं आण. ।
क्षत्रियधर्म प्रकृति[3]प्रतिपालन, दंड[4], उग्रता[5], जाण. ॥ ५५
जनमेजय भूपाच्या अहिसत्रामाजि भग्नदर्पांतें[6] ।
आस्तीक विप्र यत्नें संरक्षी तक्षकादि[6]सर्पांतें.' ॥ ५६
भार्गव रुरु त्यासि म्हणे, 'कथिला त्वां मज बरा नय[7] मुने ! तें[8] ।
वृत्त कथीं, न उपेक्षीं; गंगा मिळतां त्यजी न[9] यमुनेतें.' ॥ ५७
'इतिहासज्ञ[10] मुनि तुला कथितील' असें म्हणोनि तो विप्र ।
झाला गुप्त; चकोरा क्षुधिता सोडुनि[11] जसा विधु क्षिप्रें[12]. ॥ ५८
हारपला[13] चिंतामणि[14], मणि घ्यावा तों चि काय तो हातें ! ।
बहु शोधें हि न[15] मिळतां, पावे रुरु विप्र शोकमोहातें. ॥ ५९
सावध होउनि गेला; प्रमति[16]प्रति वृत्त सांगता झाला ; ।
मग रुरु तातमुखें तें आख्यान श्रवण करुनियां धाला[17]. ॥ ६०

---

१. शेवटीं. २. तिसरी. 'तशी क्षमा' असें पाठान्तर. ३. प्रजापालन. ४. ( अपराध्यांस ) शासन करणें. ५. तामसीपणा. ( मागें अध्याय २ गीति ९६–९७ पहा ). ६. ज्यांचा गर्व नष्ट झाला आहे, अशा तक्षकादि सर्पांना. ७. नीति. ८. तें वृत्त=जनमेजयराजाच्या सर्पसत्रासंबंधीं वर्तमान. ९. गंगा मिळाली म्हणून यमुनेचा कोणी त्याग करीत नाहीं. त्याप्रमाणें तूं मला नीति सांगितलीस, ती मीं ग्रहण केली. पण तेवढ्यावरच मी संतुष्ट नाहीं. मला आणखी सर्पसत्राचें वृत्त देखील सांग–असा भावार्थ. १०. 'इतिहास हा मुनि तुला' असें पाठान्तर. ११. 'सांडुनि' असें पाठान्तर. १२. लौकर. १३. सांडला. १४. इष्ट वस्तु देणारें रत्न. काय ( जणूं काय ) चिंतामणि हातें घ्यावा तों चि तो मणि हारपला !–असा अन्वय. **उत्प्रेक्षा**लंकार. १५. 'बहु शोधितां न मिळतां' असा पाठभेद. १६. 'प्रमतीतें' असें पाठान्तर. १७. संतुष्ट झाला.

# अध्याय चौथा.

शौनक पुसे; तयाला सौति म्हणे, चरित आयका चारु[1]; ।
होता यायावरकुलतिलक[2] प्रथमाश्रमी[3] जरत्कारु[4]. ॥ १
यतचित्त[5], ऊर्ध्वरेता[6], जितनिद्राहार[7], तरुतळीं राहे; ।
गर्तीत[8] पूर्वजांतें[9], करितां तीर्थाटनासि, तो पाहे. ॥ २
त्यांसि जरत्कारु पुसे, 'कोण तृणस्तोमलग्नपाद[10] असे? ।
गर्तीं अधोमुख तुम्ही लोंबतसां? पावलां विपत्ति कसे? ॥ ३
ज्याचा अवलंब[11] तुम्हां, त्या हि तृणस्तोममूलकासि[12] महा- ।
मूषक खंडितसे कीं, हा शीघ्र चि गर्तपातहेतु[13], अहा!' ॥ ४
भूलोक गर्त, मूषक काल, तृण-स्तंब[14] वंश, हा भाव; ।
संतति[15] नसतां, स्वर्गीं पितरांसि वसावया नसे ठाव. ॥ ५
ते पितर म्हणति, 'आम्ही यायावरनाम ऋषि जनख्यात[16]; ।
आहों पतनोन्मुख[17]; हा होत असे संततिक्षयें घात. ॥ ६
आहे वंशीं, एक चि पुरुष, जरत्कारुनामक, ज्ञानी. ।
परि तेणें, स्त्री न करुनि, केली हे संततिक्षयें हानी. ॥ ७
एक तप चि करितो तो मंद, करीना चि यत्न संतानीं[18]; ।
संतानोत्पादन जरि निंदित, केलें कशासि संतांनीं[19]; ॥ ८
आम्ही च मंदभाग्य; स्वर्गापासूनि होतसों भ्रष्ट; ।
तूं कोण साधु? दुःखितवृत्तें होसील[20] विव्हळ स्पष्ट.' ॥ ९

---

१. चांगलें. २. यायावर नामक ऋषीच्या कुळांतील श्रेष्ठ असा ( जरत्कारु ). ३. ब्रह्मचारी. ४. ऋषिविशेष. ५. ज्यानें चित्ताचें संयमन केलें आहे असा. ६. तेजस्वी वीर्याचा. ७. जिंकिलीं आहेत निद्रा आणि भोजन ज्यानें असा. ८. खळग्यांत. ९. पितरांतें. १०. तृणसमुदायांत गुंतले आहेत पाय ज्यांचे असे. ११. आश्रय. १२. गवताच्या ढिगाच्या मुळ्या. १३. खड्डयांत पडण्यास कारण. १४. गवताची पेंढी. 'तृणस्तोम' असें पाठान्तर. १५. अपत्य ( पुत्र, कन्या इत्यादि ). १६. लोकप्रसिद्ध. १७. अगदीं पडण्याच्या बेतांत. ( मनुस्मृति, अध्याय ९ श्लोक १३७ व १३८ पहा ). १८. संततीविषयीं, पुत्रप्राप्तीसंबंधीं. १९. साधूंनीं. २०. 'होतोसि' असें पाठान्तर.

त्यांसि म्हणे, 'तो[1] मी च. स्वोद्धा[2]राचा प्रयत्न मज सांगा.' ।
ते म्हणति, 'जरत्कारो ! वत्सा ! पुससी कळोनियां कां गा? ॥ १०
स्त्री संपादुनि, जोडीं तीच्या ठायीं विशुद्ध संततिला; ।
तारील ती च आम्हां[3]; म्हणती "व्यसनांत नौव[4]" संत तिलों[5].' ॥ ११
ये[6]रु म्हणे, 'जरि मजला नामें, शीलें, वयें, समा कन्या ।
देतील बंधु भिक्षे जरि, तरि मान्या असे; नसे अन्या. ॥ १२
पोषण न करीन तिचें; स्वल्प हि न तदर्थ वित्त जोडीन; ।
होतां चि गर्भधारण, संगँ[7] तिचा मी स्वतंत्र[8] सोडीन. ॥ १३
विधि[9] हा चि मान्य आहे; त्याहुनि विधि[9] मान्य मज नसे इतर.' ।
ऐसें ऐकुनि म्हणती, 'आम्हांला हें चि लक्षं[10]' ते पितर. ॥ १४
मग पृथिवीवरि फिरला, परि कोठें ही न काम[11] तो घडला. ।
दा[12]रकरग्रहणार्थी साधु जरत्कारु संकटीं पडला. ॥ १५
'कन्याभिक्षार्थी मी विप्र जरत्कारु, वचन माना, व्हा ।
सिद्ध, मला द्या विधिनें, परि ती हि असेल जरि स[13]मानाव्हा.' ॥ १६
यापरि वनांत हाका मोठ्यानें तीन विप्र जों फोडी, ।
तों भगिनीतें आणुनि वासुकि तत्काळ कर तया जोडी. ॥ १७
नौम[14] ? 'जरत्कारु' असें पुसतां कथिलें; दिली तया विधिनें; ।
वरुनि तिला, हर्षविलें निजपूर्वजचित्त त्या तपोनिधिनें. ॥ १८
'जनमेजयसत्रीं निज[15]जननीशापें हुताश[16] भक्षील; ।

---

१. जरत्कारु. २. आपल्या उद्धरणाचा. ३. 'तारील तेचि आम्हां' असें पाठान्तर. ४. नौका. ५. विशुद्ध संततीला. ६. तो ( जरत्कारु ). 'येरीं' असा रा० पराडकर यांच्या प्रतींत पाठ आहे. ७. सोबत, मैत्री. ८. स्वतंत्र=स्वच्छंद, दुसऱ्याचा ताबेदार नव्हे असा. स्वतंत्र [ असा ] मी तिचा संग सोडीन—असा अन्वय. ९. विधान, कर्तव्य. १०. लक्ष=लक्ष्य, उद्दिष्ट, ध्यानांत ठेवण्याजोगा जो अर्थ तो. 'आम्हांला हेचि लक्ष' असें पाठान्तर. ११. इच्छित. १२. भार्येचा हस्त धरण्याची म्हणजे विवाहाची इच्छा करणारा. १३. माझ्या नांवासारखें ( म्हणजे जरत्कारु हेंच ) नांव आहे जिचें अशी. 'परि ती हि असे जरी समानाव्हा' असें पाठान्तर. १४. नाम?=नांव काय? १५. पुढें गीति ७१ पहा. १६. अग्नि. हुत=हवन केलेलें द्रव्य+अश्नाति=खातो तो.

त्या व्यसनीं[1] तेजस्वी भगिनीसुत आपणांसि रक्षील.' ॥ १९
या अर्थे वासुकिनें दिधली अनुजा[2] तयासि आणूनी. ।
शापाचा परिहार श्रीविधिच्या आननें चि जाणूनी. ॥ २०
आस्तीकनामक तिला सुत झाला; अग्नि जेधवां भक्षी ।
जनमेजयसत्रीं, तो जाउनि, हुतशेष[3] मातृकुल रक्षी. ॥ २१
आतां अहिशापाचें कारण सूतात्मजोक्त[4] बोलावें; ।
संक्षेपविस्तरज्ञ श्रोत्यांचें मस्तकाब्ज[5] डोलावें. ॥ २२
कद्रू, विनता कन्या दक्षाच्या, कश्यपर्षिच्या जाया[6]; ।
पतिनें दोघींस दिले वर, झाल्या मागत्या[7] प्रिया ज्या या. ॥ २३
कद्रू समवर्चस[8] दशशत सुत मागे तिला म्हणे तो 'घे.' ।
विनतेस हि दे कद्रूतनुजाधिकशक्ति पुत्रमणि[9] दोघे. ॥ २४
'यत्नें गर्भ धरावे' ऐसा उपदेश आदरें केला. ।
मग तो भगवान् कश्यप तप साधाया तपोवना गेला. ॥ २५
प्रसवे अनल्पकाळें[10] कद्रू अंडीं सहस्र वरदानें. ।
विनता दोनें[11] प्रसवे. दिधलीं पतिनें अभीष्टवरदानें[12]. ॥ २६
वृद्ध्युचितोष्णस्थानीं[13] दासींनीं, पूर्ण पांचशत वर्षे ।
केलीं अंडीं जतन, प्राणांसम, कृपणवित्तसम, हर्षें. ॥ २७
अंडें भेदुनि झाले प्रकट अहिसहस्र[14]; माय सुख पावे; ।
विनता म्हणे, 'अहा ! सुत कां न उपजले? वरें[15] मज हि व्हावे[16].' ॥ २८
फोडी अंडाप्रति तों पाहे पूर्वार्धसिद्ध[17] देहातें; ।

---

१. संकटांत. २. धाकटी बहीण. ३. हवन होऊन बाकी राहिलेलें. ४. सूतपुत्रानें (सौतीनें) सांगितलें तें. ५. शिरकमळ. ६. भार्या. ७. ज्या या ( भार्या ) मागत्या ( वर मागणाऱ्या ) [ त्या ] प्रिया झाल्या—असा अन्वय. ८. समानतेजोयुक्त, सारख्या तेजाचे. ९. पुत्ररत्नें. १०. फार दिवसांनीं. ११. 'दोनि' असा पाठ रा० पराडकर यांच्या प्रतींत आहे. दोनि=दोनी=दोन्ही. १२. इच्छित वर देणाऱ्यानें. १३. वाढण्यास योग्य अशा उष्ण स्थळीं. १४. एक हजार सर्प. १५. वराच्या योगानें. १६. 'व्हावें' असा पाठ रा० पराडकर यांच्या प्रतींत आहे. १७. कंबरेपर्यंतचा भाग तयार झालेल्या.

ताप [1]अधैर्यें विनता आपुलिया आपणासि दे हातें. ॥ २९
क्रोधें तो पुत्र म्हणे, 'तूं [2]जीची धरुनि मानसीं स्पर्धा, ।
करुनि त्वरा, [3]अधीरे ! केला [4]मद्देह हा असा अर्धा; ॥ ३०
या अन्यायें [5]तीची दासी होशील पंच[6]शत अब्द[6]; ।
देवविला शाप तुझ्या कर्मे; लावूं नको मला [7]शब्द. ॥ ३१
जरि दुसऱ्या हि सुताचा [8]घात असा न करिशील, तरि मुक्त ।
[9]दासीत्वापासुनि तुज करिल, असों दे मनांत हें [10]उक्त. ॥ ३२
[11]पंचशताब्दानंतर उपजेल [12]दुजा तुजा सुत, न [13]तूर्ण; ।
जरि रक्षिशील तोंवरि, करिल मनोरथ समस्त परिपूर्ण.' ॥ ३३
विनतेचा प्रथम तनुज अरुण; [14]तरणिसूत जाहला आहे. ।
दुसरा गरुड उपजतां भरला गगनीं; न मंदिरीं राहे. ॥ ३४
झाला क्षुधित, [15]प्रलयानलसा तेजस्विवर्य तो पक्षी ।
[16]क्षुत्पीडाशमनार्थ ब्रह्मयानें अन्न [17]कल्पिलें भक्षी. ॥ ३५
[18]त्या कद्रूची विनता दासी, सुतशापकारणें, झाली, ।
ती च कथा सांगावी, म्हणुनि, अमृतमथनसत्कथा आली. ॥ ३६
[19]चतुराननमुख्यामर सर्व [20]कनकनगशिरीं बसोनि, 'कसें ।
अमृतोत्पादन करणें ?' चिंतिति नारायणासमक्ष असें. ॥ ३७
हरिनें [21]विधिला केलें अमृतप्राप्त्यर्थ युक्तिचें कथन. ।

---

१. उतावीळपणें. २. कद्रूची. ३. उतावीळ स्त्रिये ! अधीरा=जिच्या अंगीं धैर्याचा अभाव आहे अशी, भयादिकांनीं व्याकुल अशी. 'अधीरे !' हें विशेषण येथें सहेतुक योजिलेलें आहे, म्हणून **परिकरा**लंकार. 'अधीरें' असें पाठान्तर. ४. मत्+देह=माझें शरीर. ५. 'या अन्यायें चि तिची' असें पाठान्तर. ६. पांचशें वर्षें. ७. दोष, बोल. ८. 'सुताचा घात न करिसील तरिच तो मुक्त' असाही पाठ आहे. ९. 'दास्यत्वापासुनि' असें पाठान्तर. १०. [ हें माझें ] बोलणें, भाषण. ११. पांचशें वर्षांनंतर. १२. 'उपजेल दुजा स्वयें सुत' असें पाठान्तर. १३ लवकर. १४. सूर्याचा सारथी. १५. प्रळयकाळच्या अग्नीसारखा. १६. भुकेची बाधा दूर होण्याकरितां. १७. उत्पन्न केलेलें. १८. 'ज्या कद्रूची' असें पाठान्तर. १९. चतुरानन+मुख्य+अमर=चतुर्मुख ( ब्रह्मदेव ) मुख्य आहे ज्यांत असे देव. २०. मेरुपर्वताच्या शिखरावर. २१. ब्रह्मदेवाला.

'मंदरनगें[1] करावें लवणोदधिचें[2] सुरासुरीं मथन.' ॥ ३८
प्रभुमंत्रें[3] संधि[4] करुनि, झाले एकत्र देवदैत्य, मग. ।
यत्न करिति, परि त्यांच्या वीर्यें नुचले चि मंदराख्य नग. ॥ ३९
अकरा सहस्र योजन[5] तो[6] वरि, तितुका चि भूमिच्या पोटीं. ।
उचलेना गिरि, देवांदैत्यांचीं भागलीं[7] बळें मोटीं. ॥ ४०
नारायणासि अचलोद्धरणाची[8] युक्ति तेधवां सुचली; ।
आज्ञापितां अनंता[9], तो भगवान् तत्क्षणीं तया उचली. ॥ ४१
नेला नग सिंधूप्रति, झाला आधार कूर्मराज तळीं. ।
वासुकि मंथनरज्जु[10], भ्रमविति सुर, असुर त्यासि अब्धिजळीं[11]. ॥ ४२
मुख जिकडे वासुकिचें धरिती तिकडे चि ते असुर मानी[12]; ।
तद्गरलज्वालांनीं[13] प्राणांची निश्चिता चि जरि हानी. ॥ ४३
दैत्यांनीं वासुकिचें त्यजिलें जें काय[14] मानुनी तुच्छ, ।
तें धरिलें देवांनीं, स्वहितकरप्रभुवरोदितें[15], पुच्छ. ॥ ४४
विषधूमार्चिस्पर्शश्रांतां[16] करि शांत शक्र जलदांनीं[17]. ।
त्यां श्रमशिथिलभुजांतें[18] प्रभु झाला मुक्तहस्त[19] बलदानीं[20]. ॥ ४५
मथितां सिंधूतूनि प्रथम प्रकटे कलानिधी[21] सोमें[22]; ।
तो धवलात्मा धवली[23] स्वांशुपटें[24]करुनि दिङ्मही‌व्योम[25]. ॥ ४६
झाली प्रकट मग श्रीदेवी; देवी सुरा[26] मग निघाली; ।

---

१. मंदराचलानें. नग=पर्वत. २. क्षारसमुद्राचें. ३. मंत्र=गुप्तवाद, एकांतीचा विचार. ४. द्रव्यादि देऊन शत्रूंशीं स्नेह करणें, संघटण. ५. चव्वेचाळीस हजार कोस. योजन=चार कोस लांबीचें प्रमाण. ६. पर्वत. ७. थकलीं, दमलीं. ८. पर्वत उचलण्याची. 'अचलोद्धाराची' असें पाठान्तर. ९. शेषाला. १०. [ ताक ] घुसळण्याची दोरी. रज्जु=दोरी, चऱ्हाट. ११. समुद्राच्या पाण्यांत. १२. अभिमानी. १३. त्या वासुकीच्या विषज्वालांनीं. १४. शरीर. १५. स्वकीयांचें हित करणारा जो प्रभुश्रेष्ठ, त्याच्या भाषणानें. १६. विषाच्या धूमयुक्त ज्वाळांच्या स्पर्शानें थकलेल्यांस. १७. मेघांनीं. १८. श्रमानें थकले आहेत बाहू ज्यांचे त्यांस. १९. सढळ हाताचा, उदार. २०. शक्ति देण्याविषयीं. २१. षोडशकलापूर्ण. २२. चंद्र. २३. शुभ्र करी, उजळी. २४. आपल्या किरणरूपी वस्त्रानें. २५. दिशा, पृथ्वी व आकाश. २६. मद्य.

प्रकटे धवल तुरग[1] मग, जो झगमग[2] आपुली गगनिं घाली. ॥ ४७
कौस्तुभ मणि प्रकटला, श्रीसह घे श्रीपति स्वयें त्याला; ।
मग, अमृतकमंडलुकर[3], भगवान् धन्वंतरि प्रकट झाला. ॥ ४८
श्वेत, चतुर्दंत; करी[4] ऐरावत जन्मला, तया हरि[5] घे; ।
हयपतिस[6] हि घे; तैसें कवणाच्या रत्न मानसीं न रिघे? ॥ ४९
अतिनिर्मथनें[7] प्रकटे अतिदारुण[8] काळकूट-नाम गर[9] ।
तद्गंधें[10] विश्व विकळ झालें, जैसें दवानळें[11] नगर. ॥ ५०
दहनव्यसन शमाया प्रार्थावा जलद त्या जसा नगरें; ।
शंभु विनविला विश्वें, कीं खावें आपणासि या न गरें. ॥ ५१
ब्रह्मप्रार्थित शंकर, त्या त्रिजगद्ग्रासासिद्धपाप्याला[12], ।
तत्काळ चि, लीलेनें, विश्वावरि करुनियां कृपा, प्याला[13]. ॥ ५२
कंठीं च विष धरि प्रभु; त्यास्तव आणी निकी[14] मनीं लाभ; ।
कीं अतुल यश मिळालें; कंठ हि शोभे निकाम[15] नीलाभ[16]. ॥ ५३
धन्वंतरिपासुनि तो अमृतकमंडलु बळें असुर हरिती; ।
करिती चिंता निर्जर[17]; जाणे त्यांचा अभीष्टकर हरि ती[18]. ॥ ५४
अद्भुत ललनारूप[19] स्वीकारुनि, विश्वरूप हरि, त्यांचें ।
प्रथम हृदय, मग अमृत हि हरि[20], अप्रार्थित बळें चि हरित्यांचें[21]. ॥ ५५
प्राप्त हि अमृत करींचें, स्त्रीसंगें जाय, हें जना कळवी; ।

---

१. घोडा. २. झकाकी, लकाकी. ३. अमृतानें भरलेला कमंडलु ( पात्रविशेष ) ज्याच्या हातांत आहे, असा. ४. हत्ती. 'करी ऐरावण' असें पाठान्तर. ५. इंद्र. ६. अश्वश्रेष्ठ उच्चैःश्रव्यास. ७. फार मंथन केल्यामुळें. ८. फार भयंकर. ९. विष. १०. तत्+गंधें=त्या विषाच्या दर्पानें. ११. दव+अनळें=अरण्य+अग्नीनें=वणव्यानें. १२. स्वर्गमृत्युपाताळांस खाण्याकरितां सिद्ध झालेल्या पापी अशा काळकूटाला. १३. शंकर प्याला–असा अर्थ. १४. पुरता, पूर्ण. १५. फार चांगला १६. नीलवर्ण. १७. देव. निर्जर=ज्यांना जरा ( वृद्धावस्था ) नाहीं, ते. १८. चिंता. १९. सुंदर तरुणीचें रूप. २०. हरण करी. २१. त्यांचें हरित्यांचें ( ते जे अमृत हरण करणारे असुर त्यांचें ) बळें चि ( बळेंच, मुद्दाम ) अप्रार्थित ( ज्याविषयीं प्रार्थना–याचना–केलेली नाहीं असें ) हृदय प्रथम [ व ] मग अमृत हि हरि–असा अन्वय.

[1]प्रभु, [2]दृक्पातें, [3]हसितें, भुलवुनि, सर्वस्व जोडिलें पळवी. ॥ ५६
जे जे साधु, स्वाश्रित, त्यांतें तें अमृत मोहिनी वाढी. ।
तात्पर्य अमृतमथनीं ऐसें [4]मणिगर्भकार हें काढी. ॥ ५७
[5]सुररूप असुर राहु प्राशी अमृतासि, तें तरणि इंदु ।
सूचविति, तों चि हरि [6]हरि [7]अरिनें अरिशिर, गिळों न दे [8]बिंदु. ॥ ५८
**गुरुचा प्रसाद नसतां अमृत न पावे असाधुजन कपटें.** ।
हें कळविलें बुधांतें अमृत पितां वधुनि राहु [9]कनकपटें. ॥ ५९
तें [10]गगन-ग राहुशिर द्वेषें अद्यापि रविविधु-ग्रास ।
करितें, कवि [11]अघभीरु चि बहु भीति अघा तया चि [12]उग्रास. ॥ ६०
राहून्मथनीं झाला अतुल, तुमुल, [13]दितिजदनुजनाकि-रण. ।
रविचे शररेणुपटल[14]पटधिकृत न दिसती जना किरण. ॥ ६१
नर[15]शरगणें, चतुर्भुज[16]चक्रें, झाले असंख्य [17]असु-रहित. ।
अमृतें न तसें होतें, [18]रणमरणें होय फार असुर-हित ॥ ६२

---

१. मोहिनीचें रूप घेतलेला प्रभु ( विष्णु ). २. दृष्टिक्षेपानें, नेत्रकटाक्षानें. ३. हास्यानें. ४. हा व्यासरचित भारतावरील एका टीकेचा कर्ता आहे. ५. देवाचें रूप ज्यानें घेतले आहे असा. ६. हरण करी, च्छेदी. 'सूचवि तोचि हरि हरी अरिनें अरिशिर' असें पाठान्तर. येथील 'रि' ची आवृत्ति चमत्कृतिजनक आहे. येथें **अनुप्रासा**लंकार आहे. ७. चक्रानें. ८. [अमृताचा] थेंब. ९. पीतांबरधारी कृष्णानें. १०. आकाशांत उडालेलें. ११. पातकास भिणारे. १२. तया चि ( त्याच ) उग्रास ( रौद्रस्वरूपी राहुशिरास ) [ व ] अघा ( दोषास, राहु अमृतप्राशन करण्याच्या बेतांत आहे असें सूर्य व चंद्र यांनीं सुचविलें त्या दोषास ) अघभीरु चि कवि बहु भीति–असा अन्वय. अघा=सूचकत्व दोषास–**पंत**. १३. दैत्य, दानव व देव यांचें युद्ध. ( नाक=स्वर्ग, नाकी=स्वर्गांत राहाणारे, देव ). १४. शर+रेणु+पटल+पट+धिकृत=बाण आणि धूलि यांच्या समूहरूपी वस्त्रानें आच्छादित. १५. नर-मुनीच्या बाणसमुदायांनीं. ह्या युद्धाच्या वेळीं नरनारायण युद्ध करण्यास आले होते. म्हणून नरमुनीच्या बाणांचा उल्लेख केला आहे. 'सुर–शर–गणें' असें पाठांतर. १६. चतुर्भुज अशा विष्णूच्या सुदर्शन नामक चक्रानें. १७. गतप्राण, मृत. १८. धारातीर्थीं मरण आल्यामुळें. वीरांना युद्धांत मरण आल्यानें स्वर्गप्राप्ती होते, असें शास्त्रांत सांगितलेलें आहे. 'हतो वा प्राप्स्यसि स्वर्गं जित्वा वा भोक्ष्यसे महीम्' [ भगवद्गीता, अध्याय २।३७ ] हें भगवंतांचें वचन प्रसिद्धच आहे. ही कल्पना आपल्या पूर्वजांच्या मनावर पक्की ठसली होती. कालिदास-पूर्वकालीन कवि भास ह्याच्या 'कर्णभार' नामक नाटकांत पुढील श्लोक आढळतो:—हतोऽपि लभते स्वर्गं जित्वा तु लभते यशः । उमे बहुमते लोके नास्ति निष्फलता रणे. ॥

अमृतार्थ युद्ध दारुण केलें, ती बहु कथा असो, यत्नें ।
सिंधूंतूनि चतुर्दशसंख्यार्क[1] प्रकट जाहलीं रत्नें. ॥ ६३

'त्यांतिल हरि[2] किंवर्ण[3]?' स्वसपत्नीला असें पुसे कद्रू ।
निजमत्सर वृद्धिंगत सत्वर व्हाया, जसा सुसेक[4] द्रू[5]. ॥ ६४

विनता म्हणे, 'भगिनि ! त्या हयपतिचा वर्ण निश्चयें धवळ;[6] ।
तूं तर्के वद कैसा? पाहूं जाऊनियां तया जवळ[7].' ॥ ६५

कद्रू म्हणे, 'नसे तो धवल, असे कालवाल[8], हें साचें.' ।
विनता म्हणे, 'दुधाच्या मित्र चि तें अश्वरत्न[9] फेंसाचें.' ॥ ६६

कद्रू म्हणे, 'करीं पण.' तेव्हां विनता म्हणे, 'जिचें लटिक ।
होईल, तिणें व्हावें, जीचें तर्कित[10] खरें, तिची बेटिक[11]. ॥ ६७

व्याळांची माय म्हणे, 'बहु बरवें, आजि तों असो, राहूं; ।
दोघी उद्यां चि जाउनि उच्चैःकर्णाप्रति[12] स्वयें पाहूं.' ॥ ६८

निश्चय करूनि ऐसा, कद्रू सांगे सुतांसि गूढ[13] पण[13]; ।
शिकवी कुमति, स्वमुखें प्रकट करी आपुलें चि मूढपण. ॥ ६९

'अंजननिभ[14] केश तसे होऊनि शिरीं[15] तुरंगपतिपुच्छीं.' ।
ऐसें कपट शिकवितां, ते स्वमतीं[16] घालिती न मन तुच्छीं[16], ॥ ७०

त्यांसि म्हणे, 'जनमेजयसत्रांत जळाल,' तों 'तथास्तु' तिला ।
विधि हि म्हणे; करि, करितां पूर्ण स्वमहामनोरथा, स्तुतिला. ॥ ७१

विधि कश्यपासि सांगे, 'जगदहितभुजंग[17]शाप मज रुचला; ।

---

१. चौदा आहे संख्या ज्यांची अशीं. २. घोडा. ३. कोणत्या रंगाचा? ४. उत्तम प्रकारचें पाणी घातलेला. ५. वृक्ष. ६. पांढरा. ७. जवळ जाऊनियां तया पाहूं—असा अन्वय. ८. काळ्या केंसांनीं युक्त, काळ्या केंसांचा. ९. तें अश्वरत्न दुधाच्या फेंसाचें मित्र चि [होय]—असा अन्वय. फेंसाचें मित्र=फेंसासारखें शुभ्र. येथें **पर्यायोक्त** अलंकार आहे. १०. कल्पना, तर्कानें ठरविलेलें जें, तें. ११. दासी. हें पंतांच्या ठरींव यमकांपैकीं एक आहे. पुढें गीति ७५ व सभापर्व, अध्याय ५।७३ पहा. १२. उच्चैःश्रव्याप्रत. ( उच्चैःश्रवा=ज्याचे कान उंच आहेत असा ). १३. गुप्त. पण=पैज १४. काजळासारखे. १५. प्रवेश करा. १६. स्वमतीं तुच्छीं=सु+अमत=सज्जनांस अमान्य, अशा तुच्छीं=तुच्छ ( क्षुद्र ) गोष्टींत. १७. जगत्+अहित+भुजंग+शाप=जगाला शत्रूसारख्या अशा सर्पांना दिलेला शाप.

खेद तुवां न करावा; होणारासारिखा तिला सुचला.' ॥ ७२
प्रातःकाळीं कद्रू—विनता लंघूनि जलधिला, [1]खं-पथें ।
गेल्या अश्व पहाया, [2]दासीपण करुनि [3]दृढ पुन्हा शपथें. ॥ ७३
जातां, विनता अश्वीं [4]कद्रूक्ता [5]कालवालता पाहे; ।
पावे वल्ली, भरितां जेविं विषें [6]आलवाल, तापा हे. ॥ ७४
हयपुच्छवर्ण फिरवुनि, ऐसा कपटें करूनि लटिक पण, ।
कद्रूनें [7]आत्मोचित विनतेसि दिलें बळें चि बटिकपण. ॥ ७५
तेव्हां विनतेमागें झाला उत्पन्न गरुड [8]पावकसा. ।
[9]त्रस्त सुर म्हणति, 'अग्ने ! आटोपीं [10]स्वोग्र तेज, पाव कसा.' ॥ ७६
अग्नि म्हणे, 'तो विनतासुत, गरुड, खगेंद्र; [11]जाणतां अरुणा, ।
[12]तदनुज तो साधु तुम्हां देवांवरि करिल सर्वदा करुणा.' ॥ ७७
सुरमुनि दुरूनि विनतापुत्राला मग करूनियां [13]प्रणती, ।
स्तवुनि यथामति, जोडुनि कर, '[14]जगदभयार्थ सौम्य हो' ह्मणती. ॥ ७८
होउनि सौम्यतनु गरुड त्यांसि म्हणे, 'म्यां स्वतेज आवरिलें, ।
सोडावें [15]तें, तुमच्या [16]हृदयांनीं, न समजोनि, [17]ज्यां वरिलें.' ॥ ७९
देतां अभय असें, ते वंदुनि गेले तया [18]सत्करुणातें; ।
[19]सिंधुपरतटा गेला पृष्ठीं वाहोनि गरुड अरुणातें. ॥ ८०
[20]पूर्वोदधिपरपारीं गरुडें नेऊनि ठेविला अरुण; ।
रवि जैं झाला होता, [21]करावया विश्व भस्म, [22]निष्करुण. ॥ ८१
रविचा क्षोभ असा कीं, '[23]सूचविला सुरहितार्थ जो अरि तो ।

१. आकाशमार्गानें. २. मागें गीति ६७ पहा. 'दासीपण करूनियां पुन्हा शपथें' असाही पाठ आहे. ३. पक्कें. ४. कद्रूनें म्हटल्याप्रमाणें. ५. केंसांचा काळेपणा. 'कद्रू अश्वाला कालवालता पाहे' असा पाठभेद. ६. अळें ( झाडाच्या मुळास पाणी राहाण्यास्तव करितात तें ). ७. आपणास योग्य असें, तिच्या कपटी स्वभावास शोभण्यासारखें. ८. अग्नीसारखा. ९. भय पावलेले. १०. आपलें प्रखर. ११. तुम्ही अरुणाला जाणतच आहांत. १२. त्या अरुणाचा धाकटा भाऊ. १३. नमस्कार. १४. जगाला अभय देण्याकरितां. १५. भय. १६. 'हृदयानें' असें पाठान्तर. १७. भयास. १८. सदयातें. १९. समुद्राच्या पलीकडील तीरास. २०. पूर्व-समुद्राच्या परतीरावर. २१. 'करवाया' असें पाठान्तर. २२. निर्दय. २३. मागें गीति ५८ पहा.

राहु, स्ववध करविला म्हणउनि, पीडा सुदुःसहा करितो. ॥ ८२
सर्व उदासीनपणें पाहति, आम्हांसि देउनी भरिला[1]; ।
प्राशाया अमृताला आपण सिद्ध, न सहावया[2] अरिला[2]. ॥ ८३
या क्षोभें, अस्ताप्रति गेल्यावरि, सर्वलोक तापवुनी ।
बहु विकळ करी रात्रौ; ग्रीष्मींच्या ही तसा न ताप वुनीं[3]. ॥ ८४
कथिति महर्षि सुरांला, 'ताप नुगवतां[4] हि देतसे अर्क[5]; ।
भस्म करील जगत्रय उदयानंतर असा दिसे तर्क.' ॥ ८५
सुर म्हणति, 'चला जाऊं, कळवूं विधिला.' तसें चि मग करिती. ।
सूर्याभिप्राय कथुनि, विधि सांगे युक्ति जी तिला वरिती[6]. ॥ ८६
भानुपुढें अरुणाचें स्थापन, गरुडासि सांगवुनि, करवी; ।
पात्र अकाळ[7]त्रिजगन्नाशापयशासि होय तो न रवी. ॥ ८७
जलनिधिच्या परपारीं गेला मातेसमीप मग पक्षी[8]. ।
आधिमलिन[9] मुख न तिचें, नतिचें[10] भाजन[11] पदांबुज चि, लक्षी[12]. ॥ ८८
दासी होउनि कद्रूचरणयुगीं सर्वदा असे विनता[13] ।
कपटजिता[14] दक्षसुता खगपतिमाता महासती विनता[15]. ॥ ८९
तीतें दे ताप सदा सर्वांगीं जेविं वाढली दद्रू[16]. ।
एके[17] दिवसीं सांगे न्याया द्वीपांतरासि ते कद्रू. ॥ ९०
घे स्कंधीं कद्रूला विनता, नागांसि गरुड ही वाहे. ।
तेजस्वी परि मातृस्नेहें स्वातिक्रमासि[18] तो साहे. ॥ ९१
नागांसि रामणीय[19]द्वीपा नेतां, नभःपथें[20], पक्षी ।

---

१. आम्हांला भर देऊन, आम्हांला स्फेम चढवून. २. शत्रूकडून होणारा त्रास सहन करावयास. ३. वुनीं=उनीं, उन्हांत. पंत 'उ' व 'वु' यांमध्यें अभेद मानितात. ४. न+उगवतां=उदय न झाला तरी. ५. सूर्य. ६. स्वीकारिती. ७. अकाळीं जो त्रैलोक्याचा नाश, तेंच अपयश (अपकीर्ति), तिला. ८. गरुड. ९. मनोव्यथेनें निस्तेज झालेलें. १०. नमस्काराचें. ११. पात्र. १२. पाहे. [ गरुड ] तिचें (विनतेचें) आधिमलिन मुख न [ पाहे ], नतिचें भाजन (नमस्कारार्ह, पूज्य असें) पदांबुज चि लक्षी—असा अन्वय. गरुडानें इतर कोणत्याही गोष्टीकडे लक्ष न देतां, प्रथम आपल्या मातेच्या पायांवर मस्तक ठेविलें—असा भाव. १३. विनम्रा. १४. कपटानें जिंकलेली. १५. गरुडमाता. १६. खरूज. १७. 'एके समयीं' असें पाठान्तर. १८. आपल्या उल्लंघनास म्हणजे अमर्यादेस. १९. रामणीय नामक बेटांत. २०. आकाशमार्गानें, आकाशांतून.

सूर्यासमोर चि उडे, व्याळांची विकळता[1] न तो लक्षी. ॥ ९२
तेव्हां इंद्रासि म्हणे **कद्रू**, जोडोनियां स्वकर, 'पावें.' ।
इंद्र हि वृष्टि करी कीं, अहिकुळ तीव्रातपें[2] न करपावें[3]. ॥ ९३
गेली द्वीपा सगुता **कद्रू**; तें स्थान, जेविं नाकवन[4], ।
दे सुख त्यांला, जेसें साधूचें सर्व सज्जनां कवन[5]. ॥ ९४
**गरु**डाला अहि ह्मणती, 'याहुनि ही स्थळ असेल जें रम्य, ।
तेथें आह्मांला ने; सामर्थ्यें सर्व तुज असे गम्य[6].' ॥ ९५
**गरु**ड ह्मणे मातेला, 'ऐकावें पन्नगोक्त[7] म्यां कां ? गे !' ।
अश्रुमुखी[8] ती **वि**नता पुत्राला सर्व वृत्त ही सांगे. ॥ ९६
नागांला **गरु**ड पुसे, 'उक्त[9] कराया असें चि उद्युक्त; ।
सांगा तुमच्या दास्यापासुन होईन मी कसा मुक्त ?' ॥ ९७
अहि ह्मणति, 'अमृत जरि तूं आणुनि देशील, मुक्त होशील. ।
नाहीं तरि तुजसह तव माता हें दास्य नित्य सोशील.' ॥ ९८
तें मान्य करुनि, सांगे मातेला; मग ह्मणे, 'न कुत्सा[10] हें ।
भुजयुग[11] पावो, जातों अमृतानयनार्थ[12] आजि उत्साहें. ॥ ९९
परि भक्षावें काय ? क्षुद्बाधा[13] दारुणा, वदें युक्ती; ।
तनुमतिसामर्थ्यातें[14] कारण सर्वांसि पाहिजे भुक्ती[15].' ॥ १००
**वि**नता ह्मणे, 'पयोनिधिकुक्षींत[16] निषाद[17] फार आहेत, ।
ते खा; आणुनि अमृत, क्षिप्र[18] करीं मुक्त, पुरविं हा हेत. ॥ १०१
ब्राह्मण मात्र न खावा; तद्घातें[19] होय आपुला घात; ।

---

१. घाबरगुंडी, दु:स्थिती. २. प्रखर उन्हानें. ३. 'तापावें' असें पाठान्तर. येथपर्यंत **पं**तांनीं मूळांतील २६ अध्यायांचा सारांश ग्रथित केला आहे. ४. नंदनवन. ५. साधूचें कवन=सज्जनाचें गुणवर्णन ज्यांत केलेलें आहे, असें काव्य. ६. गमनीय, जाण्यास शक्य असें. 'तेथें आम्हां नेईं, सामर्थ्यें तुज खगा असे गम्य' असें पाठान्तर. ७. सर्पांचें सांगणें. ८. मुखावर दु:खाश्रु गळत आहेत जिच्या, अशी. ९. सांगाल तें, आज्ञा कराल ती. १०. निंदा, तिरस्कार. हें भुजयुग कुत्सा न पावो–असा अन्वय. ११. बाहुयुग; ( पण गरुडाच्या बाबतींत पक्षयुग ). १२. अमृत आणण्यासाठीं. १३. क्षुत्+बाधा=भुकेपासून होणारी पीडा. १४. तनु व मति यांच्या सामर्थ्यातें, शरीर व बुद्धि यांचें सामर्थ्य संपादण्यासाठीं. १५. भोजन. १६. समुद्राच्या तीरावर. १७. मासे मारणारे कोळी. १८. सत्वर, लौकर. १९. तत्+घातें=ब्राह्मणाच्या घातानें.

दहन, रवि, शस्त्र, विष, तो[1]; जोडावे त्यासि सुमतिनें[2] हात. ॥ १०२
चिन्ह[3] पुससि तरि कंठीं जाळील[4], तयावरूनि वळखावा. ।
विप्रें[5] करूनि निराळा, त्वां सर्व निषादलोक खळ खावा. ॥ १०३
तव पक्षांतें मारुत, पृष्ठातें[6] चंद्रसूर्य रक्षोत; ।
वन्हि शिरातें; तनुतें वसु[7]; वत्सा ! विघ्नें[8] तुज न लक्षोत.' ॥ १०४
आशीर्वादें सुखवुनि, आज्ञा दे पादपंकजीं विनता[9]; ।
मग तो तैसें चि करी वदली होती जसें सती विनता[10]. ॥ १०५
वृंदावनीं[11] अजगरें मोहुनि गिळिले निषाद सर्व, तसे ।
जठरानळांत झाले भस्म, प्रळयानळांत पर्वतसे. ॥ १०६
तेव्हां गरुडें, पसरुनि मुख, गिळिले बहु सहस्र ते कोळी. ।
तेव्हां कंठीं एक ब्राह्मण अंगार[12]राशिसा पोळी[13]. ॥ १०७
त्याला खग 'नीघ' ह्मणे, परि न निघे विप्र तो विषादी[14] तें ।
मरण तसें मान्य करी; मग सोडी तत्प्रियां[15] निषादीतें. ॥ १०८

---

१. ब्राह्मण. तो दहन ( अग्नि ), रवि ( सूर्य ), शस्त्र [ व ] विष [ यांसारखा पीडा करणारा असतो ]–असा भाव. 'अग्निरर्को विषं शस्त्रं विप्रो भवति कोपितः' असें मूळांत आहे ( अध्याय २८।४ पहा ). २. सज्जनानें, साधु पुरुषानें. ३. ओळखण्याची खूण. ४. घशाशीं जळजळ करील, आग उत्पन्न करील. ५. ब्राह्मणास सोडून. ६. पृष्ठ=पाठ. चंद्र व सूर्य हे तुझे पाठिराखे ( रक्षणकर्ते ) असोत–असा भाव. 'पक्ष्मांतें...रक्षोत' असें पाठान्तर. पक्ष्म=डोळ्याच्या पांपणीचे केश, नेत्रलोम. ७. वसु नामक देव. हे आठ आहेतः—धरो ध्रुवश्च सोमश्च अहश्चैवानिलोऽनलः । प्रत्यूषश्च प्रभासश्च वसवोऽष्टाविति स्मृताः ॥ ८. अडथळे, प्रतिबंधक निमित्तें. 'विघ्न' हा शब्द संस्कृतांत पुल्लिंगी आहे. ९. नम्र असा जो गरुड, त्याला. १०. 'सती जशी विनता' असें पाठान्तर. ११. येथें पुढील कथाभाग अनुसंधेय असावा असें दिसतेंः—एके काळीं सुदर्शन नामक विद्याधर हा अंगिरा ऋषीस हंसल्यामुळें, 'तूं सर्प होशील' असा त्यास ऋषीनें शाप दिला. त्याप्रमाणें हा अंबिकावनांत सर्प होऊन पडला. पुढें गोपालांसह नंद तेथें यात्रेस गेला असतां, ह्या सर्पानें त्या सर्वांस गिळिलें. तेव्हां कृष्णानें याजपासून सर्वांची सुटका करून, याचा उद्धार केला. ( भागवत, दशमस्कंध, अध्याय ३४ ) अजगरानें निषादांस केव्हां व कां गिळिलें, ही कथा आम्हांस माहीत नाहीं. [ जसे ] वृंदावनीं [ वृंदावनांतील लोक ] अजगरें गिळिले, तसे [गरुडें] सर्व निषाद मोहुनि गिळिले–असा अन्वय करणें बरें. मोहून=घाबरवून. १२. निखाऱ्यांच्या ( विस्तवाच्या ) राशीसारखा. १३. जाळी. १४. दुःखी, उदासीन, निराश. १५. गरुड सर्व निषाद खाऊन टाकीत असतां चुकून त्यानें एक ब्राह्मण गिळिला. परंतु विनतेनें ब्राह्मण

भक्षूनि निषादांतें, वंदी जाऊनि कश्यपासि मग. ।
आशी:कुशलप्रश्नें[1] तातें केला प्रसन्नचित्त खग. ॥ १०९
वृत्त कथुनि, गरुड ह्मणे, 'आलों ताता! त्वदंघ्रि[2] देखाया; ।
अमृताहरणा[3] जातों, क्षुत्परिहारार्थ[4] अन्न दे खाया.' ॥ ११०
कश्यप म्हणे, 'सुता! या कासारीं[5] एक[6] कूर्म जो राहे, ।
तो उन्नत[7] त्रियोजन, दशयोजनमंडल स्वयें आहे. ॥ १११
गज हि वनीं एक असे सा[8] गावें उच्च, आयत[9] हि बारा; ।
ते भक्षावे; म्यां हा तुज वत्सा! अंडजा[10]! दिला चारा. ॥ ११२
गज सुप्रतीकनामा मुनि, जो कच्छप विभावसू तो, ते ।
झाले असे स्वशापें धनलोभें, अनुज[11]-अग्रजनि[12] होते. ॥ ११३
अद्यापि पूर्ववैरें कलह करिति, उठति त्या गजीं, कूर्मीं, ।
दृक्पातवातयोगें[13] क्रोधविषाब्धींत तापकर कूर्मी[14].' ॥ ११४
आशीर्वाद निरोप हि दे, मग खगपति तसें चि करि तो, घे ।
एकें चि नखें कच्छप, गज ही एकें चि, उचलिले दोघे. ॥ ११५
करिकच्छपधर[15]-खगवर तो जाय उडोनि मेरुच्या शिखरीं. ।

---

ओळखण्याची खूण त्यास सांगून ठेविलेली असल्यामुळें ब्राह्मण घशांत जातांच, त्याच्या घशाशीं आग होऊं लागली. तेव्हां गरुडानें त्या ब्राह्मणास बाहेर पडण्यास सांगितलें, पण तो तसें करीना. कारण त्याची प्रिया एक निषादी होती. तिला गरुडानें गिळिलें होतें व त्यामुळें तो विरहदु:खानें व्याकुळ होऊन मरणास तयार झाला होता. तेव्हां गरुडानें त्या दोघांसही घशांतून बाहेर काढिलें—अशी कथा आहे.

१. आशीर्वाद देऊन व कुशलप्रश्न विचारून आनंदित केलें आहे चित्त ज्याचें असा. २. तुझे पाय. ३. अमृत+आहरणा=अमृत+हरण करणें=अमृत हरण करून आणण्यासाठीं. 'अमृतहरणासि' असें पाठान्तर. ४. क्षुधानिवारणार्थ. ५. सरोवरांत. ६. 'कूर्मराज जो राहे' असें पाठान्तर. ७. उंच. योजन=चार कोस. मंडल=घेर. ८. सहा. ९. लांब. १०. अंड्यापासून उत्पन्न झालेल्या (पक्ष्या!). ११. कनिष्ठ. १२. वडील. विभावसु हा एक महर्षि होता. तो मोठा रागीट असे. महान् तपस्वी सुप्रतीक हा त्याचा पाठचा भाऊ होता. ह्याला आपलें धन वडील भावाजवळ एकत्र असणें आवडेना. यामुळें त्यांचें भांडण होऊन त्यांनीं एकमेकांना शाप दिले (मूळांतील अध्याय २९ पहा). १३. दृष्टादृष्टरूप वाऱ्याच्या योगानें, एकमेकांनीं एकमेकांस पाहातांच. १४. कु+ऊर्मी=दुष्ट लाटा, भयंकर लहरी. एकमेकांस पाहातांच त्यांस अतिशय संताप येतो—असा भाव. 'ऊर्मी' असें पाठान्तर. १५. करि+कच्छप+धर+खगवर=हत्ती व कूर्मराज यांस धारण करणारा पक्षिश्रेष्ठ.

आश्रय द्याया [1]त्याचीं [2]गुरुतरुवनें हि त्यासि खरीं. ॥ ११६
आश्रय वृक्ष न देती, कांपति; मग खग ह्मणे, 'करूं कैसें ?' ।
तों एक वट वदे, 'ये, [3]मच्छाखेवरि खगेश्वरा ! बैसें. ॥ ११७
[4]शतचर्मतंतुमाजि न [5]मायाची, आणि लांब शत गावें ।
भंगे वसतां चि; तिचें त्या गुरुभारें स्वधैर्य न [6]तगावें. ॥ ११८
पाहे जों शाखेला तों तीच्या आश्रयें [7]अधस्तुंडें ।
श्री[8]वालखिल्यवृंदें लोंबत होतीं, तपोग्निचीं कुंडें. ॥ ११९
नाश न पावावीं तीं [9]दिव्यतपःश्रीविलासिनीसदनें, ।
ह्मणउनि, पडतां चि धरी शाखेला वैनतेय तो वदनें. ॥ १२०
[10]गजकच्छपशाखाधर गरुड उडाला, नभीं बहु श्रमला; ।
[11]मुन्यवनाधिभरें चि, न शाखादिभरें करोनि, तो श्रमला. ॥ १२१
मग, गंधमादनाप्रति जातां, पाहे पिता, ह्मणे. 'बा ! हें ।
साहस न करीं, तुजला भस्म न मुनिवर करोत [12]हे, राहें.' ॥ १२२
प्रार्थुनि ह्मणे [13]मुनींप्रति, '[14]मजवर करुणा करूनि, हे शाखा ।
सोडा, सयश जोडा, व्यसनीं वि[15]नताप्रजा तुम्ही राखा.' ॥ १२३
ते मुनि त्या शाखेला सोडुनि गेले हिमालया, मग, [16]तीं ।
तातकथित विजयनगीं गरुडें त्यजितां चि, कांपिली जगती. ॥ १२४
ज्यावरि शाखा त्यजिली, त्या चि [17]नगशिरीं बसोनियां, पक्षी ।
त्या [18]स्वचरणनखरशिखरलग्नद्विपकच्छपांसि तो भक्षी. ॥ १२५

---

१. मेरुपर्वताचीं. २. प्रचंड वृक्षांचीं अरण्यें. ३. माझ्या खांदीवर. ४. त्या फांदीचा घेर एवढा मोठा होता कीं, चामड्याच्या शेंकडों वाद्यांमध्यें ती मावली नसती—असा भावार्थ. ( पण प्रत्येक वादीची लांबी किती ? ) ५. रहावयाची. ६. टिकावें. गुरुभारें=मोठ्या वजनामुळें. ७. अधोमुख अशीं. 'तोंचि तिच्या आश्रयें अधस्तुंडें' असें पाठान्तर. ८. वालखिल्य नामक मुनींचे समुदाय. 'वृंद' हा शब्द संस्कृतांत पुल्लिंगी व नपुंसकलिंगी आहे. ९. उत्तम तपःसंपत्ति-रूप विलास करणाऱ्या स्त्रीचीं मंदिरेंच अशीं मुनिवृंदें. १०. गज+कच्छप+शाखाधर=हत्ती व कांसवांचा राजा व शाखा यांस धारण करणारा. ११. ऋषींचें संरक्षण व्हावें ह्या काळजीनें. १२. 'ये, राहें' असें पाठान्तर. १३. वालखिल्यनामक मुनिसमुदायास. १४. 'मजवरति दया करूनि' असें पाठान्तर. १५. विनतेची संतति ( गरुड ). १६. शाखा. १७. पर्वताच्या शिखरावर. १८. आपल्या पायांच्या नखाग्रांना अडकलेले जे हत्ती व कांसव, त्यांना.

भोजन करुनि उडे तो अमृत हरायासि, तेधवां झाले ।
भूकंपाद्युत्पात,[1] त्रिदश[2] महेंद्रादि सर्व ही भ्याले. ॥ १२६
उत्पातबीजें[3] पुसतां, हरिसि[4] गुरु[5] ह्मणे, 'करीं स्मरण, मागें ।
वदले, त्वां स्वबळमदें अपमानित, वालखिल्य ते रागें. ॥ १२७
पूर्वीं करीत होता पुत्रार्थी[6] कश्यप स्वयें यजन; ।
साहित्य देत होते सुर, ऋषि, गंधर्व, सर्व भव्य[7] जन. ॥ १२८
समिधांचा गिरिसम[8] गुरु[9] भुजलीलेकरुनि आणितां भार, ।
मार्गांत वालखिल्य हि तुज येतां भेटले निराहार.[10] ॥ १२९
अंगुष्ठोदरमितवपु[11] ते, एक पलाशवर्तिका,[12] वाटे[13] ।
आणित असतां, श्रमले होते; गोष्पद[14] हि सिंधु ज्यां वाटे. ॥ १३०
त्या गोष्पदांत पडतां, बुडतां, श्रमतां, तयांसि पाहोनी, ।
तूं हांसलासि; नाहीं झालासि सहाय, जवळि राहोनी. ॥ १३१
त्या अपमानें चित्तीं कोपातें धरुनि, यज्ञ ते धन्य ।
करिते झाले, स्वतपें निर्माया इंद्र तूजहुनि[15] अन्य. ॥ १३२
कामगम,[16] कामरूप,[17] स्वाधिकबळ इंद्र निर्मितील मुनी, ।
करितील पदच्युत मज, हें[18] त्वां स्वपित्यासि[19] कळविलें नमुनी.' ॥ १३३
त्यांप्रति कश्यप वदला, 'मुनि हो ! स्वतपें नवी जगद्रचना ।
शक्य चि तुम्हां असे परि विधिच्या मिथ्या करूं नये वचना. ॥ १३४
मिथ्या संकल्प नसो तुमचा हि, करा[20] खगेंद्र, विप्रभ[21] या ।

---

१. पृथ्वीकंपादिक उत्पात म्हणजे अशुभचिन्हें. २. देव. ३. बीज=कारण. ४. इंद्राला. ५. बृहस्पति. त्वां स्वबळमदें (आपल्या सामर्थ्याच्या घमेंडीमुळें) अपमानित (ज्यांचा अपमान केला आहेस असे) वालखिल्य रागें (रागानें) मागें [ जें ] वदले (बोलले) [ त्याचें ] स्मरण करीं—असा अन्वय. ६. आपणास पुत्र व्हावा अशी इच्छा ज्यास आहे तो. ७. थोर, मोठमोठे. ८. पर्वतासारखा. ९. गुरु भार=मोठें ओझें. १०. उपोषण करणारे. ११. आंगठ्याच्या पेऱ्याएवढें शरीर आहे ज्यांचें असे. १२. पलाशसमिधा. १३. वाटेनें, मार्गांतून. १४. गाईच्या पावलानें उमटलेल्या चिन्हांत (लहानशा खळग्यांत) सांठतें इतकें थोडें पाणी. १५. 'तुजहुनी' असें पाठान्तर. १६. मनास वाटेल तिकडे जाणारे. १७. हवीं तशीं रूपें धारण करणारे. १८. 'हें त्या स्वपित्यासि' असें पाठान्तर. १९. कश्यपास. २०. खगेंद्र (गरुडच) [ इंद्र ] करा, गरुडालाच इंद्रपद द्या—असा भाव. २१. निस्तेज.

हरिचें वदन पहा हो ! वारा याच्या तुम्ही सुविप्र[1] भया.' ॥ १३५
ते सुप्रसन्न होउनि, वदले ऐसें, 'प्रजापते ! साधो[2] ! ।
तरि हा त्वत्पुत्र असो, त्वत्संकल्पित हि या फळें साधो[3].' ॥ १३६
'तो विनताकुक्ष्युद्भव[4] काश्यपि[5], पक्षींद्र[6], गरुड, बळशाली, ।
जातो अमृत हराया, उत्पातोत्पत्ति[7] तद्भयें झाली.' ॥ १३७
हें ऐकुनि इंद्र म्हणे 'सुर हो ! पक्षी[8] हरो न सोमातें[9]; ।
रक्षा; खगकृतपरिभवनूलमषीलेप[10] हा नसो मातें.' ॥ १३८
झाले सिद्ध सुर सकळ, नेले अमृतासमीप अशनिकरें[11].' ।
ह्मणति, 'करावा चि सुधाहरणेच्छु विहंग[12] काळवश[13] निकरें[14].' ॥ १३९
तों तेथें गेला तो खगकुळ[15]चूडा[16]महामरीचि[17]मणी. ।
भ्याली त्यासि सुरचमू[18], श्येनांचें[19] जेविं भय धरी चिमणी. ॥ १४०
नखपक्षतुंडपातें[20] बहु मूर्च्छित होय विश्वकर्मा[21]. तें ।
वर्णावें किति ? त्याच्या[22] वाखाणी फार विश्व कर्मातें[23]. ॥ १४१
उडवूनि पक्ष-पवनें[24] धूळि, करी अंध देवसेनांतें ।
जें धैर्य मनीं होतें, वीरांला पाठि दे[25], वसेना तें. ॥ १४२
शक्रें पवनाकरवीं रज वारवितां चि[26], देवकटकांहीं[27] ।
बहु शस्त्रवृष्टि केल्या, परि नाटोपे चि पक्षिभट[28] कांहीं. ॥ १४३
मग गगन-ग[29] खग त्यांतें जर्जर करि पक्षतुंडनखरांनीं[30]. ।

---

१. उत्तम ब्राह्मण. 'तुम्ही सविप्र भया' असें पाठान्तर. २. हे सज्जना. ३. पूर्ण होवो. ४. विनतेच्या कुक्षीपासून झालेला. ५. कश्यपपुत्र. ६. पक्ष्यांचा इंद्र. ७. उत्पातांची उत्पत्ति. ८. गरुड. ९. अमृताला. १०. खग+कृत+परिभव+नूल+मषी+लेप=गरुडानें केलेल्या पराभवरूप नवीन काजळाचा लेप. ११. वज्रहस्त इंद्रानें. १२. पक्षी. १३. मृत्युग्रस्त. १४. जोरानें, एकवटून. १५. पक्ष्यांच्या कुळामध्यें शिरावरील अत्यन्त तेजस्वी रत्नासारखा. 'खगपतिचूडामहामरीचिमणी' असें पाठान्तर. १६. चूडामणि=शिरोभूषण. १७. महामरीचि=अतितेजस्वी. १८. देवसेना. १९. ससाण्याचें. २०. नखें, पंख व चोंच यांच्या आघातानें. २१. देवांचा शिल्पी. २२. गरुडाच्या. २३. कर्म=कामगिरी, कृत्य. २४. पंखांच्या वाऱ्यानें. २५. वीरांना धैर्य पाठमोरें झालें, वीरांना धैर्य सोडून गेलें. २६. घालवितांचि. २७. देवांच्या सैन्यांनीं. २८. योद्धा गरुड. २९. आकाशांत संचार करणारा. ३०. पंख, चोंच व नखें यांनीं.

सुरकटकीं तो तैसा, जैसा प्रज्वलित वायुसख रानीं. ॥ १४४
पळवुनि सुर सकळ, वधुनि अश्वक्रंदादि यक्ष नव, धरणी ।
रंगविली; सर्वांचा केला तेणें द्रवोनि न वध रणीं. ॥ १४५
कोट चि होय अनळ, जैं जाय हरायासि गरुड सोमातें. ।
गर्वें म्हणे, 'विदारू, खरनखराघात करु, डसो, मातें.' ॥ १४६
विझवी त्यासि गरुड, बहुमुख होउनि, करुनि बहुनदी-पानें. ।
दावावा झंझानिलसूर्यांतें गर्व बहु न दीपानें. ॥ १४७
क्षुरपर्यंत, सुदारुण, चक्र वरि भ्रमतसे; तळीं दोघे ।
अमृतघटप चक्षुर्विष-अहि; तें पाहूनि सूक्ष्म वपु तो घे. ॥ १४८
शिरला अरांतरें तो वायु तसा, मग अनलप रेंज उडवी; ।
अंध करुनि ते काळव्याळ, न भरतां निमेष, तो तुडवी. ॥ १४९
घेउनि अमृतघट, करुनि चक्राचा भंग, जाय कवि; त्याचें ।
तेज अतुळ; म्हणाति, 'नभीं तें मंडल लोपलें चि सवित्याचें !' ॥ १५०
प्याला अमृत न लेश हि, केवळ संदतिक्रमासि तो भ्याला; ।
म्हणउनि, निस्पृहजनधन भगवान् दे भेटि त्या अलोभ्याला. ॥ १५१
विष्णु म्हणे, 'विहगवरा ! तूं माग मला अभीष्ट वर दात्या.' ।
मागे सुधेविणें अजरामरता, केतुवास, वरदा त्या. ॥ १५२

---

१. पेटलेला. २. वायु आहे मित्र ज्याचा तो, अग्नि. ३. नव=नऊ. ४. पृथ्वी रक्तानें भरली—असा भाव. ५. दयार्द्र होऊन, कळवळा येऊन. ६. किल्ला. ७. अग्नि. ८. तीक्ष्ण नखांनीं आघात. 'खर-नखराघात-कर' असें पाठान्तर. ९. पुष्कळ मुखें ज्यास आहेत असा. आग विझविण्याकरितां गरुडानें असंख्य मुखें धारण केलीं आणि पुष्कळ नद्यांचें पाणी पिऊन येऊन, तें आगीवर सोडिलें—असा अर्थ. १०. पुष्कळ नद्यांचीं प्राशनें. ११. 'झंझावातः सवृष्टिकः,' पावसासहित जो सोसाट्याचा वारा तो आणि सूर्य, यांस. हें गीत्यर्ध सुभाषितरूप आहे. १२. वस्तऱ्यासारख्या धारा ज्याच्या. पर्यंत=कडा, बाजू; समाप्ति. १३. अतितीक्ष्ण. १४. अमृतघटाचें पालन ( रक्षण ) करणारे. १५. चक्षुर्विष या नांवाचे दोन सर्प अमृतघटाचें रक्षण करीत होते. [ चक्षुर्विष=ज्यांच्या दृष्टींत विष आहे असे ]. 'चक्षुर्विष अहितें पाहूनि' असें पाठान्तर. तो=गरुड. १६. चक्रधारांच्या फटींतून. १७, बहुत. १८. धूलि. १९. काळसर्प. २०. थोरांच्या अपमानास. २१. निस्पृह ( विरक्त ) लोक हें ज्याचें धन असा. २२. मला दात्या=मी जो दाता त्या मला; माझ्यासारख्या दात्याजवळ. २३. ह्याचा कर्त्ता—गरुड. २४. जरा ( वृद्धावस्था ) व मरण यांचें रहितत्व. येथें यतिभंग झाला आहे. २५. ध्वजस्तंभीं वास. २६. विष्णूजवळ.

आपण हि म्हणे प्रभुला, 'मजपाशीं तूं हि इष्ट वर मागें[1].' ।
देव म्हणे, 'मद्रथ[2] हो.' सरले नाहीं च शिष्ट[3]-वर मागें. ॥ १५३
स्वपराभव करुनि, बळें जातां घेऊनि सोमकलश[4], मन ।
क्रोधासि होय वश; मग ताडी वज्रें तयासि बलशमन[5]. ॥ १५४
विहगेंद्र म्हणे, 'जेणें[6] निजतेजें सकळ अचळ कांपविला, ।
दाटुंनि[7] मजवरि सोडुनि, अपयश दिधलें रणांत कां पविला[8]?' ॥ १५५
विप्रास्थिचा[9] अनादर न करावा, म्हणुनि सोडिलें पत्र[10]; ।
हें तुमच्या दृष्टीला हो साक्षात् दिव्यरुचि-सुधासत्र[11]. ॥ १५६
सुरपति म्हणे, 'सुपर्णा ! सांग मला स्वबळ, आयकों दे गा ! ।
वरिचे-वरि[12] तें तुझिया श्रितजयदभुजांत[13] काय कोंदे[14] गा?' ॥ १५७
तार्क्ष्य[15] म्हणे, 'आत्ममुखें न करिति आत्मप्रशंसन[16] ज्ञानी; ।
परि कथितों संकोचें, कीं हें[17] ध्यावें मनीं न अज्ञांनीं. ॥ १५८
सनगवनसमुद्रोदक्षिति[18] पक्षाग्रीं सदैव वाहेन; ।
ब्रह्मांडकंदुकें[19] मी क्रीडेन; अशीं[20] सहस्र साहेन[21].' ॥ १५९
शक्र म्हणे, 'विहगेंद्रा ! घे, देतों, तूं सुपात्र सख्यातें.' ।
गरुड म्हणे, 'तृप्त असें मी सुरसें[22] या चि, सुरसिकख्यातें[22].' ॥ १६०

---

१. माग. २. माझा रथ, माझें वाहन. ३. थोर लोक, मोठमोठे लोक. ४. अमृतकलश. ५. बलनामक दैत्याचा वधकर्ता (इंद्र.) बल हा दनायूच्या पुत्रांतील एक. ६. ज्या वज्रानें. ७. मुद्दाम, जाणूनबुजून. ८. वज्राला. ९. ब्राह्मणास्थिरूप वज्राचा. इंद्रानें आपलें वज्र दधीचि ऋषीच्या अस्थींपासून तयार केलें होतें, ही कथा येथें अनुसंधेय आहे. १०. पीस. वज्राचा तडाखा बसला असतांही गरुडास यत्किंचित् इजा झाली नाहीं. परंतु इंद्राचा व वज्राचा मान राखण्याकरितां गरुडानें आपल्या पंखांतून एक पीस काढून टाकिलें, व विनम्रभावानें वज्राचा तडाखा बसला आहे, असें भासविलें. ११. ज्याची रुचि दिव्य आहे अशा अमृताचें सतत दान. सत्र=नित्यदान, औदार्य. १२. वारंवार, पुन्हां पुन्हां. १३. आश्रिताला जय देणाऱ्या भुजांत. १४. भरलेलें आहे. १५. गरुड. १६. आत्मस्तुति. 'इन्द्रोऽपि लघुतां याति स्वयं प्रख्यापितैर्गुणैः' हें सुभाषितवचन प्रसिद्धच आहे. १७. आत्मप्रशंसन. १८. स+नग+वन+समुद्र+उद+क्षिति=पर्वत, वनें व समुद्रोदक यांसह पृथ्वी. १९. ब्रह्मांडरूप चेंडूंनीं. २०. ब्रह्मांडें. २१. त्यांचा भार (ओझें) सहन करीन. २२. उत्तम रसिकांमध्यें ज्याची ख्याति आहे अशा उत्तम रसानें, अर्थात् सख्यानें.

इंद्र म्हणे, 'जरि अमृतप्राशनवांछा नसे चि, मग, मातें ।
खिन्न करुनि, काशाला नेसि? न देसी फिरोनि[1] खगमा[2]! तें[3]? ॥ १६१
तूं देणार जयां हें, ते आम्हां पीडितील; या सु-रसा ।
भलता उचित नव्हे बा! तूं पी; असशी महाशया[4]! सुर-सा[5].' ॥ १६२
गरुड म्हणे, 'हें, कांहीं कारण आहे, म्हणूनियां, मात्र ।
नेतों; त्वां आणावें ठेविन तेथोनि निजसुधापात्र.' ॥ १६३
वृत्रारि[6] म्हणे, 'झालों त्वत्साधुत्वें चि तुष्ट; वर माग.' ।
वीश[7] म्हणे, 'मज हें, दे, भक्षावे म्यां समस्त खळ नाग.' ॥ १६४
इंद्रें 'दिधलें' ह्मणतां, जाउनि सर्पांसि[8] तो म्हणे, 'उक्त[9] ।
केलें; हें घ्या; आह्मी दास्यापासूनि जाहलों मुक्त. ॥ १६५
म्यां ठेविला कुशांवरि[10] हा तुमचा अमृतघट; पहा; सेवा, ।
स्नान करा, शुचि व्हा, हो! उद्योगांतर[11] मुहूर्तभरि ठेवा.' ॥ १६६
अहि गेले स्नाना, तों अमृत हरुनि, हरि म्हणे 'धुवा वपु, न्हा; ।
खळ हो! पहाल पुष्कळ निजनेत्रांतील[12] अमृत[13], हें न पुन्हा.' ॥ १६७
न्हाले, भूषित झाले, आले त्या लेखजीवना[14] प्याया. ।
अन्योन्यांतें ह्मणती, 'व्हा अजरामर, करा त्वरा, प्या, यां[15].' ॥ १६८
कलश न दिसतां, सोडिति निश्वासा, तळमळोनि, अहिमा[16]; या ।
हानीच्या हेतूतें समजति ते आपुली च अहि माया[17].' ॥ १६९
तो घात त्यांसि दुःसह; सर्वस्वविनाश साहता[18] शतदा. ।
'चुकलों, मुकलों स्नानें;' ह्मणती ते सर्प 'हा!' हताश[19] तदा. ॥ १७०

---

१. फिरोनि=परत. २. आकाशांत संचार करणाऱ्या पक्ष्या! ३. अमृत. ४. महाशय=उदार चित्ताचा, दयाळू व सभ्य गृहस्थ. 'महायशा!' असें पाठान्तर. महायशा=मोठा प्रख्यात, अतिकीर्तिमान्. ५. देवासारखा. ६. वृत्रासुराचा शत्रु (इंद्र). ७. वि+ईश=पक्षी+राजा=गरुड. ८. 'सर्पारि' असें पाठान्तर. सर्पारि=सर्पांचा शत्रु (गरुड). ९. वचन. १०. दर्भांवर. ११. दुसरा उद्योग. १२. उदक, अश्रु. १३. 'अमृत' शब्दावर येथें श्लेष आहे. १४. देवांचें जीवन जें अमृत, त्याला. लेख=देव. १५. चला. १६. अ+हिमा=थंड नसलेले, उष्ण. १७. कपट. ते अहि (सर्प) आपुली च माया [असें] या हानीच्या हेतूतें समजति—असा अन्वय. आपल्या कपटामुळेंच आपलें अकल्याण झालें, ही गोष्ट त्यांच्या लक्ष्यांत आली—असा भावार्थ. १८. सहन झाला असता. १९. भग्न झाली आहे इच्छा ज्यांची असे; निराश.

'लटिक बटिक, फटि-कपटें हें दुःसह, सह्य वैर वरचील. ।
खाय चरारां चावुनि, उग्रत्व तसें न भैरव रचील.' ॥ १७१
चुकवी कुगति, यशें उत्सुकवी सन्मन, असन्मुखें सुकवी; ।
सुकवी मातेला निजमुखवीक्षामृतरसें चि, तो सुकवी. ॥ १७२

## अध्याय पांचवा.

कद्रूचा ज्येष्ठ तनय शेष; दुजा वासुकी महाभाग; ।
ऐरावत, कर्कोटक, तक्षक, कालीय, बहु असे नाग. ॥ १
सर्वगुरूत्तम माता, परि तीची रीति ती नव्हे नीट, ।
म्हणउनि शेष तप करी, दुःसंगतिचा धरोनियां वीट. ॥ २
अत्युग्र गंधमादनगोकर्णादिस्थळीं सदा तपतां, ।
भेटे त्यासि पितामह, यमनियमांतें सुयुक्तिनें जपतां. ॥ ३

---

१. सर्पांच्या कपटामुळें. फटी=फणी–पंत. फटा=फडा–( फटा ज्याला आहे तो फटी ). 'लटिक बटिक, माय न हे, कपटें दुःसह्य वैर वरचील' असा पाठभेद. लटिक–बटिक=आपली सापत्न माता बटीक झाली, हें अगदीं खोटें आहे. हे माय न=आमची आई ही आमची आई नव्हे, तर ती वैरिण होय. हीं वाक्यें रागाच्या भरांत उच्चारिलेलीं असल्यामुळें अशीं तुटक आहेत. २. शिवाय, आणखी, वरकड. हें ( दुःख ) फणिकपटामुळें दुःसह होय. वरचील ( आणखी, इतर कोणतेंही ) वैर सह्य [ होय ]–असा अन्वय. वरचील हा शब्द लक्ष्यांत ठेवण्यासारखा आहे. यांत विशेषणाचे दोन प्रत्यय 'चा' व 'ईल' हे एकदम लागले आहेत. वरचा, खालचा, मागचा, पुढचा, वगैरे व वरील, खालील, मागील, पुढील वगैरे स्वतंत्र रूपें आढळतात. परंतु येथें वर+चा+ईल=वरचील–असें प्रत्ययद्वयघटित रूप आहे. हा शब्द पंतांच्या काव्यांत अन्यत्र योजिलेला आढळतो. ( कर्णपर्व, अध्याय १२।१९ व ४०।२; गदापर्व, अध्याय १।६३ पहा ). ३. शिवाच्या भयंकर स्वरूपांपैकीं हें एक रूप आहे. ४. शत्रूंचीं तोंडें. ५. वाळवी. शुष्क करी–असा भाव. ६. दामयमक. सुकवी=सुखवी, सुख देई. ७. स्वमुखनिरीक्षणरूप अमृतरसानें. गरुड सुखरूप परत आलेला पाहून त्याच्या मातेस आनंद होणें साहाजिकच आहे. ८. तो उत्तम शाहाणा ( चतुर ) असा गरुड. 'सुकवी' हा ह्या गीतींतील सर्व क्रियापदांचा कर्ता आहे. म्हणून येथें कारकदीपक अलंकार झाला आहे. जेथें कर्ता एक असून त्याचा अनेक क्रियांशीं अन्वय असतो, तेथें हा अलंकार होतो. ९. सर्व+गुरु+उत्तम=सर्व गुरूंमध्यें श्रेष्ठ अशी. 'न मातुः परदैवतम्' हें वचन प्रसिद्धच आहे. १०. ब्रह्मदेव, सर्पांचा पिता कश्यप आणि कश्यपाचा पिता ब्रह्मदेव. म्हणून ब्रह्मदेव हा सर्पांचा पितामह (आजोबा). ११. इंद्रियदमन आणि स्नानसंध्यादि जीं नित्यकर्मै, त्यांना.

‘वत्सा ! कां उग्रतपें तापुनि, लोकांसि तापविसि ? बोल. ।
[1]मद्दृष्टिवरतरिगता शेषा ! न [2]मनोरथाब्धि तुज खोल.’ ॥ ४
शेष म्हणे, ‘द्वेष करिति गरुडाचा, न धरिती भया, भ्राते, ।
दुर्मति परस्पर हि, [3]अरिसम भांडति, सर्वदा [4]दयाभ्रा ! ते. ॥ ५
जन्मांतरिं ही त्यांचा संग नसावा, म्हणोनि देहातें ।
त्यागाया तप करितों, [5]वरदा ! वरदान हें चि दे हातें.’ ॥ ६
द्रुहिण म्हणे, ‘मी जाणें [6]कद्रूचें, आणि त्यां हि सापांचें, ।
विनतागरुडद्वेषप्रभृति [7]विचेष्टित अशेष, पापांचें. ॥ ७
वर माग, शोक न करीं, म्यां [8]तत्परिहार योजिला आहे; ।
[9]सन्मतिला वर देतां, माझें मागेंपुढें न मन पाहे. ॥ ८
मज [10]नयनिष्ठ, शुचि, तुझें नवनीताहूनि हृदय मउ ठावें. ।
या [11]त्वन्मतिमधुपीनें, [12]धर्मसरोज त्यजूनि, न उठावें.’ ॥ ९
‘हा चि वर मला द्यावा’ शेष म्हणे. विधि करी दया फार. ।
मग त्याला [13]प्रभु सांगे निजमाथां घ्यावया [14]धरीभार. ॥ १०
धरिली पृथ्वी माथां, त्या पाताळीं शिरोनियां [15]विवरें. ।
सर्ल्यें आनंदविलें, विधिच्या आज्ञेकरूनि, [16]त्या [17]वि-वरें. ॥ ११
वासुकि हि करी चिंता; न सुचे कांहीं च [18]शापपरिहार; ।
झाला म्लान; फिरविला पुष्पांचा जेविं वन्हिवरि हार. ॥ १२
वासुकिला कोणी अहि म्हणती, ‘आम्हीं विचार हा केला; ।
जनमेजयराजाच्या घ्यावें, होऊनि विप्र, [19]भाकेला. ॥ १३
[20]गोवुंनि त्यासि म्हणावें, ‘[21]भरतकुळश्रीसुरत्नहारा ! हो ।

---

१. मत्+दृष्टि+वर+तरि+गता=माझी दृष्टि हीच श्रेष्ठ नौका तीत बसणारा जो तूं, त्या तुला. २. मनोरथरूपी सागर. येथें **परंपरितरूपक** आहे. ३. ‘अरिसम भावुनि सर्वदा दयाभ्रा, ते’ असाही पाठ आहे. ४. कृपाघना ! ५. वरदात्या ! ६. सर्पमातेचें. ७. आचरण. ८. दूरीकरण. ९. सज्जनाला. १०. नीतिसक्त, नीतिमान्. ११. तुझ्या मतिरूप भ्रमरीनें. १२. धर्मरूप कमल. **परंपरितरूपक.** १३. ब्रह्मदेव. १४. पृथ्वीचा भार. १५. बिळांतून १६. शेषास. १७. पक्षिश्रेष्ठ गरुडानें. १८. शापमोचनाची युक्ति. १९. भाक=वचन. २०. गोवुनि=गोंवून (वचनांत गुंतवून). २१. भरतकुळरूप श्रीच्या (लक्ष्मीच्या) उत्तम रत्नांचा हारच अशा राजा !

सत्यप्रतिज्ञ, राया ! अहिसत्रारंभ[1] उग्र हा राहो.' ॥ १४
अन्य अहि म्हणति, 'होऊं तन्मंत्री, दाखवूनि नयपटुता[2]. ।
पुसतां विचार, आणूं तच्चित्तीं सर्पसत्रफळकटुता[3].' ॥ १५
इतर म्हणति, 'सत्रज्ञ[4] ब्राह्मण, नृपहितें[5], असेल जो शिष्ट[6], ।
तो चावुनि मारावा भलत्या भुजगें, विचार हा इष्ट. ॥ १६
असतील तज्ज्ञ बहु, तरि मारूं सर्वांसि ही, करूं दंश.' ।
साधु म्हणति, 'शिव ! शिव ! या मंत्रें[7] वांचेल हा कसा वंश ?' ॥ १७
एक म्हणति, 'घन होऊं, विझवूं अनळासि[8], सत्रविघ्न करूं.' ।
एक म्हणति, 'स्रुगादिक[9] पात्रें, असतां असावधान[10], हरूं.' ॥ १८
किति म्हणती, 'मळमूत्रें दूषावें[11] सर्व अन्न; तो यज्ञ ।
मग कैसा चालेल ?' स्वमत असें बोलती किती अज्ञ[12]. ॥ १९
'ऋत्विज[13] होउनि सत्रीं रायाला दक्षिणार्थ अडवावें. ।
प्रारंभीं च करावा प्रत्यूह[14], बहु च्छळूनि, रडवावें. ॥ २०
अथवा उदकीं क्रीडा करितां, राजा धरूनि आणावा. ।
बद्ध करावा; हा चि स्वश्रेयस्कर[15] उपाय जाणावा.' ॥ २१
कोणी पंडितमानी[16] अहि म्हणति, 'तुम्हांसि लागलें खूळ[17]; ।
चावूं नृपासि; खाणूं स्वानर्थांचें[18] अशेष[19] तें मूळ.' ॥ २२
वासुकि म्हणे 'भुजग हो ! तुमचा मजला विचार हा न रुचे. ।
क्षुधितें[20] कसे गिळावे कवळ[21] गरळदूषितांतरा[22] चरुचे ? ॥ २३
गुरुला चि शरण जावें; वाटे आम्हांसि तो चि रक्षील; ।
वारील शापताप[23] प्रभु जरि करुणेकरोनि लक्षील.' ॥ २४

---

१. सर्पसत्राचा आरंभ. २. राजनीतिकौशल्य. ३. सर्पसत्राचा अनिष्ट परिमाण. ४. यज्ञाचा विधि जाणणारा. 'सर्वज्ञ' असें पाठान्तर. ५. राजाचा हितकर्ता. ६. मान्य, पूज्य. ७. मसलतीनें. ८. अग्नीस. ९. पळी इत्यादि यज्ञपात्रें. १०. सावध नाहीं असा. ११. विघडवावें. १२. ज्ञानहीन, मूर्ख. १३. पुरोहित, उपाध्याय. १४. विघ्न. १५. आपलें कल्याण करणारा. १६. 'मी पंडित' अशी ऐट करणारे, स्वतःला पंडित समजणारे. १७. वेड. १८. आपल्या अनर्थांस कारणीभूत होणारें. १९. संपूर्ण. २०. क्षुधितानें. हें गीत्यर्ध सुभाषितरूप आहे. २१. घांस. २२. विषानें (दूषित झालें) आहे अंतर ज्याचें अशा भाताचे. चरु=भात. २३. शापामुळें प्राप्त होणारें दुःख. येथें मूळांतील ३७ वा अध्याय संपतो.

एळापत्र[1] म्हणे, 'मी वदतों, परिसा त्यजूनि संताप; ।
होतों तेव्हां अंकीं मातेच्या, जेधवां दिला शाप. ॥ २५
सुर हळहळले, वदले, 'तीक्ष्णा[2] न स्त्रीपरीस तरवारी.' ।
मग ते विधिसि विनविती, तो[3] त्यांचा खेद शीघ्रेंतर[4] वारी. ॥ २६
जवळ चि तेव्हां होतों, म्हणउनि, म्यां ऐकिलें तदुक्त[5] असें:–।
'मंज[6] शाप मानला हो! जरि नसता मान्य, वारितों न कसें? ॥ २७
तीक्ष्णजगदहितपन्नगवृद्धि[7] नसावी, असें मनीं होतें. ।
मद्वांछित[8] स्नुषेच्या[9] तेजें[10] सिद्धीस पावलें हो! तें. ॥ २८
जे पापाचार, खळ, व्याळ, जगत्काळ, ते चि मरतील. ।
दुस्तरशापव्यसनीं[11], जे धार्मिक, सदय, ते चि तरतील. ॥ २९
आस्तीकनामक द्विज, पुत्र जरत्कारुचा तयां कवच[12] ।
होईल, स्वस्थ असा, हें माझें देव हो! मृषा[13] न वच.' ॥ ३०
देवांनीं, श्रवण करुनि विधिची अभयप्रदा अशी उक्ती, ।
आस्तीकमौक्तिकाची[14] पुशिली त्या ज्ञानसागरा शुक्ती[15]. ॥ ३१
'अभिधान समान जिचें, वरिल जरत्कारु[16] तीस, तसि कन्या ।
कद्रूची, वासुकिची अनुजा आहे, जगीं नसे अन्या.' ॥ ३२
ऐसें आयकिलें म्यां, स्वजरत्कारु-स्वसा[17] तया ऋषितें ।
द्यावी जीवनकामें[18]; यत्न करावा चि सर्वथा तृषितें. ॥ ३३
एळापत्रोक्तें ते झाले सानंद[19] सर्व ही भोगी[20]. ।

---

१. सर्पविशेष. २. कठोर, उग्र. ३. ब्रह्मदेव. ४. अतित्वरित. ५. त्या ब्रह्मदेवाचें भाषण. ६. मला (ब्रह्मदेवाला). ७. भयंकर आणि जगास अहितकर अशा सर्पांची वृद्धि. ८. म्यां इच्छिलेलें. ९. कश्यपपत्नी कद्रू तिच्या. १०. पराक्रमानें. ह्या भाषणांतील खोंच वाचकांच्या लक्षांत सहज येईल. ११. तरून जाण्यास कठीण अशा शापामुळें उत्पन्न झालेल्या संकटांतून. १२. आच्छादन, संरक्षण. १३. असत्य. १४. आस्तिकमुनि हा मोती, तर त्याची माता म्हणजे मोत्यें जींत उत्पन्न होतात ती शिंप. त्या ज्ञानसागरा (ब्रह्मदेवाजवळ) आस्तीकमौक्तिकाची शुक्ती पुशिली (तिच्याविषयीं चौकशी केली)–असा अन्वय. १५. शिंपला, अर्थात् माता. १६. 'वरिल जरत्कारु जीस, ती कन्या' असें पाठान्तर. १७. आपली जरत्कारु नामक भगिनी. १८. येथें 'जीवन' ह्या शब्दावर श्लेष आहे. जीवन=(१) प्राणधारण; (२) उदक. सर्पपक्षीं–जगण्याच्या इच्छेनें; तृषितपक्षीं–पाण्याच्या इच्छेनें. १९. आनंदयुक्त. २०. सर्प.

अमृतमथनीं च ऐसा मंत्र[1] करी वासुकी महायोगी. ॥ ३४
शापार्तें[2] वासुकिनें, मग डोळे करुनि अश्रुंनीं ओले, ।
विधि सुरमुखें विनवितां, जें एळापत्र, तें चि तो बोले. ॥ ३५
अमृतमथन झाल्यावरि, वासुकिनें सावधानधी[3] भोगी ।
आज्ञापिले[4], 'कथावा होतां चि विवाहकाम[5] तो[6] योगी[6].' ॥ ३६
दिव्यतपस्यासंगें[7] भुलला होता महर्षि; तो कां जी ! ।
स्त्रीला[8] सरेल ? रसिक, त्यजुनि सुधा, कोण सेवितो कांजी[9] ? ॥ ३७
ऐसें असतां, त्याच्या त्या व्यसनीं[10] काळ लोटला प्राज्य[11]; ।
जोंपर्यंत परीक्षिन्नृपति करायास लागला राज्य. ॥ ३८
त्या अभिमन्युकुमारें हर्षविली, रक्षुनि प्रजा, अवनी[12]. ।
एका दिवशीं केला, मृगया[13]क्रीडेस्तव, प्रवेश वनीं. ॥ ३९
तेथें एक शरक्षत[14] हरिण पळाला, म्हणोनि, त्यामागें[15] ।
लागे तो नृप; ऐसें झालें नव्हतें कधीं[16] च त्यामागें. ॥ ४०
पुनरपि विंधावा[17] मृग, म्हणउनि, तो, धरुनि सज्य[18] धनु, सरला[19] ।
विशिखा[20] योजुनियां, मख[21]-हरिणातें हरें[22], तसा चि अनुसरलें[21]. ॥ ४१
झाला अदृश्य मृग तो स्वर्गतिचा[23] हेतु होय त्या रूपें. ।
केला भरीं भरूनि, श्रम भोगुनि, शोध काननीं भूपें. ॥ ४२

---

१. मसलत. २. शापानें पीडलेल्या ( वासुकीनें ). 'शापान्ता' असें पाठान्तर. शापान्ता= शापाचा अन्त व्हावा म्हणून, शापाचें निवारण व्हावें ह्या हेतूनें. ३. सावध आहे बुद्धि ज्यांची असे. ४. 'आज्ञापिले कथाया' असें पाठान्तर. ५. विवाह करण्याची इच्छा आहे ज्याची असा. ६. ऋषि जरत्कारु. ७. तपश्चर्यारूप दिव्य स्त्रीच्या संगतीनें. ८. स्त्रीला=तपश्चर्यारूपी स्त्रीला सोडून कोणा अन्य स्त्रीला–असा भाव. ९. कोण ( कोणता ) रसिक सुधा ( अमृत ) त्यजुनि कांजी ( पेज ) सेवितो ?–असा अन्वय. १०. व्यासंगांत, नादांत. ११. बहुत. १२. पृथ्वी. १३. पारध करण्याकरितां. १४. ज्यास बाण लागल्यामुळें जखम झाली आहे असा. १५. हरिणाच्या पाठोपाठ. १६. 'ऐसें झालें होतें कधीं न त्यामागें' असा पाठभेद. १७. ( बाण मारून ) जखमी करावा. १८. दोरीसह, तयार. १९. वांकडा नव्हे अशा. २०. बाणाला. २१. यज्ञपुरुषरूपी मृगाच्या मागें गेला. २२. शंकर. शंकरांनीं दक्षयज्ञाचा विध्वंस केला, तेव्हां यज्ञपुरुषानें मृगाचें रूप धारण करून पळ काढला. त्या वेळीं शंकर त्याचा पाठलाग करीत गेले–ही कथा येथें अनुसंधेय आहे. 'मग हरिणानें हरि, तसाचि अनुसरला' असा पाठभेद. हरि=सिंह. २३. स्वर्गप्राप्तीचा.

देउनि वियोग निधिनें[१] लुब्ध[२], नृप श्रमविला तसा एणें[३]. ।
मग विपिनीं[४] मौनव्रत, फेनप[५], मुनि एक देखिला तेणें[६]. ॥ ४३
नाम शमीक तयाचें, जो सत्त्व[७] चि शुद्ध-मानसां[८] गमला; ।
त्यासि म्हणे, 'क्षतमृग, जरि तुज आढळला असेल, सांग मला.' ॥ ४४
मुनि न वदे. नृप कोपे. मग कार्मुककोटिनें[९] मृता अहिला[१०] ।
घाली त्याच्या कंठीं, घडला पूज्यापराध तो पहिला. ॥ ४५
भाविप्रबळभ्रम[११] तो, सर्व हि बालिश[१२] असो, असो सु-कवी[१३], ।
होणार, सत्पथीं ही, दिवसीं[१४] ही, डोळसासि ही, चुकवी. ॥ ४६
नृपति निजपुरा गेला. न क्षोभे मुनि, न तो मनांत रुसे. ।
साधु, कृतोपद्रव[१५] ही, प्रतिकूळ न होति ते जनां, तरुसे[१६]. ॥ ४७
त्या साधु[१७]शमीकाचा सुत; नाम तया महर्षिचें शृंगी; ।
सेवी दृष्टि जयाची ब्रह्मपदाब्जा[१८] सदा, जशी भृंगी[१९]. ॥ ४८
तो स्वाश्रमासि, विधिला[२०] वंदुनि, येतां तयाप्रति सखा तें ।
गुरुलंघन[२१] सांगे कृश[२२]. असमंजस[२३] कर्म सन्मतिस खातें. ॥ ४९
वृत्त अशेष कृशमुखें कळतां, शृंगी तदा असें शापीः—।
'तक्षकदंशें सप्तम दिवसीं तत्काळ तो मरो पापी.' ॥ ५०

---

१. ठेव्यानें. २. लोभी, हावरा. ३. मृगानें. ४. वनांत. ५. फेंस पिणारा. ६. त्या नृपानें. ७. साक्षात् सत्वगुणच. ८. ज्यांचीं अंतःकरणें शुद्ध आहेत अशा मनुष्यांना. 'जो सत्वविशुद्ध मानसा गमला' असा पाठभेद. ९. धनुष्याच्या टोंकानें. १०. सर्पाला. ११. पुढें घडून येणाऱ्या गोष्टींसंबंधानें अनावर मोह. 'भाविप्रळयभ्रम' असें पाठान्तर. १२. मूर्ख. १३. अतिशय शहाणा. १४. 'दिवसाही' असें पाठान्तर. ही गीति सुभाषितरूप आहे. १५. ज्याला उपद्रव केला आहे, ज्याला त्रास दिला गेला आहे असा. [ जे ] साधु ते कृतोपद्रव ही, तरुसे, जनां प्रतिकूळ न होति—असा अन्वय. १६. वृक्षाप्रमाणें. ( उदाहरणार्थ—वृक्ष हा स्वतःस तोडणाऱ्या-वरीलही सावली दूर करीत नाहीं ). वृक्षाची थोरवी पुढील सुभाषितांत उत्तम रीतीनें वर्णिलेली आहेः—छायामन्यस्य कुर्वन्ति तिष्ठन्ति स्वयमातपे । फलान्यपि परार्थाय वृक्षाः सत्पुरुषा इव. ॥ १७. हा एक अंगिरसकुलोत्पन्न ऋषी. ह्यास गौ नामक स्त्रीपासून शृंगी नांवाचा पुत्र झाला. १८. ब्रह्मदेवाच्या पदकमळास. १९. भ्रमरी. **उपमा.** २०. ब्रह्मदेवाला. २१. बापाचा अपमान. २२. कृश नामक ऋषिकुमार. हा शृंगीचा सखा. याची आकृति अत्यंत कृश होती, म्हणून त्यास हें नांव पडलें. २३. अयोग्य, वाईट कर्म.

मग आश्रमासि येउनि, शृंगी जों तातमूर्तिला पाहे, ।
मृतसर्प कंठदेशीं तोंवरि तैसा चि अर्पिला आहे. ॥ ५१
काढुनि सर्प, पित्याला सांगे, 'ज्या दुर्जनें असें पाप ।
केलें, म्यां त्यासि दिला, तक्षकदंशें मरो, असा शाप.' ॥ ५२
पुत्रासि शमीक म्हणे, 'सुतपस्या व्यर्थ गेलि; हें काय ।
केलें ? न पावलें क्षय कंठगतप्रेतलेलिहें[1] काय[2]. ॥ ५३
पूज्य, दशश्रोत्रियसा[3], अध्ययनतपःक्रतुक्रियाहेतु[4], ।
राजा, गुरु प्रजांचा, चोरादिव्यसनसागरीं सेतु[5]. ॥ ५४
या क्रोधदस्युतिलकें[6] कोण तपोधन जगीं नसे लुटिला ? ।
बापा ! विचक्षणा[7] ! तूं कैसा विश्वासलासि या[8] कुटिला[9] ?' ॥ ५५
बहु हळहळोनि, मुनिनें गौरमुख[10] च्छात्र[11] शीघ्र पाठविला; ।
शाप नृपासि कळविला; तेणें स्वकृतापराध आठविला. ॥ ५६
गुरुलंघनपरितप्तें[12] भूपें तो गौरवदन बोळविला. ।
आधीं मस्तक त्याच्या असकृत्[13]शुचिपदरजांत[14] लोळविला. ॥ ५७
मंत्रिमतें[15] तोषविले विषनाशोपायदक्ष[16] कनकांहीं. ।
ते म्हणति, 'स्वस्थ असा; आम्हांहुनि शक्त[17] तक्षक न कांहीं.' ॥ ५८
शीघ्र करविला एकस्तंभप्रासाद[18]; त्यांत नृप राहे; ।

---

१. गळ्यांत पडलेला मृत सर्प, त्याच्या योगानें. लेलिह=सर्प. २. देह. गळ्यांत मृत सर्प घातला, म्हणून माझें शरीर नाश पावलें नाहीं, मग शाप कां बरें दिलास ?–असा भाव. ३. वेदाध्ययन केलेल्या दहा ब्राह्मणांसमान. 'दश' ह्या पदाचा अर्थ निश्चित करणें कठीण आहे. दशश्रोत्रिय=दशविध ब्राह्मण ( पंच गौड व पंच द्रविड ) असा घेतला तरी चालेल. किंवा दशलक्षणांनीं युक्त अशा ब्राह्मणासमान असा अर्थ समजावा. ब्राह्मणाच्या ठायीं अवश्य असणारीं दहा लक्षणें:–शम, दम, शौच, दान, संतोष, क्षमा, आर्जव, भक्ति, दया व सत्य. मूळांतही 'दशश्रोत्रियसमो राजा' असेंच आहे ( अध्याय ४१।३२ पहा ). ४. अध्ययन, तपश्चर्या व यज्ञकर्में हीं निर्विघ्नपणें पार पडण्याचें कारण. ५. चोर वगैरे दुष्टांपासून उत्पन्न होणाऱ्या संकटरूपी सागरांत सेतुसारखा, अर्थात् संरक्षण करणारा. **रूपक.** ६. क्रोधरूप श्रेष्ठ चोरानें. ७. हे शहाण्या ! ८. क्रोधास. ९. दुष्टाला, खळाला. १०. शिष्यनाम. ११. शिष्य. १२. थोरामोठ्याचा अपमान करून पश्चात्ताप पावलेला जो, त्यानें. १३. असकृत्=वारंवार. १४. पवित्र पादधूलींत. १५. प्रधानाच्या मतानें. १६. विषबाधेचा नाश करण्यामध्यें कुशल असे. १७. समर्थ. १८. फक्त एका खांबाच्या आधारावर बांधलेला राजवाडा.

[1]जेथें प्रवेश त्याच्या आज्ञेवांचूनि वात हि न [2]लाहे. ॥ ५९
तेथें चि राजकार्यें करितां, सा दिवस लोटले नीट. ।
[3]आप्तोक्त करी, परि नृप भ्याला नाहीं च तो महाधीट. ॥ ६०
सप्तम दिवशीं कश्यपमुनि, कोणी एक, मृत्यु वाराया, ।
धावोनि येत होता, [4]द्विजतनु तक्षक हि त्यासि माराया. ॥ ६१
दोघांसि गांठि पडतां, तक्षक त्यातें पुसे, 'अगा आर्या ! ।
सांग, त्वरा करुनि, तूं कोठें जातोसि ? कोणत्या कार्या ?' ॥ ६२
कश्यप म्हणे, '[5]परीक्षिन्नृपतीतें आजि विप्रशापानें ।
तक्षक डसणार, तया जातों रक्षावया प्रतापानें.' ॥ ६३
त्यासि म्हणे, 'जो तक्षक डसणार तयासि, तो [6]महाविष मी; ।
साधो ! [7]जा मागें, तूं कां पडसी संकटीं अशा [8]विषमीं ?' ॥ ६४
विप्र म्हणे, 'मद्विद्याबळ मज ठावें; तुझें हि हरिन [9]गर; ।
[10]पतिकुशळमुदित [11]गजपुर करिन, जसें [12]नागमुक्त [13]हरिनगर.' ॥ ६५
नाग म्हणे, 'जरि [14]मद्विषहत नृप उठवावयासि तूं शक्त, ।
म्यां चाविला करुनि तरु जीवंत, स्वबळ दाखवीं [15]व्यक्त.' ॥ ६६
विप्र म्हणे; 'हूं.' तों तो स्वविषाचा दाखवी [16]विभव, डास ।
घेउनि, तक्षक भस्म चि करि एका [17]घनघटानिभ वडास. ॥ ६७
तो मुनि हांसोनि म्हणे, 'हा अद्भुत गा ! [18]अहे ! तुझा डास; ।
क्षण हि न भरतां, झाला ऐसा [19]भस्मत्वहेतु झाडास. ॥ ६८
आतां माझें विद्याबळ, लोकीं अतुळ, निर्विवाद, पहा. ।
होता तसा चि करितों, जरि झाला भस्मराशि [20]पादप हा.' ॥ ६९

---

१. 'तेथें प्रवेश' असें पाठान्तर. २. मिळवी, प्राप्त करून घेई. ३. आप्तांनीं सांगितलेलें. ( आप्त=यथार्थवक्ता. ) ४. ब्राह्मणाचें रूप घेतलेला. ५. येथें रा० पराडकर यांच्या प्रतींत 'परिक्षिन्नृपतीतें' असा शब्द आहे. पण तो मुद्रणदोष असावा, कारण पंतांनीं 'परीक्षिन्नृपति' असा शुद्ध शब्द अन्यत्र योजिला आहे. ( मागें गीति ३८ पहा ). ६. मोठा विषारी. ७. परत जा. ८. दुर्घट अशा. ९. विष. १०. राजक्षेमानें आनंदित. ११. हस्तिनापुर. १२. कालीय सर्पानें सोडलेलें. १३. गोकुळ–वृंदावन. १४. माझ्या विषानें मेलेला. १५. स्पष्ट. १६. प्रताप. २७. मेघसमुदायतुल्य वडास. १८. हे सर्पा ! १९. भस्मरूप होण्याचें कारण. २०. वृक्ष.

ऐसें वदोनि, मुनिनें, तें सर्व [1]करूनि भस्म [2]एकवट, ।
केला जीवंत, करुनि त्यावरि [3]विद्यासुधाभिषेक, वट. ॥ ७०
आला क्षणांत अंकुर, नव पत्र, [4]स्कंध, पल्लव हि दाट. ।
झाला वृक्ष यथास्थित मुनितेजेंकरुनि; तो हि अहि [5]भाट. ॥ ७१
तक्षक म्हणे, 'मुने ! तूं धन्य, ब्रह्मा चि भाससी, बापा ! ।
हरशील गरळ माझें, इतरांचें ही, समस्त, निष्पापा ! ॥ ७२
जरि असशील धनार्थी, तरि मजपासोनि [6]अर्थ बरवे घे; ।
नृप तों गतायु, कुशल न [7]खंडितमूळाफळद्रुवर [8]वेघे ॥ ७३
[9]दुर्वारविप्रशापें निःशेष प्राशिलें [10]नृदेवायु; ।
तेणें करशिल काय ? न वृद्धि [11]निरिंधनशिखीस दे वायु; ॥ ७४
अयश न जोडावें त्वां; क्षीणायु [12]क्षितिप निश्चयें मरतो; ।
येथूनि च पुष्कळ धन घेउनि, [13]अमलिनयशा [14]भवान् परतो.' ॥ ७५
ध्यानें जाणूनि म्हणे मुनि, 'तो चि [15]तपस्विशेखर खरा [16]हो.' ।
धन घेऊनि परतला; परि चित्तीं लागला [17]खरखरा हो ! ॥ ७६
मग तक्षक, नृपतीचें जाणुनि बहु सावधानपण, [18]सद्मीं ।
नागांतें मुनिवेषें प्रेषी; ते शिरति, [19]अलि जसे [20]पद्मीं. ॥ ७७
भेटति [21]कपटमुनि, कुशळ पुसति सबहुमान, साधुता राया ।
दावुनि, फळ, जळ अर्पिति, वदति प्रिय, मानसा [22]धुर्ताराया. ॥ ७८
पूजुनि, [23]बोळवुनि तयां, मग, तो नृप, विप्रदत्त तीर्थजळें ।
घेउनि माथां, ससचिव, सेवूं बैसे ऋषिप्रसादफळें. ॥ ७९

---

१. रचूनि–**पंत.** २. एकत्र. तें भस्म गोळा करून–असा भाव. ३. विद्यारूप अमृताचा अभिषेक. ४. झाडाचें खोड, किंवा फांदी. ५. स्तवकर्ता, स्तुतिपाठक. ६. धनादि चांगल्या वस्तू. ७. तोडिलें आहे मूळ ज्याचें, असा वांझ जो वृक्ष, त्यावर. अफळ=फळरहित, वांझ. ८. वेघे=वेंघे=चढे. ९. निवारण करण्यास कठीण अशा ब्राह्मणदत्त शापामुळें. १०. राजाचें आयुष्य. ११. निर्+इंधन+शिखीस=जळण नसलेल्या विस्तवास. १२. परीक्षित राजा. १३. ज्याचें यश मलिन झालें नाहीं, असा. १४. तूं. येथें 'भवान्' हा शब्द योजिला आहे, म्हणून 'परतो' असें तृतीयपुरुषी क्रियापदाचें रूप घातलें आहे. १५. तपस्व्यांमध्यें श्रेष्ठ. १६. होवो. १७. चुटपूट. १८. घरांत. १९. भ्रमर. २०. कमळाच्या ठिकाणीं. **उपमा.** २१. कपट-वेषधारी मुनि (अर्थात् सर्प). २२. प्रतारायास, ठकवायास. २३. पाठवणी करून.

शिरला होता तक्षक योगबळें ज्यांत, तें चि भूप फळ ।
घेता झाला; **वाटे मोठें सर्वां[1] बळांत भाविबळ.** ॥ ८०
त्यांत नृपासि कृमि[2] दिसे, ज्याहुनि वर्णें ल्हान शेंदूर[3]; ।
ज्याचें[4] नेत्रयुग म्हणे, 'तिमिरों[5]! उपमा ल्हा, नसें दूर.' ॥ ८१
त्या ऱ्हस्वकाणुकृमिला[6] राजा सचिवांसि[7] दाखवी; हांसे; ।
भ्रमला सुविचक्षण परि; पडले कंठांत मृत्युचे फांसे. ॥ ८२
सचिवांसि म्हणे, 'सप्तम दिनें[8] सरलें; मरण युक्तिनें टळलें; ।
कृमि कंठीं डसवावा; शृंगिवचन ही न पाहिजे मळलें[9].' ॥ ८३
सचिव म्हणति, 'बहु उत्तम; **न करावा शब्द साधुचा लटिका;** ।
टळला चि समय; जाया अस्ताप्रति भानुला नको घटिका.' ॥ ८४
काळप्रेरित, सचिवानुमतें, नृप आपुल्या करें कृमिला ।
डसवी कंठीं; हांसे; तों तेणें कंठदेश आक्रमिला[10]. ॥ ८५
भीषणें[11]भोगें वेष्टुनि, फूत्कारें कांपवूनि सोग-रसा[12], ।
नागें, कंठीं चावुनि, नृप केला[13] घटजपीतसागरसा[14]. ॥ ८६

---

१. भवितव्यतेचें बळ. २. कीड, जंतु. ३. वर्णें ल्हान शेंदूर=रंगानें शेंदूर त्या कृमीपेक्षां कमी होता, म्हणजे त्या कृमीचा रंग शेंदुरापेक्षां देखील लाल होता. ४. ज्याचे डोळे अंधकारास म्हणत कीं, 'हे अंधकारा ! तूं माझें सादृश्य मिळव, [ काळेपणांत ] माझ्यापासून दूर राहूं नको. सारांश–त्या कृमीचे डोळे काळोखापेक्षां काळे ( फार काळे ) होते. ५. हे काळोखा ! येथें **'चेतनधर्मारोपोक्ति'** नामक अलंकार आहे. ( मागें पृष्ठ १७ टीप ८ पहा ). येथें 'तिमिर' हा अचेतन असून तो सचेतन आहे अशी कल्पना केलेली आहे. **पंतांचें** विराटपर्व, अध्याय १ गीति १०६ मध्यें हा अलंकार आढळतो. ६. ऱ्हस्वक+अणु+कृमिला=अत्यंत सूक्ष्म अशा किडीला. ७. सर्व प्रधानांस. ८. दिवस. 'दिन' हा शब्द संस्कृतांत नपुंसकलिंगी आहे. ९. बाध येतां कामा नये, डाग लागतां कामा नये. प्राचीन काळीं पूज्य व्यक्तींचा अनादर न व्हावा, अशाविषयीं फार काळजी घेण्यांत येत असे. ह्याचें दुसरें उदाहरण, गरुड व इंद्र यांच्या युद्धप्रसंगीं गरुडानें इंद्राच्या वज्राविषयीं दाखविलेला विनम्रभाव हें होय. ( मागें अध्याय ४ गीति १५६ पहा ). १०. व्यापला. ११. भयंकर शरीरानें ( गळ्याभोंवत्या वेंटोळ्यानें ). १२. पर्वतांसह पृथ्वी–**पंत.** साग=स+अग=पर्वतासह. रसा=पृथ्वी. १३. येथें मूळांतील ४३ वा अध्याय संपतो. १४. अगस्तीनें प्यालेल्या समुद्राप्रमाणें ( जीवनहीन केला ). घटज= अगस्त्य. मित्रावरुणांनीं आपलें तेज कुंभांत सोडिलें होतें, त्यापासून अगस्त्य ऋषि जन्मल्यामुळें त्यास कुंभयोनि, घटज असें म्हणतात. अगस्त्य ऋषि स्त्री व पुत्र यांसहित आश्रमधर्म चालवीत असतां, कालकेय नामक असुरांनीं लोकांस पीडा देण्यास सुरुवात केली, तेव्हां ते समुद्रांत

दव-कवळित-नगखगसे,[1] तग[2] सेवक काढिती न तैं पळ ते. ।
जळते प्रासादासह[3] नृपतिसवें, जरि न तत्क्षणीं पळते. ॥ ८७
मोटा नाद करुनि, मग गगनपथें, तो उडोनियां जाय.[4] ।
राय, प्रासादासह, होय भसित[5]; सर्व पुर[6] म्हणे, 'हाय.' ॥ ८८
परलोकहितें[7] नृपाचें करुनि, गुरु पुरोहितप्रधानजन ।
करिति जनमेजयाचें, अभिषेकुनि[8] सविधि पितृपदीं, भजन.[9] ॥ ८९
बाळपणीं च सुमति तो जनमेजय रंजवी प्रजा; मातां[10]–।
तांत तसा पाळी, ज्या गुरु-धन-सत्कार्य विप्र जामाता.[11] ॥ ९०
काशिप[12] सुवर्णवर्मा राजा, जनमेजया नृपा धन्या, ।
संबंध योग्य जाणुनि, देता झाला वपुष्टमा[13] कन्या. ॥ ९१
त्या काळीं च, ब्राह्मणवर्य जरत्कारु, सोडुनी[14] पहिला ।
आश्रम,[15] दुसरा सेवी, धन्य करी स्वांगनाग्रजा[16] अहिला.[17] ॥ ९२
वासुकिनें रम्य गृहीं, करवुनि साहित्य सर्व, वसवीला. ।
मुक्त्यर्थ[18] उमाशंकर जाणों देवालयांत बसवीला. ॥ ९३
स्त्रीस मुनि म्हणे, 'अप्रिय करितां चि त्यजिन तत्क्षणीं तुजला. ।

---

जाऊन लपून बसलेले असल्यामुळें ऋषीनें समुद्राचें शोषण करून, कालकेयांचा नाश केला व सकल जनांस स्वस्थ केलें–अशी कथा आहे. अगस्त्य ऋषि मोठा तत्त्ववेत्ता होता. याशिवाय त्याच्या आंगीं परोपकारबुद्धि असून धनुर्वेदामध्यें त्याची गणना उच्च कोटींत होत असे.

१. वणव्यानें ग्रासलेल्या वृक्षावरील पक्ष्यांसारखे. नग=वृक्ष किंवा पर्वत. २. तग काढणें=धीर धरणें, टिकाव धरणें. पळ=पळभर सुद्धां. ३. राजवाड्यासह. ४. [ वासुकी ] उडोनियां जाय–असा अन्वय. 'मोठा वेग करुनि तो गगनपथीं मग उडोनियां जाय' असा पाठभेद. ५. भस्म. ६. पुर=नगरवासी जन. ७. परलोकप्राप्ति व्हावी म्हणून करावयाचे विधि, उत्तरक्रिया. ८. 'अभिषेचुनि' असें पाठान्तर. ९. सेवा. १०. आईबापांनीं ज्याप्रमाणें आपल्या मुलाबाळांचें पालनपोषण करावें, त्याप्रमाणें जनमेजयराजा आपल्या प्रजेचें करीत असे–असा भाव. ११. ज्या ( ज्याला ) विप्र [ हा ] पुष्कळसें धन देऊन सत्कार करण्यास योग्य असा जांवईच आहे कीं काय असें वाटे–असा अर्थ. १२. काशीचा राजा. १३. नामविशेष. १४. 'सांडुनि' असें पाठान्तर. १५. ब्रह्मचर्याश्रम. येथें पंतांनीं जरत्कारूस पितरांचें दर्शन व त्यांचें जरत्कारूशीं संभाषण हा मूळांतील भाग गाळिला आहे. ( मूळांतील ४५ वा अध्याय पहा ). १६. आपल्या स्त्रीचा ज्येष्ठ बंधु जो वासुकी नामक सर्प, त्याला. १७. सर्पाला. १८. मुक्तीकरितां, मोक्ष प्राप्त व्हावा म्हणून. ही सरस व रम्य कल्पना पंतांचीच आहे. उत्प्रेक्षालंकार.

विप्रिय सोशी विषयी[1], हा, विषयाकारणें, नसे सुजला[2].' ॥ ९४
त्या शब्दें कंपिततनु झाली, झंझानिलें[3] जशी कदली[4]. ।
पदलीना ते साध्वी, मान्य करुनि, 'बहु बरें' असें वदली. ॥ ९५
भयचकितता[5] मृगाची, शुनकाची[6] जागरूकता[7] शिकली, ।
ती इंगितज्ञता[8] ही काकाची; म्हणुनि सेवनीं टिकली. ॥ ९६
पत्नी अंतर्वत्नी[9] होतां चि, म्हणे मनांत तो 'जावें; ।
हा स्नेहपाश कैसा तोडावा? यासि काय योजावें?'[10] ॥ ९७
एका समयीं, स्त्रीच्या अंकीं[11] ठेवूनि शिर, निजे श्रमला[12]. ।
साध्वीस तो चि अवयव सर्वावयवांत धन्यसा गमला. ॥ ९८
संध्यासमयावधि पति निजला, न उठे, म्हणोनि, ते व्याली[13], ।
निद्राभंग कराया, न कराया ही, सती मनीं भ्याली. ॥ ९९
'निद्राभंग बरा, परि न बरा आवश्यकक्रियालोप[14];' ।
करुनि विचार असा, जों उठवी, तों विप्र तो[15] करी कोप. ॥ १००
'कां गे! भुजंगमे[16]! त्वां मजला निद्राभरांत जागविलें? ।

---

१. विषयासक्त, कामुक. हा=मी. २. सुजणें=अप्राप्त वस्तूविषयीं अत्यासक्त होणें. 'सुजणें' ह्या शब्दानें अत्यंत आसक्ति, हांव, उत्कट इच्छा यांचा बोध होतो. एकाद्या मनुष्याला एकादा पदार्थ खाण्याची इच्छा झाली, आणि त्याला तो पदार्थ न मिळाला तर त्याच्या पोटाला बेंबीजवळ सूज येते आणि त्याला तो पदार्थ मिळाला म्हणजे ती सूज उतरते-अशी समजूत आहे. सुजणें ह्या शब्दाचा ह्या अर्थी उपयोग **पं**तांनीं अन्यत्र केला आहे. ( उद्योगपर्व, अध्याय ७।३७ व ६५; कर्णपर्व, अध्याय २१।३५ ). ३. झंझा+अनिल=पाण्याचा थेंब+वायु=पर्जन्यवृष्टियुक्त वारा. ४. केळ, केळीचें झाड. ५. भयामुळें चकित होणें हा हरिणाच्या ठायीं आढळणारा गुण. ६. श्वानाची. ७. जागृतपणा. श्वानाच्या अंगीं आढळणाऱ्या गुणासंबंधीं पुढील सुभाषित आहेः-बह्वाशी स्वल्पसंतुष्टः सुनिद्रः शीघ्रचेतनः । प्रभुभक्तश्च शूरश्च ज्ञातव्याः षट् शुनो गुणाः ॥. ८. दुसऱ्याच्या मनांतील भाव जाणणें. काक=कावळा. 'नराणां नापितो धूर्तः पक्षिणां चैव वायसः' हें वचन प्रसिद्धच आहे. मूळांतील 'उपायैः श्वेतकाकीयैः' ( अध्याय ४७।१२ ) ह्या केवळ दोन शब्दांच्या आधारावर ही गीति **पं**तांनीं रचिली आहे. ९. गरोदर. १०. स्नेहपाश तोडण्यासाठीं कोणतें कारण योजावें ?-असा भाव. ११. मांडीवर. १२. श्रमलेला, दमलाभागलेला. १३. नागकन्या ( जरत्कारी. ) १४. नित्यकर्में ( संध्याहोमादि ) यांचा लोप. १५. जरत्कारु. १६. सर्पिणी ! ह्या विशेषणाची योजना सहेतुक केलेली असल्यामुळें येथें **परिकरा**लंकार झाला आहे. मूळांत 'भुजंगमे' हाच शब्द योजिलेला आहे. ( अध्याय ४७।२५ ).

काय करशील ? अंकीं शिर ठेवुनि, तुज उदंड[1] भागविलें[2] ! ॥ १०१
जातों; न साहवे मज ऐसा अवमान, पळ हि, हा कांहीं. ।
गृहसुख पुरे; कळविलें; शूळ चि उठले शिरांत हांकांहीं[3]. ॥ १०२
'अस्तासि चालिला रवि, संध्याविधि अंतरेल,' या भावें, ।
म्हणसी जागविलें, तरि माझें सामर्थ्य तुज नसे ठावें. ॥ १०३
मी निजलों असतां, बळ कैंचें अस्तासि जावया रविला ? ।
म्यां काय द्यूतांत ख्यात[4] स्वतपःप्रताप[5] हारविला ? ॥ १०४
दाटूनि[6] दोष ठेवी, तो काय किति प्रकार बोलावा ? ।
स्नेहाचा, निजचित्तीं, लेश हि येऊं न दे चि ओलावा. ॥ १०५
जातां स्त्रीस म्हणे, 'मी होतों सुखरूप, या तुझ्या भवनीं[7]; ।
गेल्यावरि वासुकिला सांगावें, योग्य हा[8] जन स्व-वनीं[9].' ॥ १०६
नमुनि जरत्कारि[10] म्हणे, 'नसतां अपराध, टाकितां दासी; ।
द्विजराज[11] तुम्ही; या अपवादांकें[12] घाल हर्ष चांदासी. ॥ १०७
वासुकिनें, ज्या अर्थे, यां[13] देहें पूजिले भवच्चरण; ।
अजि वरद[14] ! अहो वत्सल ! आहे कीं तें नसे तुम्हां स्मरण ?' ॥ १०८
विप्र म्हणे, 'त्वद्गर्भी आहे गुणमणिकरंड[15], कवि, शिष्ट; ।
शापव्याकुळमातुळकुळविपदर्णवतरंडक[16], विशिष्ट[17].' ॥ १०९
वासुकि पुसे, 'अहा ! तो कां हो ! गेला मुनि ? स्वसे[18] ! नमनीं ।

१. पुष्कळ, कितीतरी. २. श्रमविलें, कष्टविलें. ३. तूं ज्या मला हांका मारिल्यास, त्या हांकांनीं. ४. प्रख्यात, सर्वांस ठाऊक असलेलें. ५. आपलें (माझें) तपःसामर्थ्य. मी द्यूत खेळून आपल्या तपाचें सामर्थ्य हरविलें नाहीं–असा भाव. ६. मुद्दाम, हट्टानें. ७. गृहांत. ८. हा जन ( मी ) स्व-वनीं ( आपल्या वनांत, अर्थात् वनांतील आश्रमांत राहाण्यास ) योग्य [ होय ]–असा भाव. ९. आपल्या वनांत (अरण्यांत). १०. येथें रा० पराडकर यांच्या प्रतींत 'जरत्कारु' असा शब्द आहे. मूळ पंतलिखित पोथींत असा पाठ असेल असें वाटत नाहीं. तेव्हां तो मुद्रणदोष असावा, असें म्हणणें भाग आहे, कारण पुढें गीति ११३ मध्यें 'जरत्कारि' असाच शब्द आहे. ११. ब्राह्मणश्रेष्ठ. १२. अपवाद ( दोषारोप ) रूपी डागानें. 'या अपवादें कैं घाल हर्ष चांदासी ?' असें पाठान्तर. १३. हा ( माझा ) देह अर्पण करून. १४. येथें बाह्यात्कारें स्तुति केली आहे असें वाटतें, परंतु तिचें पर्यवसान निंदेंत झालेलें असल्यामुळें येथें **व्याजस्तुति** अलंकार आहे. १५. सद्गुणरूप रत्नांचा डबा. १६. शापानें व्याकुळ जें मातुलकुल ( सर्पकुळ ) त्याला, विपत्तिरूप समुद्र तरण्याविषयीं जणूं काय नौकाच असा. १७. श्रेष्ठ, असामान्य. १८. बहिणी.

चुकलों चि काय आम्ही? क्षणभरि ही स्वस्थ निःस्वसे[1] न मनीं.' ॥ ११०
मुनिच्या अभयोक्तीनें झाला सानंदचित्त वासुकि; ती ।
स्वस्थ करी विश्वातें; तेथें कद्रूतनूद्भवासु[2] किती? ॥ १११
चिंतामणि[3] पेटीला, कीं जेविं निधानकुंभ[4] सुक्षितिला[5], ।
कीं अमृतरस कुपीला, बहु गौरव दे तिचा च कुक्षि[6] तिला. ॥ ११२
स्वहितेच्छु भुजग जपती फार जरत्कारिला, जैसे[7], चुकवी ।
जो बोध मरण, त्याच्या[8] माते विद्येसि सर्वदा सु-कवी. ॥ ११३
उत्तम समयीं झाला पुत्र तिला; प्रकटतां रवि प्राची[9] ।
जशि शोभे, तशि तेणें ती[10] भार्या फार फार विप्राची. ॥ ११४
**आस्तीक** नाम त्याचें ठेवुनि, मानूनि लाभ[11] लाभाचा[11], ।
वासुकिनें स्वप्राणांहूनि सदा रक्षिला भला भाचा. ॥ ११५

---

## अध्याय सहावा.

सचिवमुखें जनमेजय परिसे साद्यन्त तातघातकथा. ।
कोपें म्हणे, 'न शापीं[12], पापीं भुजगीं च, तात-घातक[13]-ता. ॥ १

---

१. निर्धनासारखे. निर्धन जसा स्वस्थ नसतो, तसे आम्ही देखील आपल्या मनांत स्वस्थ नव्हतों—असा भाव. निःस्व=निर्धन. २. सर्पांचे प्राण. ३. ह्या गीतींतील कल्पना **पं**तांना कविकुल-गुरु **का**लिदासकृत रघुवंश, सर्ग ३, श्लोक ९ वरून सुचल्या असाव्या. सदहू श्लोकाचें रूपांतरः—निधान उदरीं जिच्या धरणि ती विराजे जशी; । जिच्या जठरिं अग्नि ती विलसते शमी कां जशी; ॥ जलौघ उदरीं जिच्या असि सरस्वती शोभती । नृपाशि गमली तशी तव निजा सगर्भा सती. ॥ (कै० गणेशशास्त्री लेले). ४. द्रव्यानें भरलेला हांडा. ५. उत्तम जमिनीला. ६. कूस. (येथें लक्षणेनें 'गर्भ' असा अर्थ समजावयाचा). ७. 'तसे' असें पाठान्तर. ८. जो बोध मरण चुकवी (ज्या बोधामुळें मनुष्य मरणापासून मुक्त होतो) त्याच्या (बोधाच्या) माते विद्येसि (माता जी विद्या तिला) जसे सुकवी (शहाणे, विद्वान्) सर्वदा जपती, [तसे] स्वहितेच्छु भुजग (स्वतःचें हित इच्छिणारे सर्प) जरत्कारिला [फार जपती]—असा अन्वय. ९. पूर्वदिशा. ह्या गीतीशीं कविकुलगुरु **का**लिदासकृत अभिज्ञानशाकुंतलनाटकाच्या चौथ्या अंकाचा १८ वा श्लोक ताडून पाहाण्यासारखा आहे. सदहू श्लोकाचें रूपांतरः—कुलिन पतिच्या लाभोनीयां वरा गृहिणीपदा। नृपतिगृहिंच्या मोठ्या कार्यीं निमग्न जधीं सदा॥ प्रसवुनि—जशी प्राची सूर्या—सुता झणिं पावना। विरह तुजला माझा वत्से! कठीण गमेल ना? ॥ (रा० केशव विनायक गोडबोले). १०. जरत्कारी. ११. मोठा लाभ. १२. शापाच्या ठिकाणीं. १३. पित्याचा घात केल्याचा दोष.

हा ! तात ! मला झाली अत्यन्त असह्य, [१]तापदा, [२]वार्ता. ।
हा ! साहवेल कवणा ? [३]क्षण तरि सोसेल ताप [४]दावार्ता ?' ॥ २
भूप अमात्यांसि म्हणे, 'झालें [५]वनवृत्त तें कसें श्रवण ? ।
**काश्यप**तक्षकभाषण ऐकोनि तुम्हांसि भेटला कवण ?' ॥ ३
म्हणति प्रधान, 'होता काष्ठार्थी पुरुष [६]वटनगारूढ; ।
होऊनि भस्म, झाला जीवंत वटासवें चि, तो [७]गूढ. ॥ ४
तेणें कथिलें, देवा ! जरि मध्यें प्राप्त जाहलें मरण, ।
**काश्यप**मुनिच्या विद्यासामर्थ्यें त्यासि राहिलें स्मरण.' ॥ ५
सचिवांसि म्हणे राजा, 'जेणें बाधों दिली न हानि वडा; ।
वांचविता ताताला तो मुनि, चित्तांत [८]भाव हा निवडा. ॥ ६
मार्गांतूनि फिरविला **काश्यप**, देऊनि धन, असा मोटा ।
आग्रह घातीं ज्याचा, तो **तक्षक** अहि कसा नव्हे खोटा ? ॥ ७
तो चि भुजग [९]कृतपातक, घातक; तात कपटें खळें वधिला. ।
[१०]शृंगिक्षोभ बरा; परि न बरा त्या कुमतिच्या [११]मनांमधिला. ॥ ८
प्रिय आपलें कराया, **उत्तंका**चें हि, मी तया अरिला ।
भस्म करीन कुळासह; संकल्प असा स्वमानसीं धरिला.' ॥ ९
[१२]ऋत्विक्पुरोहितांतें भूप म्हणे, 'तक्षकें जसा तात ।
केला भस्म, तसा मी त्या [१३]दुष्टांचा हि इच्छितों घात. ॥ १०
होतील भस्म दहनीं [१४]पन्नग जेणें, जरि [१५]प्रयोग असा ।

---

राजाला जीवंत करूं नये म्हणून तक्षकानें काश्यपाला द्रव्य देऊन परत पाठविलें व त्यामुळें राजा मरण पावला. तेव्हां त्याचा दोष तक्षकाकडे आहे, ऋषीच्या शापाकडे नाहीं—असा भाव.

१. ताप देणारी. २. कथा. ३. 'क्षणभरि' असें पाठान्तर. ४. वणव्यानें पोळलेल्याला. ५. वनांत घडलेलें वर्तमान. ६. वटवृक्षावर चढलेला. (मागें अध्याय ५ गीति ६३–७३ पहा). ७. गुप्त असलेला. ८. ही गोष्ट मनांत पक्की ( निश्चित ) समजा. भाव=अभिप्राय. निवडा=निवडून काढा, धारण करा. ९. ज्यानें पाप केलें आहे असा, पापी. येथें **अश्वधाटी** यमक आहे. १०. शृंगी नामक ऋषीचा संताप. ( मागें अध्याय ५ गीति ४८–५० पहा ). ११. त्या कुमतिच्या मनामधिला ( मनांतील ) [ क्षोभ ] बरा न—असा अन्वय. १२. ऋत्विज आणि उपाध्याय यांना. १३. सर्पांचा. 'त्या दुष्टाचा' असें पाठांतर. १४. सर्प, नाग. १५. युक्ति, उपाय.

अवगत[1] असेल सांगा; हो पतिरिपुकुळविनाशहृष्ट[2] रसा[3].' ॥ ११
ते ह्मणति, 'नृपा ! आहे वेदपुराणोक्त[4] सर्पसत्र, पहा ।
कौतुक; ह्मणोत होउनि अहि पश्चात्तप्त[5], सभय, सत्रप[6], 'हा !' ॥ १२
'पारीक्षित जनमेजय नरनाथ करील सर्पसत्रास;' ।
बुध वदति; तूं चि तो[7] हो दीक्षित; होऊत सर्प सत्रास[8].' ॥ १३
साहित्य नृपति करवी; यज्ञायतनार्थ[9] मोजितां भूतें[10], ।
'विप्रनिमित्तें[11] यज्ञासिद्धि' असें भावि वर्णिलें सूतें[12]. ॥ १४
तें परिसोनि नृप म्हणे द्वास्था[13], 'या यज्ञमंदिरामाजी ।
मज न कळतां, न कोणी यावा; आज्ञा मनीं धरा[14] मोजी[15].' ॥ १५

---

## अध्याय सातवा.

दीक्षा नृपासि देउनि, विधिलागिं जपोनि, धीर[16] विप्र[16] कृती[16] ।
करिती सत्रारंभ व्यासादि तपोनिधी रविप्रकृती[17]. ॥ १
गुरुशापविधिकृततदनुमोदनसन्मंत्रमुनिबळें[18] कुंडीं[19], ।
जैसे पतंग दीपीं, पडति अमित[20] सर्प वन्हिच्या तुंडीं[21]. ॥ २

---

१. माहीत. २. राजा परीक्षितीच्या शत्रुकुळाच्या नाशानें आनंदित अशी. ३. पृथ्वी. ४. वेदांनीं व पुराणांनीं सांगितलेलें. ५. पश्चात्तापानें पोळलेले. ६. सलज्ज. ७. तो=ज्याची यज्ञ करण्याच्या कामीं आवश्यकता आहे असा. तो दीक्षित तूं चि हो—असा अन्वय. 'तोचि तूं हो दीक्षित' असें पाठान्तर. ८. सभय. ९. यज्ञकुंडाकरितां. आयतन=स्थान, जागा. १०. भूमीतें. ११. विप्रनिमित्तें (एका ब्राह्मणामुळें) यज्ञासिद्धि (यज्ञाची असिद्धि, यज्ञाची पूर्णता न होणें) [होईल] असें भावि (भविष्य, घडणारी गोष्ट) सूतें (सूतानें) वर्णिलें [आहे]—असा अन्वय. १२. ह्याचें नांव लोहिताक्ष. हा शिल्पशास्त्रज्ञ असून जातीनें सूत होता. हा मोठा पौराणिक होता, अशी याची प्रसिद्धी आहे. (मूळांतील अध्याय ५१ श्लोक १६ पहा). १३. द्वारपाळास. १४. येथें पंतलिखित पोथींत 'धरीं' असा पाठ आहे, पण तो यमकास अनुकूल नाहीं. १५. माझी. येथें मूळांतील ५१ वा अध्याय संपतो. १६. धैर्यवान् आणि कर्तृत्ववान् असे ब्राह्मण. १७. सूर्यासारखे तेजस्वी. १८. गुरु (पूज्य) अशी जी माता तिचा शाप, त्याला ब्रह्मदेवाचें अनुमोदन, उत्तम मंत्र आणि ऋषींचें सामर्थ्य यांच्या योगानें. १९. यज्ञकुंडांत, होमांत. २०. असंख्य. 'तसे' असें पाठान्तर. २१. मुखांत.

नानावर्ण[१], महाबळ, वृद्ध, शिशु, व्याळ म्हणति 'हा!' रडती; ।
पडतां कृशानुवदनीं[२], दीन महाकाय[३] फार आरडती. ॥ ३
उद्गाता[४] कौत्समुनी, पिंगल अध्वर्यु[५], त्या मखीं, होता. ।
शार्ङ्गरवऋषि ब्रह्मा[६], च्यवनात्मज चंडभार्गव हि होता[७]. ॥ ४
मौद्गल्य[८], देवशर्मा, कोहंड[९], उद्दालक, प्रमिति[१०], वत्स्य, ।
कुंड, जठर काळघट, श्रुतश्रवा[११], वेदवारिनिधिमत्स्य[१२]; ॥ ५
इत्यादि मुनि सदस्य[१३]; व्यास हि; ती अद्भुतप्रताप सभा. ।
लोपे वैश्वानरभा[१४]; अधिक दिसे त्या मखांत तापस-भा[१५]. ॥ ६
शक्रासि शरण गेला तक्षक, जाणोनि त्या मखारंभा. ।
दे अभय हरि[१६] हि; शरणागत चि सखा शर्मद[१७], न सखा रंभा. ॥ ७
बहु भुजग भस्म होतां, उरतां परिवार केवळ स्वल्प, ।
वासुकि हि, विकळ होउनि, 'सर्वांचा पातला' म्हणे 'कल्प[१८].' ॥ ८
भगिनीस म्हणे, 'वत्से! वाटे उसळोनि मी हि त्या कुंडीं[१९] ।
सत्वर पडेन; सर्पग्रासकरीं मंत्रदीप्तशिखि-तुंडीं. ॥ ९
दिग्भ्रम झाला; गेलें धैर्य-बळ; भ्रमतसें महातापें; ।

---

१. निरनिराळ्या रंगांचे. २. अग्निमुखीं. ३. मोठे, लठ्ठ. दीन=असहाय्य, संकटग्रस्त. ४. सामवेदी ऋत्विज. ह्याचें काम देवतांच्या संतोषार्थ सामवेदगायन करणें, हें असतें. ५. अध्यक्ष, यजुर्वेदी ऋत्विज. ह्याचें काम अग्नींत आहुति देण्याचें असतें. ६. वेदत्रयी जाणणारा ऋत्विज. याचें काम कर्मारंभीं व शेवटीं प्रणवोच्चार करणें व यज्ञांतील सर्व कामांवर देखरेख ठेवणें, हें असतें. ७. ऋग्वेदी ऋत्विज. ह्याचें काम यज्ञांतील देवतांस स्तुतिपूर्वक आव्हान करणें, हें असतें. ८. मुद्गलगोत्री समसौरभ नामक ऋषि. ९. 'कहोड' असें पाठान्तर. १०. मूळांत 'प्रमतक' असें नांव आढळतें. ११. 'श्रुत, श्रवक' असें पाठान्तर. १२. वेदरूपी समुद्रांतील जणूं काय मत्स्य ( मासे ) च असे, ज्यांनीं सर्व वेदांचें अवगाहन केलें आहे, असे. १३. सभासद, यज्ञांत वेदोक्तकर्मैं यथासांग चाललीं आहेत किंवा नाहींत, हें पाहाणारे ऋत्विज. १४. अग्नितेज. १५. ऋषितेज. १६. इंद्रानें देखील तक्षकाला अभय दिलें. कारण [ त्यानें विचार केला, कीं ] रंभा [ ही ] सखा ( मित्र ) न ( नव्हे, तर ) शरणागत चि सखा ( खरा मित्र ) [ व ] शर्मद ( सुखदायक ) [होय ]–असा भाव. परोपकार हाच मित्र होय–हा इत्यर्थ. येथें **'काव्यलिंग'** नामक अलंकार आहे. १७. सुखद. १८. प्रळय, मरणकाळ. १९. सर्पांचा ग्रास करणाऱ्या मंत्रप्रज्वलित अग्नीचें मुखच अशा कुंडांत.

मन न वळे मज[1], जैसा गज अंकुश न वसतां महाता-पें[2]. ॥ १०
आम्हां रक्षील तुझा आत्मज; कथिलें भविष्य हें [3]विधिनें; ।
म्हणुनि जरत्कारुकरीं पूर्वीं म्यां तुज समर्पिलें विधिनें[4]. ॥ ११
तें आजि सत्य व्हावें; वत्से ! वत्सासि सांग, 'माहेर ।
व्यसनीं[5] न बुडो, काढीं पुत्रातें[6], प्लव[7] करूनि, बाहेर.' ॥ १२
आस्तीकासि तशी तूं बहुमान्या, जानकी जशी कपिला[8]. ।
कीं देवहूति[9] माता जैशी त्या सर्वमुनिवरा कपिला[10].' ॥ १३
स्वस्थ हृदय वासुकिचें करुनि, जरत्कारुवृत्त सत्वर तें ।
पुत्रासि कथी; तेव्हां अभय दिलें त्यांसि[11] त्यां[12] हि सत्वरतें[13]. ॥ १४
आस्तीक म्हणे, 'मामा ! तुमचे असु या भयें न कांपावे. ।
स्वकृत[14]-सुकृत रक्षोद्यत[15] असतां, तें[16] संकटीं न कां पावे ? ॥ १५
जे मेले ते मेले; उरले रक्षील; आळस त्रात्या ।
हरिसि[17] नसे; वारील[18] चि सर्वात्मा विश्वपाळ सत्रा त्या.' ॥ १६
देउनि अभय असें, तो रक्षाया वासुकिप्रभृति भोगी[19], ।
वामन जसा बळिकडे, गेला जनमेजयाकडे योगी[20]. ॥ १७
व्हावा प्रवेश म्हणवुनि, मखऋत्विङ्नृपसदस्ययश[21] वर्णी ।

---

१. माझें मन मला आपल्या ताब्यांत ठेवितां येत नाहीं—असा भाव. २. महातापाशीं. पें=जवळ. हा हिंदीभाषेंतील प्रत्यय आहे. ३. ब्रह्मदेवानें. ४. यथाविधि, विधिपूर्वक. ५. संकटांत. ६. 'पुत्रातें बोध करुनि बाहेर' असाही पाठ आहे. ७. नौका. पुत्रातें प्लव करूनि [ आम्हांला व्यसनसागरांतून ] बाहेर काढीं—असा अन्वय. ८. वानरास ( मारुतीला ). येथील 'कपि' ह्या शब्दाची योजना पंतांचें यमकाधीनत्व दर्शविते. येथें पंतांनीं 'मारुति'—वाचक एकाद्या प्रौढ शब्दाची योजना करावयास पाहिजे होती. ९. ही स्वायंभूमनूची कन्या व कर्दमऋषीची पत्नी १०. हा कर्दमऋषीस देवहूतीपासून झालेला पुत्र. हाच सांख्यशास्त्राचा प्रवर्तक होय. यानेंच आपली माता देवहूति हिला ब्रह्मतत्त्वज्ञानाचा बोध केला होता. ११. वासुकीस. १२. आस्तिकानें. १३. सत्वगुणाच्या ठिकाणीं रत ( गुंग ) असणाऱ्या आस्तिकानें. १४. आपण केलेलें पुण्य. हें गीत्यर्ध सुभाषितरूप आहे. १५. रक्षण करण्याविषयीं तत्पर. १६. तें=पुण्य. **प्रश्नालंकार.** १७. इंद्राला. ( मागें गीति ७ पहा ). १८. 'वारिलचि तो सर्वात्मा' असें पाठान्तर. १९. सर्प, नाग. २०. योगसाधन करणारा ( आस्तीक ). २१. मख+ऋत्विग्+नृप+सदस्य+यश=यज्ञ, ऋत्विज, राजा आणि सदस्य यांची कीर्ति.

साधु, जरत्कारुमुनीश्वरबाळ, व्याळपाळ[1], मुनि, वर्णी[2]. ॥ १८
'सोम, वरुण, प्रजापति, सुरपति, यम, रंतिदेव, शशबिंदु, ।
नृग, गय, अजमीढ, धनद, दशरथकुळदुग्धसिंधुचा इंदु[3]; ॥ १९
नृपति युधिष्ठिर, भगवान् व्यास, असे सुविधिदेशसमयज्ञ[4] ।
जे जे, त्यांहीं केले मख, हा ही योग्य त्यां चि सम यज्ञ. ॥ २०
या सत्रींचे विप्र श्रुतिशास्त्रयशस्तपोनिधि[5], ज्ञानी, ।
हे साक्षात् वेदपुरुष, गावे, ध्यावे, सदा विधिज्ञांनीं. ॥ २१
भगवान् पुत्रच्छात्रांसह वेदव्यास देव आपण, ज्या ।
सान्निध्य[6] देतसे, निजभाग्यें बहुमान्य भूप हा[7] पणज्या[8]. ॥ २२
जे विधिनें तुज भजले, तरले चि भवांत वीतिहोत्रा[9] ! ते. ।
त्वां अभय[10] ज्यासि न दिलें, रक्षाया त्यासि भीति हो त्राते. ॥ २३
राया ! अपूर्व दिधला त्वां हा या हव्यवाहना[11] भाग. ।
तूं तैसा चि, जसे ते खट्वांग, दिलीप, भीष्म, नाभाग. ॥ २४
भीष्में[12] व्रतें; दिवाकर तेजें; प्रभुतें[13]करूनि तूं शक्र; ।
द्युतिनें[14] नारायण तूं; यद्यपि नाहीं तुझे करीं चक्र[15]. ॥ २५
गुणरत्नाकर[16] कृष्णापरि; धर्मविनिश्चयज्ञ तूं धर्म; ।
आश्रय वसुश्रियांचा[17], तूं यज्ञनिधान, भूमिचें शर्म. ॥ २६
तूं अस्त्रशस्त्रशास्त्रज्ञाता दाशरथि राम बाहुबळें; ।
और्व[18], त्रित[19] तेजें; तूं भगीरथ[20], पहावया अशक्य खेळें. ॥ २७

---

१. सर्पांचें रक्षण करणारा. २. ब्रह्मचारी. ३. दशरथकुळरूप क्षीरसागरांतील चंद्र (प्रभु रामचंद्र). **रूपका**लंकार. ४. शास्त्र, प्रदेश व प्रसंग हीं उत्तम प्रकारें जाणणारे. ५. वेद, शास्त्र, कीर्ति आणि तप यांचें भांडारच असे. ६. सहवासाचा लाभ देत असे. ७. हा जनमेजय राजा. ८. आजाचा बाप जो अर्जुन, त्याला. ९. हे अग्ने ! अग्नि–पंत. १०. 'त्वां अभय ज्यांसि ··· त्यांसि भीति' असें पाठान्तर. ११. अग्नीस. १२. येथें **उल्लेख** नामक अलंकार आहे. जेथें एकच वस्तु अनेकांस भिन्न प्रकारानें दिसते, तेथें **उल्लेख** अलंकार होतो. १३. प्रभुता= राजवैभव, सामर्थ्य. १४. कांतीनें, तेजानें. १५. सुदर्शन नामक चक्र. येथें **व्यतिरेका**लंकार आहे. १६. सद्गुणांचा सागर. ह्या गीतींतही **उल्लेखा**लंकार आहे. १७. अष्टवसूंच्या वैभवाचा. अष्ट वसुः—अह, ध्रुव, सोम, धर, अनिल, अनल, प्रत्यूष व प्रभास. (मागें पृष्ट ३९ टीप ७ पहा). १८. ऋषिविशेष. ऊर्व नामक ऋषीचा पुत्र. १९. हा गौतम ऋषीच्या तीन पुत्रांतील

वीर्य सदा गुप्त तुझें, जैसें वाल्मीकिचें; जितक्रोध; ।
[1]जोडा तूं चि वसिष्ठा; न दुजा; केला उदंड म्यां शोध. ॥ २८
[2]अस्मन्मनःप्रिया ! तुज या सर्वांसह सदा असो [3]स्वस्ति; ।
[4]त्वद्यश करो, तुझ्या अरिभटकटकासह, दिगंतरीं वस्ती. ॥ २९
या ऐशा सत्राचा कर्ता तूं मात्र भारता ! राया ! ।
तूं व्यसनीं [5]सेतु जनां, वाहूनि [6]जनाधिभार, [7]तारायां.' ॥ ३०
ऐसें करितां स्तवन [8]प्रज्ञातेजोनिधिप्रति द्वारीं ।
[9]रोध करावा कवणें ? झाला बहुमान्य वेद[10]विद्वारीं. ॥ ३१
वय अल्प; [11]अनल्प तपोविद्यातेज; प्रग[12]ल्भता शब्दीं; ।
पाहोनि, सर्व सादर झाले मुनि ते, जसे [13]शिखी [14]अब्दीं. ॥ ३२
भूप म्हणे, 'बाळ दिसे, परि मतिनें [15]वृद्धसा, न बाळकसा; ।
वय अल्प; परि अनल्प ज्ञान; म्हणावा असा हि बाळ कसा ? ॥ ३३
वर द्यावासा वाटे; भलत्यासि [16]सुपात्र हें नव्हे लभ्य; ।
सांगोत श्रीव्यासप्रभृति, करुनि ऐकमत्य, मज सभ्य.' ॥ ३४

---

२०. तूं भगीरथासारखा पराक्रमी असल्यामुळें तुझ्याकडे नुसतें पहाणें देखील दुष्टाला शक्य नाहीं–असा भाव.

१. तप आणि सहनशीलता यांविषयीं वसिष्ठाशीं तुझें साम्य आहे. कारण त्याचे शंभर पुत्र विश्वामित्रानें मारिले, तथापि त्यास क्रोध आला नाहीं. २. आमच्या मनास आवडणाऱ्या ! ३. क्षेम, कल्याण. ४. तुझ्या पराक्रमामुळें तुझे शत्रु भीतीनें दिगंतरीं पळून जावोत व त्या योगानें तुझी कीर्ति सर्व जगांत पसरो–असा भाव. येथें **'सहोक्ति'** नामक अलंकार आहे. ५. संकटरूपी समुद्रावरील पूल. ६. जन+आधि+भार=जनांचा मनोव्यथारूप भार. ७. येथें मूळांतील अध्याय ५५ वा संपतो. आस्तिकानें केलेला स्तुतिपाठ **व्या**सांनीं १६ श्लोकांत वर्णिला आहे. त्याचा सारांश **पं**तांनीं १२ गीतींत आणिला आहे. ८. बुद्धि व तेज यांचें भांडारच अशा आस्तिकाला. ९. अटकाव, प्रतिबंध. १०. वेदवेत्त्यांच्या समूहांत. वार=समूह. ११. अन्+अल्प=नाहीं+थोडें=पुष्कळ. १२. प्रौढता. १३. मोर. १४. मेघांचे ठिकाणीं. १५. ज्ञानवृद्ध, ज्ञाता. जगांत वयोवृद्धांपेक्षां वाचनादि अभ्यासानें ज्ञानवृद्ध झालेल्या व्यक्तींसच लोक पूज्य मानितात. ज्ञानवृद्धच खरा वृद्ध होय. ह्यासंबंधीं पुढील वचन पहाः–न तेन वृद्धो भवति येनास्य पलितं शिरः । यो वै युवाप्यधीयानस्तं देवाः स्थविरं विदुः ॥ ( मनुस्मृति, अध्याय २ श्लोक १५६ ) म्हणजेः—नुसते केंस पिकून मस्तक पांढरें झालें म्हणून मनुष्य वृद्ध मानला जात नाहीं. जो सतत अध्ययनांत निमग्न असतो, तो तरुण असला तरी त्याला देव वृद्ध समजतात. १६. सत्पात्र, वर देण्यास योग्य असें स्थान.

सर्व सदस्य म्हणति, 'बहु उत्तम सत्कारयोग्य हें पात्र; ।
द्यावे[1] वर; थांबावें परि ये तक्षकभुजंग तों मात्र.' ॥ ३५
आस्तीकचातकावरि तो नृप जीवनद[2] बोळला[3] होता; ।
तों तें चि वदे; जाणुनि मखविघ्न, मनांत पोळला होता[4]. ॥ ३६
'तक्षक येऊं द्यावा' ऐसें म्हणतां चि, राय होत्यातें ।
प्रार्थुनि म्हणे, 'शिखिमुखीं[5] होमा; अवकाश काय हो त्यातें ?' ॥ ३७
ऋत्विज म्हणति, "नृपा ! सुरपति[6] आहे सिद्ध शत्रुच्या अवनीं[7]; ।
शस्त्राधिदेवता[8] हें सांगति 'हरिच्या[9] चि तो असे भवनीं[10].'" ॥ ३८
तो लोहिताक्ष-सूत हि बोले, 'मुनि बोलिले यथार्थ, नृपा ! ।
कथितों पुराणमत मी; कोण न शरणागतीं करील कृपा ?' ॥ ३९
इंद्रें स्वतातघातक पाठीशीं घातला, म्हणूनि, करें ।
कर चोळी; अधरातें चावे[11] जनमेजय प्रभू निकरें[12]. ॥ ४०
नृपतिप्रियार्थ होता मंत्रबळें तक्षकासि आकर्षी; ।
गडबडले बहु तेव्हां वासव, सुर, साध्य, सिद्ध, नाकर्षी[13]. ॥ ४१
शक्र, बसोनि विमानीं, लपवुनि अहि उत्तरीयवस्त्रांत[14], ।
सत्रासि जाय, होउनि विवश[15], बळ अनंत विप्रशस्त्रांत[16]. ॥ ४२
सर्पमखायतनोपरि[17] गगनीं आला भयार्त मघवा[18] हो; ।
अतुळा ऋषिकीर्तिसुधातटिनी[19]; तीमाजि सर्व अघ[20] वाहो. ॥ ४३
तों नृप होत्यासि म्हणे, 'आझुनि जरि हरि[6] अरीस[21] सोडीना; ।
निजभक्तसंततीचें करुनि हित, प्रेम यश हि जोडीना; ॥ ४४
तरि काय पहातां ? हो ! दोघांस[22] हि पावकांत[23] होमा जी ! ।
तुमच्या पदप्रसादें वांच्छा सफळा जगांत हो मौजी[24].' ॥ ४५

---

१. 'द्यावा वर' असें पाठान्तर. २. जीवन ( जल )+द ( देणारा )=मेघ. ३. बोळणें=प्रसन्न होणें. 'ओळला' असा अन्य पाठ. ४. हवनकर्ता. ५. अग्नीच्या मुखांत. ६. इंद्र. ७. रक्षणीं. ८. शस्त्रांच्या (मंत्रविशेषांच्या) मुख्य देवता. ९. इंद्राच्या. १०. गृहीं. ११. 'चावी' असें पाठान्तर. १२. क्रोधानें. १३. स्वर्गांतील ऋषी. १४. उपरण्यांत, पांघरण्याच्या वस्त्रांत. १५. व्याकुळ. १६. ब्राह्मणांच्या [ मंत्रादि ] हत्यारांत. १७. सर्पसत्राच्या मंडपावर. १८. इंद्र. १९. ऋषींची कीर्तिरूपी अमृतनदी. २०. पातक, पाप. २१. शत्रु जो तक्षक, त्याला. २२. इंद्र व तक्षक ह्या दोघांस. 'इंद्राय स्वाहा, तक्षकाय स्वाहा' ही प्रचारांतील म्हण प्रसिद्धच आहे. २३. अग्नींत. २४. माझी.

ऐशी यजमानाची आज्ञा होतां चि, विप्रवर होता ।
झाला सिद्ध, तयीं त्या यज्ञाच्या उपरि वज्रधर होता. ॥ ४६
भ्याला नाहीं जो प्रभु, करितां वृत्रासवें हि भीम-रणां[1], ।
पविधर[2], कवि, धरभेत्ता[3], तो ही सुरराज, फार भी मरणा. ॥ ४७
त्यजिला सुरपतिनें तो शरणागत तक्षक स्व पदरींचा[4]; ।
पावेल चि भंगातें प्रभु हि, जरि धरील पक्ष सदरींचा[5]. ॥ ४८
हरि[6] भवनास[7] चि गेला, सोडुनि शरणागत स्वहस्तींचा; ।
दैवकवळितनिजकलभत्राणीं[8] दुर्बळ चि पति हि हस्तींचा. ॥ ४९
ओढोनि आणिला हो ! तो तक्षक मंत्रशक्तिनें जवळ; ।
आपण 'घे' म्हणतां चि, ज्वलनें घ्यावा चि आननें[9] कवळ[9]. ॥ ५०
ऐसें करूनि ऋत्विज म्हणति, 'नृपा ! जें त्वंदिष्ट[10] सत्कार्य, ।
तें हें झालें चि बरें; सत्कारीं शिशुमुनींद्र[11] सत्कार्य[12]. ॥ ५१
बहुधा अहि कंपितहरिहस्तापासोनि पावला पतन; ।
हे नाद[13] तक्षकाचे; भवदहिता[14] करिल कोण गा जतन ?' ॥ ५२
मुदितमना नृपति म्हणे, 'बाळमुने ! वर तुला महाकविला ।
देतों; माग; न आम्हीं कोणीं हि कधीं सकाम[15] हाकविला[16].' ॥ ५३
आस्तीक म्हणे, 'देवा ! तुमचा महिमा बहूत्तम खरा, हो ! ।
जरि वर देतां, द्या हा, न बरा अत्यंत उग्र मख[17], राहो.' ॥ ५४
नृपति म्हणे, 'मणि, कांचन, धेनु, गज, ग्राम, घे; न मख राहो; ।
देवी सरस्वतीच्या मजवरि तूं सुप्रसन्न मखरा[18] ! हो.' ॥ ५५

---

१. भयंकर युद्धास. २. वज्रधर. वज्र हें इंद्राचें शस्त्र होय. ३. पर्वत भेदणारा. ४. आपल्या उत्तरीयवस्त्राच्या पदरांत असलेला ( गीति ४२ पहा ). ५. साधूंच्या शत्रूंचा. हें गीत्यर्ध सुभाषितरूप आहे. ६. इंद्र. ७. गृहास. ८. वणव्यांत सांपडलेल्या आपल्या छाव्याच्या रक्षणाविषयीं. ९. मुखानें. कवळ=घांस. १०. तुला प्रिय. ११. बालवय असूनही मुनिश्रेष्ठच आहे असा. १२. सत्कार करण्यास योग्य. १३. ध्वनि, शब्द, गर्जना. १४. तुमच्या शत्रूस. १५ इच्छायुक्त, आपले मनोरथ पूर्ण व्हावे असें इच्छिणारा. १६. हांकलून लाविला, विन्मुख जाऊं दिला. १७. अत्यंत उग्र मख बरा न, [ तो ] राहो ( बंद होवो ), हा [ वर ] द्या—असा अन्वय. १८. देवी सरस्वतीच्या मखरा !=सरस्वतिदेवीच्या निवासस्थाना ! ज्ञात्या !

विप्र म्हणे, 'मणि, कांचन, धेनु नको, हय नको, नको हस्ति, ।
ग्राम नको, धाम[1] नको, मख राहो. मातृकुळ[2] असो स्वस्ति[3].' ॥ ५६
ऋत्विक्, सदस्य म्हणती, 'राया ! स्तुतिचा[4] मनोज्ञ नवरा हो; ।
दे वर मुनिला; त्वद्यश साधुवदान्यांत[5] नित्य नव[6] राहो !' ॥ ५७
नृप लोभवीत होता जोंवरि मुनिला अनेकवरदानें, ।
सांवरिला होता अहि मुनितेजानें प्रपन्नकरदानें[7]. ॥ ५८
मग त्या आस्तीकाला भूप म्हणे, "जरि नको दुजें[8] वस्तु[9]; ।
'त्वंत्सत्रमेव[10] विरमंतु[11]' म्हणसि, तरि तुझें चि इष्ट तें अस्तु[12]." ॥ ५९
विप्राचें प्रिय करितां, सर्व हि ऋत्विक्, सदस्य, वरदा त्या ।
म्हणति, 'भला ब्रह्मण्या[13] ! सर्वां दात्यांत तूं चि वरें[14] दात्या !' ॥ ६०
केलें सत्र समाप्त, क्षितिपतिनें विप्र तर्पिले वित्तें; ।
गौरविला आस्तीक प्रेमें, मानूनि आत्मभू[15] चित्तें. ॥ ६१
जेणें 'विप्रनिमित्तें विघ्नितें[16] होईल मख' असें भावी[17] ।
कथिलें होतें, नृप त्या सूतीं हि महागुणज्ञता[18] दावी. ॥ ६२
'व्हावें सदस्य माझ्या हयमेधीं[19] त्वां महामनुज्ञात्या[20] !' ।
ऐसें आस्तीका नृप विनवुनि, दे जावया अनुज्ञा[21] त्या. ॥ ६३
दुष्कर कर्म करुनि तो मुनि, जाउनि शीघ्र मातुळावासा[22], ।
दे हर्ष, घनें दिधल्या दवार्तहर्षासवें[23] तुळावा[24]सा. ॥ ६४

---

१. गृह. २. आईचें (अर्थात् सर्पांचें) कुळ. ३. कुशल. ४. [ तूं ] स्तुतिचा मनोज्ञ नवरा हो=आस्तिकऋषीनें केलेल्या स्तुतीस साजेल अशी कृति कर. मनोज्ञ=सुंदर. ५. सज्जन व दाते यांच्या मंडळींत. ६. नूतन. ७. शरणागतास आश्रय देणाऱ्यानें. ८. 'दुजी' असें पाठान्तर. ९. हा शब्द संस्कृतांत नपुंसकलिंगी आहे. १०. त्वत्+सत्रं+एव=तुझा यज्ञच. ११. राहो. १२. असो. १३. ब्राह्मणांच्या हितकर्त्या ! १४. श्रेष्ठ, थोर. येथें मूळांतील छप्पन्नावा अध्याय संपतो. सर्पसत्रांत दग्ध झालेल्या सर्पांचीं नांवें अध्याय ५७ मध्यें दिलेलीं आहेत. तो भाग पंतांनीं गाळिला आहे. १५. स्वयंभू ( ब्रह्मदेव ). १६. ज्यांत विघ्नें आहेत असा ( मागें अध्याय ६ गीति १४ पहा ). १७. पुढें होणारें. १८. मोठी गुणग्राहकता. १९. अश्वमेध यज्ञामध्यें. २०. गायत्री हा महान् मंत्र, तो जाणणाऱ्या. मनु=मंत्र. २१. निरोप. २२. मामाच्या (वासुकीच्या) गृहास. २३. वणव्यांत सांपडल्यामुळें ज्यास दुःख झालें आहे, त्यास [ मेघाच्या वृष्टीमुळें ] जसा हर्ष व्हावा, त्याप्रमाणें. २४. तुलना करावी असा.

जीवनदानें[1] झाला सर्वांसह सुप्रसन्न नागवर[2] ।
वासुकि, त्या भगिनीच्या पुत्रासि म्हणे, 'यथेष्ट माग वर.' ॥ ६५
आस्तीक म्हणे, 'माझ्या आख्यानीं अर्पितील जे श्रवण, ।
त्यांसि न लेश हि द्यावें भय, व्हावें सर्वदा तुम्हीं प्रवण[3].' ॥ ६६
पन्नग[4] म्हणति, 'दिला वर बापा ! त्वच्चरितनामगात्याचा[5] ।
घात करील अही जो, मूर्धा[6] शतधा उलेल[7] गा ! त्याचा.' ॥ ६७
ऐसा आस्तीक मुनि व्याळांचा शाप, मृत्यु, वारूनि[8], ।
तप करुनि, वंश ठेवुंनि[9], गेला मोक्षासि, भक्त तारूनि. ॥ ६८
सौति म्हणे, 'हे शौनक ! मुनिवर्या ! सुमतिकीर्तिसदनानें[10] ।
रुरुला अशी प्रमतिनें पूर्वीं कथिली कथा स्ववदनानें.'[11] ॥ ६९

---

## अध्याय आठवा.

शौनक सौतीस म्हणे[12], 'सत्रीं कर्मांतरीं कथा व्यासें ।
कथिल्या नृपा तशी[13], त्या वाटे आम्हां तुवां कथाव्यासें[14].' ॥ १
सौति म्हणे, 'परिसा जी ! कथनीं आहे मला हि हव्यास[15]; ।
सांगेन तें चि, वदला नृपतिप्रति जें सुखावह[16] व्यास.' ॥ २
व्यासासि म्हणे राजा, 'संतति संरक्षिली तुवां कुरुची; ।
क्षयहेतु[17] विरोधाची उठली तीच्या मनांत कां कु-रुची[18] ? ॥ ३
कौरव पांडव बंधू, वैर कसें त्यांत वाढलें अजि ! तें ? ।

---

१. प्राणदानामुळें. २. वासुकी. ३. नम्र. ४. (वासुकी आदिकरून सर्व) सर्प. ५. तुझें चरित्र व नाम हीं गाणाऱ्याचा, तुझें स्मरण करणाऱ्याचा. ६. मस्तक. कल्पनासादृश्यः—वदतां अयथार्थ तुझा मूर्धा शतधा फुटेल पविपातें. । (पंतकृत सभापर्व, अध्याय ५ गीति ९९). ७. फुटेल. ८. निवारण करून, नाहींसा करून. ९. वंशाचा क्षय न होऊं देतां. १०. हें प्रमतीचें विशेषण. ११. येथें मूळांतील अठ्ठावन्नावा अध्याय संपतो. १२. येथें महाभारतांतील मुख्य कथानकास आरंभ होतो. १३. पंत हा शब्द 'तस्या' असा लिहितात. १४. कथाव्या+असें, सांगाव्या असें. १५. उत्कंठा. १६. व्यास नृपतिप्रति जें सुखावह वदला, तें चि सांगेन—असा अन्वय. सुखावह=सुखदायक. १७. क्षयास कारणीभूत अशी. १८. दुष्ट रुचि, वाईट आवड.

सांगा, न वारिलें त्वां प्रभुनें[1] कां ? त्या हि ईश्वरें अजितें[2] !' ॥ ४
श्रीव्यासें स्वच्छात्रा[3] श्रीवैशंपायना दिली आज्ञा; ।
'पूर्वजकथा कथावी राया जनमेजया तुवां प्राज्ञा !' ॥ ५
सांगे वैशंपायन संक्षेपें[4] प्रथम सर्व ही, परि तें ।
तृप्ति न दे, म्हणुनि पुन्हां सांगे रायास विस्तरें चरितें[5]. ॥ ६
उपरिचरवसुकथा, जी मुनिगीता[6], आयका कवी हो ! ती, ।
हे चि सुधा; तुळितां तरि, बहु बोलों काय ? काकवी हो ती[7]. ॥ ७
पुरुवंशज वसु पूर्वीं उग्र तप करि; प्रजावन[8] त्यागी; ।
त्यासि हरि[9] म्हणे, 'तुज भूत्राण[10] चि हित, हे नव्हे असत्या गी[11].' ॥ ८
सुरमुनि हि तसें चि म्हणति; मग वसु तें मान्य करि; तया माळा[12], ।
यष्टि[13], स्फटिक-विमान[14] हि दे शक्र सख्या स्वचेदिभूपाळा[15]. ॥ ९
तो हरिदत्तविमानीं हरिसा साजे; म्हणोनियां प्रणती ।
करुनी, उपरिचरवसु[16] प्रेमें गंधर्व अप्सरा म्हणती. ॥ १०

---

१. त्वां प्रभुनें=आपल्यासारख्या समर्थानें. २. अजिंक्य अशा श्रीकृष्णानें. ह्या गीत्यर्धांत 'प्रभु' व 'अजित' ह्या विशेषणांची योजना सहेतुक केलेली असल्यामुळें येथें **परिकरालंकार** झाला आहे. ३. आपल्या शिष्याला. छात्र=शिष्य. ४. पंतांनीं देखील हेंच धोरण स्वीकारिलें आहे. येथें मूळांतील अध्याय ५९, ६०, ६१ व ६२ मधील १४० श्लोकांचा सारांश पंतांनीं सहा गीतींत दिला आहे. ५. घडलेल्या गोष्टी. 'सांगे रायासि विस्तरें चरितें' असें पाठान्तर. ६. मुनिजनांनीं किंवा व्यासमुनींनीं गाइलेली. ७. ती=सुधा. उपरिचरवसूची कथा हीच खरी सुधा ( अमृत ) होय. सुधा व वसुकथा यांची तुलना करण्यांत काय अर्थ ? ह्या वसुकथेपुढें सुधा ही काकवीसारखी आहे—असा भाव. हो=होवो. ८. प्रजांचें रक्षण. ९. इंद्र. १०. पृथ्वीचें रक्षण. ११. वाणी. १२. जिच्यांतील कमळें कधींही कोमेजत नाहींत अशी वैजयंती माळा मी तुला देतों. युद्धामध्यें ती तुला शस्त्रांनीं जखम होऊं देणार नाहीं, असें मूळांत आहे ( अध्याय ६३।१५ ). १३. सज्जनांचें रक्षण करणारी वेळूची काठी ( मूळ अध्याय ६३।१७ ) १४. आकाशांत फिरणारें, देवांनीं उपभोग घेण्यास योग्य असें एक सुंदर व मोठें स्फटिकाचें विमान इंद्रानें वसुराजास दिलें ( मूळ अध्याय ६३।१३ पहा ). 'विमानहि ये' असें पाठान्तर. १५. स्वकीय अशा चेदिदेशाच्या राजाला. पुरुवंशीय वसु-राजानें इंद्राच्या सांगण्यावरून सुंदर व रमणीय चेदिदेश काबीज केला ( मूळ अध्याय ६३।२ ). हा देश धनधान्य व सुवर्णरत्नादिकांनीं समृद्ध होता ( मूळ अध्याय ६३ लोक ७–१२ ). १६. गंधर्व [ आणि ] अप्सरा [ वसूतें ] प्रेमें ( प्रेमानें ) 'उपरिचर' ( वर म्हणजे आकाशांत संचार करणारा ) वसु [ असें ] म्हणती—असा अन्वय. 'करुनि, उपरिचर वसुतें प्रेमें ··· म्हणती' असा पाठभेद.

होती नदी श्रुतिमती त्याच्या नगरासमीप जी, तीतें, ।
रोधुनि बळें चि कोलाहलनग[1] भोगी[2], त्यजूनि नीतीतें. ॥ ११
तटिनीस[3] सोडवाया, बळसिंधु, नृपति, जसें विटा[4] मत्ता, ।
त्या कोलाहलगिरिला हाणी, अशनी[5] जशी, तशी लत्ता. ॥ १२
पादाघातें[6] पडलें विवर; तयांतूनि ती[7] निघोनि नृपा ।
अर्पुनि नगज[8] सुतसुता[9], 'मजवरि केली' म्हणे 'उदंड कृपा.' ॥ १३
सेनापति करुनि तिचा सुत, वसुनें तत्सुते[10] हि गिरिकेला[11] ।
स्त्रीत्वें वरूनि विधिनें[12], श्वशुरत्वें तो हि धन्य गिरि केला[13]. ॥ १४
गिरिकेच्या ऋतुकाळीं केली आज्ञा स्वयें चि पितरांनीं; ।
म्हणुनि मृगयार्थ गेला, संपादाया तदीय हितें[14] रानीं. ॥ १५
तें वन चित्ररथोपम[15] खवळी कामासि, म्हणुनि गिरिकेला ।
वसुनृप चिंती; मदनें वश तो तत्काळ धैर्यगिरि केला. ॥ १६
चित्तांत चिंतितां चि स्त्रीसंगसुखासि, शुक्रपात[16] घडे; ।
पत्रपुटीं[17] धरुनि, वसु क्षितिपति पळमात्र संकटांत पडे. ॥ १७
वीर्य अमोघ[18] व्यर्थ न जावें, ऐसा विचार आठविला; ।
तें स्त्रीस द्यावयाला, मग खग[19] नगरासि शीघ्र पाठविला. ॥ १८
पत्रपुट धरुनि तुंडीं श्येन[20] उडे, त्यासि धांवतां अडवी ।
आमिषशंकी[21] अन्य श्येन नभीं; दैव अन्यथा[22] घडवी. ॥ १९
ते श्येन तुंडयुद्धीं जेव्हां खपथीं[23] प्रवर्तले दोघे, ।
तेव्हां पादनखांनीं पत्रपुटातें धरूनि खग तो घे. ॥ २०

---

१. कोलाहलनामा पर्वत. २. उपभोगी. ३. नदीस. ४. जाराला. 'वेश्यापतिर्भुजङ्गः स्याद्विटः पाल्लविकः स्मृतः' इति हलायुधः. ५. वज्र. ६. लाथेनें. ७. नदी. ८. पर्वतापासून उत्पन्न झालेलीं ९. मुलगा व मुलगी. १०. 'तत्सुता हि' असें पाठान्तर. ११. गिरिकानामक कन्येला. १२. यथाविधि, धर्मशास्त्रांतील नियमांनुसार. १३. ह्या गीत्यर्धात **पर्यायोक्ता**लंकार आहे. १४. कल्याण. पितरांच्या आज्ञेचें पालन करण्यांतच आपलें हित आहे, असें समजून, तो राजा गिरिकेच्या मोहास वश न होता शिकार करावयास गेला—असा भाव. १५. कुबेराच्या बागेसारखें. १६. वीर्यपात. १७. द्रोणांत. १८. व्यर्थ न होणारें. १९. पक्षी. २०. ससाणा पक्षी. २१. तें मांस आहे अशी शंका ज्यास आली होती, असा. 'आमिषशंकित' असें पाठान्तर. २२. भलतेंच, दुसरेंच कांहीं. २३. आकाशमार्गांत.

तें वसुवीर्य गळालें, श्येनाचें चित्त गुंततां युद्धीं; ।
पडलें दैवनियोगें[1] श्रीमद्भास्करसुतोदकीं[2] शुद्धीं. ॥ २१
त्यातें मत्स्यी प्राशी; ती तैशी अद्रिकाप्सरा शापें ।
विधिच्या झाली होती, आपण संपादिल्या तशा[3] पापें. ॥ २२
शापान्त हि वसुवीर्यें प्रसवेल अपत्ययुग, तिचा[4] विधिनें ।
केला होता निश्चय, पूर्वीं शापोनि ही दयानिधिनें. ॥ २३
वसुवीर्य सेविल्यावरि, मास दहावा भरे, अशा काळीं ।
सांपडली दाशांला[5] ती, त्या यमुनेंत टाकिल्या जाळीं. ॥ २४
चिरितां अपत्ययुग दे, मुक्तायुग[6] उकलितां जशी शुक्ति[7]; ।
तत्काळ अद्रिका त्या शापापासोनि पावली मुक्ति. ॥ २५
ते त्या उपरिचराला आश्चर्यें दाश दाविती बाळें; ।
कन्या दाशांसि दिली, सुत आपण घेतला धरापाळें. ॥ २६
तो मत्स्यनाम राजा; जी दाशपतीसि ओपिली[8] कन्या, ।
ती सत्यवती, धीवर[9]-वर-सदनीं वाढली सती धन्या. ॥ २७
त्या कन्येच्या देहीं मीनाचा गंध येत होता; तें ।
परि वपु निरुपम; रक्षी यमुनातीरीं स्वतात-पोतातें[10]. ॥ २८
त्यावरि[11], ज्याच्या जन्में होय वसिष्ठ स्वयें परम हर्षी, ।
तीर्थाटनप्रसंगें तेथें आला पराशर[12] महर्षी. ॥ २९
वंदुनि सत्यवतीनें बैसविला निजतरींत[13] उतराया; ।
झाला प्रसन्न विनयें, निरुपमरूपें हि, शक्तिसुत[14] राया ! ॥ ३०

---

१. दैवयोगानें. २. सूर्याची कन्या जी यमुना, तिच्या पाण्यांत. ३. तशा=(?). ही अप्सरा ब्राह्मणाच्या शापानें मत्स्यी होऊन यमुनेंत फिरत होती, असें मूळांत आहे. (अध्याय ६३ श्लोक ५८–५९ पहा). तिला कोणत्या ब्राह्मणानें व कोणत्या कारणामुळें शाप दिला, ह्यासंबंधीं उल्लेख आम्हांस आढळला नाहीं. ४. तिचा=तिच्या संबंधीं. 'तिच्या' असें पाठान्तर. ५. कोळ्यांना. ६. मोत्यांचे दोन दाणे. ७. शिंपली. ८. अर्पण केली, दिली. ९. कोळ्यांच्या राजाच्या घरीं. 'धीवरसदनीं जी वाढली' असें पाठान्तर. १०. पित्याच्या नौकेतें. [पोत=] नौका–पंत. ११. तदनंतर एके वेळीं. १२. हा वसिष्ठ ऋषीचा नातू. १३. आपल्या नौकेंत. तरी=नाव. १४. वसिष्ठपुत्र शक्ति, त्याचा सुत पराशर.

दिव्यज्ञान मुनि म्हणे, 'सुंदरि ! मज अंगसंग दे; हरितें ।
त्वद्रूप मन्मनातें; कामज्वर नुरवि तिळ हि देह[1] रितें.' ॥ ३१
ती त्यासि म्हणे 'दोहीं तीरीं सर्वत्र विप्र आहेत, ।
दिवसा, अशा प्रकाशीं, तुमचा कैसा घडेल हा हेत ?' ॥ ३२
करि अंधकार तेथें, निर्मुनि तो योगिराज नीहार[2], ।
त्या[3] वरुनि[3] मनिं, म्हणे ती, 'दुर्लभतम[4] होय हा जनीं हार[5].' ॥ ३३
विनवुनि ती त्यासि म्हणे, 'गुरुजन देती वरासि कन्या; या ।
मार्गासि लंघितां, मी प्रभुजी ! होईन पात्र अन्याया.' ॥ ३४
तो मुनि हांसोनि म्हणे, **'स्वपरांच्या दूषणासि कवि[6] टाळी;** ।
'हूं' म्हण; माग वर; सुमुखि ! **कोणास हि साधुसंग न विटाळी.'** ॥३५
'देहीं दुर्गंध नसो[7]' ऐसा वर मागतां चि दे; हातें ।
स्पर्श करुनि, करि विप्र क्षिप्र तिच्या दिव्यगंध[9] देहातें. ॥ ३६
योग्यत्व[10] अंगसंगीं आलें; कुदशा, त्यजूनि तनु, सरली[11]; ।
योजनगंधा[12] मुनिला, जशि गंगा शंकरासि, अनुसरली. ॥ ३७
सदयमुनिनें भवाध्वश्रांताचें[13] दुःख हेरिलें; रेतें[14] ।
नै च उतलें[15]; सुक्षेत्रीं[16] कल्पद्रुमबीज पेरिलें रे ! तें. ॥ ३८
वाटे, सोडुनि[17] जातां, गर्भवती निरविली च यमुनेतें; ।
वदली असेल ती ही, 'विसरावें स्ववरदान न मुने ! तें.' ॥ ३९

---

१. हा शब्द संस्कृतांत पुल्लिंगी व नपुंसकलिंगी आहे. २. धुकें. धुई–**पंत**. ३. त्याला वरून, त्याचा स्वीकार करून. मनि=मनीं=मनांतल्या मनांत, मनानें. हें गीत्यर्ध **पंत**प्रतिभानिर्मित आहे. ४. 'दुर्लभतर' असें पाठान्तर. ५. हा (पराशररूपी) हार (माळा). ६. ज्ञाता. ७. 'हा ही दुर्गंध नसो' असें पाठान्तर. ८. सत्वर. ९. उत्तम आहे सुवास ज्याचा असा. पराशराच्या कृपेनें सत्यवतीच्या शरीराला सुगंध प्राप्त झाल्यामुळें तिचें 'गंधवती' असेंही नांव पडलें होतें. १०. योग्यता, मोठी पदवी. ११. तनु त्यजूनि (सत्यवतीच्या देहाला सोडून) कुदशा (वाईट स्थिति) सरली (गेली).—असा अन्वय. सरली=गेली–**पंत**. १२. चार कोसपर्यंत जिच्या आंगाचा सुवास पसरत जाई अशी. ह्या तिच्या अंगच्या गुणामुळें तिचें 'योजनगंधा' असें नांव पडलें होतें. १३. संसारमार्गीं श्रमलेल्याचें. १४. (आपल्या अमोघ) वीर्यामुळें. 'रे ! तें । नच उरलें' असें पाठान्तर. १५. उन्मत्त झाला नाहीं. १६. चांगल्या शेतांत. (स्त्री हें, गर्भबीजाचें शेतच होय). १७. 'सांडुनि' असें पाठान्तर.

यमुनाद्वीपीं झाली तत्काळ सुखप्रसूति; सुत[1] पातें ।
हालों न दे पहातां; करि कौतुक शक्तिपुत्र[2] सुतपा[3] तें. ॥ ४०
प्रसवें[4] कन्याभाव न मळला; पळ लागलें न सुटकेला. ।
सत्यवतीकुक्षीनें लज्जित सद्रत्नशुक्तिपुट[5] केला. ॥ ४१
तो उपजतां चि झाला प्रौढ मुनि; स्वजननीस करि नमन; ।
तीस म्हणे, 'येतों मी; स्मरतां,[6] भेटोनि,[7] हृष्ट करिन मन.' ॥ ४२
द्वीपं अयन-आश्रय[8] त्या मुनिसि उपजतां,[9] म्हणूनि, कवि त्यातें ।
'द्वैपायन'[10] म्हणति नृपा ! अज्ञानमहातमिस्रसवित्यातें[11]. ॥ ४३
होतिल बहु कलिमलिनप्रज्ञ[12] जन न पावतील भव्यास[13]; ।
यास्तव करी चतुर्धा[14] वेदविभागासि,[15] म्हणुनि, तो 'व्यास.' ॥ ४४
ऐसा भगवान् व्यास ब्राह्मणरूपें मुकुंद[16] अवतरला; ।
जन, ज्याच्या उपदेशें, निजहित जाणुनि, सुखें चि भव[17] तरला. ॥ ४५
या श्रीव्यासप्रभुला वंदुनि, मी भारतेतिहास-रस[18] ।
पाजीन तुम्हां श्रोत्यां, अमृतरसाहूनि फार हा सरस. ॥ ४६

---

१. पुत्र. सुत पहातां [डोळयांचें] पातें हालों न दे–असा अन्वय. तो पुत्र इतका सुंदर होता, कीं त्याच्याकडे पाहाणाऱ्याच्या डोळ्यांचें पातें हालत नसे–असा भाव. २. पराशर. ३. उत्तम तपस्वी. ४. 'प्रसवे, कन्याभाव न मळला' असें पाठान्तर. ५. उत्तम मोत्यें प्रसवणाऱ्या शिंपल्याचा पुडा. ६. माझें स्मरण करितांच. ७. भेट. ८. आश्रय. ९. तो मुनि उपजला त्या वेळीं. १०. 'न्यस्तो द्वीपे स यद्बालस्तस्माद् द्वैपायनः स्मृतः' म्हणजेः–ज्या अर्थी तो बाल असतांच द्वीपांत टाकिला गेला, त्या अर्थी त्यास द्वैपायन म्हणूं लागले–असें मूळांत आहे (अध्याय ६३।८६). ११. अज्ञानरूप महांधकाराचा नाश करणाऱ्या सूर्यातें. [तमिस्र=] अंधकार–पंत. १२. कलियुगामुळें ज्यांची बुद्धि (प्रज्ञा) मलिन झाली आहे, असे. 'कलिमलिनप्राज्ञ' असें पाठांतर. प्राज्ञ=प्र+अज्ञ=अत्यंत मूर्ख. १३. कल्याणास. १४. चार प्रकारानें. १५. त्या विद्वान् पराशरपुत्रानें प्रत्येक युगांत धर्म चतुर्थांशानें ऱ्हास पावत असलेला पाहून आणि मर्त्य प्राण्यांचें आयुर्मान व शक्ति, तशीच युगावस्था लक्षांत घेऊन, वेद व ब्राह्मण यांच्यावर अनुग्रह करण्याच्या इच्छेनें, ज्या अर्थी वेदाचा विभाग (व्यास) केला, त्या अर्थी त्याला 'व्यास' असें नांव मिळालें आहे–असें मूळांत आहे. (अध्याय १६ श्लोक ८७–८८). १६. प्रत्यक्ष श्रीविष्णूच असा. मुकुंद=मोक्षदाता. **परिकरांकुरा**लंकार. १७. संसार. १८. भारतरूप इतिहास हाच रस.

दितिज, दनुज, राक्षस बहु, धरूनि मनुष्यादिरूप, या महिला ।
पीडिति अधर्मभारें, धरुनि सुरद्वेष मानसीं पहिला[1]. ॥ ४७
निज[2]भरपरिहारार्थ प्रार्थी श्रीप[3]द्मयोनिला अव[4]नी; ।
तो देवांसि म्हणे, 'जा अंशें, व्हा सिद्ध भूमिच्या अव[5]नीं.' ॥ ४८
इंद्रें विष्णु विनविला; झाला वसुदेवपुत्र तो अंशें; ।
ज्याच्या उदयें लोकीं वरिलें सयश सुधां[6]शुच्या वंशें. ॥ ४९
बळदेव शेष झाला; यादव देवांश, भीष्म व[7]स्वंश; ।
जेणें निजप्रतापें कुरुचा नाहीं बुडों दिला वंश. ॥ ५०
मांडव्याच्या शापें झाला यमधर्म शूद्र[8]योनिजनी; ।
कुरुच्या वंशीं तेजें भीष्म विदुर हीं च दिव्य दोनि[9] जनीं. ॥ ५१
सू[10]र्यांशें कुं[11]त्युदरीं कर्ण उपजला; तसा चि जो द्रोण, ।
तो अंश बृहस्पतिचा; तैसा होता सुवि[12]द्यजन कोण? ॥ ५२
तो रु[13]द्रकाळकामक्रोधांशोत्पन्न हे[14] नृपा! जाण ।
जो द्रोणाचार्यांचा अश्वत्थामा बहिश्च[15]र प्राण. ॥ ५३
रु[16]द्रगणांशोद्भव कृप, शकुनिनृप द्वा[17]परांशजख्यात; ।
म[18]रुदंशज कृतवर्मा; द्रुपद हि, शैने[19]य तो हि, तज्जात. ॥ ५४
गंधर्वपति अरि[20]ष्टानंदन नामेंकरूनि जो हंस, ।
तो धृतराष्ट्र, सुयोधन क[21]लि, केला ज्या खळें कु[22]ळध्वंस. ॥ ५५

---

१. पूर्वीचा, मागचा. २. पृथ्वीच्या पाठीवरील पापांचा आणि पातकी लोकांचा भार नाहींसा व्हावा म्हणून—असा भाव. 'यदा यदा हि धर्मस्य' (अध्याय ४।७) हें गीतावचन सर्वांच्या परिचयाचेंच आहे. ३. ब्रह्मदेवाला. ४. पृथ्वी. ५. रक्षणाविषयीं. ६. चंद्राच्या. ७. वसु+अंश=अष्टवसूंच्या अंशांपासून झालेला. ८. शूद्रयोनींत उत्पत्ति ज्याची, असा. जनी= जन्म, उत्पत्ति. ९. हींच दोनी (दोन) [ अपत्यें ]. जनीं (ह्या लोकांत) कुरुच्या वंशीं तेजें दिव्य [ अशीं ] भीष्म [ आणि ] विदुर हीं च दोनि (दोनच) [ अपत्यें होऊन गेलीं ]–असा अन्वय. १०. सूर्याच्या अंशापासून. ११. कुंतीच्या पोटीं. १२. चांगला विद्वान मनुष्य. १३. रुद्र, काळ, काम व क्रोध यांच्या अंशांपासून झालेला. १४. 'भूमिपा!' असें पाठान्तर. भूमिप=भूपाल, राजा. १५. शरीराबाहेर असणारा. १६. महादेवाच्या गणांच्या अंशांपासून झालेला. १७. 'द्वापरांश विख्यात' असें पाठान्तर. १८. मरुद्देवांच्या अंशांपासून झालेला. १९. सात्यकि. २०. अरिष्टा नांवाच्या अप्सरेचा पुत्र. २१. कलिपुरुष. २२. कुलक्षय.

दुर्योधनानुजन्मे[1] पौलस्त्य[2]; तयां न साधु मानावें. ।
विस्तरभयें तयांचीं मी सांगें ना चि सर्वथा नांवें. ॥ ५६
पहिला दुर्योधननृप; तदनुज दुःशासनाख्य तो दुसरा; ।
दुःसह, दुःशल, ऐसे शत[3] झाले, मकर[4] कुरुकुळा सु-सरा[5]. ॥ ५७
वेश्यापुत्र[6] युयुत्सु स्तुत्य; शता-वेगळा चि तो, त्यांत; ।
जैसें[7] गुणें अधिक गजमौक्तिक एक चि अनेक मोत्यांत. ॥ ५८
अत्र्यंश[8] पांडुराजा; त्याच्या दोघी सुलक्षणा भार्या, ।
त्या सिद्धिधृती कुंती माद्री झाल्या सुरांचिया कार्या. ॥ ५९
त्यांच्या ठायीं झाले जे, कुरुचा भूषवावया वंश, ।
सुत पांच, धर्ममारुतहरिदस्रांचे[9] प्रसिद्ध ते अंश. ॥ ६०
शच्यंश[10] द्रुपदसुता झाली, साध्वीजनीं जिची अर्चा[11]. ।
कृष्णानुजोदरज[12] जो अभिमन्यु सुधांशु[13]-पुत्र तो वर्चा[14]. ॥ ६१
कुरुगुरुशिरोंबुजातें[15] जो धृष्टद्युम्न धरुनि असि[16] खंडी ।
तो अग्न्यंश[17]; नृपाळा ! राक्षस तो, सुर[18] मनुष्य न, शिखंडी. ॥ ६२
प्रतिविंध्य युधिष्ठिरसुत, सुतसोम वृकोदरात्मज ख्यात; ।
श्रुतकीर्ति-शतानीक-श्रुतसेनांचे क्रमें तिघे[19] तात. ॥ ६३

---

१. दुर्योधनाचे धाकटे बंधु. २. पुलस्त्यमुनीचे पुत्र (सर्व राक्षस). ३. ह्या शंभर पुत्रांचीं नांवें मूळांत दिलेलीं आहेत. (अध्याय ६७ श्लोक ९५–१०८ पहा). ४. कुरुकुळरूप उत्तम सरोवरास मकरासारखे, अर्थात् स्वकीय आप्तेष्टांस ताप व भीति देणारे. येथील **उपमा** कौरवांच्या शीलास साजेशीच आहे. ५. उत्तम सरोवराला. ६. धृतराष्ट्राला वेश्येपासून झालेला मुलगा. ७. जैसें अनेक मोत्यांत एक चि गजमौक्तिक (हत्तीच्या गंडस्थळांतील मोतीं) गुणें अधिक [असतें त्याप्रमाणें]. हत्तीच्या गंडस्थळांत मोत्यें सांपडतात, अशी समजूत आहे. 'करीन्द्रजीमूत–वराह–शङ्ख–मत्स्याहिशुक्त्युद्भववेणुजानि । मुक्ताफलानि प्रथितानि लोके तेषां तु शुक्त्युद्भवमेव भूरि.' ॥ (कुमारसंभव, सर्ग १ श्लोक ६ टीका पहा). ८. अत्रिऋषीचा अंश. ९. यम, वायु, इंद्र, अश्विनीकुमार यांचे. १०. इंद्राणीचा अंश. ११. पूजा. १२. कृष्णाची धाकटी बहीण जी सुभद्रा, तिच्या पोटीं जन्मलेला. १३. चंद्राचा पुत्र (बुध). १४. तेजस्वी. १५. कौरवांचा गुरु जो द्रोण, त्याच्या शिरकमळातें. १६. तरवार. १७. अग्नीचा अंश. १८. तो शिखंडी राक्षस [होय], [तो] सुर [किंवा] मनुष्य न (नव्हे)—असा अन्वय. १९. अर्जुन, नकुळ व सहदेव.

हे पांच द्रुपदसुताकुक्ष्युद्भव[1] अंश विश्वदेवांचे[2]; ।
अवतरले अंश असे, बहु सुखवायासि विश्व[3], देवांचे. ॥ ६४
जो विप्रचित्ति[4] दानव, तो चि जरासंधनृप महासत्व[5]; ।
शिशुपाळ हिरण्यकशिपु; कंस हि तो काळनेमि, हें तत्व[6]. ॥ ६५

---

## अध्याय नववा.

जनमेजयनृपति पुसे, वैशंपायन कथी सविस्तर; तें ।
बहु; मी लेश चि गातों; जग लेशें ही महद्यशें[7] तरतें. ॥ १
श्रीकांतनाभिपद्मीं[8] प्रगटे विधि, विप्रसर्जनीं[9] दक्ष; ।
तद्दक्षांगुष्ठोद्भव[10] विख्यातयशा प्रजापती[11] दक्ष[12], ॥ २
त्याची कन्या अदिती, कश्यपभार्या, महासती, ज्येष्ठा. ।
तीचा पुत्र विवस्वान्[13]; वैवस्वत म्हणति तत्सुता श्रेष्ठा[14]. ॥ ३
त्या वैवस्वतमनुची, सोमात्मजबुधवधू[15], ईला[16] तनुजा[17]; ।
तीचा पुरूरवा सुत, पुर प्रतिष्ठान[18] दे स्वयें मनु[19] ज्या[20]. ॥ ४
तत्सुत आयु, तयाचा नहुष, तदात्मज ययाति, जो अरिला ।
यमसम समरीं झाला, शुक्रसुतेनें[21] स्वयें चि जो वरिला. ॥ ५
झाला ययाति कविचा[22] जामाता; ती च सत्कथा परिसा. ।

---

१. द्रौपदीच्या कुशीपासून उत्पन्न झालेले. २. विश्वसंज्ञक देवांचे. ३. जग. ४. हा दनुपुत्र दानवांतील ज्येष्ठ. हा अतिशय बलवान् होता. ५. मोठा बलवान्, पराक्रमी. ६. इंगित, वास्तविक अर्थ. ७. थोरांच्या कीर्तीनें. लेशें ही (अत्यंत अल्प अशा) महद्यशें (थोरांच्या कीर्तीनें, अर्थात् कीर्ति वर्णिल्यानें) जग तरतें (जगाचा उद्धार होतो)—असा अन्वय. ८. लक्ष्मीपति विष्णूच्या नाभिकमलांत. ९. ब्राह्मणांच्या उत्पत्तीविषयीं. १०. तत्+दक्ष+अंगुष्ठ+उद्भव=त्याच्या उजव्या आंगठ्यापासून उत्पन्न झालेला. ११. प्रजा उत्पन्न करणाऱ्यांत मुख्य. १२. दक्षप्रजापति. १३. सूर्य. १४. श्रेष्ठा तत्सुता वैवस्वत म्हणति—असा अन्वय. १५. चंद्रपुत्र जो बुध, त्याची स्त्री. १६. नामविशेष. १७. कन्या. १८. प्रयाग—पंत. १९. वैवस्वतमनु. २०. ज्याला (पुरूरव्याला). २१. शुक्राचार्यांची कन्या देवयानी, तिनें. २२. शुक्राचार्यांचा.

या चरितामृतपानें या लोकीं सर्व रसिक[1] हो हरिसा[2]. ॥ ६
देवाचार्य बृहस्पति, कवि[3] असुराचार्य, हे जगन्महित[4], ।
शिष्याभिमान धरुनि, स्पर्धा करिती सदा जसे अहित[5]. ॥ ७
सुर-शस्त्रांहीं[6] जे जे भेट[7] होती संगरांत[8] असु-रहित[9] ।
संजीविनीबळें[10] त्यां उठवी, करि काव्य[11] नित्य असुर-हित. ॥ ८
ती विद्या सुरगुरुला अवगत नव्हती, म्हणूनि समरांत, ।
बहु मरती, तें पाहुनि, न टिके उत्साह-धैर्य अमरांत. ॥ ९
ती विद्या साधाया देवांनीं सद्विचार आठविला; ।
शुक्राकडे स्वगुरुसुत कच विनवुनि, कथुनि युक्ति, पाठविला. ॥ १०
शिष्यत्वें जाउनि, कच सांगे गुरुदास्यकाम[12], पद नमुनी; ।
प्रणतीं शत्रुसुतीं ही द्रवला तो सुप्रसन्नवदन मुनी. ॥ ११
आराधिला कचें गुरु, गुरुची कन्या हि देवयानी, ती ।
झाली प्रसन्न सत्वर; शिकविति तैशी च देव यां[13] नीती[14]. ॥ १२
असुर म्हणति, 'विद्येनें प्रबळ करायास देव, या नीचें ।
मन मोहिलें गुरूचें, गुरुचित्ताहूनि देवयानीचें.' ॥ १३
गुरुगोरक्षण[15] करितां, देवद्वेषें हरूनि असु रानीं, ।
कचमांस वृकांसि[16] दिलें वांटुनि[17] भक्षावयासि असुरांनीं. ॥ १४
गाई गृहासि आल्या, मावळला रवि हि, कच न आढळला; ।
तेव्हां सोडुनि धृतिनग[18] शुक्रसुताबुद्धिभूमिला[19] ढळला[20]. ॥ १५

---

१. 'सर्व रसिक हो ! हरिसा' असा पाठ रा० पराडकर यांच्या प्रतींत आहे, व हरिसा=हर्षा, आनंद पावा—अशी टीप दिलेली आहे. २. इंद्रासारिखा. हो=होवो. ३. शुक्र. ४. जगाला पूज्य. ५. शत्रु. ६. 'शस्त्रें देवांच्याही' असें पाठान्तर. ७. योद्धे. ८. युद्धांत. ९. प्राणरहित. १०. जिवंत करण्याच्या विद्येच्या जोरावर. ११. शुक्राचार्य. १२. गुरूची सेवा करण्याची इच्छा. १३. कचास. १४. युक्ति, योजना. १५. गुरूच्या( शुक्राचार्यांच्या ) गाईचें संरक्षण. १६. लांडग्यांस. 'मृगांसि' असें पाठान्तर. मृग=वन्य पशू. १७. तुकडे तुकडे करून. ( मूळ अध्याय ७६ श्लोक २९ पहा ). १८. धैर्यरूप पर्वत. १९. देवयानीच्या बुद्धिरूप पृथ्वीला. २०. ढांसळला. रूपकालंकार.

शुक्रसुता गहिंवरली; न्हाणी तदुरःस्थलासि[1] अश्रु[2] तिचें; ।
कवणाला न प्रिय तें गुणमणिमय[3] केलिमंदिर[4] श्रुतिचें[5] ? ॥ १६
तातासि म्हणे, 'आला नाहीं अद्यापि कच; नसे अवधी; ।
लव धीर बुद्धि न धरी माझी; ताता ! सुनिष्ठुरा[6] तव धी[7]. ॥ १७
येता मघां चि, असता जरि कुशली; करिति खळ अघा[8]; बरवी ।
गति न दिसे चि कचाची; कुशलिजनविरह[9] असा न घाबरवी. ॥ १८
कच आजि न येतां, मी प्राण त्यागीन न भरतां घटिका; ।
आण तुझी; जाण खरें; केला निश्चय नव्हे चि हा लटिका.' ॥ १९
काव्य म्हणे, 'धैर्य[10] धरीं; आहे संजीविनी सुधाधारा[11]; ।
उठवूनि आणितों कच, चिंतुनि विश्वंभरा[12] बुधाधारा[12].' ॥ २०
मंत्रजप करुनि तो कवि, 'ये रे ! वत्सा ! कचा !' असें बाहे[13]. ।
भेदुनि वृकोदरें[14], पलं[15] सर्व निघे, त्यांत लेश हि न राहे. ॥ २१
होता तसा चि झाला; उठला; आचार्य देव तारी; ती ।
शक्ति तशी च निरुपमा[16]; भिन्ना गुर्वन्यदेवतारीती[17]. ॥ २२
कच येतां बहु हर्षे; 'धन्य' म्हणे 'मी च' कन्यका; मातें ।
वांचविलें[18], त्वां चि दिला; या देइल कोण अन्य कामातें ?' ॥ २३
पुसतां वधवृत्त, कच स्वगुरुसुतेला समस्त आयकवी. ।
प्रार्थुनि म्हणे, 'उगी. हा स्वस्ति[19] असो सर्वविप्रराय कवी.' ॥ २४
त्यांवरि[20] गुरुकन्योक्तें[21], पुष्पें आणावयासि जाय वना; ।

---

१. तिच्या वक्षःस्थलास. २. हा शब्द संस्कृतांत नपुंसकलिंगी आहे. ३. गुणरूप रत्नांनीं मढविलेलें. ४. क्रीडागृह.—अर्थात् कच. ५. वेदाचें. हें गीत्यर्ध पंतप्रतिभानिर्मित आहे. ६. फार निष्ठुर, जींत ममता नाहीं अशी. ७. बुद्धि. ८. पापाला. (पक्षीं) घाताला. ९. सुखरूप असलेल्या मनुष्यांचा विरह. १०. 'धीर धरीं' असें पाठान्तर. ११. अमृताची केवळ धारच, अशी. १२. विश्वपोषक व ज्ञात्यांना आधारभूत अशा परमेश्वरास. १३. बोलावी, हांक मारी. १४. लांडग्यांचीं पोटें. १५. मांस. १६. उपमा नाहीं जिला अशी. १७. गुरूवांचून जे अन्य देव, त्यांची रीति. गुरुदेवच शिष्यांचा खरा हितकर्ता होय—असा भाव. १८. 'वांचविला' असें पाठान्तर. १९. सुखरूप. कुशल—पंत. २०. त्यानंतर एकदां. २१. देवयानीच्या सांगण्यावरून.

सांपडला त्या असुरां कच, जैसा वत्स[१] एकला यवना. ॥ २५
पुनरपि त्या पापांनीं[२] सद्विप्रकुमार चरचरां चिरिला; ।
भय न धरिलें तिळ हि, त्या पापांच्या[३] जोडितां महागिरिला[४]. ॥ २६
खंड तिळप्राय करुनि, नेउनि, केले निमग्न जळधींत[५]. ।
**नाहीं च धर्म, करुणा, पापभय[६], विचारलेश खळधींत[७]. ॥ २७**
जो मुनि तयासि[८] कन्याप्रियकाम[९], दयाळु, काव्य[१०] तो तारी. ।
रंज[११] गोळा करुनि, घडी शिष्याची मूर्ति, जेंवि ओतारी[१२]. ॥ २८
पुनरपि तो कच वधिला; केला तद्देह दग्ध रुष्टांनीं[१३]; ।
शुक्रासि पाजिलें हो तद्भस्म[१४] सुरारसांत[१५] दुष्टांनीं. ॥ २९
कच न दिसतां रडे सुरयानी[१६]; तीतें पिता म्हणे, 'कां गे ! ।
वत्से ! रडसी ?' ऐसें पुसतां, तैसें[१७] चि ती पुन्हां सांगे. ॥ ३०
शुक्र म्हणे, 'वत्से ! मी वांचवितों, परि पुनःपुन्हां मरतो; ।
आग्रह करूनि, म्हणसि, 'प्रेतगतिंगत[१८] हि कच पुन्हां परतो.' ॥ ३१
त्यज शोक; मत्प्रसादें तुज काय उणें[१९] असे ? नको चि रडों; ।
दाटुनि माथां वाहुनि दुर्वह[२०] दुःखाद्रिला, नको चिरडों[२१]. ॥ ३२

---

१. [ गाईचें ] वांसरूं. यवनांचा गाईच्या बाबतींतील दुष्टपणा प्रसिद्धच आहे. **पं**तांच्या काव्यांत आढळणाऱ्या अशा प्रकारच्या उद्गारांवरून त्यांच्या वेळच्या परिस्थितीची थोडी कल्पना होते. असे उद्गार अन्यत्रही आढळतातः–( १ ) भागा, या, गाय तसी मी, न धरी अघभयास हा यवन. । ( सभापर्व, अध्याय ५।७५ ). ( २ ) रायासि बायको मी सांपडलें, जैंवि गाय गा ! यवना. । ( ध्रुव–चरित्र ). २. पाप=पापी, पाप करणारा. ३. 'पापाच्या' असें पाठान्तर. ४. मोठ्या पर्वताला. ५. समुद्रांत. ६. पापाविषयीं भीति. ७. दुष्टाच्या बुद्धीच्या ठायीं. ८. कचास. जो कन्याप्रियकाम दयाळु काव्य मुनि तो तयासि ( कचाला ) तारी–असा अन्वय. ९. कन्येचें प्रिय करण्याची इच्छा ज्याला आहे असा. १०. शुक्र. ११. कण–**पंत.** १२. धातूचें ओतींव काम करणारा. १३. संतापलेले जे राक्षस त्यांनीं. १४. तत्+भस्म=त्याचें भस्म ( राख ). १५. मद्यांत. १६. देवयानी. १७. मागें गीति १७ ते १९ यांत वर्णन केल्याप्रमाणें. १८. मृतस्थितीला गेलेला. मूळांत हाच शब्द आहे. ( अध्याय ७६।४६ पद्य ). १९. 'तुज काय उणें मुली ?' असें पाठान्तर. २०. वहाण्यास कठीण अशा दुःखरूप पर्वताला. अद्रि=पर्वत. २१. कल्पनासादृश्यः–जननि ! उगी, धीर धरीं, या चिंतागिरिभरें नको चिरडों. । ( पंतकृत सभापर्व, अध्याय ७।५४ ).

ती तातासि म्हणे, 'कच गुरुभक्त, कुलीन, साधु, कार्यकर[1]; ।
जरि त्यासि सोडिलें जेळ[2], तरि जळ सोडू मला हि आर्यकर[3]. ॥ ३३
ब्रह्मघ्नां[4] शिष्यांची भीड धरुनि, साधु शिष्य मोकळिला[5], ।
म्हणतिल; न ऐकवे तें; न स्वहित [6]कवी असें गमो कळिला[7].' ॥ ३४
स्मर्नि म्हणे कविसत्तम, 'मळवावें पंडितें न यश; हाणी[8] ।
प्राणांची हि बरी; परि न यशाची;' सांगती[9] नय शहाणी[10]. ॥ ३५
मग मेळवी महात्मा एकत्र समस्त असुर, कोपानें ।
खवळे प्रिय[11]शिष्यभसितमिश्रित-मधुच्या हि तज्ज्ञ तो पानें. ॥ ३६
असुरांसि म्हणे, 'कां रे ! नेणां[12] अद्यापि मत्तपां[12] ? मरतो ।
कीं वांचतो पतंग ? न भी जो ज्वलनासि[13] मत्त, पामर, तो[13]. ॥ ३७
'विप्र अवध्य' म्हणे श्रुति; हाणोनि तिच्या[14] हि लात हाकेला[15], ।
कचहननें सुरगुरुचा न, तुम्हीं माझा चि घात हा केला. ॥ ३८

---

१. कार्यकर्ता, पराक्रमी. रा० पराडकर यांनीं 'साधुकार्यकर' असा पाठ घेतला आहे. २. पाणी. पाणी सोडणें=त्याग करणें. ३. श्रेष्ठ ( पूज्य, वडील ) असे जे आपण, त्यांचा हात. ४. ब्रह्महत्या करणाऱ्या. ५. गमावला, हातचा घालविला. ६. 'कचीं' असें पाठान्तर. कचीं=कचाच्या बाबतींत. कचापासून आपलें हित नाहीं असें कळिला ( दुष्टाला ) वाटेल तर वाटो, परंतु आपणाला तसें न वाटावें–असा देवयानीच्या म्हणण्याचा भाव. ७. कवी ( शुक्राचार्य ) स्वहित ( आपला हितकर्ता ) [ आहे ] असें कळिला ( पापी काळाला ) न गमो ( वाटो )–असा अन्वय. ८. नाश. अपकीर्ति करून घेऊं नये, तसा प्रसंग आल्यास प्राणांची पर्वा करूं नये–अशी नीति आहे. तिचा उल्लेख ठिकठिकाणीं आढळतो:–( १ ) संभावितस्य चाकीर्तिर्मरणादतिरिच्यते. ॥ ( भगवद्गीता, अध्याय २।३४ ) म्हणजे–प्रतिष्ठित पुरुषाला अकीर्ति मरणाहून अधिक दुःखकारक आहे. ( २ ) सोसे कुलजा मृत्यु, न अयशाचा सोसवे चुना लोकीं. । ( पंतकृत द्रोणपर्व, अध्याय २१।५८ ). ९. सांगते. शहाणी ( देवयानी ) [ असा ] नय ( नीति ) सांगती–असा अन्वय. 'सांगती नय शहाणीं' असा पाठ असता तर बरें झालें असतें. शुक्राचार्य तरुण मुलीच्या सांगण्यापेक्षां पंडितांच्या सांगण्याला ज्यास्त महत्व देतात, असें म्हणण्यांत अर्थगौरव ज्यास्त आहे. शहाणीं=शहाणीं माणसें, सुज्ञ जन. १०. सुज्ञ ( देवयानी ). ११. प्रिय शिष्य अशा कचाच्या भस्मानें मिश्रित जें मद्य, त्याच्या. 'प्रियपुत्रभसित°' असें पाठान्तर. १२. तुम्ही माझी तपश्चर्या (तपःसामर्थ्य) जाणत नाहीं काय ? १३. जो [पतंग] ज्वलनासि ( अग्नीला ) न भी, तो मत्त (उन्मत्त) [व] पामर ( मूर्ख ) [होय]–असा अन्वय. १४. श्रुतीच्या. १५. हाकेला लात हाणोनि=तिची आज्ञा तुच्छ मानून, अवज्ञा करून.

ब्राह्मण[1] कणसे खुपती तुमच्या नेत्रीं; नसो[2] सवे[3], काढा; ।
युक्त[4] चि मरणाराला हितपरिणाम[5] हि न सोसवे काढा. ॥ ३९

धिक्कारुनि असुरांतें, धर्म[6] चि तो अमृतमय[7] वचा शिकवी; ।
बाहे विद्या-करुणादिव्यतपस्याबळें कचासि कवी. ॥ ४०

जों गुरु 'वत्स ! कच !' म्हणुनि 'एहि'[8] असें तो म्हणावया योजी, ।
तों विद्यासामर्थ्ये उपजूनि गुरूदरीं, म्हणे 'ओ जी !' ॥ ४१
उदरप्रवेश[9] पुसता झाला तो पुण्यराशि शुक्रमुनी; ।
सांगुनि खळकपट, म्हणे[10], 'येथ वसो काळ हा शिशु क्रमुनी[11]. ॥ ४२
निर्भय वसेन, काळ क्रमुनि पवित्रोदरीं[12], असा चि सुखें. ।
न हित गुरूदरदारण[13]; निघतां[14] मज निंदितील साधु-मुखें.' ॥ ४३
शुक्र म्हणे, 'वत्से ! कच कुक्षि विदारुनि निघेल बाहेर. ।
हा तरला चि; परि तुझें या कुव्यसनीं[15] बुडेल माहेर.' ॥ ४४
सुरयानी त्यासि म्हणे, 'वदतां हें अशुभ काय? हो ! तात ! ।
व्हावे[16] दोघे हि मला; चिंतामणि[17] हे चि पाय होतात. ॥ ४५

---

१. ब्राह्मण तुमच्या डोळ्यांत केरकचऱ्याप्रमाणें खुपतात, म्हणजे ब्राह्मण तुम्हांला अप्रिय वाटतात–असा भाव. २. ब्राह्मणांकडे द्वेषबुद्धीनें पाहाण्याची संवय नसावी, ती काढा ( काढून टाका, सोडा )–असा भाव. ह्यासंबंधानें पुढील सुभाषित पहा:–न विषं भक्षयेत्प्राज्ञो न क्रीडेत्पन्नगैः सह । न निन्देद्योगिवृन्दानि ब्रह्मद्वेषं न कारयेत्. ॥. ३. संवय. 'सवे' हा शब्द पंतांच्या काव्यांत वारंवार आढळतो. यावरून पंतांच्या काळीं 'सवे' हेंच रूप प्रचारांत रूढ असावें, असें दिसतें. ( पुढें अध्याय १७।३, वनपर्व–अध्याय १२।१३७, गदापर्व–अध्याय १०।१८, अश्वमेधपर्व–अध्याय १।६८, मंत्रभागवत, स्कंध १०।५५६ ). ४. योग्यच. हें गीत्यर्ध सुभाषितरूप आहे. ५. हितकारक परिणाम आहे ज्याचा, असा (काढा). समानार्थक गीत्यर्धः–मरणाऱ्या रोग्याला काय करिल जाणता भला वैद्य? । (सभापर्व,–अध्याय २।३७). ६. तो मूर्तिमंत धर्मच असा (शुक्र). ७. अमृतानें युक्त ( हितकारक ). ८. ये. ९. माझ्या उदरांत तुझा प्रवेश कसा झाला तें वर्तमान. १०. ह्याचा कर्ता कच. ११. हा शिशु ( हा बालक, मी ) काळ क्रमुनी येथ वसो–असा अन्वय. मला (कचाला) येथेंच राहूं देऊन कालक्रमणा करण्याची परवानगी असावी–असा भाव. १२. निर्मल उदरामध्यें. १३. गुरु+उदर+दारण=गुरूचें पोट फाडणें. १४. पोट फोडून बाहेर पडल्यास. १५. ह्या घोर संकटांत. माहेर बुडेल=तुला माहेर नाहींसें होईल, म्हणजे मी मरेन–असा अर्थ. १६. पाहिजेत, हवेत. १७. इच्छिलेलें फळ देणारें रत्न.

'तारुनि शिष्यासि, तरो गुरु;' म्हणत्यें[1] 'पात्र काय कन्या या ।
नोहे वरासि ? वरदा[2] ! जाणसि तूं सुज्ञनायक[3] न्याया.' ॥ ४६
भीड सुतेची भारी; विद्या संजीविनी कचा शिकवी; ।
गुरुला हि वांचवाया योग्य करी, सज्जना कचासि कवी. ॥ ४७
गुरुकुक्षि विदारुनि कच बाहेर निघे; परंतु बहु तो भी, ।
उठवुनि गुरु, संकोचे नमुनि, रडे कुळंज[4] कीर्तिचा लोभी[5]. ॥ ४८
गुरुदक्षिणाविधीतें कच गुरुचा आप्त, विद्यमानधनें[6] ।
देहें साधी; धन्य चि केला निज आप्तविद्य[7] मानधनें. ॥ ४९
कचघातकासुरांतें[8] सुरयानीचा स्वयें जनक दापी[9] ।
कीं 'जो ब्रह्मद्वेष्टा कुशळ[10] न पावेल तो जन कदापी. ॥ ५०
समजा बरें, जसा मी विप्र; गुरु, तसा चि हा कच; पळाला ।
ब्रह्मांडांतुनि जरि रिपु, वधिन, न देतां चि हाक[11], चपळाला.' ॥ ५१
असुरांसि करुनि शिक्षा, बाहु उभारुनि, म्हणे 'अहो ! कानीं ।
घ्यावें माझें हितकर मर्यादावचन[12] साधुलोकांनीं. ॥ ५२
**जो विप्र आजिपासुनि मद्य-प्राशन करील, तो पापी ।**
**ब्रह्मघ्नासम[13] निश्चित.'** अशि मर्यादा स्वयें कवि स्थापी[14]. ॥ ५३
होता सहस्र वर्षें कच गुरुसेवेंत; मग तया प्राज्ञा ।
शुक्रें बहुसंतोषें दिधली जाया पित्याकडे आज्ञा. ॥ ५४

---

१. 'म्हणत्ये, पात्र कन्यकान्या या' असा पाठभेद. कन्यका+अन्या=कन्येहून अन्या (दुसरी). २. वर देणाऱ्या ! **परिकरा**लंकार. ३. 'सुज्ञनायका !' असें पाठान्तर. ४. कुळवान्, उच्चकुलोत्पन्न. 'संकोचें नमुनि रडे, कुळज कीर्तिचा लोभी' असा पाठभेद. ५. कीर्तिचा लोभी [ असा तो ] कुळज ( कच ) रडे—असा अन्वय. कच कीर्तीचा लोभी होता, म्हणून आपण गुरूचें पोट फोडून बाहेर निघालों, ह्या गोष्टीविषयीं त्याला लाज वाटली—असा भाव. ६. जवळ असलेलें द्रव्यच अशा देहानें. ७. प्राप्त झाली आहे विद्या ज्याला असा. [ आप्त= ] प्राप्त-**पंत**. ८. कचाचा नाश करणाऱ्या असुरांस. ९. दटावी, रागें भरून सांगे. १०. कल्याण. ११. शत्रूला दिलेल्या आव्हानाचा स्वीकार न करितां, जरी तो पळाला तरी—असा भाव. हाक देणें=प्रत्युत्तर देणें, जबाब देणें. १२. नियमाचें वचन. १३. ब्रह्महत्या करणाऱ्या पातक्यासारखा. ब्रह्महत्या हें पंचमहापातकांपैकीं एक आहे. १४. मूळ अध्याय ७६ श्लोक ६५-६८ पहा.

## अध्याय[1] दहावा.

कच सिद्ध[2] होय जों, तों शुक्रसुता त्या मनोहरा, उचिता, ।
स्वकरग्रहार्थ[3] विनवी; बहु आवडली सुविद्यता[4] शुचिता[5]. ॥ १
जें गुरुचें, तें चि तिशीं, पूज्यत्वाचें धरूनि कच नातें, ।
ठेवूनि दृष्टि धर्मीं, तो न तिच्या मान्य होय वचनातें. ॥ २
पडतां गळां, म्हणे कच, 'भगिनीला वरुनियां न भाउ तरे. ।
करितां अधर्म, सद्यः स्वपितृसुहृज्जनमुखप्रभा[6] उतरे. ॥ ३
सुख व्हावें, तरि धर्माप्रति म्हण, 'माथां[7] वसें, नसें दूर'. ।
पूजा कैंची लोकीं? जरि दगड शिरीं धरी न शेंदूर.[8] ॥ ४
धर्म अनंत असो, परि तो करितां कीर्तन[9] स्वसे[10]! वेचे[11]; ।
सांग प्रकार[12] याहुनि दुसरे कांहीं मज स्वसेवेचे. ॥ ५
ज्या उदरीं वास तुझा, तेथें माझा हि, हें असे नातें[13]. ।
केविं करग्रहण करूं? संमत धर्मासि जें असेना तें.' ॥ ६
बहु दिवसांची आशा तत्काळ च्छेदितां कचें, रुष्टा ।
शुक्रसुता त्यासि म्हणे, 'रे कपटपटो[14]! भला भला दुष्टा! ॥ ७

---

१. 'काव्यसंग्रहां'त छापिलेल्या ह्या पर्वाच्या जुन्या आवृत्तींत नवव्या अध्यायाच्या ६७ गीति आहेत. परंतु रा० पराडकर यांनीं पंतलिखित पोथीवरून छापलेल्या प्रतींत सदहू अध्यायाच्या ५४ गीति असून बाकीच्या १३ गीति पुढील अध्यायांत समाविष्ट केलेल्या आहेत. ही गीतींची विभागणी पूर्वींच्या योजनेपेक्षां ज्यास्त सयुक्तिक व कथानकाच्या दृष्टीनेंही ज्यास्त सरळ वाटते. शिवाय ही योजना अधिकृत प्रतींत असल्यामुळें आम्ही तिचाच स्वीकार केला आहे. २. तयार. [ पित्याकडे परत जाण्यासाठीं ]. ३. आपल्याशीं लग्न करण्याविषयीं. स्व-कर-ग्रह=पाणिग्रहण=विवाह. ४. मोठी विद्वत्ता. ५. शुद्ध आचरण. हे कचाच्या अंगचे गुण कोणास आवडणार नाहींत? ६. आपल्या पितरांच्या व मित्रजनांच्या मुखावरील तेज. अधर्मजन्य अप्रतिष्ठेमुळें तोंड उतरतें-असा भाव. ७. माझ्या मस्तकावर राहा, मला सोडून जाऊं नको-असा भाव. ८. जरि दगड शिरीं शेंदूर न धरी, [ तरी त्याची ] लोकीं पूजा कैंची?-असा अन्वय. दगडाला शेंदूर फांसल्यावर तो मारुती बनतो व त्यास लोक नमस्कार करितात, हें प्रसिद्धच आहे. ९. बढाई, वाच्यता. 'कीर्तन' हा शब्द ह्याच अर्थीं पंतांनीं अन्यत्र योजिला आहे. ( कर्णपर्व, अध्याय ४९।४८ ). १०. हे भगिनि! ११. खर्च होतो. १२. 'सांगें प्रकार' असें पाठान्तर. १३. आपण 'सहोदर' आहों-असा अर्थ. १४. कपटकुशला!

ऐक कृतघ्ना ! जरि मी, 'उठवा चि मदर्थ या [1]हंता', शतदा ।
ऐसें गुरुसि न म्हणत्यें, कैसा उठतास तूं [2]हताश ! तदा ? ॥ ८
[3]मलिन, कुटिल, नीरस, जड, अजड पुनर्भवपणें हि [4]कचसा च; ।
धरिला शिरीं हि न स्वप्रकृति[5]गुण त्यजिसि; नाम कच साच. ॥ ९
न करीं विफळ मदाशा; आशा भंगूं नये चि साधूनीं; ।
जरि भंगिशील, विद्यासिद्धि नसो, जीस नेसि [6]साधूनी.' ॥ १०
कच हि म्हणे, 'गुरुवेदानुज्ञा नाहीं; म्हणोनि या [7]कर्मा ।
[8]मान्य नसें मी; शापीं, **कीर्तिकर चि शाप न चुकतां [9]धर्मा.** ॥ ११
पढवीन ज्यासि विद्या, ही त्यासि [10]फळेल; तूं हि घे शाप; ।
परि कोणी हि ऋषि[11]सुत न वरिल तुज; फळो तुझें तुला पाप.' ॥ १२
जातां स्वर्गीं मिरविति निज[12]गुरुसुतरत्न देव [13]यानीं तें. ।
वर्णिति दैत्यांतें किति, किति [14]कवितें, कितिक देवयानीतें. ॥ १३

---

१. मेलेल्याला. २. दुष्टा !; नष्टा ! ३. देवयानी म्हणते:–हे कचा ! तूं आपल्या 'कच' ह्या नांवाच्या अर्थाप्रमाणें म्हणजे केंसाप्रमाणें आहेस. केश मलिन ( काळे ) तर तूं मलिन ( पापी ); केश कुटिल ( वक्र, कुरळे ) तर तूं कुटिल ( कपटी, दुष्ट ); केश नीरस ( रसरहित, शुष्क ) तर तूं नीरस ( अरसिक, प्रीतिरहित–कारण माझ्यासारखी विवाहेच्छु तरुणी तुला पाणिग्रहण करण्यास विनवीत असतां, तूं तिचा धिक्कार करितोस ); केश जड ( निर्जीव ) तर तूं जड ( मतिमंद, मूर्ख ); आणि पुनर्भवपणें ( पुनःपुन्हां उत्पन्न होण्याच्या समानधर्माप्रमाणें केश व तूं उभयतांही ) अजड ( सचेतन ) आहां; व तुम्हां उभयतांना डोक्यावर वागविलें ( केश डोक्यावरच असतात, पण कचाला डोक्यावर बसविलें ) तरी तुम्ही आपापले स्वाभाविक गुण टाकीत नाहीं. शिरीं धरणें= डोक्यावर बसविणें, फाजील लाड करणें. 'तूं मलिन, कुटिल, नीरस, जड हि, पुनर्भवपणें हि कचसाच' असा पाठभेद आहे. ४. केंसासारखा. ही गीति **अभंगश्लेषाचें** उदाहरण होय. अभंगश्लेषांत एकाच शब्दाचे अनेक अर्थ होतात. ५. आपला स्वाभाविक गुण. प्रस्तुत गीतीशीं कांहीं अंशीं समानार्थक अशी पंतांची पुढील गीति पहा:–स्नेहें लालन केलें माथां धरिलाहि मलिन वक्र कच । तव शब्द तसा, भेदी हृदय, न दारुण असा नव क्रकच. ॥ ( कर्णपर्व, अध्याय ३२।१६ ). ६. मिळवून, संपादून. ७. या कर्मा=तुझें पाणिग्रहण करण्यास. ८. 'मान्य नसें, हूं शापीं' असें पाठान्तर. ९. धर्मा न चुकतां ( आपल्याकडून धर्मास प्रतिकूळ अशी गोष्ट घडली नसतां ) शाप [ कोणी दिल्यास तो ] कीर्तिकर चि [ होय ]–असा अन्वय. १०. फलदायक होईल. ११. ऋषिपुत्र, अर्थात् ब्राह्मणाचा मुलगा. 'तुज कोणीही ऋषिसुत न वरील, फळो तुझें तुला पाप' असा पाठभेद. १२. आपल्या गुरूचा उत्तम पुत्र ( कच ). १३. विमानांत. १४. शुक्राचार्याला.

विद्यालाभमुदित[1] सुर हरिसि[2] म्हणति, 'विक्रमासि[3] यासम, या-।
पूर्वीं, न पावलों चि; प्रभुजी! टाळूं नका चि या समया. ॥ १४
आम्हां न दिसे चि दुजा सुखदायक शत्रुनाशसम यज्ञ. ।
समयीं पराक्रमातें करिति शुभयशोधनाश[4], समयज्ञ[5].' ॥ १५
'वृषपर्वतडागाचा[6] होऊं नेदी विनाश कविरोध[7]. ।
पाडावा यांत यशःसंपज्जीवनविनाशक[8] विरोध.' ॥ १६
करुनि विचार असा हरि[9] जेथें वृषपर्वदैत्यपतिराज्य, ।
त्या देशीं जाय, म्हणे, 'जरि मिळतें रंध्र[10] लघु[11] हि, तें प्राज्य[12].' ॥ १७
तों रम्यवनीं शक्रें जळकेलिरता[13], सखीयुता[14], धन्या ।
अवलोकिल्या, कविसुता[15] एक, दुजी सर्वदैत्यपतिकन्या[16]. ॥ १८
विप्रासुरवरकन्या[17] पाहुनि, हर्षें मनीं म्हणे बलहा[18], ।
'भगवंत पावला; या दोघींत प्रथम लावितों कलहा.' ॥ १९
उदकीं क्रीडत होत्या; त्यांचीं वस्त्रें सरस्तटीं[19] होतीं. ।
मारुतरूपें[20] शक्रें मिश्रित केलीं परस्परें हो! तीं. ॥ २०
राजसुता शर्मिष्ठा जळकेलि[21] करूनियां[22] तटीं आली. ।

---

१. संजीविनी विद्येच्या लाभानें आनंदित झालेले. अर्थात् कचाजवळ ती विद्या शिकून कृतार्थ झाल्यामुळें जे आनंदयुक्त झाले होते असे. (मूळ अध्याय ७८।१ पहा). २. इंद्राला. ३. पराक्रमास. पराक्रम दाखविण्याची अशी संधी आतांपर्यंत आली नव्हती. पण देवांनीं संजीविनी विद्या संपादन केल्यामुळें आतां त्यांना योग्य संधी प्राप्त झाली आहे—असा भाव. ४. शुभ+यशः+धन+आश=शुभ असें जें यशोरूप धन त्यातें इच्छिणारे. हें गीत्यर्ध सुभाषितरूप आहे. ५. काळवेळ जाणणारे, धोरणी. ६. वृषपर्वारूप तळ्याचा. रूपकालंकार. ७. शुक्ररूप तट. वृषपर्वा आणि शुक्राचार्य हे एकमतानें वागतात—असा भाव. ८. यशस्+संपत्+जीवन+विनाशक=कीर्ति व संपत्ति हेंच उदक यांचा नाश करणारा. ९. इंद्र. १०. छिद्र, उणेपणा, निमित्त. ११. लहानही. १२. मोठें. भांडण लावण्याच्या कामीं जरी लहानसें कारण सांपडलें, तरी तें पुष्कळच उपयोगी पडेल—असा भाव. १३. जलक्रीडा करण्यांत गुंग झालेल्या. १४. सखीजनांसमवेत, मैत्रिणींसह. १५. शुक्राची कन्या, देवयानी. १६. सर्व दैत्यांचा राजा जो वृषपर्वा त्याची कन्या, शर्मिष्ठा. १७. विप्रवराची कन्या (देवयानी) व असुरवराची कन्या (शर्मिष्ठा). १८. बलाराति (इंद्र). बल=इंद्रानें मारिलेल्या दनायूच्या पुत्रांतील एक. १९. सरोवराच्या तीरीं. २०. वायुरूप धारण केलेल्या अशा. २१. जलक्रीडा. २२. 'करुनि त्या तटीं आली' असें पाठान्तर.

होती जलाशयीं[1] च श्रीमत्कविकन्यका तिची आली[2]. ॥ २१
शर्मिष्ठा कविजांबर[3] नेसे झडकरि; कळों न वासव[4] दे. ।
तों तीस देवयानी, ओढुनि तत्परिहितात्मवास[5], वदे:—॥ २२
'असुरसुते ! मच्छिष्या होउनि, मद्वस्त्र नेससी कां गे ? ।
बहु मातलीस, ऐसें मज समुदाचारलोप[6] हा सांगे.' ॥ २३
'मर्यादा पाळावी, निजशिवें[7] गुरुचे चि पाय, रीतीतें ।
सोडूं[8] नये', म्हणति कवि 'साधुपदाची च पायरी, तीतें.' ॥ २४
शर्मिष्ठा तीस म्हणे, 'बैसावें जैं सभेंत मत्तातें[9], ।
त्वत्तातें व्हावें तैं बंदी[10]; तूं विसरलीस मत्ता तें. ॥ २५
सिंहासनीं विराजे मद्गुरु[11], न सहस्रकर[12] हि, परि सविता[13]; ।
बैसे खालें त्वद्गुरु कवि, कविता करुनि, त्यासि परिसविता[14]. ॥ २६
तूं तों कन्या, जो स्तुतिकर, याचक, दान घे सदा, त्याची. ।
मी कन्या स्तव्यांची[15], भव्यांची[16], सर्वसेव्यदात्याची[17]. ॥ २७
माझी न पाविजे त्वां, मत्ताताची तुझ्या न सरि[18] तातें; ।
जें जन्हुकन्यकेचें[19] भाग्य, न पावेल अल्प सरिता तें. ॥ २८
होती महेंद्रनयनें, पाहुनि राजेश्वरा जया, चकितें; ।
मत्तातभाग्य कैंचें त्वत्ताता भिक्षुकासि, याचकि[20] ! तें ? ॥ २९
मत्ताताची जी श्री[21], कीर्ति, कवीला न ये चि भिक्षुकि ! ती. ।
अमृतरसासीं व्हाया सम माधुर्यें समर्थ इक्षु[22] किती ? ॥ ३०

---

१. सरोवरांत. २. सखी. ३. देवयानीचें वस्त्र. ४. इंद्र. ५. शर्मिष्ठा जें आपलें वस्त्र नेसली होती तें. राजकन्या जें नेसली तें स्ववस्त्र–**पंत.** ६. मर्यादाभंग. [ समुदाचार ]= सदाचार–**पंत.** ७. आपलें कल्याण करणारे. ८. 'सांडूं नये' असें पाठान्तर. ही गीति उत्तम सुभाषित होय. ९. माझ्या बापानें. १०. भाट, स्तुतिपाठक. ११. माझा पिता. १२. कर= हात; ( पक्षीं ) किरण. १३. सूर्य. अर्थात् सूर्यासारखा तेजस्वी (पराक्रमी). १४. ऐकविता. १५. स्तुतीस योग्य अशाची. १६. भव्य (श्रेष्ठ) असा जो वृषपर्वा त्याची. १७. सर्वांनीं सेवा करण्यास योग्य अशा दात्याची ( वृषपर्व्याची ). १८. बरोबरी. १९. गंगेचें. २०. 'याचकि !' व पुढील गीतींतील 'भिक्षुकि !' हे शब्द मूळांतीलच आहेत. ( अध्याय ७८।११ ) २१. भाग्य, संपत्ति. २२. ऊंस. अमृतरसासीं माधुर्यें सम ( बरोबरीचा ) व्हाया इक्षु किती ( कितीसा, अर्थात् अत्यन्त अल्प ) समर्थ [ होय ]–असा अन्वय.

राजसुतेचें यश जें, तुज येइल काय गे ! दरिद्रे ! तें ? ।
पाहसि विकावया तूं केसरमूल्यें कसें हरिद्रेतें[3] ?' ॥ ३१
निर्भर्त्सना[4] करी बहु; संपादी द्वेष, पाप; गाढ केली ।
करुनि, कविजेसि[6] कूपीं[7] ती कोपाची महापगा[8] ढकली. ॥ ३२
मेली च असें मानुनि, शर्मिष्ठा आपुल्या घरा गेली; ।
कूपीं कविजा होती, जैसी नागी[9] मनांत रागेली[10]; ॥ ३३
तों मृगयाश्रांत[11], तृषित, तोयार्थ[12] ययाति तेथ एकाकी[13] ।
आला, शर्मिष्ठा ज्या कूपीं त्या देवयानिला टाकी. ॥ ३४
कूपीं पाहे सहसा[14] सत्कन्यारत्न तो ययाती तें. ।
'कोणाची कोण ?' असें मंजु[15] पुसे, करुनियां दया, तीतें. ॥ ३५
सांगे 'तज्जा[16] मी, कवि म्हणति द्विजनायका ययाते ! ज्या.' ।
नरवर म्हणे, 'प्रसवला तो भगवान् काव्य काय या तेजा ?' ॥ ३६
कविजा म्हणे, 'नरेंद्रा ! स्वतपें, तुझिया यशें हि, तुज जाणें[17]; ।
मज दक्षकर[18] धरुनियां[19] वर घेउनि, करुनि धन्य भुज, जाणें.' ॥ ३७
क्षुधितापुढें सुधेची[20] पात्री[21] दैवें चि वाढिली; वरिती[22] ।
झाली मनें[22]; गुरुभुजें[23] दक्षिणकर धरुनि, काढिली वरि ती. ॥ ३८

---

१. ह्या गीतींत **'निदर्शना'** अलंकार आहे. जेथें एका गोष्टीची असंभाव्यता तशाच प्रकारच्या दुसऱ्या असंभाव्य गोष्टीची उपमा किंवा उदाहरण सांगून दाखविलेली असते, तेथें हा अलंकार होतो. शर्मिष्ठा देवयानीस म्हणतेः—तुझ्यासारख्या ब्राह्मणाच्या भिकारड्या पोरीनें आपण एखाद्या राजकन्येप्रमाणें वागूं पाहाणें, हें केशराच्या किंमतीनें हळद विकूं पाहाण्यासारखेंच, अर्थात् अशक्य कोटींतील आहे. २. केशराच्या किंमतीनें. 'केशरमौल्यें' असें पाठान्तर. ३. हळदीला. ह्या गीतींत **'प्रतिवस्तूपमा'** अलंकार आहे, असेंही म्हणावयास हरकत नाहीं. ४. फजीति, तिरस्कार. ५. कलह. ६. शुक्रकन्येस (देवयानीस). ७. विहिरींत. ८. मोठी नदी. ९. नागीण, सर्पीण. १०. संतापलेली. ह्या गीत्यर्धांत **पूर्णोपमा** अलंकार आहे. ११. पारध करून थकलेला. १२. उदक पिण्याकरितां. १३. एकटाच. १४. एकदम, अचानक. १५. मधुर व सौम्य शब्दांनीं. १६. त्याची कन्या. ज्या द्विजनायका कवि (शुक्राचार्य असें) म्हणति, तज्जा मी [आहें, असें] सांगे—असा अन्वय. १७. जाणत असें. १८. उजवा हात. १९. 'मज दक्षकरीं धरुनी' असा पाठभेद. २०. अमृताची. २१. परात. २२. ययातीस मनेंकरून वरिती झाली. २३. गुरुभुजें=लांब हात करून.

भूप म्हणे, 'धिक्' चिंता[1]; 'क्षेत्रा[2] विप्रात्मजा न सेव्या ही.' ।
ती हि म्हणे, 'नहुषेतर[3] कविला' चित्ता[4] 'जनीं नसे व्याही.' ॥ ३९
नृप गेला; मग आली, शोधाया घूर्णिका[5] तिला; 'हां गे ! ।
जा, सांग पित्याला, म्यां त्यजिलें वृषपर्वपुर' असें सांगे. ॥ ४०
वृत्त कथुनि कविसि, म्हणे ती, 'निष्ठुरता पहा निरोपाची. ।
छाया[6] करा चि; न करो अतिनिष्ठुर ताप हानि रोपांची[7].' ॥ ४१
भेटोनि, तितिक्षेचे[8] गुण सांगे साधु बाप तनयेतें, ।
कीं 'कोपाच्या संगें स्वविभागा[9] सर्वथा पतन[10] येतें.' ॥ ४२
शर्मिष्ठोक्ति[11] पित्यातें कथुनि, म्हणे, 'तूं असा चि असशील; ।
सोसुनि अपमान सुखें, वाटे या दुर्जनांत वसशील.' ॥ ४३
शुक्र म्हणे, 'विधि वदला मजला 'तूं विश्ववृष्टिपति[12]' तनये ! ।
स्वमुखें काय वदों ? मज पाहों तो[13] शरण केविं पतितें[14] न ये ? ॥ ४४
अज्ञ मुलें कलह करिति; न वदावें तें चि बोलति स्वैरें[15] ।
तें चित्तांत धरूनि[16], प्राज्ञें पुरुषें करूं नये वैर.' ॥ ४५
सुरयानी गुरुसि[17] म्हणे, 'बा ! नेणति थोर थोर कवि[18] ज्यातें, ।
धर्माचें तत्व बरें जाणतसे हे सुबुद्धि कविजा[19] तें. ॥ ४६

---

१. 'भूप म्हणे धिक् चिंता' असें पाठान्तर. २. क्षत्रियाला. ३. नहुष राजाहून दुसरा मनुष्य. राजा नहुष हा ययातीचा पिता असल्यामुळें आपल्या पित्याचा तो व्याही व्हावा. म्हणजे तूं ययातिराजाच माझा पति व्हावास–असा स्पष्टार्थ. **पर्यायोक्ता**लंकार. ४. आपल्या मनाशींच. 'चित्तीं' असें पाठान्तर. ५. ह्या नांवाची दाई. ६. कृपारूप छाया. ७. रोप=रोपटें, कोमल अंकुर. अतिनिष्ठुर ताप ( देवयानीस होत असलेलें दुःख ) रोपाची ( कन्या देवयानीरूप कुलांकुराची ) हानि न करो–असा अन्वय. ८. सहनशीलतेचे. ९. आपल्या वांट्यास. १०. कमीपणा. ११. शर्मिष्ठेचें भाषण. ( मागें गीति २५ ते ३१ पहा ). 'शर्मिष्ठोक्त' असें पाठांतर. १२. जग आणि पर्जन्य यांचा पति. तनये ! विधि मजला वदला [ कीं ] तूं विश्ववृष्टिपति [ आहेस ]–असा अन्वय. 'विश्वसृष्टिपति' असें पाठान्तर. १३. तो=वृषपर्वा. 'ती' असें पाठान्तर. ती=शर्मिष्ठा. १४. पातकी. १५. स्वेच्छेनें, वाटेल तसें. १६. 'धरुनियां' असें पाठान्तर. ह्या गीतींत उत्तम व्यावहारिक नियम सांगितला आहे. ही गीति उत्तम सुभाषित होय. ह्यासंबंधीं पंत अन्यत्र म्हणतातः–रीति दहांची हे कीं आधीं समजाविती लहानातें. । ( उद्योगपर्व, अध्याय १।३८ ). १७. बापाला. १८. शहाणे पुरुष. १९. देवयानी.

धर्माधर्मबळाबळवार्ता[1] तों दुर्लभा चि अन्या[2] या; ।
अन्या[3] या पायांची[4] जाणे न्याया, तथैव अन्याया. ॥ ४७
त्यांत पळ हि न वसावें, ज्यांत[5] दुरितभीति[6], धर्म, नय, नाहीं. ।
तृणचरमुखें[7] सुखें अवलोकावीं, खळमुखें न नयनांहीं. ॥ ४८
दुर्जनसहवास सदा तापद[8]; हा काय नरक सामान्य ? ।
होईल यासि दाटुनि[9] मानधन[10] प्राज्ञ नर कसा मान्य ?' ॥ ४९
वृषपर्व्यासि म्हणे कवि, 'मी विप्र चि कीं अविप्र ? मत्तनया ।
पीडावी ? हरिसि[11] हसति वांटे[12] सोडुनि अवि[13] प्रमत्त[14] नयां[15]. ॥ ५०
त्यजितों तुला, अतिक्रम[16] साहे ऐसा नव्हें पुरोधा[17] मी, ।
वृत्त्यर्थ[18] तापसा मज शाक[19] पुरो, वा[20] ! न वा पुरो, धामीं[21].' ॥ ५१
असुरपति[22] म्हणे, 'स्वामी ! आहें मी सर्वथैव अपराधी. ।
पहिली एका[23] चि असो या दासजनीं, नसो चि अपरा[24], धी. ॥ ५२

---

१. धर्म कोणता व अधर्म कोणता; तसेंच बलवान कोण व बलहीन कोण—ह्या बाबतींतील सूक्ष्म विचार. २. अन्या=माझ्याशिवाय दुसरीला. ३. 'न्या' ह्या अक्षराचा **अनुप्रास** पंतांचा आवडता दिसतो. (अध्याय १२।४२, व ३८।६७; तसेंच वनपर्व, अध्याय १३।२६ इत्यादि पहा). ४. या पायांची=आपली (शुक्राचार्यांची). अत्यंत पूज्यभाव ध्वनित करण्याच्या हेतूनें पंतांनीं 'या पायांची' हे शब्द देवयानीच्या तोंडीं घातले आहेत. ५. ज्या समाजांत, ज्या देशांत. कल्पनासादृश्यः—वरं वनं व्याघ्रगजेन्द्रसेवितं द्रुमालयः पत्रफलाम्बुभोजनम् । तृणानि शय्या वसनं च वल्कलं न बन्धुमध्ये धनहीनजीवनम्. ॥ ६. पापभीति. ७. पशूंचीं तोंडें. दुष्ट लोकांच्या सहवासांत राहाण्यापेक्षां वनांत जाऊन तेथें पशूंच्या सहवासांत राहाणें बरें—असा भाव. ८. संतापदायक. ९. मुद्दाम. १०. मानी. ११. सिंहास. १२. ही **स्वरूपोत्प्रेक्षा** होय. १३. बोकड. १४. अत्यंत उन्मत्त. १५. नीतीस. १६. अपमान. १७. उपाध्याय. १८. उपजीविकेकरितां. १९. भाजी. ही गीति रचण्याच्या वेळीं पंतांच्या डोक्यांत पुढील संस्कृत श्लोक घोळत असावा, असें दिसतें:—दिल्लीश्वरो वा जगदीश्वरो वा मनोरथान् पूरयितुं समर्थः । अन्येन केनापि नृपेण दत्तं शाकाय वा स्याल्लवणाय वा स्यात्. ॥ २०. वा=बा ! बा (राजा !) मज तापसा वृत्त्यर्थ धामीं शाक पुरो वा न पुरो, अतिक्रम साहे ऐसा पुरोधा मी नव्हें, तुला त्यजितों—असा अन्वय. येथें 'बवयोः सावर्ण्यम्' ह्या नियमानें 'बा' च्या ठिकाणीं 'वा' योजिला असावा. किंवा—संस्कृत भाषेंतील 'नरो वा कुंजरो वा' ह्या पद्धतीच्या रचनेप्रमाणें येथील वाक्यरचना आहे असें समजून दोन 'वा'कारांचा निर्वाह करावा. ही गीति वाचून 'निःस्पृहस्य तृणं जगत्' ह्या वचनाचें स्मरण होतें. २१. (स्वतःच्या) घरीं. २२. वृषपर्वा. २३. एकच (कृपेची) धी (बुद्धि), कृपादृष्टि. २४. अन्या (रागाची).

जरि सिंधु जीवनाचीं, क्षण हि न दे, करुनियां दया, दानें, ।
तरि वांचावें कैसें ? रक्षावें बा ! स्वयाद यादानें ? ॥ ५३
त्यजितां मरेल हा जन; न प्रभुवर लाविला मळा सुकवी. ।
स्वयशासि सकृप-अकृपत्वाच्या लागों न दे मळा सु-कवी.' ॥ ५४
काव्य म्हणे, 'मी जातों; व्यसनांत तुम्ही तरा, बुडा, लोलं; ।
आतां सुर येतील; क्षिप्र पळा हो ! मला नसे बोल. ॥ ५५
तुमचें प्रिय, कन्येचें अप्रिय, मज हा न दोष करवेल. ।
लावील शत सुरांचे, अजिरीं, परि ते न तोषकर, वेलें ॥ ५६
वृषपर्वा नमुनि म्हणे, 'श्रीचा, माझा हि नाथ तूं, देवा ! ।
हो सुप्रसन्न; आम्हां दासांपासूनि घे सदा सेवा.' ॥ ५७
शुक्र म्हणे, 'जरि म्हणसि स्वश्रीचा, आपुला हि, नाथ मला, ।
तरि कन्या चि मदात्मा; प्रार्थूनि करा प्रसन्न जो श्रमला.' ॥ ५८
राजा म्हणे, 'बहु बरें'. मग सुरयानीकडे तयासहित ।
जाय कवि; तदुक्त कथी, जें तीस, तया कृताश्रयास, हित. ॥ ५९
परिसुनि तातोक्त म्हणे, 'म्हणतो तुज, 'आत्मवित्तनाथ'; मुखें; ।
राजा मज 'माग' म्हणो; मग मी मागेन इष्टकाम सुखें.' ॥ ६०

१. उदकाचीं. २. स्वकीय जलचर प्राणी. ३. जलजंतूनें. 'यादस्' हा शब्द संस्कृतांत नपुंसकलिंगी आहे. ४. मी वृषपर्वा. ५. फुलझाडें व फळझाडें यांची बाग. 'विषवृक्षोऽपि संवर्ध्य स्वयं च्छेत्तुमसांप्रतम्' हें वचन प्रसिद्धच आहे. ६. वाळवी–पंत. ७. सुकवी स्वयशासि सकृप-अकृपत्वाच्या मळा लागों न दे–असा अन्वय. सुज्ञ मनुष्य हा दयाळू आहे किंवा निष्ठुर आहे असा लोकापवाद आपणास लागूं देत नाहीं. त्याची सर्वांच्या ठिकाणीं समबुद्धि असते–असा भाव. 'स्वयशा अकृपत्वाच्या सहसा लागों न दे मळा सुकवी' असा पाठभेद. ८. शुक्र. ९. संकटांत, दुःखांत. १०. चंचलवृत्तीचे. ( जणूं काय व्यसनसागरांत गटंगळ्या खाणारे ). ११. [ तुम्ही ] अजिरीं सुरांचे शत वेल लावाल, परि ते ( वेल ) तोषकर न–असा अन्वय. तुम्ही माझ्या दारांत शेंकडों कल्पलता आणून लाविल्यात, तरी त्यांच्यापासून मला आनंद होणार नाहीं. कन्येचें प्रिय केल्यानेंच मला संतोष होईल–असा भाव. १२. कल्पलता. १३. अंगणांत. १४. संपत्तीचा, वैभवाचा. १५. माझा आत्मा, माझा जीव कीं प्राण. १६. वृषपर्व्याचें भाषण. ( गीति ५७ पहा ). १७. केला आहे आपला आश्रय ज्यानें, अशा तया ( त्या वृषपर्व्याला. ) १८. हितकारक. १९. पित्याचें भाषण. 'तातोक्ति' असें पाठांतर. २०. आपल्या द्रव्याचा स्वामी.

राजा म्हणे, 'गुरुसुते ! देतों, जें मागशील, तें नमुनी. ।
आम्हां तूं तशि पूज्या, पूज्य जसा हा तपोनिधान[1] मुनी.' ॥ ६१
कविदुहिता त्यासि म्हणे, दशशतकन्यायुता[2] तुझी तनया[3] ।
शर्मिष्ठा मद्दासी[4] व्हावी; कामासि इच्छितें मन या. ॥ ६२
यावें मजसह मत्पतिसदनासि[5], त्यजुनि भाऊ[6], दासीनें. ।
दास्य करावें भावें[7], न असावें मानसें उदासीनें. ॥ ६३
राजा धात्रीस[8] म्हणे, 'हें चि शिवें[9]. तुझी च आण. जागे[10] हा ।
श्रीगुरु असत्राणीं[11]; कन्येला शीघ्र आण; जा गेहीं[12].' ॥ ६४
धात्रीनें समजावुनि जावुनि कथितां चि पितृमुखाज्ञा[13], ती ।
शिबिकेंत[14] बसोनि निघे, कीं[15] पात्र असोत जयसुखा ज्ञाती. ॥ ६५
गुरुतनयेसि म्हणे, 'तुज देईल तुझा जयासि बा[16], धामीं[17] ।
त्याच्या हि तुझी दासी येत्यें, न गणूनि दास्यबाधा[18], मी.' ॥ ६६
स्मित[19] करुनि, देवयानी, राजवधूगल्ल[20] व्हावया[21] ओले, ।
टोले शर्मिष्ठेच्या माथां हाणावया, असें बोलेः—॥ ६७
'मज्जनक[22] तव पित्याचा बंदी[23]; स्थिति रीति हे अशी; गाई ।
घेतो[24] याचक; माझी दासी होशील तूं कशी ? गाई !' ॥ ६८
शर्मिष्ठा उत्तर दे, 'जी बहु आग्रह[25] करील[26], अज्ञा ती. ।
कुळजेनें व्यसनकरीं[27] प्राण हि द्यावे, परंतु न ज्ञाती.' ॥ ६९

१. तपश्चर्येचें भांडार. २. हजार मुली जिच्याबरोबर आहेत अशी. कन्या=मुली. पुढें गीति ८१ मध्यें ह्यांची संख्या दोन हजार सांगितली आहे. पण प्रत्येकीच्या एक हजार याप्रमाणें देवयानी व शर्मिष्ठा या दोघींच्या दासींची मिळून ही संख्या दिलेली आहे. (मूळ अध्याय ८१।८) ३. कन्या. ४. मत्+दासी=माझी दासी. ५. माझ्या पतीच्या घराला. ६. भाऊबंद, आप्तेष्ट–असा भाव. ७. भक्तीनें, मनापासून. ८. दाईला. ९. कल्याण. १०. तत्पर असतो. ११. आमच्या रक्षणाविषयीं. १२. घरीं. १३. बापाच्या तोंडची आज्ञा. 'धात्रीनें समजावुनि कथितां कन्येसि पितृमुखाज्ञा ती' असा पाठभेद. १४. पालखींत. १५. कीं (कारण) ज्ञाती (स्वजन, असुर) जयसुखा (जयप्राप्ति झाल्यानें होणाऱ्या सौख्याला) पात्र (योग्य) असोत (होवोत)–असा अन्वय. १६. बाप. १७. घरीं. १८. परतंत्रपणामुळें प्राप्त होणारें दुःख. १९. हास्य. २०. राजकन्येचे गाल. २१. राजकन्या रडावी म्हणून. २२. माझा बाप (शुक्र.) २३. स्तुतिकर्ता. २४. घेतो—पंत. २५. अगाई. २६. हट्ट करील. २७. संकटाचे हातीं. हें गीत्यर्ध सुभाषितरूप आहे.

सुरयानी गुरुसि म्हणे, 'विद्यातेजें, विवेकविज्ञानें[1], ।
बापा ! सत्य निवाल्यें; निववूनि जना, निवे कवि, ज्ञानें. ॥ ७०
चाला, आला चित्ता आतां, मुनिनायका ! पुरा[2], वासें. ।
वास[3] तुझ्या चि यशाचा मधुर; असा काय कापुरा वास ? ॥ ७१
जाय पुरीं, उत्सव दे मुनि शिष्यां, जेंवि अर्क[4] राजीवां[5], ।
वांटी मधुरा आशी[6] कवि, वृषपर्वा हि शर्करा जीवां[7]. ॥ ७२
त्यावरि, एका समयीं, त्या च वनीं शुक्रकन्यका गेली. ।
संगीं सहस्र दासी, शर्मिष्ठा; काननीं[8] करी केली[9]. ॥ ७३
तेथें मृगानुसारी[10] आला राजा ययाति हि तसा च; ।
पूर्वी जेणें केलें कूपोद्धारें[11] करोनि हित साच. ॥ ७४
दासीसहस्रमध्यस्थित[12] कन्याद्वय विलोकुनी रुचिर[13], ।
नरपति निववी नयनें[14] तल्लावण्यामृतन्हदीं[15] सुचिर[16]. ॥ ७५
पुसतां नृपें, हराया निजमधुरोक्तें[17] तदीय खेदासी, ।
सांगे, 'मी शुक्रसुता; माझी असुरेंद्रजा[18] हि हे दासी.' ॥ ७६
'राजसुता त्वद्दासी[19] हें कैसें ?' नृप पुसे; म्हणे कविजा[20], ।
'पुससी काय ? जग असे वश कर्मा[21], हस्त जोडिती कवि ज्यां[22].' ॥ ७७
'त्वां हि कथावें मज निजकुलनाम,' असें सती अकुत्स[23] वदे. ।

१. विचारानें प्राप्त झालेल्या विशेष प्रकारच्या ज्ञानानें. २. पुरा (वृषपर्व्यांच्या नगरीला) चाला, [ तेथील ] वास ( राहाणें ) आतां चित्ता आला ( मला मान्य आहे )–असा अन्वय. ( मागें गीति ४० पहा ). ३. सुगंध. **दामयमक.** ४. सूर्य. ५. कमलांस. ६. आशीर्वाद. ७. प्राण्यांना, अर्थात् सर्व लोकांना. येथें मूळांतील ८० वा अध्याय संपतो. ८. अरण्यांत. ९. क्रीडा. १०. हरिणांच्या पाठीस लागलेला. ११. विहिरींतून वर काढण्यानें. १२. हजार दासींच्या मध्यभागीं असणारें. १३. सुंदर. १४. डोळे. [ नयन हा शब्द संस्कृतांत नपुंसकलिंगी आहे. ] देवयानी व शर्मिष्ठा यांच्या लावण्यानें मोहित होऊन राजा ययाति त्यांच्याकडे टक लावून पाहूं लागला–असा अर्थ. १५. त्या कन्यांच्या लावण्यरूप अमृताच्या डोहांत. १६. फार वेळपर्यंत. १७. आपल्या मधुर भाषणानें. १८. असुराधिपति वृषपर्व्याची कन्या. १९. तुझी दासी. २०. देवयानी. २१. दैवाला. ( पूर्वजन्मीं केलेल्या कर्माला दैव असें म्हणतात ). भर्तृहरीनें आपल्या नीतिशतकांत कर्मप्रशंसापर जीं पद्यें रचिलीं आहेत, तीं जिज्ञासु वाचकांनीं पाहावीं. २२. दैवास. ज्या कवि हस्त जोडिती ( ज्याला शरण जातात, ज्याच्यापुढें नम्र होतात ) [ त्या ] कर्मा जग वश ( अधीन ) असे--असा अन्वय. २३. निंदारहित, अर्थात् सरळपणानें.

नृप आपण हि तिला, [1]तें स्वमुखें सांगोनि, फार [2]उत्सव दे. ॥ ७८
'[3]शशिकुलज, नहुषसुत, जन हा, नाम ययाति, येथ [4]तोयार्था मी ।
आलों मृगानुसारें; [5]आपृच्छे [6]त्वाम् [7]तदहमितो [8]यामि.' ॥ ७९
त्यासि म्हणे सुरयानी, 'परम मनोहर तुझें जगीं यश गा ! ।
[9]सत्य, सखा [10]भर्ता हो; झाल्यें तुज मी मनोरमा [11]वशगा. ॥ ८०
हे शर्मिष्ठा दासी; दासी [12]विंशतिशतें हि कन्या या; ।
अंगीकारावें मज, जाणसि तूं [13]धर्मपाळक ! न्याया.' ॥ ८१
नृपति म्हणे, '[14]सिंधूसि त्यजुनि, दया करुनि ही, नदी नातें ।
लावील [15]सराशीं, तरि तें हित त्या [16]शक्तिहीन-दीनातें. ॥ ८२
तुज व्हावें पात्र, अशीं कैंचीं पुण्यें सहाय [17]या तितुकीं ? ।
विप्रवरसुते ! क्षत्रिय उतरेल तुझ्या न हा ययाति [18]तुकीं.' ॥ ८३
'[19]ब्रह्मक्षत्रविमिश्रिततत्वें तूं ही ऋषी च, [20]सन्महित; ।
वर्णाश्रमधर्मांच्या [21]अवनें, लोकीं तुझें चि जन्म हित. ॥ ८४
त्यांत हि मी च [22]असें तुज म्हणत्यें; नाहीं च तुजकडे दोष; ।
मजवरि गुरुचा प्रेमा बहुत चि; न करील लेश तो [23]रोष. ॥ ८५
शिवलासि मत्करा तूं; शिवतां अन्याय या तिजा, माता ।
[24]स्त्री; गुरु कीं तूं; साजे कविसि, न [25]अन्यां, ययाति जामाता. ॥ ८६

१. आपलें कुलनामादिक. २. आनंद, हर्ष. ३. चंद्रवंशांत ज्याचा जन्म झाला आहे असा. ४. पाण्याकरितां, पाण्याचा शोध करीत. ५. पुसतों, विचारितों. येथें वस्तुतः संस्कृत शब्दांची योजना करण्याचें कांहीं कारण नव्हतें, परंतु कदाचित् ब्राह्मणकन्येशीं भाषण करावयाचें म्हणून राजाच्या तोंडीं हें संस्कृत वाक्य पंतांनीं घातलें असावें. ६. त्वां=तुला. ७. आतां मी येथून. ८. जातों. ९. सत्य=हें सत्य होय. १०. मित्र आणि पति. भर्ता=( १ ) नवरा, पति; ( २ ) पोषण करणारा. ११. स्वाधीन, अनुकूळ. १२. वीसशें, दोन हजार. १३. धर्माचा पालनकर्ता, धर्मरक्षक. ह्या विशेषणाची योजना सहेतुक असल्यामुळें परिकरालंकार. १४. समुद्राला. १५. सरोवराशीं. १६. असमर्थ व दरिद्री अशा सरोवरास. १७. मला (ययातीला.) १८. तुलनेविषयीं, बरोबरीला. १९. तुझ्या ठायीं असणाऱ्या ब्राह्मण व क्षत्रिय यांच्या विमिश्रित गुणांनीं. (शील ब्राह्मणासारखें व पराक्रम क्षत्रियासारखा-असा भाव). २०. साधूंना पूज्य. २१. रक्षणानें. २२. वर गीति ८०-८१ मध्यें सांगितल्याप्रमाणें. मी च= मी आपण होऊन, मी स्वतःच्या इच्छेनें. २३. क्रोध. २४. माता [ ही ] स्त्री [ होय ] ( तेव्हां तिच्याविषयीं विचार करण्याचें कारण नाहीं ) [ परंतु ] गुरु ( पिता ) कीं ( किंवा ) तूं

धरिला[1] करीं कुलीनें जो, तो त्या होय योग्य[2] अत्यागा. ।
कर सोडिसी कसा हा? धर्मज्ञा[3] ! न करितां हि अत्यागा[4].' ॥ ८७
नृपति म्हणे, 'मज तुज ही मान्य, तुझा गुरु करील आज्ञा, ते. ।
वृष्टिप्रति चातकसे, करिताति[5] गुरूक्तिला[6] चि आं ज्ञाते.' ॥ ८८
जेव्हां असा निजाशय नृपरत्नानें वधूसि[7] जाणविला; ।
धात्री[8] धाडुनि कळवुनि वृत्त, पिता त्या वनांत आणविला. ॥ ८९
कविनें, येतां चि, दिली पादप्रणता[9] नृपासि रुचिराशीः[10], ।
धर्मालोपवरासह[11]; मग विधिनें निजसुता हि रुचि-राशी[12]. ॥ ९०
कथिलें[13] हि असें मग, कीं, 'सुरयानीचा धरूनि शय[14], नातें ।
शर्मिष्ठेसीं हि न हें लावीं, योग्या करूनि शयनातें.' ॥ ९१
बहु सत्कारुनि, मुनिनें वृषपर्व्यानें हि भूप[15] बोळविला[16]. ।
असकृत्[17] नृपें प्रयाणीं[18] गुरुपादरजांत मुगुट लोळविला. ॥ ९२
गेला पुरासि घेउनि, बसवूनि मनुष्यदेव[19] यानीं[20]; तें, ।
श्रीतें[21] पद्म[22] तसें, वरसद्म[23] सुखद होय देवयानीतें[24]. ॥ ९३
बहुपुण्यवंत रमतो जैसा सानंद देवलोकवनीं, ।

---

[ यांखेरीज ] तिजा ( तिसरा कोणी ) या ( माझ्या हाताला ) शिवतां ( शिवला तर तो ) अन्याय ( अधर्म ) [ होय ]–असा अन्वय. किंवा—स्त्रियांपैकीं माता व पुरुषांपैकीं गुरु किंवा तूं यांशिवाय तिसरा कोणी या ( माझ्या हाताला ) शिवल्यास तो अधर्म होय. २५. ययातीशिवाय दुसरा कोणी. ( मागें गीति ३९ पहा ).

१. करीं धरिला=हाताशीं धरिला, आश्रय दिला; ( २ ) पाणिग्रहण केलें. २. त्याग करण्यास अयोग्य, अत्याज्य. ३. धर्माचीं तत्वें जाणणाऱ्या ! धर्मविदा ! ह्या विशेषणाची योजना साभिप्राय असल्यामुळें **परिकरा**लंकार. ४. अति+आग=मोठा अपराध. ५. आ करिती= अपेक्षा करितात, आज्ञेची वाट पाहातात. ६. गुरूच्या वचनाला. ७. मुलीला. ८. दाई. ९. पायां पडलेल्यास. १०. उत्तम आशीर्वाद. [ आशीः= ] आशीर्वाद–**पंत.** ११. धर्माचा अलोपरूप जो वर त्यासह, तुझ्या हातून अधर्म न घडो, अशा वरासह. १२. रुचि म्हणजे कांति तिची राशी, अर्थात् सुंदर. १३. ही गीति पूर्वींच्या आवृत्तींत गळाली होती. ह्या गीतीखेरीज, अध्याय ११ गीति १० मधील ययातिराजाच्या भाषणाची संगति लागत नाहीं. १४. हस्त. १५. ययातिराजा. १६. निरोप दिला, जाण्यास परवानगी दिली. १७. वारंवार. १८. जाण्याच्या वेळीं. १९. राजा. २०. पालखींत. २१. लक्ष्मीला. २२. कमल. **उपमा**लंकार. २३. नवऱ्याचें घर. २४. येथें मूळांतील ८१ वा अध्याय संपतो.

स्त्रीरत्नीं बहु रमला नृप, [1]सरसीं रसिक काय तो कवनीं ! ॥ ९४
सदनीं करी ययाती जे कांहीं सुखविलास तीस हितें[2], ।
रायें स्वात्मा तैसा, जेंवि हरें सुखविला [3]सतीसहित. ॥ ९५
[4]कविजासुत यदु पहिला; त्याचें [5]गुरुलोचना मना तुंड[6] ।
निववी; शशिबिंब जसें, करि [7]कविचें, मुदित[8] धाम, नातुंड. ॥ ९६

---

## अध्याय अकरावा.

होयें[9] ऋतुमती [10]सुमंती शर्मिष्ठा, व्याकुळा [11]वैराधीनें; ।
चित्तीं म्हणे "सहावें किति [12]दुःख [13]कलेवरें पराधीनें ? ॥ १
प्रियतम सहाय नसतां, यौवनहननेंकरोनि जो क्षीण, ।
तद्गणनीं[14] कुंठितमति होईल [15]सरस्वती हि जोशीण[16]. ॥ २
[17]शिशु पाळण्यांत घालुनि हालवितां, निजवितां, सुखें [18]'जो जो' ।

---

१. सरसीं (प्रेमयुक्त) [अशा] स्त्रीरत्नीं नृप बहु रमला, [जणूं] काय तो रसिक सरसीं (नवरसयुक्त) कवनीं (काव्यांत) [रमला]—असा अन्वय. **उत्प्रेक्षा**लंकार. रस=प्रेम, (पक्षीं) काव्यांतील शृंगारादि नऊ रस. **श्लेषा**लंकार. २. हितकर, इष्टसाधक. ३. पार्वतीसह. सती हें पार्वतीचें पूर्वजन्मांतील नांव. ४. देवयानीचा पुत्र. ५. आईबापांच्या नेत्रांना. ६. तोंड. ७. शुक्राचें. ८. आनंदयुक्त. ९. देवयानीच्या विवाहानंतर हजार वर्षांनीं शर्मिष्ठा यौवनांत येऊन ऋतुमती झाली—असें मूळांत आहे. (अध्याय ८२।६). १०. 'जेव्हां' असें पाठान्तर. ११. पतिप्राप्तीविषयींच्या तीव्र मानसिक व्यथेनें. १२. परस्वाधीनपणामुळें किती दुःख सहन करावें लागतें व त्यामुळें मनाची स्थिति कशी होते, हें **पं**तांनीं पुढील गीत्यर्धांत वर्णिलें आहे:—फारचि बरी निरय-गति परवशता शतगुणें करी जाच. ॥ (विराटपर्व, अध्याय १।५६). १३. पारतंत्र्यांत असलेल्या शरीरानें. ही राजकन्या असूनही केवळ आपल्या ज्ञातीच्या कल्याणाकरितां ती पारतंत्र्यांत दिवस काढीत होती. हा तिचा केवढा स्वार्थत्याग ! १४. त्याची गणना (मोजदाद) करण्यांत. १५. रा० **प**राडकर यांच्या प्रतींत 'स्वरस्वती' असा पाठ आहे. पण तो हस्तदोष किंवा मुद्रणदोष असावा. १६. गणना करण्याचें काम जोशाचें असतें, पण तें काम सरस्वती करणार म्हणून ती जोशीण. १७. धात्री पाळण्यांत शिशु (देवयानीचें मूल) घालुनि जो हालवितां [व] जो निजवितां मुखें 'जो जो' [असा शब्द] सुखें म्हणति (म्हणते), तो [जणूं काय तिच्या तोंडून] अमृतरस चि निघे, [असें] सखीला (शर्मिष्ठेला) [वाटे]—असा अन्वय. तान्ह्या मुलाचें कौतुक त्याची दाई करीत असतां, त्याच्या मातेला व इतर मंडळीला असा आनंद होतो, त्याचा हा उत्तम नमुना आहे. १८. 'जो जो बाळा' हा शब्द.

धात्री[1] म्हणति, सखीला[2] अमृतरस चि तो, निघे मुखें जो जो. ॥ ३
'काय करूं? एकांतीं जरि होती भेटि, वाटतें मतिला।
विनवुनि वरितें, पुत्रप्राप्त्यर्थ[3], तरि, स्वयें सखीपतिला[4]. ॥ ४
न उपेक्षील कदापि क्षितिपति, धर्मज्ञ[5], शरण आलीला.।
मज ही व्हावे, झाले कामद[6] ते[7] जेंवि चरण[8] आलीला." ॥ ५
नृप हि उपवनीं[9] गेला; एकांतीं ती हि दृष्टिला पडली;।
न घडावी च कधीं, परि दोघांची गांठि विधिबळें[10] घडली[11]. ॥ ६
देतां दुर्लभ दर्शन एकांतीं, करुनियां दया, तीतें,।
कळला[12] प्रसाद; मग ती विनवी मंजु[13] स्वयें ययातीतें. ॥ ७
'द्वारीं मृगपतिहस्तांतूनि[14] अहो! वीरराय[15]! जी मुक्ता[16],।
ती सेविजेल इतरें सिंहावांचूनि काय जी! मुक्ता[17]?' ॥ ८
नृपति म्हणे, 'जें वदसी, जाणतसें मी, यथार्थ सुंदरि! तें.।
सरस[18] असो चि; मधुप[19]-बहुमत जरि हि रसें-करूनि कुंद[20] रितें[21]. ॥ ९
'तुज शयनीं न वहावें[22],' वदला कवि; मज अलंघ्य आज्ञा ती.।
माझें तुझें हि न पुन्हा मुनिच्या क्षोभें म्हणोत 'हा[23]!' ज्ञाती[24]". ॥ १०
शर्मिष्ठा त्यासि म्हणे, 'गम्यस्त्रीविषयकानृतें[25] पाप।

---

१. दाई. २. देवयानी-**पंत.** ह्या गीतींत **वत्सलरस** ओतप्रोत भरलेला आहे. ३. पुत्र होण्याकरितां. ४. मैत्रिणीचा पति जो ययाति, त्याला. ५. धर्माचें तत्त्व जाणणारा. ६. इच्छित कामना पूर्ण करणारे. ७. ययातीचे पाय. ८. सखीला. ९. बागेंत. १०. देवबळें, सुदैवानें. ११. 'पडली' असें पाठान्तर. १२. ही देवाची कृपा आहे, असें वाटलें. १३. मंजुळ वाणीनें, मोहक भाषणानें. १४. सिंहाच्या हातांतून. १५. वीरश्रेष्ठ! ह्या गीतींत **अप्रस्तुतप्रशंसा** नामक अलंकार आहे. १६. गळालेली, सुटलेली. अहो! वीरराय! मृगपतिहस्तांतूनि जी मुक्ता मुक्ता, ती द्वारीं [असतां] सिंहावांचूनि इतरें सेविजेल काय?-असा अन्वय. सिंहानें हत्तीचें गंडस्थल फोडून काढिलेल्या व जवळपास पडलेल्या त्या मौक्तिकाचा उपभोग सिंहाशिवाय दुसरा कोण घेईल बरें? ह्या शर्मिष्ठेच्या भाषणांतील गर्भितार्थ ययातीच्या लक्ष्यांत येण्यास फार वेळ लागला नाहीं-हें स्पष्टच आहे. १७. मौक्तिक. (मागें पृष्ठ ७७ टीप ७ पहा). १८. रसयुक्त फुलाची गोष्ट राहूं द्या-असा भाव. १९. भ्रमर. 'मधुप-बहु-मनिं' असें पाठान्तर. २०. कुंदपुष्प. २१. रिकामें. जरि हि रसेंकरूनि कुंद रितें [तरीही तें] मधुपबहुमत (भ्रमराला फार मान्य) [असतें]-असा अन्वय. २२. बोलवावें. (मागें अध्याय १० गीति ९१ पहा). २३. हाय! हाय! २४. स्वजन, बांधव. २५. गम्य+स्त्री+विषयक+अनृतें=गमन करण्यास योग्य अशा

नें[1] शिवे धर्मज्ञाला; आर्त[2]जनाचा निवारिजे ताप. ॥ ११
वरिलासि मत्सखीनें; म्यां ही वरि[3]लासि तूं मनें; मातें ।
पापापासुनि रक्षीं; या माझ्या चालवूनि नेमातें.' ॥ १२
भूप म्हणे, 'व्रत माझें, कोणी जन जें अभीष्ट[4] मागेल, ।
तें द्यावें त्यासि असें; मज तत्त्या[5]गें हि दोष लागेल.' ॥ १३
ऐसें वदे, मग नृपति, द्याया त्या सुंदरीस मु[6]दतिशय, ।
हांसे; म्हणे, 'धरूं दे सुंदरि! रंभोरु[7]! सुभ्रु[8]! सुदति[9]! शय[10].' ॥ १४
केली कृपा नृपानें, प्रथम स्वमनीं नमूनि त्या ऋषितें[11]. ।
प्याली ती हि चकोरी पतिमुखचंद्रामृता मनें तृषितें. ॥ १५
स्वप्रसवें[12] सुख शोभा दे क्षितिस परां[13] हि जेंवि सुक्षितिचा; ।
प्रसवोनि सुतासि, तसा सुख शोभा दे विशुद्ध कुक्षि तिचा. ॥ १६
शर्मिष्ठेला झाला सुत[14]; नाम द्रुह्यु ठेविलें आहे; ।

---

स्त्रीविषयीं खोटें बोलल्यानें. खोटें बोललें तरी कोणकोणत्या प्रसंगीं पाप लागत नाहीं, हें पुढील श्लोकांत सांगितलेलें आहे:—विवाहकाले रतिसंप्रयोगे सर्वात्यये प्राणधनापहारे । विप्रस्य चार्थे अनृतं वदेत पंचानृतान्याहुरपातकानि. ॥ ह्याचें पंतकृत रूपांतर:—लग्न, रति, प्राणक्षय, सर्वस्वविनाश, विप्रकार्य अशा । पांचां ठायीं अनृत हि बोलावें तें करी न नाश यशा. ॥ ( कर्णपर्व, अध्याय ४१।४१ ). येथेंही शर्मिष्ठा ययातीला 'धर्मज्ञ' म्हणून त्याचें मोठ्या खुबीनें मन वळविण्याचा प्रयत्न करीत आहे. **परिकरा**लंकार.

१. 'न शिवेचि, धर्म झाला' असा पाठभेद. २. दुःखानें पीडिलेल्या जनांचा. ३. येथील कर्मणिप्रयोग विशेष लक्षांत ठेवण्यासारखा आहे. तृतीयांत कर्ता, प्रथमांत कर्म व कर्माच्या लिंगवचनाप्रमाणें क्रियापद, ह्या लक्षणास अनुसरून असेल तो कर्मणि प्रयोग खरा; पण येथें द्वितीयपुरुषीं कर्म आहे. कर्मणिप्रयोगांत कर्म प्रथम किंवा द्वितीयपुरुषीं गद्यांत येत नाहीं. तथापि पद्यांत कवींनीं व विशेषतः पंतांनीं पुष्कळ ठिकाणीं अशा प्रकारचा प्रयोग केलेला आहे. ४. इच्छित वस्तु. ( मूळ अध्याय ८२।२० ). ५. त्या व्रताच्या त्यागानें. ६. हर्षाचा अतिशय. ७. केळीसारख्या ( सकुमार व गोल ) मांड्या जिच्या, अशी. ८. उत्तम आहेत भिंवया जिच्या, अशी. ९. उत्तम आहेत दांत जिचे, अशी. १०. हात. ११. शुक्राचार्याला. १२. आपल्या [ धान्यादिकांच्या ] उत्पत्तीनें. १३. दुसऱ्यांना देखील. जेंवि सुक्षितिचा ( चांगल्या जमिनीचा ) [ कुक्षि ] स्वप्रसवें क्षितिस ( प्रत्यक्ष धरणीमातेस ) [ व ] परां हि सुख [ व ] शोभा दे, तसा तिचा ( देवयानीचा ) विशुद्ध ( पवित्र ) कुक्षि सुतासि प्रसवोनि [स्वपरांस] सुख व शोभा दे ( देता झाला )–असा अन्वय. क्षिती=पृथ्वी, जमीन. कुक्षि=( १ ) पोट, उदर; खांच, खळगा. १४. येथें मूळांतील ८२ वा अध्याय संपतो.

ऐसें कळतां, चित्तीं चिंतेला काव्यकन्यका वाहे. ॥ १७
भेटुनि तिला म्हणे, 'हें कर्म उचित सुभ्रु ! काय[1] गे ! हातें ।
विमळ कुळ मळविलें, कीं लावियला अग्नि, हाये ! गेहातें. ॥ १८
धवलांबरासि[3] कज्जल, तैसें जें शुचिकुळासि पाप डसे, ।
तें धूतां श्रम बहु; गुरुं[4] भाजति दुःखाग्निमाजि पापडसे.' ॥ १९
येरि[5] म्हणे, 'ऋषि आला, श्रुतिपारग[6], धर्मशील; वरदा त्या ।
प्रार्थूनि, याचिला म्यां ऋतुकाळीं पुत्रकामवर[7] दात्या.' ॥ २०
देवी म्हणे, 'खरें हें जरि, तरि शोभन[8] चि, मानलें मजला ।
मज नाम सांग त्याचें; सुंदरि ! जो वरद ऋषि तुला भजला.' ॥ २१
दैत्यपतिजा[9] म्हणे, 'ऋषि गमला रविसा चि; नामगोत्रांस[10] ।
कैंची शक्ति पुसाया ? सांगों मी देवि ! काय तो त्रास[11].' ॥ २२
राज्ञी म्हणे, 'बरें. मज नाहीं कोप त्वदीयसुतलाभें. ।
जन न उतला[12] जगीं जो, तो पावे नित्य भद्र[13], उतला[14] भें[15].' ॥ २३
वदल्या दोघी प्रेमें, झाल्या सानंद, हांसल्या आली[16]. ।
आलिंगिलें परस्पर. मग निजसदनास भार्गवी[17] आली. ॥ २४
त्यावरि दुसरा झाला, तो तुर्वसु शुक्रकन्यकातनय[18]. ।
अनु, पूरु पुत्र दोघे, शर्मिष्ठेला; **करी न घात नय[19]**. ॥ २५
कविकन्येचे दोघे, शर्मिष्ठेचे तिघे सुत, नुरविते[20] ।
पितृचिंतातिमिर[21], सुहृन्नयनाब्जें[22] सुखविते, सुतनु[23], रवि ते. ॥ २६

---

१. 'काय गे ! हा ! तें' असें पाठांतर २. 'अग्नि काय गे हातें' असा अन्य पाठ. ३. शुभ्र वस्त्राला. ४. मातापितरादि वडील माणसें. ५. शर्मिष्ठा. ६. वेदपारंगत. ७. पुत्रप्राप्तीच्या इच्छे-विषयीं वर. ८. चांगलें. ९. शर्मिष्ठा. १०. त्याचें नांव व कुळादि. ११. भीति, भय. १२. उन्मत्त झाला. जो जन जगीं न उतला, तो नित्य भद्र पावे, [जो जन] उतला [ तो ] भें (भय) [ पावे ]—असा अन्वय. हें गीत्यर्ध सुभाषितरूप आहे. १३. कल्याण. १४. माजला. १५. भय. १६. सख्या. १७. देवयानी. शुक्राचार्य हा भृगुऋषीचा पुत्र म्हणून तो भार्गव व त्याची कन्या ती भार्गवी. १८. देवयानीचा पुत्र. १९. नय ( न्याय ) घात ( नाश ) न करी—असा अन्वय. शर्मिष्ठा नीतीनेंच वागत होती म्हणून तिचा नाश होणार नाहीं—असा भाव. २०. न उरविते, न उरविणारे. २१. बापाचा चिंतारूप अंधकार. हें **परंपरितरूपक** आहे.

एका समयीं देवी पतिसह गेली [1]अशोकवनिकेला ।
'क्रीडावें तेथ सुखें' संकल्प असा तिनें स्वमनिं केला. ॥ २७
शोभे सती [2]उपवनीं पतिसह, जशि [3]शंभुसह उमा [4]रमणी. ।
तों देखिले तिनें [5]सुरगर्भसमप्रभ तिथे [6]कुमार-मणी. ॥ २८
[7]देवी राजासि पुसे, '[8]सुरकलभांची हिरोनि गति [9]घेते, ।
कोणाचे शिशु, [10]जैसे देवांचे [12]चालते [11]नग तिथे ते ? ॥ २९
दिसति तुम्हांसम रूपें, [13]श्रीचे [14]संकेतकुंज ते ज्यांचे ।
[15]काय [16]रुचिर; काय [17]सुचिर झाले हे प्रकट [18]पुंज तेजांचे !' ॥ ३०
[19]पाचारुनि [20]त्यांसि म्हणे, 'कोणाचे बाळ हो ! तुम्ही ? [21]धाम ।
कोठें तुमचें ? सांगा. कुळ तुमचें कोण ? काय हो नाम ? ॥ ३१
[22]अंकीं तुम्हांसि घेउनि, आलिंगुनि, [23]हृष्ट कोण होतात ? ।
कोणासि माय म्हणतां ? तुमचा [24]कृतसुकृत कोण हो ! तात ?' ॥ ३२
[25]माता सांगुनि, [26]पुसतां ताते, ययातीस दाविती बोटें. ।
खोटें कर्म नृपाचें जाणुनि, [27]ती दुःख धरि मनीं मोटें. ॥ ३३

---

२२. सुहृत्+नयन+अब्जें=मित्रांचीं नेत्रकमलें. २३. ते सुतनु ( देखणे, सुंदर ) रवि [ होत ]–असा अन्वय. जणूं काय ते सूर्यच होते–असा भाव. **उत्प्रेक्षा**लंकार.

१. अशोकवृक्षांच्या बागेंत. २. बागेंत. ३. 'शंभुची' असें पाठान्तर. **उपमा**लंकार. ४. ह्या वनविहाराच्या वर्णनप्रसंगीं 'रमणी' ह्या शब्दाची योजना **पं**तांच्या मार्मिकतेची साक्ष पटविते. ५. देवांच्या बालकांसारखे तेजस्वी. गर्भ=अर्भक, बालक. ६. पुत्रश्रेष्ठ. हें यमक **पं**तांचें मोठें आवडतें आहे. ( हरिवंश, अध्याय ३५।६७; सौप्तिकपर्व, अध्याय २।२३; सभापर्व, अध्याय ४।५३; विराटपर्व, अध्याय ३।६३; आदिपर्व, अध्याय १३।६३ ). ७. राणी देवयानी. ( राजाबरोबर पट्टाभिषिक्त अशा राणीला देवी असें म्हणतात ). ८. देवांच्या हत्तींच्या छाव्यांची. ९. घेणारे. 'देवपुत्रांप्रमाणें शोभणारे हे बालक कोणाचे आहेत?' असें साधें वाक्य मूळांत आहे. (अध्याय ८३ श्लोक १३ ). १०. 'जंगम नव अमरांचे जसे नग तिथे ते' असा पाठभेद. ११. कल्पतरू. १२. हिंडते फिरते, सजीव. १३. लक्ष्मीचे. १४. संकेताचीं लतागृहें, विलासस्थानें. १५. देह. १६. सुंदर. १७. दीर्घकाल. **उत्प्रेक्षा**लंकार. १८. राशी. १९. बोलावून. २०. शर्मिष्ठेच्या पुत्रांस. २१. गृह. २२. मांडीवर. ह्या गीत्यर्धात सुरेख **पर्यायोक्ता**लंकार आहे. २३. आनंदयुक्त. २४. कृतपुण्य, पुण्यवान्. २५. आपली माता कोण हें सांगितल्यावर. २६. 'तुमचा पिता कोण ?' असें विचारिलें तेव्हां. २७. देवयानी.

[1]नेले शिशु जवळि परि, न त्यां तो [2]करुणासुधानदीपति घे. ।
ते त्या क्षणीं च [3]रुचले स्वकुळाचे त्या बुधा न दीप तिघे. ॥ ३४
उत्सुक झाले होते [4]अंकारोहार्थ पुत्र, [5]पर तो न ।
प्रभु घे, मग मातेप्रति गेले रोदन करीत परतोन. ॥ ३५
पतिकृतकपटें पावे, आणुनि नेत्रांसि [6]वारि, खेदासी. ।
[7]तीस म्हणे, 'कां? गे ! हे ऋषिसुत तरि नृपतिसारिखे? दासी ! ॥ ३६
त्वां हा भूप भुलविला, केला माझा [8]दहांत अपमान; ।
बटिक [9]लटिक तूं दुष्टे ! [10]वद, लंघ्य तुला मदीय तप, [11]मान?' ॥ ३७
[12]राजसुता हि म्हणे, 'तूं, कमळाला [13]मधुकरी जशी [14]तृषिता, ।
ज्या भाळलीस [15]ऋषिजा; त्या सत्पुरुषीं कशी नसे [16]ऋषिता? ॥ ३८
जो त्वत्पति, तो मत्पति, देवि ! पहा धर्म, मी तुझी [17]आली. ।
त्वां म्यां हि मनें वरितां, [18]ऋषिता पतिता प्रभूकडे आली ! ॥ ३९
तूं ज्येष्ठा विप्रसुता, राजसुता मी [19]सये ! कनिष्ठा हो ! ।
जैशी तुझी नृपपदीं, माझी हि तशी च एकनिष्ठा [20]हो. ॥ ४०
वदल्यें सत्य चि पूर्वीं, देवि ! [21]पहातां ऋषी च पति, [22]तत्वें; ।

---

१. 'न त्यांतें' असें पाठान्तर. २. दयारूप अमृताचा समुद्र ( ययाति ). ३. त्या क्षणीं च ( देवयानी रागावतांच ) त्या बुधा ( शहाण्या ययातीला ) ते तिघे स्वकुळाचे दीप न रुचले ( गोड वाटले नाहींत )–असा अन्वय. ४. मांडीवर बसण्याकरितां. ५. परंतु. 'पर' हा शब्द 'परंतु' ह्या शब्दाच्या ठिकाणीं सुशिक्षित लोकांच्या बोलण्यांत बहुधा येत नाहीं. अडाणी लोक मात्र ह्या शब्दाचा प्रयोग विशेष करितात. इतर मराठी कवींचे काव्यांतही हा शब्द आढळत नाहीं. तथापि तो पंतांच्या काव्यांत पुष्कळ ठिकाणीं आढळतो. ६. उदक, अश्रू. ७. शर्मिष्ठेला. ८. समाजांत, चारचौघांत. 'दहा' हा शब्द ह्या अर्थीं पंतांच्या काव्यांत पुष्कळ ठिकाणीं योजिलेला आढळतो. ९. लबाड. १०. बोल. ११. मदीय तप ( तपश्चर्या ) [ व ] मान ( योग्यता, मानमरातब ) तुला लंघ्य ( उल्लंघन करण्यास योग्य ) [ आहे, असें वाटतें काय ? ] वद–असा अन्वय. १२. वृषपर्व्याची कन्या शर्मिष्ठा. १३. भ्रमरी. १४. तृषेनें युक्त. १५. ऋषिकन्या. तूं ऋषिकन्या असूनही–असा भाव. १६. ऋषित्व. १७. सखी. १८. त्वां मनें वरितां ऋषिता [ आणि ] म्यां [ मनें वरितां ] हि प्रभूकडे पतिता ( धर्मच्युति ) आली [ हें आश्चर्य होय ]–असा अन्वय. १९. सखे ! शर्मिष्ठा राजकन्या असूनही किती लीनतेनें बोलत आहे बरें ! २०. होवो. ( राहो, असो–असा अर्थ ). २१. तत्वें पहातां ( खरोखर विचार केला तर ) पति ( आपला पति ) ऋषी च [ होय ]–असा अन्वय. २२. तत्वतः, खरोखर.

क्षोभों नको वृथा तूं, हा जन दूषूं नको चि पतितत्वें[2]. ॥ ४१
जी स[3]रहता, पद[4]नता, त्यजिल न [5]शशिवंशसदनदीप तितें; ।
भेटेल नदी जी जी, ती [6]अनुकंप्या चि [7]नद-नदीपतितें.' ॥ ४२
शुक्रसुता पतिसि म्हणे, 'हें विप्रिय[8] काय उचित [9]महिम्यातें ? ।
त्यजिलें आजि तुझें जें श्री[10]पद्म हि सद्म [10]शुचितम हि म्यां तें.' ॥ ४३
[11]आरोपूनि [11]स्वशिरीं, दासीसंगें करूनि वि[12]टलीला, ।
पंडितवर परि न शके समजावाया ययाति वि[13]टलीला. ॥ ४४
[14]गुण [15]वावडीस, सुदृढ प्रेमाचि स्त्रीस, आवरायाचा; ।
तो तुटतां यत्न नसे कांहीं; गेला चि [16]आव रायाचा. ॥ ४५
जाय पित्याच्या सदना, करुनि परित्याग बायको पतिचा. ।
पुत्रांतें हि न पाहे, सांगावा उग्र काय कोप तिचा ? ॥ ४६
नाहीं च [17]कांतवचना, हृदयांत धरूनि तें [18]असुख, [19]वळली., ।
वाटे नृपासि [20]धरितां, सोडील चि आपुले [21]असु, [22]खवळली. ॥ ४७
भूप म्हणे तीस, 'परिस माझें सुखसंपदे ! वि[23]नवणें, [24]हो ।
चित्त [25]सुवृत्त, न पावो [26]विश्लेषें कंप, [27]देवि ! निर्वणें हो ! ॥ ४८

---

१. ययाती राजा. २. पापीपणानें. ३. कामार्ता. ४. पायांशीं नम्र झालेली, शरण आलेली. येथें '**समुच्चया**'लंकार आहे. ५. चंद्रवंशरूप घरांतील दिवा ( ययाती ). **रूपकालंकार.** ६. दयार्हा, दया करण्यास योग्य. ७. समुद्राला. नद=मोठी नदी. ८. न आवडणारी गोष्ट. ९. ( आपल्या दोघांच्या ) मोठेपणाला. १०. अत्यंत शुद्ध असें लक्ष्मीचें [ निवासस्थान ] जें कमल, तसें ( अर्थात् शुचितम ) हें तुझें सद्म ( घर ) त्यजिलें–असा भाव. येथें शुचि शब्दावर **श्लेष** आहे. शुचि=( कमलपक्षीं ) शुद्ध, पंकरहित; ( देवयानीपक्षीं ) सदाचरणयुक्त. ११. आपल्या डोक्यावर बसवून, फाजील लाड करून. १२. जारलीला–**पंत.** १३. कंटाळली जी, तिला. १४. दोरी. १५. पतंगास. स्त्रीस आवरण्याचीं जीं अनेक साधनें आहेत, त्यांच्यामधील एकट्या सुदृढ प्रेमाची निवड करून संपत्त्यादि इतर साधनांचें त्याज्यत्व ह्या गीतींत दर्शविलें आहे, म्हणून येथें **परिसंख्या** नामक अलंकार झाला आहे. १६. धैर्य. १७. आपल्या पतीचें भाषण. 'कांतवदना' असें पाठान्तर. कांतवदना=जिचें मुख सुंदर आहे, अशी. १८. 'हृदयांत धरूनि ती असुख'–असा पाठभेद. १९. तिच्या मनाला अत्यंत दुःख होत असल्यामुळें ती ययातीच्या म्हणण्यास मान देऊन परत फिरली नाहीं–असा भाव. २०. देवयानीला धरिलें तर ती. २१. प्राण. २२. क्रोधयुक्त अशी. २३. विनवणी, ( ययाती करीत असलेली देवयानीची ) मनध-

[1]दावार्ता जेंवि मृगी [2]कासारीं, जाय ती स्व माहेरीं; ।
[3]पावे [3]नृप हि, [4]म्हणे तों, नमुनि गुरुसि, '[5]तापसोत्तमा! [6]हेरीं. ॥ ४९
[7]ताप दिला जेणें, तो हा कामी; तापसा! [8]हतांस दया ।
उठवि तुझी, किति [9]मारूं हाका? मी [10]ताप साहतां सदया!' ॥ ५०
'माझी दासी मजहुनि बहुमान्या, यासि बा! दया तीची; ।
तीन तिला सुत दिधले, दोघे मज, ती प्रिया ययातीची.' ॥ ५१
स्वतपाच्या तीव्रत्वें लाजविता योगिराज जो [11]पविला, ।
[12]तो [13]स्वातिक्रम कळवुनि, सुरयानीनें क्षणांत कोपविला. ॥ ५२
'[14]वृंदावनासि मानिति, अव्हेरिति मूर्ख मत्त [15]पनसा, [16]हे ।
ती च [17]गति; अतिक्रम [18]परंतप साहो, लव हि मत्तप न [19]साहे. ॥ ५३
जेणें अधर्म घडला, [20]नाशो बळवीर्य आजि राया! तें, ।
वपुला आतां चि [21]जरा ग्रासो; हा दंड [22]साजिरा यातें.' ॥ ५४
भूप म्हणे, 'शाप दिला उग्र [23]विपत्पातहेतु; म्हातारा ।
झालों पहा; अहा जी! जोडितसें हात हे तुम्हां, तारा. ॥ ५५

---

रणी. २४. होवो. २५. सुशील, सदाचारयुक्त. २६. वियोगें. २७. अहो! देवी! (अहो राणी-साहेब!) निवणें (आतां आपण निवावें, शांत व्हावें)–असा अर्थ.

१. वणव्यानें पीडित. २. सरोवरीं. ३. पाठोपाठ राजा (ययाती) देखील तेथें जाऊन पोहोंचला–असा अर्थ. ४. ह्याचा कर्ता देवयानी. 'म्हणे जों' असें पाठान्तर. ५. तपस्विश्रेष्ठा! ६. सूक्ष्म दृष्टीनें पाहा. ७. ह्या गीतींत **संदष्टक** नामक **यमका**लंकार आहे. ज्या पद्याचे द्वितीय आणि चतुर्थ पाद समवर्णात्मक असतात, तेथें संदष्टक यमक असतें. याचें लक्षण:– प्रत्येकं पश्चिमयोरावृत्त्या पादयोर्द्वितीयेन । यमके संजायेते गर्भः संदष्टकं चेति. ॥ (काव्यालंकार, अध्याय ३ श्लोक ७). अशा प्रकारच्या यमकाचीं उदाहरणें **पं**तांच्या काव्यांत अनेक आहेत. कामी=कामुक, कामाविष्ट. ८. मृतांस, मेलेल्यांस सुद्धां. येथें कचकथा अनुसंधेय आहे. (मागें अध्याय ९ व १० पहा). ९. हांका मारणें=चरफडणें, ओरडणें. **पं**तांनीं ह्या वाक्प्रचाराची येथें योजना करून देवयानीच्या मनस्तापाचें आधिक्य दर्शविलें आहे. १०. संताप, अपमानजन्य दुःख. ११. वज्राला. १२. शुक्राचार्य. **पर्यायोक्ता**लंकार. १३. आपला अपमान. अतिक्रम= उल्लंघन. १४. कडू वृंदावनफळास. हें शुक्राचार्यांचें भाषण आहे. १५. फणसास. १६. 'हो!' असें पाठान्तर. १७. दशा, प्रकार. १८. दुसऱ्याचें तप. १९. 'साहो' असें पाठान्तर. २०. नाश पावो. २१. वार्धक्य. २२. योग्य. साजिरा=साजेल असा. २३. विपत्तींत पडण्यास कारण.

ऋतुदान[1] धर्म कीं जी ! हा[2] यास्तव हाय ! काय शापावा ? ।
कन्येकडे तरि पहा, रक्षा मुनिनायका ! यशा, पावा. ॥ ५६
म्हणतां सत्य चि देवा ! जें, हें[3] न विचारिलें तुम्हां, चुकलों; ।
परि शापें तुमच्या प्रियदुहितेच्या[4] मी समागमा मुकलों. ॥ ५७
करुणा करा सुतेवरि, गुरुजि ! प्रभुजि ! स्वशाप हा फिरवा; ।
मिरवा प्रसाद लोकीं, जिरवा मनिं रोष, मज[5] इला निरवा. ॥ ५८
मी यौवनीं अतृप्त चि; हीच्या आतां चि भर विलासाचा; ।
शापमिषें[6] त्वां ताप चि आम्हां दोघांसि भरविला[7] साचा.' ॥ ५९
शुक्र म्हणे, 'नरनाथा ! नाहीं होणार शाप हा लटिका; ।
तेज पहा वचनाचें, ज्यासि फळाया न लागली घटिका. ॥ ६०
परि मद्वरें[8] तयाप्रति जाइल, देशील हे जरा ज्यातें; ।
येईल तुजप्रति, जें त्याचें तारुण्यतेज, राजा ! तें.' ॥ ६१
भूप म्हणे, 'दोघींला दिधले म्यां पांच तनय निजें[9] रेतें; ।
तो[10] राजा हो, देइल यौवन जो त्यांत, घेउनि जरेतें.' ॥ ६२
काव्य म्हणे, 'हें हि दिलें, जा; परि होवोनि वीर्यमत्त, नया[11] ।
न उलंघीं; धर्मातें रक्षीं; दुखवीं पुन्हां न मत्तनया[12].' ॥ ६३
गुरुची आज्ञा, कन्या घेउनि, जाउनि गृहासि, तो[13] जीन[14] ।
आणी मनीं असें की, 'यदुच्या देहीं जरेसि योजीन.' ॥ ६४
त्यासि म्हणे, 'स्वजरा[15] घे, यौवन दे, अयश न नुत[16] न यदो ! घे; ।

---

१. मूळ अध्याय ८३ श्लोक ३३ व ३४ पहा. २. ययाती. ३. देवयानीचें अतिक्रमण माझ्याकडून ज्या योगें झालें, तें कृत्य. ४. आवडत्या कन्येच्या. ५. इच्या हातीं मला द्या. ६. शापाच्या निमित्तानें. ७. चारला. ८. माझ्या वराच्या योगानें. येथें मूळांतील ८३ वा अध्याय संपतो. ९. आपल्या वीर्यानें. १०. त्यांत (त्या पांच पुत्रांत) जो जरेतें घेउनि यौवन देइल, तो राजा हो (होवो)–असा अन्वय. 'तो राजा होऊ, जो देइल यौवनहि, घेउनि जरेतें' असा पाठभेद. ११. नीतीला. १२. माझी कन्या. १३. ययाति. १४. वृद्ध. जीनो, जीर्णः– **पंत**. १५. माझें वार्धक्य. ययाति आपल्या मुलांजवळ त्यांचें तारुण्य कायमचेंच मागत नव्हता. हजार वर्षे पूर्ण झाल्यानंतर तो आपलें वार्धक्य परत घेऊन पुत्राचें तारुण्य त्यास परत देणार होता (मूळ अध्याय ८४ श्लोक ४,११,१८,३० इत्यादि पहा). पंतांनीं ह्या महत्वाच्या बाबीचा उल्लेख गाळला नसता, तर बरें झालें असतें. १६. नुत=स्तुत, ज्याची स्तुति केली आहे असें.

तो तें न करी; तुर्वसु ही; ते हि द्रुह्यु, अनु तनय दोघे[1]. ॥ ६५
पूरूनें[2] आज्ञेचा केला स्वीकार; ते जरा याला ।
स्पर्शे[3], काव्यवरबळें याचें तारुण्य-तेज रायाला. ॥ ६६
करितां आज्ञाभंग, क्षोभाचें पात्र जाहले चवघे; ।
पूरु प्रसाद गुरुचा पावे; सत्कीर्तिची सदा चव घे. ॥ ६७
पूरुप्रति भूप म्हणे, 'वत्सा ! मत्सार्वभौमपदवीतें[4] ।
तूं चि सुपात्र; मज तुझें साधुत्व तव स्तवासि[5] वदवीतें. ॥ ६८
[6] तूं धन्य, अन्य न असा, कैंची सर्वत्र साधु सुत-रीती ? ।
बापा ! प्रजा अशी, जी पितरांसि भवार्णवांत[7] सु-तरी[8], ती.' ॥ ६९
धर्मार्थकाम[9] सेवी पुत्रवयें[10] नृप सहस्र वत्सर[11] तो; ।
मग मनिं म्हणे, 'पुरे हें; या श्रीसंगीं[12] मदीय[13] वत्स[14] रतो. ॥ ७०
स्वल्प चि एका हि स्रक्चंदनवनितादि[15] सर्व विषय मही; ।
कळले मज हे भोगें[16] चि मारक, न व्याळ[17], शस्त्र, विष, यम ही. ॥ ७१
श्रीसेव्यां[18] ! सदलिमता[19] ! वस राज्यसरीं[20], न[21] मज्ज[21], राजीवा[22] ! ।
वत्सा ! बहु कष्टविलें त्वां, स्वीकारूनि मज्जरा[23], जीवां[24].' ॥ ७२

---

न नुत=न स्तुत्य, अर्थात् निंद्य. यदो ! न नुत ( निंद्य असें ) अयश ( अपकीर्ति ) न घे ( घेऊं नको )–असा अन्वयार्थ.

१. द्रुह्यु आणि अनु हे दोघे शर्मिष्ठेचे तनय हि तें ( जरेचा स्वीकार ) न करिती. २. 'पुरुनें आज्ञेचा त्या' असें पाठान्तर. ३. 'स्पर्शे' ह्या क्रियापदाचा देहलीदीपकन्यायानें उपयोग करावयाचा. ४. माझ्या सार्वभौम ऐश्वर्याला. ५. स्तुतीस. येथें मूळांतील ८४ वा अध्याय संपतो. ६. ही गीति पंतप्रतिभानिर्मित आहे. ७. संसारसागरांत. ८. उत्तम नौका. **रूपका**लंकार. ९. धर्म, अर्थ व काम. १०. पुत्राच्या वयामुळें, अर्थात् पुत्राकडून घेतलेल्या तारुण्यामुळें. ११. वर्षें. १२. राज्यश्रीच्या संगतींत, राज्यवैभवांत. 'या स्त्रीसंगीं' असा पाठ आहे. पण तो हस्तदोषमूलक असावा. १३. माझा. १४. पुत्र. १५. फुलांच्या माळा, चंदन, स्त्री आदिकरून. एका हि ( एका माणसाला देखील ) स्रक्चंदनवनितादि सर्व विषय ( शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध हे पांच विषय ) [ व ] मही ( पृथ्वी, अर्थात् पृथ्वीवरील सर्व वस्तुमात्र ) स्वल्प चि ( अत्यंत अल्प आहे ) [ असें वाटतें ]–असा अन्वय. मूळांत 'यत्पृथिव्यां व्रीहियवं हिरण्यं पशवः स्त्रियः । एकस्यापि न पर्याप्तं तस्मात्तृष्णां परित्यजेत्' असें आहे. ( अध्याय ८५।१३ ). १६. सौख्य, सुखदुःखादिकांचा जो अनुभव, तो. १७. सर्प. १८. लक्ष्मीनें सेवन करण्यास योग्य अशा. १९. साधुरूप भ्रमरांस मान्य अशा. २०. राज्यरूप सरोवरांत. **परंपरितरूपक.** २१. बुडों नको. २२. हे राजीवा ! ( कमळरूप वत्सा ! ). २३. मत्+जरा=माझें वार्धक्य. २४. आपल्या जीवाला ( प्राणांना ).

जाय नृप, श्रीकरवीं धरवुनियां पूरुहस्त, वनवासा[१]. ।
[२]न गमे प्रजांसि पति तो, [३]गुणजित-सुरभूरुह-स्तव, नवासा. ॥ ७३
जाउनि तपोवनातें, सेवी राजा महातपा [४]पवना; ।
जाळी [५]ज्ञानदवें तो [६]चित्तगजाचा [६]महात [७]पाप-वना. ॥ ७४
गेला स्वर्गासि अमित सुकृतें जोडोनि राय; तें [८]नाकीं ।
होय सुदुःसह [९]शंका, जैसें बाळासि रायतें [१०]नाकीं. ॥ ७५
एका समयीं सुरपति त्याचें चि महत्त्व तन्मुखें [११]वदवी; ।
[१२]ऋजुभावें नृप नेणे कीं, [१३]**आत्मस्तोत्र कुगतिची पदवी.** ॥ ७६
'स्वतपें तूं कवणाशीं तुल्य?' असें [१४]हरि पुसे **ययातीतें.** ।
त्यातें [१५]नाहुष राजा सत्य चि सांगे मनें [१६]भयातीतें. ॥ ७७
'देवेंद्रा! कोणी ही स्वतपें मत्तुल्य जन असेना कीं. ।
काय वदों? नर ते किति? न महर्षिजनीं [१७]असे, नसे नाकीं.' ॥ ७८
शक्र म्हणे, 'बहु [१८]भास्वर रविसम [१९]ज्यांचे तपोगुणें [२०]काय, ।
त्वत्तुल्य त्वदधिक ही आहेत तपोनिधी; [२१]उणें काय? ॥ ७९
हें काय उचित तुजला? साधु न कोणास ही अव्हेरीती. ।
अभिमानें स्वतपःक्षय केला कीं; हे बरी नव्हे रीती. ॥ ८०

---

१. राजानें वानप्रस्थाश्रमाचा स्वीकार केला–असा भाव. येथें मूळांतील अध्याय ८५ वा संपतो. २. नवासा न गमे=ययातीराजा जाऊन पूरु राज्याधिकारी झाला, तेव्हां कोणी नवीन राजा झाला, असें प्रजेस वाटलें नाहीं. ३. गुणांनीं जिंकिली आहे कल्पवृक्षाची स्तुति ज्यानें, असा. अर्थात् मोठा उदार, दानशूर. ४. वायूला. ५. तपोग्नीनें–**पंत.** ६. मनोरूपी हत्तीला वश करणारा महात. ७. पापरूपी अरण्यास. **परंपरितरूपक.** ८. स्वर्गामध्यें. येथें मूळांतील ८७ वा अध्याय संपतो. ९. 'दैवा' असें पाठान्तर. १०. नाकांत. येथील रायत्याचा दृष्टांत कोणास ग्राम्य वाटण्याचा संभव आहे. कल्पनासादृश्यः–ऐसें द्रोणाला बहु वदला जें काय राय, तें नाकीं. । नहुषचरितसें दुःसह झालें; कीं जेंवि रायतें नाकीं. ॥ (**पं**तकृत द्रोणपर्व, अध्याय २०।८५), ११. बोलवी. १२. सरळ भावानें, भोळेपणानें. १३. स्वतःची स्तुति, बढाई. (मागें अध्याय १० गीति ५ व तीवरील टीपा पहा). 'इन्द्रोऽपि लघुतां याति स्वयं प्रख्यापितैर्गुणैः' हें वचन प्रसिद्धच आहे. १४. इंद्र. १५. नहुषाचा पुत्र ययातिराजा. १६. निर्भय अशा. १७. 'असा' असें पाठान्तर. १८. कांतिमान. १९. 'ज्याचे' असा पाठ रा० **प**राडकर यांच्या प्रतींत आहे. २०. देह. २१. त्यांच्यामध्यें उणें (कमीपणा, न्यून) काय आहे?–असा अर्थ. 'उणे काय' असा पाठ आहे, त्याचा स्वीकार केल्यास 'ते तुझ्यापेक्षां कोणत्या बाबतींत उणे (कमी, हीन) आहेत?'–असा अर्थ.

झाला सर्व तपःक्षय, पांव[1] प्रक्षीणपुण्य[2] तूं पतन. ।
बहु[3] तप करिता तापस धन्य नव्हे; धन्य करिल जो जतन.' ॥ ८१
नाहुष म्हणे स्वपतनावसरीं[4] प्रार्थूनि नाकपाळाला,[5] ।
'हा जन संतांत पडो, जरि आलें पतन या कपाळाला.' ॥ ८२
इंद्र म्हणे, 'तुज राया ! संतांत घडेल पात[6]; कमळाला ।
रविसे ते[7] हर्ष तुला देतील, हरूनि पातकमळाला.' ॥ ८३
पडतां, स्वर्गासि पुन्हां गेले घेऊनि संत राजाला. ।
नृप अष्टक, प्रतर्दन, वसुमन, शिबि नामक,[8] स्वं[9] आजाला. ॥ ८४
तरला ययातिराजा, दर्शन होतां चि संत-रायांचें; ।
सद्दर्शन[10] चि सुदर्शन करि गट चट कटक अंतरायांचें.[11] ॥ ८५
जे दुरिततृणचया[12] दव[13] यादव यदुचे[14]; हरी[15] अरिगजांचे.[16] ।
त्या पूरुचे हि पौरव; पौर[17] वदति नाकगोष्टि[18] हि न ज्यांचे.[19] ॥ ८६

---

## अध्याय[20] बारावा.

श्रीमद्ययातिनंदनपूरुकुळीं भूप जन्मले शतशा[21]; ।
श्रवणें तत्कीर्ति[22] हरिति ताप[23] सुधांच्या[24] नद्या न लेश तशा. ॥ १

---

१. 'पावें' पाठान्तर. २. नष्ट झालें आहे पुण्य ज्याचें असा. ह्यासंबंधानें पुढील **भ**गवद्गीता वचन पहाः–ते तं भुक्त्वा स्वर्गलोकं विशालं । क्षीणे पुण्ये मर्त्यलोकं विशन्ति. ( अध्याय ९।२१ ) म्हणजे–ते त्या विशाल स्वर्गलोकाचा उपभोग घेऊन पुण्य संपलें म्हणजे पुन्हां मृत्युलोकीं प्रवेश करितात. ३. हें गीत्यर्ध सुभाषितरूप आहे. ४. आपल्या पडण्याच्या वेळीं. ५. देवेंद्राला. ६. पतन, पडणें. ७. संत. ८. 'नायक' असें पाठान्तर. ९. ययातीची कन्या जी माधवी, तिचे हे अष्टकादि चार पुत्र होते. म्हणून ययाती त्यांचा आजा. १०. सद्दर्शन ( साधुजनाचें दर्शन ) [ हें ] सुदर्शन चि ( सुदर्शन चक्रच ) [ होय ] [ तें ] अंतरायांचें ( विघ्नांचें ) कटक ( सैन्य, समुदाय ) चट ( चटसारें, चटकन ) गट करी ( गट्ट करितें, नाश करितें )–असा अन्वय. हें गीत्यर्ध सुभाषितरूप आहे. ११. विघ्नांचें-**पंत**. १२. पातकरूपी गवताच्या समूहाला. 'जें दुरिततृण तया' असें पाठान्तर. १३. अग्नि. १४. जे यदुचे यादव [ ते ] दुरिततृणचया दव [ होत; व ते ] अरिगजांचे हरी [ होत ]–असा अन्वय. १५. सिंह. १६. शत्रुरूपी हत्तीचें. १७. पुरवासी जन. येथें मूळांतील अध्याय ९३ वा संपतो. १८. **स्वर्गास जाण्याची गोष्ट.** पौरवपुरं स्वर्गाधिकं.–**पंत**. पौरवांच्या नगरींत राहाणें स्वर्गांत राहण्यापेक्षांही त्यांस ज्यास्त आनंददायक वाटत असे–असा भाव. १९. पौरवांचे, पूरुवंशीय राजांचे. २०. **ह्या अध्यायांत**

त्या पौरवांत[1] झाला राजा दुष्यंत धर्मपर[2], महित[3]. ।
स्वगुणें करि प्रजांचें अनुदिन[4] तो मूर्तधर्म[5] परम हित. ॥ २
तो एकदा वनाला जाय, कराया यथेष्ट मृगयेतें[6]; ।
बलकोलाहल[7] परिसुनि, 'कुलनाशव्यसन[8]' म्हणति मृग 'येतें[9].' ॥ ३
वधिले व्याघ्र, वृकें[10], खळ[11] श्वापद; धरिले प्रमत्त गज रानीं; ।
चिरिले किरि[12], लेश हि धृति[13] मृगयूथीं[14] नुरविली च गजरांनीं[15].' ॥ ४

---

पंतांनीं मूळांतील अध्याय ६८-७४ ह्या अध्यायांचा म्हणजे ३२९ श्लोकांचा सारांश ग्रथित केला आहे. हाच कथाभाग मुक्तेश्वरांनीं आपल्या आदिपर्वाचे अध्याय १५ व १६ यांमध्यें म्हणजे ४०५ ओंव्यांत वर्णिला आहे. २१. शतशः, शेंकडों. २२. त्याच्या कीर्ति. ययातीच्या अंगीं अनेक सद्गुण होते. त्या प्रत्येक सद्गुणामुळें त्याची कीर्ति होत असे, म्हणून कीर्तीचें विविधत्व दर्शविण्याकरितां पंतांनीं येथें अनेकवचनी प्रयोग केला असावा. 'सत्कीर्ति' असें पाठान्तर. २३. दुःखें. [ जशा ] तत्कीर्ति ( त्या राजांच्या कीर्ति ) श्रवणें ( श्रवण केल्या असतां ) ताप हरिति, तशा सुधांच्या ( अमृतांच्या ) नद्या लेश ( अल्प, थोडासा देखील ) [ ताप ] न [ हरिती ]–असा अन्वय. २४. अमृतांच्या. अमृताचे पांच प्रकार आहेतः–स्वादामृत, उन्मादामृत, । सुप्तयमृत, तृप्त्यमृत । ये अमृतें प्रलोभार्थ । परमामृत पांचवें. ॥ १ ॥ स्वादामृत अप्सरांसी । तेणें त्या स्वादिष्ट सर्वांसी । तृप्तिअमृत देवांसी । क्षुधा त्यांसी बाधीना. ॥ २ ॥ उन्मादामृत दैत्यांसी । तेणें ते उन्मत्त अहर्निशीं । सुप्त्यमृत तें दिग्गजांसी । तेणें सुखेंसीं डुल्लत. ॥ ३ ॥ डुलक्या येती निद्रितासी । तेवीं डुल्लणें दिग्गजांसी । ये, तंव अमृतें वायसी । देवें सर्वांसी चाळविलें. ॥ ४ ॥ समुद्र मथिला समस्तीं । जाली अमृताची प्राप्ती । कलहो करितां देवदैत्यीं । मोहिनीहातीं दीधलें. ॥ ५ ॥ मोहिनीरूपें श्रीविष्णु जाण । तेणें अमृत विभागून । इतरां अमृत वाढोन । राखिलें आपण परमामृत. ॥ ६ ॥ जेणें चुके जरामरण । तें परमामृत विष्णु–आधीन. । ......( भावार्थरामायण–अरण्यकांड, अध्याय ६ ओंव्या १११–११७ ). पंतांनीं 'सुधांच्या' असा अनेकवचनी प्रयोग कां केला, हें नीटसें कळत नाहीं. ह्या टीपेंत दर्शविलेल्या अमृताच्या पांच प्रकारांस उद्देशून पंतांनीं असा प्रयोग केला असेल, असेंही वाटत नाहीं.

१. पूरूपासून दुष्यंत अठरावा वंशज होय. मूळांतील ६८ व्या अध्यायाच्या चौदा श्लोकांत दुष्यंताचें वर्णन आहे. त्याचा संक्षेप पंतांनीं एका गीतींत केला आहे. पुढील श्लोक महत्त्वाचा आहेः–बले विष्णुसमश्चासीत्तेजसा भास्करोपमः । अक्षोभ्यत्वेऽर्णवसमः सहिष्णुत्वे धरासमः ॥ अध्याय ६८।१३ ). २. धार्मिक. ३. पूज्य. ४. प्रतिदिनीं, दररोज. ५. मूर्तिमान धर्मच. ६. मृगया=शिकार, पारध. ७. सैन्याचा कलकलाट. ८. ( आपल्या ) कुळाचा नाश करणारें संकट. ९. येत आहे, आलेंच. १०. लांडगे. ११. क्रूर पशु. 'खगश्वापद' असें पाठान्तर. १२. डुकर. १३. धैर्य. १४. हरणांच्या कळपामध्यें. १५. कलकलाटामुळें ( सैन्याच्या आरोळ्यांनीं ).

एका हरिणामागें [1]एकाकी भूप [2]धांवला, श्रमला; ।
जातां दूर श्रीमत्कण्वाश्रम रम्य पाहतां रमला. ॥ ५
तें [3]सत्यलोकतुल्य चि आ[4]श्रमपद, ज्यांत [5]अण्वघ न साच. ।
तेथील तापस [6]शिखीचातकसे, त्यांत कण्व [7]घनसा च. ॥ ६
श्री[8]मालिनीतटीं तो त्या शुद्धाश्रमपदांत शिरला, हो ! ।
चित्तांत म्हणे, का[9]श्यपपदपद्मरजःप्रसाद शिर लाहो.' ॥ ७
[10]मुनि आश्रमांत नव्हता, त्याची कन्या शकुंतला होती. ।
पूजी [11]नरदेवातें, करि तेव्हां [12]स्ववपु दीपकज्योती. ॥ ८
अवलोकितां चि, आधीं भुलला लावण्यकल्पलतिके[13]ला. ।
त्यांत तिनें उचितादर [14]सस्मितमधुरोदितें हि अति के[15]लें. ॥ ९

---

१. एकटा. येथें मूळांतील ७० व्या अध्यायास आरंभ होतो. २. 'धांवतां श्रमला' असें पाठान्तर. ३. ब्रह्मलोकासारखें. ४. पद=स्थान, ठिकाण. कविकुलगुरु कालिदास 'शान्तमिदमाश्रमपदं' असें ह्या आश्रमाचें वर्णन करितात. (अभिज्ञानशाकुंतल नाटक). ५. अणु+अघ= लवमात्र पातक, लेशभर देखील पाप. ६. मोर आणि चातकपक्षी यांसारखे. ७. मेघासारखा. ह्या गीतीच्या पूर्वार्धांत **पूर्णोपमा** आहे. "कारण 'सत्यलोक'–उपमान, 'तुल्य'–उपमावाचक शब्द, 'आश्रमपद'–उपमेय, 'ज्यांत अण्वघ न साच'–हा वाक्यरूपी साधारण धर्म." उत्तरार्धांत **लुप्तोपमा** आहे. "कारण उपमेय, उपमान व उपमावाचक शब्द हजर असून साधारणधर्म अध्याहृत आहे. 'कण्व' मेघासारखा, कारण (विद्यादान करणारा); 'तापस' मोरांसारखे किंवा चातकांसारखे, कारण (विद्येची वृष्टि होतांच आनंदानें नाचणारे किंवा विद्या घेण्यासाठीं आ करून बसलेले). यांत 'नीरस स्वभावोक्ति' अलंकार्य समजावी. दुसऱ्या अर्धांत 'कण्व' हा 'ब्रह्मदेवासारखा' असा **'उपमाध्वनि'** आहे. कारण पहिल्या अर्धांत 'सत्यलोका'चा उल्लेख उघड झालेला आहे." (अलंकारमीमांसा). ८. नदीविशेष, तिच्या तीरीं. ९. कण्वऋषीच्या चरणधूलीचा प्रसाद. १०. काश्यप. येथें मूळांतील ७१ वा अध्याय सुरू होतो. ११. दुष्यंतराजाला. १२. आपला देह. शकुंतलेनें आपला देह दुष्यंतराजावरून ओंवाळून टाकिला–असा भाव. १३. सौंदर्याची जणूं काय कल्पवल्लीच अशा शकुंतलेला. १४. हास्ययुक्त मधुर भाषणानें. १५. ह्या गीतींत **'समाधि'** नामक अलंकार आहे. एकादें आरंभिलेलें कार्य दुसऱ्याच आकस्मिक कारणामुळें अधिक सुकर होतें असें जेथें वर्णन असतें, तेथें हा अलंकार होतो. येथें शकुंतलेस पाहून पहिल्यानें तिच्या लावण्यासच दुष्यंत भुलला होता; इतक्यांत हांसून व गोड बोलून तिनें त्याचा आदरसत्कारही केला. तेव्हां अर्थातच त्याच्या मनावर पहिल्यानें जो ग्रह झाला होता, त्यास पुष्टीच मिळाली–असें वर्णन असल्यामुळें हा **समाधि** अलंकार समजावा. ह्या गीतींत **'समुच्चया'**लंकार आहे, असेंही म्हणतां येईल. "दुसऱ्याला मोहित करावयाला शकुंतलेचें

चित्तीं म्हणे नृपति, 'हे जातीची[1] सस्मिता[2] सु-कलिका[3]; मीं ।
होईन काय, चुंबुनि ईतें, सफलेच्छ, तृप्त, अलि[4] कामीं ?' ॥ १०
मग तीस पुसे, 'सुंदरि ! चतुरे ! तूं कोण ? सत्य सांग मला. ।
तुज या वयांत हित हा उग्र तपोनियमताप[5] कां गमला ? ॥ ११
'कण्वसुता मीं' म्हणसी, परि न गमे सत्य, सत्य वद नातें; ।
दे मत्कर्णतृषाहरवृत्तसुधाचषकता[6] स्ववदनातें. ॥ १२
त्वत्तात[7] ऊर्ध्वरेता[8] कण्व कसा ? तूं सुता कशी ? बोल. ।
मीं पौरव[9] दुष्यंत त्वद्वृत्ताकर्णनीं[10] असें लोल[11].' ॥ १३
ती त्यासि म्हणे, 'पूर्वीं एके मुनिनें विचारिलें होतें; ।
जें त्यातें मत्तातें[12] कथिलें मज्जन्म[13], सांगत्यें हो ! तें:-॥ १४
"विश्वामित्र तप करी, केलें कोणीं हि तेंवि तप नाहीं. ।
तापे[14] मुनितेजें जग, जैसें कल्पांतकाळतपनांहीं[15]. ॥ १५
उग्रतपःसामर्थ्यें विश्वामित्र प्रभु स्वपद हरितो, ।
ऐसें शंकोनि, म्हणे, धरुनि करें मेनकाकरा[16], हरि[17] तो. ॥ १६

---

सौंदर्य हें एक कारण असतां तिनें त्याचा केलेला आदरसत्कार, आणि तिचें मंदस्मितयुक्त भाषण, ह्या दोन कारणांची जोड मिळाली, असें वर्णन आहे, म्हणून हा '**समुच्चय**' अलंकार झाला." ( भिडेकृत अर्थालंकारांचें निरूपण ).

१. जाईची. २. किंचित विकसित ( विकासलेली ). 'सस्मिताहि कलिका; मीं' असें पाठान्तर. ३. उत्तम कळी. 'कलिका' हें पद नवयौवनायुवतिसूचक आहे. ४. भ्रमर. मीं अलि ईतें चुंबुनि कामीं सफलेच्छ [ व ] तृप्त होईन काय ?–असा अन्वय. ५. तपश्चर्या व धर्माचरण ( व्रतें, उपोषणें वगैरे ) यांच्यामुळें होणारें दुःख. ६. मत्+कर्ण+तृषा+हर+वृत्त+सुधा+चषक+ता= माझ्या कर्णांची तृषा हरण करणारें [ तुझें ] वृत्त हेंच अमृत पिण्याचें पात्र, त्याचा भाव=पात्रता, पात्रपणा. तुझ्या तोंडून तुझें वृत्त माझ्या कानीं पडो–असा मथितार्थ. ७. त्वत्+तात=तुझा जनक. 'त्वत्तात ऊर्ध्वरेता कण्व, तयाची सुता कशी ? बोल' असें पाठान्तर. ८. योगी. ब्रह्मचारी. ९. 'हा पौरव' असें पाठान्तर. १०. तुझ्यासंबंधीं वर्तमान ऐकण्याविषयीं. ११. उत्सुक, साभिलाष. १२. माझ्या बापानें, कण्वानें. १३. माझ्या जन्माविषयींची हकीकत. १४. पीडित झालें, त्रस्त झालें. जगाला भीतिग्रस्त होण्याचें कारण विश्वामित्र 'स्वपदहर गमे सकळां' ( गीति १८ ) हें होय; किंवा—हे ऋषी कधीं कोणावर संतापतील व त्यास भस्म करितील, कोण जाणे ! असें लोकांस वाटून ते भिऊं लागले–असा भाव. १५. प्रलयकालच्या सूर्यांनीं. १६. मेनकेच्या हातास. १७. इंद्र.

'स्वश्रीभोग[1] बहुत जरि केला, परि तो गमे न केला हो; ।
म्हणुनि ई[2]चा हा[3], कौशिक[4]मुनि हि तुझा भोग मेनके! लाहो. ॥ १७
स्वपदहर[5] गमे सकळां, मजला चि प्रिय[6]तमे! न केवळ तो; ।
न वळेल उपायशतें, तुज चि मुनी नियत[7] मेनके! वळतो. ॥ १८
तूं पात्र, गाधिजाला[8] सदुपायन[9] करुनि देह, नुतितें[10] हो[11].' ।
हरि[12] वारंवार असें, स्वकरें चि धरुनि, वदे, हनु[13], तितें हो! ॥ १९
'भ्रूधनु[14] ओढुनि कज्जलविषदिग्ध[15] कटाक्षशर वरारोहे[16]! ।
सोडुनि, लुटीं तपोधन, सौभाग्यश्री तुझी भरारो[17] हे.' ॥ २०
ती अप्सरा म्हणे 'तो भस्म करिल मज महातपा शापें. ।
जाइल कवण यमाच्या, जोडुनि बळें चि हात, पाशापें[18]? ॥ २१
मी अबला भीरु[19] कशी साहों[20] त्या गाधितनयतेजातें? ।
भ्यालासि असा, दुःसह मानुनियां तूं हि सुरपते[21]! ज्यातें. ॥ २२
गाताति कीर्ति ज्याची मुनिसुतहनन[22]त्रिशंकुरक्षणजा. ।
ब्रह्मसखित्व[23] चि दे नवसृष्टीचा दिव्य अंकुर क्षण[24] ज्यों[25]. ॥ २३

---

१. आपल्या पदाचा अर्थात् इंद्रपदाचा भोग. 'स्वःश्रीभोग' असें पाठान्तर. स्वःश्रीभोग= स्वर्गांतील ऐश्वर्याचा भोग. २. स्वश्रीचा. ३. मी ( इंद्र ). ४. कुशिकपुत्र विश्वामित्र. ५. आपल्या पदाचें हरण करणारा. ६. हे प्रिय मेनके! ७. खास, निःसंशय. ८. विश्वामित्राला. ९. उत्तम नजराणा. येथें '**परिणामा**'लंकार आहे. १०. स्तुतीतें. ११. होईं. तूं नुतितें पात्र हो–असा अन्वय. १२. इंद्र. १३. हनुवटी. १४. भृकुटीरूप धनुष्य. १५. कज्जलरूप विषानें लिप्त. ह्या गीतींत "शृङ्गाररस 'अलंकार्य' आणि '**रूपक**' अलंकार आहे." ( अलंकारमीमांसा ). १६. हे सुंदरि मेनके! १७. वृद्धि पावो. १८. पाशाजवळ. १९. भित्री. २०. सहन करूं. 'अग्नि हें ज्याचें मुख, तेजस्वी चंद्रसूर्य हे ज्याच्या डोळ्यांतील तारका, काल ही ज्याची जिव्हा, अशा त्या विश्वामित्राला, देवेंद्रा! माझ्यासारखी स्त्री कसा बरें स्पर्श करील?'–असें मूळांत आहे ( अध्याय ७१।३८ ). २१. देवाधिदेवा (इंद्रा). ह्या गीतींतील 'अबला', 'भीरु' व 'सुरपते' हीं विशेषणें साभिप्राय असल्यामुळें येथें **परिकरा**लंकार आहे. २२. वशिष्ठमुनीच्या पुत्रांचा वध व त्रिशंकुराजाचें रक्षण ह्या कृत्यांमुळें उत्पन्न झालेली कीर्ति. वशिष्ठाचे शंभर पुत्र विश्वामित्रानें मारिले होते व त्यानें त्रिशंकुराजास सदेह स्वर्गास पाठविण्याचा प्रयत्न केला होता. ह्या कथा येथें अनुसंधेय आहेत. २३. ब्रह्मदेवाचें मित्रत्व, ब्रह्मदेवाची बरोबरी. 'ब्रह्मसखत्वचि दे' असें पाठान्तर. ब्रह्मदेव हा सृष्टिनिर्माता होय, पण विश्वामित्रानें नवी सृष्टि रचावयाचा प्रयत्न केला होता, म्हणून त्याला ब्रह्मदेवाची योग्यता क्षणभर प्राप्त झाली होती–असा भाव. २४. क्षणभर. २५. विश्वामित्रास.

जें दुष्कर [1]पुरुषवरा तुज हि , कसें करिल काज [2]रामा तें ? ।
[3]सदमृततरु तो मुनि, परि कपटें होईल [4]काजरा मातें. ॥ २४
करिल कसें मांजर, जें दुष्कर [5]हरिहननकाज वाघांस ? ।
न शकति अग्नि, [6]विधु; कसा [7]दिनमणिचा करिल काजवा घांस ? ॥ २५
त्या मुनितें मोहाया [8]ही जन काय [9]प्रभु ? प्रभो ! परि तें ।
तेज पहाया जात्यें; **[10]परिजनगत [11]नाथतेज जय करितें.** ॥ २६
जात्यें; तव आज्ञेचा कोण [12]सुधी जन करील [13]अवमान ? ।
परि मन्निकट असावे मज साह्य [14]वसंतकामपवमान.' ॥ २७
शक्र म्हणे, 'सर्व हि सुर आहों तुजला सहाय; कार्य करीं.' ।
आज्ञा [15]दे; मग गेली आणाया [16]तूर्ण तो हि [17]आर्य [18]करीं. ॥ २८
जेथें करीत होता दारुण तप तो [19]तपोनदीन मुनी, ।
तेथें जाउनि, खेळे [20]तन्निकट, प्रथम तत्पदीं नमुनी. ॥ २९
होती करीत [21]कंदुककेलि, मधुर गान, मोहिनी, तीतें ।
स्पर्शे प्रथम [22]वसनहर पवन, मग त्यजुनि [23]तो हि नीतीतें. ॥ ३०
सुरतरसांत बुडाला, जाणों स्त्रीरत्न [24]शीत-नव-सर, तो ।
तप्त [25]मतंगज रतला; शक्र म्हणे, बहु करोनि नवस, 'रतो.' ॥ ३१

---

१. तुज पुरुपवरा हि ( तुझ्यासारख्या पुरुषश्रेष्ठाला देखील ) जें दुष्कर, तें काज ( कार्य ) रामा ( स्त्री, अर्थात् अबला ) कसें करिल ?—असा अन्वय. येथील 'पुरुपवर' व 'रामा' हीं पदें साभिप्राय असल्यामुळें येथें **परिकरा**लंकार झाला आहे. २. स्त्री. ३. सत्+अमृत+तरु=उत्तम अमृतवृक्ष. ४. काजरा ( कुचला ) या नांवाचा विषवृक्ष. ५. सिंह मारण्याचें काम. ६. चंद्र. ७. सूर्याचा. ८. ही मी ( मेनका ). ९. समर्थ. १०. सेवकजनांच्या ठिकाणीं असलेलें. ११. स्वामीच्या आंगचा पराक्रम. १२. सुज्ञ, शहाणा. १३. 'अपमान' असें पाठान्तर. १४. वसंतऋतु, मदन व वायु. येथें मूळांतील ७१ वा अध्याय संपतो. १५. दिली. इंद्रानें तिला विश्वामित्राचा तपोभंग करावयास जाण्याची आज्ञा दिली—असा भाव. १६. सत्वर. १७. श्रेष्ठ, अर्थात् विश्वामित्र. १८. हातांत. करीं आणाया=हस्तगत करावयास, ताब्यांत ठेवण्यास. १९. तपाचा सागर. [ नदीन= ] सागर—**पंत.** नदी+इन=नदीचा स्वामी. २०. त्याचे ( विश्वामित्राचे ) शेजारीं. २१. चेंडूचा खेळ. २२. वस्त्र हरण करणारा. २३. विश्वामित्र देखील. येथें **पर्याया**लंकार आहे. २४. ज्याचें पाणी थंड व नूतन आहे, असें सरोवर. येथें **उत्प्रेक्षा**लंकार आहे. **नूतन**= ताजें, स्वच्छ. २५. हत्ती.

झाली गाधिजसंगें हे कन्या; मालिनीतटीं ठेवी; ।
स्वर्गासि जाय तेथुनि, बहु निष्ठुर चित्त करुनि, ती देवी[1]. ॥ ३२
संरक्षिली वनीं, मधु पाजुनि मातेविना, शकुंतांनीं[2]. ।
असतां विधिकवच[3], नव्हे काळाच्या ही विनाश कुंतांनीं[4]. ॥ ३३
स्नानार्थ मालिनीतें गेलों, तों कळविलें इच्या रुदितें[5]; ।
आणुनि उटजीं[6], केलें म्यां[7] पालन, लालन, स्वयें[7] मुदितें[7]. ॥ ३४
झाले शकुंत पाळक, म्हणवूनि[8] 'शकुंतला[9]' असें नाम ।
ठेवुनि, वागविलें[10] हें रत्न गळां जेविं मालतीदाम[11].' ॥ ३५
ऐशी तातमुखश्रुत[12] निजजन्मकथा शकुंतला कळवी; ।
पळ, विस्मित[13] करुनि, नृपतिमनिंची स्वालभ्यता[14]-व्यथा पळवी. ॥ ३६
नृपति म्हणे, 'तरि सुंदरि ! सुदति[15] ! मुदतिशय[16] तुला, मला हि घडो. ।
सत्कृतिशीं[17] रसिकाची; माझी तुजशीं तशी च गांठि पडो. ॥ ३७
कुलशीलगुणांहीं तूं योग्या, नृपकन्यका[18], महोदारा[19], ।
घे राज्य सर्व, नाहीं त्वदधिक[20] मज अन्य काम[21], हो दारा[22].' ॥ ३८

---

१. देवस्त्री ( मेनका ). २. पांखरांनीं. ३. दैवरूप कवच, अर्थात् सुदैव. कवच=चिलखत. ४. भाल्यांनीं. "हा **अर्थान्तरन्यास** [ फारच ] सुरेख आहे; इतकेंच कीं दुसऱ्याही अलंकाराची म्हणजे **समासोक्ती**ची छटा याच्यामध्यें भासत आहे." ( अलंकारमीमांसा ). ५. रडण्यानें. ६. पर्णशालेंत. ७. आनंदित असा जो मी ( कण्व ), त्यानें. ८. 'झाले शकुंत पाळक, म्हणुनि असे मज शकुंतला नाम' असा पाठभेद. ९. मूळ अध्याय ७२।१६ पहा. १०. अगदीं फुलासारखें वागविलें—असा भाव. ११. जाईच्या फुलांचा हार. १२. पित्याच्या तोंडून ऐकिलेली. येथें मूळांतील ७२ वा अध्याय संपतो. 'तातमुखें श्रुत' असें पाठान्तर. शकुंतला विश्वामित्राला आपला पिता असें समजते, तें योग्यच आहे, कारण 'शरीरकृत्प्राणदाता यस्य चान्नानि भुञ्जते । क्रमेणैते त्रयोऽप्युक्ताः पितरो धर्मशासने.' ॥ म्हणजे, शरीर उत्पन्न करणारा, प्राणदान देणारा व अन्नदाता—असे हे क्रमानें तीन्ही पिते धर्मशास्त्रानें सांगितले आहेत. ( मूळ अध्याय ७२।१५ ). १३. चकित. 'पळवी, स्मित करुनि' असें पाठान्तर. स्मित=किंचित् गालांतल्या गालांत हंसणें. १४. स्व+अलभ्यता=आपल्या प्राप्तीची अशक्यता—हीच व्यथा; किंवा, सु+अलभ्यता=( आपल्या ) प्राप्तीची अत्यन्त अशक्यतारूप व्यथा ( दुःख ). १५. उत्तम आहेत दांत जिचे, अशी. १६. आनंदाचा अतिशय. १७. उत्तम कवितेशीं. १८. विश्वामित्र हा गाधिराजाचा पुत्र. तेव्हां शकुंतला ही राजकन्या होय, हें उघडच आहे. १९. मोठी उदार. उदार=सरळ मनाची, सभ्य, सज्जन. २०. तुझ्याहून अधिक. २१. इच्छा. २२. स्त्री, पत्नी.

हांसोनि[1] ती म्हणे, 'हो ! प्रार्थावें प्रणतपारिजातातें[2]; ।
देवा स्वयें वहावें या निजकारुण्यवारिजा[3] तातें. ॥ ३९
मजकरवीं न तुम्ही बुध[4] गुरुमर्यादातिपात[5] करवा हो ! ।
सत्पात्रीं स्वधनातें चिंतामणि[6] कण्वतातकर वाहो[7].' ॥ ४०
भूप म्हणे, 'गांधर्वें[8] तुजशीं होईन शीघ्र अन्वित[9] मीं. ।
नाहीं तरि अदयस्मरशरहत[10] झालों, बुडेन तन्वि[11] ! तमीं[12]. ॥ ४१
अन्या[13], धन्या, कन्या, अन्यायन्याय जाणत्या, मागें ।
गांधर्वें चि वरांतें भजल्या; तद्गुरु[14] हि न भरले रागें. ॥ ४२
गुरुदेवताप्रसादा हो भाजन[15], आपुल्या चि देहातें, ।
सत्कीर्ति जगीं व्हाया, सत्पात्रीं आपुल्या चि दे हातें.' ॥ ४३
'सुत युवराज असो,' हा वरुनि वर निका[16], शकुंतला आली[17] ।
झाली; करा[18] तयाच्या मधुपवरनिकाशकुंतला[19] आली. ॥ ४४
तेव्हां तद्दैव म्हणे, 'योग्य तुला न नर अन्य केलीलें[20]; ।
श्री विष्णुशीं तशी तूं याशीं[21] करिं कण्वकन्यके ! लीला.' ॥ ४५
लब्धमनोरथ[22] राजा दुष्यंत म्हणे, 'प्रियंवदे ! विरहा ।
मी ही भ्याड चि, सेना पाठवितों तों अशी[23] च देवि ! रहा. ॥ ४६

---

१. 'हांसुनि तीहि म्हणे' असें पाठान्तर. २. शरण आलेल्यांस पारिजातवृक्षाप्रमाणें असलेल्या ( म्हणजे त्यांची इच्छा पूर्ण करणाऱ्या ) कण्वमुनीतें. पारिजात=कल्पवृक्ष. ३. आपल्या दयारूप जलामध्यें उत्पन्न झालेल्या या कमळाला ( म्हणजे–मला ). येथें 'शकुंतला' ही 'कमळ' व हें 'कमळ' वाढलेलें कारुण्यरूपी 'पाण्यांत'. हें 'एकदेशविवर्ती **रूपक**'. हें 'पाणी' भरलेलें कण्वरूपी 'तडागांत', म्हणून '**रूपकध्वनि**'ही झाला.' ( अलंकारमीमांसा ). ४. ज्ञाते, सुज्ञ. ५. वडिलांच्या मर्यादेचें उल्लंघन. ६. चिंतिलेलें ( इच्छिलेलें ) फल देणारें रत्नच असा कण्व–बाबांचा हात. 'चिंतामणि' हें विशेषण साभिप्राय असल्यामुळें '**परिकरा**'लंकार. ७. अर्पण करो. ८. गांधर्वविवाहपद्धतीनें. ९. संलग्न, युक्त. १०. निर्दय मदनाच्या बाणानें विद्ध. ११. सुकुमारी. १२. दुःखांत. १३. ( माझ्याहून ) इतर, दुसऱ्या. '**न्या**' ह्या अक्षराचा अनुप्रास पंतांच्य मोठा आवडीचा दिसतो. १४. त्यांचीं वडील माणसें. १५. पात्र. १६. खरा, पक्का. १७. सखी ( पत्नी ). १८. 'करांत याच्या' असें पाठान्तर. १९. मधुप+वर+निकाश+कुंतला=भ्रमरश्रेष्ठाशीं सदृश ( काळेभोर ) आहेत जिचे केंस अशी. २०. क्रीडेला. २१. 'याशिं करीं' असें पाठान्तर. २२. ज्याचे मनोरथ पूर्ण झाले आहेत असा. 'राजा दुष्यंत म्हणे लब्धमनोरथ प्रियंवदे विरहा' असा पाठ. २३. जशी आहेस तशीच, अर्थात् एकाद्या तपस्विकन्येप्रमाणें, किंवा माझ्याप्रमाणेंच विरहाला भिणारी.

दे मज निरोप; हंसें, वद विसरिजेल काय देवि ! सर[1] ! ।
भिन्न दिसो, एक चि वपु; हें कोणास हि न काय दे विसर[2].' ॥ ४७
गेला निरोप घेउनि, परि[3] बहु कण्वासि भूप तो भ्याला. ।
चित्तीं म्हणे, 'अहा ! मुनि शापिल मज परमविषयलोभ्याला.' ॥ ४८
आला कण्व मुहूर्तें[4], फलपुष्पसमित्कुशांसि[5] आणूनी, ।
झाला प्रसन्न भगवान्, दिव्यज्ञानेंकरूनि जाणूनी. ॥ ४९
कण्व म्हणे, 'वत्से ! त्वां केला निश्चित आजि तातकर[6]; ।
न धरीं संकोच; नव्हे गांधर्वविधि स्वधर्मघातकर. ॥ ५०
तुज सुत होईल भला, निववील यशोमृतें कुलीन-मनें; ।
त्यासि मदाशीर्वादें करितील समस्त नृप, मुली ! नमनें.' ॥ ५१
तातातें नमुनि म्हणे, 'म्यां दुष्यंतासि वाहिलें काय[7]. ।
भवदाश्रमीं[8] अतिथिचें[9] नव्हतां[10] प्रिय उचितें[11] राहिलें काय ? ॥ ५२
त्यावरि[12] कृपा करावी, द्या हा वर, योग्य होय कन्या या[13].' ।
कण्व म्हणे, 'हें हि दिलें; कां भीसी ? न करुनी हि अन्याया.' ॥ ५३
झाला[14] शकुंतलेला सुत; सुतपा[15] कण्व त्यासि परिपाळी; ।
गृहधर्माची कुतुकें दे तो[16] भगवान् विरक्त परि पाळी. ॥ ५४

---

१. मानससरोवर. २. हें काय ( शरीर, अर्थात् तुझें रूप ) कोणास हि विसर न दे–असा अन्वय. तुझें सौंदर्य कोणालाही तुझा विसर पडूं देणार नाहीं–असा भाव; किंवा हें काय ( माझें शरीर, अर्थात् मी ) कोणास हि विसर न दे म्हणजे मीं कोणालाही विसरत नाहीं–असा भाव. ३. 'परि मनिं' असें पाठान्तर. ४. घटकाभऱ्यानें. मुहूर्त=( १ ) घटका; ( २ ) क्षण, थोडा वेळ. ५. फळें, पुष्पें, समिधा व दर्भ यांस. समित्=समिधा. ६. पितृहस्त. ७. देह. ८. तुमच्या आश्रमांत. ९. पाहुण्याचें. १०. न होतां. ११. उचित=योग्य, स्तुत्य. आपल्या आश्रमांत आलेल्या अतिथीचें योग्य आदरातिथ्य झालें नाहीं, तर मग त्यांत आपलें थोरपण काय राहिलें ?–असा भावार्थ. १२. दुष्यंतावर. येथें मूळांतील ७३ वा अध्याय संपतो. १३. वरास. १४. प्रदीप्त अग्नीप्रमाणें कांतिमान्, रूप, औदार्य इत्यादि गुणांनीं युक्त असा दुष्यंतपुत्र पूर्ण तीन वर्षांनीं ( गर्भापासून उत्पन्न ) झाला–असें मूळांत आहे ( मूळ अध्याय ७४।२ ). १५. तपस्वी. परिपाळी= पालनपोषण करी, संरक्षण करी. १६. तो भगवान् ( कण्व ) विरक्त परि गृहधर्माची पाळी कुतुकें दे—असा अन्वय. कण्वऋषी जरी संसारबंधनांतून मुक्त झाला होता, तथापि तो कौतुकानें गृहधर्माची पाळी दे, म्हणजे, मोठ्या कौतुकानें गृहस्थाश्रमी माणसारखी वागणूक करी. पाळी= वांट्यास आलेलें काम, प्रसंग. पाळी देणें–हा प्रयोग चिंत्य आहे.

भरवी मृगार्भका[1], मग तो भरवी कां न नातवा घांस? ।
झाला असा, शिशुपणीं[2] बद्ध करी काननांत[3] वाघांस. ॥ ५५
[4]तो आश्रमवृक्षांसी शार्दूल-वराह-हस्ति-हरि-सेना[5] ।
बांधी सा वर्षांचा शिशु; कण्वोक्तांत तें[6] चि परिसेना. ॥ ५६
'**सर्वदमन**'[7] त्यासि म्हणति, करिति सदा सुवरवृष्टि[8] जलदमुनी[9]; ।
'निरुपम सुख प्रजांला हा शिशु देईल, सर्व खल दमुनी[10].' ॥ ५७
**कण्व** म्हणे, 'मुलि! झाला राज्योचित[12] सुत, मला हि लाभ वनीं[11]; ।
जा पतिगृहासि; **शोभे स्त्रीजन पतिच्या चि राहिला भवनीं[13].** ॥ ५८
राज्यसुख पहा; पतिची सेवा करिं; मज उदास[14] मुलि[15]! न मनीं[16]; ।
पतिसह वृद्धपणीं ये, जरि हें वन, सिंधु[17], नीर[18], पुलिन[19] मनीं[20].' ॥ ५९
आज्ञापिले स्वशिष्य, स्वसुता[21], नेत्रें[22] पुसोनि, पाठविली; ।
साश्रुमुनिजनीं[23], **कण्वें** शतवार तदीय[24] भक्ति आठविली. ॥ ६०
दुष्यंतसद्मपद्मीं[25], ते स्त्री-श्री[26] **कण्वें**[27]-भानु-शिष्य-करीं ।

---

१. बालहरिणास. ह्या गीत्यर्धांत '**काव्यार्थापत्ति**' अलंकार आहे. २. लहानपणीं. ३. रानांत. ४. तो सा वर्षांचा शिशु आश्रमवृक्षांसी शार्दूलवराहहस्तिहरिसेना बांधी—असा अन्वय. ५. व्याघ्र, डुकर, गज, सिंह, यांचे समूह. ६. तेंचि=वाघ, सिंह वगैरे जनावरांच्या वाटेस जाऊं नको, एवढीच गोष्ट सर्वदमन ऐकत नसे, बाकी सर्व गोष्टी मान्य करीत असे—असा भाव. 'बांधी सा वर्षांचा, शिकवी कण्वोक्त युक्त परिसेना' असा पाठभेद. युक्त=योग्य असलेलें. ७. 'हा सर्वांना दमवितो म्हणून याचें नांव सर्वदमन असो' असें मूळांत आहे (अध्याय ७४।७-८). ८. उत्तम वररूप जलाची वृष्टि. ९. मुनिरूप मेघ. १०. दुष्टांस जिंकून, दुष्टांचा नाश करून. (मूळ अध्याय ७४ श्लोक ६–८ पहा). ११. कण्व वानप्रस्थाश्रमी असून देखील त्यास सर्वदमनाच्या बालक्रीडा पाहावयास मिळाल्या, हा त्याला मोठा लाभच झाला—असा भाव. १२. राज्य करण्यास योग्य. १३. घरीं. 'नारीणां चिरवासो हि बान्धवेषु न रोचते' (अध्याय ७४।१२) असें मूळांत आहे. १४. उदासीन, खिन्न. १५. बाळे! १६. नको मानूं—**पंत.** १७. नदी. १८. पाणी. १९. वाळवंट. २०. जरि हें वन......मनीं [ये] (मनास येईल, आवडेल) [तरि] वृद्धपणीं पतिसह [राहावयास] ये—असा अन्वय. २१. आपली कन्या (शकुंतला). २२. विरहदुःखामुळें नेत्रांत आलेले अश्रु पुसून. २३. ज्यांचे नेत्र अश्रुपूर्ण आहेत अशा मुनिजनांनीं. २४. तिची (मुनिजन व कण्व यांच्या ठिकाणीं असलेली) भक्ति. २५. दुष्यंताच्या गृहरूपी कमलांत. २६. स्त्री (शकुंतला) रूपी शोभा. 'ते श्री-स्त्री' असें पाठांतर. २७. कण्वरूपी सूर्याच्या शिष्यरूपी किरणांनीं.

नेली, पुत्र[1]-सुगंधासह, धर्मनेयांबुपूर्णनगरसरीं[2][3]. ॥ ६१
पतिला म्हणे मुनिसुता, 'द्यावें पुत्रासि यौवराज्य नृपा!।
स्मृति आहे कीं? पूर्वीं केली जी काश्यपाश्रमांत कृपा.' ॥ ६२
राजा म्हणे, 'कवण तूं? कोणाचा पुत्र? काय गे! वदसी?।
का च स्मृतिरयि[4] तापसि[5]! मैवं प्रलपात्र भूभुजःसदसि.' ॥ ६३
साध्वी म्हणे, 'अहो! नयधर्मज्ञ[6] तुम्ही नरेंद्र पौरव[7] कीं?।
वदतां असें कसें? हो! करितां[8] विश्वासघात रौरव[9] कीं. ॥ ६४
मृगयेचिया[10] प्रसंगीं, हरिणामागें वनांत लागोनी,।
आलासि मालिनीच्या[11] तीरीं कण्वाश्रमासि भागोनी[12]. ॥ ६५
सिद्धाश्रमांत[13] नव्हता तात; तुला म्यां चि पूजिलें वन्यें[14];।
जागें काय करावें निपट[15] कपटनिद्रिता जना अन्यें[16]? ॥ ६६
मज्जन्मवृत्त[17] पुशिलें त्वां; मग म्यां मेनकाप्सरा माय,।
कौशिक[18] बाप, असें तुज कथिलें; तें विसरलासि तूं काय? ॥ ६७
सुतयौवराज्यवर[19] मज देउनि, गांधर्वविधि करूनि मला।
वरुनि, 'न जाणें[20]' म्हणसी; पूरुकुळीं तूं चि सुज्ञ साधु भला[21]! ॥ ६८
स्त्रीस म्हणति 'जाया;' सुतरूपें पति तदुदरांत[22] जन्मति; तें।
श्रुतिवचन[23] तुज असावें[24] ठावें; परि मान्य होय सन्मतितें[25]. ॥ ६९

---

१. पुत्ररूपी सुवासासह. २. धर्मनीतिरूप जलानें पूर्ण अशा नगररूप सरोवरांत. ३. ही गीति **सांगरूपकाचें** एक उत्कृष्ट उदाहरण होय. ४. 'स्मृतिरपि' असें पाठान्तर. ५. अयि तापसि! (हे तपस्विकन्ये!) का च स्मृतिः? (कशाची आठवण?) अत्र भूभुजःसदसि मा एवं प्रलप (येथें राजसभेंत असें बडबडूं नको)–असा अन्वय. ६. नीतिशास्त्र जाणणारे. ७. पूरूच्या वंशांतले. ८. कीं (कारण) विश्वासघात करितां (केला असतां) रौरव [ प्राप्त होतो ]–असा अन्वय. ९. नरकवास. १०. पारधीच्या. ११. नदीचें नांव. १२. दमून, थकून. १३. ज्यांनीं परमार्थ आपलासा केला आहे, अशा सत्पुरुषांच्या आश्रमांत. १४. वनांतील फलपुष्पांनीं. १५. केवळ, अत्यंत. १६. दुसऱ्यानें. १७. माझी जन्मकथा. १८. विश्वामित्र. १९. तुझ्या पुत्रास यौवराज्य देईन असा वर. २०. मला माहीत नाहीं, मला आठवत नाहीं, असें. (मूळ अध्याय ७४।२५). २१. येथील 'साधु, सुज्ञ, व भला' ह्या विशेषणांत वस्तुतः निंदा केलेली आहे; म्हणून येथें **व्याजस्तुति** अलंकार आहे. ह्या अलंकारास व्याजोक्ति व व्याजनिंदा अशीं अन्य नांवें आहेत. २२. तिच्या (जायेच्या) उदरांत. २३. 'पतिर्जायां प्रविशति गर्भो भूत्वा स्वमातरम्। तस्यां पुनर्नवो भूत्वा दशमे मासि जायते। तज्जाया जाया भवति यदस्यां जायते

मी जाया सत्कार्या[1]; आत्मा[2] चि तुझा कुमार हा, राया ! ।
झाला प्राप्त, परि गळां न धरिसि अद्यापि रत्नहारा[3] या[3].' ॥ ७०
भूप म्हणे, 'भग्नव्रत[4] तात तुझा; माय ही तुझी अ-सती[5]; ।
नसतीस तत्सुता तूं, लज्जा कांहीं तरी तुला असती. ॥ ७१
सा वर्षांचा म्हणसी; इतुक्यांत चि एवढा कसा गे ! हा ? ।
स्वीकारुनि तुज, लावूं डाग कसा मूढलोकसा गेहा[6] ?' ॥ ७२
साध्वी म्हणे, 'मिळविलें ज्ञानतपःकीर्तिभाग्य मत्तातें[7], ।
कैंचें तुझ्या कपाळीं नीचा ! अतितुच्छभाग्यमत्ता[8] ! तें ? ॥ ७३
ती ब्रह्मयोनि[9] देवी मन्माता मेनका, सुरांस मता[10]; ।
नीचा तुझी च माता; **करिल सुधेची[11] कशी सुरा[12] समता[13] ?** ॥ ७४
जरि मुख्यसत्यधर्मच्युत[14] आपण, विश्वनिंद्य[14] जन; नीचा ! ।
निंदिसि कसें पदातें मत्ताताच्या, मदीय जननीच्या ? ॥ ७५
पौरव[15] रौरवगौरव[15]कर्ता, भर्ता भला मला गमसी; ।

---

पुनः ।' या स्मृतिवचनास उद्देशून हें भाषण आहे. मूळांत पुढील श्लोक आहे:—भार्यां पतिः संप्रविश्य स यस्माज्जायते पुनः । जायायास्तद्धि जायात्वं पौराणाः कवयो विदुः ॥ ( अध्याय ७४।३७ ) म्हणजे, पति हा भार्येंत प्रवेश करून पुन्हां ( पुत्ररूपानें ) तिच्यापासून उत्पन्न होतो; हेंच जायेचें जायात्व आहे, असें पुराणवेत्ते ज्ञाते समजतात. मनुस्मृतींतही अशाच अर्थाचें वचन आहे ( अध्याय ९।८ पहा ). २४. माहीत असेलच. २५. सज्जनाला, ज्याची सदसद्विवेकबुद्धि जागृत आहे त्याला. पण ( ही गोष्ट ) ज्याला सद्बुद्धि असेल ( ज्याची सदाचारप्रवृत्ति जागृत असेल ) त्यालाच मान्य होईल; इतरांना मान्य होणार नाहीं—असा भावार्थ.

१. सत्काराई, सत्कारास योग्य. २. तुझा जीवच असा, त्वद्रूप. ( मागील गीतीवरील टीपा पहा ). ३. या ( पुत्ररूपी ) रत्नहारा ( मणिमाळेस ). ४. मेनकेनें भग्न केलें आहे तपोव्रत ज्याचें, असा तुझा पिता ( विश्वामित्र ). ५. जारिणी. ६. घराण्याला, कुळास. ७. माझ्या बापानें. ८. राज्यादि अत्यंत क्षुद्र अशा भाग्यानें उन्मत्त झालेल्या राजा ! येथें शकुंतलेनें विश्वामित्र व दुष्यंत यांची तुलना केली आहे. विश्वामित्राचें भाग्य 'ज्ञानतपःश्री' नें युक्त, तर दुष्यंताचें भाग्य 'अति-तुच्छ'! येथें **विषमा**लंकार आहे. ९. ब्रह्मदेवापासून जिची उत्पत्ति अशी. 'जी ब्रह्मयोनि देवी' असें पाठान्तर. १०. मान्य, पूज्य. ११. अमृताची. १२. मद्य. १३. बरोबरी. १४. जर आपण स्वतः धर्मांतील मुख्य तत्व जें 'सत्य' त्यापासून च्युत झालेले असलों, तर आपणास सर्व जग विश्वनिंद्य आहे, असें वाटतें—असा भाव. विश्वनिंद्य=अत्यंत निंद्य, सर्व जगांत निंद्य. १५. पूरु-कुलोत्पन्न असूनही रौरवाचें ( नरकाचें) गौरव करणारा.

समशीलबुद्धि होउनि, नीतीनें आजि बोलुं लाग मसी. ॥ ७६
बहुधा तुझें कपाळ न साहे सुतरत्नसन्निधानातें[2]; ।
हतभाग्य न घे, देतां दाटुनि आणूनि, सन्निधानातें[3]. ॥ ७७
क्षितिपति[4] मत्सुत चि असो, तेजांचा[5] मूर्तिमंत हा निकर[6]; ।
हा निकर[7] मांडिला तूं; देशील कर[8] स्वकीर्तिहानिकर[9].' ॥ ७८
ऐसें वदोनि, जाया उठली, तों जाहली नभोवाणी[10]; ।
'दुष्यंता ! काय करिसि ? समजावीं आपुली सती[11] राणी. ॥ ७९
त्वां हे विधिनें[12] वरिली; या साध्वीचें विशुद्ध जनु[13]; रागें[14] ।
पुर, राष्ट्र भस्म न करो; समजावीं सुतवतीस अनुरागें[15]. ॥ ८०
पुत्राचें भरण[16] करीं; भाग्यें तुज लाधला, भर[17] तयातें; ।
म्हणतील आजिपासुनि भुवनीं जन सर्व ही '**भरत**' यातें.' ॥ ८१
स्वकुळपुरोहित, ऋत्विक्, मंत्री, आचार्य, साधु जे होते, ।
राजा म्हणे, 'परिशिलें[18] ?' म्हणती सारे[19] हि एकदा[20] 'हो' ते. ॥ ८२
'मत्सुत[21], मद्दयिता[22] हें मी जाणें; परि जनांस कळवाया ।
ऐसें निष्ठुर वदलों, तुमची शंका अशेष[23] पळवाया.' ॥ ८३
कळवुनि असें समस्तां, हृदयीं सप्रेम बाष्पभर तातें[24] ।

---

१. मजशीं, माझ्याबरोबर. येथें रा० **प**राडकर यांच्या प्रतींत 'मसी' असा अनुस्वार रहित पाठ आहे. 'मसीं' असा पाठ स्वीकारिल्यास अनुस्वारव्यत्ययदोष उत्पन्न होतो. २. सुतरूप रत्नाच्या सांनिध्यातें ( सहवासाला ). ३. उत्तम ठेव्याला. निधान=सांठा, खजिना. ४. राजा. ५. तेज=क्रियासामर्थ्य, पराक्रम. येथील अनेकवचनाच्या योगानें **पं**तांनीं भरताच्या पराक्रमाचा अतिशय ध्वनित केला आहे. 'तेजाचा' असें पाठांतर. ६. समूह, पुंज. ७. अनर्थ. येथें **'दामयमक'** आहे. ८. करभार. ९. आपल्या कीर्तीचा नाश करणारा. १०. आकाशवाणी. 'देवदूतस्य भाषितं' असें मूळांत आहे ( अध्याय ७४।११८ ). ११. पतिव्रता, सच्छीलवती. **परिकरा**लंकार. १२. यथाशास्त्र. १३. जन्म. १४. क्रोधानें. १५. प्रीतीनें. १६. पोषण. १७. पोषण कर. [भर=] पोषण.-**पंत.** १८. ही आकाशवाणी काय म्हणते तें ऐकलेंत ना ?-असा भाव. १९. 'सारेचि' असें पाठान्तर. २०. एकदम ( तत्काळ ). २१. भरत हा माझा पुत्र आहे हें. २२. ही शकुंतला माझी भार्या आहे ही गोष्ट. दयिता=आवडती स्त्री. 'मद्वनिता' असें पाठान्तर. २३. पूर्णपणें, संपूर्ण. २४. बाष्पभरानें युक्त अशा, ज्याच्या नयनांतून आनंदाश्रु गळत आहेत अशा पित्यानें.

आलिंगिलें, गुरु[1]सुहृत्सचिवानुमतेंकरूनि, भरतातें. ॥ ८४
कण्वसुतेसि म्हणे नृप, 'दयिते ! साध्वि ! क्षमा करीं, भीरू[2] ! ।
त्वत्क्षोभा भ्याला, सति ! हा[3] जन, बहु पावका जसा भी रूं[4]. ॥ ८५
असकृत्[5] विरहद[6], तापद[7], परि मित्रीं[8] काय सुमुखि ! भीरु ! सति ! ।
दयिते ! नलिनी[9], न धरुनि चित्तीं स्वप्रेमभंगभी[10], रुसती ? ॥ ८६
माझी कीर्ति, श्री, तूं; बोलाया[11] वचन कोरडें ज्या[12] ये ।
तत्कंठ काय दाटे ? येऊं देऊं नको रडें, जाये ! ॥ ८७
वदलों शुद्ध्यर्थ[13] असें; भीतों बहु मानसांत डागातें[14]; ।
निंदिल हंस कसा[15] मधुररस[16] सेवुनि, मानसा[17]-तडागातें ?' ॥ ८८
स्त्री सुखवुनि, दुष्यंतें गुरु-सेवा-पुण्य-कीर्ति-लाभ-रत ।
युवराज पुत्र केला; कविंनीं तो सुबहु कीर्तिला[18] भरत. ॥ ८९
दुष्यंत जधीं राजा[19], झाले रिपुनृप तधीं च नक्षत्रें; ।
भरत तरि रवी[20] च, परीं तें यश[21] केलें कधीं च न क्षेत्रें[22]. ॥ ९०

---

१. गुरुजन, आप्तेष्ट व मंत्रिमंडळ यांच्या संमतीनें. २. हे भित्रे ! 'भीरुरातें त्रिलिंगः स्याद्दर-योषिति योषिति' इति मेदिनी. ३. मी (दुष्यंत). ४. कापूस. ५. वारंवार. ६. वियोग देणारा. ७. पीडा देणारा. ताप=(१) पीडा, संताप; (२) उष्णता. ८. सूर्यावर. ९. कमलिनी. चित्तीं स्वप्रेमभंगभी धरुनि नलिनी मित्रीं न रुसती काय ?—असा अन्वय. आपल्या प्रेमाचा भंग होईल, अशी मनांतून भीति वाटत असली, तरी स्त्रिया आपल्या पतीवर रागावत नाहींत काय ?—असा भाव. ह्या गीतींत **अन्योक्ति** अलंकार आहे. १०. आपल्या प्रेमाचा भंग होईल कीं काय अशी भीति. 'सुप्रेमभंगभी' असें पाठान्तर. ११. ज्या कोरडें वचन बोलाया ये, तत्कंठ दाटे काय ?—असा अन्वय. जो प्रेमाशिवाय किंवा कळकळीशिवाय नुसती बडबड करितो, त्याचा कंठ दाटून येऊं शकतो काय ?—असा अर्थ. १२. '......बोलाया वदन कोरडें जाये । त्वत्कंठ कां न दाटे ?......' असा पाठ आहे, पण तो लेखकप्रमादजन्य असावा. १३. (आपलें) पावित्र्य सिद्ध करण्याच्या हेतूनें. १४. डाग=कलंक, अपकीर्ति, १५. 'निंदिल हंसवर कसा ? रस सेवुनि मानसा तडागातें' असें पाठान्तर. १६. (कमळांतील) मधुर रस. १७. मानससरोवराला. १८. वर्णिला. १९. राजारूपी चंद्र. राजन्=(१) राजा, (२) चंद्र. 'दुष्यंत जधीं राजा झाला, रिपुनृप तधींच नक्षत्रें' असें पाठान्तर. २०. सूर्यासारखा तेजस्वी (पराक्रमी). २१. [जें] यश (दुष्यंत किंवा भरत यांनीं केलें) तें क्षत्रें (इतर क्षत्रियांनीं) परीं (आपल्या शत्रूंच्या बाबतींत) कधीं च न केलें—असा अन्वय. दुष्यंत व भरत हे अतुलबलशाली होऊन गेले—हा इत्यर्थ. 'परी तें यश' असें पाठान्तर. २२. क्षत्रियानें.

कण्वें भरताकरवीं बहुदक्षिण[1]-यज्ञ करविले शतशा; ।
याचा[2] प्रताप मिरवी छवि[3] पाताळीं हि, न रवि लेश तशा. ॥ ९१
गोवितत[4]-वाजिमेधीं[5] ब्राह्मणपूजाद्यनंतलाभरतें[6] ।
दिधल्या सहस्रपद्में[7] कण्वाला धेनु दक्षणा भरतें. ॥ ९२
केली कीर्ति शशिकुळीं भरतें, नाशूनि भूमिभार, तता[8]; ।
म्हणवूनि पौरवांच्या[9] ठायीं नांदे प्रसिद्ध भारतता[10]. ॥ ९३
भरतसुत भुमन्यु नृपति; तत्पुत्र[11] सुहोत्र; तत्तनय हस्ती; ।
तत्तनुज[12] तो विकुंठन; म्हणति सदा साधु, '[13]अस्तु ते स्वस्ति[13].' ॥ ९४
नंदन विकुंठनाचा अजमीढ, जगत्पवित्र यत्स्मरण; ।
पुत्र चतुर्विंशतिशत[14] त्याचे; कुळकर[15] तयांत संवरण. ॥ ९५
संवरणाचा सुत कुरु; त्याचा नंदन विदूर मतिशाली[16]; ।
त्याचा तनुज अनश्वा; स्त्री अमृता मागधी[17] तया झाली. ॥ ९६
तत्पुत्र परीक्षिन्नृप, तन्नंदन भीमसेन भूमिपती; ।

---

१. ज्यांत दक्षिणा पुष्कळ द्यावी लागते असे यज्ञ, मोठमोठे यज्ञ. २. याचा ( भरताचा ) प्रताप [ जशा ] पाताळीं हि छवि ( कांति ) मिरवी, तशा ( छवि ) रवि लेश ( अल्प देखील ) न [ मिरवी ]–असा अन्वय. भरताच्या प्रतापाचें तेज पाताळांतही जाऊन पोंचलें, पण सूर्याचा एकादा किरणही तेथपर्यंत पोंचला नाहीं–असा भाव. येथें 'प्रताप' ह्या शब्दावर श्लेष आहे. प्रताप=( भरतपक्षीं ) वैभव, प्रभाव; ( सूर्यपक्षीं ) उष्णता, ऊन्ह. ३. कांति. ४. 'गोवित्तवाजिमेधीं' असें पाठान्तर. ५. अश्वमेधयज्ञाचे अनेक प्रकार आहेत. त्यांपैकीं 'गोवितत' नांवाचा एक प्रकार आहे. ६. ब्राह्मणांची पूजा इत्यादि अनेक लाभांच्या ठिकाणीं रत अशा भरतानें. ७. वाल्मीकिरामायणाच्या युद्धकांडाच्या २८ व्या अध्यायांत श्लोक ३३–३७ पर्यंत संख्या दिली आहे, तिजवरून पद्म हें ३३ वें स्थान होतें. म्हणून सहस्र पद्में हें छत्तिसावें स्थान येतें. म्हणजे एक या अंकावर ३५ शून्यें देऊन होणारी संख्या. मूळांत 'भरतानें गोवितत नांवाचा अश्वमेध केला, त्यांत त्यानें कण्वाला हजार पद्में ( मोहरा ) दक्षिणा दिली'–असें आहे ( अध्याय ७४। १३४ ). पद्म म्हणजे शंभर कोटी ( संख्या )–असाही अर्थ आहे. ८. विस्तृत. हें 'कीर्ति'चें विशेषण. ९. रा. पराडकर यांच्या प्रतींत 'पौरवांचा' असा पाठ आहे. पण पंत पुष्कळदां 'चा' आणि 'च्या' यांत अभेद मानितात. १०. 'भरतामुळें भरतखंडाची कीर्ति झाली. त्याच्यामुळेंच या कुलास 'भारत' असें नांव प्राप्त झालें' असें मूळांत आहे. ( अध्याय ७४।१३४ ). ११. 'तत्सुत सुहोत्र' असें पाठान्तर. १२. 'तत्तनय तो' असें पाठान्तर. १३. तुझें कल्याण असो. १४. एकशेंचौवीस. १५. मूळांत 'वंशकरः' असा शब्द आहे. ( अध्याय ९५।३७ ). वंशकर=वंश चालविणारा. १६. बुद्धिमान्. १७. मगध देशाच्या राजाची कन्या.

त्याचा प्रतिश्रवा सुत, त्याचा तनुज प्रतीप शुद्धमती[1]. ॥ ९७
अमृतें[2] प्रतीप-चरित प्राशावें श्रवण करुनि आर्यांनीं[3]. ।
गाईल रामकरुणाघनें[4]भक्तमयूर तें चि आर्यांनीं[5]. ॥ ९८

---

## अध्याय तेरावा.

ईक्ष्वाकुवंशज[6] महाभिष राजा सांगराजसूयशतें[7], ।
हयमेधसहस्रें[8] ही जोडी, दुर्लभ सुरां हि जें, यश तें. ॥ १
तो नृप झाला स्वर्गीं बहुमान्य सुरांसि, सुकृत[9] साधूनी; ।
ब्रह्मसभेंत[10] बसविला होता तत्रत्यें[11] सर्व साधूंनीं. ॥ २
विधिदर्शनार्थ गेली ब्रह्मसभेप्रति सरिद्वरा[12] गंगा; ।
तों तदुरोंचल[13] उडवुनि, मारुत[14] उघडें करी तिच्या अंगा. ॥ ३
सर्व अधोमुख झाले; पाहे नृप तो तसा चि गंगेतें; ।
जाणे द्रुहिण[15], महाभिषमन तद्रूपीं[16] क्षणार्ध रंगे, तें. ॥ ४
ब्रह्मा म्हणे, 'नृपा ! नरलोकीं जा; घे सुजन्म; थापटुनी ।
भुज[17], जिंकिलें न कोणीं ज्ञानासि[18]विना चि मन्मथा पटुंनीं[19]. ॥ ५
जाणोनि अहित केवळें[20], ज्या संत्यजिलें चि विषयमद्य जनीं, ।

---

१. येथें मूळांतील ९५ वा अध्याय संपतो. ह्या अध्यायाचे ९० श्लोक असून त्यांत पूरूचा वंशविस्तार वर्णिलेला आहे. २. जणूं काय अमृतच असें. 'अमृतप्रतिम चरित्र' असें पाठान्तर. ३. श्रेष्ठांनीं. ४. राम हाच दयेचा मेघ (दयाळू) त्याचा भक्त मयूर (मोरोपंत). ५. आर्या-छंदांनीं. ६. येथें मूळांतील अध्याय ९६ मधील कथानकास सुरुवात होते. ७. यथासांग केलेल्या शेंकडों राजसूययज्ञांनीं. ८. हजारों अश्वमेधयज्ञ करून. ९. पुण्य. १०. ब्रह्मसभेंत स्थान मिळणें हा मोठा मान होय. तेथें स्थान मिळणें अत्यंत दुर्लभ असतें. देवांच्या सर्व सभांत ब्रह्मसभा ही श्रेष्ठ होय. ह्या निरनिराळ्या सभांचीं नांवें व वर्णनें पंतांनीं सभापर्वांत दिलीं आहेत (अध्याय १ गीति २२–४० पहा). 'ब्रह्मसभेसि' असें पाठान्तर. ११. तेथील–पंत. १२. सरित्+वरा=नद्यांमध्यें श्रेष्ठ अशी. १३. तिच्या उरावरील पदर. १४. वायु. १५. ब्रह्मदेव. १६. तत्+रूपीं=तिच्या सौंदर्यांत. १७. बाहु, दोर्दंड. दंड थोपटणें=युद्धास तयार होणें. केवळ बाहुबळानें मदनास जिंकितां येत नाहीं, तर ज्ञानरूपी खड्गाचें साहाय्य घेऊनच त्याला जिंकितां येतें–असा भावार्थ. १८. ज्ञान+असि+विना=ज्ञानरूप खड्गावांचून. १९. पटु=निष्ठुर, कडक, दक्ष. २०. ज्या जनीं (लोकांनीं) विषयमद्य, [तें] केवळ अहित [आहे, असें] जाणोनि, संत्यजिलें ते चि साधु मद्यजनीं योग्य होताति–असा अन्वय. 'ज्यांहीं त्यजिलें' असें पाठान्तर.

ते साधु सत्यलोकीं राया! होताति योग्य मद्यजनीं[1]. ॥ ६
भोगुनि विषय, विटोनि[2], स्वर्गतिला पावशील, विषयमते[3]! ।
रायां[4]! कळो तुज अमृत अनुग्र, कीं विषय उग्र विष, यम ते.' ॥ ७
स्वमनीं म्हणे महाभिष, 'आत्मा शुद्ध प्रतीपभूपाचा; ।
व्हावें तत्सुत; आश्रय योग्य पयोराशिचा[5], न कूपाचा[6].' ॥ ८
परते तेथुनि गंगा, त्या चि नृपातें मनांत रेखूनी; ।
मार्गीं पुसे वसूंतें[7] तद्वृत्त तयां सखेद देखूनी. ॥ ९
वसु म्हणति, 'वसिष्ठानें[8] नमन न केलें म्हणूनियां, शाप ।
'व्हा योनिसंभव' असा दिधला; अत्यंत पावलों ताप. ॥ १०
तूं देवि! मानुषी[9] हो; आम्हां त्वत्कुक्षिमाजि[10] जन्म हित; ।
अन्योदरवास[11] नसो; भगवति! भवदुदरवास[12] सन्महित[13]'. ॥ ११
गंगा पुसे तयांला, 'तुमचा होईल कोण हो! कर्ता[14]?' ।
वसु सांगति, 'प्रतीपक्षितिपतिसुत शांतनु क्ष्माभर्ता[15].' ॥ १२
गंगा म्हणे, 'करीन प्रिय तुमचें, त्या हि नृपतिचें इष्ट.' ।
**धर्मयशस्कर जें जें कर्म स्वीकारिती च तें शिष्ट[16]. ॥ १३**
वसु म्हणती, 'जो होइल, तो तो सुत निज जळांत बुडवावा; ।
त्वां क्षिप्र[17] विप्रसत्तमदत्तासच्छापताप[18] उडवावा.' ॥ १४

---

१. मत्+यजनीं=माझ्या पूजेविषयीं. २. विषयाचा वीट ( कंटाळा ) येईल तेव्हां. ३. विषयांच्या ठायीं ज्याची बुद्धि गुंग झाली आहे, अशा राजा! ४. राया! विषय अनुग्र अमृत ( अमृताप्रमाणें सौम्य ) [ आहेत ] कीं ( किंवा ) [ ते ] उग्र विष ( विषाप्रमाणें उग्र ) [ आहेत, कीं ] ते यम ( प्रत्यक्ष कृतांतच आहेत ) [ हें ] तुज कळो-असा अन्वय. विषय कसे आहेत, हें तुला प्रत्यक्ष अनुभवानेंच कळो-असा भाव. ५. समुद्राचा. ६. विहिरीचा. ७. वसु संज्ञक देवांतें ( मागें पृष्ठ ३९ टीप ७ पहा ). ८. पूर्वीं एकदां ऋषिश्रेष्ठ वशिष्ठ एकांतांत संध्योपासना करीत असतां, अष्टवसूंनीं मूर्खपणानें त्यांचा उपमर्द केला. त्यामुळें रागावून त्यांनीं 'तुम्ही मनुष्ययोनींत जन्म घ्या' असा त्यांस शाप दिला. ( मूळ अध्याय ९६ श्लोक १२-१४ ). 'वशिष्ठा! रे' असें पाठान्तर. ९. मानवी, मनुष्यजातीची स्त्री. १०. तुझ्या कुशींत, तुझ्या पोटीं. ११. तुजहून दुसरीच्या पोटीं राहाणें. १२. तुझ्या उदरीं राहाणें. १३. सज्जनांस मान्य. १४. उत्पन्नकर्ता, बाप. १५. पृथ्वीपति ( राजा ). १६. सुसंस्कृत लोक, सुशिक्षित. १७. सत्वर. १८. विप्र+सत्तम+दत्त+असत्+शाप+ताप=ब्राह्मणश्रेष्ठानें ( वशिष्ठानें ) आम्हांला दिलेल्या शापामुळें उत्पन्न होणारा ताप ( संताप, दुःख ).

स्वःसिंधु[1] म्हणे, 'वसु हो ! ऐसें चि असो; परंतु मत्संगा ।
पावुनि, नृप न निवाला, या पात्र न अपयशासि हो गंगा.' ॥ १५
वसु म्हणति, 'सर्व देऊं स्वाष्टमतेजोंश[2] एक सुत राया; ।
होईल[3] सेतु केवळ नष्टात्मजशोकसिंधु[4] उतराया.' ॥ १६
ऐसा निश्चय केला गंगाद्वारीं[5]; मग प्रतीपातें ।
पाहे गंगा देवी मूर्तिमंती[6] पूरुवंशदीपातें. ॥ १७
नृप जप करीत होता, तों त्याच्या ती हळू चि निष्पंकीं[7] ।
अतिरुचिरांगी[8] गंगा बसली जाऊनि दक्षिणीं[9] अंकीं[10]. ॥ १८
तीतें 'कल्याणि ! तुझें प्रिय काय करूं ?' असें पुसे राजा. ।
गंगा म्हणे, 'करावा स्वीकार; त्याग न करिजे माजा.' ॥ १९
भूप म्हणे, 'हें न घडे; असवर्णा[11] तूं शुभांगि ! परदारा[12]. ।
मज ठावें, **नरकाच्या जातो चि परांगनेच्छु[13] नर दारा.'** ॥ २०
गंगा म्हणे, 'अनिंद्या, दिव्या मी; मत्प्रसंग[14] न विटाळी. ।
भज मज; येतां असुलभ वस्तु करीं[15], त्यासि कोण कवि टाळी ?' ॥ २१
नृपति म्हणे, 'तरि म्हणतों, स्वकरा हा दिव्यलाभ यावा मीं, ।
अंकीं[16] जरि, कल्याणि ! प्रथम चि तूं बैसतीस या वामीं[16]. ॥ २२
अंक[17] स्नुषासुतांला[18] दक्षिण योग्य; स्त्रियांसि वाम हित; ।
सोसूनि विलंबातें, हो सून चि; पंथ[19] नव्हे नवा महित[20].' ॥ २३
गंगा म्हणे, 'बहु बरें; तुमचा आत्मा कुमार जो भावी[21], ।
त्याच्या तरि वामांकीं हे सून यथाभिलाष[22] शोभावी. ॥ २४

---

१. स्वर्गातील नदी ( गंगा ). २. आमच्या तेजांचा आठवा अंश असा. ३. [ तो सुत ] सेतु होईल–असा भाव. ४. मृतपुत्रांविषयींचा शोकरूपी सागर. ५. प्रतीपराजा गंगाद्वाराशीं जाऊन जपजाप्य करीत बरींच वर्षें राहिला–असें मूळांत आहे ( अध्याय ९७।१ ). ६. मूर्तिमंत देवीच अशी. ७. निष्कलंक ( निष्पाप ) अशा. ८. अतिसुंदर अंग आहे जिचें अशी. ९. उजवे. १०. मांडीवर. ११. अन्य जातीची. १२. परस्त्री, दुसऱ्याची स्त्री. १३. परस्त्रीची इच्छा करणारा. १४. माझा समागम ( प्र+संग=संबंध, अनुराग, आसक्ति ). १५. हातास, हातांत. हा भाग सुभाषितरूप आहे. १६. डाव्या मांडीवर. १७. उजवी मांडी. १८. सुना व मुली यांना. १९. मार्ग ( चाल, रीत ). २०. मान्य. २१. पुढें होणारा. २२. ( तुमच्या ) इच्छेप्रमाणें.

पावेल पति सुगतिला, वर्तेन असें चि साधु[1] बहुधा मीं; ।
परि[2] साधु, असाधु, किमपि न म्हणावें; हित करीन बहु धामीं[3].' ॥२५
म्हणतां 'अवश्य', झाली गुप्त सती क्षिप्र[4] ती; परायास[5] ।
प्राथ्यर्थ न करितां चि स्वमुखें प्रार्थी प्रतीपरायास[6]. ॥ २६
पुत्रार्थ यज्ञ केले; आर्जविले अमर, विप्र; तीं[7] परते ।
त्यापासूनि[8] तपीं, स्त्रीसह, कुळसारसरवि[9] प्रतीप[10] रते. ॥ २७
पोटासि महाभिष नृप आला, झाला कुमार बहु रुचिर[11] ।
बहु वृद्धपणीं फळला[12] विधि[13], करितां परम उग्र तप सुचिर[14].॥ २८
कुळ शांत[15] जाहलें, तें जन्मुनि विस्तारिलें, म्हणोनि सुता ।
**शांतनु** ऐसें ठेवी नृप नांव[16], यशें दुधांचिया[17] हि उतां[18]. ॥ २९
धन्य प्रतीप राजा; भासे जोडा चि **शांतनु** रवीतें; ।
होतें शोकतम[19] मनीं, कीं झाला वंश शांत, नुरवी तें. ॥ ३०
सुत यौवनस्थ[20] होतां, पूर्वकथा[21] भूप त्यासि तो कानीं ।

---

१. चांगलें, बरें. २. प्रसंगोपात्त मी जें जें कांहीं करीन, त्याला तुझ्या पुत्रानें नांवें ठेवूं नयेत. मी त्याच्या घरीं राहात असतांना, त्याच्या आनंदांत भर घालीन-असा गंगेच्या म्हणण्याचा भाव. ( मूळ अध्याय ९७ श्लोक १४-१५ ) असाधु=वाईट, अनिष्ट. ३. गृहीं ४. सत्वर. ५. पर+आयास=अत्यंत श्रम. प्रतीपराजाला कांहीं खटपट करावी न लागतां-असा भाव. ६. प्रतीपराजानें गंगेच्या म्हणण्यावर 'अवश्य' असें म्हणतांच, गंगेच्या इच्छेप्रमाणें खात्रीपूर्वक होईल, असें प्रतीपराजानें उत्तर देतांच. अवश्य=निःसंशय. ७. गंगा-**पं**त. ८. त्या दिवसापासून. 'तैंपासूनि' असा पाठ असता तर बरें झालें असतें. ९. कुळरूपी कमळाला ( विकसित करणारा ) सूर्यच-असा. १०. मागें अध्याय १२ गीति ९७ पहा. ११. सुंदर. १२. फळ देता झाला. १३. नशीब. १४. फार वेळ. १५. नष्ट. १६. रा० **प**राडकर यांच्या प्रतींत 'नाव' असा शब्द आहे. पण तो मुद्रणदोष असावा. १७. तत्तस्य यशोतिधवलमिति भावः—**पं**त. ( म्हणजे—ती त्याची कीर्ति अतिशय शुभ्र होती, असा भावार्थ ). यशाचा रंग शुभ्र असतो, अशी कल्पना आहे. उत=फेंस. दुधाचा फेंस अत्यंत शुभ्र असतो, हें प्रसिद्धच आहे. १८. येथील वाक्य अपूर्ण आहे. यशें दुधाचिया उताहि नांव ठेविती—असें म्हणण्याचा भाव आहे. सारांश—प्रतीपराजाचें यश दुधाच्या उतापेक्षां देखील निर्मल होतें. यशाचें आत्यंतिक निर्मलत्व दर्शविण्यासाठीं **पं**तांनीं हाच दृष्टांत ठिकठिकाणीं योजिला आहे. ( पुढें अध्याय १९।८१ व कर्णपर्व, अध्याय ३८।२६ व ४६।५५ पहा ). १९. शोकरूप तम म्हणजे अंधकार. २०. वयांत आलेला, प्रौढ. २१. पूर्वींची ( गंगेसंबधीं ) हकीकत ( मागें गीति ९–२६ पहा ).

सांगोनि, म्हणे, 'तैशी स्वप्नीं हि न पाहिली च लोकांनीं; ॥ ३१
भेटेल तुला तनया ! धन्य कराया स्वयें चि ती [1]महिला; ।
मजपाशीं [2]वर वरिला आहे चि; तिला भजें, [3]दुज्या [4]महिला. ॥ ३२
जें ती करील, तें त्वां सर्व सहावें चि; [5]रुक्ष न वदावें; ।
प्रेम [6]तुटतां चि जाइल, तें [7]चि करीं तीस नित्य नव [8]दावें. ॥ ३३
हा बाल्हीक [9]अनुज; हें राज्य [10]तुझें घे [11]करीं; करीं [12]अवन; ।
[13]भवन [14]हितें नव्हे आम्हां, हित कुरुकुळजांसि या वयांत [15]वन'. ॥ ३४
समजावुनि शांतनुला जाय, जसा ज्येष्ठपुत्र [16]देवापी; ।
[17]किति राज्य ? दे [18]तपस्या सुख, अमृताची हि तें न दे [19]वापी. ॥ ३५
बहु महिमा शांतनुचा; स्पर्शे ज्या ज्यासि तो [20]सकारुण्य, ।
त्या त्या [21]जीर्णासि पुन्हां तत्काळ प्राप्त होय तारुण्य. ॥ ३६
तो मृगयाशीळ नृपति [22]एकाकी [23]सुरसरित्तटीं [24]धन्वी ।
होता, तों एकांतीं तेणें दूरूनि देखिली [25]तन्वी. ॥ ३७
सेविति [26]आमरण सदा यतिपति, जे परम शांत, [27]तनुसतीतें; ।
निरुपम [28]तनु प्रकटितां कां हो ! न भुलेल शांतनु सतीतें ? ॥ ३८

---

१. स्त्री ( गंगा ). २. मी तुमची सून होईन असा वर ( गीति २४ पहा ). ३. दुज्या= आणि, आणखी. तिला भजें आणि महिला भजें—असा अन्वय. ४. पृथ्वीला. पृथ्वी ही देखील राजाची एक स्त्रीच होय—अशी समजूत आहे. ( कालिदासकृत अभिज्ञानशाकुंतल नाटक, अंक ३ पद्य १७ पहा ). ५. स्नेहरहित, कठोर. ६.'तुटतांचि प्रेम जाइल' असें पाठांतर. ७. प्रेम हेंच नवें दावें. ८. दोरी. दावें=गुरें बांधण्याची दोरी. येथें आपल्या ताब्यांत ठेवण्याचें साधन—असा अर्थ. ९. लहान भाऊ. देवापि, शंतनु व बाल्हीक हे प्रतीपाचे पुत्र. १०. 'तुझे घे करीं' असें पाठान्तर. ११. हातीं. १२. प्रजेचें पालन. अवन=रक्षण. १३. गृह. १४. बरें करणारें, कल्याण करणारें. १५. अरण्य, अर्थात् वानप्रस्थाश्रम. १६. हा प्रतीपाचा वडील पुत्र. हा पूर्वींच राज्य सोडून तपोवनास गेला होता. १७. [ जें ] तपस्या सुख दे, तें अमृताची वापी हि न दे. [ तपस्या व अमृत यांच्यांशीं राज्याची तुलना केली असतां ] राज्य किती ? त्यांच्यापुढें राज्याची काय कथा ? राज्य अगदीं तुच्छ. **काव्यार्थापत्ति** अलंकार. १८. तपश्चर्या, तपश्चरण. १९. विहीर. २०. सदय, कृपायुक्त. २१. म्हाताऱ्याला. २२. एकटा. २३. देवनदी ( गंगा ) तिच्या तीरीं. २४. धनुर्धारी वीर. २५. सडपातळ स्त्री. २६. मरेपर्यंत. २७. शरीररहित अशीतें ( केवळ प्रवाहरूप अशा गंगेतें ). २८. शरीर.

नृपति म्हणे, 'तूं कोण त्रिभुवनसौंदर्यमूर्ति ? [1]रुचिरतमीं ।
रूपीं लुब्ध चकोर चि झालों [2]त्वन्मुखसुधांशुरुचिरत मीं. ॥ ३९
[3]वद [4]सुदति ! या वनीं कां ? मी तों भूप प्रतीपसुत धन्वी ।
भ्रमतों असा चि मृगयाशीळ वनीं; सांग कोण तूं ? तन्वि ! ॥ ४०
वर मागतों तुला, तव शृंगारामृतरसांत [5]मज्जाया; ।
दे दान हें [6]उदारे ! हो, होउनि सुप्रसन्न, [7]मज्जाया'. ॥ ४१
गंगा [8]स्मित करुनि म्हणे, 'राया ! होईन मीं तुझी भार्या; ।
परि [9]विप्रियें न करावें, दूषुनि माझ्या [10]शुभाशुभा कार्या. ॥ ४२
विप्रिय करितां चि नृपा ! जाईन; असें रुचेल [11]तरि, हें मीं ।
स्त्रीरत्न योग्य अंकीं बसवावें, जेंवि रत्न वरिं [12]हेमीं.' ॥ ४३
तें मान्य करी राजा; जेव्हां दे त्यास दान [13]वपु राणी; ।
[14]त्यां त्यांत रस, जसा मन रसिका दे त्या सदा [15]नव पुराणीं. ॥ ४४
झाले सुत आठ तिला; त्यांत उपजतां चि बुडविले सात; ।
[16]त्यागभयें नृप साहे, जरि संततिचा असा करी घात. ॥ ४५
सुत आठवा हि होतां, नृप पावे पुत्रशोककष्ट महा; ।
'न करीं कुळघात' म्हणे 'एक तरि असो कुमार अष्टम हा. ॥ ४६
त्वां न सुत, पति [17]बुडविला; झालों सुतशोक[18]पावकीं तप्त; ।
यास हि बुडविसि काय ? क्रूरे ! ते बुडविले जसे [19]सप्त.' ॥ ४७

---

१. अत्यंत सुंदर अशा रूपाचे ठायीं. २. तुझ्या मुखचंद्राच्या कांतीच्या ठायीं रत ( गुंग ). ३. बोल. ४. उत्तम आहेत दांत जिचे, अशी. ५. स्नान करण्यास. ६. हें विशेषण साभिप्राय योजिल्यामुळें **परिकरा**लंकार. ७. माझी भार्या. ८. मृदु हास्य. ९. 'अप्रिय' असें पाठान्तर. १०. बऱ्या वाईट कृत्याला. ११. 'हे मी' असें पाठान्तर. १२. सुवर्णीं. वरिं ( वरीं ) हेमीं= उत्तम अशा सुवर्णाचे ठिकाणीं. वर=श्रेष्ठ, उत्तम. येथें 'रत्नं समागच्छतु काञ्चनेन' ह्या **कालि**दासोक्तीचें स्मरण होतें. 'रत्नवर हेमीं' असें पाठांतर. १३. शरीर. आपलें शरीर शांतनूस अर्पण करी—असा भाव. १४. जसा रसिका त्या पुराणीं [ त्याचें ] मन सदा [ रस ] दे, [ तसा ] नव ( नवीन ) रस त्या ( शांतनूला ) त्यांत ( गंगेच्या समागमांत ) [ प्राप्त झाला ]—असा अन्वय. १५. नूतन. १६. गंगा आपणास सोडून जाईल ह्या भीतीमुळें. १७. प्रथम चरणांत **'अपन्हुति'** अलंकार आहे. १८. पावक=विस्तव. १९. सात.

देवी म्हणे, 'नृपा ! तुज पुत्र प्रिय; मी नव्हें प्रिया; युक्त[1]; ।
हा सुत घे; जात्यें; त्वां विप्रियें[2] केलें; न रक्षिलें उक्त[3]. ॥ ४८
विप्रिय करूनि माझें, त्वां मत्सहवाससमय संपविला.' ।
ऐसें वदोनि, गंगादेवीनें तो नृपाळ कंपविला. ॥ ४९
मग कथिलें, 'मी गंगा; सुत हे वसु; आपवें[4] दिला शाप. ।
केले विमुक्त[5]; नाहीं केलें, त्वत्सुत वधूनि, म्यां पाप.' ॥ ५०
वसुशापाचें कारण पुसतां, गंगा म्हणे, 'असें झालें:—।
एका वसुच्या चित्तीं स्वस्त्रीचें दुष्ट[6] बोलणें आलें[7]; ॥ ५१
हरिली वसिष्ठमुनिची धेनु श्रीनंदिनी[8] स्वबळदर्पें[9]; ।
मग शापिलें; डसावें पुच्छ तुडवितां पदें, जसें सर्पें. ॥ ५२
'जन्मा[10] मनुष्यलोकीं' ऐसा सर्वांसि शाप; त्यांतें[11] नृपा ! ।
'सत्वर सुटाल जन्मुनि', अशि केली, कवळितां चि पाय, कृपा. ॥५३
जेणें केलें मुनिचें धेनुहरण, तो द्युसंज्ञ हा; याला ।
ऋषिचा वरप्रसाद, प्रणति[12] करुनि विनवितां, असा झाला. ॥ ५४
राहेल हा द्युनामा नरलोकीं बहुत काळ; परि हार[13] ।
होईल सज्जनांचा; प्रणतार्तींचा[14] करील परिहार[15]. ॥ ५५

---

१. योग्य. तुला तुझे पुत्र प्रिय आहेत, मी प्रिय नाहीं, हें योग्यच आहे. हें भाषण औपरोधिक आहे. २. जें आवडत नाहीं तें. ३. वचन. ४. वसिष्ठानें. 'आपव' हें वशिष्ठाचें नामांतर. निमीराजाच्या शापानें हा मरण पावला व पुढील जन्मीं वरुणाच्या पोटीं जन्मास आला, तेव्हां त्यास 'आपव' असें नांव प्राप्त झालें. ५. शापांतून मुक्त. ( मागें गीति १० पहा ). ६. दुष्ट बोलणें=खोडसाळ, दोषयुक्त भाषण. एकदां अष्टवसु आपल्या स्त्रियांसह वशिष्ठ ऋषीच्या तपोवनांत आले असतां त्यांच्या नजरेस नंदिनी नांवाची गाय पडली. जो मनुष्य तिचें दूध पिईल त्याचें तारुण्य सदा टिकून राहील व तो दहा हजार वर्षें जगेल, असा तिच्या दुधाचा गुण होता. म्हणून द्युनामक वसूच्या स्त्रीनें ती आपल्या जितवती नामक मृत्युलोकांतील सखीसाठीं पळवून आणावयास आपल्या पतीस सांगितलें. द्यूनें आपल्या पृथुप्रभृति भावांच्या साहाय्यानें ती गाय पळवून नेली. ही गोष्ट वशिष्ठऋषीस कळतांच त्यानें वसूंस शाप दिला ( मूळ अध्याय ९९ पहा ). ७. बोलणें चित्तीं आलें=बोलणें पसंत पडलें, भाषण मान्य झालें. ८. कामधेनूची मुलगी. ९. आपल्या आंगच्या बळाच्या गर्वानें. १०. जन्मास या, जन्म घ्या. ११. त्या शापाच्या बावतींत. १२. नमस्कार. १३. माला. तो सज्जनांच्या गळ्यांतील ताईत होईल–असा भाव. १४. नम्र झालेल्यांच्या पीडेचा. १५. निवारण.

शास्त्रनिपुण, धर्मात्मा, पितृभक्त, ब्रह्मचर्यपर, महित[1] ।
होइल लोकीं, जोडुनि कीर्ति; कुळाचें करील परम हित. ॥ ५६
नेत्यें शिशुला; मग हा येईल; त्यजिल न वसु धामातें[2]; ।
बहु[3] भुलविला पति, म्हणुन हे देऊँ[4] शाप न वसुधा[5] मातें'. ॥ ५७
दयिता[6] गेल्यावरि, तो हास्तिनपुरनाथ शांतनु प्राज्य[7] ।
क्रतु[8], दान-धर्म साधी; श्रीरामासारिखें करी राज्य. ॥ ५८
वेदानें[9] कथिलीं तीं करि कर्में; ब्राह्मणांसि दे दानें; ।
वर्षें छत्तीस नृपति कंठी गंगावियोगखेदानें. ॥ ५९
गंगातटासि मृगयाव्यासंगें जाय एकटा भूप. ।
तों स्तंब्ध, अल्प हि दिसे तोयें[10]; म्हणे, 'कां इचें असें रूप ?' ॥ ६०
भूप म्हणे, 'जाणवला[11] प्रियविरहक्लेशहेतु दुष्करसा. ।
गंगा हि मद्वियोगें झाली मत्तुल्य काय शुष्क-रसा[12] ?' ॥ ६१
करुनि विचार पहातां सर्वत्र, कुमार पटु[13], धनुष्पाणी[14] ।
दिसला; यत्कृत[15]मार्गणसेतुस्तव तें तसें[16] दिसे पाणी. ॥ ६२
झाला अदृश्य सत्वर दिव्याकृति जेधवां[17] कुमार-मणी[18], ।
सुत आठवुनि नृपें ती विनविलि, जशि शंकरें उमा रमणी[19]. ॥ ६३
दुर्लभ दर्शन, तनय हि द्याया, ती आपणासि तरुनि[20], करें ।
सुत धरुनि, ये; जिचें यश गावें संतानकादितरुनिकरें[21]. ॥ ६४

---

१. पूज्य. २. गृहातें. ३. आपला पति ( राजा ) शांतनु हा गंगेनें स्वतःच्या नादीं फार लाविला. म्हणून पृथ्वीनें मला शाप देऊं नये–असा गंगेच्या म्हणण्याचा भाव. ४. 'हे देवूं शाप न' असें पाठांतर ५. पृथ्वी. ६. प्रिय पत्नी. ७. पुष्कळ. ८. यज्ञ. ९. 'वेदांनीं' असें पाठांतर. १०. ज्याचा खळखळाट होत नव्हता असें पाणी. तोय=पाणी. ११. 'जाणविला' असें पाठांतर. १२. शुष्क आहे रस म्हणजे उदक जिचें अशी. १३. हुषार. १४. धनुष्य आहे हातीं ज्याच्या असा. १५. ज्यानें केलेल्या बाणरूप सेतूमुळें. १६. कमी, आटलेलें. १७. जेव्हां. १८. कुमार-श्रेष्ठ, उत्तम मुलगा. १९. पत्नी, तरुण सुंदर स्त्री. हें पंतांचें आवडतें यमक आहे ( मागें अध्याय ११।२८ व सभापर्व, अध्याय ४।५३ पहा ). २०. येथें 'तारुनि' असा पाठ असावयास पाहिजे होता. २१. संतानकादिक कल्पवृक्षांच्या समुदायानें. देवांचे वृक्ष पांच प्रकारचे आहेतः– पञ्चैते देवतरवो मन्दारः पारिजातकः । संतानः कल्पवृक्षश्च पुंसि वा हरिचन्दनम्. ॥ ( अमरकोश ).

आली निववायाला स[1]-हसा देवी जशी नव सुधा हो !
द[2]र्शन होतां चि, दिसों सहसा दे, वीजशी, न व[3]सुधा हो ! ॥ ६५
गंगा म्हणे, 'अहो जी ! तुमचा हा पुत्र आठवा; याला ।
न्या स्वगृहीं, मज स[4]मयीं, यातें पाहूनि, आठवायाला. ॥ ६६
हा शिष्य वसिष्ठाशीं, भृ[5]गुरामाशीं हि सम; न वे[6]दांत, ।
शास्त्रांत उणा; आधीं या आले वेद, मग नवे दांतें[7]. ॥ ६७
[8]गुरुशुक्रनीतिशास्त्रीं प[9]टु, भ[10]टपति श[11]क्रसम, र[12]वि ख[12]रा या ।
लाजेल, कीं कु[13]शळ हा, बहु श[14]रकर, करुनि स[15]मर, विखराय[16]ा. ॥६८
म्यां देवव्रत ऐसें याचें अ[17]न्वर्थ ठेविलें नाम; ।
ने पुत्ररत्न; शोभो[18] येणें कुळदीपकें तुझें धा[19]म'. ॥ ६९
देउनि सुतरत्न करीं, घेउनि प[20]तिचित्तवित्त, ती गेली. ।
नेत्रोदकें तिघांच्या गंगा गंगातटीं न[21]वी केली. ॥ ७०
पुत्रासि पुरीं नेउनि, शांतनु दे यौवराज्यपद त्यातें. ।
स[22]ामात्य पौ[23]र झाले वश त्या, प्रियपथ्य[24]सत्यवदत्यातें. ॥ ७१

---

१. स+हसा=हास्ययुक्त. सस्मिता—**पंत.** 'सस्मित' असें पाठांतर. २. हो ! दर्शन होतांचि सहसा वीजशी वसुधा दिसों न दे—असा अन्वय. वीज चकाकली असतां जसे डोळे दिपतात, त्याप्रमाणें गंगेचें दर्शन होतांच राजाचे डोळे दिपून त्याला पृथ्वी देखील दिसेनाशी झाली. ३. पृथ्वी. ४. कधीं कधीं. या मुलाकडे. पाहून माझी तुम्हांला आठवण यावी म्हणून—असा भाव. ५. भार्गवराम जो परशुराम त्याशीं सम=बरोबरीचा, बरोबरी करणारा. ६. वेदांत [ व ] शास्त्रांत उणा न—असा अन्वय. ह्या गीतींत **अतिशयोक्ति** अलंकार आहे. ७. मुलांचे पहिले ( दुधाचे ) दांत त्यांच्या वयाच्या सातव्या किंवा आठव्या वर्षी पडून त्यांस नवीन दांत येतात. म्हणजे देवव्रताचें वेदशास्त्राध्ययन त्याच्या वयाच्या आठव्या वर्षापूर्वीच संपूर्ण झालें होतें ! हें खुबीदार वर्णन **पं**तनिर्मितच आहे. ८. बृहस्पति जें शास्त्र जाणतो, तें ह्या तुझ्या महाबाहु व महाबुद्धिवान् पुत्राच्या ठिकाणीं अङ्गोपाङ्गांसहित सर्व वसत आहे. शुक्राला जें शास्त्र अवगत आहे, तें सर्व हा जाणतो—असें मूळांत आहे ( अध्याय १०० श्लोक ३६-३७ ). ९. चतुर. १०. योद्ध्यांचा स्वामी. ११. इंद्रासारखा. १२. प्रत्यक्ष सूर्य देखील. १३. 'लाजे कीं सुकुळ हा' असें पाठान्तर. १४. बाणरूपी किरण. १५. हा समर ( युद्ध ) करुनि बहु शरकर विखराया कुशळ ( प्रवीण ) [ असे ]—असा अन्वय. १६. पसरण्यास, जिकडे तिकडे फैलावण्यास. १७. खऱ्या अर्थाचें. १८. 'शोभे' असें पाठांतर. १९. गृह. येथें मूळांतील ९९ वा अध्याय संपतो. २०. पतीचें चित्तरूप द्रव्य. येथें **'परिवृत्ति'** अलंकार आहे. २१. नवी नदी. २२. प्रधानांसह. २३. पुरवासी लोक. २४. मधुर, हितकर व खरें बोलणाऱ्याला ( देवव्रताला ).

सत्पुत्रें सर्व भर[1] स्वशिरीं घेतां, प्रतीपसुत[2] हर्षें ।
नेता झाला, घटिका चार तशीं, चार उपरि[3] त्यां वर्षें. ॥ ७२
यमुनातीरवनीं तो गेला होता सुभूषित, सुवासा[4]; ।
तेथें नृपासि मारुत[5] भेटे न्हाऊनि[6], आणुनि[7] सुवासा. ॥ ७३
सत्यवतीनिकट[8] नृपा नेलें गंधें तदंगसंभूतें[9]; ।
जैसें तपोयशें मन वेधूनि उमासमीप शंभूतें. ॥ ७४
चेतोहर[10]गंधाढ्या ती, म्हणतों, दिव्य[11] पद्मकलिका[12], मी[13]; ।
घेउनि सुवास धांवत गेला जो, रसिक तो हि अलि[14] कामी[15]. ॥ ७५
यमुनातीरीं कन्या सत्यवती सुतनु[16] देखिली भूपें. ।
गमली ती भूमिगता[17] साक्षाद्देवी च अद्भुतें रूपें. ॥ ७६
पुसतां सांगे कन्यारत्न, न वदवे त्रपाभरें[18] तरि, तें; ।
'धर्मार्थ वाहत्यें पितृवचनें[19] मी दाशपतिसुता[20] तरितें[21].' ॥ ७७
चित्तीं म्हणे नृप, 'अहा ! चवरीची[22] झोडणी[23] च कीं केली ! ।
मोळिविक्यानें काष्ठें फोडाया असिलता[24] वना[25] नेली !' ॥ ७८
भरली मनांत नवरी, मागाया दाशपतिकडे गेला; ।
मग त्यास स्वमनींचा अर्थ श्रुत आपुल्या मुखें केला. ॥ ७९

---

१. (राज्याचा) भार. २. शांतनु. ३. त्याउपरी=त्यानंतर, त्याला घरीं आणल्यानंतर. याप्रमाणें त्या महापराक्रमी शांतनुराजानें पुत्राच्या सहवासांत चार वर्षें सुखानें घालविलीं–असें मूळांत आहे. (अध्याय १०० श्लोक ४४). ४. उत्तम वस्त्र नेसलेला. ५. वायु. ६. स्नान करून म्हणजे सजल होऊन. अर्थात् ज्यामध्यें बारीक बारीक जल–तुषार मिश्र आहेत, असा वारा. ७. सुगंधास घेऊन. ८. निकट=जवळ. ९. तिच्या अंगापासून उत्पन्न झालेल्या. १०. चित्त हरण करणाऱ्या सुवासानें पूर्ण अशी. ११. स्वर्गीय, स्वर्गातील. १२. कमळाची कळी. १३. मी=मोरोपंतकवि. १४. भ्रमर. १५. कामातुर (राजा शांतनु). १६. सुंदर. १७. पृथ्वीवर अवतरलेली. १८. लज्जातिशयामुळें श्रोता व वक्ता यांस संकोच वाटण्यासारखें सत्यवतीनें कांहीं सांगितलें, असें दिसत नाहीं. (मूळ अध्याय १०० श्लोक ४७-४८). १९. बापाच्या सांगण्यावरून. २०. कोळ्यांच्या राजाची कन्या. २१. नौकेतें. २२. 'चवरी ती' असें पाठांतर. २३. केरसुणी. 'ह्या गीतींत **'विषम'** नामक अलंकार आहे. कारण सत्यवतीस तरीवर पाहून राजा शांतनु वरील उद्गार काढीत आहे आणि सत्यवतीची स्थिति तीस अगदीं शोभत नाहीं, असें वर्णन करीत आहे. इतकेंच कीं या [ गीतीवर ]–अन्योक्तीची किंवा अतिशयोक्तीची किंवा निदर्शनेची छाया पडली आहे' (अलंकारमीमांसा). २४. तरवार. २५. 'वनीं नेली' असें पाठांतर.

दाशपति म्हणे, 'आहें जातीनें मी, नव्हें नवा, हीनें.[१] ।
द्यायाची च सुता[२]; वररत्नपदीं[३] तीस कां न वाहीन ? ॥ ८०
परि आहे मच्चित्तीं, तो राया ! एक काम[४] पुरवा हो ! ।
सद्वरलाभसुखामृतपूरीं[५] माझें प्रकाम[६] पुर[७] वाहो.' ॥ ८१
'वद काम, देय[८] देऊं.' भूप म्हणे. दाशपति वदे वाचा[९]; ।
'तुजमागें नृप हो, जो होईल इला[१०] कुमार देवाचा[११].' ॥ ८२
स्मरहत[१२] जरि नृप, निर्मळ जें[१३] मेळविलें मळों न दे यश तें, ।
गेला पुरासि; कीं तो न सुता[१४] देइल वळोन देय-शतें[१५]. ॥ ८३
भूप[१६] ह्मणे, 'हा करितो युग[१७], न धरुनि भीड, काम यामातें[१८]. ।
सुखवील ती[१९] च मात्रा[१९], नाशुनि हृत्पीडकामया[२०], मातें'. ॥ ८४
गांगेय[२१] पित्यासि पुसे, 'दिसतां कृश, हरिण[२२]; काय[२३] हो ! तात ! ।
कारण[२३] ? चिंतारोगें जन ऐसे क्षीणकाय[२४] होतात. ॥ ८५

---

१. मी जातीनें ( जन्मतःच ) हीन आहें. मी नवा ( नवीन हीन ) नव्हें—असा अन्वय. मी मूळचाच हीन जातीचा आहें. मी आतां नवीन—अर्थात् माझ्या दुष्कर्मामुळें—हीन झालों आहें, असें नव्हे. सारांश, मी हीनजातीय असलों तरी कुलशीलवान आहें—असा भाव. २. कन्या. कल्पनासादृश्यः—जयाचें ठेविलें तया । देऊनि होइजे उतरायिया. ( ज्ञानेश्वरी ). पुढें अध्याय ३१ गीति २८ पहा. ३. उत्तम पतीचे पायांवर. ४. इच्छा. ५. चांगला वर ( अभीष्ट, देणगी ) लाभल्यामुळें होणाऱ्या सुखरूप अमृताच्या पुरामध्यें. वर कोणता पाहिजे, हें पुढें ८२ व्या गीतीच्या उत्तरार्धांत सांगितलेलें आहे. वर=जांवई—असा अर्थ आहे. तोही घेण्यास हरकत नाहीं. ६. यथेच्छ. ७. नगर, राजधानी. ८. देण्यास योग्य असेल तें. 'वद काम, काय देऊं ?' असा पाठभेद. ९. भाषण, उत्तर. १०. जो इला ( हिच्या पोटीं ) देवाचा कुमार ( राजपुत्र ) होईल [ तो ] तुजमागें नृप हो ( होवो )—असा अन्वय. ११. नृपाचा—**पंत.** १२. मदनानें पीडिलेला. १३. 'परि' असें पाठांतर. १४. कीं ( कारण ) तो ( दाशपति ) देयशतें ( पुत्राला राज्य देण्याच्या वचनाखेरीज इतर शेंकडों देणग्यांनीं ) वळोन ( वळून, कबूल होऊन ) सुता ( कन्या, सत्यवती ) न देइल—असा अन्वय. १५. शेंकडों देणग्यांनीं. १६. हें शांतनूचें स्वगत भाषण आहे. हा काम यामातें ( प्रहरातें ) युग ( युगासारखें मोठें, कंटाळवाणें ) करितो—असा अन्वय. १७. एक युग म्हणजे त्रेचाळीस लक्ष वीस हजार वर्षें. १८. प्रहरातें. [ याम=] प्रहर—**पंत.** १९. सत्यवतीरूप मात्रा ( औषध ). २०. हृत्+पीडक+आमया=हृदयास पीडा करणाऱ्या रोगास. २१. गंगापुत्र ( भीष्म ). २२. पांडुरवर्ण, फिकट. २३. ( असे कृश होण्याचें ) काय कारण ? २४. कृशदेह.

चिंता काय![1] तया तुज, धरुनि शिरीं सर्व भूप पादरजा,[2] ।
भावें उपासिती, सुर शक्रासि[3] तसे, सदैव सादर ज्या. ॥ ८६
व्याधि[4] कळों द्या; त्याची क्षिप्रं[5] करीन प्रतिक्रिया,[6] देवा ! ।
अस्वस्थ[7] सर्व झाले, तुमची स्वर्वल्लि[8] ज्यां जनां सेवा.' ॥ ८७
राय म्हणे, 'काय वदों ? वत्सा ! देवव्रता ! तुज पहातों ।
तेव्हां चि पावतों तट[9]; चिंतापूरीं[10] सदैव हि वहातों. ॥ ८८
एक[11] अपत्य जया, तो अनपत्य चि; त्यांत नित्य तूं शस्त्री[12]; ।
लोक[13] हि अनित्य[14] वाटे; करिजे रक्षावया स्ववंश[15] स्त्री[16]. ॥ ८९
जें पूर्वजीं मिळविलें, करिशिल वाढवुनि तूं जतन यश तें. ।
तूं स्वसम[17] चि; बा ! घ्यावें कुशळें एका हि तूज तनय-शतें[18]. ॥ ९०
काळप्रवाह दारुण; नेणों होईल चलन सेतूतें[19]; ।
हें दुःखाचें कारण **गांगेया** ! पाठिबल[20] नसे तूतें.' ॥ ९१
पितृवचन श्रवण करुनि, देवव्रत पितृसखा अमात्यातें ।
गुरुचिंताहेतु[21] पुसे; तो सांगे सर्व[22] सत्तमा[23] त्या[23] तें[22]. ॥ ९२
वृद्धामात्यें कथितां, तातप्रिय[24] दाशपतिकडे तूर्ण[25] ।

---

१. 'चिंता काय जया तुज' असें पाठांतर. २. पायांची धूळ. ३. इंद्राला. ४. शरीरपीडा. ५. सत्वर. ६. उपाय. ७. दुःखी, कष्टी. ज्यां जनां तुमची सेवा स्वर्वल्लि [ आहे, असें वाटतें ते ] सर्व अस्वस्थ झाले–असा अन्वय. आपल्या राजाच्या जीवाला जर कांहीं अपाय झाला, तर आपला कल्पवृक्षच गेला, असें स्वामिभक्त सेवकांस वाटणें योग्यच आहे. पण त्यांस असें वाटावयास लावणाऱ्या राजाची योग्यताही तशीच असावी लागते. ८. कल्पलता. ९. तीर. चिंतापुरांत वाहून जात नाहीं, मनाला थोडें स्वास्थ्य मिळतें–असा भाव. १०. काळजी हाच पूर, त्यांत. ११. 'अनपत्यं त्वेकपुत्रमित्याहुर्धर्मवादिनः' [ म्हणजे–एक पुत्र असणें, हें अपत्य नसल्यासारखेंच होय–असें धर्म सांगणारे म्हणतात ]. असेंच मूळांतही आहे ( अध्याय १००।६७ ). १२. शस्त्र धारण करणारा, लढवय्या. १३. इहलोक. १४. अशाश्वत. १५. 'स्वदेश' असें पाठांतर. १६. नूतन पत्नी–असा भाव. १७. तुझ्यासारखा तूंच–असा भाव. **'अनन्वया'**-लंकार. १८. शेंकडों पुत्र मोबदला देऊन. १९. सेतु=पूल, बांध. २०. पाठबळ, साहाय्य. तुला पाठचे भाऊ नाहींत–हा इत्यर्थ. २१. बापाच्या काळजीचें कारण. २२. तें सर्व=सत्यवती-संबंधीं वर्तमान. २३. त्या सर्वश्रेष्ठ अशा भीष्माला. २४. पितृभक्त, बाप आहे आवडता ज्याला, असा. २५. सत्वर.

सार्य[1] नदीसुत[2] गेला, कार्य पित्याचें करावया पूर्ण. ॥ ९३
लंघी[3], जेंवि गयेच्या, बुध[4] तो गुरुचित्तरंजनाश[5], पथा. ।
दाशवरोक्त[6] शिरीं[7] घे; करि, तत्संदेहभंजना[8], शपथा. ॥ ९४
पुनरपि दाशपति म्हणे, 'त्वदपत्याचें[9] परंतु भय वाटे; ।
कीं राज्यलोभ दारुण; यां[10] भीष्मीं स्नेहनीतिनद[11] आटे.' ॥ ९५
गांगेय म्हणे, 'त्यजिला स्त्रीसंग; सशंक[12] दाशवर ज्यांत; ।
अनृत वदेन तरि गळो हें, न रणमखीं[13] कदा, शव[14] रजांत[15].' ॥ ९६
करितां अशी प्रतिज्ञा, दाशपति म्हणे, 'दिली सुता[16], साधो[17]! ।
या धर्में त्वच्चिंतित सर्व हि पितृभक्तसंस्तुता[18]! साधो[19].' ॥ ९७
त्या समयीं ऋषिसुरगण करुनि कुसुमवृष्टि म्हणति, 'हा भीष्म[20]; ।
हा विषयवासनासरिदंतकतेजा[21] चि केवळ भीष्म.' ॥ ९८
तो सत्यवतीस म्हणेः—'चाल; असो तातचित्त[22] महि[23], माते[24]! ।
वर्णिति नभीं पहा ऋषि, देव तुझा अतुळभाग्यमहिमा[25] ते[26].' ॥ ९९

---

१. अमात्यादि आर्यासहवर्तमान. २. [ गंगा ] नदीचा पुत्र भीष्म. ३. क्रमी. एकादा पितृभक्त पुत्र पितरांस मुक्ति मिळावी म्हणून जसा मोठ्या तत्परतेनें गयेच्या यात्रेस जातो, त्याप्रमाणें देवव्रत तावडतोब दाशपतीकडे गेला—असा भाव. ४. शहाणा ( भीष्म ). ५. पित्याच्या मनाचें रंजन व्हावें असें इच्छिणारा. ६. दाशपतीचें जें म्हणणें होतें, तें. ७. शिरसा मान्य करी. ८. त्याचा ( दाशपतीचा ) संशय घालविण्याकरितां. ९. तुझ्या पुत्राचें, अर्थात् जो पुढें होण्याचा संभव आहे, त्याचें. १०. या राज्यलोभरूप उन्हाळ्यांत. ११. प्रीति व न्याय ह्याच कोणी नद. १२. संशययुक्त. १३. रणयज्ञांत म्हणजे रणभूमीवर. १४. शरीर. १५. धुळींत. १६. कन्या. १७. हे सत्पुरुषा! १८. पितृभक्तांत प्रशंसनीय अशा ( देवव्रता! ). १९. साध्य होवो. २०. भयंकर. 'हा ( देवव्रत ) भीष्म ( भयंकर ) आहे' असे उद्गार देवांनीं काढिले. ( मूळ अध्याय १००।९८ ). २१. विषय+वासना+सरित्+अंतक+तेजा=विषयवासनारूप नदीचा नाश करणारें तेज (पराक्रम, सामर्थ्य) आहे ज्याच्या ठिकाणीं असा. २२. बापाचें चित्त. २३. सोत्सव-**पंत.** ( मह=उत्सव, त्यानें युक्त तें महि ). 'महिं' असें पाठान्तर. महिं= उत्सवांत. २४. 'मातो' असें पाठांतर. मूळांत देखील भीष्माच्या तोंडीं 'माते!' असा शब्द घालून आत्यंतिक पितृनिष्ठा व गाढ मातृभक्ति ( सत्यवती सापत्न माता असूनही ) ह्या त्याच्या ठिकाणीं वसत असलेल्या उच्च मनोवृत्तींचें दिग्दर्शन केलेलें आहे. ( अध्याय १००।९९ ). २५. मोठेपणा. २६. 'तो' असें पाठांतर.

दिधली सुदुर्लभा त्या सत्पुत्रें त्या पित्यासि सत्यवती. ।
'स्वच्छंदमृत्यु[1] हो' अशि आशी[2] तातें हि त्यासि सत्यवती[3]. ॥ १००

---

## अध्याय चौदावा.

सत्यवतीसुत पहिला चित्रांगद, जेंवि रात्रिकान्त[4] नवा[5], ।
सुखकर; दुसरा झाला, त्या नांव विचित्रवीर्य शांतनवा[6][7]. ॥ १
शंतनुनृप भीष्माच्या हातीं तें पुत्रयुग्म[8] दे हातें[9]; ।
गेहांतें[10] देवांच्या जातां, काळाचिया[11] स्वदेहातें. ॥ २
भीष्में राजा केला चित्रांगद; तो अतीव अभिमानी. ।
काय कथा[12] मनुजांची ? असुरांसि[13], दिवौकसांसि[14] हि न मानी. ॥ ३
त्यातें, गंधर्वाधिप चित्रांगद कपटपाटवें[15] भारी[16] ।
तीरीं सरस्वतीच्या, वर्षत्रय युद्ध करुनियां मारी[17]. ॥ ४
शांतनवें[18] मातृमतें विधिनें देवूनि पितृपद भ्रात्या ।
बाळा विचित्रवीर्या, दिधली नयशक्ति[19] ही अदभ्रा[20] त्या. ॥ ५
होतां विवाहदीक्षायोग्य भ्राता नदीज[21] तो कानीं ।
काशिपसुतास्वयंवर[22] परिसे, कथितां स्वदूत-लोकांनीं. ॥ ६
वाराणसीस जाउनि, काशिपतिसुता[23] तिघी हि भीष्म हरी. ।
कन्यार्थि[24], युयुत्सु[25], समरनिपुण[26], नृपतिकुंजरांत[27] होय हरी[28]. ॥ ७

---

१. स्वतःच्या इच्छेस वाटेल तेव्हां मरण पावणारा. २. आशीर्वाद. ३. खरी. येथें मूळांतील १०० वा अध्याय संपतो. ४. चंद्रमा. ५. 'नव' असें पाठान्तर. ६. शंतनुपुत्राला. ७. 'शान्तनव' असें पाठांतर. ८. पुत्रद्वय. ९. ( आपल्या ) हातानें, स्वतः. १०. गृहातें. ( स्वर्गीं जाते वेळेस, असा भाव. ) ११. काळाच्या हातीं आपल्या देहातें दिलें. १२. येथें **'काव्यार्थापत्ति'** नामक अलंकार आहे. १३. राक्षसांस. १४. स्वर्गलोक हेंच स्थान ज्यांचें असे जे देव, त्यांस. १५. भारी ( अत्यंत ) कपटपटुत्वानें. १६. 'मारी' असें पाठांतर. १७. 'भारी' असें पाठांतर. १८. भीष्मानें. १९. राजनीतिज्ञान. २०. अ+दभ्र=नाहीं+थोडें=पुष्कळ. येथें मूळांतील १०१ वा अध्याय संपतो. २१. भीष्म. २२. काशिराजाच्या कन्यांचा विवाह. २३. अंबा, अंबिका व अंबालिका. २४. कन्या इच्छिणारा. २५. युद्ध करूं इच्छिणारा. २६. युद्धकुशल. २७. राजरूप हत्तींत. अर्थात् ( अन्य ) राजे हेच कोणी हत्ती, त्यांमध्यें. २८. सिंह.

बहु भूप भग्न केले, परि मागें शाल्व लागला एक; ।
जीर्णों[1] महोरगावरि[2] गेला धावोनि मातला[3] भेक[4]. ॥ ८
तो विरथ[5] मात्र केला, आंवरिला घातकाम[6] हात रणीं; ।
तेज चि खद्योताचें[7] हरिल, करिल घात कां महातरणी[8] ? ॥ ९
भगिनी[9]-सुता-सुनांशा[10] त्या नेल्या निजगृहासि शांतनवें[11]. ।
त्याचें जन्मापासुनि सदय विमळ[12] चित्त; न प्रशांत[13] नवें. ॥ १०
लग्नोपक्रमसमयीं[14] ज्येष्ठा अंबा म्हणे, 'मला न वरा; ।
नवराजीवाक्ष[15] हि हा नलगे; मज शाल्व मानला नवरा. ॥ ११
माझा, मज्जनकाचा, शाल्वाचा ही विचार हा; निकर[16] ।
क्षत[17] मन्मनोरथांचा करितां, हें कर्म धर्महानिकर.' ॥ १२
पाठविली माघारी अंबा, कथिलें तसें चि साधूंनीं[18]; ।
बंधूंसि[19] अंबिकेसह दिधली अंबालिका हि साधूनी. ॥ १३
नृप[20] कामात्मा[21] झाला; लावण्य, प्रेम अतुल दोघींचें. ।
वाहे शृंगाररसीं तन्मानस, जेंवि पुष्प ओघींचें[22], ॥ १४
स्त्रीविषय सात वर्षें रात्रिंदिव[23] भोगितां न तो धाला[24]. ।
झाला[25] वश कामाच्या अहिता; न हिता स्वकीय बोधाला. ॥ १५
देहज[26] यक्ष्मा[27] त्याला खाय, जसा आश्रयाश[28] आहुतिला. ।
जी राजकांति[29] होती, लेश हि नुरवी च रोगराहु[30] तिला. ॥ १६

---

१. **उत्प्रेक्षा**लंकार. २. मोठ्या सर्पावर. ३. माजलेला. ४. बेडूक. ५. रथरहित. ६. ठार मारण्याची इच्छा ज्याला आहे, असा. ७. काजव्याचें. ८. सूर्य. भीष्माच्या पराक्रमाचें वर्णन मूळांत सविस्तर केलेलें आहे. ( अध्याय १०२ श्लोक १७–५६ पहा). ९. 'भगिनी सुना-सुताशा' असा पाठ स्वीकारिल्यास भगिनी म्हणजे त्या तिघी बहिणी ( काशिराजाच्या मुली )–असा अर्थ. १०. [ आपल्या ] बहिणी, मुली किंवा सुना यांप्रमाणें. ( अध्याय १०२।५७ ). ११. भीष्मानें. १२. निर्मळ, निष्कलंक. १३. शमयुक्त, सौम्य. १४. विवाहारंभाचे वेळीं. १५. नूतन कमलपत्रासारखे नेत्र ज्याचे असा. **दामयमक.** १६. समुदाय. १७. नष्ट, खंडित. 'क्षय' असें पाठांतर. १८. संतांनीं. १९. विचित्रवीर्यास. २०. राजा विचित्रवीर्य. २१. मदनाधीन. २२. पाण्याच्या ओघांतील. २३. 'रात्रदिवस' असें पाठांतर. २४. तृप्त झाला. २५. [ विचित्रवीर्य ] अहिता कामाच्या वश झाला, स्वकीय हिता बोधाला न [ वश झाला ]–असा अन्वय. २६. देहांत उत्पन्न झालेला. २७. क्षयरोग. २८. अग्नि–**पंत.** २९. राजाचें तेज, ( पक्षीं ) चंद्राचें तेज. येथें 'राज' शब्दावर **श्लेष** आहे. राजन्=( १ ) राजा; ( २ ) चंद्र. ३०. रोगरूपी राहु.

न चुके चि भावि[1]; चुकतें तरि, मृत्यु न व्हावया[2] सकाम[3] रण ।
करिता चि भीष्म, येतें मग त्या मध्यमवयास[4] कां मरण ? ॥ १७
सत्यवती साश्रु म्हणे, 'गेला टाकुनि सकाय[5] गेहा[6] हा; ।
लोकांत मंदभाग्या[8] मी च; करूं यत्न काय ? गे ! हा ! हा !' ॥ १८
चिंताशोकव्याकुळ भीष्म हि मुकला क्षण स्वभावाला; ।
करवूनि पारलौकिकें[9], करि सद्गति समुचित स्वें[10] भावाला. ॥ १९

---

## अध्याय पंधरावा.

दीना होउनि देवी[11] सत्यवती पुत्रशोकतापानें, ।
भीष्मासि म्हणे, 'साधो ! रक्षावें कुळ तुवां अ-पापानें[12]. ॥ १
धर्में[13] त्वन्माता मी, धर्मज्ञा[14] ! धर्मसेतु[15] रक्षाया ।
कथितें तें मान्य करीं, स्वीकारीं स्त्री, स्वधर्म-दक्षा या[16]. ॥ २
मी गुरु[17], मदुक्तिनें या स्त्रीस्वीकारीं नसे तुला पाप. ।
आपद्धर्म[18] असे हा[19] बा ! पद गुरुचें वरीं, हरीं ताप. ॥ ३
स्वजनां हो तृप्ति तुझ्या[20] ठायीं, जैशी शिलीमुखां[21] बकुळीं. ।
कुरुकुळगृह[22] न खचावें; याला आधार तूं चि खांब कुळीं.' ॥ ४
भीष्म म्हणे, 'माते ! त्वां धर्म चि कथिला, परि प्रतिज्ञा ते ।

---

१. पुढें होणारें. २. 'मृत्यु न व्हावयासि काम रण' असें पाठांतर. काम=यथेष्ट, पुष्कळ. ३. पूर्ण झाली आहे इच्छा ज्याची, असा. ४. 'मध्यमवयांत' असें पाठांतर. ५. शरीरासह. ६. गृहा. ७. विचित्रवीर्य. ८. दुर्दैवी. ९. परलोकसंबंधीं कृत्यें, उत्तरक्रिया वगैरे. १०. आपल्या बंधूस ( विचित्रवीर्यास ). येथें मूळांतील १०२ वा अध्याय संपतो. ११. राणी. १२. निष्पाप अशा तुवां (त्वां). १३. तूं जरी माझा पुत्र नव्हेस, तरी धर्मशास्त्रदृष्ट्या मी तुझी आईच आहें म्हणून—असा भाव. १४. धर्मशास्त्रवेत्त्या ! **परिकरा**लंकार. १५. धर्ममर्यादा. १६. या ( अंबा व अंबालिका ) स्वधर्मदक्षा [ आहेत ]—असा अन्वय. तुझ्या भावाच्या ह्या दोघी पट्टराण्या शुभलक्षणांनीं युक्त, तरुणी व रूपसंपन्न असून त्या 'आपणास पुत्र असावे' अशी इच्छा करीत आहेत. तरी आपल्या कुलाचा विस्तार व्हावा, यासाठीं तूं त्यांच्या ठिकाणीं पुत्रांची उत्पत्ति कर—असें मूळांत आहे ( अध्याय १०३ श्लोक १०-११ ). 'स्वधर्म रक्षाया' असें पाठांतर. १७. वडील. १८. संकटसमयीं आचरावयाचा धर्म. १९. स्त्रीस्वीकाररूप. २०. रा० पराडकर यांच्या प्रतींत 'तुझा' असा शब्द आहे. २१. भ्रमरांस. २२. कुरुकुळरूपी घर.

अत्याज्य[1]. भीति[2] सत्यभ्रंशासि, न बहु अरिप्रति[3] ज्ञाते. ॥ ५
म्यां ब्रह्मचर्यसुव्रतनियम[4] स्वमुखें त्वदर्थ जो केला, ।
देह त्याज्य, परि न तो त्याज्य; न सेवील सुज्ञ ओकेला[5]. ॥ ६
त्यजितील[6] पंचभूतें[7] स्वगुणांसि[8], रवी छवीस[9] सोडील, ।
शीतत्वातें चंद्र हि, शक्र हि कर[10] विक्रमासि जोडील; ॥ ७
उष्णत्व त्यजिल दहन[11], मर्यादेतें हि सिंधु[12] सोडील, ।
धर्मपर धर्मराज हि सद्धर्मप्रीतिला हि तोडील; ॥ ८
परि हा शांतनव[13], तुझा सुत, केवळ कृपण[14] मान, सत्य जितां[15] ।
मेल्या हि न टाकील, प्राणासि[16] न भीतमानस त्यजितां.' ॥ ९
देवी म्हणे, 'खरें हें; सांगाया योग्य होय मी; नातें[17] ।
गंगेचें माझें सम, जाणें तुज सत्य-तोय-मीनातें[18].' ॥ १०
भीष्म म्हणे, 'मज न शिवे सत्यभ्रष्टत्व, वंश यश राहे, ।
ऐसा विचार[19], शिष्टश्रुतिमान्य[20], विचारिशील तरि आहे. ॥ ११
पूर्वी पितृवधकुपितें[21] रामें स्वीकारुनि स्वगुरु-केली[22], ।

---

१. सोडण्यास अयोग्य. २. रा० पराडकर यांच्या प्रतींत 'भिती' असा शब्द आहे. ३. शत्रुप्रत. ४. ब्रह्मचर्यव्रतरूप उत्तम नियम. ५. वांतीला. ६. 'पंचभूतांचा व गुणांचा संबंध जरी तुटेल तरी' असें म्हणणें म्हणजे संबंधाच्या ठिकाणीं असंबंधाची कल्पना करणें होय. अशाच प्रकारचें वर्णन गीति ७ व ८ यांत आहे, म्हणून त्यांत **'असंबंधातिशयोक्ति'** अलंकार झाला आहे. ७. पृथिवी, आप, तेज, वायु, आकाश, हीं पांच मूलतत्त्वें. ८. आपल्या गुणांस. (शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध यांस). ९. कांतीस. १०. कर जोडणें=हात जोडणें, शरण जाणें. 'करविक्रमासि तोडील' असा पाठभेद. करविक्रम=बाहुपराक्रम. ११. अग्नि. १२. समुद्र. १३. शांतनूचा पुत्र. १४. कृपण=लोभी. मान=समज. मी आपल्या प्रतिज्ञेचें रक्षण करण्याच्या बाबतींत मोठा लोभी किंवा कंजूष आहें—असा भाव. वरील दोन गीतींत जे जे संबंध तुटतील असें भीष्मानें म्हटलें आहे, ते कधींही तुटावयाचे नाहींत. पण ते ते संबंध कदाचित् तुटतील अशी कल्पना केली, तरी मी आपली प्रतिज्ञा मोडणार नाहीं, अशी भीष्मानें आपल्या दृढनिश्चयाची पराकाष्ठा सांगितली आहे. (मूळ अध्याय १०३ श्लोक १६-१९ पद्य). १५. जीवंत असतां. [ हा ] जितां मेल्या हि ( जीवंत असला किंवा मेला तरी ) सत्य न टाकील—असा अन्वय. १६. प्राणासि त्यजितां [ मी ] भीतमानस ( ज्याच्या मनाला भीति वाटते असा ) न ( नाहीं )—असा अन्वय. १७. गंगा तुझी माता, तशी मी देखील तुझी माताच—असा भाव. १८. सत्यरूपी जलांतील मासा, अर्थात् सत्यप्रतिज्ञ. १९. 'उपाय' असें पाठांतर. २०. विद्वान् व वेद यांस मान्य असा. २१. आपला पिता जो भृगु, त्याच्या वधामुळें रागावलेल्या परशुरामानें. एकदां हा

वधुनि सहस्रभुजार्जुन, असकृत् निःक्षत्रिया धरा केली. ॥ १२
क्षत्रियवंश बुडविले; वधिले जे जे प्रसिद्ध योध रणीं; ।
पोटीं शिशु हि नुरविले; राम म्हणे, 'क्षत्रहीन हो धरणी.' ॥ १३
संतानार्थ शरण मग विप्रांसि क्षत्रियस्त्रिया गेल्या. ।
ज्या केवळ चि बुडाल्या संतति, त्या प्रकट मागतीं केल्या. ॥ १४
गुरुशप्त उतथ्याचा सुत, ममताकुक्षिजात, दीर्घतमा ।
होता प्रकाशमैथुनदोषी, परि आश्रय श्रुतोपशमा. ॥ १५
स्त्रीपुत्रांनीं तो ऋषि, त्या दोषें, जान्हवींत वाहविला. ।

---

आश्रमांत नसतां, कार्तवीर्यराजानें याच्या पित्याची कामधेनु बलात्कारानें हरण केली व तिच्यासह तो आपल्या नगरास गेला. तें वर्तमान यास कळतांच, तिकडे जाऊन त्यास यानें निरोप पाठविला कीं, तुम्ही आणलेली आमची कामधेनु परत द्यावी, नाहीं तर युद्धास यावें. या निरोपामुळें कार्तवीर्यास क्रोध येऊन त्यानें परशुरामाशीं युद्ध केलें. त्यांत यानें कार्तवीर्याचे हजार हात तोडिले व त्यास ठार मारून कामधेनूस परत आणिलें. या गोष्टीस बराच काल लोटल्यानंतर कार्तवीर्याच्या पुत्रांनीं, परशुराम आश्रमांत नाहीं असें पाहून, भृगुऋषीचा ( जमदग्नीचा ) वध केला व ते पळून गेले. यामुळें परशुरामास पराकाष्ठेचा राग आला व त्यानें 'पृथ्वीवरील सर्व क्षत्रियांचा संहार करीन' अशी प्रतिज्ञा केली, व त्याप्रमाणें त्यानें एकवीस वेळां पृथ्वी निःक्षत्रिय करण्याचा प्रयत्न केला—अशी कथा आहे. २२. आपला गुरु जो शंकर, त्याची संहार करण्याची क्रीडा. केली=क्रीडा.

१. ज्याला सहस्र भुजा आहेत असा अर्जुन. हा कृतवीर्य राजाचा पुत्र. यास कार्तवीर्य आणि सहस्रार्जुन अशीं नांवें होतीं. २. वारंवार. ३. 'बुडाले' असें पाठांतर. ४. पोटामध्यें ( गर्भांत देखील ). 'पाठीं' असें पाठान्तर. ५. मागाहून. 'मागुती' असें पाठांतर. ६. बृहस्पतीनें शापिलेला. ७. बृहस्पतीचा बंधु जो उतथ्य, त्याचा. ८. उतथ्याच्या ममतानामक स्त्रीच्या कुशीपासून झालेला. ९. उतथ्यपुत्र. 'तूं दीर्घतमामध्यें—अंधारामध्यें—प्रवेश करिशील ( अर्थात् आंधळा होशील )'—असा बृहस्पतीनें त्यास शाप दिल्यामुळें त्याचें दीर्घतमा असें नांव प्रसिद्ध झालें. ( मूळ अध्याय १०४।२२ ). १०. उघड्या ठिकाणीं मैथुन करण्यामुळें दोषी. ११. 'परि आश्रय प्रतोषशमा' असें पाठान्तर. १२. ( ह्या अशा प्रकारच्या आचरणाला ) श्रुत ( शास्त्र ) व उपशम ( शांति ) यांचा आश्रय ( आधार ) होता—असा भाव. 'उतथ्य ऋषीच्या संतानाची व कुलाची अभिवृद्धि व्हावी म्हणून वेदांमध्यें आणि वेदांगांमध्यें निपुण आणि धर्मांचें आचरण करणाऱ्या त्या महात्म्यानें कामधेनूच्या पुत्रापासून सर्व 'गोधर्म' शिकून घेतला आणि त्यावर श्रद्धा ठेवून तो निःशंक मनानें आचरूं लागला. त्यानंतर दीर्घतमा ऋषीचें हें आचरण मर्यादेला सोडून आहे, असें पाहून त्या आश्रमांत राहाणारे सर्व मुनिश्रेष्ठ क्रोधामुळें मूढ झाले—' असें मूळांत आहे ( अध्याय १०४ श्लोक २४–२७ ). गोधर्म=गाईबैलांप्रमाणें मैथुनक्रिया दिवसा उघडपणें करणें. १३. गंगेंत.

संतानार्थ बलि[1]नृपें प्रार्थुनि तो निजगृहांत राहविला. ॥ १६
यापासूनि सुदेष्णा[2]राज्ञीला पुत्र जाहला अंग, ।
दुसरा कलिंग, पुंड्र हि, सुह्म हि, तैसा चि पांचवा वंग. ॥ १७
ऐसा आपद्धर्मव्यवहार असे; म्हणोनियां क्षिप्र ।
कोणी[3] विचित्रवीर्यक्षेत्रीं[4] संतान वाढवू विप्र[3].' ॥ १८
देवी[5] म्हणे, 'हित वदसि तूं बा! सद्बुद्धिच्या अगारा[6]! या ।
माझ्या हि हितगुजाचें श्रवण करीं सज्जना! अगा! राया!' ॥ १९
लज्जा वदों न दे, परि चिंतिति ज्याचे पवित्र पाय कवी, ।
श्रीमत्पराशराची पुण्यकथा स्वानुभूत[7] आयकवी. ॥ २०
व्यासजनन[8] कथुनि, म्हणे, 'प्रदक्षिणा पुत्र मज करी नमुनी. ।
जातां[9], वदे असें कीं, 'स्मरतां येउनि, सुखी करीन,' मुनी[10]. ॥ २१
येइल तुझ्या मना, तरि त्याला या संकटांत बाहेन[11]. ।
संततिचिंताशमन[12] प्रार्थुन त्या मुनिवरास पाहेन.' ॥ २२
भीष्म वदे, पडतां तें कानीं, 'नमुनि वरदास, विश्वास[13] ।
धार्यां[13], स्मर; रक्षिल तो कानीन[14] मुनिवर दास-विश्वास[15].' ॥ २३

---

१. हा ययातिकुलोत्पन्न सुतपाराजाचा पुत्र. ह्याच्या स्त्रीचें नांव सुदेष्णा. हिच्या ठायीं त्यानें दीर्घतमा ऋषीकडून अंग, वंग, सुम्ह, पुंड्र, आणि कलिंग असे पांच पुत्र निर्माण करविले होते. (मूळ अध्याय १०४ श्लोक ५३-५५). [बलिराजानें सुदेष्णाराणीला पुत्रप्राप्त्यर्थ दीर्घतम्याकडे कां पाठविलें, ह्यासंबंधीं खुलासा आम्हांस आढळला नाहीं. पंडुराजाला जसा शाप मिळाला होता, तसाच कांहीं शाप बळिराजाला मिळाला होता कीं काय नकळे!]. २. 'सुदेष्णाराणीला' असें पाठान्तर. ३. कोणी तरी विप्र (ब्राह्मण). ४. विचित्रवीर्याची पत्नी अंबालिका, तिच्या ठायीं. क्षेत्र=स्त्री. ५. सत्यवती. ६. गृहा, घरा. हें पंतांचें आवडतें यमक आहे. पुढें अध्याय ३४।४ पहा. ७. स्वतः अनुभविलेली (मागें अध्याय ८ गीति २७-४५ पहा). ८. व्यासोत्पत्तीसंबंधी कथा. ९. 'जातां वदला, 'स्मरतां संकट नाशुनि सुखी करीन मन' असें पाठान्तर १०. व्यासऋषि (मागें अध्याय ८ गीति ४२ पहा). ११. बोलावीन. १२. संतति कशी होईल याविषयीं उत्पन्न झालेल्या काळजीचें निवारण करण्याविषयीं. १३. जगाला तृप्त करावयास. १४. कन्यावस्थेंत झालेला मुलगा (व्यास). ह्यासंबंधीं पुढील वचन पहाः—पितृवेश्मनि कन्या तु यं पुत्रं जनयेद्रहः । तं कानीनं वदेन्नाम्ना वोढुः कन्यासमुद्भवम्. ॥ (मनुस्मृति, अध्याय ९ श्लोक १७२). ह्याचा अर्थः—विवाह होण्यापूर्वीं कन्येला पित्याच्या घरीं गुप्त रीतीनें झालेला जो मुलगा, त्यास 'कानीन' असें म्हणतात. १५. भक्तांस विश्वासभूत असा. ह्या गीतींत **संदष्टक**

स्मरतां चि, दर्शन दिलें मातेला ईश्वरें[1] पराशरजें. ।
वाहति माथां, ज्याच्या चरणांचीं, शुद्धधी पराश[2] रजें[3]. ॥ २४
येतां[4] चि, धांवला हो ! पाहत होता चि वाट पान्हा, तो[5]. ।
जाणों म्हणति मिथः[6] स्तन दृष्टि 'क्षीरें न आटपा, न्हातो.' ॥ २५
शिंपुनि कमंडलुजळें मग, आधीं दर्शनें चि, निववीली. ।
शोकवियोगदवार्ता[8] त्या अमृतघनें पळांत जिववीली[9]. ॥ २६
माता पूंजुनि[10] सुखवी पुत्रातें, तो हि नमुनि मातेतें. ।
विश्व पदरजीं लोळे, परि तिलमात्र हि न[11] तेजें[12] माते[11] तें[12]. ॥ २७
मातेसि पुसे इच्छा वरद श्रीव्यास भक्त-संतान[13]. ।
मागे[14] विचित्रवीर्यक्षेत्रीं कुरुकुळशिवार्थ[15] संतान. ॥ २८
'ताताकडील भीष्म, व्यासा ! मातेकडील तूं शिष्ट[16]; ।
मृतबंधुचें करावें धर्मार्थ तुम्ही असेल जें इष्ट. ॥ २९
असतां समर्थ तूं सुरतरुगुरुवरचरणरेणु[17] देवर[18], हा[19] ! ।

---

नामक यमकालंकार आहे. पद्याच्या द्वितीय व चतुर्थ पादांच्या यमकास 'संदष्टक' यमक म्हणतात. ( मागें पृष्ठ १०४ टीप ७ पहा ).

१. ईश्वरावतारी पराशरपुत्रानें ( व्यासानें ). २. परपदाची आशा धरणारे. ३. धूलि. ४. व्यासमुनि येतांच. ५. [ जो ] पान्हा वाट पाहत होता, तो धांवला चि—असा अन्वय. पान्हा धांवला=स्तनांतून दूध अतिशय जोरानें वाहूं लागलें. ६. परस्पर. ७. व्यास मातृपदीं नमन करीत असतां, सत्यवतीचे स्तन व तिची दृष्टि हीं परस्परांस म्हणतात कीं, क्षीरें ( स्तनपक्षीं दूध व दृष्टिपक्षीं अश्रु ) न आटपा, कारण व्यास न्हातो आहे. येथें 'क्षीर' ह्या शब्दावर **श्लेष** आहे. ह्या गीत्यर्धात **उत्प्रेक्षा**लंकार आहे. ८. शोक आणि वियोग हेच वणवे, त्यांनीं पीडित. **रूपका**लंकार. ९. जगविली, वांचविली. १०. पूजणें=कोडकौतुक करणें—असा अर्थ येथें घेणें इष्ट आहे. ११. उन्मत्त न होई. १२. तें तेज=व्यासाचें तपःसामर्थ्य, अर्थात् व्यास. १३. भक्तकाम-कल्पद्रुम, भक्तांची इच्छा पूर्ण करणारा ( व्यास ). 'जेंवि संतान' असें पाठान्तर. ( मागें पृष्ठ १३० टीप २१ पहा ). १४. सत्यवती मागे. १५. शिव+अर्थ=कल्याणाकरितां. १६. शिष्ट=सभ्य, सुशिक्षित ( गृहस्थ ). ह्यासंबधीं पुढील वचन पहाः—देवराद्वा सपिण्डाद्वा स्त्रिया सम्यङ्नियुक्तया । प्रजेप्सिताधिगन्तव्या सन्तानस्य परिक्षये. ॥ ( मनुस्मृति, अध्याय ९ श्लोक ५९ ). ह्याचा अर्थः—संततीच्या अभावामुळें वंशक्षय होत असल्यास वडील माणसांच्या परवानगीनें दिराकडून किंवा सपिंडांतील पुरुषाकडून स्त्रीनें इष्ट प्रजोत्पत्ति करावी. १७. कल्पवृक्षाचा मुख्य गुरु आहे चरणधूलि ज्याची असा. अर्थात्—इच्छिलेली वस्तू देण्याचे कामीं कल्पवृक्षापेक्षां ज्यास्त समर्थ. १८. दीर. १९. हाय ! हाय !

या त्वत्प्रजावतींनीं[1] न म्हणावें, स्वजननीस दे वर हा.' ॥ ३०
व्यास म्हणे, 'धर्मज्ञे ! माते ! आज्ञा तुझी शिरोधार्या[2]. ।
सांगेन तें करूं दे व्रत, वर्षभरी त्वदात्मभूभार्या[3].' ॥ ३१
काली[4] म्हणे, 'अहा ! बा ! होईल अराजक[5], प्रजालोप[6]. ।
आर्तमनांसि[7] महाश्रय अमृत-तरूचें[8] लहानसें रोप. ॥ ३२
कौसल्या[9] गर्भातें पावो आतां चि; बा ! विलंब कसा ।
साहों ? अधर्म[10] टपतो लोकां, मीनां गिळावया बकसा[11].' ॥ ३३
व्यास म्हणे, 'माते ! तरि कौशल्या मद्विरूपता[12] साहो[13]. ।
माझी करू प्रतीक्षा, ऋतुकाळीं सुव्रता, सुवासा[14] हो.' ॥ ३४
ऐसें सांगोनि[15], श्रीसत्यवतीच्या पदांबुजां[16] नमुनी, ।
तो योगिवेष ईश्वर झाला अंतर्हित[17] क्षणांत मुनी. ॥ ३५
सांगे सुनेसि देवी, 'कुरुकुळ तारावयास भाव्यांशीं[18] ।
बोल, रम सुतार्थ, जशी रमत्ये, बोधार्थ[19], सत्सभा व्यासीं.' ॥ ३६
झाली च मनें प्रांजलि[20] ती पुत्रास प्रसू[21]; न शय[22] नातें ।

---

१. या त्वत्प्रजावतींनीं 'हा !' न म्हणावें, हा वर स्वजननीस दे–असा अन्वय. प्रजावती=भावजय. २. शिरसा वंद्य, मस्तकीं धारण करावयास योग्य. 'मातें आज्ञा' असें पाठांतर. ३. तुझ्या पुत्राची स्त्री. ४. सत्यवती. ५. राजरहित. ६. प्रजाधर्माचा लोप ( अतिक्रमण ). ७. ज्यांचीं मनें दुःखी-कष्टी आहेत अशांस. 'आर्तमनासि' असें पाठांतर. ८. 'आम्रतरूचें' असें पाठांतर. ९. कोसलदेशच्या राजाची कन्या ( अंबिका ). १०. अराजकतारूपी अधर्म. प्रजेचा नियामक राजा नसेल, तर प्रजेमध्यें अधर्म माजतो–असा भाव. [ पुढील वचन पहा:—अराजके हि लोकेऽस्मिन्सर्वतो विद्रुते भयात् । रक्षार्थमस्य सर्वस्य राजानमसृजत्प्रभुः ॥ ( मनुस्मृति, अध्याय ७।३ ) म्हणजे–पूर्वीं राजा नसल्यानें बलाढ्य लोकांच्या भीतीनें सर्व जगांत अंदाधुंदी माजली असतां चराचर वस्तूंच्या संरक्षणार्थ ईश्वरानें राजाला जन्म दिला. ] ११. बगळ्याप्रमाणें. बगळ्याचा ढोंगीपणा प्रसिद्धच आहे. १२. मत्+विरूपता=माझें विलक्षण रूप. विरूप=(१) कुरूप (२) अक्राळविक्राळ स्वरूप. मूळांत 'विरूपता' हाच शब्द आहे ( अध्याय १०५।४६ ). १३. अंबिकेनें माझी विरूपता सहन केली पाहिजे–असा भाव. १४. उत्तम वस्त्रें धारण केलेली अशी. १५. 'ऐसें सांगुनियां' असें पाठांतर. १६. चरणकमलांस. 'पदांबुजीं' असें पाठांतर. १७. गुप्त. १८. दिराशीं. भावा=नवऱ्याचा वडील भाऊ. 'भावा' हा शब्द प्रस्तुत अर्थीं वऱ्हाड-खानदेश वगैरे प्रांतांत प्रचलित आहे. १९. हितोपदेश प्राप्त व्हावा म्हणून. २०. प्रांजलि=सन्मानार्थ हात जोडणारी. 'प्रांजल' असें पाठांतर. प्रांजल=सरळ, प्रामाणिक. २१. प्रसवणारी ( माता. ) २२. हात. शय नातें न मोडिती=दोन्ही हात अंजली करतांना एकत्र केले असतां

मोडिति, करूनि अंजळि, नेतां सून प्रसून-शयनातें[1]. ॥ ३७
सासूनें शुचिशयनीं सून निजविली, धरूनि हेनु[2]; कंपा ।
पावे, चिंती[3] भीष्मा[4]; ये मुनि हि करावयासि अनुकंपा[5]. ॥ ३८
मुनिवररवि[6]च्या उदयीं ते कैरविणी[7] च अंबिका झाली; ।
अत्युग्र रूप पाहुनि, झांकी तत्काळ लोचनें, भ्याली. ॥ ३९
त्या साध्वीवरि करुणा केल्यावरि, सूनुला[8] पुसे माता. ।
'होईल पुत्र कैसा ? सांग मला, सर्व जाणसी, ताता[9] !' ॥ ४०
व्यास म्हणे, 'होइल सुत नागायुतबळ[10], सभाग्य, विदित[11]-नय, ।
राजर्षि, साधुसत्कृत; त्यास हि होतील शत बळी तनय. ॥ ४१
परि मातेच्या दोषें[12] होइल जात्यंध[13], येवढें चि उणें. ।
चंद्रीं अंकें[14] तसें हें; परिपूर्ण परंतु सर्व साधु गुणें.' ॥ ४२
माय म्हणे, 'माझें मन, जाणुनि होणार नृप अचक्षु[15], भितें; ।
योग्य दुजा सुत द्यावा; लंघावें त्वां न हें वच क्षुभितें[16].' ॥ ४३
मान्य करुनि मुनि गेला. अंध चि सुत अंबिकेसि मग झाला. ।
'धृतराष्ट्र' असें भीष्में संस्कारुनि[17] नाम ठेविलें त्याला. ॥ ४४
अंबालिकेसि ही मग विनवी, गेला म्हणूनि सुतपा 'हूं', ।
'[18]त्वां हि न भ्यावें; सिंहासनगत[19] बाई ! तुझा चि सुत पाहूं'. ॥ ४५
ती ही भ्याली मुनिला; झाली पांडु[20] क्षणांत; कातरता[21] ।

---

त्या उभयतांत जें नातें असतें, तें ते वेगळे केले असतां, नाहींसें होत नाहीं. त्याप्रमाणें सत्यवतीनें आपल्या सुनेशीं शालीनतेला एकीकडे सारून वर्तन केलें ( गीति ३६ पहा ), तरी त्या उभयतां सास्वासुनांत एकमेकींविषयीं असणारी आदरबुद्धि किंचितही कमी झाली नाहीं—हा इत्यर्थ.

१. पुष्पशय्येप्रत. २. हनुवटी. ३. चिंतन करी; भीष्माचें स्मरण करूं लागली. ४. 'चित्तीं भीष्मा' असें पाठांतर. ५. दया. ६. मुनिश्रेष्ठ व्यास हाच कोणी सूर्य, त्याच्या. **रूपका**लंकार. ७. चंद्रविकासिनी कमलिनीच. ८. पुत्राला ( व्यासाला ). ९. बाळा ! १०. दहा हजार हत्तींचें बळ ज्यास असा. ११. माहीत आहे नीति ज्याला असा. १२. संभोगसमयीं तिनें डोळे झांकले होते, ह्या दोषामुळें ( गीति ३९ पहा ). 'कृष्णवर्ण व्यासाच्या पिंगट जटा, लखलखणारे नेत्र, करड्या रंगाची दाढी—इत्यादि प्रकार पाहून अंबिकादेवीनें आपले डोळे मिटले'—असें मूळांत आहे ( अध्याय १०६ श्लोक ५ ). १३. जन्मांध. १४. डाग, लांच्छन. १५. नेत्ररहित ( अंध ). १६. क्रोधिष्ठानें. १७. जातकर्मादि संस्कार करून. १८. हें सत्यवतीचें भाषण. १९. राज्य-पदस्थ. २०. पांढरी फिकट. २१. भित्रेपणा.

स्त्रीगुण चि; असो दोष; न पुरुष हि त्या भीतिर्[1]दायका तरता. ॥ ४६
कृ[2]ष्ण म्हणे, 'म्यां दिधला संप्र[3]ति सुंदरि ! कुमार तुजला जो, ।
तद्वर्ण पांडु, ना[4]म हि; वरकर्पूरप्रसू[5] हि तुज लाजो.' ॥ ४७
तें ही, पुसतां, कथिलें पांडुत्व; म्हणूनि धरुनियां हनुतें, ।
माय म्हणे, 'बा ! तिसरा द्यावा त्वां कल्[6]पतरुसमूहनुतें.' ॥ ४८
लाजे, हांसे, पाहे पायां चि कडे प्रसन्नवदन मुनी. ।
'अंबे[7] ! श्रुतिरा[8]ज्ञा ते.' ऐसें बोलोनि, जाय पद नमुनी. ॥ ४९
झाला पांडु. तयावरि पहिलीला वा[9]सवी [10]तंदेव पुन्हां ।
सांगे. 'आजि मुनिकडे जा, येइल, उदि[11]तें होउं दे वपु, न्हा.' ॥ ५०
तें सांगे दासीला, आपण चित्तांत फार भीड[12]स ती. ।
व्या[13]ळीशी च गमे मुनितनु; रक्षी सासुची हि भीड सती. ॥ ५१
[14]त्या प्रभुला ठकवि, असें कोणी हि न कर्म ठक; विनट[15]लीला ।
तारावया भजे हो ! भुलला न सुकर्मठ कवि नटलीला[16]. ॥ ५२
व्हाया प्रसन्न जोडुनि सज[17]लोत्थितरोम हात, '[18]पार मला ।

---

१. त्या भीतिदायका पुरुष हि न तरता–असा अन्वय. त्या भयंकर व्यासाला पाहून एकादा पुरुष देखील घाबरला असता–असा भाव. २. व्यास. ३. आतां. ४. नाम हि पांडु–असा अन्वय. ५. उत्तम कापराला प्रसवणारी केळ–अर्थात् रंभा. संस्कृतांत केळीला 'रंभा' असा शब्द आहे. 'शुचिकर्पूरप्रसू हि' असें पाठांतर. ६. कल्पवृक्षाच्या समुदायानें ज्याचें स्तवन केलें आहे अशा त्वां, इच्छिलेली वस्तु देण्यांत कल्पवृक्षापेक्षां देखील श्रेष्ठ अशा (व्यासा !). ७. हे आई ! ८. ते आज्ञा श्रुतिः=तुझी आज्ञा वेदच [ होय ]. म्हणजे–तुझी आज्ञा मला वेदासारखी मान्य आहे. ९. सत्यवती–**पंत.** १०. तेंच. ११. वपु उदित होउं दे=शरीर उदयाला येऊं दे. 'मुदित होउं दे' असें पाठांतर. १२. भिडस्त, लज्जायुक्त. १३. सर्पिणीसारखी. १४. त्या प्रभुला ठकवि, असें कर्म कोणी हि ठक न [ करूं शके ]. [ तो प्रभु ] विनटलीला ताराया भजे हो ! [ तो ]–सुकर्मठ कवि नटलीला न भुलला–असा अन्वय. त्या सर्वज्ञ व्यासांना कोणी ठक ठकवूं शकेल हें शक्यच नाहीं. तेव्हां त्या दासीनें व्यासांना फसविलें असेल, हें शक्यच नाहीं. तर ( **पंत** सांगतात ) व्यासांच्या ठायीं ती नम्र झालेली असल्यामुळें तेच तिचा उद्धार करण्याच्या हेतूनें तिला भजते झाले. ते उत्तम कर्मयोगी व ज्ञाते ( व्यास ) ती दासी नटलेली ( सजलेली ) होती म्हणून तिला पाहून ते भुलले ( मोहित झाले ), असें नाहीं–हा स्पष्टार्थ ( गीति ५३ व ५६ पहा ). १५. मग्न झालेली ( गुंग झालेली ) अशी जी दासी तिला. विनटणें=मग्न होणें, रंगून जाणें. १६. नटलेली ( सजलेली ) जी ( दासी ) तिला. १७. घर्मरोमांचयुक्त. १८. परतीर, पलीकडील तीर.

दावा' म्हणे 'भवाचा[1].' तरि च तिशीं तो महातपा रमला. ॥ ५३
गुरुवरसेवालाभें झाली लोकत्रयीं उजळे[2] दासी. ।
पंकें[3] झडोनि गळाला, अनुसरतां त्या सुपुण्यजळदासी[4]. ॥ ५४
सेवाधर्मे पूजुनि, भवसागरसेतु सुखविला साचा. ।
संपादिला प्रसाद प्रभुचा, जो हेतु[5] सुखविलासाचा. ॥ ५५
मुनिराज म्हणे तीतें, 'भावें झालीस आनत[6] पदासी. ।
तरलीस; यांवरि[7] न तूं दासी; ऐसें न आन[8] तप, दासी[9] !' ॥ ५६
'होइल सुत धर्मात्मा, सर्वसुमतिपति[10], महायशा; शीलें[11] ।
गातिल कवि; महिलें[12], कुरुपति करुनि तया सहाय, शासील[13]. ॥ ५७
केलें मद्वंचन[14]; हें प्रसवेल सुमेरुतुल्य सुत राई[15];' ।
ऐसें मातेसि कथुनि, गेला होउनि मुनींद्र उतराई[16]. ॥ ५८
मांडव्याच्या[17] शापें झाला दासीकुमार यमधर्म. ।
'**विदुर**' असें नाम तया ठेवुनि; गांगेय[18] दे सुबहु शर्म[19]. ॥ ५९
शापाचें मूळ असें:—**मांडव्य** महर्षि तरुतळीं उग्र[20] ।
तप करि; निजाश्रमपदद्वारीं च उभा; दिसे स्वयें उग्र[21]. ॥ ६०
कृश, तेजस्वी, मौनव्रत, ऊर्ध्वभुज, प्रशांत, पात्यातें[22] ।
पातें लेवुनि होता; ह्मणति मुनी सुर 'महातपा' त्यातें[23]. ॥ ६१
कोणा-एका नरपतिनगरीं चोरी करूनि, चोरांनीं ।

---

१. संसाराचा. २. उज्ज्वल, तेजस्वी, निर्मळ. ३. चिखल, (पक्षीं—पाप). ४. उत्तम पुण्यवान् पुरुषरूप मेघास. ५. कारण. ६. नम्र. ७. अतःपर, ह्यापुढें. ८. अन्य, दुसरें. ९. हे दासी ! १०. अनेक बुद्धिवानांत श्रेष्ठ असा. ११. स्वभाव, सद्वर्तन, सदाचार. १२. पृथ्वीला. १३. रक्षील. १४. माझी फसवणूक. १५. मोहरी. हें (मद्वंचन) सुमेरुतुल्य सुत (पुत्र) राई (मोहरी) प्रसवेल (उत्पन्न करील)—असा अन्वय. तूं जी माझी फसवणूक केलीस तिचा परिणाम असा होईल, कीं मोहरीच्या पोटीं मेरूसारखा (पराक्रमी, प्रभावशाली) पुत्र जन्मास येईल—असा भाव. येथें मोहरी म्हणजे मोहरीसारखी क्षुद्र दासी—असा अर्थ. 'कोठें मोहरी आणि कोठें मेरु'—असा दोन वस्तूंतील अननुरूप संबंध वर्णिला आहे म्हणून **विषमा**-लंकार. कल्पनासादृश्यः—कशी तुळितसां तुम्ही प्रकट मेरुशीं मोहरी ? (केकावली—६५). १६. उतराई होणें=वचनांतून उत्तीर्ण होणें, वचन पूर्ण करणें. (मागें अध्याय ८ गीति ४२ पहा). १७. ऋषिविशेष. १८. गंगापुत्र भीष्म. १९. सुख. २०. घोर. २१. शिव. २२. डोळे मिटून. २३. मांडव्यातें.

पळतां आश्रय केला आश्रम, वांचावयासि, तो रानीं. ॥ ६२
मागोनि लाग[1] लावित नृपबळ येउनि, पुसे तया तपत्या[2]. ।
सांगेल काय मौनी[3]? ध्यानस्था एक ठावुकें तप त्या. ॥ ६३
त्या आश्रमीं च तस्कर सांपडतां, मुनि हि मानिला चोर. ।
बांधुनि नेतां हि न तो डगमगला, शांति साधुची थोर ! ॥ ६४
राजाज्ञेनें शूळीं मुनि हि चढविला, परंतु न क्षोभे. ।
तेथें हि तपस्तेजें, एकलतालाग्रगार्कसा[4], शोभे. ॥ ६५
होता तसा चि शूळीं; तिळ हि न धैर्य-प्रताप डळमळला. ।
न ज्ञानदृक्शतांश[5] हि, येउनि देहात्मतापडळ[6], मळला. ॥ ६६
तापसजनास त्याचा ध्यानीं[7] वृत्तांत तो सकळ कळला; ।
मग खगरूपें[8] रात्रौ येउनि, पाहूनि त्यास कळकळलें[9]. ॥ ६७
मुनि ह्मणति, 'बा ! अहा ! हें काय ? प्रख्यात तूं ऋषी. वळसा[10] ।
हा कां ? क्षेत्रीं[11] सुकृत चि पिकविशि, कीं शालितें कृषीवळसा[12] ?' ॥ ६८
मांडव्य म्हणे; 'मुनि हो ! सुविचारें[13] यासि दंडकर हा तो ।
मुख्य न; कृत[14] भोगावें; शांतीसी[15] तरि च दंडक[16] रहातो' ॥ ६९
तें[17] वध्यस्थळरक्षकवदनें[18] परिसोनि, भूप कर जोडी; ।
अभयवरद मुनि उतरुनि, मग मूळीं, शूळ न निघतां, तोडी[19]. ॥ ७०
तत्प्राणांचा न करी जरि अंतर्गत[20] हि, ती अणी[21] कवळ[22]. ।

---

१. लाग लावणें=माग काढणें, पत्ता लावणें. २. तपकर्त्यास ( मांडव्यास ). ३. मौन धारण करून तपश्चर्या करणारा. ४. एकल+ताल+अग्र+ग+अर्क+सा=एकाचा ताडवृक्षाच्या शेंड्यावर असणाऱ्या सूर्यासारखा. ५. ज्ञानदृष्टीचा शतांशही. ६. देहाविषयींची आत्मता ( ममता ), तिचा पडदा. ७. ध्यानस्थ असतांना. ८. पक्ष्याच्या रूपानें. 'रात्रौ येउनि पाहुनि तयास' असें पाठांतर. ९. [ तापसजनाला ] कळकळ वाटली. १०. फेरा. अनर्थ-**पंत.** ११. शरीरांत, ( पक्षीं ) शेतांत. येथें '**श्लेष**' आहे. १२. शेतकऱ्यासारिखा. १३. सुविचारें ( योग्य विचारपूर्वक पाहिलें असतां ) यासि ( मला ) हा ( राजा ) [ जो ] दंडकर ( शिक्षा करणारा ) तो मुख्य न ( तर माझें कर्म हेंच मला मुख्य शिक्षा करणारें होय )—असा अन्वय. १४. केलेलें कर्म. १५. ( समाजांत ) शांतता राखण्याच्या बाबतींत. १६. रीती, मर्यादा. १७. तें=मांडव्याचें भाषण. १८. वधस्थानाचें रक्षण करणाऱ्यांच्या तोंडून. १९. तो पोटांत शिरलेला शूळ सबंध बाहेर निघेना, तेव्हां तो मूळांत तोडून टाकिला, परंतु त्याचें अग्र पोटांत राहिलें. २०. पोटांत घुसलेला. २१. शूलाग्र. २२. ग्रास.

होता स्वस्थ. तपाचें सांगावें काय हो! अणीक[1] बळ? ॥ ७१
त्याचें प्रख्यात 'अणी-मांडव्य' असें चि जाहलें नाम. ।
होय परशुराम, जसा परशूच्या धारणामुळें[2], राम. ॥ ७२
संयमनीप्रति[3] जाउनि, धर्मासि[4] म्हणे मुनींद्र, 'म्यां पाप ।
काय कधीं केलें? रे! आलें फळ ज्यास, हा असा ताप. ॥ ७३
तत्वज्ञ[5] आपणाला म्हणविसि; वद[6] तत्वं[7] शीघ्र पितृपा[8]! हूं. ।
मग मत्तपोबळ पहा; बोल; तुझें आजि सुज्ञपण पाहूं.' ॥ ७४
धर्म म्हणे, 'भगवंता! मन ठेवुनि कुतुकसाधनीं तुच्छीं, ।
वा! घातली ईषीका[9] बाळपणीं त्वां पतंगिका-पुच्छीं[10].' ॥ ७५
'अपराध अल्प असतां, त्वां केला दंड हा असा; धूसी[11] ।
बहुधा असें चि जीवा; शिक्षावें म्यां चि तुज असाधूसी. ॥ ७६
हो मानुषदासीसुत[12], हा चि उचित दंड; पूस नय मातें; ।
जें अज्ञपणीं[13] घडलें अघ[14], आणावें मनांत[15] न यमा! तें.' ॥ ७७
ऐसा मुनिनें दिधला दासीपुत्रत्वहेतु[16] हा शाप; ।
तो धर्म विदुररूपें संरक्षी कुरुकुळा[17], जसा बाप. ॥ ७८

---

## अध्याय सोळावा[18].

धृतराष्ट्र, पांडु, विदुर भ्राते, सूर्येंदुवन्हि[19] जेंवि, हितें[20] ।
झाले प्रजांसि; करिती सर्व सुखें कर्म, ज्यास जें विहितें[21]. ॥ १

---

१. आणखी, ह्यापेक्षां ज्यास्त. २. धारण=धरणें, पदरीं असणें. ३. यमनगरीप्रत. ४. यमाला. ५. तत्वज्ञानी, ब्रह्मस्वरूप जाणणारा. ६. बोल. ७. वस्तुस्थिति, सत्य. ८. हे पितृपते! यमा! ९. दर्भाची काडी, बारीक काडी. 'वा! घातली सुई कां?' असा पाठभेद. १०. एका प्रकारची माशी, तिच्या पुच्छांत. पतंगिका=पांढरा मध करणारी माशी. ११. धुऊन टाकितोस, अर्थात् शिक्षा करून निर्दोष करितोस. १२. 'मानवदासीसुत' असें पाठांतर. १३. अजाणतेपणानें. १४. पाप. १५. मनांत न आणावें=त्याच्याकडे लक्ष देऊं नये. अणीमांडव्य म्हणाला:—'धर्मफलाचा जिच्यामध्यें उदय आहे, अशी मर्यादा लोकांना मी आजपासून घालून देतों. ती अशी—चवदा वर्षेंपर्यंत पाप लागणार नाहीं. या वयाच्या पलीकडच्या माणसांनीं जर कांहीं दुष्कृत्य केलें, तर मात्र त्याबद्दल तीं दोषी होतील'. (मूळ अध्याय १०८ श्लोक १६–१७). १६. दासीपुत्र म्हणून जन्मास येण्याचें कारण. १७. 'कुरुकुळीं' असें पाठांतर. येथें मूळांतील

'द्वापर[1] कृतयुग झालें;' आलें यांत चि समृद्धिचें[2] कथन; ।
ज्ञातज्ञेय[3] तिघे ही, करिं[4] त्यांचें यश चि शत्रुचें[5] मंथन. ॥ २
धृतराष्ट्र अंध, शूद्रीसुत विदुर, म्हणोनि राहिले[6] दोघे. ।
भीष्में केला राजा पांडु; तदाज्ञाबळें[7] चि पद तो घे. ॥ ३
एका समयीं हर्षें भीष्म म्हणे, स्वाशिंवाद्रिच्या[8] भिदुरा,[9] ।
'साधो ! धर्मरहस्यज्ञाननिधे[10] ! वांसरा[11] ! सख्या ! विदुरा ! ॥ ४
हें कुळ सत्यवतीनें, व्यासानें, मीं हि रक्षिलें कुरुचें; ।
कुळयश वाढवुनि, तुम्ही सुखवा मन या कुळींचिया[12] गुरुचें[12]. ॥ ५
म्यां ऐकिलें असें कीं, यदुकुळजा कुंतिभोजनृपकन्या, ।
सुबळसुता,[13] मद्रेश्वरतनया, या सुकुळजा वधू धन्या. ॥ ६
संतानार्थ कुळाच्या, भार्या तव अग्रजांसि त्या उचिता; ।
असत्संबंधी ते नृप; त्यांची विदित मज असे शुचिता[14]. ॥ ७
आल्या मनासि माझ्या; तूं सांग स्वमत; वृद्धिला गोत्रें[15] ।

---

'मांडव्योपाख्यान' नामक १०८ वा अध्याय संपतो. १८. ह्या पर्वाच्या जुन्या आवृत्तींत पंधराव्या अध्यायाच्या ९३ गीति आहेत. परंतु पंतलिखित पोथीवरून पंतवंशज रा० पराडकर यांनीं छापिलेल्या प्रतींत पंधराव्या अध्यायांत ७८ गीति ठेवून बाकीच्या १५ गीति सोळावा अध्याय म्हणून दिलेल्या आहेत. ही अधिकृत प्रतींतील अध्यायांची मांडणी विशेष विश्वसनीय व विषयविवेचनास विसंगत नसल्यामुळें आम्ही देखील ती स्वीकारीत आहों. ह्या योजनेनें ह्या पर्वाच्या जुन्या आवृत्तींत ३७ अध्याय होते, त्यांच्या ठिकाणीं आतां ३८ अध्याय झाले आहेत. पण ग्रंथसंख्येंत फरक मुळींच पडलेला नाहीं. १९. सूर्य, चंद्र व अग्नि. **यथासंख्या**लंकार. २०. हितकर. २१. योग्य.

१. युगें चार आहेत:—कृतयुग, त्रेतायुग, द्वापरयुग आणि कलियुग. पांडु राज्य करीत होता, त्या काळीं द्वापरयुग चालू होतें, तथापि त्याची प्रजा इतकी सुस्थितींत होती, कीं तिला कृतयुगच सुरू झालें कीं काय असें वाटलें. २. कुरुदेशाच्या वैभवाचें व समृद्धीचें वर्णन मूळ अध्याय १०९ श्लोक १–१४ मध्यें आहे. ३. जाणावयाचें जें कांहीं तें (सर्व) ज्यांनीं जाणलें आहे असे तिघे (धृतराष्ट्र, पांडु व विदुर). ४. 'कर्त्यांचें' असें पाठांतर. ५. नाश. ६. राज्यपदावांचून राहिले–असा भाव. ७. त्याच्या (भीष्माच्या) आज्ञेस मान देऊन. ८. स्व+अशिव+अद्रिच्या=आपल्या अकल्याणरूप पर्वताला भिदुरा (वज्रा) प्रमाणेंच अशा. ९. वज्रा. इंद्रानें आपल्या वज्रानें पर्वतांचे पंख तोडिले, अशी कथा आहे. १०. हे धर्माच्या गूढ अशा ज्ञानाच्या भांडारा (विदुरा!). ११. वत्सा! १२. ह्या कुळांतील वडील जो मी त्याचें. १३. सुबल हा गांधारदेशाचा राजा. शकुनी व गांधारी यांचा पिता. १४. शुद्धता. १५. कुळ.

म्यां त्वां हि पाववावें; योग्य चि तूं हें नव्हे वृथा स्तोत्र[1].' ॥ ८
विदुर म्हणे, 'शिशु आह्मी; तूं माता, तात, गुरु; करीं हित तें. ।
स्वकुळकथा[2] काय ? मुदित जग केलें बा तुझ्या यशें विततें[3].' ॥ ९
विप्रमुखें भीष्माला कळलें, आराधुन स्मरहरातें[4], ।
गांधारी सुबळसुता झालीसे पात्र शतसुत-वरातें[5]. ॥ १०
धृतराष्ट्रार्थ वराया गांधारीतें, नदीसुतें[6] जवन[7] ।
त्या गांधारपतिकडे[8] पाठविला दूतवर, जसा पवन. ॥ ११
वर अंध म्हणुनि कांहीं पहिली पडली विचारणा; परि तो ।
आला मना, कलंक न चंद्राच्या गुणगणा[9] वृथा करितो. ॥ १२
गांधारी स्ववराच्या जाणुनि नेत्रांत अंधकारा, ती ।
बांधी निजनयनांतें; भावी अंधां[10] हि अंधकाराती[11]. ॥ १३
नागपुरीं[12] भगिनीचें शकुनी, पूजूनि सूरि[13], दान करी. ।
नगरपथातें पंकिल[14] करिती तद्दत्त भूरिदान[15] करी[16]. ॥ १४
गांधारीनें स्वगुणें गुरुजन[17], पति, पोष्यवर्ग[18] तोषविले. ।
नाहीं च घेतलें परपुरुषांचें नाम, परि न रोषविले. ॥ १५

---

## अध्याय सतरावा.

केला होता शूरें[19] प्रथमापत्यप्रदान[20]पण सत्य ।
हृष्ट कराया स्वजनकभगिनीसुत कुंतिभोजें[21] अनपत्य[22]. ॥ १

---

१. स्तुति. २. **काव्यार्थापत्ति** अलंकार. ३. विस्तृत अशा यशानें. ४. शिवातें. ५. गांधारीनें शंकराची आराधना करून 'तुला शंभर पुत्र होतील' असा वर मिळविला होता. ही गोष्ट भीष्माला कळली–असा भाव. ( मूळ अध्याय ११०।१० ). ६. गंगापुत्र भीष्मानें. ७. वेगवान्. ८. गांधारदेशाच्या राजाकडे. गांधारदेश म्हणजे सध्यां ज्यास कंदाहार म्हणतात तो. ९. गुणांच्या समुदायास. 'एको हि दोषो गुणसन्निपाते निमज्जतीन्दोः किरणेष्विवाङ्कः' (कुमारसंभव, सर्ग १ ) ह्या कालिदासाच्या उक्तीचें येथें स्मरण होतें. १०. अंधा ( त्या आंधळ्या धृतराष्ट्राला ) हि [ ती ] अंधकाराती ( शंकर ) भावी ( मानी, समजे )–असा अन्वय. ११. अंधकासुराचा अराति ( शत्रु, मारणारा ) असा शंकर. १२. हस्तिनापुरीं. १३. पंडित, विद्वज्जन. विवाहप्रसंगीं ब्राह्मणांस दक्षिणा वगैरे देऊन–असा भाव. १४. चिखलानें युक्त. १५. भूरि (पुष्कळ) आहे दान ( गंडस्थळांतून स्रवणारें मदजल ) ज्यांच्या ठायीं असे.

वसुदेवाच्या जनकें पहिली कन्या दिली सख्यास[1] पृथा[2]; ।
कीं साधुनें प्रतिज्ञा जाऊं देऊं नये कदापि वृथा. ॥ २
ती कुंती पितृसदनीं कासारीं[3] पद्मिणी[4] तशी वाढे. ।
तों दुर्वासा तेथें ये, ज्याचे जाच कडु, जसे कोंढे[5]. ॥ ३
त्या मुनितें, ती[6], सेवा करुनि, करी सुप्रसन्न देवी[8], 'द्या ।
वर मज' असें न मागे, परि तो तीस स्वयें चि दे विद्या[7]. ॥ ४
मुनि कुंतीस म्हणे, 'या मंत्रें ज्या ज्या सुरा बहाशील[9], ।
त्या त्या सुरप्रसादें वत्से ! तूं पुत्रसुख[10] पहाशील.' ॥ ५
सर्वभविष्यज्ञ मुनिप्रवर, अशी करुनियां दया, गेला. ।
मग कौतुकें पृथेनें सूर्यागमनार्थ[11] मंत्रजप केला. ॥ ६
एकांतीं गंगेच्या तीरीं जपतां चि दिव्य मंत्रास, ।
दिसला दिनकर, येतां, होय चमत्कार, हर्ष, संत्रास[12]. ॥ ७
येउनि निकट[13] रवि म्हणे, 'सुंदरि ! पाचारिलेंसि[14] कां ? मातें. ।
काय करूं इष्ट तुझें ? तूं कोणा इच्छितीस कामातें[15] ?' ॥ ८
कुंती म्हणे, 'प्रभो ! मज सेवापरितुष्ट[16] विप्रवर[17] विद्या ।
देता झाला; कुतुकें मी वदल्यें, जरि असेल बरवि[18], द्या. ॥ ९
विद्याबळ जाणाया, पाचारुनि पाहिलें तुम्हां, देवा ! ।
चुकलें; क्षमा करा. हें विद्येचें कृत्य; किति इचा[19] केवा[20] ?' ॥ १०

---

१६. गज, हत्ती. १७. वडील माणसें. १८. आश्रित (सेवक). १९. वसुदेवाच्या बापानें. २०. पहिलें मूल दत्तक देण्याचा निश्चय. २१. राजाविशेष. २२. संततिरहित असा.

१. आपला मित्र जो कुंतिभोजराजा त्यास. २. कुंती. ३. सरोवरांत. ४. कमलिनी. ५. काढा कडू असला तरी तो आरोग्यकारक असतो, त्याप्रमाणेंच दुर्वासऋषीचे जाच हितकारक होते–असा भाव. जाच=त्रास, कटकट. दुर्वासऋषी मोठा संतापी व शीघ्रकोपी होता, हें प्रसिद्धच आहे. ६. कुंती. ७. मंत्रविद्या. ८. देवाला. ९. बोलाविशील. १०. 'तत्पुत्रमुख' असें पाठांतर. तत्पुत्र-मुख=त्या देवाच्या पुत्राचें मुख. ११. सूर्याच्या आगमनासाठीं. १२. भीति. १३. जवळ. १४. बोलाविलेंस. १५. मनोरथातें. १६. सेवा केल्यामुळें प्रसन्न झालेला. १७. ब्राह्मणश्रेष्ठ (दुर्वासा.) १८. बरवी, चांगली, अर्थात् सद्यःफलदायी. १९. आत्मानं दर्शयति–**पंत.** इचा म्हणजे माझा–असें म्हणून तिनें स्वतःकडे बोट दाखविलें–असा भाव. २०. गणना. सूर्याला बोलावण्याचें सामर्थ्य माझ्या ठिकाणीं कोठून असणार ?–असा भाव.

भानु म्हणे, 'वरदाता दुर्वासा गुरु तुझा मला कळला. ।
फळला तो कल्पद्रुम; तद्वर[1] न कधीं हि अपयशें मळला. ॥ ११
भीरु[2]! भय त्यजुनि, मिठी घालीं माझ्या गळ्यांत बाहूंनीं. ।
दर्शन अमोघ[3] माझें; तुज उचित न हा नकार, बाहूंनी. ॥ १२
बंधुजनापासुनि तूं मुग्धे! चित्तीं भिऊं नको; मळंता ।
जन तरि[5] बहुकर होतों? कां जाणसि[6] आमुची[7] न कोमळता?' ॥ १३
सत्य, प्रिय, हित बोलुनि, योजुनि अंकीं[8] निवास, रमणीतें ।
घेउनि, देउनि[4] अधरामृत, भोगी रत्न वासरमणी तें. ॥ १४
झाला सहजकवचमणिकुंडलधर[9] तत्क्षणीं रुचिर[10] बाळ. ।
ती हि कुमारी झाली; आली जाणों प्रसूतिची आळ[11]. ॥ १५
रवि गेल्यावर, तो सुत गंगेच्या घातला तिनें पदरीं; ।
केलें कठिण मन; असो पुत्रफळ; त्यागमति नव्हे[12] बदरीं[13]. ॥ १६
तें पुत्ररत्न दिधलें गंगेनें अधिरथासि; तद्भार्या[14] ।
राधा त्यातें पोषी; यास्तव 'राधेय[15]' म्हणति त्या आर्या[16]. ॥ १७
त्यांहीं 'वसुषेण[17]' असें पुत्राचें नाम ठेविलें विधिनें. ।
झाला शूर, उदार; स्तविलें ज्याच्या यशा सुधानिधिनें[18]. ॥ १८
कुंतीनें पांडु-नृपति नृपवृंदांत[19] स्वयंवरीं वरिला. ।

---

१. त्याचा वर. २. हे भित्रे! ३. कधींही व्यर्थ न होणारें, सफल. ४. बोलावून. ५. [ मी ] मळता ( मलीन होणारा ) जन [ असतों ] तरि बहुकर ( ज्याला पुष्कळ किरण किंवा हात आहेत असा ) होतों ( असतों काय? )—असा अन्वय. ६. 'जन तरि बहुकर नसतों, ठावी तुज न शुचिता न कोमळता' असा पाठभेद. ७. 'ठावी तुज आमुची' असाही पाठ आहे. ८. मांडीवर. ९. उपजतच कवच व रत्नकुंडलें ज्यानें धारण केलीं आहेत असा. १०. सुंदर. ११. दोषारोप. १२. होत नाहीं. १३. बोराविषयीं. पंत म्हणतात:—पुत्रफळ तर असोच, पण बोर म्हणजे किती क्षुद्र! पण तें देखील टाकून देण्याची बुद्धि होत नाहीं. मग पुत्रफळ टाकून दिलें, यावरून कुंतीनें किती कठोर मन केलें असेल बरें? तिची त्यागबुद्धि केवढी मोठी बरें? १४. त्या अधिरथाची स्त्री. १५. राधेचा पुत्र. १६. श्रेष्ठ, श्रेष्ठाला ( कर्णाला ). १७. हा वसुसह ( अर्थात् कानांतील कुंडलरूप द्रव्यासह ) उत्पन्न झाला म्हणून अधिरथ व राधा यांनीं त्याचें 'वसुषेण' असें नांव ठेविलें. ( मूळ अध्याय १११।२४ ). १८. चंद्रानें. येथें मूळांतील १११ वा अध्याय संपतो. १९. राजसमूहांत.

जैशी वरिती झाली देवसमूहीं पुलोमजा[1] हेरिला[2]. ॥ १९
दुसरा विवाह व्हावा पुत्राचा, हें मनांत आणूनी, ।
मद्रपतिकडे गेला आपण[3] गांगेय योग्य जाणूनी. ॥ २०
यें[4]च्चरितें सुजनाच्या हृदयीं अमृतें चि, शत्रुच्या शैल्यें[5]; ।
सद्विज[6], सामात्य[7], सबळ[8], तो भरतश्रेष्ठ[9] पूजिला शल्यें[10]. ॥ २१
भीष्म म्हणे, 'राया ! वच[11] सप्तर्षींचें[12] जसें करि हिमाद्री[13]; ।
करिं तूं हि यां[14] ऋषींचें; आहे जरि एक, दे तरि हि माद्री.' ॥ २२
शल्य म्हणे, 'कुरुनाथा[15] ! अढळ कुळाचार, जेंवि हेमाद्री[16], ।
ठावा असेल तुजला, द्यावी म्यां शुल्क[17]दासि हे माद्री.' ॥ २३
भीष्म म्हणे, 'कुलधर्मत्याग नव्हे उचित, मान्य मज आहे; ।
सत्कुलजाचें चि सदा स्वकुलाचाराकडे चि मन वाहे.' ॥ २४
ऐसें मान्य करुनि, दे कन्या[18]शुल्कार्थ भूषणें, वस्त्रें, ।
रत्नें, कनकें, वाजी[19], हस्ती[20], रथ, आणि चांगलीं शस्त्रें. ॥ २५
शल्य मग नंदीजाचा[21] अनुजेनें अंकें[22] शोभवुनि उजवा, ।
प्रार्थुनि म्हणे, 'पुरा न्या; प्रेमरसें लोभवूनि, इस उजवा[23].' ॥ २६

---

१. पुलोमा नामक ऋषीची कन्या. २. इंद्राला. पंतांनीं येथें मूळांतील ११२ व्या अध्यायाच्या १४ श्लोकांचा सारांश फक्त एका गीतींत ग्रथित केला आहे. ३. स्वतः, जातीनें. ४. ज्याच्या चारित्र्यामुळें येथें एकाच चरितावर परस्पर विरुद्ध अशा धर्मांचा आरोप करण्यांत आल्यामुळें **'विरोध'** नामक अलंकार झाला आहे. ५. उत्पन्न होतात–असा भाव. ६. ब्राह्मणांसह. ७. आपल्याबरोबर मंत्री घेऊन. ८. सैन्यासह. ९. भरतकुलांत श्रेष्ठ असा (भीष्म). १०. मद्रदेशाचा राजा जो शल्य, त्यानें. ११. वचन. हिमालयाकडे पार्वतीला मागणी घालण्याकरितां शंकरानें सप्तर्षींस पाठविलें होतें. तेव्हां त्यानें सप्तर्षींचें म्हणणें मान्य करून पार्वती शंकरास अर्पण केली–अशी कथा आहे. १२. सप्तर्षींचीं नांवें:—कश्यप, अत्रि, भारद्वाज, विश्वामित्र, गौतम, जमदग्नि आणि वशिष्ठ. १३. हिमालय पर्वत, हिमाचल. १४. या ऋषींचें= भीष्माबरोबर गेलेल्या ब्राह्मणांचें. 'या ऋषीचें' असें पाठांतर. १५. हे भीष्मा ! १६. हेम+अद्रि=सुवर्णाचा पर्वत (मेरुपर्वत). मेरुपर्वत ज्याप्रमाणें अढळ आहे, त्याप्रमाणें आमचा शुल्क घेण्याचा कुळाचारही अढळ आहे–असा भाव. १७. कन्येचें मोल देणाऱ्यास. १८. कन्येच्या मोलाकरितां. १९. घोडे. २०. हत्ती. २१. भीष्माचा. २२. शल्यानें माद्रीला भीष्माच्या उजव्या मांडीवर बसविलें–असा भाव. कन्या आणि स्नुषा यांनीं पुरुषाच्या उजव्या मांडीवर बसावें, असें शास्त्र आहे (मागें अध्याय १३।२३ पहा). २३. उज्वलित करा, अर्थात् हिचा विवाह करा.

त्या लावण्यवतीला आला घेऊनि **भीष्म**, मग लग्न ।
झालें, **पांडुसुहृन्मन**[1] हर्षी, दुःखीं अमित्रमन[2], मग्न. ॥ २७
कुंतीशीं माद्रीशीं करुनि सुखविहार एक मासभरी, ।
**भीष्मा**दिगुरुमतें तो **पांडु** प्रस्थान[3] भू-जयार्थ[4] करी. ॥ २८
पवनातें[5], तेजातें ग्रासुनि निःशेष न करि अहि[6], तरणी[7]; ।
न तसा **पांडु** महाबळ[8]; याच्या उरला न एक अहित[9] रणीं. ॥ २९
अरि[10]-नाग, **पांडु**[11]-हरिच्या, केले शतचूर्ण, सायक[12]-दरांनीं. ।
त्यजुनि दुरभिमान, स्वप्रियहित वरिलें न काय करदांनीं[13] ? ॥ ३०
अहित अहि[14], तयां झाला विवर[15], विवर[16] सांपडों दिलें न रणीं. ।
महित[17] महितळीं झाले, नमुनि न मुनिसुत[18], हठी द्विषत्[19] मरणीं. ॥ ३१
करद[20] परें[21] दमुनि केले, धनदमन[22] दरिद्र[23] आपणा मानी. ।

---

१. पांडुराजाच्या मित्रांचें मन. २. शत्रूंचें अंतःकरण. ह्या गीत्यर्धांत **'विरोधा'**लंकार आहे. ३. प्रयाण. ४. पृथ्वी जिंकण्यासाठीं, दिग्विजयार्थ. ५. वायूतें. अहि पवनातें [ आणि ] तरणी तेजातें ग्रासुनि निःशेष न करि–असा अन्वय. सर्प व सूर्य हे अनुक्रमें वारा व तेज यांस सेवन करितात, तरी त्यांना अगदींच नाहींसे करीत नाहींत. परंतु बलशाली पांडु तसा नाहीं. त्याच्याशीं युद्ध करणाऱ्या शत्रूंपैकीं एकासही त्यानें शिल्लक राहूं दिलें नाहीं. त्यानें सर्व शत्रु निःशेष केले–असा स्पष्टार्थ. **यथासंख्या**लंकार. सर्प वायुभक्षण करून राहातात, अशी समजूत आहे. ६. सर्प. ७. सूर्य. ८. पराक्रमी, बलशाली. ९. शत्रू. १०. शत्रुरूपी हत्ती. येथें **पं**तांनीं सुरेख **परंपरितरूपक** साधिलें आहे. ११. पांडुराजा हाच कोणी सिंह, त्याच्या. १२. बाणरूप दांतांनीं. १३. करभार देणारे जे ( राजे ) त्यांनीं. १४. [ जे ] अहित ( शत्रु ) [ ते ] अहि ( सर्पाप्रमाणें ) [ होऊन ] तयां ( त्या शत्रूंना ) [ पांडुराजा ] विवर ( गरुडाप्रमाणें, नाशकर्ता ) झाला. [ त्यानें आपल्या शत्रूंना ] रणीं ( युद्धामध्यें ) विवर ( छिद्र ) सांपडों न दिलें– असा अन्वय. ह्या वर्णनावरून पांडूचें रणकौशल्य दिसून येतें. ह्या गीतींतील **अश्वधाटी-यमकें** चमत्कृतिपूर्ण व कर्णमधुर आहेत. १५. वि+वर=पक्ष्यांमध्यें श्रेष्ठ असा ( गरुड ). १६. छिद्र, बीळ; अर्थात् कांहीं व्यंग, उणेपणा. १७. पूज्य. १८. व्यासपुत्र ( पांडुराजा ). हठी द्विषत् मरणीं महितळीं ( पृथ्वीच्या पाठीवर ) महित झाले, मुनिसुत नमुनि [ ते महित ] न [ झाले ]–असा अन्वय. हट्टी ( चिकाटीनें लढणारे ) शत्रु धारातीर्थी पतन पावून पृथ्वीवर मानमान्यता पावले. परंतु जे शत्रु पांडूला शरण गेले, त्यांच्याविषयीं लोकांना पूज्यबुद्धि वाटली नाहीं–असा अर्थ. किंवा–हठी ( हठयोगी ) मुनिसुत [ ईश्वरास ] नमुनि महितळीं महित ( पूज्य ) न झाले; [ परंतु ] हठी ( हट्टी ) द्विषत ( शत्रु ) मरणीं ( युद्धांत आलेल्या मरणामुळें ) महितळीं महित झाले–असा अन्वय. १९. शत्रु. येथें रा० पराडकर यांच्या प्रतींत 'द्विषन्मरणीं' असा शब्द आहे. २०. करभार देणारे. २१. शत्रु. २२. कुबेराचें मन. २३. निर्धन, दरिद्री.

ऐसीं[1] वित्तें घेउनि अक्षत[2] आला पुरासि तो मानी[3]. ॥ ३२
बहु मानिला नंदीजें[4] पांडु, जसा शंकरें स्व-सेनानी[5]. ।
तैं वेष्टुनि केलें गजपुर लंकाद्वीपतुल्य सेनानीं. ॥ ३३
शोभे स्थळस्थळीं तें राशीकृत[6]रत्नकनक नगर; मला ।
वाटे, गमलें[7] लोकां कीं, येथें[8] रत्नकनकनग[9] रमला. ॥ ३४
भीष्मादिकांसि तें धन दिधलें वांटूनि; जेंवि धनदानें, ।
केलीं आश्रितयाचकहृदयें संतुष्ट भूरि[10]-धन-दानें. ॥ ३५
एकच्छत्रा, कंटक[11]रहिता, स्ववशा, करूनियां अवनी[12], ।
भवनीं[13] रमोनि, पांडु क्रीडे तुहिनाद्रि[14]दक्षपार्श्ववनीं. ॥ ३६
घेउनि गेला संगें कुंतीतें आणि त्या हि माद्रीतें. ।
गंगागौरीगुरु[15]सा आश्रय करि पांडु त्या हिमाद्रीतें. ॥ ३७
धाडी धृतराष्ट्र सदा साहित्य वनांत आदरें पुरतें. ।
अनुकूलदारसंगें कां हो ! न गमेल पांडुला पुर तें[16] ? ॥ ३८
पांडु वनीं असतां सुरसिंधुज[17], विदुरार्थ आणवुनि बरवी ।
देवकमहीपतीची पारसवी[18] कन्यका, तिला वरवी[19]. ॥ ३९

---

## अध्याय अठरावा.

एका[20] समयीं क्षुधित, श्रांत, श्रीव्यास मंदिरीं[21] आला. ।
गांधारीनें सादर तोषविला[22], सुप्रसन्न तो झाला. ॥ १

---

१. रा० पराडकर यांच्या प्रतींत 'ऐसी' असा अनुस्वाररहित शब्द आहे, पण तो मुद्रणदोष असावा. २. सुखरूप, क्षतरहित. क्षत=जखम, पीडा. 'अक्षय' असें पाठांतर. ३. अभिमानी. ४. गंगेचा पुत्र जो भीष्म त्यानें. ५. आपला सेनापति ( कार्तिकेय ). ६. रत्नें आणि सोनें यांचा ढीग केलेला आहे असें. ७. वैशंपायन ऋषीला. ८. उत्प्रेक्षालंकार. ९. मेरुपर्वत. नग=पर्वत. १०. पुष्कळ द्रव्यदानानें. येथें मूळांतील ११३ वा अध्याय संपतो. ११. निष्कंटक ( शत्रुरहित. ) १२. पृथ्वी. १३. स्वगृहीं. १४. हिमालयाच्या दक्षिणभागच्या वनांत. १५. गंगा आणि गौरी यांचा पति जो शंकर त्यासारखा. 'पतिरेको गुरुः स्त्रीणां' हें वचन प्रसिद्धच आहे. १६. तें= वन. तें ( वन ) पुर ( नगर ) कां न गमेल ? ( वाटणार नाहीं ? )—असा अन्वय. १७. गंगेचा पुत्र भीष्म. १८. पारसवी=पारशवी म्हणजे शूद्रस्त्रीला ब्राह्मणापासून झालेली कन्या. विदुरही

'वर माग' असें म्हणतां, मुनिच्या पायांसि ती सती लागे. ।
शतपुत्रवर हरा जो मागितला[1], तो चि त्यास ही मागे. ॥ २
मग गर्भवती झाली, होती तैशी च दोनें अब्द[2] सती; ।
कुंतीस पुत्र झाला, ऐसें परिसोनि, होय खिन्नमती. ॥ ३
दुःखें निजोदराला[3] ती गांधारी स्वमुष्टिनीं[4] ताडी. ।
गर्भासि बळात्कारें, भवितव्यबळें हि, संकटीं पाडी. ॥ ४
लोहाची[5] कांडीशी पडिली पेशी[6] च एक मांसाची; ।
चित्तीं म्हणे सुबळजा[7], 'हे त्यागावी च दुःखदा साची.' ॥ ५
तों तें जाणुनि, येउनि, मुनि[8] साहसकारिणीस त्या वारी[9]. ।
वरदा स्वशुरासि म्हणे, मग ती आणूनि लोचनीं वारी[10]. ॥ ६
'दिधलें मज शतसुतवरदान तुम्हीं वरदराज[11] मामाजी ! ।
झाली पेशी; वर्षद्वय हे तनु पावली श्रमा माजी. ॥ ७
झाला सुत कुंतीला परिसुनि, मज दुःख वाटलें मोटें. ।
मग म्यां[12] उदर बडविलें; स्वामीपाशीं वदों नये खोटें.' ॥ ८
व्यास म्हणे 'गे वत्से ! लोकीं सर्वज्ञतेसि मी पात्र, ।
जाणें सर्व हि; तिळ हि न जाणें लटिकें वदावया मंत्र[13]. ॥ ९
शत घृतकुंभांत[14] रवे पेशीचे घाल, कन्यके ! शीतें ।
उदकें शिंपावी[15], तें[16] सद्यः शतधा[17] करील पेशीतें.' ॥ १०

---

पारशवच होता. येथें मूळांतील अध्याय ११४ संपतो. १९. भीष्मानें विदुराकडून तिचें पाणिग्रहण करविलें–असा अर्थ. २०. 'एके समयीं' असें पाठांतर. २१. धृतराष्ट्राच्या मंदिरास. २२. 'तुष्टविला' असें पाठांतर.

१. मागें अध्याय १६ गीति १० पहा. २. वर्षें. 'दोनि अब्द' असा पाठ रा० पराडकर यांच्या प्रतींत आहे. ३. आपल्या पोटाला. ४. स्वतःच्या मुठींनीं. ५. लोखंडाची. ६. आंडें, पिशवी. ७. सुबलसंज्ञक राजाची कन्या ( गांधारी. ) ८. व्यासमुनि. ९. निवारण करी, त्या गोष्टीपासून परावृत्त करी. १०. उदक. ११. वर देणाऱ्यामध्यें, श्रेष्ठ अशा मामाजी! येथें 'परिकरा' लंकार आहे. १२. येथें रा० पराडकर यांच्या प्रतींत 'म्या' असा अनुस्वाररहित शब्द आहे. १३. [ मी ] तिळमात्र हि लटिकें वदावया न जाणें–असा अन्वय. मी सत्यवचनी आहें–असा भाव. १४. तुपाच्या ( शंभर ) घागरींत. १४ पेशी शिंपावी–असा भाव. १५. तुकडे. १६. तें=शिंपडणें. 'उदकें शिंपावी ते' असें पाठांतर. १७. जिचे शंभर भाग होतील अशी.

केलें तसें चि; तेव्हां कन्येचा[1] काम मानसीं आला; ।
श्रीमन्मुनिप्रसादें, भाग अधिक एक त्या शतीं झाला. ॥ ११
घृतकुंभरक्षणाचा विधि, अवधि[2] हि, कथुनि, कृष्णमुनि[3] गेला. ।
झाला प्रथम सुयोधन, तेणें खरशब्द[4] उपजतां केला. ॥ १२
गांधारीसुतकृत रव[5] परिसुनि, गोमायु[6], गृध्र[7], खर[8], काक, ।
हाक स्वयें हि देती; धृतराष्ट्राच्या मनीं शिरे धाक. ॥ १३
भूदेव[9], भीष्म, विदुर, स्वगृहीं आणूनि, आंबिकेय[10] वदे, ।
'व्यासेश्वरप्रसादें झाला सुत, परि मना न उत्सव दे. ॥ १४
राजसुत[11] युधिष्ठिर तों राजा[12] चि, स्पष्ट तो कुळज्येष्ठ; ।
हा हि नृप चि त्यामागें[13]? भवितव्य वदा बरें तुम्ही श्रेष्ठ.' ॥ १५
म्हणति भविष्यज्ञ द्विज, 'बुडवाया जाण हा निदान[14] कुळा; ।
त्यागावा चि; न भुजगें[15] पोसावें प्राणहानिदा नकुळा[16].' ॥ १६
विदुर म्हणे, 'त्यागावी अहिदंष्टा[17] तत्क्षणीं च आंगोळी[18]. ।
मारक[19] कळतां, घ्यावी उग्रविषाची बळें चि कां गोळी? ॥ १७
एकोनशतसुतांशीं[20], एक कुपुत्र त्यजूनि, नांदावें. ।
व्याकुळ व्हाया, फुंकुनि भाजों घ्यावें स्वगेह कां दावें[21]? ॥ १८
झाला कुळकीर्तीच्या, आप्तजनाच्या, कुपुत्र हा निधनी[22]. ।
**त्यजिति यशोधन[23] देह हि, यश रक्षिति, म्हणति, 'होवु हानि धना.'॥**
उग्रनिमित्तें[24] सर्व हि भ्याले, एक चि न अंध तो भ्याला; ।

---

१. आपल्यास एक कन्या व्हावी, अशी इच्छा. २. कालमर्यादा. 'अविधि हि' असें पाठांतर. ३. व्यासमुनि. ४. गाढवाचा शब्द. (मूळ अध्याय ११५ श्लोक २७।२८). ५. शब्द. ६. कोल्हे. ७. गिधाडें. ८. गाढव. ९. ब्राह्मण. १०. अंबिकापुत्र, धृतराष्ट्र. ११. पांडुराजाचा पुत्र. १२. 'तो राजाचि' असें पाठांतर. १३. दुर्योधन धर्मराजाच्या पाठीमागून तरी राजा होईल किंवा नाहीं, असें धृतराष्ट्रानें भीष्मादिकांस विचारिलें. (मूळ अध्याय ११५।३२). १४. कारण. १५. सापानें. सर्प व मुंगुस यांचें हाडवैर प्रसिद्धच आहे. १६. मुंगुसाला. १७. सापानें जिला दंश केला आहे अशी. १८. अंगुली, बोट. १९. मारणारी, प्राणघातक. हें गीत्यर्ध सुभाषितरूप आहे. २०. एक उणा ज्यांत अशा शंभर पुत्रांशीं. अर्थात् दुर्योधनाशिवाय बाकीच्या नव्याण्णवपुत्रांसह. २१. वणव्यानें. २२. नाशाला. २३. यश हेंच ज्यांचें धन असे. २४. भयंकर अपशकुनांनीं, दुश्चिन्हांनीं.

होय मरणहेतूल्कामुखभूतीं[१] सुनिधिबुद्धि[२] लोभ्याला. ॥ २०
पितृसुरतृप्तिप्रद[३], जगदाल्हादक, तापहर[४], सुवृत्त[५], शुचि[६], ।
शशिचें[७] मंडळ, कुळ ही; तेथ हरिण अंक[८], येथ हा[९] पशु चि. ॥ २१
ज्या दिवशीं दुर्योधन झाला, कुंतीस भीम त्यां[१०] दिवशीं; ।
स्वगुणें एकें तप्तें[११], एकें केलीं सुहृन्मनें हिंवशीं[१२]. ॥ २२
धृतराष्ट्राला झाले शत सुत, कन्या[१३] हि एक वरदानें. ।
जैसें कथिलें होतें श्रीमद्व्यासें अभीष्टवरदानें. ॥ २३
अंतर्वत्नी[१४] असतां, गांधारीनें स्वयें चि सनयेला[१५] ।
दिधला सद्वैश्यांच्या[१६], निजपतिसेवाधिकार, तनयेला. ॥ २४
वैश्या सेवादक्षा, प्रज्ञाचक्षु[१७] हि कृतज्ञ, भजलीला ।
दे पुत्रफळ; गमे सुरतरुची, प्रभुची हि, तुल्य मज[१८] लीला. ॥ २५
नाम युयुत्सु तयाचें; एकाधिक शतकुमार[१९] यासकट. ।
सर्वांत साधु[२०] वैश्यानंदन, होईल तें पुढें प्रकट[२१]. ॥ २६

---

१. मरण+हेतु+उल्का+मुख+भूतीं=मरणास कारणीभूत जें उल्कामुख ( ज्याच्या मुखांत उल्का आहे असें ) भूत (पिशाच), त्याच्या ठिकाणीं. उल्का=ज्वाला. २. धनाची उत्तम ठेव येथें आहे अशी कल्पना. '°मुखभूतहि सन्निधान लोभ्याला' असा पाठभेद. ३. पितर आणि देव यांस तृप्ति देणारें. ( चंद्राच्या कला पितर व देव प्राशन करितात, अशी समजूत आहे ). ४. ताप=उष्णता; ( पक्षीं ) दुःख. ५. वाटोळें; ( पक्षीं ) सदाचारी. ६. शुभ्र; ( पक्षीं ) पवित्र. ७. चंद्रमंडल व चंद्रवंश यांची तुलना ह्या पद्यांत केलेली आहे, ती फारच चांगली साधली आहे. ही **श्लेष**युक्त रचना **पं**तप्रतिभानिर्मित आहे. ८. लांछन, चिन्ह; ( पक्षीं ) कालिमा. ९. हा=दुर्योधन-**पंत.** १०. 'ते दिवशीं' असें पाठांतर. ११. संतप्त, दुःखानें व्याकुळ. १२. थंडगार. १३. हिचें नांव दुःशला. हिचा विवाह जयद्रथराजाशीं झाला. १४. गर्भिणी. १५. नीतिमतीला, नीतिमती अशी जी वैश्यकन्या तिला. १६. 'सद्वैश्येच्या' असा पाठ आहे. पण तो मूळास धरून नाहीं. 'एक वैश्यवर्णाची दासी धृतराष्ट्राच्या सेवेस जात असे,' असें मूळांत आहे. ( अध्याय ११५।४१ ). १७. धृतराष्ट्र. १८. मला=वैशंपायन ऋषीला किंवा मोरोपंत-कवीला. १९. एकशें एक पुत्र. २०. सज्जन, पुण्यशील. हा शूर व महारथी होता. हा धृत-राष्ट्राचा दासीपुत्र असूनही युद्धप्रसंगीं पांडवांस जाऊन मिळाला होता. २१. येथें मूळांतील ११५ वा अध्याय संपतो. अध्याय ११६ मध्यें दुःशलेची उत्पत्ति व ११७ मध्यें धृतराष्ट्राच्या १०० पुत्रांचीं नांवें व दुःशलेचा विवाह इत्यादि कथाभाग आहे. तो **पं**तांनीं गाळिला आहे.

## अध्याय एकोणिसावा.

होता महावनांत स्त्रीसख[1] नृप पांडु, तत्कथा परिसा. ।
अरिसामंतनमितपद[2] तो मृगयार्थें फिरे वनीं हरिसा[3]. ॥ १
तेणें मैथुनसमयीं हरिणीसह हरिण देखिला पुष्ट; ।
वधिला पंचशरांनीं सस्त्रीक अदुष्ट[4] तो, जसा दुष्ट. ॥ २
तो ऋषिपुत्र, तपोधन, भार्येशीं काननांत मृगरूपें ।
रतिकेलिसक्त होतां[5], वधिला सहसा मृगभ्रमें[6] भूपें. ॥ ३
किंदमनामा तो ऋषि भूमिवर पडोनि पांडुला गांजी. ।
कर जोडुन नृप हि म्हणे, 'भ्रमलों; मृगरूप घेतलें कां ? जी !' ॥ ४
किंदम म्हणे, 'अरे ! म्यां, व्हावा सुत ऋष्यशृंगसा[7] मातें, ।
हें मात्र वांछिलें रे ! मन वश होऊं दिलें न कामातें. ॥ ५
जनलज्जेस्तव मृगतनु घेउनि, रमतां वनीं मृगीसहित, ।
केला कसा तुवां वध ? केलें नसतां हि लेश म्यां अहित. ॥ ६
मृगयाधर्म[8] तुज, मज हि आहेत चि विदित, परि सुरत[9]–शर्म ।
अनुभवुनि, कसें केलें हनन ? अरे ! काय हें उचित कर्म ? ॥ ७
ब्रह्मवधें दुरित[10] नसो; नकळत घडली[11] तुला, परंतु नृपा ! ।
सुरतसुखज्ञा तुजला यावी, आली कशी न लेशें[12] कृपा ? ॥ ८

---

१. 'स्त्रीसह' असें पाठांतर. २. शत्रु आणि मांडलिक राजे यांनीं नमस्कृत आहेत पद (पाय) ज्याचे असा. ३. सिंहसा, सिंहाप्रमाणें. ४. निरुपद्रवी, गरीब. ५. 'होतां' असें पाठांतर. ६. तो मृग (हरिण) आहे अशा समजुतीनें. ७. ऋष्यशृंगऋषीसारखा. ऋष्यशृंग हा विभांडकऋषीचा पुत्र. एकदां विभांडक गंगातीरीं स्नानास गेला असतां, तेथें त्यानें उर्वशी नामक अप्सरेस पाहिलें. तेणेंकरून त्याचें रेत जलांत पतन पावलें. इतक्यांत कोणी देवकन्या शापानें मृगयोनि पावलेली, तेथें जलपानार्थ आली होती. तिच्या उदरांत तें जलप्राशन करीत असतां प्रविष्ट झालें. त्यापासून हा उत्पन्न झाला. ह्याचें सर्व शरीर मनुष्यासारखेंच होतें. परंतु मस्तकावर मृगासारखें शिंग होतें म्हणून यास ऋष्यशृंग असें नांव पडलें. [ ऋष्य=श्वेतपाद व शीघ्रगामी हरिण. ] ८. मृगया (शिकार) करण्यासंबंधीं नियम. (कोणत्या जनावराला केव्हां मारावें, व केव्हां मारूं नये इत्यादि). ९. संभोग-सुख. १०. पाप. ११. ब्रह्मवध नकळत घडला–असा भाव. 'घडला परंतु तूज नृपा !' असें पाठांतर. १२. थोडी देखील.

दुष्टोचित[1] शासन कीं; सोसावें काय तापसानें हें ? ।
कां निरपराध वधिला ? राया ! वद काय पाप सोनें हें ? ॥ ९
घे शाप तापसाचा, तुज ही करितां मनःप्रिया-संग ।
मृत्यु घडो; या माझ्या शापाशनिचा[2] कधीं न हो भंग.' ॥ १०
शापवचन मलिन तया करि, कज्जल जेविं पांडुर[3]-मणीतें. ।
मुनि गेल्यावरि, येउनि तें कळवी साश्रु पांडु रमणींतें[4]. ॥ ११
'व्यसनें[5] तात[6] बुडाला, मी ही; **भोगील काय मंद[7] रसा[8] ?** ।
झालों स्वगुरुसुहृज्जनहृत्सागरमथनहेतु[9] मंदर[10]सा. ॥ १२
कामें[11] चि बुडविलें जग, हें ऐकावें हि न व्यसन कानें. ।
इतर किति[12] ? पाविजेल चि विषयें भय नित्य नव्य[13] सनकानें[14]. ॥ १३
झालों **विचित्रवीर्यक्षेत्रीं[15] मी पांडु कृष्णसुत[16]**; पाला ।
भक्षीन, करीन सुखें, होउनि संगीं वितृष्णें[17], सु-तपाला. ॥ १४
मी नाठवीन राज्य, स्वजन, स्त्री, शयन, वसन, अन्न, मनें. ।
जा हस्तिपुरासि तुम्ही, सांगा **भीष्मादिकांसि** मन्नमनें[18].' ॥ १५
म्हणति स्त्रिया, 'करूं तप आम्ही ही, अधिकें काय संन्यासीं[19] ? ।

---

१. लहानसान. २. शापरूपी वज्राचा. येथें मूळांतील ११८ वा अध्याय संपतो. ३. पांढऱ्या मण्यातें. ४. स्त्रियांतें ( कुंती व माद्री यांस ). ५. व्यसनें=कामव्यसनें, विषयसुखाच्या नादानें. ( मूळ अध्याय ११९ श्लोक ३ ). मी ही=मी देखील त्याच नादानें बुडालों—असा भाव. ६. बाप ( विचित्रवीर्य ). मागें अध्याय १४ गीति १४-१७ पहा. ७. मंद ( मूर्ख मनुष्य ) रसा ( पृथ्वी ) भोगील काय ? जो मूर्ख आहे त्याच्या दैवीं राज्यादि वैभवाचा उपभोग कुठला ?—असा भाव. ८. पृथ्वी. ९. स्व+गुरु+सुहृत्+जन+हृत्+सागर+मथन+हेतु=आपले गुरुजन ( वडील माणसें ) व मित्रजन ह्यांच्या हृदयसागराचें मंथन करण्यास ( त्यांना दुःखी करण्यास ) कारणीभूत. १०. मंदरपर्वतासारखा. येथें समुद्रमथन—कथा अनुसंधेय आहे. ११. विषयेच्छेनें. विचारसादृश्यः—कामें, कोपें, लोभें नागविले अमित, यांस जे भुलले । यांच्या कुदृष्टिपातें तेजस्वी पुरुषहीरही उलले. ॥ ( **पं**तकृत उद्योगपर्व, अध्याय ९।७२ ). १२. **काव्यार्थापत्ति** अलंकार. १३. नवीन. १४. हा ब्रह्मदेवाच्या चार मानसपुत्रांपैकीं एक. हा मोठा ब्रह्मनिष्ठ होता. १५. विचित्रवीर्याच्या अंबालिका नामक स्त्रीचे ठिकाणीं व्यासांच्या वीर्यापासून झालेला. १६. व्यासपुत्र. १७. इच्छारहित, निःस्पृह. १८. मत्+नमनें=माझे नमस्कार. १९. संन्यास घेण्यांतच विशेष काय आहे ?—असा भाव. 'आम्हां धर्मपत्न्यांसह राहून हवी तितकी तपश्चर्या

येथें तपोनि, भोगा स्वर्गीं सुख कुंतिमद्रकन्यासीं. ॥ १६
भार्या न त्यागाव्या, विरहज्वलनांत या न भाजाव्या; ।
अंतीं स्वर्गासि तुम्हांसह, तेजें शोभवुनि नभा[1], जाव्या.' ॥ १७
दारोदारोक्ति[2] करी मान्य चि, कीं प्रेम शुद्ध, निष्कपट. ।
काढी अंगद[3], कुंडल, कटकयुगुल[4], मौलिरत्न[5], निष्क[6], पट. ॥ १८
तीं भूषणें, सुवस्त्रें[7] अर्पुनि विप्रांसि, तो म्हणे, 'स्वामी ! ।
जाउनि नागपुरीं हें सांगावें, मागतों वरा या मी.' ॥ १९
वल्कल[8] नेसोनि, म्हणे दासांसि, 'पुरासि जा सखे[9] ! खग हो ! ।
जळला शापदवें[10] हीं[11]; आश्रय सर्वांसि भीष्म सन्नग[12] हो. ॥ २०
दुर्दैव-ग्रीष्मानें गेला आटोनि पांडु-कासार[13]. ।
जा भीष्म-मानसाप्रति[14], दास-मधुप[15] हो ! विचार हा सार[16]. ॥ २१
भीष्म, धृतराष्ट्र, विदुर, स्वर्द्रुम[17] तुमचे; तदाश्रयें वर्ता[18]. ।
हा पांडु, आजपासुनि, झाला यति, भूमिचा नव्हे भर्ता[19].' ॥ २२
सस्त्रीक पांडु गेला, पूर्वीं राघव तपोवना जेंवीं[20]; ।
वाढुनि शोकविष, समय तो, सकळांच्या म्हणे मना, 'जेवीं.' ॥ २३
सेवकजन बहु रडला; समजावें केविं त्या अनाथानें ? ।
पांडुपदें जशि त्यांच्या[21], शिशुच्या हि न तृप्ति तशि मना थानें. ॥ २४
त्यांनीं नागपुरीं ती नेली बहु शीघ्र तापदा वार्ता. ।

---

करितां येईल, असे ( संन्यासाशिवाय ) इतर आश्रमहि आहेत'–असें कुंती व माद्री म्हणाल्या. ( मूळ अध्याय ११९।२७ ).

१. आकाशाला. २. दारा+उदार+उक्ति=स्त्रियांचें कपटरहित भाषण. उदार=प्रामाणिक, मधुर, वक्तृत्वपूर्ण. ३. बाहुभूषणें. ४. सलकड्यांची जोडी. ५. उत्तम प्रतीचा मुकुट. ६. उरोभूषण. निष्क=पदक. निष्क हें सोन्याच्या नाण्याचें नांव आहे. पूर्वीं निष्कांच्या माळा गळ्यांत घालीत असत. ७. वस्त्रें, कपडेलत्ते. ८. झाडाची साल. ९. मित्ररूपी पक्षि हो ! १०. शापरूपी वणव्यानें. **रूपका**लंकार. ११. पांडु. १२. उत्तम वृक्ष. १३. पांडुरूप सरोवर. १४. भीष्मरूपी मानससरोवराप्रत. ह्या गीतींत सुरेख **परंपरितरूपक** आहे. १५. सेवकरूपी भ्रमरांनो ! मानससरोवराप्रत राजहंस जातात, असा कविसंकेत आहे. म्हणून 'दासरूपी राजहंसांनो !' असें म्हणावयास पाहिजे होतें. १६. श्रेष्ठ, चांगला. १७. कल्पवृक्ष. १८. वागा, चाला. १९. धनी, पालक ( राजा ). २०. ज्याप्रमाणें. २१. सेवकजनाच्या.

[1]अंगारवृष्टिनें तशि केली सर्व प्रजा तिनें [2]आर्ता. ॥ २५
[3]आजी, [4]माय बहु रडे; भीष्म–विदुर फार जाहले कष्टी. ।
धृतराष्ट्र म्हणे, 'विधिनें[5] केविं पळविली [6]अचक्षुची [7]यष्टी?' ॥ २६
तो पांडु हिमगिरीतें लंघुनियां, [8]गंधमादना गेला. ।
इंद्रद्युम्नसराप्रति जाउनि, [9]शतशृंगपर्वतीं [10]ठेला. ॥ २७
तेथें पांडु, तप करुनि, पावे सुमहर्षितुल्यता [11]सुकृती. ।
काय न साधील, पथा साधूंच्या अनुसरोनि, [12]सासु [13]कृती? ॥ २८
तेथील [14]महर्षिनिकर अन्योन्यातें म्हणे, 'उठा, चाला;' ।
श्रीब्रह्मदेवदर्शन ध्यायास्तव सिद्ध एकदा झाला. ॥ २९
पांडु म्हणे, 'मी येतों.' मुनि म्हणती, 'वायु, कीं महर्षिजन ।
जाया समर्थ, न इतर [15]विधिलोकपथीं करावया [16]व्रजन.' ॥ ३०
समजे पांडु [17]तदाशय, कीं झालों जरि हि [18]अनृण इतरांचा, ।
तरि हि [19]अनपत्यतेस्तव आहें चि ऋणी समस्त पितरांचा. ॥ ३१
पितरांच्या फेडाया न समर्थ, करुनि महातप, रिणा मी. ।
घडतां अधःपतन, मज पुण्यें देतिल न हात [20]परिणामीं. ॥ ३२
त्यांसि म्हणे, 'स्वामी हो! तारावा संकटांत हा भक्त; ।
[21]अनपत्यत्व स्वर्ग[22]द्वारनिरोधासि [23]हेतु, हें [24]व्यक्त. ॥ ३३

---

१. अग्नीच्या वर्षावानें. २. पीडित, दुःखित. ३. सत्यवती. ४. अंबालिका. ५. दैवानें, दुर्दैवानें. ६. आंधळ्याची. ७. काठी. ८. गंधमादन हें हिमालयाच्या एका शिखराचें नांव होय. ९. हें हिमालयाच्या एका शिखराचें नांव. हें पाडवांचें जन्मस्थान होय. १०. जाऊन राहिला. येथें मुळांतील ११९ वा अध्याय संपतो. ११. पुण्यवान्. १२. स+असु=सह+प्राण=प्राणांसह जो तो, अर्थात् प्राणी. १३. कुशल, सद्गुणी. हें गीत्यर्ध सुभाषितरूप आहे. १४. महर्षींचा समुदाय. १५. ब्रह्मलोकाच्या मार्गानें. १६. गमन. १७. ऋषिजनाच्या म्हणण्याचा हेतु. १८. ऋणांतून मुक्त. प्रत्येक मनुष्यास तीन प्रकारचें ऋण फेडावें लागतें. देवांचें ऋण यज्ञानें, पितरांचें प्रजेनें व ऋषींचें स्वाध्यायानें फेडावयाचें असतें. १९. पोटीं संतान नसल्यामुळें. अपत्यावांचून पितरांचें ऋण फिटत नाहीं व अनपत्य मनुष्यास स्वर्गप्राप्ति होत नाहीं, असें शास्त्रवचन आहे. २०. अंतीं, मरणाच्या वेळीं. २१. अपुत्रत्व, निपुत्रिक असणें. ह्यासंबंधीं मनुस्मृतींतील पुढील वचनें पहाः–पुत्रेण लोकाञ्जयति पौत्रेणानन्त्यमश्नुते । अथ पुत्रस्य पौत्रेण ब्रध्नस्याप्नोति विष्टपम्. ॥ पुंनाम्नो नरकाद्यस्मात्त्रायते पितरं सुतः । तस्मात्पुत्र इति प्रोक्तः स्वयमेव स्वयंभुवा. ॥ ह्याचा अर्थः–मनुष्य पुत्रप्राप्तीनें स्वर्गादि लोक मिळवितो,

जेंवि पितृक्षेत्रीं मी, मत्क्षेत्रीं ही तसें चि संतान ।
होतें, तरि तरतों; हा काम पुरविते तुम्ही चि संतान[1].' ॥ ३४
मुनि म्हणति, 'भारता ! हा काम तुझा देवताप्रसादानें ।
होईल पूर्ण, ऐसें दिसतें आम्हांसि पाहतां ज्ञानें.' ॥ ३५
मुनि गेल्यावर, पांडु ज्येष्ठस्त्रीतें म्हणे, 'प्रिये ! कांहीं ।
कथितों, तें मान्य करीं; तुज तों अमृत हि मदुक्त्यधिकें[2] नाहीं. ॥ ३६
मद्वचनें संपादीं सन्मुनिपासूनि शुद्ध संततिला. ।
संततिलाभ चि लाभ; 'स्वर्निःश्रेणी[3] च' म्हणति संत तिला. ॥ ३७
शरदंडायनभार्या[4], पतिच्या आज्ञेकरूनि, सन्मुनितें ।
भजली पूर्वीं; तारी सदपत्यत्रय तयांसि, जन्मुनि, तें.' ॥ ३८
कुंती म्हणे, 'तुम्ही मज कथितां ज्या काय आजि कार्यातें, ।
व्युषिताश्वकथा[5] जाणुनि, मग मान्य करील कोण आर्या[6] तें ? ॥ ३९
व्युषिताश्व भूप मेला; त्याची भद्रा वधू सती, पतिचें ।
शव आलिंगूनि, करी विलाप बहु; न गणि मत सुहृन्मतिचें. ॥ ४०
स्वपदीं दृढ भाव तिचा जाणोनि, नभांत बोलिला[7] वाणी, ।
सोडीना चि शवाला, संततिचा काम धरुनि, जैं राणी, ॥ ४१

---

पौत्रप्राप्तीनें याच स्वर्गादि लोकांत तो चिरकाल वास करितो, आणि प्रपौत्रप्राप्तीनें तो सूर्यलोकास जातो. मुलगा पुं नामक नरकापासून पित्याचें संरक्षण करीत असतो म्हणून त्याला पुत्र असें म्हणतात, अशी स्वतः ब्रह्मदेवानेंच ह्या शब्दाची व्याख्या केली आहे. ( अध्याय ९ श्लोक १३७--१३८ ). २२. स्वर्गद्वारीं अडथळा होण्यास. कल्पनासादृश्यः--संतति नसतां स्वर्गीं पितरांसि वसावया नसे ठाव. ( मागें अध्याय ४ गीति ५ ). २३. कारण. २४. स्पष्ट, उघड.

१. कल्पवृक्ष. २. माझ्या वचनाहून अधिक. ३. स्वर्गलोकास जाण्याची शिडी. हें गीत्यर्ध सुभाषितरूप आहे. ४. शरदंडायन नामक राजाची पत्नी. 'शरदंडायनभूपस्त्री पत्याज्ञेकरूनि सन्मुनितें' असें पाठांतर. शरदण्डायनराजानें आपल्या पत्नीस पुत्र प्राप्त करून घेण्याची आज्ञा केली असतां, ती ऋतुमती झाल्यानंतर त्रिरात्र व्रतस्थ राहिली व चौथ्या दिवशीं स्नान केल्यावर रात्रीच्या वेळीं चार रस्ते एकत्र होतात अशा ठिकाणीं गेली व तिनें एका ब्राह्मणाला आपणाकडे आणिलें. नंतर तिनें सिद्ध अग्नीमध्यें पुंसवन होम केला. तें हवनकर्म समाप्त झाल्यावर ती त्या ब्राह्मणाशीं रत झाली. पुढें तिला दुर्जय आदिकरून तीन पुत्र झाले. ते सर्व महाप्रतापी होते. ( मूळ अध्याय १२० श्लोक ३९--४१ ). ५. राजविशेष, त्याची कथा. ६. सती, पतिव्रता. ७. व्युषिताश्व बोलिला--असा भाव.

'न करीं विलाप सति ! घे वर; ऋतुकाळीं तुवां [1]मंदंगातें ।
रक्षुनि घ्यावें शयनीं; देईन [2]अपत्यहेतुसंगातें.' ॥ ४२
भद्रा तैसें चि करी; झाले तिस शाल्व, मद्र सुत [3]सातें. ।
हें ऐकिलें असेल व्युषिताश्वचरित तुम्हीं हि विख्यात. ॥ ४३
शापप्रतिबंध खरा; परि असद्भाव-भाग्य-[4]पुण्यबळें, ।
स्वामी तुम्ही च कल्पद्रुम, द्याल स्त्रियांसि [5]पुत्रफळें. ॥ ४४
तेंवि, [6]मनःसंकल्पें, दिव्यतपोयोगसिद्धिमंतानें, ।
[7]माझ्या ठायीं देवा ! निर्मावीं त्वां चि शुद्ध संतानें.' ॥ ४५
पांडु म्हणे, 'गे ! साध्वि ! व्युषिताश्व जसा, तसा नसे अन्य. ।
तो साक्षाद्देवोपम; लोकीं सन्मान्य, योगनिधि, धन्य. ॥ ४६
मज आहे श्रुत ऐसें, कीं [8]कामविहारिणी स्त्रिया, [9]स्ववशा ।
पूर्वीं होत्या, भजती भलत्यासि, जशा वनीं गजास [10]वशा. ॥ ४७
उद्दालकमुनिपुत्रें रीति तयांची विलोकिली खोटी; ।
केली हे मर्यादा, जे आतां चालत्ये जगीं मोटी. ॥ ४८
उद्दालकपत्नीतें एक ब्राह्मण धरी करीं, कामी, ।
'क्रीडों चाल' म्हणे, जरि देखत होता तिचा पती [11]धामीं. ॥ ४९
तें पाहुनि उद्दालकमुनि[12]सूनु म्हणे, तयासि, 'कर सोडा.' ।
[13]भव्यार्थ, आजिपासुनि, या दुष्टा [14]दंडकासि कर जोडा.' ॥ ५०
तात म्हणे, 'वत्सा ! हे रीति पुरातन, तुवां न कोपावें. ।
[15]स्त्रीप्रियकामविहारीं विघ्न किमपि तूं करूं नको, पावें.' ॥ ५१

---

१. माझ्या शरीराला (शवाला). २. अपत्योत्पत्तीला कारण अशा संभोगाला. ३. त्या शवापासून ती भद्रा राणी तीन शाल्व आणि चार मद्र असे [ सात ] पुत्र प्रसवली ( मूळ अध्याय १२१।३७ ). ४. आपल्या ठिकाणीं असलेली आमची भक्ति, आमचें सुदैव व आमचें पुण्य यांच्या बळानें. ५. पुत्ररूपी फळें. ६. कुंति म्हणते:–व्युषिताश्वराजाप्रमाणें तूं देखील माझ्या ठिकाणीं मनानेंच पुत्र उत्पन्न करण्यास समर्थ आहेस. कारण तपोबल आणि योगबल ह्या दोन्ही बलांनीं तूं युक्त आहेस ( मूळ अध्याय १२१।३८ ). ७. 'माझा' असा रा० पराडकर यांच्या प्रतींत शब्द आहे. ८. यथेच्छ विलास करणाऱ्या. ९. स्वतंत्र, स्वैर वर्तन करणाऱ्या. १०. हत्तिणी. ११. घरांतून १२. सूनु=पुत्र. १३. ( समाजाच्या ) कल्याणार्थ. १४. रीतीला. १५. 'स्त्री प्रियकामविहारी' असें पाठान्तर.

तें मात्र वचन न[1] करी मान्य श्रीश्वेतकेतु[2] बापाचें; ।
स्पष्ट म्हणे, 'हें कारण होइल नरकप्रद[3] उग्र पापाचें. ॥ ५२
यांवरि[4] ती भ्रूणघ्नी[5] परपुरुषाला भजेल जी अ-सती; ।
भ्रूणघ्न सतीत्यागी पुरुष हि, नरकीं घडो तयां वसती. ॥ ५३
पुत्रोत्पत्त्यर्थ धवें[6] आज्ञा देतां हि, जी हि आज्ञा ते ।
न करिल, तशी[7] च ती ही; भंगितिल न धर्मसेतु[8] हा ज्ञाते.' ॥ ५४
अशि मुनिकृत मर्यादा लोकीं अद्यापि चालत्ये कांते ! ।
जाणसि मदुद्भवास[9] हि; मान्य करीं वचन कनकनिभकांते[10] ! ॥ ५५
कल्माषपादपत्नी[11] मदयंती, जाणताति संत तिला. ।
ती पावली वसिष्ठापासुनि गतिकीर्तिहेतुसंततिला[12]. ॥ ५६
त्वां हि तसें चि करावें; म्यां रचिला[13] आजि सफळ अंजलि हो. ।
मन्नाम पुत्रवंतांमाजि यमामात्यपाणिकंज[14] लिहो'. ॥ ५७
जन्मेजयासि सांगे मुनि[15], कीं वाणीस[16] ही, करुनि पण, जी ।
जिंकू शके सुभाषणनिपुणत्वें[17], ती वदे तुझि निपर्णजी[18]. ॥ ५८
'मत्पितृसदनीं होता श्रीदुर्वासा महोग्र, परि चरण ।
म्यां अर्चिले सदा ही; केलें, साहोनि कष्ट, परिचरण[19]. ॥ ५९
तेणें[20] प्रसन्न होउनि मंत्र मला एक शिकविला आहे. ।
पुत्रार्थ सुराकर्षण कथिलें, वेळा हि पातली त्यां[21] हे. ॥ ६०
श्रीगुरुदत्त[22]-मनु-बळें सांगाल तया सुरासि बाहेन. ।

---

१. मान्य न करी–असा भाव. २. उद्दालकाचा पुत्र. ३. नरक प्राप्त करून देणाऱ्या (नरकास नेणाऱ्या) भयंकर पापाचें. ४. आजपासून पुढें. 'या चरितीं' असें पाठांतर. ५. गर्भघातिनी. ६. पतीनें. ७. भ्रूणघ्नी. ८. धर्माची मर्यादा. ९. माझी उत्पत्ति व्यासवीर्यापासून झाली ही कथा. १०. सुवर्णासारखी आहे कांति जिची अशे! (हे कुंति?) ११. पुढें अध्याय ३४ पहा. १२. उत्तम गति (मोक्ष) व कीर्ति होण्यास कारण अशा संततीस. १३. रचिलेला, रचलेला (अंजलि). १४. यमाचा अमात्य जो चित्रगुप्त, त्याचें हस्तकमल. १५. वैशंपायन. १६. सरस्वतीलाही. १७. उत्तम भाषण करण्याविषयींच्या चातुर्यानें. १८. कुंती. १९. सेवा. २०. दुर्वासानें. २१. देवाच्या आकर्षणाला. २२. श्रीगुरु जो दुर्वासा, त्यानें दिलेल्या मंत्राच्या सामर्थ्यानें.

परपुरुषाला, तुमच्या वचनें, पुत्रोद्भवार्थ पाहेन'. ॥ ६१
पांडु म्हणे, 'धर्मातें बाहें, वाहें तयासि हें [1]काय. ।
[2]तज्जे न सज्जनमतपथ सोडिल, अगुणें [3]सु-विग्रहें काय? ॥ ६२
पतिस नमुनि, गुरुचरणस्मरण करुनि, मंत्रजप करी विधिनें, ।
तत्काळ दिलें दर्शन [4]धर्में, [5]मंत्राहूतें, दयानिधिनें. ॥ ६३
परिसुनि धर्म वदे, '[6]अयि! सति! कुंति मतं ददामि किं ते?' तें ।
परिसुनि म्हणे पृथा, 'जें सुतरत्न हरील सर्व चिंतेतें.' ॥ ६४
धर्में तसा चि दिधला सुत, करुणा करुनि पांडुभूपाळीं. ।
[7]ईषशुक्लपंचमीतिथि[8] होती, [9]तज्जनन होय ज्या काळीं. ॥ ६५
तो उपजतां चि, झाली वाणी [10]अशरीरिणी अशी [11]व्योमीं; ।
'हा कुरुकुळीं युधिष्ठिर हित सकळां, अमृतरस जसा [12]सोमीं.' ॥ ६६
हा पांडुपुत्र सत्यव्रत, सुज्ञ, अजातशत्रु, [13]भू-तरणी; ।
हा [14]मूर्त धर्म [15]भूपतिपति, यश जोडील परम [16]पूत रणीं.' ॥ ६७
[17]सुतमुख-शशिरुचि सेवुनि, पांडु निवाला; परंतु एकानें ।
तृप्त नसे चि; जसा [18]मरुतरुप [19]सकृत्प्राप्तवारिसेकानें. ॥ ६८
पुनरपि म्हणे तिला, 'बळशाली सुत आणिखी असावा गे! ।
सबळ चि वीरखळबळीं, विपिनीं [20]समीरुद्दवा असा, वागे.' ॥ ६९

---

१. शरीर. २. त्याच्यापासून (धर्मापासून) झालेला. ३. विग्रह=शरीर. चांगल्या शरीरानें (शरीरसामर्थ्य चांगलें असून त्या पुरुषाच्या ठिकाणीं गुण नसले, तर त्यांचा काय उपयोग?— असा भाव. 'विनिग्रहें' असें पाठांतर विनिग्रह=विरोध. ४. यमधर्मानें. ५. मंत्राच्या द्वारें ज्याला बोलाविलें होतें त्यानें. ६. अयि! सति! कुन्ति! ते मतं किं ददामि?=अगे साध्वि! कुन्ति! तुला इष्ट [आहे] असें मी काय देऊं? ७. आश्विन शुक्ल पंचमी—**पंत** इष=आश्विनमास. ८. मूळांत 'ऐन्द्रे चंद्रसमायुक्ते मुहूर्तेऽभिजितेऽष्टमे । दिवा मध्यगते सूर्ये तिथौ पूर्णेऽतिपूजिते ॥ समृद्धयशसं कुंती सुषाव प्रवरं सुतम् ॥' (अध्याय १२३ श्लोक ६—७) असें आहे. यावरून ज्येष्ठ शुक्ल ५ स जन्म झाला असें दिसतें. ९. त्याचा जन्म. १०. आकाशवाणी. ११. आकाशांत. १२. चंद्राच्या ठिकाणीं. १३. पृथ्वीवरचा सूर्य. १४. मूर्तिमान्. १५. राजराजेश्वर, सार्वभौम राजा. १६. पवित्र. १७. पुत्रमुखरूपी चंद्राची कांति. १८. मारवाडांतील मोठा वृक्ष. मारवाडांत पाण्याचें दुर्भिक्ष असतें, हें प्रसिद्धच आहे. १९. एक वेळ प्राप्त झालेल्या उदकाच्या सिंचनानें. २०. वाऱ्यासह दावानळसा.

कुंती मंत्रजप करुनि, चिंती मनिं कीं, 'समीर' देवा! '[1]यो'. ।
तो ही तसा चि आला; त्यासि म्हणे ती, 'सुपुत्र दे वायो!' ॥ ७०
पवनापासुनि झाला सुत बळनिधि भीमसेन, [2]तज्जननीं ।
होय [3]गगनंगी, हर्षे भूमि हि; केवळ न एक [4]तज्जननी. ॥ ७१
'हा बळजळधि खळांचा समरीं उतरील सर्व हा [5]रेंचं. ।
चूर्ण करील शिळा-दृढ-[6]शत्रूरें, मुष्टिच्या प्रहारें च.' ॥ ७२
[7]अंकीं निजला असतां, व्याघ्रभयें ती पृथा उठे [8]तूर्ण. ।
तों [9]घनसा भीम पडे, होय तनुभरें तळीं शिळा चूर्ण. ॥ ७३
'तिसरा हि पुत्र लोकश्रेष्ठ असावा' असें मनीं आणी. ।
उग्र तप करी राजा पांडु; [10]तदुक्तें तशी च ती राणी. ॥ ७४
आराधिला [11]सुरेश्वर; [12]भेटोनि म्हणे तयासि, 'माग वर.' ।
पांडु म्हणे, 'दे मजला आत्मसम कुमार [13]भूरिभाग-वर.' ॥ ७५
इंद्र म्हणे, 'मत्सम तुज पुत्र दिला, सर्ववीरवर हो तो. ।
हो तूं हि [14]पुत्रिवर; [15]बहुगुण सुजनीं अर्पिला सु-वर होतो.' ॥ ७६
[16]हरि गेल्यावरि, पांडु स्त्रीस म्हणे, 'एक वर्ष तपलीस ।
ज्या [17]अर्थे तूं देवि! स्वव्रतनियमासि फार जपलीस, ॥ ७७
तें तप फळलें; तुज सुत देणार हरी, म्हणोनि, [18]गुरुदत्ता ।
विद्या तुवां जपावी, जीची [19]सांची जगत्रयीं सत्ता.' ॥ ७८

---

१. येवो. 'समीरदेवा! यो' असें पाठांतर. यो=यावें. २. त्याच्या जन्मकाळीं. ३. आकाशवाणी. ४. त्याची माता. ५. गर्व. रेंच उतरणें=खोड मोडणें, रग जिरवणें. हा शब्दसमूह **पं**तांच्या काव्यांत वारंवार आढळतो. ह्या शब्दसमूहावर ती० कै० **वा. दा. ओक** यांनीं विशेष शोधपूर्वक एक सविस्तर टीप **पं**तकृत उद्योगपर्व, अध्याय ८ गीति ७२ वर दिली आहे, ती जिज्ञासूंनीं अवश्य पहावी. ६. दगडासारखीं कठीण अशीं शत्रूचीं उरःस्थळें. 'चूर्ण करील शिळा दृढ, शत्रुशिरें मुष्टिच्या प्रहारेंच' असा पाठभेद. ७. मांडीवर. ८. शीघ्र, घाईनें. ९. घणासारखा. १०. त्यानें सांगितल्याप्रमाणें. ११. देवाधिपति इंद्र. १२. इंद्र भेटोनि—असा अन्वय. १३. महाभाग्यशाली, मोठा भाग्यवान्. १४. पुत्रवंतांमध्यें श्रेष्ठ. १५. सुजनीं अर्पिला (अर्पिलेला) सुवर (उत्तम वर) बहुगुण (अनेक पटींनीं वाढणारा) होतो—असा अन्वय. १६. इंद्र. १७. हेतूनें. १८. गुरूनें (दुर्वासाऋषीनें) दिलेली. १९. खरोखर.

कुंतीनें शुभदिवशीं, एकांतीं, इष्टकाम जाणविला. ।
आत्रेयदत्तविद्यादूती[1] योजून शक्र आणविला. ॥ ७९
इंद्रापासुनि अर्जुन होतां, तद्गुण[2] मनोरम नभोगी[3] ।
वर्णी, तच्छ्रवणें सुख बहु कुंतीपांडुसाधुमन भोगी. ॥ ८०
'हा रंजवील गुरुजनचित्तातें; श्रुतिरहस्य[4] कवळील; ।
दुग्धाब्धिफेनधवळें स्वयशें[5] कुरुच्या कुळासि धवळील[6]; ॥ ८१
लीलेनें सुरदुष्कर[7] कर्म करिल; संगरीं[8] न आटेल; ।
फाटेल भयें याच्या द्विषदुर[9]; हा मूर्त काळ वाटेल; ॥ ८२
हा तोषवील युद्धीं त्यास हि, जो काळकंपद[10] पिनाकी[11]. ।
पावेल पाशुपत[12] ही, ज्या पात्र न, जरि हि कृती तदपि, नाकी[13]. ॥ ८३
किंबहुना विष्णु[14] जसा सुखद अदितिला[15], तसा चि हा तुजला. ।
'धन्यासि[16] कुंति !' 'पांडो ! त्वत्क्षेत्रीं[17] कल्पवृक्ष कीं[18] रुजला !' ॥ ८४
ऐशी अंबरवाणी झाली, शुभकुसुमवृष्टि बहु मोटी; ।
वाद्यध्वनि बहु झाले; आले आदित्यरुद्रमुनि कोटी. ॥ ८५
पावे दशरथगृह जें यश, पांडूटज[19] हि जिष्णुजननीं[20] तें; ।
बहु मानिलें सतींनीं कुंतीतें, जेविं विष्णुजननीतें. ॥ ८६
पांडु पुन्हां हि प्रार्थी, त्यातें कुंती म्हणे, 'पुरे, लोभें ।

---

१. अत्रीचा पुत्र दुर्वासा यानें दिलेली विद्यारूपी दूती. २. त्या अर्जुनाचे गुण. 'सद्गुण' असें पाठांतर. ३. नभः+गी=आकाशवाणी. ४. वेदरहस्य ( आत्मज्ञान ). कवळणें=कवटाळणें, हस्तगत करणें. ५. क्षीरसमुद्राच्या फेंसाप्रमाणें शुभ्र अशा आपल्या यशानें. यशाचा रंग पांढरा असतो, असा कविसंकेत आहे. ६. शुभ्र करील. ७. देवांनाही करण्यास कठीण असें. ८. युद्धांत. ९. शत्रूचें वक्षस्थळ. १०. यमाला देखील कांपविणारा ( भीति–प्रद, भिवविणारा ). ११. पिनाक नांवाचें धनुष्य ज्याच्याजवळ आहे, तो ( शंकर ). १२. शंकराचें अस्त्र. १३. स्वर्गांत राहणारे देव. नाक=स्वर्ग. १४. विष्णु हा द्वादश आदित्यांपैकीं एक. द्वादश आदित्यांचीं नांवें:–शक्र, विष्णु, अर्यमा, धाता, त्वष्टा, पूषा, विश्वावसु, मित्र, वरुण, अंशुमान, भग आणि अतितेज. १५. आदिति ही कश्यपऋषीच्या तेरा स्त्रियांतील ज्येष्ठ. ही प्राचेतस दक्षाची कन्या. हिला आदित्यसंज्ञक बारा देव हे पुत्र होते. १६. हे कुंति ! तूं धन्य आहेस. १७. तुझ्या पत्नीरूपी शेतामध्यें. १८. 'हा रुजला' असें पाठांतर. १९. पांडु+उटज=पांडूची पर्णशाला. २०. अर्जुनाच्या जन्माच्या योगानें.

होईन बंधकी[1] मी; क्षोभें न मनीं, ईहीं च बहु शोभें.' ॥ ८७
माद्री पतिप्रति म्हणे, 'झाले माझ्या कुमार जावेला[2]; ।
सुख गमलें; म्हणत्यें मी, 'वृद्धीतें[3] यापरीस[4] जा वेला[5] !' ॥ ८८
दोघी वंध्या होतों, परि फळला सत्प्रसाद एकीला. ।
झाला तुम्हांसि संततिलाभ, जसा वृष्टिलाभ केकीला[6]. ॥ ८९
मी मात्र मंदभाग्या[7]; सांत्वुनि म्हणतां, 'रहा सुखें, न रडें.' ।
परि मुनिशापवृकें[8] या हरिणीचें कवळिलें मुखें नरडें. ॥ ९०
मत्संतानार्थ तुम्ही दयितेला[9] भीड घालितां, तरि ती ।
आज्ञा न मोडिती, या सवतीवरि ही सती दया करिती.' ॥ ९१
पांडु म्हणे, 'माझ्या ही चित्तीं आहे असें चि; पदर तिला ।
पसरीन; करील वचन; भंगील न ती मदीय-पद-रतिला[10].' ॥ ९२
कुंतीस म्हणे, 'देवि ! त्वद्भजनीं सादरा तुझी आली[11]. ।
माद्री त्वां तारावी; हे चि न दुःखाब्धिच्या[12] तटा आली. ॥ ९३
यश बहु वाढेल तुझें; हें चि भल्यांनीं जपोनि सांचविलें; ।
सर्वस्व वेंचिलें[13], परि एक भलेपण जगांत वांचविलें.' ॥ ९४
आज्ञा स्वीकारुनि, ती, मंत्रजप करुनि म्हणे तिला, 'जावें; ।
पुत्रार्थ सकृत्[14] दैवत चिंतावें त्वां; सये[15] ! न लाजावें.' ॥ ९५
ती दस्रांतें[16] चिंती, तों ते पावोनि[17] म्हणति, 'हे माद्री ! ।
द्यावें[18] काय तुज ? तुवां स्वावयवें[19] जिंकिला चि हेमाद्री[20] !' ॥ ९६

१. जारिणी. २. ह्या तीन मुलांनींच. ३. गांधारीला. गांधारी-**पंत.** ४. गांधारीला शंभर पुत्र झाले, त्यापेक्षां ज्यास्त. 'यापरीच' असें पाठांतर. ५. वंशरूपी वेल ( लता ). वंशाला वेलाची उपमा देण्याचा प्रघात आहे. ६. मयूराला. ७. दुर्दैवी, अभागी. ८. किंदमऋषीनें दिलेला शाप, हाच लांडगा त्यानें. ९. आवडती स्त्री जी कुंती तिला. १०. माझ्या पायांच्या ठिकाणीं असलेल्या प्रीतीला. ११. सखी. १२. ( पोटीं संतति नसल्यामुळें वाटणाऱ्या ) दुःखसागराच्या तीरावर गेली नाहीं, दुःखांतून मुक्त झाली नाहीं. १३. खर्च केलें. १४. एकदां. १५. 'सखे !' असें पाठांतर. १६. अश्विनीकुमारांना. १७. येऊन. १८. 'द्यावें काय ? वद.' असें पाठांतर. १९. स्व+अवयवें= आपल्या अवयवानें. तिचे स्तन अतिशय पुष्ट होते. त्यांनीं जणुं काय मेरुपर्वतासही जिंकिलें होतें-असा भावार्थ. किंवा अवयव म्हणजे शरीर असा अर्थ आहे, तो घेऊन स्वावयवें=आपल्या शरीरसौष्ठवानें-असा अर्थ करावा. २०. मेरुपर्वत हा सुवर्णाचा आहे, अशी समजूत आहे.

माद्री हांसोनि म्हणे, 'जाणुनि हृद्रोग, त्यासि अगदानें[1] ।
दूर करा, जी ! रोगी न निवे कनकाचिया[2] हि अग-दानें.' ॥ ९७
त्यांपासुनि ती पावे अत्यंत मनोरमांग यमलांतें[3]; ।
नकुळ सहदेव ते बहु सुखविति त्या पांडुनेत्रकमलांतें. ॥ ९८
अणखी माद्रीविषयीं पांडु प्रार्थी पृथेसि एकांतीं. ।
मान्य न करी; गमे ती वृष्टि उघडली[4] मयूरकेकांतीं[5]. ॥ ९९
कुंती बोले, 'माझा उपमर्द करील ती, असें गमतें; ।
द्वंद्वाह्वानें[6] पुत्रद्वंद्व जिनें सहज साधिलें स्वमतें[7].' ॥ १००

---

## अध्याय विसावा.

झाले पांच सुरद्रुम[8]सम सुत, आनंद पांडुचा पिकला. ।
पिकें[9] लाभला बहुदिसां आम्राला, सुरभि[10] ज्यामधें टिकला. ॥ १
त्यावरि वसंतकाळीं, एकांतीं, रम्यनंदनाभ[11]भवनीं, ।
माद्री अनुसरली, जशि सेवी त्या पूरुनंदना[12] भवनीं[13]. ॥ २
होता विरक्तिभस्मोच्छादित[14] कामाग्नि पांडुहृत्कुंडीं; ।
फुकिला सुरभिवनश्रीधमनी[15] काळें[16] धरूनियां तुंडीं[17]. ॥ ३
पावे[18] स्मराग्नि, जागा[19] होता, स्त्रीदृष्टिसर्पिराहुतिला[20]. ।
लोपे विवेकशशिरुचि[21], मुनिशाप[22] चि होय दर्पि[23] राहु तिला. ॥ ४

---

१. औषधानें. २. सोन्याच्या पर्वताच्या दानानें. अग=पर्वत. ३. जुळ्या मुलांना. ४. बंद झाली. ५. मोराच्या टाहोनंतर. ६. दोघांना बोलावण्यानें; दोघांस बोलावून. ७. आपल्याच मतानें, अर्थात् माझी संमती न घेतां. ८. कल्पतरुतुल्य. ९. कोकिल. हें साधर्म्यैकरून होणाऱ्या दृष्टांताचें उदाहरण आहे. दामयमक. १०. वसंत किंवा सुवास. वसंत–पंत. ११. नंदनवनासारख्या रम्य वनांत. ( आभ=सदृश ). १२. पूरूच्या वंशजाला म्हणजे पांडूला, पूरुकुलांतील नंदन ( पुत्र ) जो पांडु त्याला. १३. गृहीं. १४. विरक्तिरूप भस्मानें झांकलेला. १५. वसंतसंबंधी वनशोभारूप फुंकणी, वसंतांतील वनश्री हीच फुंकणी. १६. काळपुरुषानें, यमानें. ह्या गीतींत परंपरितरूपक आहे. १७. तोंडांत. १८. [ जो ] स्मराग्नि जागा होता [ तो ] स्त्रीदृष्टिसर्पिराहुतिला पावे–असा अन्वय. १९. 'जागा होतां' असें पाठांतर. २०. स्त्री+दृष्टि+सर्पि+आहुतिला=स्त्रियेची दृष्टि हीच तुपाची आहुति, तिला. २१. विचाररूप चंद्राची कांति. २२. किंदममुनीचा शाप. ( अध्याय १९ गीति १० पहा ). २३. दर्पयुक्त, उद्दाम.

धृति[1] नव्हति काय ? मुनिचा नव्हता तो विदित काय कोप तिला ? ।
परि होणार चुकेना ! **वारूं न शके चि बायको पतिला.** ॥ ५
स्मरकाळमूढ[2] **पांडु** प्रेमें आलिंगुनि स्वं[3]-रामेला, ।
सुरतीं प्रवर्तला जों, झाला मुनिशाप तो[4] खरा, मेला[5] ! ॥ ६
दृग्मीलननिश्चलता[6] **पांडूची** प्रथम भासली सुरतें. ।
मग मरण समजलें, हो ! झालें वपु शीत कांति[7]-भासुर तें. ॥ ७
**माद्री**, 'हा प्राणेश्वर ! हा देव !' असे करी विलाप वनीं. ।
ते नेउनि भेटविले क्षिप्र तिचे शब्द **कुंतिला** पवनीं[8]. ॥ ८
ससुता **कुंती** तेथें जाय म्हणे, 'हाय ! **माद्रि** ! हें काय ? ।
शाप विदित असतां, त्वां स्पर्शो द्यावें पतीस[9] हें काय ? ॥ ९
क्षणसुखलोभें मूढे ! एकांतीं कांत[10] भुलविला साचा. ।
केला घात ! कसा ? गे ! या व्यसनीं[11] काम तुज विलासाचा ?' ॥ १०
**माद्री** म्हणे; 'न म्यां, नरदेव नियतिनें[12] चि, भुलविला साचा. ।
बाइ ! हरि[13] पुढें दिसतां आठव[14] हि करेणु[15] करि विलासाचा[16] ? ॥ ११
दीपकलिकेसि[17] धावुनि आलिंगी आग्रहें पतंग जसा, ।
पडला गळां चि माझ्या; रंभेच्या[18] दीप्तमद[19] मतंगजसा[20]. ॥ १२
**कुंती म्हणे, 'पतीसीं[21] मी जातें, ऊठ, तूं मुलें पाळीं.'** ।
**माद्री** म्हणे, 'मला दे आज्ञा, माझ्या चि हें असो भाळीं[22]. ॥ १३
तूं चि मुलें रक्षाया दक्षा[23], यादवि[24] ! न मी, तुझी ममता ।
सर्वत्र तुल्य आहे; राहेल न मन्मनीं असी समता. ॥ १४

---

१. धैर्य. २. मदनरूप काळानें मोहित केलेला. ३. आपल्या बायकोला. ४. रा० **परा**डकर यांच्या प्रतींत 'मुनिशाप तो' असा पाठ आहे. पण येथें 'जों–तों' अशी जोडीच असणें अर्थ-गौरवार्थ इष्ट दिसतें. ५. पांडु मेला–असा भाव. ६. डोळ्यांचें मिटणें व हालचाल बंद होणें. ७. कांतीनें शोभणारें. ८. वाऱ्यानें. ९. शरीर. १०. पति ( पांडुराजा ). ११. शापरूपी संकटांत असून. १२. दैवानेंच. १३. सिंह. १४. स्मरण. १५. हत्तीण. १६. सिंह समोर दिसत असतां हत्तिणीला विलासाची इच्छा होईल काय ? अर्थात् 'नाहीं' हें उत्तर. **प्रश्ना**लंकार. १७. दिव्याच्या ज्योतीला. १८. केळीच्या. १९. मदोन्मत्त. २०. हत्तीसारखा. ह्या **उपमा** माद्रीवर ओढवलेल्या प्रसंगाची कल्पना वाचकांच्या मनश्चक्षूंपुढें उभी करितात. २१. पतीबरोबर. सहगमन करितें.–असा भाव. २२. कपाळीं ( दैवांत ). २३. योग्य, तत्पर. २४. यदुकुलोत्पन्ने ! कुंति !

दे मज अग्नि, स्वर्गीं पतिसह सुकृतें[1] तुझ्या चि जाईन. ।
बाई ! न दया टाकीं, तेथें मी त्वद्गुणासि[2] गाईन.' ॥ १५
कुंतीनें माद्रीची सफळा सहगमन-कामना[3] केली. ।
नियतिमना[4] ये त्यांच्या[5], सवतीच्या ये न कां मना केली[6] ? ॥ १६
शतशृंगवासि[7] मुनिजन झाला तेथें समस्त एकवट[8]. ।
आश्रय मुनिला[9] बुडतां, कुंतीस हि होय तो चि एक वट[10]. ॥ १७
त्या पांडुकुटुंबातें ते साधु महर्षि गुह्यकवनांत ।
उघडें[11] पडों न देती, सुकवि जसे वेदगुह्य[12] कवनांत. ॥ १८
पंच[13] सुतांसह कुंतीप्रति समजावूनि, आपुल्या संगें, ।
संस्कार[14] घडायास्तव त्या दोघांचीं हि आणिती अंगें[15]. ॥ १९
येउनि पुरासि[16] केलें मुनिंनीं तें स्वांघ्रिशुद्धिवृत[17] राष्ट्र. ।
भेटाया आणविले सत्यवती भीष्मविदुरधृतराष्ट्र. ॥ २०
वृत्त कथुनि, बाळ, पृथा भेटवुनी, दाखवूनि अस्थि, 'रहा ।
धैर्यनगें, धर्मपथीं,' मुनि म्हणति, 'असाचि, अर्थ[18] अस्थिर[19] हा.' ॥२१
मुनि गेले, झालें तें पांडुमरणवृत्त धृतिनगीं[20] भिदुर[21]. ।

---

१. पुण्यानें. २. 'त्वद्गुणांसि' असें पाठांतर. ३. मृतभर्त्यासह जावयाची इच्छा. ४. दैवाच्या मनास. 'नियतिमना ये त्यांचा' असा रा० पराडकर यांच्या प्रतींत पाठ आहे. पण पंत पुष्कळदां 'चा' व 'च्या' यांत भेद मानीत नाहींत. ५. त्यांच्या (पांडु व माद्री यांच्या) केली (क्रीडा) नियतिमना (दैवाच्या मनास) ये (आल्या), [मग] सवतीच्या (कुंतीच्या) मना कां न ये? (कां येऊं नयेत बरें?)-असा अन्वय. दैवाला जी गोष्ट पसंत पडली, ती मान्य करणें कुंतीला भागच होतें—असा भाव. ६. क्रीडा. ७. शतशृंग नामक हिमालयाच्या शिखरावर राहणारा. ८. एकत्र. ९. मार्कंडेयास—पंत. भगवंतानीं आपली माया मार्कंडेयाच्या प्रत्ययास आणून देण्याकरितां एकदां जलप्रलय केला. त्या वेळीं मायेनेंच निर्माण केलेला एक वटवृक्ष त्यास आधार झाला—अशी कथा आहे. 'आश्रय मुलांसि बुडतां' असें पाठांतर. मुलांसि=पांच पांडवांस. १०. वटवृक्ष. ११. उघडें पडणें=निराश्रित होणें, सांभाळ करणारें माणूस नाहींसें होणें. १२. वेदांचें रहस्य. १३. 'पांच सुतांसह' असें पाठांतर. १४. अंत्यविधि. १५. मृतशरीरें (अर्थात् दग्ध शरीरांतील अंगें म्हणजे अस्थि वगैरे). १६. हस्तिनापुरास. १७. स्व+अंघ्रि+शुद्धि+वृत=आपल्या पायांनीं केलेल्या शुद्धीनें युक्त. १८. इच्छिलेली वस्तु, ध्येय. १९. अशाश्वत. २०. धैर्यरूप पर्वतावर. २१. वज्र.

करवी[1] उत्तरकार्य प्रेज्ञाचक्षुर्मतें[2] सुधी[3] विदुर. ॥ २२
विध्युक्त पारलौकिक झाल्यावरि पुत्र पांडुचे गेहीं ।
नेले[4], गेमले, शिरले ते पंच प्राण टाकिल्या देहीं. ॥ २३
त्यावरि मातेसि[6] कथी व्यास कुरुकुळीं अनर्थ जो भावी[7], ।
धाडी तपोवनीं; कीं, ती स्वर्गीं तप करूनि शोभावी. ॥ २४
दोघी[9] सुना हि घेउनि, भीष्मासि पुसोनि, जाय ती न टिके[10]. ।
त्यजिले आप्तजन तसे, स्वप्नींचे अर्थ ते जसे लटिके. ॥ २५
गेल्या तिघी हि उत्तमलोकीं त्या धरुनि कांसें[11] योगाची[12]. ।
पडली गळां चि त्यांच्या निःसीम समृद्धि दिव्यभोगाची. ॥ २६

---

## अध्याय एकविसावा.

पांडुसुतांचीं झालीं उपनयनें[13] ते श्रुतिस्मृती पढले. ।
अल्पवयांत चि पांच हि बंधु महत्वीं हळू हळू चढले. ॥ १
भीम बळी, त्यापासुनि होती धृतराष्ट्रपुत्र परिभूत[14]. ।
मंत्रज्ञ[15] सहज पाहे, पावति अत्यंत ताप परि भूतें[16]. ॥ २
ज्या त्या क्रीडेंत, मुलें भीमापासूनि पावती भंगें[17]. ।
सन्माणिक्यमणिपुढें[18] गोमेदांचा[19] फिका पडे रंग. ॥ ३

---

१. ब्राह्मणाकडून करवी-असा भाव. २. धृतराष्ट्राच्या अनुमतानें. ३. विद्वान्, पंडित. ४. 'गेले' असें पाठांतर. ५. **उत्प्रेक्षा**लंकार. ६. सत्यवतीला. ७. होणारा. ८. 'तपोवनीं' असें पाठांतर. ९. अंबिका आणि अंबालिका ( विचित्रवीर्याच्या भार्या. ) १०. राहे. संसारांत न राहे असा-भाव. ( मूळ अध्याय १२८ श्लोक १२-१३ ). ११. कांस धरणें=आश्रय करणें. १२. योग=ईश्वरप्राप्तीचा उपाय, समाधि, चित्तवृत्तिनिरोध. १३. मौंजीबंधनें. १४. पराभव पावलेले. १५. मांत्रिक. १६. पिशाच. हा शब्द संस्कृतांत पुल्लिंगी आहे. १७. पराभव. १८. माणिक नामक जातीच्या उत्तम रत्नापुढें. ह्या गीतींत **प्रतिवस्तूपमा** नामक अलंकार आहे. १९. गोमेद=पाषाणविशेष. हा मणि हिमालयांत व सिंधुनदांत सांपडतो. याचा रंग पांढरा, पिंवळा, अस्मानी व तांबडा असा चार प्रकारचा असतो. गुणावरून याचे शुभावह आणि अशुभावह असे दोन भेद आहेत ( रसरत्नसमुच्चय, अध्याय ४ श्लोक ५४-५६ पहा ). 'गोमेदांचा' असें पाठान्तर.

भीमाच्या साहजिकें तेजें ते भंग पावती [1]क्षुद्र, ।
[2]ऋक्षांत रवि, तसा [3]तो [4]त्यांत महात्मा, [5]पशूंत कीं [6]रुद्र. ॥ ४
चढति फळार्थ [7]नगीं ज्या, तन्मूळीं भीम निजपदें ताडी, ।
लीलेनें तत्फळदळकुसुमांसह त्यांसि भूतळीं पाडी. ॥ ५
[8]शशि-रंकुपुढें कैसे होतील न भग्नगर्व [9]काळविट ? ।
भीमबळोत्कर्षें ते खळ धरिति मनांत सर्वकाळ [10]विटं. ॥ ६
स्पर्धा करूनि साधूं जातां, भलतें हि काज, [11]वेगमंती ।
न पुरे; तो भीम शशी भासे; ते सर्व काजवे गमती. ॥ ७
[12]मारुतिसिंह वधावा कपटें, तद्बंधु हे हि [13]अवि चारी ।
बांधावे, ऐसें हें योजी [14]दुर्योधनाख्य अविचारी. ॥ ८
[15]जळकेलीचें करवी साहित्य मग [16]प्रमाणकोटींत. ।
वरि दावी प्रेम असें, कीं, नाहीं [17]तत्प्रमाण कोटींत. ॥ ९
ने पांडवांसि तेथें, बहुत भला भासला, न [18]वंचकसा. ।
कळला चि न [19]संसर्गायोग्य चि, तो [20]मूर्तपापपंचकसा. ॥ १०
गेले प्रमाणकोटिस्थानीं गंगातटीं [21]वरोपवनीं. ।
तेथ [22]पटगृहीं शोभा केली होती, जसी [23]महाभवनीं. ॥ ११
धृतराष्ट्रपुत्र, पांडव त्या [21]सदुपवनीं, जया जसें इष्ट, ।
[24]गंगातटपटसदनीं ते भक्षिति अन्न विविध जें मिष्ट. ॥ १२
दुर्योधनें विषान्नें वाढविलीं, भीम जेविला भावें. ।
आदर तसा करी खळ, बहु दिवसां [25]मित्रें जेंवि लाभावें. ॥ १३

---

१. नीच. २. नक्षत्रांत. ३. भीम. ४. धृतराष्ट्रपुत्रांत. ५. प्राण्यांत ( पश्यन्ति–पाहातात ते पशवः=प्राणिनः ). ६. पशुपति, महादेव. ७. वृक्षावर. ८. चंद्रस्थ हरिणापुढें. ९. हरिणविशेष. १०. वीट, तिरस्कार, मत्सर. ११. [ दुर्योधनादिकांच्या अंगीं असलेला ] जोर, धडाडी, आवेश. १२. मरुताचा ( वायूचा ) पुत्र ( भीम ) हाच कोणी सिंह. १३. मेंढे. १४. दुर्योधन ह्या नांवाचा. १५. जलक्रीडेचें. दुर्योधनानें 'उदकक्रीडन' या नांवाचें एक ठिकाण तयार करविलें होतें. ( मूळ अध्याय १२८।३३ ). १६. प्रमाणकोटि=गंगातीरावरील एक तीर्थ. १७. त्याचें माप. १८. वंचकसा न [ भासला ]–असा अन्वय. वंचक=ठक, फसविणारा. १९. सहवासास अनुचित. २०. मूर्तिमान् पंचमहापातकांसारिखा. ब्रह्महत्या, सुरापान, सुवर्णस्तेय, गुरुपत्नीगमन आणि तत्संसर्ग हीं पांच महापातकें समजतात. २१. सुंदर बागेंत. २२. तंबूमध्यें. २३. मोठ्या वाड्यामध्यें. २४. गंगेच्या कांठावर उभारलेल्या तंबूंत. २५. 'मित्र' हा शब्द संस्कृतांत नपुंसकलिंगी आहे.

'इष्टार्थाची निश्चित सिद्धि,' म्हणे तो मनांत खळ, 'केली.' ।
मग ते सूर्यास्तावधि करिति श्रीजान्हवींत जळ-केली. ॥ १४
आले कुमार तीरीं, त्यांत बहु श्रांत भीम; [1]गरळानें ।
तो व्यापिला; [2]ऱ्हद जसा तैलाच्या [3]बिंदुनें [3]सु-तरळानें. ॥ १५
जळकेलींत श्रमला, प्रथम हि सविषान्न जेविला तिपट, ।
निजला शीत पटगृहीं, तीरीं येतां चि [4]मोहिला [5]निपट. ॥ १६
दुर्योधनें विषाकुळ [6]मारुति केला निबद्ध [7]वल्लींनीं. ।
[8]पंकजवद्दुर्जातें करिजेतो घात [9]भृंगवल्लींनीं. ॥ १७
दुर्योधनें बुडविला तो गंगेंत त्यजूनि [10]अनुकंपा. ।
ऐसें [11]अघ करितां, त्या [12]पापाची पावली न [13]तनु कंपा. ॥ १८
पाषाणसा बुडाला, खळसंगें घात हा असा घडला. ।
नागकुमारांवरि तो जाउनि, [14]नागालयांतरीं पडला. ॥ १९
वरि पडतां डसले [15]ते दैवें तो त्यासि होय [16]हितें दंश. ।
विष उतरलें [17]अहिविषें; उरला नाहींच लेश हि [18]तद्दंश. ॥ २०
[19]स्वज्ञानातें पुनरपि [19]पावे तो, जेंवि अंध नेत्रातें; ।
दैवें तद्वळ त्याला झालें, तोडोनि बंधनें, [20]त्रातें. ॥ २१

---

१. विषानें. २. सरोवर, तलाव. ३. अत्यंत चंचल अशा थेंबानें. ४. गुंगला, बेशुद्ध झाला. ५. अगदीं, पूर्णपणें. ६. भीमसेन. हा मरुताचा (वायूचा) पुत्र होय. (मागें अध्याय १९ गीति ६८ ते ७३ पहा). ७. वेलीनीं, लतांनीं. दुर्योधनानें स्वतः वेलींचे फांस करून त्यांनीं भीमाला बांधिलें-असें मूळांत आहे. (अध्याय १२८•श्लोक ५४). ८. पंकजवत्+दुर्जातें=कमलसदृश दुष्टानें. ९. भृंगवत्+लीनीं=भुंग्याप्रमाणें जो लीन झाला त्याचे ठायीं. (सूर्यास्तसमयीं कमळ मिटलें असतां त्याच्या सुगंधास लुब्ध झालेला भुंगा आंतच अडकून राहातो, अशी वस्तुस्थिति आहे. तीस अनुसरून ही कल्पना आहे. ह्यासंबंधीं पुढील सुभाषित पहाः-रात्रिर्गमिष्यति भविष्यति सुप्रभातं भास्वानुदेष्यति हसिष्यति पंकजश्रीः । इत्थं विचिन्तयति कोशगते द्विरेफे हा! मूलतः कमलिनीं गज उज्जहार. ॥ १०. दया. ११. पाप. १२. पापरूप दुर्योधनाची. १३. देह. १४. सर्पांच्या निवासस्थानांत (पाताळांत). १५. ते=सर्प. १६. हितकारक. १७. [पाताळांतील] सर्पांच्या विषानें. येथें कर्त्याच्या मनांत जें घडून यावें अशी अपेक्षा होती त्याप्रमाणें घडून न येतां, उलट अगदीं त्याच्या विरुद्ध क्रिया घडली असें वर्णन आहे. म्हणून हा **विषमा**लंकार. १८. त्या विषाचा अंश. १९. तो (भीम) शुद्धीवर आला-असा भाव. २०. रक्षण करणारें.

बंधन तोडुनि भीमें डसले होते तनूसि जे सर्प, ।
गरुडें जसे, तसे ते दूर उडविले, हरूनियां [1]दर्प. ॥ २२
[2]नागकुमारमुखें श्रुत होतां [3]आश्चर्यवृत्त तें, राजा ।
वासुकि पाहों आला; कुंतीचा [4]आर्यकाख्य जो [5]आजा. ॥ २३
आर्यकनाग प्रेमें भेटे भीमासि, कीं कळे नातें. ।
[6]आर्यांचें दूरत्वें, नसतां सहवास ही, मळेना तें[7]. ॥ २४
वासुकि म्हणे, 'करावें याचें प्रिय काय ? आर्यका ! [8]सार. ।
श्रांताला निववावें; इच्छितसे हें चि कार्य [9]कासार.' ॥ २५
आर्यक म्हणे, 'प्रभो ! प्रिय करिसी जरि सुप्रसन्न चित्तानें, ।
बहुलाभ काय याला, दिधल्या [10]मणिकांचनादिवित्तानें ? ॥ २६
आहे [11]सहस्रगजबळ ज्या [12]रसकुंडीं प्रतिष्ठित प्राज्ञा ! ।
जितुका रुचेल तो रस तितुका सेवू, असी दिजे आज्ञा.' ॥ २७
रससेवनार्थ आज्ञा वासुकिची होय, दाविलें कुंड. ।
सुपरिश्रांतें भीमें त्या रसकुंडासि लाविलें [13]तुंड. ॥ २८
केलीं [14]एकोच्छ्वासें एक असीं [15]रिक्तें आठ रसकुंडें. ।
पात्रें स्वल्पजळाचीं जैसीं तृषितें गजें [16]निहितशुंडें. ॥ २९
अंश [17]जगत्प्राणाचा म्हणउनि रस तो महातपा प्याला. ।
[18]सुकृत अमित नसतें, तरि लावूं देते न [19]हातें पाप्याला. ॥ ३०
एकांतीं सुखशयनीं पांडव निजला पिवूनियां [20]सु-रसा ।
रूपें बळें गुणें तो सकळां नागांसि भासला [21]सुर-सा. ॥ ३१

---

१. ( त्या सर्पांचा ) गर्व. २. सर्पबालकांच्या मुखानें. ३. 'आश्चर्यवृत्त तो राजा' असें पाठांतर. ४. 'आर्यकाख्यही आजा' असें पाठांतर. ५. कुंतीची माता भोजा ही आर्यक नामक कद्रूपुत्राची ( नागाची ) कन्या, म्हणून आर्यक हा कुंतीचा मातामह. ६. थोरांचें. ७. नातें. ८. उत्तम. ९. सरोवर. १०. रत्नें, सोनें इत्यादि धनानें. ११. एक हजार हत्तींचें बळ. गज=हत्ती. १२. अमृतरसाच्या पात्रांत. १३. तोंड. १४. एकदां श्वास घेतल्याबरोबर. १५. रिकामीं. १६. ( पात्रामध्यें ) घातली आहे सोंड ज्यानें अशा हत्तीनें. १७. जगाचा प्राण जो वायु त्याचा. १८. पुण्य. १९. भीम पापी असता तर वासुकि आणि इतर सर्प यांनीं त्याला अमृतकुंडाला हात देखील लावूं दिला नसता—असा भाव. 'लावूं देतें न हात' असें पाठांतर. २०. उत्तम रसातें. २१. देवासारिखा.

इकडे धर्म पृथेला[1] जातां चि गृहीं पुसे, 'पुढें आला ।
भीम ? न येतां दिसला, केला बहु शोध, काय तो झाला ?' ॥ ३२
कुंती म्हणे, 'अहा ! हा ! दैवा ! हे रीति काय गा ! बरवी ?' ।
ती प्रियपुत्रगति[2] जसें तीस, पतिगति[3] हि तसें न, घाबरवी. ॥ ३३
कुंती विदुरासि म्हणे, 'भावोजी ! भीम भेटवा, धुंडा. ।
तद्रहिता हे संतति न हिता, जैसी विपुष्करा[4] शुंडा. ॥ ३४
दुर्योधन साहेना[5] यांशि[6], जसा शिशु कणांसि[7] नयनींच्या, ।
वाटे[8] वधिला तेणें; अन्याय चि आवडे, न नय[9], नीचा'. ॥ ३५
विदुर म्हणे 'यावरि हें येऊं देऊं नको चि तोंडास. ।
रक्षीं शेषें[10], न घे द्विषदहि[11] मौना[12]स्तीकभक्ति तों डांस[13]. ३६
'त्वत्सुत दीर्घायु' असें जें वाक्य महर्षिचें[14], न तें विसरें. ।
होय सदाशीर्वचनें[15], अमृताच्याही, भलें न तेंवि, सरें[16]. ॥ ३७
येईल शीघ्र कीं तो साध्वाशीर्वादपात्र[17] शिवशील[18]. ।
निवशील सुतस्पर्शें, चिंतेला न गणरात्र[19] शिवशील.' ॥ ३८
करुनि समाधान असें गेला विदुर स्वमंदिरा; मग तो[20] ।
आठ दिन निजोनि उठे; प्राणव्यसनीं हि पुण्यवान् जगतो. ॥ ३९

---

१. कुंतीला. पृथेला कुंतीभोजनामक राजानें तिच्या पित्यापासून दत्तक घेऊन 'कुंती' असें नांव ठेविलें. २. आवडत्या पुत्राची अवस्था. ३. पतीचें गमन (मरण). ४. अग्रभागविरहित, शेंडा तुटलेली. पुष्कर=हत्तीच्या सोंडेचें अग्र. ५. दुर्योधन भीमाला सहन करूं शकेना, भीमाचा उत्कर्ष दुर्योधनाला सहन होईना—असा भाव. ६. 'त्यासि' असें पाठांतर. ७. रज:कण, डोळ्यांत गेलेला केर. ८. वाटेंत, परत येत असतां रस्त्यांत. ९. नीति. १०. अवशिष्ट चार पुत्र. ११. शत्रु-रूप सर्प. १२. मौनरूप आस्तिकऋषीची भक्ती चालू असे तोंपर्यंत. **रूपका**लंकार 'मौनास्तीक भक्ति तों' असें पाठान्तर. मौनास्तीकभक्ति=मौनरूप आस्तीक नामक ऋषीच्या भक्तांच्या ठिकाणीं. आस्तीकाचें स्मरण करणाऱ्यास सर्प दंश करणार नाहींत, असा सर्पांनीं वर दिला होता, त्यास उद्देशून येथील वर्णन आहे (मागें आध्याय ७ गीति ६६-६७ पहा). १३. दंश, चावा. विदुर म्हणतो:—असें भलतें बोलूं नको. मौनधारण कर, म्हणजे दुर्योधन बाकीच्या मुलांचा नाश करणार नाहीं. १४. महामुनीचें (व्यासाचें.) १५. साधूंच्या आशीर्वादानें. १६. सरोवरानें. १७. साधूंच्या आशीर्वादास पात्र. १८. कल्याणकारक स्वभाव ज्याचा असा. १९. पुष्कळ रात्री, अर्थात् पुष्कळ दिवस. [ गण= ] बहु—**पंत**. २०. भीम.

आर्यकमतें अहींद्रें[1] सुखवाया कुंतिकुळपताकेला[2] ।
त्या स्थानीं च वृकोदर बहु सत्कारूनि पावता केला. ॥ ४०
भीमें माता भ्राते क्षिप्र निववविले, तसे न घनसारें[3]. ।
तैं[4]च्चित्तचातकासुख नाशी रसपानवृत्तघन[5] सारें. ॥ ४१
धर्म म्हणे, 'दुर्योधनचित्तास प्रेम नित्य नव दावा. ।
भीष्मा–विदुरा–वांचुनि हा अर्थ[6] तुम्हीं परासि न वदावा. ॥ ४२
विश्वास खळीं न बरा, सावध व्हा, भय घडे अनवधानें[7] ।
हीं[8] राज्यलुब्ध लेश हि लाजेल न गुरुसुहृज्जनवधानें[9].' ॥ ४३
पांडव सावध[10] झाले, त्याले दुर्भेद्य विदुरमतकवचा[11]; ।
साहति सुदुःसहा ही दुर्योधनकर्णशकुनि-हतक-वचा[12]. ॥ ४४

## अध्याय बेविसावा.

गौतम[13]पुत्र शरद्वान्[14] चापश्रुतिनिष्ठ[15] जो स्वभावानें, ।
पूर्वीं वज्री[16] भ्यालों[17] त्याच्या दारुणतपःप्रभावानें. ॥ १

१. नागराज वासुकीनें. २. कुंतिभोजराजाची कुलपताकाच अशी जी कुंती तिला. ३. कापुरानें. कर्पूरें–**पंत.** ४. तत्+चित्त+चातक+असुख=त्यांचें ( माता व बंधु यांचें ) चित्त हाच चातक त्याचें दुःख. **रूपका**लंकार. ५. अमृतप्राशनादिक जी घडलेली **गोष्ट** तोच मेघ. ६. हा सर्व प्रकार. ७. गैरसावधपणानें. ८. दुर्योधन. ९. गुरु+सुहृत्+जन+वध=गुरुजन व आप्तेष्ट मंडळीचा वध करून. १०. धर्मराज सर्व भावांसह सावधपणानें वागूं लागला. परंतु पुढें धर्माच्या आवडत्या सारथ्याला दुर्योधनानें युक्तीनें ठार मारिलें. तदनंतर नवीन तीक्ष्ण विष त्यानें भीमसेनाच्या अन्नामध्यें घालविलें. पांडवाचें हित करण्याच्या इच्छेनें युयुत्सूनें ती गोष्ट त्यांना सांगितली तथापि भीमानें तें खाऊन, कांहीं विकार न होतां, पचवून टाकिलें. अशा रीतीनें दुर्योधन, कर्ण व शकुनि हे अनेक प्रकारच्या उपायांनीं पांडवानां ठार मारण्याची इच्छा करित असत–हा भाग पंतांनीं गाळला नसता तर बरें झालें असतें. ( मूळ अध्याय १२९ श्लोक ३५-४० पहा ). ११. विदुरमत हेंच कवच ( चिलखत ) त्याला. १२. दुर्योधनादिक कपाळकरंट्या खलांच्या वचनाला. हतक=कपाळकरंटा. १३. शरद्वान् हा गौतमाचा प्रपौत्र होय, पुत्र नव्हे. १४. कृपाचार्यांचा पिता. १५. धनुर्वेदामध्यें निपुण. १६. वज्र धारण करणारा ( इंद्र ). १७. मूळांत 'भृशं सन्तापयामास देवराजं स गौतमः' असें आहे ( अध्याय १३०।५ ). इंद्राचा संशयी व परोत्कर्ष सहन न होणारा स्वभाव प्रसिद्धच आहे. ह्या ब्राह्मणाची धनुर्विद्येंतील पारंगतता व विपुल तपश्चर्या पाहून इंद्राला भीति वाटली, कीं हा माझें पद हरण करितो किं काय!

पाठविली सुरकन्या जानपदी [१]स्वस्तडागनक्रानें, ।
त्याच्या उग्रतपाला विघ्न करावा म्हणूनि शक्रानें. ॥ २
तो [३]बाणधनुष्पाणी मुनि [४]जानपदीकटाक्षशरपातें, ।
[५]वातें तरुसा, कांपे; धैर्य मनें, चाप सोडिलें हातें. ॥ ३
प्रथम सशर चाप गळे, त्यावरि [६]तद्वीर्य ही गळे [७]क्षिप्र. ।
होतां विघ्न, स्वाश्रम सोडुनियां जाय तो महाविप्र. ॥ ४
मुनिवीर्य [८]शरस्तंबीं पडतां होय द्विधा [९]सुता–सुत तें. ।
गर्भाशयीं न वसतां दिव्याकृतिलाभ संस्कृतें [१०]सुततें. ॥ ५
[११]मृगयागत [११]शांतनुच्या तें [१२]मिथुन [१३]चमूचरें अरण्यांत, ।
अवलोकिलें मुनीच्या स्थानांत, ख्यात जें [१४]शरण्यांत. ॥ ६
दर्भासन[१५]कृष्णाजिनवल्कलशरचापसाहचर्यानें, ।
तें [१६]मुन्यपत्ययुग हें निश्चित केलें सुबुद्धिवर्यानें. ॥ ७
भेटविलें शांतनुला, तेणें [१७]मुनिवीर्यजात जाणोनी, ।
परिपाळिलें 'कृप' 'कृपी' नामें ठेवुनि गृहासि आणोनी. ॥ ८
येउनि निजाश्रमातें तो हि शरद्वान् महामुनि ज्ञानी, ।
[१८]जाणे शांतनुसदनीं स्वापत्यांच्या [१९]स्थितिप्रति ध्यानीं. ॥ ९
भेटोनि [२०]कृपसुताला तो [२१]स्वधनुर्वेद–दाय दे तात, ।

१. स्वर्गरूप तळ्यांतील नक्र ( मगर ) जो शक्र त्यानें. २. हा शब्द संस्कृतांत पुल्लिंगी आहे. ३. बाण व धनु हातांत आहे ज्याच्या तो. ४. जानपदीच्या नेत्र कटाक्षरूप बाणाच्या प्रहारानें. ५. मनें ( मनानें ) धैर्य [ सोडिलें ] व हातें ( हातानें ) चाप सोडिलें–असा अन्वय. ६. त्याचें रेत, शुक्र. ७. लगेच, सत्वर. ८. शरनामक गवताच्या समूहावर. ९. मुलगी आणि मुलगा. १०. सुतत म्हणजे अतिविस्तृत अशा पुण्य कर्मानें ( घडला ). ११. शिकारीकरितां आलेला जो शांतनुराजा त्याच्या. १२. जोडपें, जोडी ( मुलगा व मुलगी ). मूळांत 'मिथुन' हाच शब्द आहे. ( अध्याय १३०।१६ ). १३. सैन्यांतील मनुष्यानें, सेनाचरानें. १४. शरणागताचें संरक्षण करण्याविषयीं जें स्थान प्रसिद्ध त्यांत. 'ख्यात जो शरण्यांत' असें पाठांतर. १५. दर्भासन+कृष्णाजिन ( काळविटाचें कातडें )+वल्कल+शर ( बाण )+चाप ( धनुष्य ) यांच्या साहचर्यामुळें म्हणजे ह्या वस्तु त्या मुलांजवळ पडलेल्या असल्यामुळें. १६. ऋषीचें अपत्यद्वय. १७. ऋषीच्या वीर्यापासून झालेलें. १८. ह्या गीत्यर्धाच्या पूर्वी पंतांनीं एक गीत्यर्ध लिहिलें होतें व तें त्यांनीं हरताळीनें खोडलें आहे. तें असें:–कळवी गोत्र नृपाला, धरि पुत्राचाहि लोभ न ज्ञानी. । ( रा० पराडकर यांची प्रत ). १९. स्थिति=राहणें, वास, पोषण. २०. आपल्या कृप नामक पुत्राला. २१. धनुर्वेदरूपी वडिलार्जित धन. आधान, संधान, विमोक्ष आणि संहार असा चतुर्विध धनुर्वेद.

पुत्रांसि जोडिलें[1] धन, जेंवि सुखें बाप—माय देतात. ॥ १०
गुरुच्या अनुग्रहें कृप अभ्यासें फार न[2] पडतां खेदीं, ।
परमाचार्यत्वातें[3] पावे तो स्वच्छधी[4] धनुर्वेदीं. ॥ ११
भीष्में कौरव पांडव शिष्यत्वें त्यासि अर्पिले विधिनें. ।
ते बाळ धनुर्वेदीं सर्व पढविले कृपें कृपानिधिनें. ॥ १२

---

## अध्याय तेविसावा.

जाय भरद्वाज मुनी गंगाद्वारीं करावया स्नान. ।
होय घृताचीदर्शन[5] तेथें, तों तेंचि लागलें ध्यान. ॥ १
सौंदर्यगुणोत्कर्षें[6] फार चि शोभे, जसी रति[7] घृताची[8]. ।
तद्रूपें हृदयाची होय जसी, पावकें[9] गति घृतांची[10]. ॥ २
पावे कामविकारें तत्काळ अमोघ रेत जें पतन, ।
द्रोणकलशमखपात्रीं[11] मुनिनें तें तेज ठेविलें जतन. ॥ ३
स्वात्युदकें[12] शुक्तिपुटीं[13] होताहे जन्म जेंवि मोत्याचें, ।
मुनिवीर्यें मखपात्रीं मुनिजन्म, 'द्रोण' नाम हो त्याचें. ॥ ४
पढला सांग[14] श्रुति[15] तो निजपितृशिष्याग्निवेशमुनिजवळी[16]. ।
अग्न्यस्त्रासि शिके, जें रिपुसि, कळिसि[17] रामनामसें, कवळी[18]. ॥ ५
मित्र भरद्वाजाचें पृषत[19] नृप[20] जसें, तदात्मज द्रुपद ।
द्रोणाचें, अध्ययनीं गुरुचें आराधितां सुरद्रुपद[21]. ॥ ६
जाय भरद्वाज मुनी स्वर्गातें, पृषतही; मग प्रौज्य[22] ।
उत्तरपांचाळांचें द्रुपद करी धर्मनीतिनें[23] राज्य. ॥ ७

---

१. संपादन केलेलें. २. फार श्रम न करितां. खेद=श्रम, कष्ट. ३. श्रेष्ठ. अशा आचार्यनामक पदवीतें. ४. ज्याची बुद्धि निर्मल आहे असा. ५. देवांगनाविशेष. ६. सौंदर्यगुणाच्या अतिशयानें. ७. कामपत्नी. ८. अप्सराविशेष. ९. अग्नीनें. १०. तुपाची. ११. द्रोणकलशसंज्ञक यज्ञपात्रांत. १२. स्वातिनक्षत्राच्या उदकानें. १३. शिंपीच्या पोटीं. १४. शिक्षा, कल्प, व्याकरण, छंदस्, ज्योतिष आणि निरुक्त या सहा वेदांगांसह. १५. वेद. १६. आपल्या बापाचा शिष्य जो अग्निवेश नामा मुनि त्याजपाशीं. १७. कळि=कली, कलियुग, कलिपुरुष. १८. ग्रासी, गिळी. १९. द्रुपदाच्या पित्याचें नांव. २०. 'पृषत नृप, तसें' असें पाठांतर. २१. कल्पवृक्षरूप चरण. २२. मोठें. २३. 'धर्मरीतिनें' असें पाठांतर.

तप करितां पितरांची आज्ञा झाली म्हणोनि तो द्रोण ।
विधिनें वरी कृपीतें; न करील गुरूक्त[1] जाणता कोण ? ॥ ८
प्रसवे कृपी सुतातें. शब्द करी उपजतां तयापरि तो ।
उच्चैःश्रवा सुरांचा हय हेषेतें[2] जयापरी करितो. ॥ ९
'अश्वत्थामा' ऐसें नाम तया ठेविलें; असें झालें. ।
'त्यावरि, त्या द्रोणाच्या कर्णाप्रति परशुरामयश[3] आलें, ॥ १०
कीं, 'तो यथेष्ट देतो सद्विप्रांकारणें[4] स्वधन, कांहीं ।
दैन्य[5] उरों देत नसे संप्रति, बहुमूल्य रत्नकनकांहीं. ॥ ११
दिव्यास्त्रांचा दाता मूर्तधनुर्वेद[6] नीतिशास्त्रज्ञ, ।
जेणें अगणित केले स्वभुजबळें सांग रणमहायज्ञ.[7]' ॥ १२
ऐसें परिसुनि जाय द्रोण महेंद्राचळीं[8] तया भेटे, ।
ज्याचे विशिख[9] क्षत्रीं[10], व्याघ्रीचे अविकुळीं[11] जसे पेटे[12]. ॥ १३
सांगोनि नाम गोत्र, प्रांजळि[13], वंदूनि तत्पदें, राहे[14]. ।
वाग्युद्धदानशूर[15] प्रभु राम द्रोणमुनिकडे पाहे. ॥ १४
सर्वस्वें प्रिय पोष्य ब्राह्मण ज्या अद्भुतप्रभा वपुसे[16] ।
'वद इच्छा काय' असें द्रोणाला तो महाप्रभाव[17] पुसे. ॥ १५
तो भारद्वाज[18] म्हणे, 'इच्छितसें मी अनंत धन, दात्या ! ।
व्हावी तुझ्या प्रसादें तुज-मज[19] पाहोनि[19] लाज धनदा[20] त्या.' ॥ १६

१. गुरूनें सांगितलेलें. २. हेषा=घोड्याचें खिंकाळणें. ३. जमदग्निपुत्र परशुरामाची कीर्ति. ४. उत्तम (सच्छील) ब्राह्मणांना. ५. विपत्ति. ६. मूर्तिमंत धनुर्वेदच असा. ७. युद्धरूप मोठे याग. ८. महेन्द्र नामक पर्वतावर. उत्तर सरकार आणि ओरिसा प्रांत यांपासून गोंडवणापर्यंत जी पर्वतांची ओळ (सांखळी) आहे, तीच हा पर्वत होय, असें म्हणतात. ९. बाण. १०. क्षत्रियांचे ठिकाणीं. ११. मेंढ्यांच्या कळपामध्यें. १२. बच्चे. मेंढ्यांच्या कळपाचा नाश जसे वाघाचे बच्चे करूं शकतात, त्याप्रमाणें परशुरामाचे बाण क्षत्रियांचा नाश करितात–असा भाव. १३. सन्मानपूर्वक हात जोडून. १४. अभिवादन करून उभा राहिला–असा भाव. १५. वाणी, युद्ध, आणि दान यांच्याविषयीं शूर. (बोलण्यांत, युद्धांत, आणि दान करण्यांत शूर–असा भाव). १६. स्वतःच्या शरीरासारखे. १७. ज्याचा प्रभाव मोठा आहे असा, प्रभावशाली. १८ भरद्वाजपुत्र द्रोण. १९. तुझ्यासारखा दाता व माझ्यासारखा याचक म्हणून. २०. कुबेराला.

राम म्हणे, 'विप्रजना दिधलें सर्वस्व[1], कश्यपा[2] अवनी[3]. ।
असें, शरीर आहे, अन्य किमपि राहिलें नसे भवनीं[4]. ॥ १७
यांत तुला सत्पात्रा ! द्यावें म्यां काय ? बोल आशु[5] कसा[6]. ।
'द्या दिव्यास्त्रें चि' असें द्रोण[7]-द्विज मंजु[8] बोलिला शुकसा[9]. ॥ १८
अस्त्रें समग्र दिधलीं; सरहस्यव्रत[10] दिल्हा धनुर्वेद. ।
केला स्वरूप[11] चि परि च्छात्रें[12] भक्त्यर्थ उरविला भेद. ॥ १९

---

## अध्याय चोविसावा.

मग भेटोनि द्रुपदा, द्रोण म्हणे, 'मी तुझा सखा पहिला.' ।
दे क्षोभ शब्द[13] तो त्या, दंड[14] जसा स्पर्शला[15] खळा अहिला. ॥ १
पार्षत[16] म्हणे 'दरिद्रा ! तूं राजाचा सखा कसा ? मुग्धा[17] ! ।
मित्रें[18] सधन सधनाचें साजे, गोदुग्ध मित्रें[19] गोदुग्धां[20]. ॥ २

---

१. सकल धन. २. कश्यपमुनीला. ३. पृथ्वी. कार्तवीर्याच्या मुलांनीं जमदग्नीस मारिल्यामुळें परशुरामानें क्षत्रियांचा संहार करण्याची प्रतिज्ञा केली व त्यानें एकवीस वेळां पृथ्वी निःक्षत्रिय करून शेवटीं ती कश्यपास दान दिली—अशी कथा आहे. ४. गृहांत, घरीं. 'राहिलें नसें भवनीं' असें पाठांतर. ५. शीघ्र, लवकर. ६. 'कसा' हें अव्यय बोलणाऱ्याच्या मनांतील उत्कट इच्छा दर्शवितें. ७. द्रोण नांवाचा ब्राह्मण; ( पक्षीं ) द्रोणरूपी पक्षी. येथें 'द्विज' शब्दावर श्लेष आहे. ८. मंजुळ. ९. पोपटाप्रमाणें; ( पक्षीं ) व्यासपुत्र शुकाचार्याप्रमाणें. १०. रहस्य ( इतरांस न समजूं देण्याचे मंत्र ) आणि व्रत ( पाळण्याचे नियम ) यांसह. ( धनुर्वेदाचें रहस्य सांगून तें राखण्याचे नियम सांगितले, असा भाव ). ११. स्वसमान, आत्मतुल्य. ह्या गीत्यर्धास मूळांत आधार नाहीं. १२. शिष्यानें. येथें मूळांतील १३० वा अध्याय संपतो. १३. 'सखा' हा शब्द. १४. काठी. १५. ज्यानें स्पर्श केला आहे असा ( दंड ). 'स्पर्शतां' असें पाठांतर. १६. पृषतपुत्र द्रुपद. १७. भोळसटा !, मूर्खा ! १८. 'मित्र' हा शब्द मराठींत नपुंसकलिंगी नसतांही पंतांनीं तो संस्कृताप्रमाणें मराठींत नपुंसकलिंगी योजिला आहे. असे प्रयोग पंतांच्या काव्यांत ठिकठिकाणीं आढळतात. पंतांनीं हा शब्द क्वचित् पुल्लिंगीही योजिला आहे:—तो मित्र होय बापा ! पापाचारांत जो बुडों नेदी. । ( प्रश्नोत्तरमाला, गीति ४१ ). १९. पंतांनीं मित्राचें लक्षण एके ठिकाणीं दिलें आहे, तें:—स्नेह करी, हृष्ट करीं, तर्पी, रक्षी, सदैव संमानी, । पावे सुखें सुखहि तें 'मित्र' असें म्हणति सर्वहि ज्ञानी. ॥ ( कर्णपर्व, अध्याय २९।१८ ) २०. गाईच्या दुधाला. हें गीत्यर्ध सुभाषितरूप आहे.

न करुनि विचार वदतां पडतें शोकांत मानस ख्यातें[1], ।
विद्वत्त्वें, सधनत्वें, तुल्यें लोकांत मान सख्यातें. ॥ ३
झालें[2] जीर्ण विरस[3] जें[4], कोण तया मंदनायका[5] ! पुसतो ? ।
गतरंगसुगंध[6], जुना, पावे सन्मान काय कापुस तो[7] ? ॥ ४
श्रोत्रियसख[8] अश्रोत्रिय, शूरसख क्लीबें[9], सुकविसख[10] अकवि, ।
आम्हां असें नसे श्रुत[11]; हंससख न मानसस्थ[12] ही बक-वि[13] ?' ॥ ५
बहु बडबडे असें, दे मद्य तसें, त्यासि भाग्य मत्तत्वें[14]. ।
मुनि मनिं म्हणे, 'न करितां परिभव[15], न कळेल यासि मत्तत्वें[16].' ॥ ६
मुनि त्या अपमानातें घोंटी[17], जेंवि त्रिलोचन[18] गरांतें[19]. ।
किमपि[20] विरुद्ध न वदतां, गेला तो हस्तिनाह्वनगरातें[21]. ॥ ७
राहे गुप्त कृपगृहीं द्रोण; तदात्मज[22] सुशीळराशि[23] कवी, ।
पार्थांसि[24] कृपानंतर[25] अस्त्रें, कोणासि न कळतां, शिकवी[26]. ॥ ८
ते कुरुकुमार करितां नगरीबाहेर जाउनि क्रीडा, ।
निरुदकेंकूपपतितनिजवीटोद्धृत्यपटु[27] पावले व्रीडा[28]. ॥ ९
ते, वृद्ध, कृश, श्याम द्रोण ब्राह्मण अदूर[29] पाहोनी ।
निजवीटोद्धारार्थ प्रार्थिति, भंवते उभे चि राहोनी. ॥ १०

---

१. ख्यातें ( प्रसिद्ध अशा ) [ व ] तुल्यें (समान अशा) विद्वत्त्वें [व] सधनत्वें लोकांत सख्यातें ( मैत्रीतें ) मान मिळतो–असा अन्वय. २. जुनें. ३. नीरस, प्रेमशून्य. ( रस=प्रेम ). ४. सख्य. ५. मूर्खशिरोमणे ! ६. ज्याचा रंग आणि सुगंध गेला आहे तो ( कापूस ). ७. हें गीत्यर्ध सुभाषितरूप आहे. ८. वेदवेत्त्या ब्राह्मणाचा मित्र. ९. नपुंसक. १०. ज्ञात्याचा मित्र. ११. ऐकिलेलें, अर्थात् माहीत, ठाऊक. १२. मानससरोवरीं रहाणारा. १३. बगळा पक्षी. (वि=पक्षी). बगळा मानससरोवराजवळ राहात असला, तरी तो हंसाचा मित्र होत नाहीं–असा भाव. ही गीति सुभाषितरूप आहे. १४. उन्मत्तपणा. १५. पराभव, पाडाव. १६. माझें तत्व ( तेज ). १७. गिळी, सहन करी. १८. त्रिनेत्र शंकर. १९. विषातें. २०. अल्प देखील. २१. हस्तिनापुरातें. ( हस्तीशीं समान आहे आव्ह ( नाम ) ज्याचें अशा नगरातें ). २२. त्याचा पुत्र अश्वत्थामा. २३. सत्स्वभावाचा जणूं निधीच असा. २४. पृथेचे ( कुंतीचे ) पुत्र धर्मराजादि त्यांस. 'पार्थासि' असें पाठांतर. पार्थ=अर्जुन. २५. कृपाचार्यांनीं पांडवांस शिकविल्यानंतर. २६. ह्याचा कर्ता–अश्वत्थामा. ( मूळ अध्याय १३१।१५ ). २७. निः+उदक+कूप+पतित+निज+वीटा+उद्धृति+अपटु=जलरहित विहिरीमध्यें पडलेली आपली विटी वर काढण्याविषयीं असमर्थ असे. २८. लज्जा. २९. समीप, जवळच.

द्रोण म्हणे त्यांसि, 'तुम्ही भरतकुळज कीं ? कृतास्त्र[१] कीं ? तरि ती ।
वीटा न निघे, धिग् ! धिग् ! गुण ते चि स्वेष्टसिद्धि[२] जे करिती. ॥ ११
वीटा तसी स्वमुद्रा[३] टाकुनि मी काढितों इषीकांहीं[४]. ।
साहित्य परि करावें प्रेमें मद्भोजनाविषीं[५] कांहीं.' ॥ १२
धर्म म्हणे, 'असद्गुरु कृप, तदनुमतें तुम्हांसि ही भिक्षा ।
शाश्वत मिळेल, दावा वीटा काढूनि अद्भुता शिक्षा[६].' ॥ १३
हास्य करूनि द्रोणें त्या कुरु[७]-कुळजांसि द्यावया तुष्टी ।
कूपांत ईषीकांची[८] अभिमंत्रण[९] करुनि सोडिली मुष्टी. ॥ १४
एकीचें[१०] मुख शिरलें वीटेमध्यें, तिला दुजी जडली, ।
तिसरी तीस, चतुर्थी तिजला, ऐसी परंपरा घडली. ॥ १५
बाहेरि काढिली ती वीटा तत्काळ, जेंवि पात्र गळें[११]. ।
स्वरभंग[१२] त्यांत[१३] वरिला त्या पार्थाच्या मुहूर्तमात्र गळें[१४]. ॥ १६
अभिमंत्रित शर सोडुनि मुद्राछिद्रांतरीं[१५] तया शिरवी, ।
वरि अंगुलीयकातें[१६] ओढी, किरणें जसें पयांशि[१७] रवी. ॥ १७
त्या मंत्रचमत्कारें प्रमुदित होउनि, कुमार ते प्रणती[१८] ।
करुनि प्रेमें, 'सांगा निज नाम, ग्राम, कुळ' असें म्हणती. ॥ १८
द्रोण म्हणे, 'सांगा हें भीष्माला ज्ञान[१९]-भग-नदीपाला. ।
जाणेल तो चि लोकीं; विदित[२०] नसे काय गगनदीपाला[२१] ?' ॥ १९

---

१. अस्त्रज्ञ, अस्त्रविद्या शिकलेले. २. आपल्या इष्टार्थाची सिद्धि. ३. ( वर नांव कोरलेली ) आपली आंगठी. ४. इषिका म्हणून एक प्रकारचें तृण आहे. यास कसाड, कसई, कास, असें म्हणतात. त्याच्या अभिमंत्रित काड्यांनीं. ५. माझ्या भोजनाविषयीं. ( विषीं=विषयीं ). ६. शिक्षण, अभ्यास. ७. 'शशिकुळजांसि' असें पाठांतर. ८. कासतृणाची. ९. मंत्रसंस्कारित करून. १०. एका इषीकेचें. ११. गळानें. ( गळ=विहिरींत पडलेली वस्तु काढावयाचें साधन ). १२. गहिंवर. १३. त्या मुलांत. १४. गळ्यानें, कंठानें. १५. आंगठीच्या छिद्रामध्यें. १६. मुद्रिकेतें. १७. उदकातें. सूर्य आपल्या किरणांनीं समुद्राचें उदक आकर्षून घेतो, ही सुप्रसिद्ध गोष्ट आहे. असेच उल्लेख पंतांच्या काव्यांत अन्यत्र आढळतातः—( १ ) शोषी बळां शरांनीं, जेंवि करांनीं नदी-जळां तरणी. । ( द्रोणपर्व-अध्याय ११।४३ ) ( २ ) कर्ण फिरे, तीं बाणीं विंधी, रवि जेंवि नीरदा किरणीं. । ( कर्णपर्व, अध्याय १३।१५ ). तसेंच कालिदासादि संस्कृत कवींच्या ग्रंथांतही मेघांच्या उत्पत्तीच्या कारणाचा उल्लेख आढळतो. ( रघुवंश, सर्ग १३ श्लोक ४ पहा ). १८. नमस्कार. १९. ज्ञानरूप ऐश्वर्याच्या सागराला. २०. ज्ञात. २१. आकाशांतील दीपच

बाळमुखें तें कळतां, भीष्म म्हणे परशुराम कीं द्रोण ।
आला असेल भाग्यें, लोकीं तिसरा असा [1]कृती कोणे ?' ॥ २०
[3]श्रीगुरुसम [4]गुरुबंधु प्रेमें भेटोनि निववला भीष्में. ।
जैसा मयूर मेघें जो तापविला [5]सुदुःसहें ग्रीष्में. ॥ २१
आणूनि राजसदनीं, पूजुनि होऊनि [6]सानुराग मनीं, ।
भीष्में तयासि पुसिलें कीं, 'सांगा हेतु [7]कोण आगमनीं ?' ॥ २२
द्रोण म्हणे, 'परिसावें त्वां, सांगावें तुला चि सभ्यास. ।
द्रुपदासि मज हि करवी चापीं गुरु [8]अग्निवेश अभ्यास. ॥ २३
गुरुबंधु सखे आम्ही होतों गुर्वाश्रमांत, [9]वीरमणे ! ।
तेव्हां मजला ऐसें पांचाळ द्रुपद गौरवूनि म्हणे:-॥ २४
'जेव्हां काय मज सख्या ! द्रोणा ! देईल राज्यपद तात, ।
तेव्हां [10]तद्भोक्ता तूं, आण तुझी, [11]कुळंज सत्य वदतात.' ॥ २५
गेला पढोनि, झाला [12]नृप तो, झालों गृहस्थ मी, राया ! ।
[13]फळली सुतरत्नफळें त्यावरि माझी कृपी [14]सती जाया. ॥ २६
[15]धनिकापत्यकृतपयःप्राशन पाहोनि, पुत्र [16]पय मागे. ।
[17]पिष्टोदकें ठकवितां, तें माझ्या शल्य काळिजा लागे. ॥ २७

---

असा जो सूर्य त्याला. सूर्याला माहीत नाहीं असें काय आहे? सूर्याला सर्व कांहीं माहीत असलेंच पाहिजे. कारण तो 'सर्वसाक्षी' (केकावलि-४) आहे. सूर्याप्रमाणें भीष्म देखील सर्वज्ञ आहे. तेव्हां मी कोण आहें, माझी योग्यता काय आहे, हें त्यालाच समजेल—असा भाव.

१. कर्तृत्ववान्, कुशल. २. रा० पराडकर यांच्या प्रतींत पुढील टीप आहे:—"मूळ पोथींत ह्या गीतीपुढें २१ वा क्रमांक घालून लिहिलेली पुढील गीति कवीनें खोडून टाकिली असून पुन्हां २१ वा च क्रमांक घालून पोथी पुढें चालू केली आहे. यावरून पोथी लिहीत असतांनाच कवीनें ही दुरुस्ती केल्याचें दिसून येतें:—आणविला राजगृहीं धाडुनियां सचिव आणि शिबिकेला । भीष्में न्हीत, द्विजपति रक्षूनि, कपोतपाल शिबि केला. ॥ २१ ॥" ३. भीष्माचा गुरु जो परशुराम, त्यासारखा. ४. द्रोण. ५. 'सुदुःसहग्रीष्में' असा पाठ रा० पराडकर यांच्या प्रतींत आहे. ६. प्रीतियुक्त. ७. कोणता. ८. ऋषिविशेष. ९. हे वीरश्रेष्ठा (भीष्मा!). १०. त्या राज्याचा भोक्ता (उपभोग घेणारा). ११. कुलीन पुरुष. १२. राज्याधिकारी. १३. फलवती झाली (प्रसवली). १४. साध्वी अशी भार्या. १५. धनिक+अपत्य+कृत+पयः+प्राशन=श्रीमंताच्या मुलांनें केलेलें दुग्धप्राशन (दुधाचें सेवन). 'कृतपयप्राशन' असा पाठ रा० पराडकरांच्या प्रतींत आहे. १६. दुग्ध. १७. पिष्टयुक्त उदकानें. (हें दुधासारखें पांढरें असतें).

पिष्टोदकपानमुदित[1] सुत धनिकसुतांत[2] चपळपद[3] नाचे. ।
मोहिति[4] मज क्षणक्षण त्यांच्या[5] उपहासशब्द[6] वदनाचे. ॥ २८

बहु धन असो नसो, परि एक असावें चि गृहिगृहीं[7] दुभतें. ।
घ्यावें सुतार्थ शुद्धापासुनि गोदान, सन्मतें[8] शुभ तें. ॥ २९

फिरलों बहु कीं, 'संतति पटु[9] तसि गोदांनदी[10] न ताराया.' ।
परि, विधि[11] मज दे, मिळवूं जातां गोदान, दीनता[12], राया! ॥ ३०

स्मरलें स्वसखद्रुपदस्नेहवचन[13] मज म्हणोनि मग, 'राहो ।
यत्नांतर,[14]' करुनि असा निश्चय, गेलों तदीय नगरा हो! ॥ ३१

भेटोनि तया वदलों, 'पूर्वींचा मी सखा' असें नातें. ।
जें तद्दत्तोत्तर[15] तुज सांगाया योग्यसें असेना तें. ॥ ३२

परि न कथितां भल्याला हृत्ताप[16] उणा न होय, शांतनवा[17]! ।
तें ऐकुनि साहेसा कोण दुजा[18] सज्जन प्रशांत नवा? ॥ ३३

धिक्कारिति अज्ञ जसे मागतया[19] भीक सर्वदा भणगा,[20] ।
मज धिक्कारी, हृदयीं झाले ते शब्द सर्व दाभण, गा! ॥ ३४

वदला[21] असे असें कीं, 'मी सख्यानर्ह[22] मंद,' राहो तें. ।
स्मरतां बहु दुःख मनीं, भीष्मा! खळजलधिमंदरा[23]! होतें. ॥ ३५

'देईन अन्न एका दिवसाचें मात्र, पाहिजे तरि घे,' ।
हें शेवटीं वदे, तों कोपागारीं मदीय चेत[24] रिघे[25]. ॥ ३६

---

१. पिष्टयुक्त अर्थात् पांढऱ्या पाण्याच्या प्राशनानें आनंदित. २. श्रीमंतांच्या बालकांमध्यें. ३. ज्याचे पद (पाय) चपळ आहेत असा. (आनंदानें नाचणारा बागडणारा). ४. मूढ करितात, वेडा करितात. ५. धनिकांच्या, किंवा–धनिकसुतांच्या. ६. कुचेष्टेचे शब्द. ७. गृहस्थाच्या घरीं. 'परि एक असावें गृहीगृहीं दुभतें'–असा अन्य पाठ. ८. साधूच्या मताप्रमाणें. ९. समर्थ. १०. पितरांचा उद्धार संततीनें होतो, गोदावरीचें (अर्थात् पवित्र तीर्थाचें) स्नान केल्यानें होत नाहीं–असा भाव. ११. दैव. १२. परि गोदान मिळवूं जातां विधि मज दीनता दे–असा अन्वय. १३. आपला मित्र जो द्रुपद, त्याचें स्नेहभावाचें भाषण. १४. इतर खटपट. १५. तत्+दत्त+उत्तर=त्यानें दिलेलें उत्तर. १६. हृदयांतील संताप. १७. हे भीष्मा! १८. 'असा' असें पाठान्तर. १९. मागणाऱ्या. २०. भिकाऱ्याला. २१. 'वदला असें असें कीं' असें पाठान्तर. २२. सख्य+अन्+अर्ह=स्नेह+नाहीं+पात्र=स्नेहास अपात्र. २३. दुष्टजनरूप सागराचें मंथन करणाऱ्या मंदरपर्वता! (भीष्मा!). २४. चित्त, अन्तःकरण. मदीय चेत क्रोधागारीं रिघे–असा अन्वय. मला अतिशय राग आला–असा भाव. २५. शिरे.

द्रुपदकृतघ्नत्वाची येतां चि प्रत्ययासि पुष्कलता[1], ।
त्यजिली सभा तयाची म्यां, मधुपें[2] जेंवि घर्मशुष्क[3] लता. ॥ ३७
आलों त्वन्नगरा मी जोडाया अर्थ, शिष्य, यश कांहीं. ।
कर्ण विटविले माझे द्रुपदाच्या विरस-वचन-मशकांहीं[4].' ॥ ३८
नायक वीरांचा श्रीद्रोण द्रुपदोक्त सर्व आयकवी. ।
'हाय' ! कवी[5] तो हि म्हणे, ज्याच्या मातेशि[6] शंभु-सायक[7] वी[8]. ॥ ३९
भीष्म 'म्हणे, राज्य तुझें, ज्यांच्या प्राप्त्यर्थ देव नवसावे, ।
ते कुरुभाग्यें आले; हे पाय क्षण हि दूर न वसावे. ॥ ४०
सिद्ध चि झालें सर्व हि कर्तव्य, असें तुम्ही मनीं आणा. ।
बाणासन[9] विज्यं[10] करा, कौरव दासीनुदाससे[11] जाणा.' ॥ ४१
प्रार्थुनि भीष्में द्रोण प्रासादीं[12] स्थापिला महेश्वरसा[13], ।
केला मान असा कीं, मानी तो सत्य, होय हे स्वें-रसा[14]. ॥ ४२
स्वपदीं कुमार सर्व हि शिष्यत्वें वाहतां चि शांतनवें, ।
शिकवी धनुःश्रुतिहृदय[15], व्हाया यश, करुनि शत्रु शांत, नवें. ॥ ४३
शिष्यांसि द्रोण म्हणे, 'येतां तुमच्या कृतास्त्रता[16] आंगा, ।
मच्चिंतित कार्य तुम्ही सिद्धिप्रति पाववाल कीं? सांगा'. ॥ ४४
त्यांत म्हणे अर्जुन, 'मी युष्मच्चिंतित-समस्त-कार्यकर[17]; ।
दुःसाध्य काय? असतां या माथां विजयदायकार्यकर[18].' ॥ ४५

---

१. अतिशयता. २. भ्रमरानें. ३. उन्हानें सुकलेली लता. ४. रसशून्य भाषणरूप डांसांनीं. ५. ज्याच्या मातेशि शंभुसायक वी, तो कवी हि 'हाय!' [ असें ] म्हणे–असा अन्वय. ह्या गीत्यर्धांत **पर्यायोक्ता**लंकार आहे. गंगेची उत्पत्ति विष्णूच्या पायांपासून झाली–अशी कथा आहे. ६. गंगेला. ७. विष्णु–**पंत**. त्रिपुरवधाच्या वेळीं देवांनीं रथसाहित्य व शस्त्रास्त्रें होऊन महादेवाचें साहाय्य केलें. त्यांत विष्णु बाण झाला होता–अशी कथा आहे. ८. प्रसवता झाला. ९. धनुष्य. १०. ज्या म्हणजे दोरी, तिनें रहित करा, म्हणजे धनुष्याची दोरी सोडा. अर्थात् विश्रांति घ्या. येथें मूळांतील १३१ वा अध्याय संपतो. ११. 'दासानुदाससें' असा रा० पराडकर यांच्या प्रतींत पाठ आहे. १२. राजवाड्यांत. १३. शिवासारखा. कल्पनासादृश्यः–मुक्त्यर्थ उमाशंकर जाणों देवालयांत बसवीला. । ( मागें अध्याय ५ गीति ९३ ). १४. आपली पृथ्वी. १५. धनुर्वेदाचें रहस्य. १६. अस्त्रविद्यानिपुणता. १७. तुम्हीं चिंतिलेलीं सर्व कार्यें करणारा. १८. विजय+दायक+आर्य+कर=यशोदायक आपला हात.

प्रेमें रडे, पडे गुरु पार्थगळां, त्या तशा उदार[1] पणें. ।
आर्य[2] प्रसन्न होती नुसत्या हि नतोक्तिच्या[3] उदारपणें[4]. ॥ ४६

---

## अध्याय पंचविसावा.

दिव्यास्त्र[5]मानुषास्त्रें पार्था शिष्यांसि पढवितां यश तें ।
ऐकुनि, राजसुतांचीं[6], त्या गुरुचे[7] वरिति[8] भव्य[9] पाय, शतें. ॥ १
गुरुच्या प्रसादपदवीप्रति शिक्षोत्कर्ष[10] साधुनी चढतां, ।
दुर्योधनसख कर्ण स्पर्धा पार्थासवें[11] करी पढतां[12]. ॥ २
श्रीगुरु एका समयीं सूक्ष्ममुख[13] कमंडलु स्वशिष्य-करीं ।
उदक भरुनि आणाया दे, पुत्रास हि म्हणे 'तसें चि करीं.' ॥ ३
जळ आणाया गुरुनें पुत्राच्या ही करीं दिला, पर[14] तो ।
विस्तीर्णमुख[15] कमंडलु होता, कीं शीघ्र एक हा[16] परतो. ॥ ४
उपदेशावें कांहीं पुत्रासि रहस्य, न कळतां, अन्या[17], ।
केली[18] युक्ति असी कीं, द्यावें भक्ता विचक्षणा धन्या. ॥ ५
ऐसें गंभीरतर[19], जें स्वगुरुमनोगत अगम्य तर्क-शतें[20], ।

---

१. उदार ( मोठ्या ) अशा पणानें ( प्रतिज्ञावचनानें ). [ पण=] प्रतिज्ञा-**पंत** २. थोर, श्रेष्ठ. ३. नम्र झालेल्यांच्या भाषणाच्या. 'हितोक्तिच्या' असें पाठान्तर. हितोक्ति=कल्याणप्रद वचन. हें गीत्यर्ध सुभाषितरूप आहे. ४. उदारत्वानें. ५. 'द्रोणानें देवलोकांतील आणि मनुष्यलोकांतील अनेक प्रकारचीं अस्त्रें पांडुपुत्रांना शिकविलीं,' असें मूळांत आहे. ( अध्याय १३२।९ ). पंतांनीं येथें 'दिव्यास्त्र' असा एकवचनी प्रयोग कां केला नकळे. ६. वृष्णि, अंधक इत्यादिकांचीं शतें (शेंकडों राजकुमार). ७. द्रोणाचे. ८. सेविती. ९. कल्याणरूप. १०. शिक्षणाचें आधिक्य. ११. 'पार्थासवें' असें पाठान्तर. १२. शिकत असतां. १३. बारीक आहे तोंड ज्याचें असा. ( सूक्ष्म मुख असल्यामुळें तो उदकपूर्ण होण्यास विलंब लागावा ). १४. परंतु ( मागें पृष्ठ १०२ टीप ५ पहा ). १५. मोठ्या तोंडाचा. अर्थात् जो पाण्यानें लवकर भरेल असा. १६. पुत्र. १७. पुत्राशिवाय दुसऱ्या कोणालाही. 'अन्यां' असा पाठ रा० पराडकर यांच्या प्रतींत आहे. १८. कीं ( पुत्रानें लौकर परत यावें अशी योजना करण्याचें कारण ) [ जें ] विचक्षणा धन्या भक्ता द्यावें ( द्यावयास योग्य असें ) कांहीं रहस्य, अन्या न कळतां, पुत्रासि उपदेशावें—असा अन्वय. १९. अत्यंत खोल ( गूढ ). २०. अनेक तर्कांच्या योगानें.

जाणे अर्जुन-मन कीं लव[1] हि न गुरुचरणविरहकर्कश[2] तें. ॥ ६
तत्काळ वारुणास्त्रें[3] भरुनि स्वकमंडलूंत तो पाणी, ।
गुरुला गुरुपुत्रासह जोडी तद्दास्यकृतिकृती[4] पाणी[5]. ॥ ७
या हि शहाणपणें तो अर्जुन गुरुच्या[6] मनांत शिरला, हो ! ।
ऐशा गुरुप्रियांचें पदरज एक हि कुळांत शिर लाहो. ॥ ८
कथिली रहस्यविद्या दोघांस हि, अधिक काय संतानें[7] ? ।
संतानें[8] पुरवावी संश्रितवांच्छा[9] तशी च संतानें[10]. ॥ ९
त्या अर्जुनीं कराया, उपदेश करूनि, सूपकारातें[11] ।
सांगे एका समयीं गुरु, पाचारूनि सूपकारातें[12]. ॥ १०
'जाईल जरि कदाचित्[13] दीपक भीमानुजाशनावसरीं[14], ।
तरि मागतां म्हणावें, 'अन्न न वाढीन या तमःप्रसरीं[15]. ॥ ११
ग्रास मुखीं न पडेल, श्रमसील, तमांत जेविसील कसा ?' ।
'कोणीं कथिलें' म्हणतां, वद कीं 'आहे चि लौकिकार्थ[16] असा.' ॥ १२
झालें तसें चि दैवें; दीप कदाचित्[17] प्रभंजनें[18] गेला. ।
अशन[19] करीत चि होता अर्जुन, तों तर्क तन्मनें केला. ॥ १३
'अत्यभ्यासें[20] जातो, तिळ हि न चळतो, मुखीं च पाणि[21] तमीं. ।
होईन शब्दवेधी[22] तिमिरांत हि, हें मनांत आणित मीं[23].' ॥ १४
तेव्हांपासुनियां तो स्वापसुखाची[24] करूनि कुत्सा[25], हें ।
ऐसें मनीं धरुनि, शरसंधान करी मनांत उत्साहें. ॥ १५

---

१. तिळमात्र, यत्किंचित्. २. गुरु+चरण+विरह+कर्कश=गुरूच्या चरणांच्या वियोगाविषयीं कठोर. अर्जुनाची गुरुचरणांच्या ठिकाणीं अत्यंत निष्ठा होती—असा भाव. ३. वरुण आहे देवता ज्याची असें जें अस्त्र, त्यानें. ४. त्या गुरूच्या दास्यरूप कर्मांत कुशल. ५. हात. ६. अर्जुन गुरुजींच्या मनांत भरला, त्यांचें मन अर्जुनावर प्रसन्न झालें. ७. पुत्रानें. ८. साधूनें. **दाम-यमक.** ९. आश्रितजनाची इच्छा. हें गीत्यर्ध सुभाषितरूप आहे. १०. कल्पद्रुमानें. ( मागें पृष्ठ १३० टीप ५ पहा ). ११. उत्तम उपकारातें. १२. पाककर्त्यातें, आचाऱ्याला. १३. कधीं काळीं, दैवयोगानें. १४. भीमाचा कनिष्ठ बंधु जो अर्जुन, त्याच्या भोजनसमयीं. १५. गाढ अंधकारांत. १६. लोकाचार. १७. एके काळीं. १८. वाऱ्यानें. १९. भोजन. २०. दृढ अभ्यासानें. २१. हात. २२. पदार्थ प्रत्यक्ष दिसत नसून, त्याचा शब्द मात्र ऐकूं येत असतां त्या शब्दाच्या अनुसंधानानेंच त्या अप्रत्यक्ष पदार्थाचा बाणादि साधनांनीं वेध करणारा. २३. ह्या गोष्टीचा मी विचार करीत आहें—असा भाव. २४. निद्रासुखाची. २५. निंदा, तिरस्कार.

बाणगुणझणत्कारश्रवण[1] करुनि, शयन सोडुनि, द्रोण ।
चित्तीं म्हणे, 'अहो ! शरसंधान तमांत करितसे कोण ?' ॥ १६
पाहे तों, तो अर्जुन आहे एकाग्र बाणसंधानीं; ।
आलिंगिला भुजांनीं, प्रोष्यागत[2] पुत्र जेंवि अंधांनीं. ॥ १७
आचार्य म्हणे, 'वत्सा[3] ! स्वयश यमाचा हि नायको दंड, ।
लोकीं असें करीन त्वद्धनुला[4], अन्य काय कोदंडें[5] ? ॥ १८
तुजसम दुजा धनुर्धर लोकीं कोठें हि आढळेना चि, ।
करिन असें मी, मद्वरशब्द[6] ध्रुव[7] होय, हा ढळेना चि.' ॥ १९
गुरुच्या[8], सद्वर देतां, आवरिति न हात पादुका, नातें ।
तैसें चि तें, समर्पी शिष्यासि महातपा दुकानातें[9]. ॥ २०
झाला तो गुरुसम चि, प्रथम गुणें जरि हि होय बिंदु[10], पण ।
दुग्धाब्धिपरिष्वंगीं[11] त्याचें राहेल तोयबिंदुपण[12] ? ॥ २१
कोणीएक निषाद[13] क्षितिपति होता सुवर्णधनु नामें. ।
तत्पुत्र एकलव्य द्रोणाप्रति ये धनुर्निगमकामें[14]. ॥ २२
सर्वत्र[15] समें सदयें गुरुनें त्या मात्र एकलव्याला ।

---

१. बाण व धनुष्याची दोरी यांच्या शब्दाचें श्रवण. २. प्रवास करून आलेला. ३. वत्सा! त्वद्धनुला लोकीं असें करीन [ कीं ] यमाचा हि दंड स्वयश नायको, [ मग ] अन्य कोदंड काय ?–असा अन्वय. ह्या जगांत तुझें धनुष्य असें प्रभावशाली करीन, कीं त्याच्यापुढें यमाचा दंड देखील तेजोहीन होईल मग इतर धनुष्यांची काय कथा ? अर्थात् तुझ्या धनुष्यापुढें इतर धनुष्यांचें कांहींच महत्त्व राहाणार नाहीं–असा भाव. ४. तुझ्या धनुष्याला. ५. धनुष्य. ६. माझें वरदानसंबंधी वचन. 'तुझ्यासारखा दुसरा धनुर्धर ह्या लोकीं होणार नाहीं, असें करण्याचा मी प्रयत्न करीन' ( मूळ अध्याय १३२।२८ ) हें माझें वरदानासंबंधीं वचन. ७. स्थिर, न बदलणारा. ८. गुरुच्या पादुका सद्वर देतां हात न आवरिति [ कारण ] तें ( गुरु-शिष्यांचें ) नातें तैसें चि [ असतें ]. महातपा ( मोठा तपस्वी, गुरु ) शिष्यासि दुकानातें समर्पी–असा अन्वय. गुरु आपलें शस्त्रास्त्र–विद्यांचें भांडार शिष्यांकडून लुटवितात–असा भाव. ९. सर्व विद्यांचें भांडार. १०. [ पाण्याचा ] थेंब. ११. दुग्धसमुद्राच्या आलिंगनानें. १२. दुग्धसागरानें तोयबिंदूला आलिंगिलें असतां त्या बिंदूचें भिन्नत्व राहील काय ? अर्थात् त्या तोयकणाचें भिन्नत्व राहाणार नाहीं, असा भाव. काकु–**पंत**. ह्या गीतींत उत्तरगर्भित प्रश्न आहे. १३. कोळी, भिल्ल. १४. धनुः+निगम+कामें=धनुर्वेद शिकण्याच्या इच्छेनें. १५. ब्रह्मदेवानें एकट्या सर्पालाच काय तें श्रुतिपात्र ( कान असण्यास योग्य ) केलें नाहीं ( सर्पाला कान दिले नाहींत ); त्याचप्रमाणें सर्वत्र

केलें नाहीं, जैसें विधिनें श्रुति[1]पात्र एकल[2] व्याला. ॥ २३
गुरुनें आश्रय न दिला, परि तो नैषादि[3] नें विटला[4] चित्तीं. ।
जों जों दुर्लभ तों तों, सस्पृह[5] वित्तेच्छु होतसे वित्तीं. ॥ २४
जाउनि वनांत, मृन्मय गुरु[6] करुनि, धरूनि भावसारा[7] धी, ।
ताराधीश[8]चकोरन्यायें[9] तो साधु त्यासि आराधी. ॥ २५
**पुरवी इष्ट सकळ ही, न गुरुध्यानप्रभाव[10] नाचारी[11]. ।**
**इच्छाफळें, न तैसी कल्पलता, जेंवि भावना[12] चारी[13]. ॥ २६**
जें तो मृन्मय[14] गुरु दे, सत्य हि गुरु दे न अर्जुना फळ तें. ।
सद्भाव[15] चि सद्गुरु पटु[16] धन्य कराया जना, असें कळतें. ॥ २७
होउनि सुविद्य कुरुकुळनंदन गेले करावया मृगया. ।
गुर्वाज्ञा कीं, 'सत्वर माघारें बहु न मारितां मृग, या.' ॥ २८
मृगया करितां शिरला शशमृगहननार्थ[17] काननीं कुतरा. ।
नैषादिप्रति पाहुनि[18], भुंके जाणों म्हणे 'धनू उतरा'. ॥ २९
श्वा[19] बहु भुंके पसरुनि तुंडा[20] मांसास्थिवल्लभा[21], त्यांत ।
तों[22] सप्त एकलव्य स्वशर भरी, जेंवि भल्ले[23] भात्यांत. ॥ ३०

---

सम व सदय अशा त्या गुरु द्रोणाचार्यांनीं एकव्या एकलव्यालाच मात्र श्रुतिला (वेदाला, धनुर्वेदाला) पात्र केलें नाहीं (धनुर्वेद शिकविला नाहीं)–असा अन्वयार्थ.

१. येथें 'श्रुति' शब्दावर श्लेष आहे. श्रुति=(१) कान; (२) वेद. श्रुतिपात्र=वेद शिकण्यास पात्र; (पक्षीं) कान असण्यास योग्य. सर्प कानानें ऐकत नाहीं, डोळ्यांनीं ऐकतो, अशी समजूत आहे, म्हणून त्यास 'चक्षुःश्रवा' असें संस्कृतांत नांव आहे. २. एकव्या (सर्पाला). ३. निषादपुत्र (एकलव्य). ४. कंटाळला नाहीं. ५. इच्छेनें युक्त असा मनुष्य, लोभी. हें गीत्यर्ध सुभाषितरूप आहे. ६. गुरु द्रोणाचार्यांची मातीची मूर्ति करून. ७. भाव (भक्ति) हेंच सार (बल) जिचें अशी. ८. चंद्र. ९. चंद्रचकोरन्यायानें. चकोर पक्षी चंद्रकिरणसेवनानें उपजीवन करितो, असा कविसंकेत आहे. १०. गुरुध्यानाच्या योगानें उत्पन्न होणारी शक्ति. 'पुरवी' ह्या क्रियापदाचा कर्ता–गुरुध्यानप्रभाव. ११. दीन, असमर्थ. १२. उत्तम भक्ति. १३. चारिलें, खाऊं घातिलें, देलें. १४. मृत्तिकेचा. १५. त्याचा भक्तिभाव. 'तद्भावचि'–असें पाठांतर. १६. कुशल. १७. ससे व हरिण यांच्या नाशाकरितां. १८. कृष्णमलदिग्धांग आणि कृष्णाजिनजटाधर असें भयंकर रूप पाहून. (मूळ अध्याय १३२।४०) १९. कुत्रा. २०. मुखा. २१. मांस व हाडें हीं ज्याला प्रिय अशा. (तुंडाचें विशेषण). २२. 'तो सप्त एकलव्य' असें पाठांतर. २३. बाणविशेष.

पाहुनि पांडव म्हणती, 'ज्याचे श्वमुखांत सप्त शर भारी ।
आहे [1]कृती असा ही, तरि मग कां हो ! नसेल [2]शरभारी ? ॥ ३१
[3]क्षत तिळ हि न होतां शर भरिले [4]श्वमुखांत जेंवि भात्यांत; ।
ऐसा [5]लाघवशिक्षानिधि जो भुज, अतुळ [6]वीर्यभा त्यांत.' ॥ ३२
विस्मित होउनि पांडव शोधुनि भेटोनि त्या निषादास, ।
पुसती वृत्त, श्रवणें पावाया दुःसहा [7]विषादास. ॥ ३३
तो निजवृत्त कथी, तों अर्जुनमुख उतरलें [8]विषादानें. ।
[9]मोहें चि पावों पाहे त्या [10]अपकर्षें जसें [11]विषादानें. ॥ ३४
येउनि पुरासि अर्जुन, एकांतीं स्वगुरुला म्हणे, 'गुरुजी ! ।
स्मरती [12]स्ववरोक्ति तुम्हां [13]मत्पंचप्राणपन्नगा ! [14]गुरु जी ? ॥ ३५
'होसील तूं चि माझ्या शिष्यांत विशिष्टतर असामान्य; ।
दुसरा कोणी हि जगीं [15]छात्र न होईल तुज-असा मान्य.' ॥ ३६
ऐसा वर देउनि, कां [16]मदधिक [16]लोकाधिक स्वशिष्य दुजा ।
केला निषादपतिसुत ? सत्य असावा जगांत बोल तुजा. ॥ ३७
कौतुक विलोकिलें तें तैसें आम्हीं वनांत हो तात ! ।
[17]शुष्यद्ध्रद-मीन तसे, [18]विकळ मनोरथ मनांत होतात.' ॥ ३८
राहे उगा चि, संकटहर युक्ति बरी मनांत पाहूनी, ।
जाय वनातें गुरु, जो [19]श्रिततापापह [20]अनातपाहूनी. ॥ ३९
सार्जुन [21]भारद्वाज प्रेक्षाया त्या [22]पदानता पावे, ।

---

१. कुशल. २. शरभाचा वैरी. अर्थात् अत्यंत पराक्रमी. शरभ हा प्राणी सिंहाहून बलिष्ठ असून त्यास आठ पाय असतात, अशी समजूत आहे. ३. इजा, जखम. ४. कुत्र्याच्या तोंडांत. ५. हस्तचापल्यविद्येचें भांडारच असा. ६. पराक्रमतेज. ७. विषाद=निराशा, उत्साहभंग, खेद. ८. खेदानें. ९. मूर्च्छा येते कीं काय ? असें वाटलें. १०. अप्रतिष्ठेनें. ११. विषाच्या सेवनानें ( आदान=सेवन ). १२. तुमची वरदानसमयींची उक्ति. ( गीति १९ पहा ). १३. माझ्या पंच-प्राणांना सर्पासारख्या ( माझ्या पंचप्राणांना भक्षण करणारा सर्पच ) अशा गुरुजी ! येथील शब्द-योजना अर्जुनाला झालेल्या संतापाचा अतिरेक दर्शविते ! १४. मोठी. १५. शिष्य. १६. केवळ माझ्यापेक्षांच श्रेष्ठ नसून सर्व लोकांत श्रेष्ठ. १७. आटणाऱ्या डोहांतील मासे. १८. 'विफळ' असें पाठांतर. १९. आश्रितांचा संताप ( दुःख ) घालविणारा. २०. छायेपेक्षां. ( आतप=ऊन्ह. अन्+आतप=छाया ). २१. द्रोण. २२. पदीं नम्र झालेल्या ( एकलव्याला ).

पाहुनि म्हणे, '[1]छळें हे [2]ऐसे नैष्ठिकें[3] कदा न तापावे. ॥ ४०
गुरुचरणव्रतनिष्ठा [4]शरमोक्षाभ्यास [5]सारखा यामीं, ।
[6]ऐसा फार बरा [7]हा; आलों व्हायासि [8]पारखा या मी.' ॥ ४१
ऐसें मनांत बोलत जाय गुरु, तया निषादतनयानें ।
वंदुनि पूजुनि केलें सर्वस्वनिवेदना[9]दि विनयानें. ॥ ४२
द्रोण म्हणे, 'तूं माझा जरि शिष्य, दिजे मदीय वेतन[10], हो ! ।
केवळें[11] विफळ चि दाउनि नम्रत्व [12]ऋजुत्व मात्र वेत न हो.' ॥ ४३
नैषादि म्हणे, 'स्वामी ! जें मज सांगाल तें निवेदीन[13]. ।
[14]प्रकटीकृतगुर्वर्थें शिष्य, [15]जसा बहुधनें निवे दीन.' ॥ ४४
द्रोण म्हणे, '[16]साधुजनीं कांहीं वेंचोनि [17]आंग [18]ठावा हो. ।
हा [19]दक्षिणें-पाणि तुझा [20]मच्चरणीं आजि आंगठा वाहो.' ॥ ४५
दारुणतर वचन असें परिसे, परि [21]सेकें [22]नवसुधेचा चि ।
[23]मावी, तद्यश सन्मतिचा हि हरी ताप, न [24]वसुधेचा चि. ॥ ४६
जों गुरु म्हणे, 'मदिष्ट [25]प्रतिपादूनि, स्ववाक्य साच करीं,' ।

---

१. कपटानें. २. हे ऐसे=ह्या अर्जुनासारखे. ३. भक्तिमान्. ४. बाण सोडण्याचा अभ्यास. ५. सर्वकाळ (याम=प्रहर). ६. ऐसा=पूर्वार्धांत सांगितल्याप्रमाणें. ७. हा=अर्जुन. ८. या (अर्जुनाला) पारखा (परकी) व्हायासि आलों (होण्याची पाळी आली आहे)–असा अन्वय. अरेरे ! अर्जुन मला सोडून जाणार ! मी त्याला अंतरणार ?–असा भाव. ९. सर्वस्वाचें अर्पण वगैरे. आत्मनिवेदन हा नवविधा भक्तीचा एक प्रकार आहे. नवविधा भक्ति येणेंप्रमाणें:– श्रवणं कीर्तनं विष्णोः स्मरणं पादसेवनं । अर्चनं वंदनं दास्यं सख्यमात्मनिवेदनं. ॥ १०. देणगी (गुरुदक्षिणा.) ११. केवळ (औपचारिक, वर वर) नम्रत्व [व] ऋजुत्व दाउनि विफळ चि (निष्फळ असा) वेत मात्र न हो–असा अन्वय. वेत नम्र असतो पण त्याला फळें येत नाहींत, तसा तूं होऊं नकोस. तुझ्यापासून मला कांहीं फळ प्राप्त झालें पाहिजे, असा भाव. १२. सरलत्व. १३. अर्पण करीन, देईन. १४. प्रकट केलेल्या गुरूच्या अर्थानें (प्रयोजनानें). १५. जसा बहुधनें दीन निवे [तसा] प्रकटीकृतगुर्वर्थें शिष्य [निवे]–असा अन्वय. १६. सत्पुरुषाच्या ठिकाणीं, सज्जनाप्रीत्यर्थ. १७. शरीराचा अवयव. शरीराला झीज लावून घे–असा भाव. १८. प्रख्यात. १९. उजवा हात. तूं आपल्या उजव्या हाताचा आंगठा मला अर्पण कर–असा भाव. २०. माझ्या पायांवर. २१. सिंचन. २२. नूतन अमृताचा. २३. मानी, समजे. २४. पृथ्वीचा. तद्यश सन्मतिचा चि ताप न हरी, वसुधेचा हि [हरी]–असा अन्वय. २५. देऊन. 'प्रतिपाळूनि' असें पाठान्तर. प्रतिपाळणें=संरक्षण करणें, आचरण करणें.

तों चि च्छेदुनि घे तो स्वांगुष्ठ, [1]व्याळदष्टसा च [2]करीं. ॥ ४७
साहे छळ आनंदें, वाहे अंगुष्ठ वरि न तो पाहे, ।
राहे उगा चि, जाणों देउनि [3]अत्यल्प लाजला आहे. ॥ ४८
केली सत्कीर्ति [4]दुणी, झाली [5]संधानशीघ्रता चि उणी. ।
तो काय घात ? **म्हणती कीर्तिविघातासि आत्मघात [7]गुणी.** ॥ ४९
शिष्यांतरीं हि होतें प्रेम, तदपि [8]**फाल्गुनीं** च एकीं तें. ।
कवि म्हणति चातकांतें [9]घनभक्त जसें, तसें न [10]केकींतें. ॥ ५०
सर्व[11]रहस्यज्ञाता [12]**गुरुपुत्र**, [13]रथप्रवीण **धर्म** सदा; ।
[14]असिधर-गुरु [15]यमे, म्हणती **भीम सुयोधन**, 'धरील कोण [16]गदा ?' ॥ ५१
[17]सर्वत्र [18]**जिष्णु** गुरुसा, त्या गुरुशिष्यांत एक मात्र उणें. ।
[19]वृद्धत्व क्षत्रत्व त्यजुनि पहातां, समान सर्वगुणें. ॥ ५२
हरुनि सकळ तम, [20]जोडा होउनि, [21]सर्वार्थभासक रवीला, ।
गुरुनें एक तरुशिरीं [22]शिष्यपरीक्षार्थ [23]भास करवीला. ॥ ५३
तेव्हां एक उतरला अर्जुन, भेदुनि [24]शिरीं च भास, [25]कसा. ।
सर्वांत मुख्य **पार्थ**, [26]ग्रहनक्षत्रांत विश्वभासकसा. ॥ ५४

---

१. सापानें चावलेला असा. २. हस्ताचे ठायीं. ३. फारच थोडी गुरुदक्षिणा. **उत्प्रेक्षा**-लंकार. ४. दुप्पट. ५. शरसंधान करण्याची चपलता. ६. कीर्तीच्या नाशाला. ७. गुणी पुरुष आत्मघाताला घात म्हणत नाहींत, परंतु कीर्तिविघाताला घात म्हणतात–असा भाव. ८. अर्जुनाच्या ठायीं. ९. 'घनभक्त जसे, तसे' असें पाठांतर. १०. मयूरांतें. ११. धनुर्वेदाचें संपूर्ण रहस्य जाणणारा. १२. अश्वत्थामा. १३. रथामध्यें बसून युद्ध करण्यांत पारंगत. १४. खड्गयुद्धांत सर्वांना मागें सारणारे. १५. जुळे भाऊ ( नकुळ व सहदेव ). १६. गदायुद्धांत आमची गदा धरणारा कोण आहे? अर्थात् गदायुद्धांत आमचा हात धरणारा कोणी नाहीं–असा भाव. १७. अर्जुनाखेरीज इतर पांडवांच्या ठिकाणीं फक्त एक एकच गुण होता. पण अर्जुनाचे ठिकाणीं त्याच्या गुरूप्रमाणेंच सर्व गुण एकत्रित झालेले होते–असा भाव. १८. अर्जुन. १९. क्षत्रत्व गुरूचे ठिकाणीं व वृद्धत्व शिष्याचे ठिकाणीं नव्हतें. हें मात्र एक उणें ( उणेपणा, व्यंग ) त्या गुरुशिष्यांच्या ठिकाणीं होतें. ही गीति **पंतांच्या** प्रतिभेची साक्ष पटविते. २०. जोडीदार, सारखा. २१. सकल पदार्थ प्रकाशित करणाऱ्या. २२. शिष्यांची प्रहरणज्ञानांत परीक्षा घेण्यासाठीं द्रोणानें शिल्पिजनांकडून एक कृत्रिम भास पक्षी करवून वृक्षाग्रीं ठेविला, अशी कथा आहे. ( मूळ अध्याय १३२।६८–६९ ) २३. पक्षिविशेष. याचे पंख नीलवर्ण असतात. २४. ( भास-पक्ष्याच्या ) डोक्यावर. २५. कसोटीला. २६. ग्रह आणि नक्षत्रें यांत. येथें **पंतांनीं भगव**-

द्रोणाच्या जंघेला[1] ग्रासी गंगेंत एकदा याद[2]. ।
तैं रक्षी जिष्णु[3]; म्हणे गुरु, 'माझा हा[4] हि एक दायाद.' ॥ ५५
होतें ब्रह्मशिरोस्त्रद्रविण[5] द्रोणें जपोनि सांचविलें, ।
तें जिष्णुला दिलें, कीं तेणें प्राणात्ययांत[6] वांचविलें[7] ॥ ५६

---

## अध्याय सव्विसावा.

गुरुनें एका समयीं रंगीं[8] भीष्मादि सर्व मेळविले; ।
शिष्यांकरवीं तेथें शिक्षित शस्त्रास्त्रखेळ खेळविले. ॥ १
रचिते झाले रंगीं शिल्पिवर[9] विचित्र मंचें[10] रायाचे. ।
गमति विमान[11] उतरले क्षितिवरि गगनांत संचरायाचे. ॥ २
स्त्रीपुरुषरत्नशोभित[12] बहु मोटा रंग[13] काय वर्णवतो ? ।
भासे व्यक्त खवळला यादोमणिकोटिकोश[14] अर्णव तो. ॥ ३
द्रोणेंदुशिष्यरश्मि[15] स्वगुणसुधा[16] प्रकट करुनि दाखविती. ।
प्रेक्षकलोकचकोरव्राताकरवीं[17] यथेष्ट चाखविती. ॥ ४
झाले कुतुकफळांचे[18] श्रीधर्मादिक सुयोध-नग[19] दाते ।
आले घेउनि बळजळराशि[20] वृकोदर-सुयोधन गदा ते. ॥ ५
सव्यापसव्य-मंडळगति[21] दोघे भ्रमति हे, मन गदांनीं[22] ।

---

द्रीतेंतील 'ज्योतिषां रविरंशुमान्' (अध्याय १०।२१) ह्या भागाचें सुरेख रूपांतर केलें आहे. २७. सर्व जगाला प्रकाशित करणाऱ्या सूर्यासारखा (अत्यंत पराक्रमी).

१. पोटरीला. २. जलजंतु, ग्राह (मगर). ३. अर्जुन सुद्धां. ४. आप्त, बंधु. ५. ब्रह्मशिरा नामक अस्त्ररूपी धन. द्रविण=धन. ६. प्राणसंकटांत. (अत्यय=नाश). ७. येथें मूळांतील १३३ वा अध्याय संपतो. ८. विद्या शिकण्याचे स्थानीं, सभास्थानीं. ९. उत्तम कारागीर. रायाचे= राजाच्या पदरचे, राजाश्रित. १०. पलंग. ११. **उत्प्रेक्षा**लंकार. 'विमान' हा शब्द संस्कृतांत पुंल्लिंगी आहे. १२. स्त्रीपुरुषांच्या अंगावरील रत्नयुक्त अलंकारांनीं सुशोभित. १३. सभामंडप, आखाडा. १४. याद (जलचर) रूप रत्नकोटीचें भांडारच असा. १५. द्रोणरूप चंद्राचे शिष्यरूप किरण. **रूपका**लंकार. १६. आपले गुण हेंच अमृत. १७. प्रेक्षकलोक हाच चकोरसमूह त्याकरवीं. व्रात=समुदाय. १८. कौतुकरूपी फळांचे. १९. चांगले योद्धे हेच वृक्ष. नग=वृक्ष २०. बलसागर. २१. उजव्या-डाव्या मंडलाकार गति ज्यांमध्यें, असें भ्रमण करिती. २२. गदांच्या योगानें.

हर्षविति देखत्यांचें, अधनाचें जेंवि हेमनग-दानीं[1]. ॥ ६
जन म्हणति, होय जैसा परिवेष[2] भ्रमवितां अलातातें[3], ।
भीमगदेचा हि तसा; केला अभ्यास बहु भला तातें[4].' ॥ ७
'दुर्योधना हि भंवता होय गदेचा तसा चि परिवेष[5]. ।
रविमंडळमध्यगहरिसम[6]' म्हणतों 'यांसि, भिन्न परि वेष.' ॥ ८
गांधारीला सांगे पुत्रविचेष्टित[7] पृथा, नृपा[8] क्षत्ता[9]. ।
भीमोत्कर्षोक्ति[10] तयां लागे दोघांस ही जसी लत्ता. ॥ ९
म्हणती 'साधु[11] वृकोदर ! साधु[11] सुयोधन !' असें तईं कोणी, ।
रंगस्थिति च न केवळ, गडबडली तद्विचेष्टितें[12] क्षोणी[13]. ॥ १०
गुरुवचनें गुरुसुत त्यां दोघांच्या क्षिप्र[14] राहवी खेळा. ।
ते पूर्वपश्चिमाब्धी, जाणों द्रोणात्मजोक्ति[15] ते वेळा[16]. ॥ ११
मग राहवूनि वाद्यें, द्रोण म्हणे, 'सूनुहूनि[17] जो मजला ।
प्रियतर चकोर होउनि, गुरुशस्त्रास्त्रामृतांशुला[18] भजला; ॥ १२
तो जिष्णु विष्णुसा या रंगीं यावा, तयासि बोलावा, ।
भीष्मादि गुणज्ञजन प्रेक्षुनि तद्भुजविलास[19] डोलावा.' ॥ १३
गुरुचित्तज्ञ धनंजय ये तनुधर[20] चापवेद[21]सा, रंगीं ।
नुरवी भान स्वगुणें, गीतें गीतज्ञ जेंवि सारंगीं[22]. ॥ १४
भेदी सूक्ष्म कठिन चल[23] लक्ष्यें[24] पळतां, बसोन तो यानीं, ।
निववि जनांसि गुणांनीं, मेघ जसा चातकांसि तोयांनीं. ॥ १५

---

१. सुवर्णपर्वताच्या दानानें. २. मंडळाकार तेजोविशेष. ३. ज्वलितकाष्ठातें, कोलिताला. ४. भीमानें. ५. तेजोमंडळ. ह्या गीतीशीं पंतांच्या द्रोणपर्वांतील अध्याय १० गीति ३७ ही ताडून पाहाण्यासारखी आहे. ६. सूर्यमंडळाच्या मध्यभागीं असलेल्या विष्णूसारखा. ७. पुत्रांचें कृत्य, त्यांचे पराक्रम. पृथा गांधारीला सांगे व क्षत्ता नृपा (धृतराष्ट्राला) सांगे–असा अर्थ. ८. धृतराष्ट्राला. ९. विदुर. १०. भीमाच्या उत्कर्षाचें भाषण. ११. शाबास ! १२. त्यांच्या (भीमदुर्योधनांच्या) कृतीनें. १३. पृथ्वी. १४. सत्वर. १५. द्रोणपुत्र जो अश्वत्थामा त्याचें भाषण ती. **उत्प्रेक्षा**लंकार. १६. सागरमर्यादा. १७. पुत्रापेक्षां. १८. गुरूचीं शस्त्रें आणि अस्त्रें हाच अमृतांशु (चंद्र) त्याला. १९. त्याच्या (अर्जुनाच्या) बाहूंचा खेळ (पराक्रम). २०. मूर्तिमान्. २१. धनुर्वेदच असा. २२. हरिणांच्या ठिकाणीं. हरिणें गानप्रिय असतात, अशी समजूत आहे. २३. चंचल. २४. निशाणें.

अग्न्यस्त्रप्रमुखास्त्रें प्रकट करुनि, वारुणादिकें[1] शमवी, ।
अर्जुन गुरुप्रसादें प्रेक्षकजनचित्तवृत्तिला रमवी. ॥ १६

होय अदृश्य प्रकट क्षणभरि अणु धरि शरीर पर्वतसें. ।
जनदृष्टिला मिळालें नाहीं च कधीं हि हर्षपर्व[2] तसें[3]. ॥ १७

तों त्या रंगद्वारीं तलताडितबाहुशब्द[4] दुःसहसा ।
झाला, जसा अशनिचा[5] होतो, पडतां शिळातळीं[6] सहसा. ॥ १८

ते[7] अल्प मयूराचे शब्द करिति, चकित विमद[8] भुजगा[9] जे. ।
दचके मनांत रंगीं जन, जेव्हां तो प्रचंड भुज गाजे. ॥ १९

द्वाराकडे चि सारे पाहति तों मूर्त[10] राशि तेज्याचा, ।
कर्ण शिरे रंगीं, भुजरव पविरव[11] म्हणति लोक ते ज्याचा[12]. ॥ २०

शत्रुमदाचा[13] कर्णापासुनि व्हायासि अंत रंगांत, ।

---

१. वारुणास्त्र व इतर आणखी अस्त्रें त्यांनीं. वरुणास्त्रानें, अर्थात् पर्जन्याचा मारा करून. २. हर्षाची पर्वणी. ३. अर्जुनानें संपादन केलेल्या शस्त्रास्त्रकलानैपुण्याविषयीं मूळांतील वर्णन वाचनीय आहे:—धनुर्धर अर्जुनानें आग्नेयास्त्रानें अग्नि उत्पन्न केला, वारुणास्त्रानें उदक उत्पन्न केलें, वायव्यास्त्रानें वायु निर्माण केला, पर्जन्यास्त्रानें मेघ उत्पन्न केले. भौमास्त्रानें तो भूमींत शिरला, पर्वतास्त्रानें त्यानें पर्वत उत्पन्न केले आणि अंतर्धान अस्त्रानें तो गुप्त हि झाला. तो क्षणांत उंच होई तर क्षणांत ठेंगणा होई, एकाएकीं तो रथाच्या धुरेवर जाई तर दुसऱ्याच क्षणीं तो रथांत येई व लगेच तो जमिनीवर उतरे. चपलतेनें स्थलांतर करीत असलेल्या अर्जुनानें सूक्ष्म नाजूक आणि गुरु ( जड ) लक्ष्यें अनेक प्रकारच्या बाणांनीं वेधिलीं. फिरत असलेल्या लोखंडी डुकराच्या उघड्या तोंडामध्यें जणूं एकच बाण मारावा त्याप्रमाणें त्यानें एकदम वेगवेगळे पांच बाण सोडिले. दोरीला टांगून ठेवलेल्या चंचळ नळीमधून त्यानें एकवीस बाण मारिले. अशा रीतीनें अनेक प्रकारांनीं शस्त्रविद्येंत कुशल असलेल्या अर्जुनानें मोठ्या तरवारीनें, धनुष्यानें आणि गदेनें मंडलें धरीत आपलें प्रावीण्य दाखविलें. ( अध्याय १३५ श्लोक १९–२५ ). ४. तळहातानें थोपटलेल्या दंडाचा शब्द. ५. वज्राचा. ६. दगडावर. तल=( १ ) पृष्ठभाग, ( २ ) तळ, बूड— असे अर्थ आहेत. 'शिळेवरी' असा पाठ असता तर बरें झालें असतें. ७. जे मयूराचे शब्द भुजगा (सर्पांला) विमद [ व ] चकित करिति, ते अल्प [ होत ]—असा अन्वय. सर्प व मोर यांचें हाडवैर प्रसिद्धच आहे. येथें बाहुशब्दावर मयूरशब्दाचा आणि सभामंडपांतील लोकांवर विमद भुजगांचा आरोप केलेला आहे. ८. गर्वरहित. ९. सर्पाला. १०. मूर्तिमान्. ११. वज्राचा आवाज. १२. ज्याचा भुजरव [ हा ] पविरव ( वज्राचा शब्दच आहे असें ) लोक म्हणति— असा अन्वय. **उत्प्रेक्षा**लंकार. १३. दुर्योधनाचा शत्रू जो अर्जुन, त्याच्या गर्वाचा.

[1]अवकाश दे सुयोधन [2]सानुज तोषोनि [3]अंतरंगांत. ॥ २१
[4]वाटे [5]रंगाब्जवनीं आला प्रेमासि [6]अर्क राखाया. ।
जनदृष्टि उड्या घालिति, बहु माशा जेंवि [7]शर्करा खाया. ॥ २२
[8]भानु नसे तों तेजें, [9]स्वस्तोत्र [10]हिमांशु कीं [11]दिवा करवी, ।
[12]भीमार्जुन तेजस्वी, वृष नसतां, कीं तया दिवाकर वी. ॥ २३
[13]कर्ण द्रोणासि नमुनि, बंधुत्व न जाणतां, निजा [14]अनुजा ।
[14]जिष्णुसि म्हणे, '[15]चमत्कृति दाखविल्या त्वां धरूनियां धनु [16]जी, ॥ २४
त्या दावितों, [17]चमत्कृतितटिनीशततातमेरुपर्वत मी; ।
भ्रमसी वृथा [18]पृथाप्रियपुत्रा ! कां तूं शिरोनि [19]गर्वतमीं ?' ॥ २५
द्रोण म्हणे, 'दावावे त्वां हि चमत्कार, बोलं [20]राहों दे; ।
तव [21]शस्त्रास्त्रचमत्कृतिरसपूरीं सर्व [22]रंगें वाहों दे.' ॥ २६
कर्णें तसें चि केलें कर्म; सुविद्या [23]नतां न कां पावे ? ।
[24]सुर-शेष डोलिले, मग नर[25]मस्तक कां तदा न [26]कांपावे ? ॥ २७
द्रवलें दुर्योधनमन पाहुनि [27]शस्त्रास्त्रयानपटुतेला, ।
[28]अंतर्मलिनें [29]द्रवतें [29]चक्षु जसें पाहतां चि [30]कटुतेला. ॥ २८

---

१. सवड, संधी. २. धाकट्या भावासह. ३. चित्तांत. ४. **उत्प्रेक्षा**लंकार ५. रंग (प्रेक्षागार) हेंच कमलवन, त्यांत. **रूपका**लंकार. ६. सूर्य. येथें मूळांतील अध्याय १३५ वा संपतो. ७. साखर. ८. सूर्य. ९. आपलें स्तवन. १०. चंद्र. ११. दीप. कीं=किंवा. १२. वृष (कर्ण) नसतां (नसेल तेव्हां) भीमार्जुन तेजस्वी [होत], कीं (कारण) तया (कर्णाला) दिवाकर (सूर्य) वी (प्रसवे, जन्म देई)—असा अन्वय. सूर्याचा पुत्र हा तेजस्वी असावयाचाच, त्याच्या समोर भीम व अर्जुन यांचें तेज काय पडणार?—असा भाव. ही गीति **पंत**प्रतिभानिर्मित आहे. १३. गीति २४–२५ युग्म समजावें. १४. आपला धाकटा भाऊ जो अर्जुन, त्यास. १५. चमत्कार. १६. ज्या (चमत्कृति). १७. चमत्काररूप शेंकडों नद्यांचा पिता जो मेरु, त्यासारखा मी. १८. कुंतीच्या आवडत्या मुला! (अर्जुना!). १९. गर्वरूप अंधकारांत. २०. शब्द, बडबड. २१. शस्त्रें व अस्त्रें यांचे चमत्कार, हाच कोणी रस त्याच्या पूरांत. २२. सभा. २३. नम्र पुरुषाला. २४. देव आणि शेष यांनीं कर्णाच्या गुणासंबंधीं गुणग्राहकता दर्शविली—असा भाव. २५. मनुष्याचें शिर. 'मस्तक' हा शब्द संस्कृतांत पुंल्लिंगी आहे. २६. येथें 'कांपावे' ह्या शब्दाची योजना न करितां 'डोलावे' किंवा अशाच अर्थाचा दुसरा शब्द **पंतां**नीं योजिला असता तर बरें झालें असतें; कारण 'कांपणें' हें भयाचें लक्षण आहे. २७. शस्त्रास्त्रांच्या ज्या गति त्यांविषयीं जी कुशलता तिला. २८. ज्यांत मळ शिरला आहे असें. २९. डोळ्याला

भेटुनि म्हणे सुयोधन, 'बहु यश वाढोनि तें तगो[1] कर्णा ! ।
बापा ! भला भला गा ! कार्मुकवेदत्रिनेत्रगोकर्णा[2] ! ॥ २९
हें राज्य[3] तुझें, भोगीं भोग, जसा चंदनद्रु[4] भुजगांनीं[5], ।
आम्हीं वरिलासि, तुझे गाऊं दे हे गुणाढ्य भुज गानीं[6].' ॥ ३०
कर्ण म्हणे, 'परि आहे एक मनीं काम, तो करीं पूर्ण. ।
वाटे मजसीं तिसऱ्या पार्थासीं[7] द्वंद्वयुक्त हो तूर्ण[8].' ॥ ३१
कलिपुरुष[9] म्हणे, 'कर्णा ! अरिमूर्धमहत्त्वकक्षदव[10] डावा ।
त्वच्चरण हो[11], दिगंतीं त्वां रिपुजनमद[12] समूळ दवडावा.' ॥ ३२
जिष्णु म्हणे, 'न बहातां[13] जाताति महाजनांत दाटूनी, ।
बोलति हि न बोलवितां ते घडिले मूर्खकोटि वांटूनी[14]. ॥ ३३
कर्णा ! दंडक[15] रुचला तुज फार तुझा, परंतु हा नीच, ।
सावध हो, नाहीं तरि, होईल प्राणकीर्तिहानी[16] च.' ॥ ३४
कर्ण म्हणे, 'काय तुझें येथें ? हा[17] रंग सर्वसामान्य. ।
न वदें बहु, तुज बहुधा प्राणपरिचय हि न गर्वसा मान्य[18]. ॥ ३५
यावरि कटु वदतां, शिर उडवीन शरें, जसा चि चेंडु करें. ।
आदिवराहपरिभव[19] न करिजेल स्वकुळनुतिवचें[20] डुकरें.' ॥ ३६

---

पाणी येतें. ३०. तिखटपणाला, तिखट पदार्थाला ( भरकापुरीला. ) संस्कृतांत कटु=तिखट व तिक्त=कडू–असे अर्थ आहेत. पण प्रचारांत याच्या उलट भाषासांप्रदाय रूढ झाला आहे.

१. टिको. २. धनुर्वेद हाच त्रिनेत्र ( शंकर ) त्याचें वसतिस्थान जें गोकर्णक्षेत्र तसा. ( हें क्षेत्र दक्षिणहिन्दुस्थानांत प्रसिद्ध आहे. येथें शिवाचें आत्मलिंग असून माघमासीं महाशिवरात्रीस मोठी यात्रा भरते ). ३. हें राज्य तुझें [ आहे. ] [ तूं याचा ] भोग भोगीं ( उपभोग घे ) भुजगांनीं जसा चंदनद्रु [ वरावा, तसा ] आम्हीं [ तूं ] वरिलासि ( आम्ही तुझा स्वीकार केला आहे )–असा अन्वय. ४. चंदनवृक्ष. ५. सर्पांनीं. ६. गाण्यांत. ७. अर्जुनाशीं. ८. सत्वर. ९. दुर्योधन. ( कलीच्या अंशरूपानें अवतीर्ण झालेला पुरुष ). १०. शत्रूंच्या मस्तकाचें जें महत्त्व तेंच गवत, त्यांत वणव्यासारखा. ११. होवो. १२. शत्रुगणाचा गर्व. १३. बोलावल्यावांचून. १४. चूर्ण करून. १५. रीति. १६. प्राणांची हानी व कीर्तीची हानी. १७. हा आखाडा सर्वांना सारखा मोकळा आहे—असा भाव. १८. तुला गर्व जसा मान्य नाहीं, तसा बहुधा प्राणपरिचय ही ( प्राणांची आवड ही ) मान्य नाहीं; तूं गर्व जसा तुच्छ समजतोस, तसाच स्वजीवही समजतोस असें दिसतें–हा भावार्थ. १९. विष्णूचा अवतार जो आदिवराह, त्याचा पराभव. विष्णूच्या दहा अवतारांपैकीं तिसऱ्यास 'आदिवराह', 'यज्ञवराह' असें म्हणतात. याचें

ऐसें कर्ण वदे, तों गुर्वाज्ञेसह[1] धनुर्लता[2] पार्थ ।
स्वीकारी; तेजस्वी[3] लोकीं वर्ते यशःप्रतापार्थ[4]. ॥ ३७
पांच हि पांडव उठले; भरला उत्साह अंतरंगांत. ।
उठले कौरव शत ही म्हणति तदा संत 'हंत'[5] रंगांत. ॥ ३८
दैवानें[6] दाखविलें समराडंबर[7] वृथा, न नाश तदा. ।
परि सुतकलहारंभीं 'हाय' असें ये पृथानना शतदा. ॥ ३९
बुडवि पृथा[8]पृथिवीला जेव्हां मोहांबुनिधि[9] महा खोल, ।
तिस उद्धरी गुरुसुमतिदंष्ट्रेनें[10] विदुरकविमहाकोल[11]. ॥ ४०
झाले पांडवपक्षी[12] द्रोण, कृपाचार्य, भीष्म, उत्साहें. ।
थोरांसि नावडे, 'श्रितसाधुत्यागें[13] घडेल कुत्सा[14] हें.' ॥ ४१
जों नाहीं च सुतांचे अन्योन्यास्रह्रदीं[15] शर विराले[16], ।
बंधुत्व त्यजुनि, सुतस्नेहें[17] रिपुसे सुरेश[18]-रवि[19] झाले. ॥ ४२

---

मुख डुकराचें आणि इतर शरीरभाग मनुष्यासारखे होते. विष्णूनें हा वराह अवतार घेऊन, हिरण्याक्ष दैत्यास मारून, समुद्रांत बुडणाऱ्या पृथ्वीचा उद्धार आपल्या दंताग्रानें करून तिला उचलून धरिलें, अशी कथा आहे. २०. स्वजातीच्या स्तुतिपर भाषणानें.

१. गुरु जो द्रोण, त्याच्या आज्ञेसह. येथें **'सहोक्ति'** नामक अलंकार आहे. २. धनुष्यरूपी लता ( वेल ). 'लता' अथवा 'वल्ली' हें पद भ्रू, विद्युत्, भुज, खड्ग व चाप या शब्दांशीं अथवा अशा अर्थाच्या शब्दांशीं अन्वित होऊन त्याचा अर्थ सौंदर्य, सौकुमार्य, सूक्ष्मता, तनुता–असा होतो. जसें:–भुजलता, भुजवल्ली, चापलता, धनुष्यवल्ली, विद्युल्लता, भ्रूलता, इत्यादि. ३. पराक्रमी पुरुष. ४. यश आणि पराक्रम यांकरितां. ५. खेदार्थी. अरेरे! खेद प्रदर्शित करिती–असा भाव. ६. युद्धाचे आवेश. ७. [ कौरवपांडवांनीं ] वृथा समराडंबर दाखविलें, [ परि ] दैवानें ( सुदैवानें ) तदा नाश न ( त्या प्रसंगीं कांहीं नुकसान झालें नाहीं )–असा अन्वय. ८. पृथारूप पृथ्वीला. कुंतीला झालेला मोह विदुरानें दूर केला–हा इत्यर्थ. ९. मोह हाच सागर. १०. मोठ्या सुबुद्धिरूप दाढेनें. ११. ज्ञाता विदुर हाच आदिवराह. ह्या गीतींत सुरेख **परंपरितरूपक** आहे. [ महाकोल= ] आदिवराह–**पंत**. १२. पांडवांच्या पक्षाचे. 'पांडवपक्षीं' असें पाठांतर. १३. आश्रित सुजनांचा त्याग केल्यानें. १४. निंदा. १५. परस्परांच्या रक्ताच्या डोहांत. अस्र=रक्त. 'अस्रः कोणे कचे पुंसि क्लीबाश्रुणि च शोणिते' इति मेदिनी. १६. बुडाले. १७. सुतस्नेहें ( आपले पुत्र अनुक्रमें अर्जुन व कर्ण यांच्याविषयीं वाटत असलेल्या प्रेमामुळें ) सुरेश ( इंद्र ) व रवि ( सूर्य ) बंधुत्व ( मित्रत्व ) त्यजुनि रिपुसे ( शत्रूप्रमाणें ) झाले–असा अन्वय. १८. इंद्र. ( मागें अध्याय १९ गीति ७४–८७ पहा ). १९. सूर्य. ( मागें अध्याय १७ गीति ६–१५ पहा ).

कृप कर्णासि म्हणे, 'हा नृप[1]सुत करणार तुजसवें युद्ध. ।
जे द्वंद्वयुद्धकर्ते वीर असावे कुळादिकें शुद्ध. ॥ ४३
गौर[2]व हातें वा[3]णीदेवी हि लिहों शके चि ना ज्यांचें[4] ।
गौर[5] वहातें लोकीं यश गांग[6]स्रोतसें चि राजांचें. ॥ ४४
ते पूर्वज याचे, हा कौरव गौरवपदें[7]दुकुळजात, ।
जाणे विश्व. तुवां ही सांगावे स्वा[8]न्वय, प्रसू[9], तात. ॥ ४५
कोणाचें कुळभूषण तूं कर्णा! प्रथम हें चि कळवावें; ।
भलत्यासीं च नृपसुतें द्वंद्व करुनि शस्त्र[10]-यश न मळवावें.' ॥ ४६
वृ[11]षवदन उतरलें, जैं कृपवाक्शर काळजांत खें[12]डतरले; ।
[13]मर्म उघडितां, मानी पुरुष बुडाले [14]त्रपेंत, जं[15]ड तरले. ॥ ४७
अंधसुत म्हणे, 'गुरुजी! जांचा[16]; बहु सोसितो हिरा जाच, ।
न्यायें[17] तों सत्कुळज हि, सैन्यपति हि, शूर तो हि राजा च. ॥ ४८
[18]जरि जिष्णु युद्ध न करी, तरि देतों राज्य अं[19]गदेशाचें. ।
या कर्णाचें यश हो, झालें तें जेंवि अंगदेशा[20]चें.' ॥ ४९
ऐसें वदोनि करवी रंगीं राज्याभिषेक तो कर्णीं[21]. ।

---

१. राजपुत्र अर्जुन. २. महत्त्व. ह्या गीतींत पंतांनीं **'आद्ययमक'** साधिलें आहे. ३. सरस्वती. ४. ज्यांचें राजांचें=ज्या राजाचें. ५. शुभ्र. यशाचा रंग शुभ्र आहे, अशी कविप्रसिद्धि आहे. ६. गंगाजलाच्या प्रवाहासारखें. गांग=गंगाजल. ७. महत्वाचें पद जें चंद्रकुल, त्यांत उत्पन्न झालेला. ८. आपलें कुळ. 'सान्वय' असें पाठांतर. सान्वय=स+अन्वय=कुळासह. ९. माता. १०. शस्त्राची कीर्ति; किंवा—शस्त्र आणि यश हीं मळवूं नयेत. ११. कर्णाचें तोंड. १२. आदळले, खोंचले. १३. गुप्त गोष्ट, व्यंग. हें गीत्यर्ध सुभाषितरूप आहे. १४. लज्जेंत. १५. अभिमानशून्य, मूर्ख. मानी पुरुषांस लाज वाटते, पण मूर्ख असतात त्यांस कांहींच वाटत नाहीं–असा भाव. १६. जाच करा, त्रास द्या. हिरा बहु जाच सोसितो-म्हणजे हिरा हा खरा हिरा आहे हें ठरविण्याच्या वेळीं त्याला पुष्कळ त्रास सोसावा लागतो (उदाहरणार्थ–घणानें ठोकणें वगैरे). त्याचप्रमाणें कर्ण हा उच्चकुलोत्पन्न आहे, हें ठरण्याच्या बाबतींत त्यास त्रास सोसावा लागणारच–असा भाव. 'ज्याचा' असें पाठांतर. १७. शास्त्राप्रमाणें पाहूं गेलें असतां. राजाची उत्पत्ति तीन प्रकारांनीं सांगितली आहे; कुलीन, शूर आणि सेनापति हे तीन प्रकारचे पुरुष राजेच समजावे. (मूळ अध्याय १३६।३५). 'न्यायें तो' असें पाठांतर. १८. कर्ण राजा नाहीं यास्तव. १९. अंगदेश हा भागलपुराजवळचा प्रदेश आहे असें म्हणतात. २०. अंगदनामक वानराचा प्रभु (राम) त्याचे. २१. 'कर्णा' असें पाठांतर.

भरिला सुहृदीं क्षण, शिशुतृप्तिद पीयूषरस चि गोकर्णीं. ॥ ५०
कर्ण म्हणे, 'राज्य दिलें ऐसें तुज राजनंदना ! काय ।
द्यावें ? सांग; गुणज्ञप्रीत्यधिक गमे न चंदना काय.' ॥ ५१
भूप म्हणे, 'अत्रुटिता धारा सरळी जसी च तैलाची ।
यावज्जीव असावी त्वन्मैत्री, स्थिति धरूनि शैलांची.' ॥ ५२
दिधला सुयोधनाला सख्यैवर सुतें तसा चि सवित्याच्या; ।
अतुलोदारत्वातें गाती व्यासादि सर्व कवि त्याच्या. ॥ ५३
आला तशांत तेथें अधिरथ, त्यातें करी नमन कर्ण. ।
तेव्हांचें कुतुक कथुनि रसिकीं प्रमुदित करीन मन कर्ण. ॥ ५४
अधिरथ सूत, तदात्मज वृष, कळतां भाव तो तसा रंगीं, ।
भीम वदे, जो कर्णी विभय, जसा सिंहपोत सारंगीं. ॥ ५५
'कर्णा ! वर्णाधम तूं सूत, तुला युद्धमृति नव्हे उचिता. ।

---

१. आप्त, इष्ट वगैरे मंडळीच्या ठिकाणीं. २. आनंद. ३. मुलांस तृप्ति देणारा. ४. दुग्धरस. येथें 'जणूं काय', 'जसा काय' इत्यादि शब्दांची योजना केलेली नसली, तरी येथें **उत्प्रेक्षा**-लंकार आहे, हें स्पष्टच आहे. ५. लहान मुलांना दूध पाजण्याचें गाईच्या कानाच्या आकाराचें एक पात्र असतें, त्यामध्यें. 'गोकर्णा' असें पाठांतर. ६. गुण जाणणारांच्या प्रेमापेक्षां अधिक. ७. देह, शरीर. चंदन आपल्या शरीराची पर्वा करीत नाहीं. जे त्याच्या आंगचा गुण ( सुगंध ) जाणतात, त्यांच्याकरितां तो आपला देह झिजवितो–हें प्रसिद्धच आहे. सारांश–कर्ण दुर्योधनाला म्हणतोः–तूं माझ्या ठिकाणीं असलेले ( शौर्यादि ) गुण जाणतोस, म्हणून मी तुझ्याकरितां वाटेल तो स्वार्थत्याग करण्यास तयार आहें. ८. मूळांत 'अत्यन्तं सख्यमिच्छामि' ( अध्याय १३६।४० ) असें साधें वाक्य आहे. पण पंतांनीं कसें अलंकारयुक्त भाषण दुर्योधनाच्या तोंडीं घातलें आहे बरें ! ९. अखंडित, अविच्छिन्न. १०. सरळ. 'सरळा' असें पाठांतर. ११. मी जीवंत असें तोंपर्यंत. १२. स्थैर्य, अवस्था, स्वभाव. १३. पर्वताची. पर्वताप्रमाणें मैत्री स्थिर असावी–असा भाव. १४. सख्य ( मैत्री ) रूपी वर ( देणगी ). १५. सूर्याच्या पुत्रानें ( कर्णानें ). १६. अनुपम औदार्यातें. येथें मूळांतील १३६ वा अध्याय संपतो. १७. कर्णाच्या. दुर्योधनानें दिलेल्या अंगदेशाच्या लहानशा राज्याच्या मोबदल्यांत कर्णानें 'मी यावज्जीव तुझ्याशीं मित्रत्व ठेवीन' असें जें वचन दिलें, तें त्याचें खरोखरच अतुल औदार्य होतें. कारण ह्या वचनामुळेंच त्याची सर्व प्रकारें हानी होऊन अपकीर्तीही झाली ! १८. त्याच वेळीं, तितक्यांत. १९. यालाच कर्ण हा नदींत सांपडला. २०. करीन ह्याचा कर्ता–मी ( वैशंपायन किंवा मोरोपंत ). २१. कान. २२. विगतभय, भयरहित. २३. सिंहाचा बच्चा. २४. हरिणांच्या ठायीं. २५. जातीनें नीच. २६. सारथी. ( ब्राह्मणीच्या ठायीं क्षत्रियापासून झालेला पुत्र ). २७. युद्धामध्यें मरण.

[1]परगति पावों पाहसि, परि पदरीं फार पाहिजे शुचिता[2]. ॥ ५६
उचित प्रतोद[3]धारण तुज, [4]चापग्रह नव्हे उचित रंगीं. ।
पावनता निज[5]धर्मीं, गंगेच्या हि न तसी [6]शुचि तरंगीं. ॥ ५७
[7]अंगविषयराज्यपदीं अनुचित तूं, रे! नराधमा! उतरें[8]. ।
पात्र पुरोडाशाला[9] झालें आहे कधीं तरी कुतरें?' ॥ ५८
उपहास[10] असा परिसे, परि सेनानी[11]पिता तसा साहे. ।
किंचित्प्रस्फुरि[12]ताधर कर्ण व्योमस्थ[13] रविकडे पाहे. ॥ ५९
[14]कल्यंश म्हणे, 'भीमा! या बोलें मानितील विषम[15] दहा[16], ।
न वदावें कटु पटुनें, बोले भुजवीर्य[17]गर्वविषमद हा[18]. ॥ ६०
'जे जे कोणी क्षत्रियें[19] त्यांसि बळ ज्येष्ठ' हें चि सन्मत[20] रे! ।
[21]अबळ न [22]अहितोदधिला घेउनि हि क्षत्रियांत जन्म तरे. ॥ ६१
जेथें बळ-गुण तो गुरु[23]; शूर बळा मानिती, न [24]कुलशीला. ।
गुणहीन शाल्मलि[25] वृथा, लघु न म्हणति, भजति साधु तुळशीला. ॥६२
**शूरांच्या तटिनींच्या[26] ठेविति सुगुणीं, न मन कवि प्रभवीं[27]।**

---

१. उत्तम गति. २. पुण्याई, पावित्र्य. ३. चाबूक धरण्याचें काम. ४. धनुष्य धारण करणें. ५. स्वतःच्या धर्माप्रमाणें वागण्यांतच पवित्रता असते–असा भाव. ह्या गीत्यर्धास मूळांत आधार नाहीं. हें लिहितांना पुढील **गी**तावचन **पं**तांच्या मनांत घोळत होतें, असें दिसतें:–स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः। (अध्याय ३।३५). ६. शुभ्रवर्ण लाटांमध्यें. ७. अंगदेशाच्या राज्यपदावर. ८. राज्यपदावरून खालीं उतर. ९. हविर्भागाला. हें गीत्यर्ध सुभाषितरूप आहे. १०. निंदा, कुचेष्टा. ११. परि [जसा] सेनानीपिता [विषदाह] साहे, तसा [कर्ण] उपहास साहे–असा अन्वय. सेनानी=देवांचा सेनापति (कार्तिकस्वामी); त्याचा पिता (शंकर). शंकरानें हालाहल विष प्राशन करून त्यापासून होणारा दाह सहन केला–अशी कथा आहे. १२. किंचित् स्फुरण पावत आहेत ओंठ ज्याचे असा. १३. आकाशांत असणाऱ्या. १४. कलीचा अंश (दुर्योधन). १५. वांकडें, द्वेषयुक्त. १६. दहा=दहा जण, चार लोक, समाज. १७. बाहुबलाचा गर्व हेंच विष, त्या विषाचा मद म्हणजे कैफ, अंमल. १८. हा=भीमाच्या अंगीं दिसून येणारा (विषमद). १९. 'क्षत्रियाणां बलं ज्येष्ठं' असेंच मूळांत आहे. (अध्याय १३७।११) २०. साधुजनांचा अभिप्राय. २१. सामर्थ्यहीन मनुष्य. क्षत्रियांत जन्म घेउनि हि अबळ अहितोदधिला न तरे–असा अन्वय. २२. शत्रुसागरास. २३. उत्तम, श्रेष्ठ. २४. वंशाला अथवा स्वभावाला. २५. सांवरीचें (शेंवरीचें) झाड. कल्पनासादृश्यः–न लघु सुगुण, न गुरु अगुण, तुळसीची सरि न शाल्मली लाहे. । (पंतकृत कर्णपर्व, अध्याय ४१।१७). २६. नद्यांच्या. 'नदीचें मूळ आणि

भजति स्वगुरुत्वें चि, न पाहति कुलशील [1]कनकविप्रभवीं. ॥ ६३
उदकापासुनि झाला वैश्वानर,[2] कृत्तिकासुत[3] स्कंद[4]. ।
मंद प्रताप त्यांचा[5] म्हणेल तो मूर्खता[6]-लता-कंद. ॥ ६४
असुरांसि जो स्वतेजें, घूकांला[7] अर्कसा[8] चि, तापवितो, ।
झाला दधीचिमुनिच्या अस्थींपासूनि जन्मता[9] पवि[10] तो. ॥ ६५
ज्याच्या यशोमृतरसें[11] झाली आहे सदैव धौत[12] मही, ।
विश्वामित्र क्षत्रियपुत्र, शरस्तंबजात[13] गौतम[14] ही. ॥ ६६
द्रोण गुरु हि कलशोद्भव[15], तुमचा हि प्रभव[16] मज असे कळला. ।
सांग स्वयोनिदोषें[17] तेजस्वी यांत कोण तो मळला ? ॥ ६७
सर्वसुलक्षणमंडित, सकवचकुंडल[18], जगीं असामान्य ।
तेजोराशि उपजला, वद दुसरा कोण रे ! असा मान्य ? ॥ ६८
प्राकृत[19] योषा[20] याची जननी, हें तों न ये चि युक्तींत, ।
पिकतें मौक्तिक मुक्ताशुक्तींत[21] चि, तें न अन्य शुक्तींत. ॥ ६९
प्रसवे व्याघ्रास[22] मृगी ? काय उकिरड्यांत ही हिरा पिकतो ? ।
जरि वाढला कुलायीं[23] काकाच्या[24] काक काय रे ! पिक[25] तो ? ॥ ७०

ऋषीचें कूळ पाहूं नये' ही म्हण हाच अर्थ दर्शविते. २७. मूलस्थानीं. मूळांतही असेंच आहे:– शूराणां च नदीनां च दुर्विदाः प्रभवाः किल । ( अध्याय १३७।११ ).

१. सुवर्ण आणि ब्राह्मण यांच्या उत्पत्तीविषयीं. २. अग्नि. 'सलिलादुत्थितो वह्निः' असेंच मूळांतही आहे. ( अध्याय १३७।१२ ). ३. कृत्तिकासंज्ञक नक्षत्रांचा पुत्र. त्या ( कृत्तिका ) सहा होत्या. त्यांनीं गंगेनें टाकलेल्या गर्भास घेऊन वाढविलें, म्हणून यास 'कार्तिकेय' म्हणतात. त्या गर्भास सहा मुखें होऊन त्यांनीं सहाही कृत्तिकांचें स्तनपान केलें, म्हणून त्याचें नांव 'षण्मुख' असें पडलें. ४. कार्तिकेय. ५. अग्नि व कार्तिकस्वामी यांचा. ६. मूर्खत्वरूप वेलीचा कांदा. ७. घुबडांना. ८. सूर्याप्रमाणें. ९. जो पवि ( वज्र ) दधीचिमुनिच्या अस्थींपासूनि जन्मता झाला–असा अन्वय. १०. वज्र. ('पवि' शब्द संस्कृतांत पुल्लिंगी आहे). ११. कीर्तिरूप अमृताच्या रसानें. १२. स्वच्छ. १३. शरनामक गवताच्या राशीमध्यें झालेला. ( अध्याय ९, गीति ५ पहा ). १४. कृपाचार्य. १५. कलश नामक यज्ञपात्रांत जन्मलेला. ( अध्याय २२ गीति ३-४ पहा ). १६. उत्पत्ति. १७. उत्पत्तिदोषानें. १८. 'सुकवचकुंडल' असें पाठांतर. १९. क्षुद्र, नीच. २०. स्त्री. २१. मोत्यांच्या शिंपींत. २२. हेंच उदाहरण मूळग्रंथांत आहे. ( आदिपर्व, अध्याय १३७ श्लोक १६ पहा ). २३. घरट्यांत. 'कुळींहीं' असें पाठांतर. २४. कावळ्याच्या. ( कावळे कोकिळांच्या पिलांस वाढवितात, हें सुप्रसिद्ध आहे. म्हणूनच कोकिलास 'परभृत' अशी संज्ञा आहे ). २५. कोकिल.

स्वल्पा न अंगराज्या, समुचित हा सार्वभौमपदवीतें. ।
[2]आज्ञाकरा मेंज असें कर्णाचें भाग्य भावि वदवीतें. ॥ ७१
हें ज्याला मानेना, तेणें म्हणतील जी[3]प्रति ज्ञाते, ।
अत्युग्रा करुनि असी सिद्ध करावी रणीं प्रतिज्ञा ते. ॥ ७२
शत्रु उठावा आम्हांदेखत लावूनि [4]अंघ्रि [5]चापातें ।
आम्हांसि [6]वधू, कीं [7]हो [8]हतमस्तक [9]अस्मदंघ्रिच्या [10]पातें.' ॥ ७३
ऐसी रंगीं वदला धृतराष्ट्रकुमार तो [11]यदा वाणी, ।
हाहाकारें गर्जति तों रंगीं लोक [12]तोयदा-वाणी. ॥ ७४
व्हावा [13]रणें, परि जाउनि अस्ता, तो समय [14]साधु रवि टाळी, ।
[15]क्रुद्धेक्षणांसि देउनि तेज [16]जगद्बांधवत्व न विटाळी. ॥ ७५
किति म्हणति, 'रंजवाया [17]वारुण्यबलेसि [18]अर्यमा वळला.' ।
किति म्हणति '[19]कलि न व्हावा म्हणउनि तेजस्विवर्य मावळला.' ॥७६
[20]अक्षत गृहासि गेले, सर्व करी कुशळ अर्क, राहो [21]तें; ।
[22]ज्ञातसुतपृथेसि तसें होय, जसें त्यजुनि [23]शर्करा [24]होतें. ॥ ७७

---

१. हा ( कर्ण ) स्वल्पा ( अगदीं लहानशा ) अंगराज्या ( अंगदेशाच्या राज्याला ) समुचित ( योग्य, पात्र ) न ( नाहीं ), [ तर हा ] सार्वभौमपदवीतें [ समुचित आहे ]–असा अन्वय. २. आज्ञानुवर्ती ( आज्ञेंत असणारा ) जो मी ( दुर्योधन ) त्याला. ३. ज्ञाते जीप्रति म्हणतील= ज्ञाते जी प्रतिज्ञा करा असें म्हणतील ती. ४. पाय. धनुष्य ओढतांना एका पायानें त्याचें टोंक जोरानें दाबावें लागतें. ह्या गोष्टीस उद्देशून हें भाषण आहे. ५. धनुष्यातें. ६. वध करो. ७. होवो. ८. तोडिलें आहे मस्तक ज्याचें, असा. ९. आमच्या पायाच्या. १०. पतनानें, प्रहारानें. ११. जेव्हां. १२. मेघासारखे. 'वाणी' ह्या सादृश्यदर्शक अव्ययाचा प्रयोग बहुधा प्रौढभाषेंत करीत नाहींत. परंतु पंतांना यमकाधीनत्वामुळें त्याचा उपयोग वारंवार करावा लागला आहे. ( द्रोणपर्व, अध्याय ४।३६ व अध्याय ७।१४ पहा ). १३. व्हावा रण=युद्ध झालेंच असतें. १४. सूर्यानें युद्धाचा प्रसंग येऊं दिला नाहीं, म्हणून त्याला 'साधु' म्हणणें योग्यच आहे. १५. क्रोधानें युक्त झाले आहेत नेत्र ज्यांचे, त्यांना. १६. जगाचें बंधुत्व. सूर्याला 'लोकबंधु' 'लोकबांधव' अशी संज्ञा आहे. १७. पश्चिमदिशारूप स्त्रीला. वारुणी=पश्चिम दिशा. १८. सूर्य. १९. कलह, भांडण. हा शब्द संस्कृतांत पुल्लिंगी आहे. २०. सुखरूप. २१. तें= त्या प्रसंगाचें वर्णन. २२. जाणिलें आहे सुताला ( कर्णाला ) जिनें त्या पृथेला. २३. साखरेला. २४. [ कोणाला होतें ? मुंग्यांना ? ] येथें मूळांतील १३७ वा अध्याय संपतो.

# अध्याय सत्ताविसावा.

द्रोण म्हणे शिष्यांसि, 'द्रविण[१] किती वाहती असु[२] ज्ञानी[३] ।
गुरु पूजूनि सुखविला सुज्ञांनीं, दुखविला अ-सुज्ञांनीं[४]. ॥ १
द्या दक्षिणा असी, कीं द्रुपदाचा सर्व गर्व खाणावा, ।
युद्धीं भग्न करावा, मग बांधुनि मत्समीप आणावा.' ॥ २
तें मान्य करुनि सर्व हि शिष्य, रथीं प्रथम बसवुनी[५] गुरुला[६], ।
चढले स्वरथीं, स्वर्गीं तर्पाया सद्यशोमृतें[७] कुरुला. ॥ ३
सानुज[८] सुयोधन पुढें धावे, त्या पांडवांसि सोडोनी, ।
व्हाया सकर्ण आपण धन्य द्रोणार्थ कीर्ति जोडोनी[९]. ॥ ४
शिरले द्रुपदपुरींत हि, गमलें[१०] जयमूळ[११] काळ तो साचें; ।
जिष्णुमतें[१२] गुरु राहे अंतर[१३] सोडूनि अर्धकोसाचें. ॥ ५
जिष्णु म्हणे, 'पावति गति[१४] इतर पशु न, त्या पिनाकिच्या[१५] पशुची[१६]. ।
गुरुजी ! पात्र शुचि यशा या शिष्याचा चि एक चाप[१७] शुची. ॥ ६
द्रुपद बळी, हे दुर्बळ, नाहीं येणार यांसि यश कांहीं. ।
श्येनें[१८] कसा जिंकावा ? पक्षित्वमदें[१९]-करूनि मशकांहीं[२०]. ॥ ७
होतील भग्न कौरव, मग आम्ही दाखवूं निजबळाला. ।

---

१. द्रव्य. २. प्राण. ३. किती ज्ञानी द्रविण वाहती, ( किती ) असु ( वाहती )–असा अन्वय. कित्येक शहाणे लोक गुरूला धन वाहून संतुष्ट करतात, व कित्येक प्राणही वाहून संतुष्ट करतात– असा भाव. ४. मूर्खांनीं. ५. 'बैसवुनि' असें पाठांतर. ६. द्रोणाला. ७. उत्कृष्ट यशोरूप उदकानें. अमृत=पाणी. ८. दुःशासन, विकर्ण, जलसंध, सुलोचन, युयुत्सु इत्यादि धाकट्या भावांसह. ९. द्रोणार्थ कीर्ति जोडोनि आपण सकर्ण धन्य व्हाया, सानुज सुयोधन पुढें धावे– असा अन्वय. १०. तो काळ ( समय, प्रसंग ) जयमूळ ( आपणास विजय मिळविण्यास कारणीभूत होणारा ) [ आहे, असें कौरवांस ] साचें ( खरोखर ) गमलें ( वाटलें )–असा अन्वय. ११. 'गमले' असा रा० पराडकर यांच्या प्रतींत पाठ आहे. तो काळासारखा द्रुपद राजा कौरवांस आपल्या जयाचें मूळ आहे, असें वाटलें, असा अर्थ घेतां येण्यासारखा आहे. १२. अर्जुनाच्या अभिप्रायानुरूप. १३. द्रुपदनगरापासून. १४. स्थिति, योग्यता. १५. महादेवाच्या. १६. अर्थात् नंदीची. १७. धनुष्य. १८. ससाणापक्षी. १९. ( श्येनपक्ष्याप्रमाणेंच आपणही ) पक्षीच आहों, अशा अभिमानानें. २०. चिलटांनीं, डांसांनीं. हें गीत्यर्ध सुभाषितरूप आहे.

आधीं प्रबळ-पर-करें[1] दुष्टांचा[2] पाहिजे मद गळाला.' ॥ ८
हा मंत्र[3] मना आला; मग पांचां पांडवांसह द्रोण ।
मागें राहे. **शिशुंचें[4] म्हणुनि न घे सूक्त[5] जाणता कोण ?** ॥ ९
निजदेहपरिष्वंगीं[6] मानावे अमृतगोळसे[7] तातें[8], ।
म्हणुनि द्रुपदपुरातें पीडिति ते, जेंवि टोळ सेतातें. ॥ १०
परि अरि सकळ पळविले द्रुपदें समरांगणांत भेटोनी, ।
जेंवि वृकव्याघ्रादि[9] श्वापद दहनें[10] वनांत पेटोनी. ॥ ११
अरिबलभयार्त[11] निर्भय केलें तें आपुलें पुर द्रुपदें. ।
अभय दिलें भीतांतें[12] द्रोणें दासांचिया सुरद्रु-पदें[13]. ॥ १२
धर्मासि गुरुसमीप स्थापुनि घेऊनियां तदाज्ञा ते[14], ।
गेले द्रुपदनृपावरि त्याच्या उतरावया मदा ज्ञाते. ॥ १३
रथचक्ररक्षणीं यम[15] योजुनि तत्काळ वैरितापार्थ[16], ।
झाला द्रुपदमदातें स्वशरशिखिमुखांत[17] वैरिता[18] पार्थ. ॥ १४
भीम गदेतें घेउनि धांवे हो ! एकशृंग-पर्वतसा[19], ।
गजमद जसा हरिपुढें[20], त्या हि पुढें शत्रुसैन्यवर्ग तसा. ॥ १५
भीमगदेतें[21] अरिबळ, जैसें मंडूककटक[22] उरगीतें[23], ।
भी, मग दे तें पाठि[24]; व्योम भरिति तैं प्रसन्न सुर गीतें[25]. ॥ १६

---

१. बलाढ्य शत्रूंच्या हातानें. २. दुर्योधनादि कौरवांचा व तत्पक्षीय लोकांचा. ३. मसलत. ४. लहान मुलाचें. कल्पनासादृश्य:—जनीं तरि असें असे, शिशुहि जे मुखें वर्णवी। पिता पिउनि ते भुले, मधुरता सुखें वर्णवी. ॥ (पंतकृत केकावलि, श्लोक २६). ५. सु+उक्त= सुभाषित. 'बालादपि सुभाषितं ग्राह्यम्' ह्या वचनाचाच अर्थ पंतांच्या ह्या गीत्यर्धांत आहे. ६. आपल्या देहाला आलिंगन देतांना. ७. जणूं काय अमृताचे गोळेच असे (अत्यंत प्रिय). ८. पित्यानें (धृतराष्ट्रानें). ९. लांडगे, वाघ वगैरे. १०. अग्नीनें. ११. शत्रूंच्या भयानें त्रस्त झालेलें. १२. दुर्योधनादिकांचा पराजय झालेला पाहून ज्यांची हिंमत खचली होती अशा स्वकीय लोकांना. १३. कल्पवृक्षरूप पद (पाय) ज्याचे, त्यानें. (हें द्रोणाचें विशेषण). १४. बाकीचे चार पांडव. १५. जुळे मुलगे (नकुळ व सहदेव.) १६. शत्रूंना ताप (पीडा) देण्यासाठीं. १७. आपल्या बाणरूप अग्नीच्या तोंडांत. १८. टाकणारा, ओतणारा. १९. ज्याला एकच शिखर आहे अशा पर्वतासारखा. २०. सिंहापुढें. २१. ह्या गीतींत पांच अक्षरी **आद्ययमक** आहे. २२. बेडकांचें सैन्य. २३. सर्पिणीला. २४. पाठि दे=पळे. २५. गायनानें. अर्थात् (पांडवांचीं स्तुतिस्तोत्रें) गाऊन.

पांचाळबळासि[1] न भी शिरतां[2] तो, जेंवि सागरा मकर. ।
वाटे द्विजापराधें[3] आलासे धरुनि राग रामकर[4]. ॥ १७
वेदांतीसा[5] अर्जुन, रिपुभट[6] गौतमनयज्ञसे[7], नाशा ।
तद्बळ[8] पावे, पूर्णा होय जयाची[9] न यज्ञसेनाशा[10]. ॥ १८
श्रीगुरुवराच्युतोद्धृतफाल्गुनगोवर्धनीं[11] द्रुपदेशक्र[12] ।
वृष्टी करि, परि झाले कौरवगोपाळरोम[13] हि न वक्र[14]. ॥ १९
खंडुनि शस्त्रास्त्रातें लीलेनें अर्जुनें अ-हीन[15]-कुळें ।
क्षीणमद[16] द्रुपद धराधव[17] धरिला, हो! जसा अही[18] नकुळें[19]. ॥ २०
अर्जुनगरुडें[20] गुरुवरकार्मुकपक्षोत्थशस्त्रवातबळें[21], ।
उडवुनि बळाब्धि[22], धरिला भग्नमद द्रुपददंदशूक[23] पळें[24]. ॥ २१
गिरिवरि हरिसा[25] चढला क्षिप्र रथीं पांडुपुत्र करवाळी[26], ।
द्रुपदासि धरी, जैसा दशवदना[27] तन्मदांतकर[28] वाळी. ॥ २२

---

१. द्रुपदसैन्याला. २. तो=भीम. ३. ब्राह्मणाचा अपराध ( द्रुपदानें ) केल्यामुळें. [ द्विज= ] द्रोण-**पंत.** ४. परशुरामाचा हात. ब्राह्मणपक्षपातित्वात्-**पंत.** परशुराम ब्राह्मणांचा मोठा अभिमानी असे, म्हणून त्याचा हात द्रोणाचार्यांच्या झालेल्या अपमानानें संतप्त होऊन द्रुपदावर हल्ला करण्यासाठीं धांवून आला कीं काय असें वाटलें—असा भावार्थ. **उत्प्रेक्षा**लंकार. ५. वेदांत जाणणाऱ्या पुरुषासारखा. सकळ संसार मिथ्या असून चित्स्वरूप जो परमेश्वर तोच सत्य, हें वेदांतरहस्य जाणणाऱ्या पुरुषासारखा. ६. शत्रुपक्षीय वीर. ७. गौतममुनिविरचित न्यायशास्त्र-पारंगत पुरुषांसारखे. वेदांताचे कोटिक्रम न्यायाच्या कोटिक्रमापेक्षां प्रबलतर आणि सुयुक्तिसाधित असल्यामुळें, वेदांतज्ञापुढें न्यायशास्त्रज्ञ जसा टिकाव धरूं शकत नाहीं, त्याप्रमाणें अर्जुनापुढें द्रुपदवीरसमूह टिकाव धरूं शकला नाहीं—हा भावार्थ. ८. त्या द्रुपदाचें सैन्य. ९. विजयाची. १०. द्रुपदाची आशा. यज्ञसेन, पार्षत आणि पांचाल अशीं द्रुपदाचीं अन्य नांवें होतीं. ११. श्रीगुरुवर्य अच्युतानें ( कृष्णानें ) उचललेल्या फाल्गुन ( अर्जुन ) रूप गोवर्धन नामक पर्वतावर. १२. द्रुपद हाच इंद्र. १३. कुरुवंशोत्पन्न पांडवरूप गोपालांचे ( गवळ्यांचे ) केश देखील. इंद्रानें गोकुळ बुडविण्याच्या हेतूनें अतिवृष्टि केली, तेव्हां कृष्णानें गोवर्धन पर्वताच्या आश्रयानें गोकुलस्थ जनांचें संरक्षण केलें, या कथेस अनुलक्षून ही गीति आहे. १४. बांकडा. **परंपरितरूपक.** १५. सत्कुलोत्पन्नानें. १६. हतगर्व. १७. पृथ्वीपति. १८. सर्प. १९. मुंगुसानें. २०. अर्जुनरूप गरुडानें. २१. अत्यंत श्रेष्ठ अशा धनुष्यरूपी पंखापासून उत्पन्न झालेल्या शस्त्र ( बाण ) रूपी वायूचे बळानें. २२. [ शत्रूची ] सेना हाच सागर. **परंपरित-रूपक.** २३. द्रुपदरूप सर्प. २४. पळांत, थोड्या वेळांत. २५. सिंहाप्रमाणें. २६. खड्गधर. करवाल=खड्ग, तरवार. २७. रावणाला. २८. त्याचा ( रावणाचा ) गर्व हरण करणारा.

मग तो भीमासि म्हणे अर्जुन देउनि दुरूनि हाकेला, ।
'न वधावें कटक वृथा, परतावें, भूप भग्न[1] हा केला'. ॥ २३
तें राजरत्न[2] दुर्लभ, परि न करुनि फारसा उपायें[3], नतें ।
पार्थें[4] आणुनि गुरुच्या चरणयुगीं अर्पिलें उपायन[5] तें. ॥ २४
द्रोण म्हणे द्रुपदातें[6], 'तूं माझा, मी तुझा, सखा पहिला. ।
आतां[7] तरी म्हणों ? कीं आक्रमिलें[8] एतदर्थ[9] या महिला[10]. ॥ २५
द्रुपदा ! तुज अभय दिलें, यावरि पावो तुझी न तनु[11] कंपा, ।
आम्ही[12] ब्राह्मण[13] ते, ज्यां न विसंबे[14] क्षांति[15] शांति[16] अनुकंपा[17]. ॥ २६
गुरुकुळवासी[18] होतें, परि सख्य क्षीण जाहलें मग तें. ।
म्हणुनि अ-सुख अनुभविलें बहु म्यां भवदीयदर्शनोपगतें[19]. ॥ २७
'भूप सखा भूपाचा, कवि कविचा, धनिक तो चि धनिकाचा,' ।
ऐसें वंदलासि[20], तुझ्या गमला हा द्रोण विप्र मनिं काचा[21]; ॥ २८

---

२९. वाली हा किष्किंधेचा राजा. हा मोठा पराक्रमी होता. एकदां रावणास आपल्या सामर्थ्याविषयीं मोठा अभिमान वाटून तो त्याच्याशीं युद्ध करावयास आला. पण त्यानें रावणास सहज बगलेंत धरिलें व नित्य नियमाप्रमाणें निरनिराळ्या समुद्रांचीं स्नानें करून तो परत आला. तेव्हां रावणानें त्यास सांगितलें, कीं तूं मोठा बलाढ्य असल्यामुळें मी तुझ्याशीं सख्य करावयास आलों होतों. त्यानें तें रावणाचें म्हणणें मान्य करून त्यास आपल्या घरीं एक महिना राहवून घेतलें व नंतर त्यास परत जाण्यास निरोप दिला—अशी कथा आहे. (वाल्मीकिरामायण, उत्तरकांड, सर्ग ३४ पहा).

१. पराभूत. २. राजश्रेष्ठ द्रुपदराजा. ३. युक्ति, खटपट. ४. नम्र अशा अर्जुनानें. ५. नजराणा. ६. हें भाषण औपरोधिक आहे. ७. 'मी तुझा सखा व तूं माझा सखा' असें आतां तरी म्हणूं ना?—असा भाव. ८. पादाक्रांत केलें. ९. या कारणास्तव (मित्रत्वास्तव). १०. पृथ्वीला. ११. शरीर. 'वीरा! प्राणांच्या भयानें घावरूं नको' असें द्रोणाचार्य म्हणाले. (मूळ अध्याय १३८।६६). १२. 'आम्ही ब्राह्मणतेजा' असें पाठान्तर. १३. ब्राह्मण आणि क्षत्रिय यांच्या आंगच्या गुणांसंबंधीं पूर्ण कल्पना वसिष्ठ व विश्वामित्र यांच्या आख्यानावरून सहज येण्यासारखी आहे (पुढें अध्याय ३४ पहा). १४. सोडी. १५. क्षमा. १६. मनाची स्वस्थता, समाधान. पंतांनीं ब्राह्मणाची व्याख्या अशी केली आहे:—तोचि ब्राह्मण जेथें क्षांति, दया, ज्ञान, सत्य, तप, शील. । (वनपर्व—अध्याय ६।२६). मूळांत नुसतें 'क्षमिणो ब्राह्मणा वयम्' असें आहे. (अध्याय १३८।६६). १७. दया. १८. गुरूच्या (भारद्वाज मुनीच्या) घरीं राहात असतां. 'गुरुकुळवासी होतों' असें पाठान्तर. १९. तुझ्या दर्शनार्थ आलेला जो मी, त्यानें. २०. मागें अध्याय २४ गीति २-५ पहा. २१. कच्चा.

उत्तरपांचाळपती मी निजतेजें[1], न तोंड वासूनी[2], ।
दक्षिणपांचाळपती तूं ही, होसील आजिपासूनी. ॥ २९
पांचाळराज तूं ही, मी ही; सख्यासि योग्य समशील[3] ।
आहें कीं नाहीं ? गा ! वद, वदतां मज उदार[4] गमशील. ॥ ३०
सख्यांचा[5] लोभी मी परि राजपणाविणें घडेना तें[6] ।
म्हणउनि राजा झालों, कीं न उपायांतरें[7] घडे नातें.' ॥ ३१
द्रुपद म्हणे, 'ब्रह्मर्षे ! तुमच्या जोडा नसे चि अनुभावा[8]. ।
अ[9]-तनु मदपराध तदपि पूर्वस्नेह स्मरोनि तनु[10] भावा[11].' ॥ ३२
देउनि राज्यार्ध नृप द्रोणें सत्कार करुनि बोळविला[12]. ।
अहि[13] सोडिला जसा पय[14] पाजुनि, मनिं[15], मणि[16] हरूनि, पोळविला[17]. ॥ ३३
राज्यार्ध[18], समग्र यश द्रोणें हरिलें म्हणूनि तो मानी[19] ।
पावे ताप, असा जो लेश हि न निवेल लक्षसोमांनीं[20]. ॥ ३४
आपण घेंट[21], परि पुत्राकरवीं द्रोणाब्धि आटवायाला ।
शोधी वरदा[22] ऋषिला, स्वयश जगीं अतुळ[23] वांटवायाला[24]. ॥ ३५

## अध्याय अट्ठाविसावा.

सद्गुणसिंधु युधिष्ठिर धृतराष्ट्रें यौवराज्यभोक्[25] केला; ।
वरिला श्रीनें[26] देउनि घेउनि हि गळां पडोनि भोंकेला[27]. ॥ १

१. आपल्या पराक्रमानें. २. कोणापुढें तोंड न वेंगाडतां, याचना न करितां. ३. समान स्वभावाचा, सारख्या योग्यतेचा. 'समानशीले व्यसनेषु सख्यं' हें वचन प्रसिद्धच आहे. ४. प्रामाणिक, मोठ्या मनाचा. ५. 'सख्याला लोभी' असें पाठान्तर. ६. सख्य. ७. दुसऱ्या कोणत्या उपायानें. ८. प्रभावाला, सामर्थ्याला. ९. मोठा. १०. अल्प. ११. माना, गणा. १२. निरोप दिला, जाण्यास परवानगी दिली. १३. सर्प, साप. 'पयःपानं भुजंगानां केवलं विषवर्धनं' हें सुभाषित प्रसिद्धच आहे. १४. दुग्ध. १५. मनांत. १६. कित्येक प्राण्यांच्या मस्तकामध्यें मणि किंवा मुक्ताफळें असतात, अशी समजूत आहे. १७. संतप्त केला, चरफडावयास लाविला. १८. अर्धे राज्य व संपूर्ण यश. १९. अभिमानी. तो मानी असा ताप पावे, [कीं] जो लक्षसोमांनीं लेश हि न निवेल–असा अन्वय. २०. लक्षावधि चंद्रांनीं. २१. घडा, मडकें. (अत्यंत क्षुद्र–असा भाव). २२. वर देणाऱ्या. (पुढें अध्याय ३२ पद्य). २३. निरुपम. २४. लोकांना वाटावें म्हणून. 'वाढवायाला' असें पाठान्तर. येथें मूळांतील १३८ वा अध्याय

जे **पांडुला** न वठले[1] ते केले करद[2] **जिष्णुनें** स्वारी[3]. ।
**भीमानें** ही केली तसि जसि विजयार्थ **विष्णुनें**[4] स्वारी[5]. ॥ २
म्हणती **गजपुरवासी**, 'यांच्या लुटिला धनेश[6] कटकांहीं[7]. ।
आले नव्हते चि असे मागें भरिले[8] धनें शकट[9] कांहीं.' ॥ ३
वृद्धीस **पांडुसंतति** बहु पावे, जेंवि वन्हिची कणिका[10]. ।
स्वसुतहितोपाय[11] पुसे अंध नृपति नयविशारदा[12] कणिका[13]. ॥ ४
धृतराष्ट्रासि रुचेसी सांगे अत्युग्र[14] नीति तो **कणिक**. ।
वणिकें[15] ग्राहकहस्तीं[16] देतो विषसर्पिशर्कराकणिक[17]. ॥ ५
'राज्यार्थ शत्रुवध हा पुरुषार्थ' असें चि बोलिला[18] **कणिक**. ।
तत्कथित जंबुककथा[19] मात्र कथिन कौतुकें, न मी अणिक. ॥ ६
कोठें[20] व्याघ्र, वृकें[21], नकुळ[22], जंबुकें[23], मूषकें[24] सखे वनीं होते ।

---

संपतो. २५. युवराजपदाचा उपभोग घेणारा. राजा राज्यपदीं असतांना राज्यकारभार पाहणारा व त्या राजानंतर गादीवर बसणारा असा यथाविधि अधिकारी केलेला पुत्र इत्यादि पुरुष. २६. राज्यश्रीनें. [ युधिष्ठिराच्या ] गळां पडोनि [ व परस्परांनीं परस्परांचा त्याग न करण्याविषयीं ] भाकेला देउनि व घेउनि हि श्रीनें ( तो, युधिष्ठिर ) वरिला—असा अन्वय. ही पंक्ति **पंत**निर्मित आहे. २७. वचनाला.

१. वश झाले, वठणीस आले. हा शब्द **पंत**कृत सभापर्व, अध्याय ३।३५ मध्यें योजिलेला आहे. २. करभार देणारे. ३. स्व+अरी=आपले शत्रु. ४. अर्जुनानें. विष्णु=अर्जुन. अर्जुनाला निरनिराळीं दहा नांवें होतीं, तीं अशीं:—**अ**र्जुन **फा**ल्गुन आणि **जि**ष्णु । **कि**रीटी, पांचवें **श्वे**तवाहनु । **बी**भत्सु, **वि**जयी, आठवें **कृ**ष्णु । **स**व्यसाची, **ध**नंजय. ॥ ( मुक्तेश्वरकृत विराटपर्व, अध्याय ६।७५ ). ५. ह्या पांडवांच्या स्वाऱ्यांचें वर्णन मूळांतील १३९ व्या अध्यायाच्या २८ श्लोकांत केलेलें आहे. पण तें **पं**तांनीं तीन गीतींतच आटोपिलें आहे. ६. कुबेर. ७. सैन्यांनीं. ८. भरलेले, लादलेले. ९. गाडे. १०. ठिणगी, फुणगी, अति सूक्ष्म कण. ११. आपल्या पुत्रांच्या कल्याणाचा मार्ग. १२. राजनीतिशास्त्र जाणणाऱ्या. १३. एका ऋषीचें नांव. ऋषि—**पंत** १४. त्या द्विजश्रेष्ठानें राजनीतीचा शास्त्रार्थ दर्शविणारें तीक्ष्ण भाषण केलें—असें मूळांत आहे. ( अध्याय १४०।४ ). १५. वाणी. १६. गिऱ्हाइकाच्या हातांत. १७. विषयुक्त सर्पि ( तूप ), साखर व कणिक. १८. कणिकानें सुमारें २० श्लोकांत ( अध्याय १४० श्लोक ५-२४ ) सांगितलेल्या गोष्टींचा तपशील न देतां, त्यांचा केवळ मथितार्थ **पं**तांनीं ह्या गीतार्धांत दिला आहे. १९. कोल्ह्याची गोष्ट. अशा पशुपक्ष्यांच्या गोष्टी महाभारताच्या आदिपर्वाशिवाय उद्योगपर्वांत, कर्णपर्वांत आणि शांतिपर्वांत आहेत. २०. कोणेएके स्थळीं ( वनामध्यें ). २१. लांडगा. २२. मुंगूस. २३. कोल्हा. २४. उंदीर.

बहु जपले, परि एका मृगकुळपतिला[1] न पावले[2] हो ! ते. ॥ ७
जपति जसे पाडाया व्यसनीं[3] सुजनासि सर्वकाळ विटें[4], ।
ते हि तसे चि, परि करी विफळ चि तद्यत्न सर्व काळविट[5]. ॥ ८
चिंता करितां जंबुक त्यांस म्हणे, 'आचराल जरि सारे, ।
सांगेन सुयुक्ति, तुम्ही स्वेष्टफळप्रद[6] मदुक्ति परिसा रे ! ॥ ९
या आखुनें[7] करावा क्षतखुर[8] जेव्हां असेल तो[9] सुप्त[10], ।
व्याघ्रें मग मारावा मृगवर, परि[11] मंत्र[12] हा करा गुप्त.' ॥ १०
करितां तसें चि, कोल्हा त्यांसि म्हणे, 'स्नान करुनि या खाया, ।
तोंवरि सावध बसतों एथें मी या मृगास राखाया.' ॥ ११
तो[13] स्वार्थपंडितें[14] असें सांगे तें, जेंवि अंबु[15] कमळाला, ।
त्यांच्या मना रुचे, दे न दिसों कपटींद्र[16] जंबुक मळाला[17]. ॥ १२
न्हाउनि येउनि, पाहुनि दीनें[18], पुसे व्याघ्र, 'वद[19], नवा घाला ।
पडलासा कां दिससी ?' सांगे तो म्लानवदन[20] वाघाला. ॥ १३
फेरु[21] म्हणे, 'परिसावें वदला जें किमपि आखु खोटा तें,—।
'धिग् व्याघ्रातें ! माझ्या सामर्थ्यें भरिल[22] आजि पोटातें.' ॥ १४
व्याघ्र म्हणे, 'हें नलगे, घालिन मृगयूथपीं[23] नवा घाला, ।
देईल यें[24] भुजांचें बळ फळ याहूनि पीनें[25] वाघाला.' ॥ १५
गेला तो तेजस्वी अभिमानी व्याघ्र भक्ष्य सोडोनी. ।

---

१. हरिणांच्या कळपाच्या पुढाऱ्याला. २. मिळविते झाले नाहींत, धरण्यास असमर्थ होते. पावणें=स्वाधीन होणें. ह्या शब्दाचा प्रयोग पंतांनीं कर्णपर्व, अध्याय ३९।५६ मध्यें केला आहे. ३. संकटीं. ४. शठ, लुच्चे मनुष्य, जार. ५. मृगविशेष. ( हरिणांचा पुढारी ). ६. आपल्यास इष्ट फल देणारी. ७. उंदिरानें. ८. ज्याचे खूर कुरतडले आहेत असा. ९. काळविट. १०. निजलेला. ११. परंतु. १२. मसलत. १३. कोल्हा. १४. स्वार्थ साधण्यांत पटाईत असा. १५. पाणी. १६. कपटपटु, कपट्यांमध्यें श्रेष्ठ असा. १७. मळ=पाप, किल्मिष. १८. दुःखीकष्टी, केविलवाणा. १९. बोल, सांग. २०. ( चिंतेनें ) उतरलें आहे तोंड ज्याचें असा. २१. कोल्हा. २२. [ व्याघ्र ] माझ्या सामर्थ्यें आजि पोटातें भरिल—असा अन्वय. २३. मृगांच्या कळपाच्या नायकावर ( श्रेष्ठ मृगावर ). २४. या ( माझ्या ) भुजांचें बळ वाघाला ( मला ) याहूनि पीन फळ देईल—असा अन्वय. २५. पुष्ट.

तों आला आखु, तया फेरु म्हणे साधु[1]-भाव[2] जोडोनी[3]. ॥ १६
'वदला[4], 'व्याघ्रामिष[5] विष; तुज खाऊं दे,' असें चि मुंगस, 'खा' ।
ऐसें कसें म्हणों मी ? लघु परि तूं मेरुहूनि तुंग[6] सखा.' ॥ १७
हें ऐकतां चि वंचकवचन[7] शरण जाय[8] तो बिळाला हो ! ।
चित्तीं म्हणे, 'न मेलों, हा चि महालाभ मज मिळाला हो !' ॥ १८
वृक[9] ही आला त्याला फेरु म्हणे, 'मज मृगासि रक्षाया ।
ठेवुनि, गेला व्याघ्र; स्त्रीसह येणार सर्व भक्षाया. ॥ १९
वांच, मरसि कां लोभें ? मांसाशा[10] शीघ्र सांडें[11], गा ! जा गा ! ।
हें ऐकतां चि निसटे, झाला तत्काळ लांडगा जागा. ॥ २०
मग मुंगसास हि म्हणे, 'आखु, वृक, व्याघ्रराय ही नकुळा ! ।
म्यां जिंकोनि पळविले, तेथें[12] तुज काय लाभ हीनकुळा[13] ? ॥ २१
युद्धीं न भंगितां मज कोण मृगाला शिवे कवळें[14] खाया ? ।
मी श्वापदवर आहें, परि तुज नाहीं विवेकें[15] वळखाया.' ॥ २२
नकुळ म्हणे, 'आखु, वृक, व्याघ्र हि जिंकोनि पळविले जेणें ।
तेणेंसीं[16] न झगडणें, येणें चि भलें, न या मृतें[17] एणें[17].' ॥ २३
ऐसे मंत्रबळें[18] वृक-नकुळ-व्याघ्राखु मोहुनी चवघे ।
जंबुक निर्भयचित्तें मृगमांसाची वनीं सुखें चव घे. ॥ २४

---

१. सद्भाव, मैत्री. २. 'साध्य भाव' असें पाठांतर. साध्य भाव=साधावयाचा अर्थ. ३. साधून, संपादन करून. सद्भावाची संपादणी ( ढोंग ) करून–असा भाव. ४. अर्थः–कोल्हा म्हणाला, 'उंदरा ! मला मुंगुस असें म्हणाला कीं, व्याघ्रानें संपादन केलेलें मांस हें विषच ( विषासारखें आहे ) [ म्हणून तें मला नको ]; तूं [ मला ] उंदरालाच खाऊं दे. परंतु 'तूं उंदराला खा' असें मी कसें म्हणूं ? तूं लहान असलास तरी तूं माझा मित्र असल्यामुळें मला मेरुपर्वताहून देखील उंच ( श्रेष्ठ ) आहेस. ५. व्याघ्रामिष=व्याघ्रानें संपादन केलेलें मांस. येथें 'हरिणामिष' असा पाठ असता तर बरें झालें असतें. ६. उंच. ७. कोल्ह्याचें भाषण. वंचक ( लबाड ) जो कोल्हा, त्याचें भाषण. ८. तो बिळाला शरण जाय=त्यानें बिळाचा आश्रय केला, बिळांत शिरला. शरण म्हणजे आश्रय, रक्षणकर्ता–असा अर्थ आहे. ९. लांडगा. १०. मांसाचा लोभ. ११. सोडून दे. १२. 'येथें' असें पाठान्तर. १३. नीचकुलोत्पन्न असा जो तूं, त्या तुला. १४. ग्रास, घांस. १५. विचार. १६. त्याच्याशीं. १७. मेलेल्या हरिणाच्या योगानें. १८. मसलतीच्या जोरावर. कोल्ह्याच्या आंगीं असलेला धूर्तपणा प्रसिद्धच आहेः–नराणां नापितो धूर्तः पक्षिणां चैव वायसः । चतुष्पदां शृगालस्तु स्त्रीणां धूर्ता च मालिनी. ॥

ऐसें चि कृतप्रज्ञें[1] साधावें आत्मकार्य नैपुण्यें[2]. ।
अघशमनार्थ[3] करावीं, होईल स्वार्थसिद्धि तैं, पुण्यें[4].' ॥ २५
विस्तरभयास्तव[5] कणिकनीत्यंतर्गत[6] कथा चि असि कांहीं ।
लिहिली; ईच्या श्रवणीं आदर करिजेल साधु-रसिकांहीं. ॥ २६
पांडुसुतोच्छेदेच्छा[7] येतां बुद्धींत, नीति कणिकाची ।
भेटे, व्यभिचारेच्छा धरितां जसि कामिनीस गणिका[8] चि. ॥ २७
परि जाणे द्रोणविदुरभीष्मकृपव्याळसन्निधानातें[9], ।
बहु भी अंध खणाया त्या पांडुकुमारसन्निधानातें[10]. ॥ २८

---

## अध्याय एकोणतिसावा.

सद्गुण युधिष्ठिराचे सर्वत्र सदैव सर्व पौरें[11] वदे, ।
कीं, 'हा आम्हांसि तसा पूर्वीं कोणी न हर्ष पौरवें[12] दे. ॥ १
अरिगज विदारुनि रणीं बहु लाजविलें द्विपारिजातातें[13]. ।
अर्थिमनोरथ[14] पुरवुनि केलें गतगर्व[15] पारिजातातें[16]. ॥ २
भूरक्षणभर[17] जेणें भीष्माच्या उतरिला शिरावरिला, ।

---

१. शहाण्यानें, ज्ञानी पुरुषानें. २. कुशलतेनें, धोरणानें. ३. पापाचें निरसन व्हावें म्हणून. ४. पुण्यकर्में, सत्कार्यें. ५. ह्या जंबुककथेनंतर मूळ अध्याय १४० श्लोक ५०-९३ यांत कणिकानें सांगितलेली नीति **पं**तांनीं गाळिली आहे. वस्तुतः हा भाग कांहीं कमी महत्त्वाचा नाहीं. ६. कणिकाच्या नीतिशास्त्रांत समाविष्ट झालेली. ७. पांडवांच्या नाशाची इच्छा. ८. वेश्या. व्यभिचारेच्छा धरितां कामिनीस जसि गणिका भेटे–असा अन्वय. 'गणिकांची' असें पाठांतर. गणिकांची नीति–असा अर्थ. ९. द्रोणादिरूप सर्पांच्या सान्निध्याला. १०. पांडुपुत्ररूप उत्तम ठेव्याला. ज्या ठिकाणीं द्रव्याचा ठेवा पुरून ठेविलेला असतो त्या ठिकाणीं त्याच्या रक्षणाकरितां सर्प असतात–अशी समजूत आहे. त्या समजुतीस अनुसरून येथें पांडव हेच उत्तम ठेवा, आणि द्रोण, विदुर, भीष्म व कृपाचार्य हे त्या ठेव्याचें रक्षण करणारे सर्प–असा भावार्थ. ह्या गीतीच्या दोन्ही अर्धांत **रूपका**लंकार आहे. ११. पुरवासी जन, नागरिक. १२. पूरुकुलोत्पन्न. १३. सिंहाच्या समुदायातें ( द्विप+अरि+जात=हत्तीच्या शत्रूंचा समुदाय ). येथें रा० **प**राडकर यांनीं 'लाजविले द्विपारिज्या नातें' असा पाठ स्वीकारिला आहे व द्विपारिज्या=हत्तीच्या छाव्याला ( द्विप=हत्ती+अरि=शत्रु+ज ) आणि नातें=धर्में–अशा टीपा दिल्या आहेत. १४. याचकांची इच्छा. १५. गर्वहीन. १६. पारिजात नामक कल्पवृक्षाला. १७. पृथ्वीचें रक्षण करण्याचें ओझें.

लंघुनि[1] धृतराष्ट्रा जो राज्यश्रीनें स्वयें हिरा वरिला, ॥ ३
त्या पांडुचा युधिष्ठिर सुत कुरुपति योग्य[2] अर्क राज्यातें. ।
ज्या त्या न दुजा ग्रह[3], जें यश अमृतीं ये न शर्करराज्यातें[4]. ॥ ४
राज्याभिषेक आम्ही यासि करूं. सुख न या[5] सुखापरतें; ।
सुप्रभु[6] ताट सुधेचें, कुप्रभु वांतान्नपूर्ण[7] खापर तें.' ॥ ५
पौरस्तुतधर्मगुणश्रवणें[8] दुर्योधनादि खळ मळती[9]. ।
हरिगुण संद्गीत[10] जसे श्रवणीं शिरतां पिशाच तळमळती. ॥ ६
करिति कुमंत्र सुयोधन-दुःशासन-कर्ण-शकुनि हे चवघे, ।
साधुद्वेषें उग्र[11] व्यसनांत[11] बळें बुडावया अवघे. ॥ ७
दुर्योधन एकांतीं मग गांठी निजपित्यासि भोंदाया[12]. ।
सुतरूपी दुर्विधि[13] तो इच्छी व्यसनाननांत[14] कोंदाया. ॥ ८
ऐसें म्हणे पित्याला, 'परिसा विज्ञापना अहो ! तात ! ।
जे लोकशब्द[15] कर्णीं तप्तायःशंकुतुल्य[16] होतात. ॥ ९
धृतराष्ट्र अंध, राज्यानर्ह[17]; अनघ[18] पांडु आमचा भर्ता. ।
तैसा चि युधिष्ठिर ही, न[19] परं[19], घन चि चातकव्यथाहर्ता[20]. ॥ १०
लोकानुराग[21] ऐसा, त्वां हि दिलें यौवराज्य[22] अहितातें[23]. ।

---

१. टाकून, वगळून. २. कुरुपति पांडुचा सुत युधिष्ठिर त्या राज्यातें योग्य अर्क (सूर्य किंवा इंद्र अर्थात् स्वामी) [होय]-असा अन्वय. ३. ज्या त्या दुजा ग्रह न=ज्याचें त्याचें हेंच मत होतें, युधिष्ठिर हा चांगला राज्यकर्ता होता, ह्यासंबधीं कोणाचाही मतभेद नव्हता-असा भाव. ग्रह=अभिप्राय, मत. ४. शर्करायुक्त तुपाला, तूपसाखरेला. ५. 'ज्या सुखापरतें' असें पाठांतर. ६. हें गीत्यर्ध सुभाषितरूप आहे. ७. ओकलेल्या अन्नानें भरलेलें. ८. नागरिकांनीं वर्णिलेल्या धर्मराजाच्या सद्गुणांचें श्रवण केल्यामुळें. ९. मलिन झाले, निस्तेज झाले. १०. उत्तम रीतीनें गायिलेले. 'हरिगुण सद्गीत जसें' असें पाठान्तर. ११. भयंकर संकटांत. 'व्यसनं त्वशुभे सक्तौ' इति मेदिनी. १२. फसवाया. ह्या गीतीशीं पंतकृत सभापर्व, अध्याय ३ गीति २५ व अध्याय ६ गीति ६७ ह्या ताडून पाहाण्यासारख्या आहेत. १३. दुर्दैव. १४. व्यसनाच्या मुखांत. १५. लोकांच्या तोंडचे धर्मस्तुतिपर उद्गार. १६. तापलेल्या लोखंडाच्या खिळ्यासारखे. १७. राज्य+अनर्ह=राज्यास अयोग्य. १८. निर्दोष, निष्पाप. १९. न पर=तो परका नाहीं. २०. चातकाची व्यथा हरणारा एका मेघाशिवाय अन्य कोणी नाहीं. त्याप्रमाणेंच आमचीं दुःखें हरण करणारा युधिष्ठिरावांचून दुसरा कोणी नाहीं-असा भाव. येथें 'गमे, वाटे, जणूं काय किंवा असलाच दुसरा उत्प्रेक्षेचा वाचक शब्द नसल्यामुळें ही **प्रतीयमानोत्प्रेक्षा** होय. २१. लोकप्रीति. २२. युवराजाचा अधिकार. २३. शत्रूतें.

निजसुतशत हि बुडविले पोसूनि गृहांत पांच अहि[1] तातें. ॥ ११
'कुरुपति' असें जनें, तूं असतां, राष्ट्रांत **पांडवां** गावें, ।
आम्हीं सेवकभावें धरुनि करीं चाप[2]-कांड[3] वागावें. ॥ १२
पर[4]पिंडभक्षणास्तव निजराज्य[5]पदच्युतिस्तव ज्ञाती[6], ।
लवतील[7] न प्रजा ही, **नरकगति बरी, नव्हे** अवज्ञा[8] **ती.** ॥ १३
दुर्गति[9]महापिशाची निज[10]संतानासि झडपणी[11] न करी, ।
ऐसा मंत्र[12] जपावा, यूथ[13] उपेक्षील धडपणीं न करी[14]. ॥ १४
'कैसें करूं?' असा तूं आधि[15] नरेंद्रा! धरूं नको लेश. ।
क्षम[16] अससी ताराया संततिस, क्षितिस जेंवि **कोलेश**[17]. ॥ १५
हे[18] वारणावता[19]प्रति दवडावे युक्तिनें चि देवा! तें ।
काम तुझें; नयनीं कण, कुशळ मुखाच्या, उरों न दे, वांतें[20]. ॥ १६
युक्तिलहरी[21]शतें त्वां उडवावीं तीं दयानदा! यादें[22], ।
कां राज्य वृथा देसी? **कोणास हि यश दिलें न दायादें**[23]. ॥ १७
आम्ही स्वपदीं होऊं नीतिबळें[24] बद्धमूळ[25], मग राया! ।
करितील काय **पांडव**? आले हि जरी फिरोनि नगरा या.' ॥ १८

---

१. सर्प. २. धनुष्य. ३. बाण. ४. शत्रू जे पांडव, त्यांचें अन्न खातों म्हणून. ५. आपल्या राज्यपदावरून आपण पदच्युत झालों म्हणून. ६. गोत्रज, बांधव. ज्ञाती न लवतील व प्रजा ही न लवतील–असा अन्वय. ७. नम्र होतील. ८. अपमान. ९. दरिद्रता ही मोठी पिशाची. १०. आपल्या अपत्यास. ११. झपाटा, बाधा (पिशाचरूप). १२. सल्लामसलत, युक्ति, उपाय. दुर्योधन म्हणतो, 'आम्हाला दारिद्र्यांत दिवस कंठावे लागणार नाहींत, अशी कांहीं योजना करा.' १३. यूथ=सजातीयांचा समुदाय, कळप. हत्ती सुद्धां स्वजातीयांची उपेक्षा करीत नाहीं, तेव्हां तूं देखील आपल्या पुत्रांची उपेक्षा करूं नको–असा भाव. **काव्यलिंगा**लंकार. १४. हत्ती. १५. मनोव्यथा, चिंता. १६. समर्थ. १७. महावराह. १८. पांडव. १९. हें नगर कोठें होतें, हें निश्चित कळत नाहीं. पण हें गंगेच्या उत्तर तीरावर होतें, यांत संशय नाहीं. कारण दुर्योधनानें करविलेलें लाक्षागृह याच नगरींत होतें. त्या गृहांतून पांडव दग्ध न होतां पळाल्यावर त्यांना विदुराच्या एका माणसानें नावेंत घालून गंगा-पार केलें, असें वर्णन आहे (पुढें गीति ७६ पहा). २०. मुखाच्या वातें कुशळ (सर) नयनीं कण उरों न दे–असा अन्वय. २१. युक्तिरूप शेंकडों लाटांनीं. रूपकालंकार. २२. (पांडवरूपी) जलचरें. २३. दायाद=गोत्रज, बांधव, भाऊबंद. २४. राजनीतीच्या (अर्थात् कणिकनीतीच्या) जोरावर. २५. ज्यांचें मूळ जमिनींत (राज्य-भूमींत) पुष्कळ खोल गेलें आहे असे.

[1]प्रज्ञाचक्षु म्हणे, '[2]मज हें चि रुचे कर्म, परि महाखोटें. ।
भीष्मद्रोणविदुरकृपपौरांचें भय पुढें दिसे मोटें. ॥ १९
[3]नतं लोटितां पदें अपकीर्ति जगीं, [4]सह्य न [5]प्रभावज्ञा ।
लोकां हें, न घडे हि [6]ग्रहवृंदा [7]ग्रहपतिप्रभावज्ञा. ॥ २०
हरितील [8]अस्मदसुधन, धर्मप्रिय पौर [9]एकसरतील, ।
[10]पार्थाहिपुढें तुमचे निःशेष हि [11]यत्नभेक सरतील.' ॥ २१
दुर्योधन बोले, 'हें भय न धरीं [12]द्रौणि मजकडे आहे; ।
गुरु हि मिळेल मला चि. **प्रियपुत्रवियोग कोण हो! साहे?** ॥ २२
त्यजिजेल कृपाचार्यें निजसर्वस्व हि सुखें, परि न [13]भाचा; ।
भीष्म हि [14]मध्यस्थ सदा, [15]दंडक याचा जयापरि [16]नभाचा. ॥ २३
पांडव[17]विवासनातें जरि असति समर्थ [18]पौर [19]वाराया, ।
मी वश करीन दानें, मानें सर्वांसि पौरवा! राया! ॥ २४
आहेत [20]कोशें हातीं, लोकांचें रंजवीन मन दानें. ।
[21]विश्ववशीकरणाचा घ्यावा नलगे चि मंत्र [22]धनदानें. ॥ २५
हे आम्ही काय दिवे? तेजस्वी काय [23]हा रवि? [24]दुरापें, ।

---

१. धृतराष्ट्र. (प्रज्ञा म्हणजे बुद्धि हीच आहे चक्षु म्हणजे नेत्र ज्याचे असा). २. 'मज हें रुचलें' असें पाठान्तर. ३. ह्या गीतींत धृतराष्ट्राच्या मनांत उद्भवलेल्या साधकबाधक विचारांचें दिग्दर्शन केलेलें आहे. नम्र असलेल्यांना पायांनीं ढकलून दिलें असतां जगांत अपकीर्ति होईल. दुसरी गोष्ट खरा पराक्रमी कोण आहे, हें जाणणाऱ्या लोकांना हें सहन होणार नाहीं. शिवाय सूर्याच्या तेजाची अवज्ञा इतर ग्रहसमुदायाकडून होणारही नाहीं. त्याप्रमाणेंच पांडवांच्या पराक्रमापुढें इतरांचें कांहीं चालूं शकणार नाहीं. सारांश–पांडवांच्या बाबतींत आपण कांहीं भलतेंच करणें **इष्ट** नाहीं. ४. सहन करितां येईल असें. ५. पराक्रम जाणणाऱ्या लोकांस. ६. (सूर्यमालेंतील) ग्रहांच्या समुदायाकडून. ७. ग्रह+पति (सूर्य)+प्रभा+अवज्ञा=सूर्याच्या तेजाचा अपमान. ८. आमचे प्राण आणि धन; किंवा–प्राणरूपी धन. ९. एकवटतील. १०. पार्थरूप सर्पापुढें. (अहि=सर्प). **रूपका**लंकार. ११. प्रयत्नरूप बेडूक. १२. द्रोणाचार्यांचा पुत्र अश्वत्थामा. १३. भगिनीचा (कृपीचा) पुत्र, अश्वत्थामा. १४. निष्पक्षपाती, उभय पक्षांस सारखा. १५. रीति. १६. आकाशाचा. आकाश सर्वांस सदा समान असतें, आपपरभाव त्याच्या ठेकाणीं नसतो, त्याप्रमाणें. १७. पांडवांस देशांतून घालवून देणें या गोष्टीस. १८. पुरवासी लोक. १९. निवारण करण्यास. २०. भांडारें, खजिने. २१. जगाला वश करण्याचा. २२. कुबेरानें; किंवा धन देणाऱ्यानें, श्रीमंतानें. २३. विदुर. २४. दुष्प्राप्य (मिळण्यास

न दुर्जीं, परि या कार्यीं[1] नेईल न कीर्ति हार विदुरापें[2].' ॥ २६
ऐसें वदोनि, मोही त्यास प्रतिकूळ काळ सुतरूपें. ॥
हतभाग्य[3] अशुभचिंतन[4] कां न करी पारिजात-सु-तरू-पें[5] ? ॥ २७
आप्तजनमुखें[6] कळवी, 'पशुपतिची[7] वारणावतीं यात्रा, ।
कीं ती सेवावी च प्राज्ञें भवरोगहर[8] महामात्रा.' ॥ २८
विदुरास उमजलें, कीं बुडवाया कीर्ति सुतप[9] दादानें[10] ।
केला मंत्र, व्यसनीं पाडाया पांडुसुत पदादानें[11]. ॥ २९
धर्म म्हणे, 'राजा कां जा म्हणतो वारणावता ? रचितो ।
कांहीं घात सुयोधन मंदांधदिग्वारणावतार[12] चि तो !' ॥ ३०
पांडव हि म्हणति, 'पाहूं, वाहूं वंदूनि शंकरा बेलें[13]. ।
रांवति[14] सुर भजनीं[15], मग कोण न होउनि विशंक राबेल ?' ॥ ३१
तें आप्तमुखें कळतां, धृतराष्ट्र म्हणे तयांसि, 'बाळक हो ! ।
जा वारणावता, जरि जाणार तुम्ही गुरूक्तिपाळक[16] हो ! ॥ ३२
पशुपतिचा यात्रोत्सव आतृप्ति[17] पहा, रहा, वहा रत्नें ।

---

कठीण ) अशीं. [ विदुराला ] दुर्जीं [ कार्यें ] दुरापें ( दुःसाध्य ) न ( म्हणजे साध्य आहेत ). परि या ( पांडवांना बाहेर घालविण्याच्या बाबतींत आम्हांला विरोध करण्याच्या ) कार्यीं [ मात्र ] कीर्ति विदुरापें ( विदुराकडे ) हार ( माळा ) न नेईल ( कीर्ति विदुराला वरणार नाहीं, विदुर यशस्वी होणार नाहीं )–असा अर्थ.

१. 'कार्या' असें पाठान्तर. २. विदुरापाशीं. विदुर जरी गुप्तपणें शत्रूंना मिळून आहे, तरी तो द्रव्याविषयीं आमचा बांधलेला आहे. शिवाय तो एकटा पांडवांच्या बाजूनें आम्हांला पीडा देण्यास समर्थ नाहीं–असें मूळांत आहे. ( अध्याय १४२।२२ ). ३. दुर्दैवी. जो हतभागी आहे, तो कल्पवृक्षाखालीं बसून सुद्धां अशुभचिंतन ( अशुभ गोष्टी मनांत आणणें ) करीत नाहीं काय ? करितो–हें उत्तर. अशीच कौरवांची स्थिति होणार–हें पंतांनीं ध्वनित केलें आहे. 'वांछा तशीं फळें' हा व्यवहारांतील नियम प्रसिद्धच आहे. ४. अमंगल गोष्टींविषयीं विचार. ५. पारिजात-नामक उत्तम कल्पवृक्षापाशीं. ६. यथार्थभाषी लोकांकडून. ७. शंकराची. ( पशुपति=पशूंचा म्हणजे जीवांचा पति. ) ८. संसाररूप दुःख हरण करणारी. ९. उत्तम तपश्चर्या. १०. वडील भावानें ( धृतराष्ट्रानें ). ११. राज्यपदग्रहणानें. यौवराज्यपदाचा स्वीकार केल्यामुळें–असा भावार्थ. आदान=घेणें, मिळविणें, संपादन करणें. १२. मदोन्मत्त दिग्गजाचा अवतारच असा. १३. शंकराला बेलाचें पान फार प्रिय असतें, अशी समजूत आहे. १४. खपती, झटती. १५. ( शंकराच्या ) सेवेंत. १६. वडिलजनांची आज्ञा मान्य करणारे असे. १७. तृप्ति होईपर्यंत.

देवब्राह्मणचरणीं, धनवस्त्रान्नें जनासि द्या यत्नें[1]. ॥ ३३
तेथें कांहीं काळ, स्वर्गीं सुरसे, सुखें वसा, मग या; ।
पितरां[2] बहु सुख देत्ये केली[3] आज्ञा जसी, तसी न गया[4].' ॥ ३४
धर्म म्हणे, 'बहु बरवें, ताता ! हा तारक त्वदुपदेश[5]. ।
झाला गुरुवाक्यादृत[6] पूरु महात्मा स्वयें यदुपदेश[7]. ॥ ३५
पशुपतिपाद[8] पहाया पाहूं तें वारणावत, नरा[9] ! जे[10] ।
आपण होतात, करुनि संकटविनिवारणा वतन, राजे.' ॥ ३६
जाणार पांडुसुत तों खळ दुर्योधन पुरोचना[11] यवना ।
आधीं च पुढें धाडी, करावया प्राणनाशका भवना[12]. ॥ ३७
सानुज युधिष्ठिर निघे मग जाया वारणावता, राजा[13] ।
आलिंगूनि म्हणे त्या भूभारनिवारणावतारा[14] 'जा.' ॥ ३८
भीष्मादिगुरुजनातें नमुनि म्हणे, 'अढळ[15] आप्तता राहो, ।
व्हा विरहाब्धींत मला सेतु, तुम्ही सर्व आप्त तारा हो !' ॥ ३९
कुंतीसहित निघाले पांडव, तेव्हां तयांसि पाहोनी, ।
विप्रादि पुरस्थ म्हणति, 'आम्हां सुख काय येथें[16] राहोनी ? ॥ ४०

---

१. दक्षतेनें, काळजीपूर्वक. (कुपात्रीं दान न होईल, अशी काळजी घ्या–असा भाव). २. जसी केली (केलेली, मान्य केलेली) आज्ञा पितरां बहु सुख देत्ये, तसी गया [सुख] न [देते]–असा अन्वय. मुलांनीं पितरांच्या आज्ञेचें पालन केलें असतां त्यांस जितका आनंद होतो, तितका गयेस जाऊन तेथें केलेल्या पिंडदानादि क्रियेपासून होत नाहीं–असा भाव. हें गीत्यर्ध सुभाषितरूप आहे. ३. केलेली (मान्य केलेली). ४. प्रसिद्ध पुण्यक्षेत्र. (अर्थात् तेथें केलेली पिंडदानादि क्रिया). ५. तुझा उपदेश. ६. पित्याच्या वचनाविषयीं आदरयुक्त. आदृत= सादर, कृतादर. ७. यदूच्या पदाचा (राज्याचा) स्वामी. (अध्याय ११ गीति ६४–६६ पहा). ८. अन्वयः–नरा ! जे संकटनिवारणा वतन करुनि आपण राजे होतात, [ते] पशुपतिपाद पहाया तें वारणावत पाहूं. म्हणजे—हे अर्जुना ! श्रीपशुपतीच्या चरणांचें दर्शन घ्यावयास आपण वारणावतास जाऊं. त्या स्थळीं भक्तांच्या संकटांचें निवारण करण्याच्या पुण्यकार्याचें वतन देऊन श्रीपाद स्वतः आपण राजे (सार्वभौमसदृश) होतात. [ परंतु एकंदरींत ह्या गीतींतील कल्पना नीटशी लक्षांत येत नाहीं. [ पंतलिखित पोथीवरून पंतवंशज रा० पराडकर यांनीं छापिलेल्या प्रतींत ह्या गीतीचा पाठ असाच आहे ]. ९. हे अर्जुना ! १०. पशुपतीचे पाय. ११. दुर्योधनाचा मित्र. १२. भवन=गृह. १३. धृतराष्ट्र. १४. पृथ्वीच्या भाराच्या निवारणार्थ अवतार ज्याचा झाला आहे, त्याला (धर्मराजाला). १५. दृढ, स्थिर. १६. या लोकीं.

अंध परि धूर्त; लोकीं, नाहीं दुसरा असा धुतारा[1] या. ।
आम्हां[2] बुडवाया क्षम होय, नव्हे हा असाधु ताराया. ॥ ४१
आंत[3] हि अंध चि; गारा वेंचुनि, टाकील कां कवि[4] हिऱ्यातें ? ।
गंगा टाकुनि जाइल अज्ञ चि, जळ ज्यांत टांक[5], विहिऱ्यांतें[6]. ॥ ४२
देवा ! विश्वपते ! या पांडुनृपसुतांसि पाव, कपटानें ।
खळ चि बुडावे, व्हावे[7] भस्म चि, बांधोनि पावक[8] पटानें[9]. ॥ ४३
जरि केंडिलें[10] तरि हिरा, स्तविला चि शिरीं चढे न शिरगोळा[11]. ।
तो हारवील निजशिर, जो खळ करणार साधुशिर गोळा.' ॥ ४४
धर्म म्हणे, 'भवदाशीर्वाद[12] खरे स्वर्द्रुचे[13] सखे, दानें ।
देतील इच्छिलीं; कां करिजेल मनीं निवास[14] खेदानें ?' ॥ ४५
म्लेच्छांच्या भाषेनें[15] विदुर महात्मा हितोपदेश[16] तदा ।

---

१. ढोंगी, ठक, फसविणारा. या असा=ह्याच्यासारखा. २. पुरस्थ लोक म्हणतात:—आम्हां (आमच्यासारख्या सरळपणें वागणाऱ्या लोकांस ) बुडवाया [ हा ढोंगी धृतराष्ट्र ] क्षम ( समर्थ ) होय, [ परि ] हा ( धृतराष्ट्र ) असाधु ( दुष्ट लोक ) ताराया [ क्षम ] नव्हे—असा अन्वय. सज्जनाचें अहित कोणीही सहज करूं शकतो, परंतु दुष्टाचें रक्षण करणें तितकेंच कठीण असतें—ह्या गोष्टीचा अनुभव व्यवहारांत पदोपदीं येतो. ह्या गीत्यर्धाचा अन्वय पुढीलप्रमाणें करितां येईल:—हा असाधु ( हा दुष्ट धृतराष्ट्र ) आम्हां बुडवाया क्षम होय. [ पण तो आम्हां ] ताराया [ क्षम ] नव्हे. ३. ( धृतराष्ट्र ) आंत हि अंध चि [ आहे ]=विचारशून्य आहे. ४. कोणी शाहणा मनुष्य गारा ( गारगोट्या ) वेंचुनि ( गोळा करून ) हिऱ्यातें कां टाकील ?—टाकणार नाहीं, हें स्पष्टच आहे. पण धृतराष्ट्राची कृति ह्याच्या उलट ( पांडवांस टाकणें व कौरवांस जवळ करणें ह्या बाबतींत ) असल्यामुळें तो विचारशून्य होय—असा भावार्थ. पंतांनीं सभापर्व, अध्याय ६।८२ मध्यें धृतराष्ट्रासंबंधीं 'आंत हि जो अंध' ह्याच शब्दांची योजना केली आहे. ५. बिंदु. अर्थात् ज्यांत केवळ एक थेंबभर पाणी आहे, असा झरा. ६. झऱ्यातें. 'विहिरा' हा शब्द पंतांच्या काव्यांत अन्यत्र आलेला आहे. ( वनपर्व, अध्याय ४।२३७ व द्रोणपर्व, अध्याय ५।७६ ). ७. 'व्हावें भस्मचि' असें पाठांतर. ८. अग्नि, विस्तव. हीच कल्पना पंतकृत सभापर्व, अध्याय ४।५५ मध्यें आढळते. ९. वस्त्रानें. १०. तिरस्कारिला. ११. एक प्रकारचा दगड. १२. तुमचे आशीर्वाद. १३. स्वर्गसंबंधी वृक्षाचे ( कल्पवृक्षाचे ). १४. वसती. मनांत खेद निवास करणार नाहीं—हा इत्यर्थ. १५. विदुरानें धर्मास म्लेच्छभाषेनें हितोपदेश केला, तरी व्यासांनीं तो संस्कृत भाषेनेंच उपनिबद्ध केला आहे. महाभारतावर टीका करणारे नीलकंठ चतुर्धर यांनीं विदुरोक्तीचा म्लेच्छभाषानुरूप परिस्फोट केला आहे. १६. महाभारत, आदिपर्व, अध्याय १४५ श्लोक २०-२६ यांत हा हितोपदेश आहे.

धर्मासि करी, त्याच्या धृतिला मतिला हि ओप[1] दे शतदा. ॥ ४६
'कथिलें पुरोचनाला तुमचे अग्नींत कोय[2] होमाया[3]; ।
सावध व्हा. साधूंची स्वार्थपर[4]-खळासि काय हो माया ? ॥ ४७
गृह करविलें असे, तें दहनौषधमय[5], तयांत उतरा[6] हो ! ।
दावा विश्वास खळा, कोपविषाचा मनीं च उत[7] राहो. ॥ ४८
करिल सुरुंगपथ[8] तुम्हां जाया माझा सखा सुखनक[9] वनीं, ।
अवनीं[10] तुमच्या मज जें रसिकांच्या हि रसिका सुख न कवनीं. ॥४९
तेथुनि रात्रौ ठकवुनि[11] विश्वासें तो[11] चला, भय वनातें ।
जातां त्यजा; गृहा द्या अग्नि, घडो तो च लाभ यवनातें.' ॥ ५०
मृतिहर[12] मंत्र असा तो[13] सन्मतिचा साधु सोयरा शिकवी, ।
परते, परि पांडुतनयविरहौर्वा[14] होय तोयराशि[15] कवी[16]. ॥ ५१
कुंती पुत्रास म्हणे, 'वदला तुजसीं रहस्य[17] काय कवी ?' ।
धर्म तिला संक्षेपें विदुरोक्तांतील सार[18] आयकवी. ॥ ५२
मग वारणावतीं नृप घनसा[19], पुरजन हि होय चातकसा. ।
म्हणति भले[20], 'तरि[21] च नसे येथ, न लाजेल पारिजात कसा ?' ॥ ५३

---

१. तेज, उजळा, अर्थात् प्रोत्साहन. 'तोष' असें पाठांतर. २. देह. ३. जाळावया. ४. स्वार्थी अशा दुष्टांना. ५. ज्वालाग्राही पदार्थांनीं भरलेलें. ६. बिऱ्हाड करा, रहा. ७. कढ, उमाळा. तुम्हांला आलेला राग मनांतल्या मनांत दाबून ठेवा–असा भाव. ८. भुयार, बिलमार्ग. ९. उत्तम खणणारा. मूळांत 'कश्चित्खनकः कुशलो नरः' असें आहे ( अध्याय १४७।१ ). हें भुयार तयार करणाऱ्याचें नांव कदाचित् 'सुखनक' हेंच असेल. १०. तुमच्या अवनीं ( रक्षण करण्यांत ) मज जें सुख [ वाटे, तें ] रसिकांच्या रसिका हि कवनीं ( काव्यांत ) न [ वाटे ]–असा अन्वय. ११. तो ठकवुनि=त्याला ( पुरोचनाला ) ठकवून ( फसवून ). १२. मरणनिवारक, मरण चुकविणारा. १३. विदुर. १४. पांडवांचा वियोग हाच एक और्व ( वडवानळ ) होय. विरहवडवानल विदुरानें पोटांत दाबून ठेविला–असा भाव. १५. सागर. १६. ज्ञाता ( विदुर ). १७. गुप्त मंत्र, मसलत. १८. महत्वाचा भाग. 'विदुरोक्तांतिल रहस्य' असा अन्य पाठ. १९. मेघासारखा ( अर्थात् उदार ). २०. धर्मराजाचें औदार्य पाहून सभ्यलोक म्हणूं लागले कीं, ह्या मृत्युलोकांत पारिजात कां नाहीं ? तर धर्मराजाच्या औदार्यामुळें तो येथें नाहीं. कारण धर्मराजाच्या औदार्यामुळें त्याला लाज कशी बरें वाटणार नाहीं ? सारांश, धर्मराजाचें अतुल औदार्य पाहून कल्पतरूस लाज वाटली व तो स्वर्गांत पळाला. २१. 'वरिच नसे येथ' असाही पाठ आहे. त्याचा अर्थः—कल्पतरु वर ( स्वर्गांत नाहीं ) तर येथेंच आहे; अर्थात धर्मराज हाच जणूं काय कल्पतरु.

स्तविति नृपा पौर, जसे चातक सेवूनि तोय घनदास[1]. ।
स्थापी लाक्षासदनीं[2], दाउनि बहु भाव[3], तो यवन दास. ॥ ५४
जातां[4] चि धर्म त्या शतदुष्टांचें[5] कृत्य, मत हि अंधाचें, ।
भीमादिकांस कळवी करवुनियां ग्रहण भित्तिगंधाचें[6]. ॥ ५५
'सांडुनि हे कण[7], घेसी पदरीं तनुजा[8] तुषा अगा! राया[9]! ।
ते[10] उचित प्रासादा[11], पांडुतनय जातुषा[12] अगारा[13] या?' ॥ ५६
ऐसें पांडव म्हणती, धृतराष्ट्रा आठवूनि हळहळती. ।
चिंतामणि[14] हारवि जो तत्सुहृदांची[15] तसी च हळहळ ती. ॥ ५७
म्हणती, 'जाणविली या कर्में निज नरकनिष्ठता[16] तातें[17]; ।
साक्षात् 'धर्म' म्हणावें, न म्हणावें 'नर', कनिष्ठ ताताते[18].' ॥ ५८
करुनि दृढ मंत्र मन ही होते विश्वस्तसे[19] चि त्या भवनीं. ।
यवनीं दया चि दाविति, पाहति मृगयामिषें[20] चि मार्ग वनीं. ॥ ५९
भेटे विश्वासनिधी स्नेहार्थी विदुरसचिव[21] तो खनक. ।
धर्म म्हणे, 'संरक्षीं आम्हां तूं, रक्षितो जसा जनक.' ॥ ६०
विवर[22] जतुगृहांत[23] करी, कळवी, 'करितों पुरासि खंदकसें. ।
जाणेल विदुरमंत्रितें[24] तें तो सज्जनवधेच्छु[25] मंद कसें?' ॥ ६१
बिलमार्ग सिद्ध होतां धर्म म्हणे स्वानुजांसि, 'हा यवन[26], ।
सा[27] जीव अन्य घालुनि, करुनि स्वकरें प्रदीप्त हें भवन, ॥ ६२
रात्रौ पळों[28]; न कांहीं विप्राराधनमखा[29] विलंब[30] करा.' ।

---

१. उदक देणाऱ्या मेघास. २. लाख वगैरे ज्वालाग्राही पदार्थांनीं बनविलेल्या घरीं. ३. भक्ति. ४. त्या लाक्षागृहांत राहावयास जातांच. ५. दुर्योधनादिक शंभर दुष्ट भावांचें. ६. भिंतीच्या वासाचें. ७. ( आम्ही पांडवरूपी ) धान्याचे कण. ८. ( दुर्योधनादि ) पुत्ररूपी कोंड्याला. ९. हें पंतांचें आवडतें यमक आहे. ( पुढें अध्याय ३४।४ पहा ). १०. दुर्योधनादि कौरव. ११. राजवाड्याला. १२. जतु=लाख. जातुषा=लाखेपासून तयार केलेलें. १३. गृहाला. १४. चिंतित पदार्थ देणारा मणि. १५. त्याच्या मित्रांची. १६. नरकप्राप्तीविषयीं प्रेमातिशय. १७. धृतराष्ट्रानें. १८. विदुरातें. १९. ज्यानें विश्वास ठेविला आहे अशा मनुष्यासारखे. २०. पारध करण्याकरितां जाण्याचें निमित्त करून. २१. विदुराचा मंत्री ( मित्र ). २२. भुयार. २३. लाक्षागृहांत. २४. मसलत. २५. सज्जनांचा वध इच्छिणारा यवन. २६. हा यवन आणि याशिवाय आणखी

बक[1]राजसा जपे[2], परि ठकिला[3] खळ, काय हरि[4]पुढें बकेरा ? ॥ ६३
कुंतीचें[5] व्रत कांहीं, व्हावी तत्सांगता असें छद्म[6] ।
करुनि, ब्राह्मणभोजन केलें जें जाळणार तें सद्म[7]. ॥ ६४
पौरवधू आणविल्या, न्हाणविल्या, गौरवूनि लेवविल्या; ।
देवविल्या सदलंकृति[8], सूर्यास्तावधि[9] समस्त जेवविल्या. ॥ ६५
अन्नार्थी जे आले त्यांसि म्हणे धर्मराज, 'जेवा या.' ।
तों आली पंचसुता[10] एक निषादी[11] हि तेथ जेवाया. ॥ ६६
जेवुनि यथेष्ट पुत्रांसह मद्य हि सेविलें निषादीनें; ।
काळें आदर दावुनि देतां, प्यावें न कां विषा दीनें[12] ? ॥ ६७
मद्यें भुले निषादी, पडले तत्सुत हि पासले शवसे[13]. ।
कोणाच्या ही हृदयीं देहस्मृतिचा न वास लेश वसे. ॥ ६८
ज्यासि पृथा[14] भी, जैसी व्याघ्रांच्या[15] सावधान गाय वनीं, ।
त्या भवना जो राखे, ये नीज अघांचिया[16] नगीं[17] यवना. ॥ ६९
'विश्वासघात यवना न घडो. हो सुख, न आपदा सांस[18].' ।
ऐसें विचारितां[19], तें साधूंच्या काय पाप दासांस ? ॥ ७०
विवरीं शिरले, भवनद्वारीं लावोनि वीतिहोत्रा[20] ते. ।
पळतां वनांत तिमिरीं[21] बहु भीतांचे[22] हि भीति हो ! त्राते. ॥ ७१

---

सहा जीव ( माणसें ). २७. सहा. २८. पळून जाऊं या. 'रात्रौ पळोन जाऊं' असें पाठान्तर. २९. द्विजपूजनरूप यज्ञा. ३०. उशीर न करा.

१. ( ढोंगीपणांत ) श्रेष्ठ अशा बकासारखा. 'बकध्यान' ह्या प्रचारांतील शब्दावरून बकाच्या ढोंगीपणाची कल्पना होते. २. टपत होता. ३. ठकवला गेला, फसला. ४. सिंहापुढें बकऱ्याची काय कथा ?–असा भाव. **काव्यार्थापत्ति** अलंकार. ५. ह्या गीत्यर्धांत **आद्यंतिक** यमक आहे. पहिल्या पादाचें पहिलें अर्ध व दुसऱ्या पादाचें शेवटचें अर्ध यांचें यमक साधलें असल्यास **आद्यंतिक** यमक होतें. ६. कपट. (मूळ अध्याय १४८।५ पहा). ७. घर. ८. उत्तम दागिने. ९. सूर्यास्त होईपर्यंत, संध्याकाळपर्यंत. १०. पांच आहेत पुत्र जिला अशी. ११. कोळीण. १२. गरीब मनुष्यानें. हें गीत्यर्ध सुभाषितरूप आहे. १३. प्रेतासारखे. १४. कुंती. १५. ज्यांत वाघ आहे अशा अरण्यांत. १६. पापाच्या. १७. पर्वता. १८. सहा जणांस. १९. असा विचार केल्यास, असा विचार मनांत आणिल्यास. २०. अग्नीतें. ( वीति म्हणजे पुरोडाशादि भक्ष्य ज्यांत हवन करतात तो, असा शब्दार्थ ). २१. काळोखांत. २२. भीतांचे त्राते हि बहु भीति–असा अन्वय.

वाहे पृथेसि पृष्ठीं, हस्तीं धरि भीम [1]अग्रजा, [2]अनुजा, ।
[3]यमळांसि कडेवरि घे, तो चि गमे म्हणति '[4]अंजनीजनु' ज्या. ॥ ७२
तेज न साहति त्याचें [5]गहनीं व्याघ्रादि [6]काननौके तें, ।
[7]दे लाज विमानातें, मग दे तो भीम कां न नौकेतें ? ॥ ७३
[8]सत्संगें लाजेला, भीमबळें तेंवि तूर्ण [9]अटवीला ।
तरले [10]मुमुक्षुसे ते, [11]तो खळ [12]षड्वर्गसा चि [13]फटवीला. ॥ ७४
[14]विदुराप्तपुरुष भेटे, दावी, सांगोनि नाम, [15]नौकेला. ।
[16]ते म्हणति, 'कळे [17]बाला, देवांच्या जेंवि कामना वेला.' ॥ ७५
[18]विदुरप्रेषिततरिनें तरले गंगेसि ते सुखें [19]क्षिप्रं. ।
[20]हरिदत्तविरक्तिबळें तरति महासिद्धिला जसे [21]विप्रं. ॥ ७६

---

१. धर्मा. २. अर्जुना. ३. जुळ्यांला ( नकुळसहदेवांस ). ४. मारुति. ( अंजनेपासून जनु म्हणजे जन्म ज्याचें तो ). ५. अरण्यांत. ६. ते वनचर. कानन=अरण्य; ओक=घर, म्हणजे अरण्य हेंच आहे घर ज्यांचें ते. ७. भीम विमानांतें लाज दे ( इतका तो चपलगतीनें चालत होता ) मग तो नौकेतें [ लाज ] कां न [ दे ]–असा अन्वय. **प्रश्ना**लंकार. ८. [ जसा एकादा सामान्य मनुष्य ] सत्संगें लाजेला [ तरतो ] ( सज्जनांच्या संगतीमुळें तो कोणाची भीड न बाळगतां त्याला जें कांहीं चांगलें आहे असें वाटतें तें तो करितो ) तेंवि ( त्याप्रमाणें ) ते ( धर्मराजादि ) मुमुक्षुसे भीमबळें अटवीला तूर्ण तरले ( अरण्यांतून त्वरित सुखरूप बाहेर पडले ). तो खळ ( दुष्ट यवन ), षड्वर्गसा ( निषादी व तिचे पांच पुत्र यांप्रमाणें ) फटवीला ( फसविला )–असा अन्वय. ९. अरण्याला. १०. मोक्षेच्छु असे. ११. यवन. १२. सहा जण. १३. फसविला. १४. विदुरानें पाठविलेला विश्वासु मनुष्य. १५. नौकेला. १६. ( ते पांडव ) म्हणति;—जेंवि देवांच्या वेला ( कल्पलतेला ) [ याचकांच्या ] कामना ( इच्छा ) [ कळती, तेंवि ] बाला ( विदुराला ) कळे ( सर्व कांहीं कळतें )–असा अन्वय. किंवा 'देवांच्या जेंवि का मना' असा पाठ स्वीकारल्यास पुढें दर्शविल्याप्रमाणें अर्थ होईल:–ते म्हणती:–जेंवि का वेला ( वेळ, प्रसंग ) देवांच्या मना कळे, तेंवि बाला [ वेला ] कळे. संकटाची वेळ कोणती हें ईश्वराला अचूक कळतें व तो भक्ताच्या संरक्षणासाठीं तत्काळ धांवून येतो. त्याप्रमाणेंच आमची अडचणीची वेळ कोणती हें विदुराला कळून येतें, व त्या संकटाचें निवारण करण्याची योजनाही तो करून ठेवितो. अरण्याच्या बाहेर पडतांच तेथें विश्वासू मनुष्य भेटला, व त्यानें नौका देखील तयार ठेविली होती, ह्या गोष्टीमुळें पांडवांच्या तोंडून असे उद्गार निघणें साहजिकच आहे. १७. बापाला. बा=बाप. १८. विदुरानें पाठविलेल्या नौकेनें. तरि=तरी, नौका. १९. सत्वर. २०. ईश्वरदत्त वैराग्याचे सामर्थ्यानें. २१. ब्राह्मण ( सत्पुरुष ). 'क्षिप्र' असें पाठान्तर. येथें मूळांतील १४९ वा अध्याय संपतो.

# अध्याय तिसावा.

गृह जळतां पौर म्हणति, 'हा[1]!' कळलें त्यांसि कर्म फटकळ[2] तें. ।
गुप्त करो, सदसत्कृत[3], तत्काळ दहा जणांत अटकळतें[4]. ॥ १
अग्नि विझवितां, करितां शोध, पुरजनीं[5] शिरोनि खनकानें, ।
बिळ भस्में भरिलें, बुध भरि सूचकवदन[6], जेंवि कनकानें[7]. ॥ २
ते सा प्राणी पाहुनि पौर म्हणति, 'हाय ! काय हें कर्म ! ।
हा ! धृतराष्ट्रा ! पांडवघातीं त्वां कोण देखिला धर्म ? ॥ ३
यवना ! युक्त चि तुज हें, न विलंब फळासि साधुहानीच्या; ।
जा नरका; कां वधिले ? वदान्य[8] विश्वस्त[9] साधु हा ! नीचा !' ॥ ४
तें ऐकोनि ससुत धृतराष्ट्र रडे, म्हणुनि विदुर तो हि रडे[10], ।
कीं अंधें अमृतफळें टाकुनि पदरांत घेतले हिरडे ! ॥ ५
करवी क्रिया[11], नृप रडे, पुत्र हि दुर्योधनादि सोंगाळा[12] ।
विदुर-नयनें[13] म्हणति, जळ[14], द्या खळ दुर्योधना दिसों, गाळा. ॥ ६
दुःख तिहीं[15] अनुभविलें जें कोणीं ही कधीं हि न वनीं तें. ।
अतिसुकुमार शरीरें त्यांचीं जैसीं नवीन नवनीतें[16]. ॥ ७
दक्षिण[17]दिशेसि जातां रवि उगवे, मावळे, वनीं पळतां; ।
भय बहु कीं खळ[18] येइल दैवें जगला असेल जरि जळतां. ॥ ८

---

१. हाय. २. दुष्ट. ३. चांगलें अथवा वाईट कृत्य. ४. समजतें, कळतें. हें गीत्यर्ध सुभाषितरूप आहे. ५. नगरवासी लोकांत. ६. चहाडखोराचें तोंड. ७. सुवर्णानें. ८. दाते, दानशूर. ९. ज्यांनीं ( तुझ्यावर ) भरंवसा ठेविला होता, असे. १०. पांडव सुरक्षित आहेत, हें माहीत होतें. तथापि ती गोष्ट गुप्त ठेवावयाची होती, याकरितां विदुराला रडणें भागच होतें. ११. और्ध्वदेहिक क्रिया. १२. सोंगाळ=ढोंगी, सोंगाडा. १३. 'विदुर नये न म्हणति' असें पाठान्तर. १४. विदुरनयनें ( विदुराचे डोळे ) [ स्वतःशींच ] म्हणतातः—[ नयन हो ! ] जळ गाळा ( अश्रु ढाळा ). [ तें ] खळ दुर्योधना दिसों द्या. १५. पांडवांनीं. १६. लोणी. येथील अनेकवचनी प्रयोगाचें स्वारस्य काय तें समजत नाहीं. १७. [ ते पांडव ] दक्षिणदिशेसि जातां ( जावयास निघाले तेव्हां ) रवि उगवे ( नुकताच सूर्योदय झाला होता ) [ आणि ] वनीं पळतां ( पळत असतां ) [ तो ] मावळे—असा अन्वय. सारांश—सूर्योदयापासून तों सूर्यास्तापर्यन्त ते पळत होते. १८. दुष्ट यवन. येथें मूळांतील १५० वा अध्याय संपतो.

सायंन्हीं[1] माय म्हणे, 'तर्ग[2] न निघे, तोय पाज, सुत-राया ! ।
बा ! तूं चि सेतु आम्हां या तृड्व्यसनाब्धि[3]लागिं उतराया'. ॥ ९
धांवे तरु मोडित तो, सुटला गिरिवरुनि थोर पाथरसा[4], ।
श्रमतां त्या गुरुभक्ता दे विद्याज्ञानसें चि पाथ[5] रसा[6]. ॥ १०
पात्रं[7] नसे म्हणउनि घे, भिजउनि तो उत्तरीयवास[8], वन[9]. ।
वास[10] वनव्याघ्रा[11] दे भय त्याचा, तेंवि अरिस वासव[12] न. ॥ ११
धांवत ये, पाहे तों श्रमनिद्रा[13] लागली स्व मातेतें, ।
वातें दवार्चिसें[14] त्या दैन्यें[15] गहनांत[16] दुःख मानते[17] तें. ॥ १२
निजला सानुज धर्म हि कल्पुनि[18] सुखशयन भूमितळ मळला[19]. ।
तें पाहुनि शुष्कऱ्हद-मीनें[20] तसा भीम फार तळमळला. ॥ १३

---

१. संध्याकाळीं. २. टिकाव, दम, धीर. ३. तृषारूप संकटसमुद्राला. ४. फत्तराप्रमाणें, धोंड्यासारखा. ५. उदक. ६. पृथ्वी. ७. भांडें. ८. पांघरावयाचें वस्त्र. ९. जळ. १०. गंध. येथें **दामयमक** आहे. ११. अरण्यांतील वाघ वगैरे हिंस्र पशूंस. १२. इंद्र. १३. श्रमानें आलेली नीज. १४. दव+अर्चि+सें=वणव्याच्या ज्वाळेसारखें. १५. विपत्तीमुळें. कल्पनासादृश्यः—दावार्चिसें कराया भस्म पहातें तरूपमा मातें। (पंतकृत–सभापर्व, अध्याय ३।८). १६. अरण्यांत. १७. माजे. १८. मानून. १९. मळकट, मळलेला. मळला भूमितळ सुखशयन कल्पुनि सानुज ( आपल्या धाकट्या भावांसह ) धर्म हि निजला–असा अन्वय. २०. आटून गेलें आहे पाणी ज्यांतील अशा डोहांतील मासा. 'शुष्कऱ्हदीं मीन' असें पाठान्तर. आपली माता व बंधु यांची ही अशी दैन्यावस्था पाहून आडमुठ्या भीमास देखील गहिंवर आला. त्याच्या मनःस्थितीची कल्पना पुढील उताऱ्यावरून सहज येईल:–'आज मी मंदभाग्य नुसत्या जमिनीवर निजलेल्या बंधूंना पहात आहें. आतां मला याहून ज्यास्त दुःखकर तें काय दिसणार आहे बरें ! पूर्वीं वारणावतामध्यें उत्तम शय्यांवर सुद्धां ज्यांना झोंप येत नसे, ते आज या भूमीवर झोंपीं गेले आहेत ! शत्रूंचें मर्दन करणाऱ्या वसुदेवाची बहीण, सर्व उत्तम लक्षणांनीं पूज्य असलेली कुंतिराजाची कन्या, विचित्रवीर्य राजाची सून, महात्म्या पंडुराजाची भार्या आणि आमच्यासारख्यांची माता, कमलाच्या गाभ्याप्रमाणें कांति असलेली, मूल्यवान शय्येवर पहुडण्यास योग्य, अत्यन्त नाजूक अशी ही माता कुंती, तिला योग्य नसलेल्या भूमितलावर येथें आज निजली आहे. पहा ! यमधर्मापासून, इन्द्रापासून आणि वायूपासून जी या पुत्रांना प्रसवली, ती ही राजवाड्यांत झोंपणारी ( कुंती माता ) दमून गेल्यामुळें पृथ्वीवर शयन करीत आहे ! जो मी आज ह्या नरव्याघ्रांना भूमितलावर निजलेले पहात आहें, त्या मला याहून अधिक दुःखदायक काय पाहाणें शक्य आहे ! सदा धर्मानें वागणारा हा राजा, तीन्ही लोकांचें राज्य करण्यास पात्र असतां दमून गेल्यामुळें सामान्य माणसाप्रमाणें भूमीवर निजला आहे ! हा नीलमेघाप्रमाणें सांवळ्या वर्णाचा अर्जुन, मनुष्यांमध्यें ज्याच्या तोडीचा दुसरा कोणी शूर नाहीं, तो हा सामान्य माणसाप्रमाणें भूमीवर निजला आहे, याहून मोठें दुःख काय आहे !

चोळी खळान्तकर कर, करकर रद[3] खाय, 'हाय! हाय!' करी. ।
गुंते गुर्वाज्ञेनें; पंकीं पडला करील काय करी? ॥ १४
अश्रु पुसोनि म्हणे, 'रे! दुष्टा दुर्योधना! कुळकलंका! ।
पोषू भू तव संगें, दशवदनाच्या जसी पुंलक लंका. ॥ १५
तुमचा पिता चि, कुरुकुळविपिनाचा अग्नि, हो! त्रपा प्याला. ।
लोभ्याला तेजस्वी बंधु नको, अग्निहोत्र पाप्याला. ॥ १६
शोकीं, अयशीं, नरकीं केला कीं मग्न दुष्ट हो! तात. ।
अविचारितोक्त करितां बालिश हो! आर्य रुष्ट होतात. ॥ १७
गज ही साहूं न शकति ज्यांच्या स्वमदान्ततत्परा गंधा, ।
ते केले दुर्विधिहृतमति शशकांनीं हरी परागंधा. ॥ १८
कोका! ते तुज रुचले करिति महत्त्वास भस्म रासभ जे! ।
न गुणज्ञ तूं, धरि शिरीं विधु, न उमावल्लभ स्मरास भजे.' ॥ १९
ऐसें जों भीम वदे, चिंती कृष्णा भयापहा, जागे, ।

---

देवांमध्यें अश्विनीकुमारांप्रमाणें रूपसंपन्न असलेले हे दोघे (नकुळ-सहदेव) आज साधारण माणसाप्रमाणें उघड्या जमिनीवर निजले आहेत!' (मूळ अध्याय १५१ श्लोक २२-३१).

१. दुष्टांचा नाश करणारे. २. हात. हात चोळणें, दांत खाणें-हीं संतापातिरेकाचीं लक्षणें आहेत. ह्या गीत्यर्धांत सुरेख **स्वभावोक्ति** आहे. ३. दांत. ४. वडील भाऊ जो धर्म, त्याच्या आज्ञेमुळें. ५. चिखलांत पडलेला (फसलेला, रुतलेला). ६. हत्ती. हा चतुर्थचरण सुभाषितरूप आहे. ७. रोमांच. आगांवर रोमांच येणें=आंगावर कांटा उभा राहाणें-हें भीतीचें लक्षण आहे. (ह्या गीतीशीं पंतकृत सभापर्व-अध्याय ७ गीति २५ ताडून पाहाण्यासारखी आहे). ८. धृतराष्ट्र. ९. कुरुकुळरूप अरण्याचा. येथें रा. पराडकर यांच्या प्रतींत 'कुरुकुळविपिनाच्या' असा पाठ आहे. 'पुरुकुळ' असें पाठांतर. १०. नाशकर्ता-असा अर्थ. ११. लज्जा. 'लाज वाटून पिणें' असा भाषणसांप्रदाय आहे. त्याचा अर्थ 'निर्लज्ज होणें' असा होतो. १२. 'नको' ह्या पदाचा अन्वय देहलीदीपकन्यायानें 'पाप्याला' ह्या शब्दाशीं देखील लावावयाचा. १३. तुम्ही (दुर्योधनादिकांनीं) तात (धृतराष्ट्र) मग्न केला-असा भाव. १४. अविचारानें सांगितलेली गोष्ट. १५. मूर्ख हो! १६. क्रोधयुक्त. १७. आपल्या मदाचा नाश करण्याविषयीं तत्पर अशा गंधाला. १८. दुर्दैवानें हरण केली आहे बुद्धि ज्यांची असे. १९. सशांनीं. २०. सिंह. २१. परागंधा= परागंदा, विदेशवासी. २२. धृतराष्ट्रा! (हा पांडवांचा चुलता). जे महत्त्वास (मोठेपणास, लौकिकास) भस्म करिति, ते रासभ तुज रुचले (आवडले, मान्य झाले)-असा अन्वय. २३. गर्दभ. २४. चंद्र. २५. शंकर. २६. मदन. २७. श्रीकृष्णाला. २८. भयहारका. २९. जागृत राहे. येथें मूळांतील १५१ वा अध्याय संपतो.

भगिनीस हिडिंब म्हणे, 'ते कोण मनुष्यसे, पहा, जा गे !' ॥ २०
ती राक्षसी हिडिंबा धांवे कीं चरचरां नरां खावें. ।
रक्षील व्याघ्री क्षण, परि पळ हि जिणें[1] जिणें न राखावें. ॥ २१
भुलली वनीं हिडिंबा भीमाची पाहतां चि सुंदरता. ।
तत्काळ सुंदरी ती होय जसी दिव्येयोनि[2] सुंद-रता[3]. ॥ २२
भीमासि म्हणे, 'कां जी ! शिरलां या काननांत तापससे ? ।
येथें जन बहु पावति, मृगराजबिळांत[4] जेंवि, ताप, ससे. ॥ २३
माझा हिडिंब राक्षस सोदर[5], तुमचा करील वध; मातें ।
तेणें चि धाडिलें, परि तुज वश मी, त्या त्यजूनि अधमातें. ॥ २४
स्वीकार करीं साधो ! स्मर[6] बाधो न मज, मी हि टाळीन ।
मरणा[7], पळविन तुजला वरुनि, सतीव्रत[8] न तें विटाळीन. ॥ २५
हो मत्पति, ये स्कंधीं बैस, विमानीं अमर्त्यसा[9] धावें. ।
त्वां ही म्यां ही[10] रक्षुनि अन्योन्यांतें स्वकार्य साधावें.' ॥ २६
भीम म्हणे, 'निद्रित हे[11] माता भ्राते त्यजूं वनीं ? तुजला ।
जोडूं ? तोडूं प्रीति ? स्त्रीसंगसुखासि कोण गे ! सुजेला[12] ?' ॥ २७

---

१. जीवित. २. स्वर्गांत आहे जन्म जिचा अशी. ३. सुंदसंज्ञक दैत्याच्या ठायीं रममाण झालेली ( तिलोत्तमा ). सुंद आणि उपसुंद या दोघां सहोदर राक्षसांच्या मध्यें कलह उत्पन्न करून त्यांचा नाश करावा म्हणून इंद्रानें तिलोत्तमा नामक अप्सरा पाठविली. तिला पाहून उभय बंधूंचा कलह होऊन ते मरण पावले–अशी कथा आहे. ( पुढें अध्याय ३८ पहा ). ४. सिंहाच्या गुहेंत. येथें 'मृगराजगुहेंत' असा पाठ असता तर बरें झालें असतें. ५. सख्खा भाऊ. ६. काम. 'माझें मन आणि शरीर हीं कामपीडेनें व्यथित झालीं आहेत'–असें मूळांत आहे ( अध्याय १५२।२९ ). ७. 'मरण पळवीन' असें पाठान्तर. ८. पातिव्रत्य, पतिनिष्ठा. 'पतिस्नेहोऽतिबलवान्न तथा भ्रातृसौहृदम्' म्हणजे 'पतीविषयींची प्रीति अति बळकट असते, तशी भावाविषयींची प्रीति नसते'—असें मूळांत आहे. ( अध्याय १५२ श्लोक २० ). ९. देवाप्रमाणें. देव अमर असतात–अशी समजून आहे. १०. 'म्याही' व 'अन्योन्यातें' असे शब्द रा. पराडकरांच्या प्रतींत आहेत. पण त्यांच्यावरील अनुस्वार मुद्रणदोषामुळें गळाले असावे. ११. 'मग भीम म्हणे, 'निद्रित माता, भ्राते' असें पाठांतर. १२. उत्सुक झाला. मी तुझ्या सहवासाची इच्छा मुळीं करीत नाहीं–असा भाव. सुजणें=एकाद्या वस्तूविषयीं अत्यंत आसक्त होणें. कोणा मनुष्यासच एकादा पदार्थ खाण्याची प्रबळ इच्छा झाल्यास आणि त्याला तो पदार्थ न मिळाल्यास पोटाला बेंबीजवळ सूज येते, व तो पदार्थ मिळाला म्हणजे ती सूज उतरते, अशी समजूत आहे. यावरून

तों ती म्हणे, 'पळवित्यें, सर्वांस करा तुम्ही च परि जागे.' ।
भीम म्हणे, 'सुखसुप्तां उठवींना, करिल काय अरि? जा गे ! ॥ २८
साधावा स्वार्थ, असें भय दावुनियां भयातुरा मातें, ।
समरीं[1] देईल चि, दे जेंवि यशोलाभ यातु[2] रामातें.' ॥ २९
तो[3] अंधकार, मी रवि; तो रावण, मी हि पुष्कराक्ष[4]; ससा ।
तो[3], हरि[5] मी; तन्मुख मी करिन पळामाजि[6] शुष्क राक्षससा. ॥ ३०
हें उर, हे बाहु पहा, त्याचा आम्हांसि काय गे ! लेखा ? ।
जा, त्याला म्हण, 'त्यांचे[7] धाकें चि गळोनि कार्य गेले, खा[8].' ॥ ३१
होतां विलंब, राक्षस ये पाहे स्वस्वसाचरित्रास[10]. ।
कोपोनि म्हणे, 'दुष्टे ! तुज नाहीं मृत्युचा परित्रास[11] ? ॥ ३२
काळें मति तुज दिधली मर्त्यापसदास[12] अनुसरायाची, ।
वांचेल कसी ? या सांसकट[13] तुझी आजि तनु[14] सरायाची[15].' ॥ ३३
ऐसें वदोनि धांवे सर्वांचा ही करावया कवळ[16], ।
भीमें दटाविला तो करितां रदशब्द[17] निद्रितांजवळ. ॥ ३४
परि भगिनीस वधाया धांवे तो यातुधान[18] कोपानें, ।
भीम म्हणे, 'भू याच्या रक्तांच्या[19] आज तृप्त हो पानें[20].' ॥ ३५
पांडव रागें मागें त्या पापाच्या महानगा[21] ढकली. ।
द्वात्रिंशद्धस्तांवरि[22] करिति महागजसमान गाढ कली[23]. ॥ ३६

---

'सुजणें' शब्दानें अत्यंत आसक्ति, हांव, उत्कट इच्छा यांचा बोध होतो. 'सुजणें' ह्या शब्दाचा उपयोग याच अर्थी पंतांनीं अन्यत्र केला आहे. ( उद्योगपर्व, अध्याय ७।३७ व ६५; कर्णपर्व, अध्याय २१।३५ ).

१. युद्धांत. 'समयीं' असें पाठान्तर. २. राक्षस ( रावण ). ३. तो=शत्रु ( हिडिंबासुर ). ४. पुष्कर+अक्ष=कमलनयन ( राम ). ५. सिंह. ६. पाड, पर्वा. ७. वनांत आलेल्या माणसांचे ( पांडवांचे ). 'त्यांच्या' असें पाठांतर. ८. देह. ९. खाऊन टाक. येथें मूळांतील १५२ वा अध्याय संपतो. १०. आपल्या भगिनीची कृति. ११. भय, दरारा. १२. नराधमास. अपसद= अधम, नीच. १३. पांच पांडव व कुंती या सहा जणांबरोबर. सा=सहा ( संख्या ). १४. शरीर. १५. संपावयाची, नाश पावावयाचीच. आज मी तुला पांडवादिकांबरोबर ठार मारणार—असा भाव. १६. ग्रास, घांस. खावयास धांवे—असा अर्थ. १७. दांतांचा 'करकर' असा शब्द. १८. राक्षस. १९. 'रक्तांच्या' असें पाठान्तर. २०. प्राशनानें. २१. मोठ्या पर्वताला. २२. बत्तीस हातांवर.

त्यांच्या युद्धध्वनिनें जागी झाली पृथा सुतांसहित; ।
तों निकट[1] देखिली स्त्री, लावण्य जिचें जगीं तुळारहित[2]. ॥ ३७
कुंती तिला पुसे, 'तूं कोणाची सांग बाइको, पातें ।
न लवे चि तुज पहातां, पुसिल्याच्या[3] न धरिं बाइ! कोपातें. ॥ ३८
तूं काय अप्सरा? कीं वनदेवी? वद किमर्थ आलीस? ।
कां एकली? पतिकडे पाठविलें सुमुखि! काय आलीस[4]?' ॥ ३९
कुंतीस म्हणे ती, 'मी रात्रिचरी[5], या वनीं च मद्वसती[6], ।
येथें प्राणी कोणी अस्मत्त्रासेंकरूनियां[7] नसती. ॥ ४०
स्वाग्रजहिडिंबवचनें[8] आल्यें मारावया तुम्हांला, जों ।
भुलल्यें नवहेमाभा[9] एका मी, काय हो! तुम्हां लाजों? ॥ ४१
वरिला मनें तुझा सुत, न्यावा येथूनि शीघ्र पळवावा, ।
मद्भाव[10] असा, कीं हा स्वविचार तुम्हांस ही न कळवावा. ॥ ४२
तुमची संगति सोडुनि तो, वश झाला मला न, वीरमणी, ।
आश्चर्य थोर हें, कीं प्रार्थी परि नावडे नवी रमणी[11]! ॥ ४३
मज लागला परोपरि बहुत विनवितां तुझ्या सुता वेळ; ।
तों सासुबाइ! कोपी मद्भ्राता धावला उतावेळ. ॥ ४४
आधीं माझे घ्याया, मग तुमचे प्राण मूर्त[12] अंतकसा[13] ।
धांवे, परि मत्पति तव सुत असतां, तो करील अंत कसा? ॥ ४५
तुमची सुखनिद्रा क्षणमात्र हि मोडूं नये चि त्या अहितें[14], ।
या भावें मत्पति ने दूरें[15] तया, पक्षिपति[16] जसा अहितें[17]. ॥ ४६
न धरील काय जी! खगपति-नख-करवाळ[18] लाज, सापाला ।
संपदि[19] न वधितां? चुरिला असता खळ, वाळला जसा पाला. ॥ ४७

---

सुखानें निजलेल्या आपल्या मातेला व भावांना कटकट होऊं नये, म्हणून भीमानें त्याला दूर ओढीत नेलें–असा भाव. ( मूळ अध्याय १५३ । ४३ ). २३. कलह, युद्ध.

१. जवळ. २. अतुल, निरुपम. ३. चौकशी केल्याबद्दल. ४. सखीस. ५. राक्षसी. ६. माझी वसती. ७. आमच्या भीतीमुळें. त्रास=भीति. ८. माझा वडील बंधु जो हिडिंब, त्याच्या आज्ञेनें. ९. नूतन सुवर्णाप्रमाणें ज्याची कांति आहे, अशास ( भीमास ). १०. मत्+भाव=माझा हेतु. ११. सुंदर तरुण स्त्री. १२. मूर्तिमान. १३. यमासारखा. १४. शत्रूनें. १५. दूर=बत्तीस हातांवर ( गीति ३६ पहा ). १६. गरुड. १७. सर्पातें. १८. गरूडाचीं नखें हीच तलवार. १९. तत्क्षणीं.

ते दोघे झगंडति[1] परि मत्पति मारील राक्षसापसदा[2]. ।
गरुडापुढें तृणें[3] चि तो, इतरीं जरि असुहराक्ष[4] साप सदा.' ॥ ४८
ऐसें ऐकुन सायुध[5] चौघे ही बंधु धांवले सहसा[6]. ।
जिष्णु म्हणे, 'वद आर्या ! जरि अरि भासत असेल दुःसहसा, ॥४९
तरि आज्ञा दे वधितों, तुझिया चि दयेकरूनि यातूतें[7]. ।
श्रमलासि पथीं, व्हाया न श्रम बहु अस्मदाश्रया[8] तूतें.' ॥ ५०
भीम म्हणे, 'होतो सुर-सुदतीचा[9] शस्त्रमथित[10] नवरा, [11]कीं, ।
भुजयुद्धीं च मरो खळ, सोडावा त्वां स्वविशिख[12] न वराकीं[13]. ॥ ५१
मज[14] यातु[15] तसें चि, जसें अमृतीं विजयाश[16] तक्र, तुच्छा या ।
वधिन कुतुकें, करिल जरि यावरि आंगें[17] शतक्रतु[18] छाया[19].' ॥ ५२
ऐसें वदोनि भीम श्रितपीडांच्या निवारणारांनीं[20] ।
बाहूंनीं करि अरिला व्यसु[21], जैसा सिंह वारणा[22] रानीं. ॥ ५३
विजयी भीम म्हणे, 'या खळभगिनीचा हि वध करावा, हें ।
वृंदावन[23] भोग्य नव्हे, काय पहातोसि रे ! करा[24] ! वाहें[25].' ॥ ५४

---

१. 'झगटति' असें पाठांतर. २. राक्षसाधमाला. ३. गवत. गवताप्रमाणें तुच्छ–असा भाव. ४. असु+हर+अक्ष=प्राण हरण करणारे ज्याचे नेत्र तो, चक्षुर्विष. ५. आयुधांसह. ६. धडाक्यानें, अविचारानें. ७. राक्षसातें. ८. आमचा आधारच अशा. ९. देवांगनेचा. १०. शस्त्रानें मर्दिलेला. युद्धामध्यें शस्त्रानें ज्याला मरण येतें, त्याला स्वर्गांत अप्सरा वरितात–अशी समजूत आहे. भीम अर्जुनाला सांगतो, कीं तूं बाण सोडून ह्या नीच राक्षसाचा वध केलास, तर त्याला स्वर्गति प्राप्त होऊन त्याला अप्सरा वरितील. तेव्हां असें होऊं नये म्हणून मीच त्याला भुजयुद्धांत मारितों, म्हणजे त्याला स्वर्ग प्राप्त होणार नाहीं. ११. म्हणून, यासाठीं. १२. आपला बाण. १३. अतितुच्छ अशा त्या राक्षसावर. वराक=नीच, दुर्दैवी, शोचनीय. १४. 'भीमीं हें यातु, जसें' असें पाठांतर. १५. राक्षस. ('यातु' हा शब्द संस्कृतांत नपुंसकलिंगी आहे). १६. अमृतावर जय मिळविण्याची आशा बाळगणारें ताक. जसें अमृतीं विजयाश 'तक्र'–असा अन्वय. १७. स्वतः, जातीनें. १८. इंद्र. (इंद्रानें शत (शंभर) क्रतु (यज्ञ) केले, म्हणून त्याला 'शतक्रतु' असें नांव पडलें). १९. कृपेची छाया, आश्रय. २०. आश्रितांच्या दुःखांचें निवारण करणाऱ्या (बाहूंनीं). २१. वि+असु=असुरहित, गतप्राण. येथें मूळांतील १५४ वा अध्याय संपतो. २२. हत्तीला. २३. एका जातीचें कडू फळ. २४. हे हाता ! कल्पनासादृश्यः–रे ! हस्त दक्षिण मृतस्य शिशोर्द्विजस्य । जीवातवे विसृज शूद्रमुनौ कृपाणम् ॥ (उत्तररामचरित, अंक २।१०) ह्या श्लोकार्धाचें रूपांतरः–रे ! माझ्या उजव्या करा ! द्विजशिशू वांचावया सत्वरी ।

धर्म म्हणे, 'रे ! बापा ! रक्षीं बळिनायका ! यश; स्त्रीतें ।
न वधीं; जें कर्म नव्हे सन्मत, करितील काय शस्त्री तें ?' ॥ ५५
खेचरी म्हणे पृथेला, 'जाणसि दुःखासि तूं हि सासू ! या. ।
न करीं मदुपेक्षा सति ! मति कुळजांची नसे चि सासूया. ॥ ५६
आर्ये ! लोकद्वयहित, सुत चि नव्हे काय वद नवा सून ? ।
काय मरावें क्षुधितें, कल्पलतेजवळि वदन वासून ? ॥ ५७
जो निस्पृह संसारीं बहु विटला, तो यमी न संगें मनीं ।
जरि धरि, तरि तळमळतां, यत्न करिल तोय-मीन-संगमनीं. ॥ ५८
सरतां भेटेन पथीं, विषमीं पृष्ठीं तुम्हांसि वाहेन, ।
सेवा करितां तुमची, मी आत्मसुखाकडे न पाहेन.' ॥ ५९
धर्म म्हणे, 'दिधलें जें, मागसि वंदुनि पदासि खेचरि ! तें; ।
परि आमुचे करावे त्वां प्रमुदितमति सदा सखे चरितें. ॥ ६०
क्रीडार्थ दिसीं ने, परि सांजे या स्वप्रियावहा आण, ।

---

टाकीं खड्ग विशंक होउनिच त्या शूद्रा तपस्व्यावरी ॥ ( कै० परशरामपंत तात्या गोडबोले ). २५. वाहें=चालून जा. ह्या राक्षसीवर धांवून जा–असा भाव.

१. सज्जनांस मान्य. स्त्रीचा वध करणें अधर्म होय–अशी समजूत आहे. रामानें ताटिकेचा वध केला, ह्या गोष्टीस उद्देशून लवानें काढलेले उद्गार या गोष्टीची साक्ष पटवितातः—वृद्धास्ते न विचारणीयचरितास्तिष्ठन्तु किं वर्ण्यते । सुन्दस्त्रीदमनेऽप्यखण्डयशसो लोके महान्तो हि ते ! ॥ ( उत्तररामचरित, अंक ५।३५ ). ह्या श्लोकार्धाचें रूपान्तरः—वृद्धांचीं चरितें असोत कशिंही तेथेंच साधू रते । केला स्त्रीवध, जाहलें यश महा लोकीं, खरे थोर ते ! ॥ ( कै० परशुरामपंत तात्या गोडबोले ). २. शस्त्रधर वीर. ३. राक्षसी ( आकाशांत संचार करणारी ). ४. स्त्रियांना कामापासून जें दुःख होतें तें तूं जाणतेस–असा भाव ( अध्याय १५५।५ ). ५. स+असूया= असूयेनें युक्त, मत्सरानें युक्त. असूया=गुणांच्या ठायीं दोषांचा आरोप करणें. ६. आर्या=पूज्य स्त्री, सासू. हें गीतार्थ लक्षांत ठेवण्यासारखें आहे. सून म्हणजे दुसरा मुलगाच–ह्या अभिप्राया-प्रमाणें वागल्यास प्रपंचांतील किती तरी भानगडी नाहींशा होतील. ७. उभय लोकीं ( इहपर-लोकीं ) कल्याण करणारा. ८. सून ( हा ) लोकद्वयहित नवा सुत चि नव्हे काय ? वद–असा अन्वय. ९. तोंड वेंगाडून, याचना करून. १०. जितेंद्रिय. ११. आसक्ति, संबंध, मैत्री. १२. पाण्यावांचून तडफडत असतां. १३. पाणी आणि मीन ( मासा ) यांना एके ठिकाणीं आणण्याविषयीं. १४. संकटाच्या वेळीं. १५. सानंदमानस. त्वां आमुचे सखे ( बंधु ) सदा (स्व) चरितें प्रमुदितमति करावे–असा अन्वय. १६. दिवसास. १७. संध्याकाळीं. १८. तुझें प्रिय करणाऱ्याला ( भीमाला. ) १९. ( परत आमच्याकडे ) घेऊन ये.

रक्षीं सत्य निशाचरि ! 'घात करींना' असी वहा आण.[1] ॥ ६१
खचरी म्हणे, 'चुकेना गुरुभजनीं देह हा, निभावो[2] जी ! ।
वचनातिक्रम[3] करितां, क्षिप्र घडो देहहानि[4] भावोजी !' ॥ ६२
गुरुवचनें मारुति[5] जें एक चि सदपत्यरत्न[6] दे तीतें ।
तन्नाम[7] घटोत्कच[8], दे सुख पितरां, शत हि सुत न देती तें. ॥ ६३
कार्पटिकांचा[9] वेष[10] स्वीकारुनि पांडुपुत्र ते, ज्यातें[11] ।
मिरवावें चि, परि अरित्रासें आच्छादिति स्वतेजातें. ॥ ६४

---

## अध्याय एकतिसावा.

स्कंधीं पृथेसि वाहुनि, लंघुनि मत्स्यादि[12] देश दूरवर, ।
गेले तापसवेश[13] स्वीकारुनि पांडुपुत्र शूरवर. ॥ १
त्या व्यसनांत निववला दर्शन देऊनि तापहा[14] व्यासें, ।
जो चिंती साधुजनीं संपत्ति सदा रता पहाव्यासें[15] ॥ २
चिंतामणि अधना जें, धन्वंतरि जें गदाकुळा[16] देतो, ।
भेटोनि अकस्मात् सुख तें त्या कुरुच्या तदा कुळा दे तो[17]. ॥ ३

---

१. शपथ. २. हा देह गुरुभजनीं चुकेना (चुकणार नाहीं), [हा गुरुभजनीं] निभावो (टिकाव धरो, ह्या देहाचा निभाव लागो)—असा अन्वय. ३. प्रतिज्ञाभंग. ४. देहनाश, मरण. ५. भीम. (मारुताचा म्हणजे वायूचा पुत्र). ६. उत्तम अपत्य (पुत्र) रूप रत्न. ७. तत्+नाम= त्याचें नांव. येथें मूळांतील १५५ वा अध्याय संपतो. ह्या अध्यायांतील बराच भाग—विशेषतः हिडिंबीचें कुंतीशीं भाषण, तिची भीमाबरोबर क्रीडा, घटोत्कचवर्णन इत्यादि—पंतांनीं गाळिला आहे. ८. याचें मस्तक घटसदृश आणि उत्कच म्हणजे केशरहित होतें म्हणून याला 'घटोत्कच' असें नांव पडलें. (मूळ अध्याय १७५ श्लोक ३८ पहा). ९. तपस्व्यांचा, तीर्थवाशांचा, काषायवस्त्र धारण करून तीर्थाटन करणाऱ्यांचा. १०. पोशाख सोंग. ह्या शब्दाचीं 'वेश' आणि 'वेष' अशीं रूपें आहेत. ११. ज्या स्वतेजातें. ज्यातें स्वतेजातें मिरवावें चि परि अरित्रासें (शत्रूंच्या भयानें) ते पांडुपुत्र कार्पटिकांचा वेष स्वीकारुनि [तें तेज] आच्छादिति—असा अन्वय. १२. मत्स्य, त्रिगर्त, पांचाल व कीचक (?) हे देश (मूळ अध्याय १५६।२). १३. तपस्व्यांचा वेश. १४. दुःखहारक. १५. पहाव्या असें. जो सदा साधुजनीं संपत्ति सदा रता (अनुरक्त असलेली) पहाव्यासें चिंती [त्या] व्यासें—असा अन्वय. 'जो चिंती साधुजनीं संपत्ति सदा, न ताप, इच्यासें' असा पाठभेद. १६. रोगग्रस्ताला. १७. व्यास.

पौत्रांसि[1] म्हणे, 'मज हें[2] कळलें होतें, परंतु जळ-धीतें ।
मिळतां बळें नदीतें फिरविल कोणी बळी,[3] न खळ-धीतें.[4] ।। ४
हा ! बालद्रुम[5] हो ! कां खेद, तुम्हां ? मी सुधाढ्य[6] आवाल,[7] ।
पावाल वृद्धि पुष्कळ, दुष्टग्रीष्मासि[8] लाज लावाल. ।। ५
प्रार्थावें नलगे मज, जें तुमचें हित करीन आधीं तें. ।
भेटेन[9]; एकचक्रानगरींत रहा, हरीन आधीतें.[10]' ।। ६
जातां देऊनि अभय निर्जनकाचा[11] पिता, महा ज्ञाते,[12] ।
त्या चि नगरीं द्विजगृहीं होते पाळुनि पितामहाज्ञा[13] ते. ।। ७
सिद्धान्न[14] मातृहस्तीं देती ते वरुनि वृत्ति माधुकरी.[15] ।
भीमासि अर्ध दे ती,[16] अर्धाचे पांच[17] भाग साधु[18] करी. ।। ८
होते कांहीं काळ स्वीकारुनि भैक्ष्यवृत्तिला[19] मुदित,[20] ।
तों कुंती परिसे त्या आश्रयदब्राह्मणालयीं[21] रुदित.[22] ।। ९
भीमासि म्हणे, 'रडतो दुःखें सकुटुंब विप्र बापा ! हें ।
मज बहु दुःसह झालें; आलें नेत्रासि अश्रु बा ! पाहें. ।। १०
आम्ही पक्षी, हें गृह नीड,[23] धरादेव[24] आश्रयागम[25] हा. ।

---

१. नातवांस. ( सत्यवतीचा कानीनपुत्र व्यास, याचा अंबालिकेच्या ठायीं झालेला पुत्र पांडु, म्हणून पांडूचे धर्मादिक पुत्र हे व्यासाचे पौत्र ). २. हें=तुमच्यावर आलेलें संकट. ३. कोणी बळी ( एकादा बलवान् मनुष्य ) जळधीतें ( समुद्राला ) [ नदी ] मिळतां, नदीतें फिरविल ( तिचा ओघ दुसऱ्या बाजूस वळवील) परंतु खळ-धीतें न [ फिरवील ]–असा अन्वय. ४. दुष्टाच्या बुद्धीला. 'परंतु क्षुद्राचें हृदय धरवेना क्षणभरी' हें वचन प्रसिद्धच आहे. ( भर्तृहरिकृत नीतिशतक, श्लोक ४ पहा ). ५. बालरूपी वृक्ष हो ! ही गीति व तींतील अलंकार हीं दोन्ही पंतांच्या मालकीचीं आहेत. ६. अमृतसंपन्न, अमृतानें भरलेलें. ७. अळें. ८. खलरूप उन्हाळ्यास. **परंपरित-रूपक**. ९. एकचक्रानगरींत तुम्ही एक महिनाभर माझी वाट पहात राहा, मी तुम्हांला तेथें पुन्हां भेटेन–असें व्यासांनीं पांडवांस आश्वासन दिलें. येथें मूळांतील १५६ वा अध्याय संपतो. १०. मनोव्यथेला. ११. पांडूचा. १२. ते महा ज्ञाते=पांडव. १३. पितामह म्हणजे आजा (व्यास) त्याच्या आज्ञेला. १४. शिजलेलें अन्न. १५. निरनिराळ्या पुष्पांतून मधुकर ( भ्रमर ) जसा मध गोळा करितो, तसा घरोघर भिक्षा मागून जो अन्नभाग मिळेल तो गोळा करणें, या कृतीला 'माधुकरी' म्हणतात. १६. ती=माता ( कुंती ). १७. चार बंधूंना चार, आणि एक आईला, असे पांच भाग. १८. चांगले, योग्य. १९. भिक्षावृत्तीला. २०. संतुष्ट. २१. आश्रय देणाऱ्या द्विजाच्या घरीं. २२. रोदन, रडणें. २३. घरटें. २४. भूदेव, ब्राह्मण. २५. आश्रयरूप अगम म्हणजे वृक्ष.

दुःख हरूनि करावी [1]प्रत्युपकृति, होय हा चि [2]याग महा.'॥ ११
[3]भीम म्हणे, 'शोध करीं, जा, स्वमुखें विप्रनायका पूस. ।
वारीन दुःख सर्व हि, [4]दहना अति[5]भार काय कापूस ?' ॥ १२
द्विजरुदित पुन्हां तप्त [6]श्रुति करि [7]झगटोनि [8]यादवीची, तें ।
मोहे मन, जेंवि [9]विषांबुधिच्या भेटोनि [10]यांद [11]वीचीतें. ॥ १३
जाय द्विजाकडे ती गाय जसी वासराकडे [12]मोहें. ।
करितां विलाप, बोलत होता निजदुःख तेधवां [13]तो [14]हें:-॥ १४
'जाये ! वदलीस पर[15]स्थळगमनविचार, सर्वथा राहो. ।
माहेर येथ [16]होतें, [17]ओळखिती लोक सर्व, [18]थारा हो. ॥ १५
[19]गेलों असतों तरि कां पडतें हें [20]प्राणसंकट, [21]प्रमदे ! ।
**स्वकुटुंबव्यसन जसें देतें, न तसें [22]बुधा विष [23]भ्रम दे.** ॥ १६
जरि दान तुझें द्यावें, कांते ! मज भासतें तसें तरि तें, ।
[24]सिंधूदरीं विकावें स्वहितार्थ [25]तितीर्षुनें जसें [26]तरितें ! ॥ १७
पुत्र चि अधिक, न कन्या, अन्यास गमे, मला न [27]लोभ्यांला. ।

---

१. उलट उपकार. २. यज्ञ. ३. समानार्थक पद्यः–भीम म्हणे कुंतीला ब्राह्मणसमुदाय रडति कां पूस । त्यांचें दुःख हराया अग्नीला भार काय कापूस ? ॥. ४. अग्नीला. ५. मोठें ओझें. ज्याप्रमाणें विस्तवाला कापसाचें ओझें होत नाहीं, त्याप्रमाणें मला ब्राह्मणाचें दुःख हरण करणें हें एक अगदीं सोपें काम आहे, असें वाटतें–असा भाव. हें **गर्भितोपमेचें** उदाहरण होय. ६. कर्ण, कान. ७. 'भेटोनि' असें पाठांतर ८. कुंतीची. ९. विषाच्या समुद्राच्या. जेंवि विषांबुधिच्या वीचीतें भेटोनि याद मोहे ( मूर्च्छित होतो, गोंधळून जातो ) [ तेंवि ] तें मन ( कुंतीचें मन ) [ मोहे ]–असा अन्वय. १०. जलजंतु. ११. लहरीतें. १२. प्रेमानें वेडी होऊन. हाच दृष्टांत मूळांत आहे ( अध्याय १५७।१८ ). १३. द्विज. १४. पुढील गीतींत वर्णिलेलें. १५. ( हें ठिकाण सोडून ) दुसऱ्या ठिकाणीं जाण्याविषयीं विचार. १६. 'आहे' असें पाठांतर. १७. 'वोळखिती' असें पाठांतर. १८. हेंच ठिकाण आपणास थारा ( आश्रयस्थान ) हो ( होवो )–असा भाव. १९. हें स्थळ सोडून जर गेलों असतों. २०. जीवावरचें संकट. २१. हे उत्तम स्त्रिये ! प्रमदा= जी प्रीतियुक्त आहे अशी. 'प्रमदः संमदे मत्ते स्त्रियामुत्तमयोषिति' इति मेदिनी. प्रमद=प्रीति, हर्ष. २२. शहाण्या पुरुषाला. २३. भ्रांति, चक्कर, भोंवळ. कल्पनासादृश्यः—दुर्गत बंधु पहातां दुःख जसें, इतरथा न माते तें ॥ ( पंतकृत सभापर्व, अध्याय ७।३३ ). २४. समुद्राच्या मध्यभागीं. २५. तरूं इच्छिणारानें. २६. नौकेतें. येथें **'निदर्शना'**लंकार आहे. २७. पुत्र चि अधिक [ होय ], कन्या [ अधिक ] न ( नाहीं ), [ असें ] अन्यास ( दुसऱ्या कोणास ) गमे ( वाटे );

नयनयुगांतुनि[1] एक हि द्याया स्वप्नीं[2] न कोण तो भ्याला ? ॥ १८
देतों निजवपु[3] परि तूं भीरु ! कसी साहशील विरहातें ? ।
स्वर्गीं हि दुःसह चि जें म्हणसील मज स्मरोनि चिर[4] 'हा[5] !' तें. ॥ १९
प्राणांचा[6] त्याग बरा, तुमचा न बरा; कसा न तो पापी ? ।
कूपांत बळें अबळां[7] घालुनि ठकवूनि दोर जो कापी.' ॥ २०
तों ब्राह्मणी म्हणे, 'हो ! कवि साधु तुम्ही करूं नका शोक ।
यन्मूल[8] 'आपदर्थे' तो शंकरसा[9] चि आठवा श्लोक. ॥ २१
अजि 'आत्मानं[10] सततं रक्षेद्दारैर्धनैरपि' श्लोकीं, ।
तें चि करा, हो ! न बुडों द्या हो ! मज, निज-मतीस ही शोकीं. ॥ २२
पतिपूर्वीं स्त्रीस मरण, तें ल्याहूनि काय हो ऊन[11] ? ।
न रहावें चि सतीनें पळभरि हि विरूपकाय[12] होऊन. ॥ २३
रक्षाल तुम्ही च मुलें, अबळा भावील[13] भार जीवा हे; ।
रक्षील कशी आल्या नवपूरीं[14] भीरु फार जी वाहे. ॥ २४
जाईन मी च, राक्षस जरि करकर सर्व मानवां चावे. ।
दैवें, स्त्री[15] म्हणुनि दया येतां, मत्प्राण कां न वांचावे ? ॥ २५

[ परंतु ] मला लोभ्याला ( मी जो अत्यंत आसक्तचित्त आहें, संसारांत ज्याला विशेष आसक्ति आहे त्या मला ) न ( गमे )–असा अन्वय.

१. दोन डोळ्यांपैकीं एक डोळा. २. स्वप्नांत सुद्धां भीति वाटेल, अर्थात् आपल्या दोन डोळ्यांतील एक देखील डोळा द्यावयास कोणीही तयार होणार नाहीं–असा भाव. ३. स्वशरीर. ४. बहुतकाळ. ५. हाय ! हाय ! ६. रा० पराडकर यांच्या प्रतींत 'प्राणाचा' असा पाठ आहे. ७. जो अबळां ( निर्बळांना ) ठकवूनि [ व ] बळें ( जबरदस्तीनें ) कूपांत घालुनि दोर कापी तो पापी कसा न ? ( नव्हे बरें ? )–असा अन्वय. येथें मूळांतील १५७ वा अध्याय संपतो. ८. ज्याचें मूळ 'आपदर्थे' असें आहे तो श्लोक. 'आपदर्थे धनं रक्षेद्दारान्रक्षेद्धनैरपि । आत्मानं सततं रक्षेद्दारैरपि धनैरपि ॥' ह्याच श्लोक मूलग्रंथांत या स्थळीं आहे. ( अध्याय १५८ श्लोक २७ पहा ). ९. शंकराप्रमाणें. शंकर=पार्वतीपति, ( २ ) सुखकारक, सुखदायक. येथें 'शंकर' ह्या शब्दावर श्लेष आहे. १०. म्हणजे (आपत्काळीं) बायकोचा आणि धनाचा नाश झाला, तरी तो पत्करून आत्मरक्षण सतत करावें. ११. उणें, कमी. १२. विद्रूप ( केशवपनामुळें ). १३. हे अबळा ( ही स्त्री, अर्थात् मी ) जीवा ( आपल्या प्राणांस ) भार ( ओझें, ओझ्याप्रमाणें ) भावील ( मानील, समजेल )–असा अन्वय. 'वाहील' असें पाठांतर. १४. नूतन [ उदकाच्या ] पुरांत. १५. स्त्री अवध्य आहे म्हणून. ह्यासंबधीं मूळांत असें वचन आहे:—अवध्यां स्त्रियमित्याहुर्धर्मज्ञा

मज भक्षील चि तो तरि विधुरपणें[1] सर्वथा नका राहूं, ।
'ती स्त्री[2] मी च,' ह्मणा जी ! मागें सारूनियां[3] 'न'-कारा, 'हूं.' ॥ २६
ऐसें म्हणतां स्त्रीच्या कंठीं घालुनि मिठी म्हणे, 'अयि[4] ! ते ।
कथमेवमुक्तमदयं तदयं किमनुष्ठितुं क्षमो दयिते !' ॥[5] २७
परिसे असें पृथा जों तों चि म्हणे त्यांसि[6] कन्यका, 'मातें ।
द्या, द्यायाची[7] च सुता, हे किमपि न ये चि अन्य कामातें. ॥ २८
आत्मा[8] पुत्र, सखा स्त्री, कन्या चिंता चि सर्वकाळ, जिला ।
प्रसवोनि[9] वाहति मनीं श्रीमंत हि पितर सर्व काळजिला. ॥ २९
बुध 'कन्या[10] रक्ष' 'तिघांतुनि एका' तुज म्हणेल कां ? 'टाकीं' ।
बापा ! कांट्यानें[11] चि प्राज्ञ सुखें काढितात कांटा कीं.' ॥ ३०

---

धर्मनिश्चये । धर्मज्ञान्राक्षसानाहुर्न हन्यात्स च मामपि. ॥ ( अध्याय १५८ श्लोक ३१ ) म्हणजे— धर्मज्ञांनीं धर्मनिश्चय करितांना 'स्त्रिया अवध्य आहेत' असें सांगितलें आहे. राक्षसही धर्म जाणतात, असें म्हणतात, म्हणून तो ( बकासुर ) देखील माझा वध करणार नाहीं.

१. विधुरावस्थेंत, गृहस्थाश्रमावांचून. बायको मेल्यानंतर पुरुषाची जी अवस्था असते, तशा अवस्थेंत राहूं नका, विवाह करा—हा भावार्थ. २. अर्थात् द्वितीय पत्नी. ३. 'न' कारातें मागें सारूनि 'हूं' म्हणा'—**पंत**. ४. 'अयि ! ते कथं एवं अदयं उक्तम्'=अगे ! तूं कसें हें निष्ठुर भाषण बोललीस ? 'दयिते ! अयं तत् अनुष्ठितुं क्षमः किम्'=हे प्रिये ! हा मी तें करण्यास समर्थ आहें काय ? या गीतींत 'अनुष्ठितुम्' हें चुकीचें रूप लेखकप्रमादानें पडलें नसून पंतांचा मूळचा पाठच असा आहे. येथें 'तदयं किमनुष्ठितिक्षमो दयिते !' असा व्याकरणशुद्ध पाठ असावयास पाहिजे होता. ५. येथें मूळांतील १५८ वा अध्याय संपतो. ब्राह्मणीचें भाषण मूळांत ३८ श्लोकांत आहे. त्याचा पंतांनीं येथें फारच संक्षेप केला आहे. ६. त्या ब्राह्मणाला ( बापाला ). ७. धर्मानेंच सुता परित्याज्य आहे. कालिदासकृत अभिज्ञानशाकुंतलांतील 'अर्थो हि कन्या परकीय एव' ( अंक ४।२१ ) ही काश्यपोक्ति प्रसिद्धच आहे. ८. 'आत्मा पुत्रः सखा भार्या कृच्छ्रं तु दुहिता किल । सकृच्छ्रान्मोचयाऽऽत्मानं मां च धर्मे नियोजय.' ॥ म्हणजे–पुत्र ( हा पित्याचा ) आत्मा आहे, भार्या ( ही पतीची ) मैत्रीण आहे, पण कन्या ही खरोखर ( पित्यावर ) संकट आहे. यास्तव तूं या ( कन्यारूपी ) संकटांतून आपल्याला सोडव, आणि माझी ( कुटुंबरक्षणाच्या ) पुण्यकर्मावर योजना कर—असें मूळांत आहे ( अध्याय १५९।११ ). ९. जन्म देऊन. कल्पनासादृश्यः–कन्या नाम महद्दुःखं धिगहो महतामपि. ( कथासरित्सागर ). १०. कन्या रक्ष [आणि] तिघांतुनि एका ( कोणाला तरी ) टाकीं, [ असें ] बुध तुज कां म्हणेल ?–असा अन्वय. कां म्हणेल ?=कसा म्हणेल ? म्हणणार नाहीं–असा अर्थ. 'कन्या रक्ष्य, तिघांतुनि एका तुज हो म्हणेल कां टाकीं'–असा पाठभेद. रक्ष्य=रक्षण करण्यास योग्य. ११. 'कंटकेनैव कंटकम्' हें सुभाषितवचन प्रसिद्धच आहे.

ऐसी वदोनि कन्या रडवूनि रडे, तशांत जवळूनि ।
खवळूनि उठे बाळक, बोले, हस्तें[1] तृणासि कवळूनि. ॥ ३१
समजावुनि त्यांसि[2] म्हणे, 'ऐसें लात्रिंचलासि[3] मालीन. ।
कां ललतां आललतां ? पलतां मी सागलांत तौलीन[4]. ॥ ३२
हांसविलीं हर्षविलीं व्यसनार्त तिघें हि बाळ-शब्दानें. ।
अब्दानें[5] ग्रीष्मदवाकुळ[6]बर्हिकुळें जसीं च अब्दानें[7]. ॥ ३३
तेव्हां चि पृथादेवी भेटे, अभयोक्ति जी वदे त्यांतें. ।
संजीवनी[8] च जाणों ती, रोगेंकरुनि जीव-देत्यांतें[9]. ॥ ३४
रोदनकारण पुसतां विप्र म्हणे, 'अंब ! तापसि ! श्रवणें[10] ।
घ्यावें शिव, अशिवाच्या व्यर्थ चि कां तूं हि तापसि श्रवणें[11] ? ॥ ३५
या राष्ट्रा बक[12]राक्षस, अज[13]-यूथा लांडगा जसा पाळी[14]. ।
तद्वेतनदाना[15]ची आलि असे आजि मजकडे पाळी. ॥ ३६
एक महिषं[16], एक पुरुष, शाल्यो[17]दनराशि, त्यासि भक्षाया ।

१. हातांत गवताची काडी ( तरवारीच्या ऐवजीं ) घेऊन. ( मूळ अध्याय १५९ श्लोक २२ ). २. बाप, आई व बहीण यांस. ३. रात्रिंचरासि ( राक्षसास ). येथील बोबड्या भाषेचा विचार करितां 'त्रि' हें अक्षर नजरचुकीनें लिहिलें गेलें असावें, असें वाटतें. ४. तारीन. पंतांनीं रचिलेली अशीच एक बोबड्या शब्दांची गीति कृष्णास शकटासुर मारावयास आला होता त्या प्रसंगींची आहेः—गोपशिशु ह्मणति, 'पलिसा, ललतां हलिनेंचि झालिला पाय, । गाला उलोनि पलला, सल्व खलें, नवल कलितसां काय ? ॥ ( हरिवंश, अध्याय १३।९ ). अशीच आणखी एक कविता आहेः—कलचलनाला ललतां झालित असतां कुमाल बहु आललतां । सकतास उघल घलला पदनखलस्पल्स तोंचि हा घलघलला.॥ ( कृष्णविजय, अध्याय ७।९). असेंच एक नामदेवकृत बोबडें पद आहे ( काव्यसंग्रह-ग्रंथमाला, पदसंग्रह, भाग २ पृष्ठ २७ पद्य). ५. मेघानें. ६. ग्रीष्म+दव+आकुळ+बर्हि+कुळें=उन्हाळ्यांतील वणव्यानें पीडित जे मोर, त्यांचीं कुळें. ७. अप्+दानें=उदकाच्या दानानें. ८. रोगेंकरुनि जीव-देत्यांतें ती जाणों संजीवनी च–असा अन्वय. मूळांत 'जणूं गतप्राण झालेल्यांना अमृतानें जीवंत करीत' असें आहे. येथें उत्प्रेक्षालंकार आहे. येथें मूळांतील १५९ वा अध्याय संपतो. ९. जीव देऊं इच्छिणाऱ्यांस. १०. कानानें. ११. श्रवणानें, ऐकण्यानें. श्रवणें शिव घ्यावें ( कानानें शुभ गोष्टी ऐकाव्या ). हे अंब ( माते ! ), हे तापसि ! तूं हि अशिवाच्या श्रवणें व्यर्थ चि कां तापसि ? ( अशुभ गोष्टी ऐकून तूं आपल्याला उगाच कां दुःखी कष्टी करून घेतेस ? )–असा अन्वय. १२. हा जटासुराचा पुत्र. हा एकचक्रानगरीच्या समीप वैत्रकीय नामक वनांत राहात असे. १३. बकऱ्यांच्या कळपास. १४. रक्षी. १५. त्याचें वेतन ( पगार ) देण्याची. १६. रेडा. १७. साळीच्या भाताची रास.

घ्यावा असें असे; या व्यसनीं मज कोण दक्ष[१] रक्षाया ? ॥　३७
विरहभयें एकास हि राक्षसहस्तीं न देववे चि; तसें ।
धन हि न पुरुष मिळेसें[२], स्वकुळ चि मी भूमिदेव[३] वेचितसें[४]. ॥　३८
सहज गजगंड[५] भेदी, हरिचा[६], नव्हता कळा शिकत, करज[७]. ।
अकृतघ्नत्वार्थ[८] चि दे शुचिता मळल्या जळासि कतक-रज[९]. ॥　३९
तैसा कुलीन जन परदुःखध्वंसीं[१०] पटु स्वभावानें ।
संकट हरि अरिचें ही, हरिना कां प्रार्थितां[११] स्व भावानें[१२] ?' ॥　४०
कुंती म्हणे, 'दिला तुज एक स्वसुत, द्विजा ! नको चि रडों. ।
हा शोकभर स्वशिरीं घेउनि सकुटुंब तूं नको चिरडों[१३].' ॥　४१
विप्र म्हणे, 'शिव ! शिव ! परघातक[१४] जो स्वार्थलुब्ध नर कामी, ।
तो जैसा, तैसा या कर्में पावेन घोर नरका मी. ॥　४२
करुनि पराचें अहित स्वहित विहित[१५] काय तापसि ! कवीसी ? ।
माते ! असें कसें मज व्हाया याहूनि[१६] ताप सिकवीसी ?' ॥　४३
कुंती म्हणे, 'मदात्मज[१७] गुरुवरमंत्रें[१८] असे महातेजा[१९]; ।
साहों न शकति राक्षस, वज्राघातास ही सहाते, ज्यां[२०]. ॥　४४

---

१. समर्थ. २. एकादा मनुष्य विकत घेण्यास माझ्याजवळ द्रव्य नाहीं, म्हणून स्त्रीपुत्रादिकांस बरोबर घेऊनच राक्षसाकडे जातों—असा भाव. ३. ब्राह्मण. ४. वेचणें=वेंचणें, खर्च करणें. येथें मूळांतील १६० वा अध्याय संपतो. ५. हत्तीचीं गंडस्थळें. ६. सिंहाचा. ७. नख, ( कर=हात ) त्याजपासून ज ( उत्पन्न झालेलें ). हरिचा करज ( नख ) कळा ( कला ) शिकत नव्हता [ तथापि ] गजगंड सहज भेदी—असा अन्वय. गजगंडभेदन कसें करावें, ही कला शिकत नव्हता ( शिकण्याची सुरुवातही केली नव्हती तेव्हांपासूनच ) हरिचा करज हत्तीच्या गंडस्थळांचा भेद करी, मग ती कला शिकल्यावर तर सिंहाच्या पराक्रमाची गोष्ट विचारावयासच नको—असा भाव. ८. जलानें आपलें रक्षण केलें, तेव्हां त्याजविषयीं आपण कृतघ्न न व्हावें या हेतूनें. ९. निवळीच्या बियांचें चूर्ण. १०. दुसऱ्याचें दुःख हरण करण्याच्या बाबतींत. ११. 'प्रार्थितांचि भावानें' असें पाठांतर. १२. बंधूनें. १३. हें पंतांच्या शेंकडों ठरींव यमकांपैकीं एक आहे ( आदिपर्व, अध्याय ९।३२ व सभापर्व, ७।५४ पद्य ). १४. जो परघातक, [ जो ] स्वार्थलुब्ध, [ व जो ] कामी तो नर जैसा [ नरका पावे ], तैसा या कर्में मी घोर नरका पावेन—असा अन्वय. १५. योग्य, शास्त्रोक्त. १६. स्वकुटुंबनाश होणार म्हणून मला सध्यां जितकें दुःख होत आहे, त्यापेक्षां ज्यास्त. १७. माझा मुलगा. १८. गुरुश्रेष्ठानें दिलेल्या मंत्राच्या योगानें. १९. बलवान्, पराक्रमी. २०. ज्यांला. वज्राघातास ही सहाते राक्षस ज्या ( मदात्मजाला ) साहों न शकति—असा अन्वय.

सुर[1]वल्लिचा, नव्हे गा ! क्षुद्रलतागुच्छकासम, स्तबक[2]. ।
स्पष्ट मंदात्मज[3]चरणीं अर्पील प्राणधन[4] समस्तं बकें[5]. ॥ ४५
परि हें विप्रवरा ! त्वां न प्रकटावें, मनीं च जिरवावें. ।
विद्यार्थिजनोपद्रव[6] लागेल म्हणूनियां न मिरवावें.' ॥ ४६
मग विप्र[7]-पृथा-प्रार्थित भीम धरुन राक्षसापराध मनीं, ।
कोपे, जाणों[8] दहन चि तो होय, प्रार्थना तया धमनी[9]. ॥ ४७
तें मान्य करुनि, मुनिला, 'व्हा स्वस्थ' असें चि तो कवि प्रार्थी[10]. ।
**संसारी[11] वित्तार्थी, तैसे चि कुलीन लोक विप्रार्थी[12].** ॥ ४८
स्वानुज[13] साहस कांहीं करणार, असें युधिष्ठिरा समजे. ।
'आकारें[14] चि परेंगितें[15] कळे' म्हणति कवि युधिष्ठिरासम जे. ॥ ४९
पुसतां[16] पृथा कथी[17] तें धर्म म्हणे, 'अंबे[18] ! परिस तोकें[19]-वच. ।
द्याया काय उचित ? जो[20] रणीं सहाणार अरिस, तो कवच. ॥ ५०

---

१. कल्पलतेचा. 'सुखवल्लिचा' असें पाठान्तर आहे, पण तें हस्तदोषमूलक असावें. कल्पलतेच्या फुलांचा गुच्छ एकाद्या क्षुद्र वेलीच्या फुलांच्या गुच्छासारखा असत नाहीं. त्याप्रमाणें भीम व बकासुर यांची बरोबरी होऊं शकत नाहीं–असा भाव. २. गुच्छ, फुलांचा झुबका. ३. माझ्या मुलाच्या पायांवर. ४. प्राणरूपी धन ( द्रव्य ) आणि इतर सर्व वस्तू. ५. दैत्यविशेष. ( मागें गीति ३६ पहा ). ६. विद्यार्थिजनांचा त्रास. बकवधाची गोष्ट लोकांस कळली, तर ते कौतुकानें भीमापाशीं मंत्रविद्या शिकण्यासाठीं येऊन तन्निमित्त त्यास त्रास देतील. ही मंत्रविद्या शिकणारे हेच विद्यार्थी. ७. द्विज आणि कुंती यांनीं प्रार्थिलेला. ८. **उत्प्रेक्षा**लंकार. ९. (ब्राह्मण व कुंती यांनीं केलेली प्रार्थना हीच) फुंकणी. १०. येथें मूळांतील १६१ वा अध्याय संपतो. ११. 'निःस्व जसे वित्तार्थी' असें पाठांतर. निःस्व=ज्यांच्याजवळ स्व ( धन ) नाहीं असे, दरिद्री. १२. विप्राची (अर्थात् ब्राह्मणाच्या आशीर्वादाची) इच्छा करणारे. १३. आपला धाकटा बंधु (भीम). १४. भय, हर्ष, क्रोध इत्यादिकांचे ज्ञापक जे शरीरावर कंप, हास्य, इत्यादि भाव होतात, त्या प्रत्येकास आकार म्हणतात. अर्थसादृश्य:—आकारेणैव चतुरास्तर्कयन्ति परेङ्गितम् । गर्भस्थं केतकीपुष्पमामोदेनैव षट्पदाः ॥ ( प्रसन्नराघव ) ( २ ) 'आकारैरिंगितैर्गत्या चेष्टया भाषणेन च । नेत्रवक्त्रविकाराभ्यां ज्ञायतेऽन्तर्गतं मनः' ॥ ( ३ ) आकारेंचि परेंगित कळतें, बोलोनि काय हो ! कळतें ? ( मोरोपंत–वनपर्व, अध्याय १।१२ ). १५. दुसऱ्याचा अभिप्राय. १६. धर्मानें विचारिलें असतां. १७. 'कथी तें' असें पाठान्तर. १८. हे आई ! १९. बालकवचन. २०. जो रणीं अरिस सहाणार तो कवच ( आश्रयस्थान, रक्षणकर्ता ) द्याया उचित काय ?–असा अन्वय. रणांत शत्रूचा मार सोसणारा जो कवच ( भीम ), तो ( बकासुरास ) देण्यास योग्य काय ? आपला रक्षणकर्ता भीम बकासुराला बळी देणें योग्य नाहीं–असा भाव.

द्यावा[1] परा न तरतां अंबुधिमध्यें कसा[2] स्व नावाडी ? ।
धार्मिक[3] न तो, जना, जो न[4] गणुनि शिशुरोदनस्वना,[5] वाडी.[6]' ॥ ५१
कुंती म्हणे, 'अरे ! बा ! पावो द्यावा मुनी कसा अ-सुखा ? ।
आम्हीं सुखें म्हणावें, 'काळा ! द्विज सोड, आमुचे असु[7] खा.' ॥ ५२
विप्रार्थ तुम्हीं असु हि, स्वर्गी सुखवावया जनक, वाडा[8]. ।
हें चि हित, न[9] काळास हि पाहुनि लाविति भले जन कवाडा. ॥ ५३
भीसी कां ! अनुभविलें अनुजबळ तुवां न काय गा ! रानीं[10] ? ।
पावो ताप पराचा, परि हिमगिरिचा न काय[11] गारांनीं. ॥ ५४
पडला निपट[12] शिशुपणीं[12] भीम मदंकावरूनि,[13] ज्यावरि तें ।
झालें चूर्ण शिळातळ,[14] न धरीं भय, यश तवानुजा वरितें. ॥ ५५
ब्राह्मणसाहाय्यकर[15] क्षत्रिय जो तो चि संत, तो चि तरे. ।
ऐसें व्यासें कथिलें,[16] म्हणुनि तुम्हां हें चि संततोचित[17] रे !' ॥ ५६
जननीस धर्म वर्णी, नवल न, वर्णील तीस सुरभी[18] ती. ।
तरि च तसे खळ[19] वधिले तत्पुत्रांनीं, जयांसि सुर भीती. ॥ ५७
रात्रौ एकाकी[20] ही शिरतां सागरवनीं[21] न भी मकर[22], ।

१. [ स्वतः ] न तरतां स्व ( आपला ) नावाडी अंबुधिमध्यें ( समुद्रांत ) परा ( दुसऱ्याला ) कसा द्यावा ?–असा अन्वय. २. 'जसा' असें पाठान्तर. ३. धर्मशील. ४. पर्वा न करितां. ५. लहान मुलाच्या रडण्याच्या शब्दास. स्वन=शब्द. ६. वाढी. वाढणें=अन्न वाढणें. हें गीत्यर्ध सुभाषितरूप आहे. ७. प्राण. ८. वाढा, अर्पण करा. ९. सज्जन प्रत्यक्ष यमाशीं देखील सामना करावयास तयार असतात–असा भाव. किंवा–सज्जन आपले प्राण अर्पण करून प्रत्यक्ष यमाचें देखील स्वागत करितात–असा अर्थ घेतला तरी चालेल. १०. अरण्यांत ( हिडिंबवधाच्या समयीं ). ११. देह, गारांनीं पराचा [ काय ] ताप पावो, परि हिमगिरिचा ( हिमालयपर्वताचा ) काय [ ताप ] न [ पावे ]–असा अन्वय. हिमालयपर्वतावर गारा पडल्या, तरी त्यांपासून त्याला त्रास होत नाहीं. त्याप्रमाणें भीमासारख्या प्रतापी व बलाढ्य वीरास बकासुरापासून कांहीं त्रास होणार नाहीं–असा भाव. १२. अगदीं लहानपणीं. १३. माझ्या मांडीवरून. १४. जन्मल्याबरोबर हा कुंतीच्या मांडीवरून डोंगरावर पडला, तेव्हां ह्याच्या शरीराच्या भारामुळें याच्या अवयवांनीं शिलेचा चूर झाला–असें मूळांत आहे. ( अध्याय १६२।१८ ). तल=तळ=पृष्ठभाग. १५. ब्राह्मणाला साह्य करणारा. ( मूळ अध्याय १६२ श्लोक २२ पहा ). १६. येथें मूळांतील १६२ वा अध्याय संपतो. १७. निरंतर योग्य. १८. कामधेनु. १९. लाक्षागृह निर्माणकर्ता पुरोचन व हिडिंबराक्षस यांच्यासारखे दुष्ट लोक. २०. एकटा देखील. २१. समुद्रोदकांत. २२. मगर, सुसर. ( हीच कल्पना पंतकृत सभापर्व, अध्याय ६।४७ मध्यें आढळते ).

भीम हि तसा बकवन्नीं आणि तदन्नीं[1] तसा चि भीमकर[2]. ॥ ५८

जेवी[3] भीम, 'बका ! ये' ऐसी मारूनि हाक उग्रास[4], ।
शिरले काय सदुदरीं[5] सदोदनाचे[6] भिवोनि सुग्रास[7]! ॥ ५९

हें पाहुनि बक धावे, मानेवरि दे धडाधड बुक्या, तें ।
होय त्वराशनीं[8] त्या कुरुकीर्तिकुचांचिया हित बुक्यातें[9]. ॥ ६०

हंसें हि जेववावा जो प्रेमें धरुनियां चिबुक[10] लावा[11], ।
तो त्या गरुडा झडपी, 'आमरण[12]' म्हणे 'असा चि बुकलावा.' ॥ ६१

भीम न सोडी भोजन, राक्षस ताडी बळें जरि बुक्यांनीं. ।
खळ गांजी, परि सादर हरिभजन करी जसा बुध[13] मुक्यांनीं[14]. ॥ ६२

पांडव[15] जेवुनि आधीं, मग राक्षस जीवितासि आंचवला[16]. ।
सन्मणि[17] न काळ-लक्षा[18] ये, ये तो काय राक्षसा चवला[19] ? ॥ ६३

मारी हरि लीलेनें जेंवि गजा[20], तेंवि पार्थ[21] कुणपाशा[22]. ।

१. त्या बकासुराच्या अन्नाच्या ठायीं. २. भीमाचा हस्त. ३. भक्षी. ४. भयंकरास (बकास). ५. सत्पुरुष जो भीम, त्याच्या पोटांत. **उत्प्रेक्षा**लंकार. ६. उत्तम अन्नाचे. ओदन=शिजलेला भात. ७. उत्तम घांस. ८. त्वरेनें जेवण्याच्या कामीं. बकासुर भीमाच्या मानेवर बुक्के मारीत होता, त्यामुळें भीमाच्या तोंडांतील घांस झटपट पोटांत जाऊन पडत व तेणेंकरून त्याचें जेवण लौकर होण्याच्या कामीं त्यांची मदतच होत होती–असा भाव. 'तया अशनीं' असें पाठांतर. अशन=खाणें. ९. कुरुकीर्तिरूप स्त्रीच्या स्तनाला [ शोभविणाऱ्या ] बुक्यासारखा जो भीम, त्याला. बुका हा सुगंधी पदार्थ प्रसिद्धच आहे. १०. जो लावा हंसें हि प्रेमें चिबुक धरुनियां जेववावा, तो त्या गरुडा झडपी–असा अन्वय. येथें लावा म्हणजे भीम व गरुड म्हणजे बकासुर असें समजावें. चिबुक=हनुवटी. चिबुक धरणें=हनुवटी धरणें, विनवणी करणें, काकुळतीनें प्रार्थना करणें. ११. पक्षिविशेष, एक लहानसा पक्षी. १२. मरेपर्यंत. १३. ज्ञाता. १४. मुकाट्यानें. ( 'मुक्यांनीं' ह्यांत मूळ शब्द कोणता ? ). १५. ह्या गीत्यर्धांत '**असंगति**' नामक अलंकार आहे. जो जेवतो तोच आंचवतो. पण येथें जेवतो भीम व आंचवतो बकासुर–असें वर्णन आहे. येथें मूळांतील १६३ वा अध्याय संपतो. १६. आंचवणें= जेवणानंतर तोंड व हात धुणें. एकाद्या गोष्टीस आंचवणें=उपभोग घेण्यास असमर्थ होणें, उपभोग घेऊं न शकणें. १७. ( भीमरूपी ) उत्तम रत्न. १८. यमरूपी लक्ष रुपयांस. [ भीमरूपी ] सन्मणि काळलक्षा न ये ( मिळत नाहीं ), [ तर ] तो ( सन्मणि ) राक्षसा चवला ( राक्षसरूपी चवलास ) ये काय ? ( येईल काय ? मिळेल काय ? )–असा अन्वय. जेथें भीमाला ठार मारणें प्रत्यक्ष यमास शक्य नाहीं, तेथें ती गोष्ट करणें क्षुद्र अशा राक्षसास शक्य नाहीं–असा भाव. 'सन्मणि न कोटिलक्षा ये' असा पाठभेद. १९. राक्षसरूपी दोन आण्यांस. २०. कुवलयापीड

तैं सुर म्हणति, 'यमाच्या, [1]गुरु साजति भीम[2]बाहुगुण, पाशा.' ॥ ६४
ठेवी नगरद्वारीं परमभयानक [3]अशुद्धिमत् [4]कुणप, ।
[5]जाणों [6]मातेनें तो वधिला [7]शिशुरक्तपोग्र [8]मत्कुण-प. ॥ ६५
भीमें हळू चि जाउनि कथिली वार्ता [9]द्विजासि कानीं ती. ।
[10]श्लाघ्य हि करुनि न मिरवी कुळज, सुजन हो! असी सिका नीती.॥ ६६
'चुकलों, क्षमा करा मज, अपराधसहस्र [11]घातुका घडलें.' ।
[12]यो भावें जाणों तें [13]द्वारीं [14]रक्ष [15]क्षमापना पडलें! ॥ ६७
प्रातःकाळीं च तसें बकशव पाहोनि, [16]एकचक्रा तें ।
यश देती झाली [17]करिवरपाळाच्या चि एक [18]चक्रातें. ॥ ६८
म्हणति विचक्षण पुरजन अन्योन्य, मनीं धरूनि [19]हरिख, 'चला, ।
ज्याचा [20]वैर तयास चि हेतु पुसों कीं कसा स्व अरि [21]खचला?' ॥ ६९
सांगे विप्र, 'मजकडे येतां [22]प्राणघ्न उग्रतर [23]वार, ।
बहु भ्यालों, [24]अज जैसा भीतो पाहूनि उग्र तरवार. ॥ ७०

---

नांवाचा कंसाचा हत्ती. याला कृष्णानें मथुरेंत मारिलें. २१. पृथापुत्र (भीम). २२. प्रेत-भक्षकास (राक्षसास). कुणप=शव, अश्नाति=खातो तो कुणपाश.

१. गुरूप्रमाणें शोभतात, अर्थात् प्राण हरण करण्यांत यमपाशांपेक्षां वरचढ आहेत–असा भाव. २, भीमाचे बाहु (भुज) रूप गुण (दोरे). ३. अपवित्र. येथें 'अशुद्धमत्' असा पाठ असता तर बरें झालें असतें. अशुद्ध=रक्त. अशुद्धमत्=रक्तानें भरलेलें. मातेनें रागारागानें एकादा मोठा ढेंकूण चिरडावा, त्याप्रमाणें भीमानें बकासुराची अवस्था केली–असा भाव. ४. शव, प्रेत. ५. **उत्प्रेक्षा**लंकार. ६. नगरीरूप मातेनें. ७. मुलांचें रक्त प्राशन करणारा असा भयंकर. ८. ढेंकणांमध्यें श्रेष्ठ, मोठा ढेंकूण. ९. मूळांत 'भीमानें घडली तशी सर्व हकिकत धर्मराजाला सांगितली' असें आहे. (अध्याय १६४।९). १०. स्तुत्य कार्य. हें अर्ध सुभाषितांत गणण्या-लायक आहे. ११. घातक्याला. १२. वर सांगितलेल्या गीत्यर्धांतील उद्देशानें. १३. (नगराच्या) द्वारीं. १४. राक्षस. हा शब्द संस्कृतांत नपुंसकलिंगी आहे. १५. क्षमेची याचना करण्यासाठीं. ह्या गीत्यर्धांत **उत्प्रेक्षा**लंकार आहे. १६. एकचक्रानगरी (मागें गीति ६ पहा). अर्थात् त्या नगरांतील सर्व लोक. १७. गजेंद्राचें पाळण करणारा जो श्रीविष्णु, त्याच्या. १८. एकचक्रा (नगरी) तें यश करिवरपाळाच्या चि एक चक्रातें (सुदर्शन नामक चक्रातें) देती झाली–असा अन्वय. सर्व लोकांना वाटलें कीं, हा राक्षस विष्णूच्या सुदर्शन नामक चक्रानेंच मारिला गेला–असा भाव. १९. हर्ष, आनंद. २०. पाळी. २१. 'चचला' असें पाठान्तर. चचणें=मरणें. (मृताविषयीं तिरस्कार दर्शविणें असल्यास कोंकणांत ह्या शब्दाचा उपयोग करितात). २२. प्राणनाश करणारा. २३. पाळीचा दिवस. २४. बकरा.

सकुटुंब रडत होतों तों आला मंत्रसिद्ध[1] विप्र कृती ।
रोदनहेतु मज पुसे तो सदय महामना[2] शुचिप्रकृती[3]. ॥ ७१
ऐकोनि व्यसन वदे, 'मी देतों अन्न राक्षसापसदा[4]. ।
हरिणवनीं वृक[5] न बरा, मंडूकांच्या[6] बिळांत साप सदा[7]. ॥ ७२
मच्चिंता न करावी, स्वस्थ असावें' असें अभय मातें ।
देउनि, जाय दमाया[8], जेंवि शिवाप्राणवल्लभ[9] यमातें. ॥ ७३
त्याचें चि कर्म हें, तो आम्हांला होय पौर हो ! तात. ।
साधूंसि सहाय सुखें देव संकर्पूरगौर[10] होतात[11].' ॥ ७४
ऐसें ऐकुनि पौर ब्रह्मोत्सव[12] करिति गाति महिमा ते, ।
म्हणती, 'ब्राह्मण चि तुझा पति, गुरु आम्हां प्रजांसि, महि-माते[13] !' ॥ ७५

---

## अध्याय बत्तिसावा.

पांडव जेथें होते तेथें वासार्थ[14] एक विप्र हित ।
शुचि तेजस्वी आला, किरण जसा नीरजीं[15] रविप्रहित[16]. ॥ १

---

१. कुशल. मंत्रसिद्ध=मंत्रविद्येंत निष्णात. मूळांत हाच शब्द योजिलेला आहे. ( अध्याय १६४।१६ ). २. थोर मनाचा. ३. ज्याचा स्वभाव कपटरहित आहे असा. ४. नीच राक्षसाला, राक्षसाधमाला. ५. लांडगा. ६. बेडकांच्या. ७. मंडूकांच्या बिळांत साप सदा [ न बरा ]–असा अन्वय. सदा=( ? ). ८. दमन करण्यासाठीं, मारण्यासाठीं. ९. शिवा ( पार्वती ), तिचा प्राणप्रिय ( पति )=महादेव. येथें मार्कंडेयकथा अनुसंधेय आहे. मार्कंडेय हा मृकंडऋषीचा पुत्र. ह्याचा मृत्युसमय जवळ आला असतां तो यमाच्या भीतीनें शिवलिंगाची पूजा करीत होता. तेव्हां त्याचे प्राण हरण करण्यासाठीं यम स्वतः आला व त्यानें आपले पाश मार्कंडेयावर टाकिले. तेव्हां शंकरानें प्रकट होऊन यमास शासन केलें व मुनिपुत्रास 'तूं चिरायु हो' असा वर दिला–अशी कथा आहे. १०. कापुरासारखा गौरवर्णी जो शंकर, त्यासह. शंकर कर्पूरगौर आहे, असें वर्णन ग्रंथांतरीं आढळतें. ११. हें अर्ध सुभाषितरूप आहे. १२. ब्राह्मणानें राक्षसाचा वध केला असें ऐकून ब्राह्मणाच्या अभिनंदनासाठीं केलेला पूजनादिक उत्सव. ब्रह्मोत्सव म्हणजे शरत्कालीं नवधान्योत्पत्ति झाली असतां जो सर्व लोक उत्सव करितात तो–असाही अर्थ आहे ( पंतकृत विराटपर्व, अध्याय १।३४ ). १३. हे भूमिमाते ! ब्राह्मण चि तुझा पति ( राजा ) [ होय ]. [ तो ] आम्हां प्रजांसि गुरु ( पूज्य ) [ आहे ]–असा अन्वय. हें गीत्यर्ध पंतांच्या मालकीचें आहे. येथें मूळांतील १६४ वा अध्याय संपतो. १४. राहण्याकरितां. १५. कमळामध्यें. १६. सूर्यानें पाठविलेला.

तो सांगे, 'द्रुपदमखप्रभवा[१] कृष्णा[२] अयोनिजा[३] कन्या, ।
तीचा स्वयंवरोत्सव[४], न कळे कोणा वरील ती धन्या.' ॥ २
पांडुसुत तिची पुसती, जैसे अनभिज्ञजन[५], कथा नमुनी. ।
होय श्रोतृश्रोत्रक्षुधितार्भकतृप्तिजनक[६] थान मुनी. ॥ ३
कथिली द्रोणद्रुपदद्वेषकथा परिभवान्त[७] आधींची[८], ।
जी[९] त्या पांचाळाच्या झाली उत्पत्तिभूमि आधींची[१०]. ॥ ४
मग विप्रें ऐकविली पुढिल कथा ती असी, "स्वं[११] अहितातें[११] ।
मारीसा सुत व्हाया, शोधी मुनितें तपस्विमहितातें[१२]. ॥ ५
उपयाजाख्यमुनीतें[१३] सेवी बहु, काम[१४] तो पुसे आर्य[१५]; ।
द्रुपद तयाला सांगे जें होतें योजिलें मनीं कार्य. ॥ ६
'अर्बुद[१६] गायी देइन तुज, दे द्रोणान्तहेतु-सुत[१७] मातें. ।
नाशी मद्व्यसनातें[१८], जैसा नाशी विभावसु[१९] तमातें.' ॥ ७
मान्य करी न महात्मा, परि नृप जोडोनें[२०] हात दास्यातें, ।
विधुतें चकोरसा तो म्हणे, 'वरामृत[२१] वहा[२१]' तदास्यातें[२२]. ॥ ८
उपयाज म्हणे, 'प्रार्थी मद्भ्राता ज्येष्ठ याजनामा, जी ।
इच्छा ती सांग तया, तो परम समर्थ याजनामाजी[२३]. ॥ ९
कार्य करील तुझें, जा; आहे ज्ञाता, परंतु लोभी तो; ।
'हूं' न म्हणेल इतर जन, पापापासूनि[२४] थोर जो भीतो. ॥ १०

---

१. द्रुपदाच्या यज्ञापासून जिची उत्पत्ति, ती. २. द्रौपदी. ३. शुक्रशोणितसंयोगानें जन्म न पावलेली. ४. व्हावयाचा आहे-हे शब्द अध्याहृत घ्यावयाचे. ५. अज्ञानी, अजाण. ६. श्रवण करणाऱ्यांचीं कर्णरूप जीं क्षुधित बाळें, त्यांना तृप्ति देणारें [ जणूं काय ] थान ( स्तन ) [ असा ] मुनि ( तो विप्र ) होई. ७. पराभवापर्यंत. ८. मागची, पूर्वीची. (मागें अध्याय २७ पहा.) येथें मूळांतील १६५ वा अध्याय संपतो. ९. कथा. १०. काळज्यांची, मनोव्यथांची. ११. स्वकीय शत्रूतें (द्रोणातें). १२. तपस्विजनांस महित ( वंदनीय ) अशा मुनीला. १३. उपयाज नामक ऋषीला. १४, इच्छा, इच्छितार्थ. १५. श्रेष्ठ ( उपयाजमुनि ). १६. दशकोटी. १७. द्रोणाच्या अन्तास ( मरणास ) कारण होईल असा पुत्र. १८. माझ्यावर आलेल्या संकटाला. १९. सूर्य. २०. येथें रा. पराडकर यांच्या प्रतींत 'जोडीन' असा पाठ आहे. २१. वररूप अमृत वहा ( अर्पण करा ), असें. 'वरामृत वदा' असें पाठांतर. २२. त्याच्या मुखातें. २३. यज्ञ करविण्याचे कामांत. 'या जनामाजी' असें पाठांतर. २४. जो थोर [ मनुष्य ] पापापासूनि भीतो [ असा ] इतर ( यजमानक

म्हणसील कसा लोभी तरि आचरणावरूनि वळखावें, ।
भक्षी[1] विजनीं[2] हा जें स्थळशुचिता[3] न कळतां न फळ खावें.' ॥ ११
उपजायमतें प्रार्थी पुत्रार्थी[4] भूप हा तया, ज्याला ।
धनलोभांक[5] असे, परि जोडी द्विजराज[6] हात याजाला. ॥ १२
याज द्रुपदमनोरथ परिपूर्ण करावया, नयज्ञात्या[7] ।
अनुजा घेऊनि, करी जो[8] देता पुत्रदान यज्ञा त्या. ॥ १३
हवनांतीं[9] याज म्हणे, 'ये राज्ञि[10] ! क्षिप्र[11] घे वरा[12] हवितें[13], ।
होइल मिथुन[14] तुज असें कीं, जें शतपुत्रिमद[15] न राहवितें.' ॥ १४
राज्ञी म्हणे, 'मुने ! मी पुण्यहविःप्राशना[16] नसें उचिता. ।
तांतड कां ? बा ! थांबा, मलिना[17] आहें, घडो मला शुचिता[18].' ॥ १५
याज म्हणे, 'देवि ! रहा, किंवा जा, न प्रयोग[19] राहेल. ।
घनबिंदु[20] चातकीच्या काय विलंबें विलंब साहेल ?' ॥ १६
देवीच्या आत्मरजोदोषें[21] जेव्हां स्व भाग राहविला, ।

---

ऋषीहून दुसरा कोणी ) जन 'हूं' न म्हणेल ( रुकार देणार नाहीं ). परंतु तो ( याज ) ज्ञाता [ असून ] लोभी आहे. [ म्हणून ] तो तुझें कार्य करील. जा ( त्याच्याकडे जा )–असा अन्वय.

१. विजनीं स्थळशुचिता न कळतां जें फळ न खावें, [ तें ] हा भक्षी–असा अन्वय. 'भक्षी विजनीं ही' असा पाठभेद. २. अरण्यांत. रा. पराडकर यांच्या प्रतींत 'विजनीं=एकान्तीं' असा अर्थ दिला आहे. पण मूळांत 'गहने वने' असे शब्द आहेत ( अध्याय १६७।१५ ). ३. भक्षण कोणत्या ठिकाणीं करावें आणि कोणत्या ठिकाणीं करूं नये, यांविषयीं नियम आहेत; त्याप्रमाणें जागा योग्य आहे किंवा नाहीं हें न जाणतां, स्थळाचा शुद्धपणा न पाहतां. ४. सुतलामेच्छु ( द्रुपद ). ५. द्रव्यलोभरूप चिन्ह किंवा लांछन. ६. चंद्र किंवा ब्राह्मणश्रेष्ठ. ७. नीति जाणणाऱ्या. ८. जो ( यज्ञ ) पुत्रदान देता ( देणारा ) त्या यज्ञा करी–असा अन्वय. ९. यज्ञाच्या शेवटीं. १०. ही राज्ञी म्हणजे पृषतस्नुषा, द्रुपदभार्या होय. ११. सत्वर. १२. पवित्र, श्रेष्ठ. १३. होमद्रव्यातें. १४. जुळें, जोडी. १५. शेंकडों पुत्रवानांचा गर्व. 'शतपुत्रमद' असें पाठांतर. १६. पवित्र अशा हवनीय द्रव्याचें प्राशन करावयास. १७. अस्पृश्या, रजस्वला. १८. शुद्धपणा. १९. (यज्ञाचा) प्रयोग ( अनुष्ठान ) राहाणार नाहीं. २०. मेघांतील पाण्याचा थेंब. २१. देवी रजस्वला होती म्हणून पवित्र हविर्भाग घेण्यास ती गेली नाहीं. तो तसाच राहिला. नंतर याजानें त्याचें विसर्जन अग्निमुखांत केलें. मूळांत 'हे ब्रह्मन् ! माझें मुख मलिन आहे. दिव्य उटया माझ्या आंगाला लावलेल्या आहेत. पुत्रप्राप्त्यर्थ हवि घेण्याला मी सध्यां मिळण्यासारखी नाहीं. तरी याजा ! माझें प्रिय करण्याकरितां थांब' असें आहे ( अध्याय १६७।३७ ). ह्यावरून द्रुपदपत्नी रजस्वला नसून केवळ अस्नाता होती, असें दिसतें.

याज शिखिमुखीं[1] होमी[2] संततिपीयूषसागरा[3] हविला. ॥ १७
कवच-किरीट-शर-धनुश्चर्मासि-धरा[4] विभावसु[5] कुमारा ।
प्रसवे, वेदी[6] हि महाकन्यारत्न स्वभाव-सुकुमारा[7]. ॥ १८
कन्यारत्न जसें क्षिति[8] जनकाला[9] व्हावया सुख निवेदी[10], ।
तैसें चि द्रुपदाला भाग्यें होऊनियां सुखनि[11] वेदी[12]. ॥ १९
होय नभोवाणी[13] कीं, 'हे सर्वस्त्रीश्वरी[14] सुसत्कार्या[15] ।
अवतरली देवांच्या सिद्धिप्रति न्यावयासि सत्कार्या[16]. ॥ २०
भय जानकीनिमित्तें झालें रात्रिंचरां[17] जसें होतें, ।
एतन्निमित्त[18] साध्वस[19] सनृपजनां कौरवां तसें हो! तें' ॥ २१
ऐसें श्रवण करुनि नरराज हि याज हि सहास्वजन[20] नाचे. ।
गाणार सुर हि झाले दिव्यकुमारीकुमारजननाचे[21]. ॥ २२
राज्ञी[22] म्हणे, 'मुने! हे कन्या हा सुत हि कल्पनग[23] मोहो[24] ।
माता जाणोत मला, हविराहुति[25] माय, यांसि न गमो हो[26]! ॥ २३
'धृष्टद्युम्न' असें त्या पुत्राचें नाम अर्थ[27] साधूनी ।
'कृष्णा'[28] हें कन्येचें केलें अभिधान[29] सर्व साधूनीं. ॥ २४
याजाच्या मंत्रबळें त्यांला[30] वाटे खरी च जननी ती[31], ।

---

१. अग्निमुखीं. २. हवन करी. ३. संततिरूप अमृताचा सागरच अशा. ( हवीचें विशेषण ). ४. चिलखत, मुगुट, बाण, चाप, ढाल आणि तरवार यांतें धारण करणाऱ्या अशा. ५. अग्नि. ६. अग्निकुंड. ७. जात्या कोमल. ८. पृथ्वी. ९. जनकराजाला. १०. अर्पण करी. ११. उत्तम खाण. १२. वेदी देई ( निवेदी ). १३. आकाशवाणी. १४. सर्व स्त्रियांमध्यें श्रेष्ठ. १५. उत्तम सत्कारास योग्य. १६. दुष्टांचा क्षय हें देवांचें उचित कार्य. १७. राक्षसांना. १८. हिच्या ( द्रौपदीच्या ) योगें. १९. भय. २०. स्वकीय जनांसह. २१. द्रौपदी आणि धृष्टद्युम्न यांच्या जन्माचे. २२. पार्षती, पृषताची सून. २३. कल्पवृक्ष. २४. मोहित करो. 'मोहें' असें पाठांतर. २५. हवीची ( यज्ञद्रव्याची ) आहुति. २६. यांसि हविराहुति [ हीच आपली ] माय [ असें ] न गमो ( न वाटो )—असा अन्वय. 'हें' असें पाठान्तर. २७. 'धृष्टद्युम्न' या शब्दाचा अर्थ धरून. धृष्ट म्ह० प्रगल्भ आणि द्युम्न म्ह० वित्त ( राजांचें बलरूप धन ) असा शब्दार्थ होतो. बल, शत्रूत्कर्षासहिष्णुत्व, कवचकुंडलादिकांसह जन्म, शस्त्रास्त्रशौर्य इत्यादि गुणांनीं संपन्न असल्यामुळें कुमारास धृष्टद्युम्न असें नांव ठेविलें. ( आदिपर्व, अध्याय १६७ श्लोक ५३ ). २८. वर्णानें काळी असल्यामुळें हिला कृष्णा असें नांव ठेविलें. २९. नांव. ३०. त्या दोघां मुलांना. ३१. द्रुपदाची भार्या.

मोहप्रदा[1] जरि तरी त्या मुनिची गाति साधुजन नीती. ॥ २५

द्रोण तयास हि पढवी, जरि झाला स्वनिधना[2] असें कळलें. ।

कीं, भाविं[3], यश न मळलें, यत्नशतें ही कधीं नसे टळलें. ॥ २६

जें न मिळालें अन्या तिळमात्र हि वेचितां हि कायशतें[5], ।

भृत्यजिता[6] अजिता कीं लाभे त्या सुज्ञनायका[7] यश तें. ॥ २७

## अध्याय तेहतिसावा.

भेटोनि व्यास म्हणे पौत्रांसि[9], 'तुह्मां सुखाब्धिमज्जन[10] हो, ।

तुमच्या सत्कीर्तीनें बहु लज्जित अन्य कीर्तिमज्जन[11] हो[12]. ॥ १

ऐका सुकथा, कोणी ऋषिकन्या तप करूनि अत्यर्थ[13], ।

शंभूप्रति आराधी[14] बहुकाळ तपोवनांत पत्यर्थ[15]. ॥ २

दर्शन देउनि हर 'वर माग' असें वचन तो अगाध[16] वदे. ।

ती पांचदां म्हणे, 'मज देवा! वरदेश्वरा[17]! अगा! धव[18] दे.' ॥ ३

शंभु म्हणे, 'पांच दिले. त्यांची जन्मांतरांत[19] नवरी हो,' ।

१. भ्रम उत्पन्न करणारी, खोट्याला खरें भासविणारी. २. आपला नाश करण्याकरितां. ३. भावी, पुढें होणारें, विधिलिखित. यत्नशतें ही भावि कधीं टळलें नसे [ आणि ] [ कोणाचें ही पवित्र ] यश [ कधींही ] मळलें न ( नसे )–असा अन्वय. किंवा न मळलें यश ( पवित्र अशी कीर्ति ) यत्नशतें ही कधीं टळलें नसे, [ असें तो द्रोण ] भावि ( समजे, मानी )–असा अन्वय. आपला बध करण्याकरितां धृष्टद्युम्न उत्पन्न झालेला आहे, असें द्रोणास माहीत होतें. तरी त्यानें द्वेषानें किंवा द्रुपदराजाकडून मिळविलेलें राज्यार्ध जाईल या भयानें धृष्टद्युम्नाला विद्या शिकविली नाहीं, अशी अकीर्ति होऊं नये, यास्तव त्यानें त्याला विद्यादान केलें, हा भावार्थ. ४. 'यश कधीं झांकत नाहीं आणि होणारें कधीं चुकत नाही' अशी एक म्हण आहे, ती ह्या गीत्यर्धांशीं समानार्थक आहे. 'भवितव्यता बलवती' 'भवितव्यं भवत्येव नारिकेलफलाम्बुवत्' इत्यादि वचनें प्रसिद्धच आहेत. ५. देहशतें, शेंकडों देह. ६. दासांनीं ( भक्तांनीं ) जिंकिलेल्या अजिताला ( देवाला ). ७. विद्वद्वर्य अशा द्रोणाचार्याला. ८. येथें मूळांतील १६७ वा अध्याय संपतो. ९. नातवांस. व्यास हा सत्यवतीचा पुत्र आणि पांडव हे तिचे प्रपौत्र ( पणतु ), तेव्हां ते व्यासाचे पौत्र. १०. सुखरूप सागराचें स्नान. ११. कीर्तिमान् जन. १२. होवो. १३. बहुत. १४. आराधना करी. १५. पतीकरितां. १६. गंभीर. १७. वर देणाऱ्यांमध्यें श्रेष्ठा! १८. पति. १९. अन्य ( पुढील ) जन्मीं.

ती प्रार्थूनि[1], म्हणे, 'हें काय? सती बहुवरांसि न वरी, हो!' ॥ ४
देव म्हणे 'तूं पति दे, ऐसें वदलीस पांचदां साचें, ।
करणें लागे प्रार्थित मज टाकुनि पेंचेपांच[2] दासाचें.' ॥ ५
वर दे वरदेश[3] जिला, झाली ती द्रुपदकन्यका, नातें ।
येतें तुम्हांकडे हें, जाऊं द्यावें न अन्य कानातें. ॥ ६
द्रुपदपुरीं च रहा, जा, तेथ तुम्हांला वरील नवरी ती, ।
तोंवर हे[4] चि असों द्या, बुध हो! दावूं नका चि नव रीती[5]. ॥ ७
पृषतकुळनंदनींच्या[6] व्हाल वरुनि त्या सभाग्य वल्लीला[7] ।
बहु लाजतील तुमच्या लीलेला सर्वभाग्यवल्लीला[8].' ॥ ८
मुनि गेल्यावरि दिंतिति त्यां[9], सेवी यत्पदांबुजा[10] मा[11] ते, ।
मग[12] तेथूनि निघाले, व्हाया पांचाळराज-जामाते. ॥ ९
मार्गासि अहोरात्र[13] क्रमितां रात्रौ धरूनि कोलीत[14], ।
चाले धनंजय पुढें खपथींच्या[15] घनतमासि[16] सोलीत[17]. ॥ १०
त्या उल्मुकें[18], कुठारें[19] घनवनसें[20], निबिड तिमिरें[21] भंगे तें. ।
आले जों ते पांडव रात्रौ मार्ग क्रमूनि गंगेतें[22]. ॥ ११
कोपे गंधर्वांचा राजा अंगारपर्ण[23] पाहूनी, ।
दापूनि[24] म्हणे, 'वांचा मागें परतोनि, दूर राहूनी. ॥ १२
इच्छित असाल व्हाया जरि खगपतिगृहबिलेशया[25]सम[26] यों[27]. ।

---

१. मागितलेलें (इष्टकार्य). २. पेंचपांच टाकुनि=सरळपणानें, डावपेंच न लढवितां. भोळ्या शंकराचा भोळेपणा प्रसिद्धच आहे. पेंचपांच=डावपेंच, छक्केपंजे. ३. वर देणाऱ्यांमध्यें श्रेष्ठ (शंकर). ४. हे (रीति) असों द्या, हल्लींचाच द्विजवेष ठेवा. ५. क्षत्रियत्वप्रकाशक नवी रीति. ६. पार्षतकुळरूप नंदनवनींच्या. नंदनवन हें इंद्राचें उद्यान होय. ७. लतेला (अर्थात् द्रौपदीला). ८. सर्व भाग्यवंतांच्या लीला. ९. कृष्णाला. १०. ज्याच्या पदकमलाला. **पर्यायोक्ता**लंकार. ११. लक्ष्मी. १२. येथें मूळांतील १६९ वा अध्याय संपतो. १३. रात्रंदिवस. १४. जळतें लांकूड. १५. 'गतिरोधकपथतमासि कोलीत' असाही पाठ आहे. कोलीत=कोलवीत, दूर करीत. १६. निबिड अंधकाराला. १७. सोलणें=साल काढून टाकणें. सोलीत=कमी करीत, नाहींसा करीत. १८. कोलितानें. १९. कुऱ्हाडीनें. २०. दाट अरण्यासारखें. २१. अंधकार, काळोख. 'तिमिर' हा शब्द संस्कृतांत पुल्लिंगी व नपुंसकलिंगी आहे. २२. सोमाश्रयायण नामक गंगातीर्थास आले. २३. गंधर्व चित्ररथ. २४. दटावूनि. २५. खगपति+गृह+बिलेशय+सम=

नाहीं लंघीत कधीं, जे मुनिवर, ते हि लेश या समया. ॥ १३
गंधर्व-यक्ष-राक्षस-भाग निशो, नरविभाग दिन, याला ।
वेदप्रमाण, रक्षिति बुध मर्यादा धरूनि विनयाला. ॥ १४
गंधर्वराज मी, या करिति क्रीडा जळांत मज्जाया, ।
बालिश हो! येतां कां प्राणव्यसनाब्धिमाजि मज्जाया?' ॥ १५
जिष्णु म्हणे, 'रे! मंदा! गंगास्नानासि नियम काळाचा? ।
कोण करील स्वांबाभिगमीं उत्साहभंग बाळाचा? ॥ १६
रात्रौ थान न घ्यावें, घ्यावें दिवसा चि,' जो असें वदता ।
त्यालागिं पशुत्वाची साची साजे सुधीमतें पदता. ॥ १७
हो दूर, मार्ग सोडुनि रविचा, तम होतसे जसें दूर. ।
गृध्र नव्हे चि अरुणसखे, आनखशिख विखरितां हि सेंदूर.' ॥ १८
गंधर्वराज कोपे, सोडी शर, जे शिखी च तिखटपणें, ।
दाविति तें, जें भेकीं दाखविति क्षुधित उग्रविख टपणें. ॥ १९
खंडी शरांसि अर्जुन लीलेनें फिरवुनी अलातातें, ।
धरि, मोहुनि अग्न्यस्त्रें; नकुळ म्हणे, 'जिंकिला भला तातें.' ॥ २०

---

गरुडाच्या गृहांत गेलेल्या सापाप्रमाणें. २६. बिलेशय=सर्प ( बिले शयनं यस्य सः बिलेशयः= बिळांत निजणारा ). २७. पुढें या.

१. नियमाला. २. गंधर्वादिकांचा संचारकाल निशा आणि मनुष्यांचा संचारकाल दिवस. ३. माझ्या स्त्रिया. ४. मूर्ख हो! ५. प्राणसंकटरूप सागरांत. ६. बुडाया. ७. आपल्या आईकडे जात असतां. ८. सुज्ञांच्या मतानें. ९. स्थानत्व, पदवी. १०. रविचा ( मार्ग सोडूनि ) जसें तम दूर होतसे [ तसें तूं ] मार्ग सोडुनि दूर हो–असा अन्वय. ११. अंधकार, काळोख. 'तमस्' हा शब्द संस्कृतांत पुल्लिंगी व नपुंसकलिंगी आहे. १२. अरुणाचा मित्र ( सूर्य ). हें अर्ध सुभाषितरूप आहे. १३. नखापासून शेंडीपर्यंत. १४. गृध्र आनखशिख सेंदूर विखरितां हि अरुणसख नव्हे चि– असा अन्वय. १५. 'गंधर्वराज कोपें सोडी शर' असें पाठान्तर. १६. अग्नीच. १७. भयंकर सर्प ( ज्यांचें विष भयंकर आहे असे ). १८. टपून बसणें, लक्ष लावून बसणें. जें टपणें क्षुधित उग्रविख भेकीं ( बेडकाच्या ठिकाणीं ) दाखविति, तें ( टपणें ) [ शर ] दाविति–असा अन्वय. ते बाण अग्नीसारखे तिखट असून, त्यांचा नेम इतका नेमका व अचूक होता, कीं जणूं काय भुकेलेला भयंकर सर्पच बेडकावर टपून बसला आहे, असें वाटत होतें–असा भाव. १९. 'शरासि' असा रा० पराडकर यांच्या प्रतींत पाठ आहे. २०. कोलितातें. २१. अग्न्यस्त्र=ज्याची देवता अग्नि आहे असें अस्त्र. २२. वडील भावानें ( अर्जुनानें ). 'ज्येष्ठो भ्राता पितुः समः' असें वचन आहे.

केशीं धरूनि त्यातें ओढुनि धर्मासमीप जों आणी, ।
पत्यभयार्थ[1] प्रार्थी जोडुनि कुंभीनसी[2] सती पाणी[3]. ॥ २१
धर्म म्हणे, "हे याची मज म्हणत्ये नमुनि बायको, 'पावें, ।
सोडीं,' सिंहें शशकीं, मशकीं गरुडें हि, काय कोपावें ?" ॥ २२
जिष्णु[4] म्हणे, 'गंधर्वा ! देतो तुज अभय आर्य[5], जा, वांचें, ।
न सरो त्वदायु, न सरे जेंवि विवाहान्त कार्य जीवांचें[6].' ॥ २३
गंधर्व म्हणे, 'त्यजिलें म्यां निज अंगारपर्ण[7] हें नाम, ।
'चित्ररथ' म्हणा, मज तूं मान्य तसा जेंवि भार्गवा[8] राम[9]. ॥ २४
मी चाक्षुषी[10] स्वविद्या[11] देतों, घ्या दिव्य पांचशत[12] वाजी[12] ।
श्रीपद्म[13] हो ! तुम्ही निजसख्यरसीं[14] हा द्विरेफ[15] तरवा[16], जी ! ॥ २५
घेउनि फळाद्युपायन[17] हर्षवितो तात पदनतापत्या[18] ।
तैसें करीं, म्हणो, 'हूं' मात्र तुझें दानि[19] वदन, तापत्या[20] !' ॥ २६
जिष्णु म्हणे, 'सख्य असो, माझें मज 'हूं' म्हणों न दे शीलें[21], ।

---

१. पतीला अभय मिळावें याकरितां. २. गंधर्वस्त्रीचें नांव. ३. हात. ४. अर्जुन. ५. धर्मराज. ६. परस्परबंधुस्त्रियांचें. ७. अंगार म्हणजे निखारा, त्यासारखें भास्वर आणि दुःस्पर्श आहे पर्ण (वाहन, रथ) ज्याचें, तो. ८. परशुरामास. ९. दाशरथी रामाचा पराक्रम पाहून तो जसा जामदग्न्याला मान्य झाला तसा. १०. नामविशेष ( विद्येचें विशेषण ). ११. आपली चाक्षुषी विद्या. जगांतील कोणताही विषय आपल्या चक्षूनें म्हणजे नेत्रानें जसा पाहावा असें इच्छावें, तसा दिसतो, म्हणून ह्या विद्येला 'चाक्षुषी विद्या' असें नांव आहे. हिचें महाभारतांत वर्णन आहे तें:— 'यच्चक्षुषा द्रष्टुमिच्छेत्रिषु लोकेषु किंचन । तत्पश्येद्यादृशं चेच्छेत्तादृशं द्रष्टुमर्हति ॥.' या विद्येच्या योगें वस्तु कोणत्याही प्रकारची असो, ती पाहणाराला त्याच्या संकल्पानुसार दिसते. १२. प्रत्येकाला शंभर असे पांचशें घोडे. १३. लक्ष्मीचें विलासमंदिर जें कमल, त्यासारखे. १४. आपली मैत्री हाच [ कमलांतील ] रस, त्यामध्यें. १५. दोन 'र्'कार आहेत ज्याच्या नांवांत तो. ( भ्रमर= भ्+र्+अ+म+र्+अ; चित्ररथ=चित्+र्+अ+र्+अथ ). 'द्विरेफ' शब्दावर श्लेष आहे. द्विरेफ=भ्रमर; ( पक्षीं ) चित्ररथ. १६. तरावयास लावा. १७. फळें इत्यादि उपायन (नजराणा). १८. पदीं नम्र झालेल्या अपत्याला ( मुलाला ). १९. दानाविषयीं 'हूं' म्हणो, स्वकार देवो. रा० पराडकर यांच्या प्रतींत 'दानि' असा पाठ आहे. २०. तपतीवंशोद्भवा ! ( अर्जुना ! ). तपती ही सूर्याची कन्या आणि सोमवंशीय संवरणनामक राजाची स्त्री. हिला वैवस्वती तपती असें म्हणतात. हिची कथा मूळ अध्याय १७१–१७३ यांत दिली आहे. २१. माझें शील मज 'हूं' म्हणों न दे–असा अन्वय. माझें शील मला दानाचा स्वीकार करण्यास स्वकार देत नाहीं–असा भाव.

[1]अस्त्रविनिमयें घेऊं विद्या, जरि 'हूं' म्हणोन देशील. ॥ २७
पुसतों तें हि वद खरें आम्ही [2]केवण्या गुणें उणे गमलों ? ।
[3]धर्षण कां [4]त्वां केलें ? धर्मपथीं तों न लेश हि भ्रमलों. ॥ २८
भारत पौरव कौरव आम्ही, तापत्य, वद, कसें ? वदतां ।
उच्चारिलें सख्या ! हें 'तापत्य' असें नवें चि कीं पद तां.' ॥ २९
चित्ररथ म्हणे, '[5]आश्रमरहित अहां, एक हें तुम्हांत उणें, ।
आणि [6]पुरोहित हि नसे, धर्षण केलें कळोनि या चि गुणें. ॥ ३०
असतें पुरोहितकवच, लागों देतें न हा उपद्रव तें. ।
[7]ब्राह्महिमें घन, अल्पें अहितोष्णें क्षात्र हें तुप द्रवतें. ॥ ३१
वाढो भुजसागरबळजळ, तुमचें [8]वांच्छिलें पुरो, हित [9]हो, ।
शक्रें बृहस्पति तसा, विजयार्थ बरा [10]वरा पुरोहित, [11]हो ! ॥ ३२
वदलों 'तापत्य' असें तें सत्य चि, तत्कथा तुम्ही परिसा. ।
तुमचा [12]पूर्वज होता [13]संवरण महायशा बळी [14]हरिसा. ॥ ३३

---

१. अस्त्रांच्या अदलाबदलीनें. २. येथें रा० पराडकर यांच्या प्रतींत 'कवणा गुणें' असा पाठ आहे. ३. अपमान, निंदा, प्रतिबंधरूप उपद्रव. ४. त्वां. ५. गृहस्थाश्रमरहित, स्त्रीरहित. ( तुम्ही अग्नि ठेविलेला नाहीं, आहुति टाकीत नाहीं आणि ब्राह्मण पुरोहित नेमिलेला नाहीं; यामुळें मीं तुमचा अपमान केला-असें मूळांत आहे. अध्याय १७०।६० पहा ). ६. उपाध्याय, कुलगुरु. प्रत्येक मनुष्याला कोणी तरी मार्गदर्शक असणें अवश्य आहे व तो मोठा विद्वान असला पाहिजे, हें उघडच आहे. पुरोहित कसा असावा किंवा पुरोहित होण्यास कोणते गुण लागतात याचें निरूपण पुढील पद्यांत केलेलें आहे:—त्रय्यां च दंडनीत्यां च कुशलः स्यात्पुरोहितः । अथर्वविहितं कुर्यान्नित्यं शांतिकपौष्टिकम्. ॥ इति कामंदकः; अथवा—पुरोहितं च कुर्वीत दैवज्ञैर्मुदितोदितम् । दंडनीत्यां च कुशलमथर्वाङ्गिरसे तथा. ॥ इति मिताक्षरायाम्. ७. क्षात्र=( क्षत्रियतेज ) हें तूप आणि ब्राह्म ( ब्राह्मणाचें तेज ) हेंच हिम. हिमाच्या योगें तूप घन ( घट्ट, दाट ) होतें, व हिमाचा संयोग नसतां अल्पें अहितोष्णें ( थोड्याशा शत्रुरूप उष्णतेनें ) तें तूप द्रवतें ( पातळ होतें ). तुमचा पुरोहित तुमच्याबरोबर असता, तर तुमचें तेज घन झालें असतें-असा ह्मणण्याचा भाव. 'ज्या राज्यांत ब्राह्मण प्रमुख आहेत तें राज्य चिरकाल टिकतें' असें मूळांत आहे ( अध्याय ७१०।८१ ). त्यास उद्देशून हें चित्ररथाचें भाषण आहे. ८. वांच्छित परिपूर्ण होवो. ९. होवो. १०. निवडा, नेमणूक करा. ११. येथें मूळांतील १७० वा अध्याय संपतो. १२. पांडवांपासून अकरावा पूर्वज आणि ब्रह्मदेवापासून छत्तिसावा वंशज. १३. राजविशेष. हा पूरुकुलोत्पन्न अजमीढराजाचा नातू. ह्याला तपतीपासून कुरु नांवाचा पुत्र होता. १४. सिंहासारखा.

साधुमतिमक्षिकांला[१] झाली स्थिति[२] शुद्ध शर्करा ज्याची, ।
भक्ति सदा वाखाणी निजभक्तजनांत अर्क[३] राजाची. ॥ ३४
अनुरूप[४] वर मिळावा, या कामें तीव्र जी करी तप ती, ।
अर्क म्हणे, 'संवरणा द्याया स्वसुता असे बरी तपती[५].' ॥ ३५
मृगयेसि एकदा तो जाय, मृगानुसरणें[६] चुके कटका[७], ।
अश्व हि मरे गिरिवनीं, हिंडे मार्ग भ्रमोनि एकटका[८]. ॥ ३६
त्या समयीं एकांतीं दर्शन दे त्या नृपासि ती तपती ।
यत्सख्यार्थ[९] सुरसुता[१०] सांबशिवातें[११] उपासिती[१२] तपती[१३]. ॥ ३७
भूप[१४] म्हणे, 'जन्मुनि जें कुळ केलें धन्य, सांग सुंदरि[१५] ! तें. ।
मत्कर्णांनीं केलें वृत्तरस[१६] भरावया स्व-तुन्द[१७] रितें. ॥ ३८
त्वन्माता जी, साजे रत्नाकर[१८] बंधु, आयताक्षि[१९] ! तिला[२०]. ।
स्वर्गशताधिक[२१] महिमा आला आतां चि आयता क्षितिला[२२] ! ॥ ३९
नयनद्वय[२३] भूरितृषा[२३], त्वद्वपु[२४] पीयूषवर्षि[२५] सुतनो[२६] ! हें. ।
हळहळतों बहु, कीं मी दशशतदृक्[२७] कश्यपर्षिसुत[२८] नोहें.' ॥ ४०
विनवी असें, परि न ती उत्तर दे भानुजा[२९], अदर्शन[३०] दे. ।

---

१. सज्जनांच्या बुद्धिरूप माशांना. २. शील, सद्वर्तन. ३. सूर्य. संवरण हा सूर्योपासक होता. ४. सदृश, योग्य, ५. सूर्यकन्येचें नांव. ६. हरिणांचा पाठलाग करीत असल्यामुळें. ७. सैन्याला. ८. एकटा. ९. ज्या संवरण राजाच्या सख्यासाठीं. १०. देवांच्या कन्या. ११. अंबा ( भवानी ) सहित शंकराला, गौरीशंकराला. १२. पूजिती. १३. तप करिती. १४. संवरण. १५. येथें 'हे सुंदरि ! तुझें नांव काय?' असें सरळ न विचारतां पर्यायानें वळसा घेऊन विचारिलें आहे, म्हणून येथें **'पर्यायोक्त'** नामक अलंकार झाला आहे. १६. वृत्तांतरूप रस. १७. आपलें पोट. 'मत्कर्णांनीं वृत्तश्रवणरस भरावया स्व उदर रितें' असा पाठभेद. १८. सागर. ( रत्नांचा आकर ह्मणजे खाण. समुद्राच्या उदरांत मोत्यें इत्यादि रत्नें सांपडतात, हें सुप्रसिद्धच आहे ). १९. हे विशाललोचने ! २०. जी त्वन्माता तिला रत्नाकर बंधु साजे–असा अन्वय. ज्याप्रमाणें समुद्रांतून रत्नें निघतात, त्याप्रमाणें तुझ्या मातेच्या पोटीं तुझ्यासारखीं रत्नें निघतात, म्हणून 'रत्नाकर' ( समुद्र ) हा तिला बंधु शोभतो–असा भाव. २१. शंभर स्वर्गांपेक्षां अधिक. २२. पृथ्वीला. २३. मोठी तृषा ( तहान ) लागली आहे ज्यास असें नयनद्वय. २४. तुझें शरीर. २५. अमृतवृष्टि करणारें. २६. हे सुंदरि ! २७. सहस्र नेत्र आहेत ज्याला असा. २८. कश्यपऋषिसुत ( इंद्र ). २९. सूर्यजा ( तपती ). ३०. अंतर्धान पावे. येथें मूळांतील १७१ वा अध्याय संपतो.

[1]तो समय जसा त्याला, ताप चकोरासि तेंवि दर्श[2] न दे. ॥ ४१
संवरणीं होय तिचा, सीतेचा विरह तो जसा रामीं. ।
सांगों काय बहु? असो; कथितों तुज ती कथा चि सौ[3]रा मीं. ॥ ४२
नृप मूर्च्छित पडतां, ती भेटोनि म्हणे, 'अहो! पहा हे मीं, ।
कोण कुशळ जन मणि[4]ला न म्हणेल 'जडोनियां रहा हे[5]मीं.' ॥ ४३
मी [6]तपनसुता तपती, विनवा माझ्या, मदर्थ, जनकास, ।
**तरती मनोरथातें निजधर्माची धरोनि जन कास. ॥ ४४**
**धर्में[7]करूनि भजतां होतांहे विषलता हि सोम[8]-लता; ।**
**त्यजितां धर्मपथातें धरिते पीयूषवल्लि[9] सोमलं[10]-ता.' ॥ ४५**
[11]'गांधर्वें मजला भज' ऐसें विनवी नृपाळ, परि तपती ।
पितृ[12]संकोचें गेली; पडला ती[13]चा विलाप करित पती. ॥ ४६
शोधीत स[14]चिव आला, झाला क[15]श्मळ समस्त हरिता तें. ।
करुणा करी तयावरि जेंवि करावी [16]स्वसूनुवरि तातें. ॥ ४७
सचिव म्हणे, 'रविला चि प्रार्थीं, दुसरा उपाय न करावा.' ।

---

१. तो समय त्याला (संवरणाला) जसा (ताप दे) तेंवि दर्श चकोरासि ताप न दे–असा अन्वय. २. अमावास्या. चकोर चंद्रकिरणांचें पान करून राहातो, असा कविसंकेत आहे. अमावास्येच्या रात्रीं चंद्रकिरण मिळूं शकत नाहींत, म्हणून चकोरास दुःख होणें साहजिक आहे. 'चकोर' शब्दाचा विग्रह असा आहे.—चकति चन्द्रामृतपायित्वाद्विषं प्रतिहन्ति चक् तृप्तौ प्रतिघाते च चकोरः। चकति तृप्यते ज्योत्स्नया इति चकोरः' इति स्वामी. ३. श्रेष्ठ, उत्तम. ४. मण्याला. मणी=रत्न, भूषण. ५. सुवर्णीं (सुवर्णाच्या कोंदणांत). 'रत्नं समागच्छतु काञ्चनेन' (रघुवंश, सर्ग ६।७९) ह्या कालिदासोक्तीची छाया ह्या गीत्यर्धावर पडलेली आहे. ६. सूर्यकन्या. ७. 'धर्मैंकरूनि भजतां होइल हे' असें पाठान्तर. ८. सोमसंज्ञकवल्ली. यज्ञांत हिचा रस काढून पितात, अशी प्रसिद्धि आहे. ९. अमृतवल्ली. १०. सोमलपणा, विषत्व. ११. गांधर्वसंज्ञक विवाहानें. मनुप्रोक्त अष्टविध विवाहांपैकीं एक. वधूवरांचा अन्योन्यानुराग असला म्हणजे हा विवाह होतो. (मनस्मृति, अध्याय ३ श्लोक २०–३४ पहा). १२. बापाचा (सूर्याचा) संकोच होता म्हणून, सूर्याची अनुमति नव्हती म्हणून. तपती स्वतःसिद्ध (स्वतंत्र) नव्हती–असा भाव. येथें मूळांतील १७२ वा अध्याय संपतो. १३. तिचा=तिच्याविषयीं, तिच्याबद्दल विलाप. येथें पति=पालक, स्वामी, अर्थात् राजा–असा अर्थ घेणें इष्ट आहे. कारण संवरण व तपती यांचा विवाह अद्याप व्हावयाचाच आहे. १४. राजाचा अमात्य. १५. मोह, मूर्च्छा. १६. आपल्या मुलावर. मूळांतही असेंच वर्णन आहे. (अध्याय १७३ श्लोक ५).

करितां [1]तसें चि भेटे [2]आपव, सरतां चि [3]दिवस अकरावा. ॥ ४८
ज्याचें तेज न तापद, ज्या लोपविलें नसे चि [4]चरमागें, ।
तो [5]अपर अद्भुत [5]तपन, नरपतिस म्हणे, 'अभीष्ट वर मागें.' ॥ ४९
भेटोनि जेधवां त्या अभयवरातें मुनींद्र आपव दे, ।
[6]यापरि संवरण तया [7]प्रभुला कळवूनि आत्मताप वदे:—॥ ५०
'आंगें चि वारिला त्वां [8]प्रणतार्तांचा न ताप वारविला. ।
यास्तव मदर्थ कन्यारत्नातें माग आपवा ! रविला.' ॥ ५१
कार्यार्थ [9]व्योमपथें गेला हो ! तो रवि[10]प्रतिम हर्षी. ।
श्रीमान् वसिष्ठ भेटे, दुसरा रविसा रविप्रति महर्षी. ॥ ५२
सूर्य म्हणे, 'वद तुज जें व्हावें, देतों [11]असंशयें मुने ! तें. ।
म्यां [12]सन्मतितें पुरवुनि [13]आळ सुखविलें, तसें न [14]यमुनेतें.' ॥ ५३
मुनितिलक म्हणे, 'झाली [15]पावुनि [16]धात्री [17]अनामया ज्यातें, ।
तपती मागों आलों मी त्या संवरणनाम [18]याज्यातें.' ॥ ५४
रवि आणवूनि हर्षें मुनिहस्तीं दे [19]तदेव तनयेतें, ।
[20]नित्याराधित जें कां कामा वर देत दैवत न ये तें ? ॥ ५५

---

१. सूर्याची आराधना करीत असतां. २. वशिष्ठ ऋषी ( मागें पृष्ठ १२९ टीप ४ पहा ). हा संवरण राजाचा पुरोहित होता. ३. बाराव्या दिवशीं. ४. चरम+अगें=अस्ताचलानें. चरम=पश्चिमेकडचा. ५. अपर तपन=( जणूं काय ) दुसरा सूर्यच असा ( वशिष्ठ ). अद्भुत=अलौकिक. ६. यापरि=खालीं दिल्याप्रमाणें. ७. समर्थाला ( वशिष्ठाला ). ८. नम्र अशा पीडितांचा, किंवा—नम्र आणि पीडित अशांचा. संवरण राजाच्या भाषणाचा मथितार्थ:—तुम्ही आजपर्यंत पुष्कळांचे ताप स्वतः निवारण केले, परंतु दुसऱ्याकडून दुसऱ्याच्या तापाचें निवारण तुम्ही करविलें नाहीं. यास्तव माझी विनंति आहे, कीं आपण माझा ताप सूर्याकडून निवारवावा. ९. आकाशमार्गानें. १०. सूर्यासारखा. प्रतिम=सदृश. ११. निःसंशय, खात्रीनें. १२. चांगली मति आहे ज्याची, अशा सज्जनाला. १३. लळा, हट्ट. १४. यमुना नदी ही सूर्याची कन्या. मी सज्जनांचे हट्ट पुरवितों, पण माझी प्रिय कन्या जी यमुना, तिचेही हट्ट पुरवीत नाहीं—असा भाव. १५. पावणें=मिळणें. संवरण पृथ्वीचें शासन करावयास मिळाल्यामुळें, संवरण हा पृथ्वीवर राज्य करीत असल्यामुळें—असा भाव. १६. पृथ्वी. १७. सुखरूप, आमय (रोग) रहित. १८. यजमानासाठीं. याज्य=यजमान, ज्याच्यासाठीं यज्ञ करितात तो. १९. तेव्हांच. २०. ज्याची नित्य आराधना केली जाते असें ( दैवत ). जें नित्याराधित दैवत तें वर देत कामा कां न ये ?—असा अन्वय. हें गीत्यर्ध सुभाषितरूप आहे.

गुरुनें दिली जसी ती सद्विद्या कीं सदोषधी[1] रमणी ।
तीनें सुखमय केला, जो होता तो सदोष[2] धीर[3]-मणी. ॥ ५६
पावोनि निवे तीतें तो नृप, रोगी जसा नवसुधेतें[4]. ।
भुलला तिला चि राजा, द्वादश वर्षें भजे न वसुधेतें[5]. ॥ ५७
तपतीस पुत्र झाला कुरु, तद्वंशीं तुम्ही म्हणोनि असें, ।
'तापत्य'नाम 'पौरव, कौरव' इत्यादि वंशनाम जसें[6].' ॥ ५८
जिष्णु वसिष्ठमुनीचा महिमा गंधर्वपतिमुखें परिसे, ।
ज्याचे वर्णन[7]-वर्ण त्रासद[8] दुरितांसि[9], करिकुळा[10] हरिसे[11]. ॥ ५९

---

## अध्याय चवतिसावा.



पार्थ[12] म्हणे, 'तो कोण ब्रह्मर्षि[13] असे ? मनोरम हि म्यां तें ।
तद्यश नसे परिसिलें, सांग सख्या[14] ! तूं तदीय[15] महिम्यातें.' ॥ १
गंधर्व म्हणे, 'होता कुशिक[16]तनुज गाधि[17] कान्यकुब्जपती[18], ।
तत्सुत विश्वामित्र प्रभु, यत्सेवेसि[19] नृप सदा जपती[20]. ॥ २
सबळसचिव[21] तो भूपति मृगया करितां वनीं बहु श्रमला; ।

---

१. उत्तम औषधी. **उत्प्रेक्षा**लंकार. २. मन्मथदोषाविष्ट, कामदोषरूप व्याधिपीडित. दोष= व्यंग, पाप, गुन्हा. ३. धीर=निश्चयी, जितेंद्रिय. संवरण राजानें कामपीडा सहन करण्यांत मोठा दृढनिश्चय प्रकट केला होता, म्हणून पंतांनीं 'धीर–मणी' ह्या पदाची योजना साभिप्राय केली असावी. **परिकरा**लंकार. ४. नव्या ( ताज्या ) अमृताला. ५. पृथ्वीला. संवरण आपलें राज्य सोडून विलासांत बारा वर्षें दंग झाला होता. ह्या काळांत राज्यांत दुष्काळ पडला, राज्य सोडून प्रजा परराज्यांत जाऊं लागली व जिकडे तिकडे बेबंदशाही माजली. तेव्हां वशिष्ठानें राजास परत आणिलें व पुन्हां सर्व स्थिरस्थावर केलें–इत्यादि येथील कथाभाग पंतांनीं गाळला नसता तर बरें झालें असतें. ६. येथें मूळांतील १७३ वा अध्याय संपतो. ७. वर्णनसंबंधी अक्षरें. ८. भीतिदायक. वशिष्ठाचें वर्णन ऐकतांच पापें पळून जातात–असा भाव. ही गीति म्हणजे पुढील कथानकाची प्रस्तावनाच होय. ९. पापांना. १०. हत्तींच्या कळपाला. ११. सिंहासारखे. १२. येथें पंतांनीं मूळ अध्याय १७४ यांतील वशिष्ठाचें माहात्म्य गाळिलें आहे. १३. (क्षत्रिय असून) ब्रह्मर्षि झालेला तो. १४. मित्रा चित्ररथा ! १५. त्या ब्रह्मर्षीच्या. १६. कुशिकाचा पुत्र. १७. राजविशेष. १८. कान्यकुब्जसंज्ञक देशविशेषाचा ( कनोज देशाचा ) स्वामी. १९. ज्या विश्वामित्राच्या सेवेला. २०. तत्पर असती. २१. सैन्य आणि अमात्य यांसहित.

दैवें वसिष्ठमुनिचें पुण्याश्रमपद विलोकितां रमला. ॥ ३
[1]स्वपदनतगाधिजातें सत्कारुनि मुनि म्हणे, 'अगा राया ! ।
जावें न क्षुधितें त्वां, येउनियां आमुच्या [2]अगारा या.' ॥ ४
वाल्मीकिच्या, जन जसा तृप्तिसि पावे कुळा[3]संकट, [4]कवनीं, ।
मुनिच्या [5]उटजीं तैसा तो गाधिज भूप ही [6]सकटक वनीं. ॥ ५
नृपति म्हणे, 'कोठुनि हें आलें साहित्य [7]जेवणा रानीं ? ।
[8]असद्गृहीं हि न कधीं वरिली [9]ती तृप्ति जेवणारांनीं. ॥ ६
जें न [10]नृपप्रासादें तें मुनिच्या [11]भुक्तिसुख दिलें [12]उटजें, ।
हें मोटें नवल; अहो ! लाजविला [13]पारिजात कीं [14]कुटजें ! ॥ ७
[15]वल्कलरुद्राक्षधर ब्राह्मण [16]अकृतान्ययत्न हा रानीं. ।
[17]बळ पूजिलें कसें हो ! [18]बहुमूल्य दुकूल[19]रत्नहारांनीं ?' ॥ ८
करितां शोध कळे, कीं उटजीं [20]सुरधेनुनंदिनी आहे. ।
पाहे तीस नृप, म्हणे मग मुनिला, 'गाय मागतों, द्या हे. ॥ ९
[20]अर्बुद गाई देतों अथवा देतों, स्वराज्य भोगाया, ।
दे गाय, काय विनि[21]मय हा [22]भवदर्थोन ? मान्य हो गा ! या.' ॥ १०
मुनिवर म्हणे, 'नृपा ! हें वचन तुझें मन्मनासि कंपा दे, ।
या धेनुबळें माझा हा [23]आश्रमधर्म [24]सांग संपादे. ॥ ११
कोण ज्ञाता राज्यस्वीकार करील [25]आधि ज्यामाजी ? ।
मागों नको, न [26]देयां, [27]हेयां हे धेनु गाधिजा ! [28]माजी.' ॥ १२

---

१. आपल्या चरणीं नम्र झालेल्या गाधितनयाला ( विश्वामित्राला ). २. गृहा. ३. सकट= सहवर्तमान. ४. कवितेंत ( रामायणांत ). ५. पर्णशाळेंत. ६. सैन्यासह. ७. जेवण्यासाठीं, भोजनाकरितां. ८. असत्+गृहीं=आपल्या घरीं. ९. 'हे तृप्ति' असें पाठान्तर. १०. राजवाड्यानें. ११. भोजनसुख. १२. पर्णशालेनें. १३. कल्पतरु. १४. कुड्याच्या झाडानें. १५. वल्कलें (झाडांच्या साली) आणि रुद्राक्ष धारण करणारा. १६. तपःस्वाध्याय-साधनावांचून दुसरा उद्योग न करणारा. १७. सैन्य. १८. बहुमोलाच्या रेशमी वस्त्रांनीं आणि रत्नांच्या हारांनीं. १९. कामधेनूची मुलगी. २०. दहा कोटी. २१. मोबदला. २२. भवत्+अर्थ+ऊन=तुमच्या अर्थाहून ( धेनूहून ) उणा ( कमी ). अर्थ=इच्छा, हेतु, वस्तु. २३. गृहस्थाश्रमांतील कर्तव्यकर्मे. २४. संपूर्ण, अशेष. २५. मनोव्यथा, चिंता. २६. द्यावयास योग्य. हे माजी धेनु देया न, [ तशीच ] हेया [ न ]–असा अन्वय. २७. सोडण्यास योग्य नव्हे. २८. माझी.

विश्वामित्र म्हणे, 'मी क्षत्रिय, [1]आधार जाण [2]तेजाचा, ।
[3]आज्ञामानसभंग न करिती [4]भद्रेच्छु [5]जाणते [6]जाचा. ॥ १३
[7]स्वाध्याय तुझें बळ, तूं ब्राह्मण, कैंचें [8]असह्य तेज [9]तुला ? ।
[10]पिप्पलजत्व सम असो; [11]दहनीं [12]तेजस्विता न ते [13]जतुला. ॥ १४
[14]मानधन प्रभु मी, जें वदलों कर्तव्य तें करीन खरें. ।
ऐसा कोण प्राणी, ज्यातें न करील वश [15]हरी [16]नखरें ?' ॥ १५
भगवान् वदे, 'बळी तूं, तुझिया [17]चतुरंग सैन्य [18]सांगातें. ।
तुज कर्तव्य असे जें सिद्ध न करिसी [19]अभीष्ट कां गा ! तें ?' ॥ १६
[20]कौशिक [21]अनुगांसि म्हणे, '[22]सोडों हो ! धेनुला, चला, [23]हांका. ।
हा काय [24]रत्नभोक्ता ? मारू [25]अनुताप पावुनी [26]हांका.' ॥ १७
दंडें ताडुनि नेतां, फोडी ती धेनु फार हंबरडे. ।
तेव्हां आश्रमवासि [27]द्विजमृगखगदेवता[28]कदंब रडे. ॥ १८
नेतां बळें चि धांवत येउनि ती मुनिपुढें उभी राहे, ।
आणूनि लोचनीं जळ, बहुदीनत्वें मुखाकडे पाहे. ॥ १९
धेनु म्हणे, 'स्वामी ! त्वां पालन केलें, करी न बाप तसें, ।
कां मज उपेक्षिलें ? हो ! मी खळदंडें [29]उदंड तापतसें.' ॥ २०
साधु म्हणे, 'मज हृदयीं [30]शत, तुज बाहेर हे [31]कशा लागे. ।

---

१. वसतिस्थान. २. क्षात्रतेजाचा, वीर्याचा. ३. आज्ञा न पाळणें व मन मोडणें. ४. आपलें कल्याण व्हावें असें इच्छिणारे. ५. शहाणे. ६. ज्याचा. ७. वेदाध्ययन. ८. न सोसण्याजोगें, सोसण्यास कठीण. ९. तुझ्या ठिकाणीं. १०. पिप्पलोत्पन्नत्व. ११. अग्नींत. १२. तेजस्वीपणा, कांति. १३. लाखेला. पिंपळाच्या लांकडापासून अग्नि उत्पन्न होतो व सालीपासून लाख उत्पन्न होते म्हणजे उत्पत्तीच्या बाबतींत त्यांच्यामध्यें साम्य आहे. परंतु अग्नीच्या ठिकाणीं असणारें तेज लाखेच्या आंगीं नसतें–असा अर्थ. १४. मान हेंच धन (संपत्ति) ज्याचें तो, स्वाभिमानी. १५. सिंह. १६. नखानें. १७. चार अंगें ( गज, अश्व, रथ आणि पदाति ) आहेत ज्याचीं तें ( सैन्य ). १८. बरोबर. १९. अभिप्रेत कार्य. २०. विश्वामित्र. २१. भृत्यांस. २२. 'सोडा हो ! धेनु ती, चला हांका' असें पाठांतर. २३. हांकून न्या. २४. [ नंदिनीरूपी ] रत्नाचा उपभोग घेणारा. २५. पश्चात्ताप. २६. बोंब. २७. 'द्विजमृगवनदेवताकदंब' असें पाठांतर. २८. कदंब=समूह. २९. पुष्कळ. ३०. तुझ्या पाठीवर चाबूक एकदां लागला, तर माझ्या हृदयांत शंभरदां लागतो. ३१. चाबूक.

मी ब्राह्मण क्षमावान्[1], माते ! रडतीस तूं कशाला गे ? ॥ २१
क्षत्रियतेज असें हें, जें तुजला पीडितें क[2]शापातें, ।
मत्तेज[3]क्षांति मला म्हणत्ये 'हां हां ! न ओक[4] शापातें.' ॥ २२
म[5]न्मति-दरींत न शिरे कोप[6]-मतंगज, विवेक[7]-हरि जा[8]गे; ।
म्यां न त्यजितां, नेतो भूप बळें, तुज रुचेल तरि जा गे !' ॥ २३
गाय म्हणे, 'भगवंता ! नसतां आज्ञा तुझी, न म[9]द्धरणीं ।
काळ हि बळी, किती[10] हा ? न तृणबळें वन्हि[11] होय बद्ध रणीं.' ॥ २४
विप्र म्हणे, 'नेला कीं दृढ बद्ध करूनि वत्स दा[12]व्यानें, ।
स्वबळें नृपें म[13]दाश्रम, देह जसा व्यापिला सदा [14]व्यानें. ॥ २५
शक्य असेल तरि रहा,' ऐसें मुनि बोलतां चि ती क्षो[15]भे. ।
ग्री[16]ष्मगमध्यान्हार्कप्रतिम तिचा देह तेधवां शोभे. ॥ २६
[17]धेनुमिषें त्या मुनिची सु[18]तपस्यासिद्धि कोपली वाटे ! ।
फाटे गा[19]धिजबळतम त्या च[20]पलेच्या धरूनियां वा[21]टे. ॥ २७

---

१. क्षमाशील आहें (कारण ब्राह्मणाचें बल क्षमा होय). मूळांत 'क्षत्रियाणां बलं तेजो ब्राह्मणानां क्षमा बलं । क्षमा मां भजते यस्माद्गम्यतां यदि रोचते.' ॥ असें आहे (अध्याय १७५।२९). २. चाबकाच्या प्रहारानें, कशाघातें. रा० **प**राडकर यांच्या प्रतींत 'जें तुजला पीडितो **कशापातें**' असा पाठ आहे. पण तो हस्तदोष किंवा मुद्रणदोष आहे, हें स्पष्टच आहे. ३. माझ्या तपश्चर्येमुळें आलेली सहनशीलता. ४. बाहेर काढूं नको, देऊं नको. 'मत्तेजक्षांति मला म्हणति, 'अहाहा! न ओक शापातें' असा पाठभेद. ५. माझी मति हीच गुहा, तिजमध्यें. ६. क्रोध हाच माजलेला हत्ती. ७. विचाररूप सिंह. ८. विवेकरूपी सिंह माझ्या मतिरूपी गुहेंत जागत आहे, म्हणून तिच्यांत कोपरूपी हत्ती शिरूं शकत नाहीं (मला राग यावयाचा नाहीं)—असा अर्थ. हें 'समस्तवस्तुविषय' **सांग-रूपका**चें उदाहरण होय. ९. मत्+हरणीं=मला हरण करण्याविषयीं, मला नेण्याच्या कामीं. १०. याचा काय पाड? याची काय किंमत? **काव्यार्थापत्ति** अलंकार. ११. हें वैधर्म्यानें होणाऱ्या **दृष्टांता**चें उदाहरण आहे. मागें अध्याय १६ गीति १२ मध्यें हाच अलंकार आहे. १२. दावें=गुरांस बांधण्याची दोरी (दांवें). १३. माझा आश्रम आपल्या सैन्याकरवीं व्यापिला. १४. व्यानसंज्ञक वायूनें. (हा सर्व शरीरांत फिरणारा वायु होय). १५. खवळे. १६. ग्रीष्मऋतूंतील दोनप्रहरच्या सूर्यासारखा. १७. धेनूच्या रूपानें. ह्या गीतींत **'मिषापन्हुति'** नामक अलंकार आहे. १८. चांगल्या तपश्चर्येचें सामर्थ्य. १९. विश्वामित्राचें सैन्य हाच अंधकार. २०. (नंदिनीरूपी) विद्युल्लतेच्या. २१. मार्गाला.

अंगांपासुनि[1] केले प्रकट तिनें म्लेच्छ, यवन, शबर, शक, ।
बळ[2] उडविलें तिहीं, खगपतिपक्षांहीं[3] जसें सहज मशक[4]. ॥ २८
जेंवि दिगंताप्रति ने तिमिरा[5] तूळा[6] रविप्रभा[7] वात्या[8], ।
सेना तसी नृपबळा; निस्तुळ[9] म्हणती कवि[10] प्रभावा[11] त्या. ॥ २९
दशशतसहस्र पीडिति एकैका गाधिजानुगा[12] यवन; ।
गाय[13] वन स्वर्ग हि, तें दावि पितां आपणांत गाय वनें[14]. ॥ ३०
'पकडा[15], लिया[16], कहां[17]? लो, बे[18]! बिसवामितर[19] भाग[20] जावेगा.' ।
यवन[21] म्हणति, 'दाविति त्या, वायु म्हणे 'भूरिभाग[22]' ज्या[23] वेगा.' ॥ ३१
मागें पाहों न दिलें, तीं बारा कोस[24] पळविलीं कटकें[25]. ।
यश हारविलें तेथें किति शस्त्रें, हार[26], कुंडलें[27], कटकें[28]? ॥ ३२
भूप म्हणे, 'जे नेणति गोब्राह्मणतेज, ते जन क्षेत्रीं[29] ।
कल्पिति, जसें न पाहुनि शिशु शशभृत्तेज[30] तेज नक्षत्रीं. ॥ ३३

---

१. शरीराच्या निरनिराळ्या अवयवांपासून. २. सैन्याची दाणादाण केली. ३. पक्ष्यांचा नायक जो गरुड त्याच्या पंखांनीं. ४. चिलट, घुंगुरडें. ५. अंधकाराला. ६. कापसाला. ७. सूर्याचें तेज. ८. वावटळ. जेंवि रविप्रभा तिमिरा [ व ] वात्या तूळा दिगंताप्रति ने, तसी [ गाईच्या अंगापासून उत्पन्न झालेली ] सेना नृपबळा [ दिगंताप्रति ने ]-असा अन्वय. येथें **यथासंख्य** नामक अलंकार आहे. ९. तुलनारहित, अनुपम. १०. शहाणे लोक. ११. सामर्थ्यास, पराक्रमास. १२. विश्वामित्राच्या सेवकास. १३. स्वर्ग हि ( स्वर्गांतील देवादिक ) देखील त्या वनाची प्रशंसा करूं लागले-असा भाव. १४. वन (उदक) पितां तें आपणांत गाय दावी. म्हणजे गाधिजमुनीच्या सैन्यास ती गाय पाण्यांतही दिसूं लागली-असा भाव. कल्पनासादृश्यः—शयनासनाशन-स्थिति-गति जें जें कर्म, कर्ण तो यांत । दिसतो; बहु काय वदों? पाहुनि होतों विवर्ण तोयांत.॥ ( पंतकृत कर्णपर्व, अध्याय ४०।१४ ). पाण्यांत दिसणें=द्वेषास पात्र होणें, भीतीचें कारण असणें. १५. पकडला. 'पकडो, लियो, हकालो' असा पाठभेद. १६. घेतला, धरला. १७. कोठें आहे. लो=लेव ( हा घ्या ). हें सैनिकांचें परस्परांस उद्देशून भाषण आहे. १८. अरे! १९. विश्वामित्र. २०. पळून जाईल. २१. यवन ( कामधेनूच्या अंगापासून उत्पन्न झालेले योद्धे ) म्हणति ( म्हणूं लागले ) [ कीं ] ज्या वेगा वायु ( प्रत्यक्ष वायु देखील ) भूरिभाग ( भाग्यवान आहे असें ) म्हणे त्या [ वेगा ] [ विश्वामित्रपक्षीय सैनिक ] दाविति-असा अन्वय. वाऱ्यापेक्षां ज्यास्त वेगानें विश्वामित्राचे सैनिक पळाले-असा भाव. २२. भूरि+भाग=पुष्कळ, मोठें+भाग्य=मोठा भाग्यवान. २३. 'यवन म्हणति दाखविती शब्दीं हरि करिवरांसि जा वेगा'-असा पाठभेद. २४. 'कोश' असें पाठान्तर. २५. सैन्यें. २६. कंठभूषणें. २७. कर्णभूषणें. २८. वलयें, कडीं. २९. क्षत्रियाचे ठायीं. ३०. शश=ससा, त्यास धारण करणारा तो शशभृत्=चंद्र, त्याचें तेज.

धिक् क्षत्रियतेजातें ! सार नसे [1]लेशं या [2]पलालसमीं, ।
येणें चि जाहलों [3]हतकाम [4]पराभूत [5]पापलालस मीं. ॥ ३४
[6]क्षत्रबळ नाव फुटकी, जें ब्राह्मणतेज ते चि नव नौका. ।
बुडतों न [7]अन्यथा मी, तरता व्यसनांत [8]तो हि न [9]वनौका. ॥ ३५
[10]प्राज्य हि राज्य [11]हितें नव्हे; तप साधावें, तयांत सर्व हितें. ।
[12]तप न करावें कोण्या प्रभुनें ? [13]विनिमग्न ज्यांत [14]शर्व हि तें.' ॥ ३६
निश्चय करूनि, राज्यश्री सोडुनि, सर्व ताप साहूनी, ।
[15]होमुनि [16]तपोनळीं वपु, होय अधिक [17]सर्व तापसांहूनी. ॥ ३७
[18]सिद्धि म्हणति, 'पति वरिले व्यर्थ तुम्हीं बहु तपोनि, धिक् [19]क्षणदे ! ।
धिक् [20]स्वाहे ! धिक् [21]पद्मिनि ! सुख न, जसें हा [22]तपोनिधि क्षण दे.' ॥ ३८

---

जसें शिशु शशभृत्तेज ( चंद्राचें तेज ) न पाहुनि नक्षत्रीं तेज [ कल्पिती, तसें ] जे गो-ब्राह्मण-तेज नेणति ते जन क्षत्रीं [ तेज ] कल्पिति—असा अन्वय. विश्वामित्राच्या म्हणण्याचा भाव असा—ज्यांना गाई व ब्राह्मण यांच्या सामर्थ्याविषयीं कल्पना नाहीं ते लोक क्षत्रियच काय ते पराक्रमी, असें समजतात.

१. अल्प, थोडें देखील. 'सार नसे, नाश या पलाल-समीं' असें पाठान्तर. पलाल=कडबा. २. कडब्यासारख्या अथवा पेंढ्यासारख्या. अत्यंत तुच्छ अशा क्षत्रिय तेजामध्यें—असा भाव. ३. ज्याच्या इच्छा नष्ट झाल्या आहेत असा, निराश, भग्नमनोरथ. ४. मोड झालेला. ५. पाप ( नीच कर्म ) करण्याविषयीं लालचावलेला. ६. 'धिग्बलं क्षत्रियबलं ब्रह्मतेजोबलं बलं' असें मूळांत आहे ( अध्याय १७५।४५ ). ७. दुसऱ्या कारणानें, निराळ्या रीतीनें. अर्थात्—तो ब्राह्मण नसता व मी क्षत्रिय नसतों, निराळीच कांहीं परिस्थिति असती तर—असा भाव. ८. तो वसिष्ठ. ९. वन हेंच ओक ( गृह ) ज्याचें तो, वनवासी ऋषि. १०. पुष्कळ. हें गीत्यर्ध सुभाषितरूप आहे. ११. कल्याण करणारें, हितकारक. १२. ज्यांत शर्व ( प्रत्यक्ष शंकर ) हि ( देखील ) विनिमग्न, तें तप कोण्या प्रभुनें न करावें [ काय ? ]—असा अन्वय. राजानें देखील [ ब्राह्मणाप्रमाणें ] तप करावें—असा भाव. १३. गढून गेलेला. १४. 'विनिमग्न ज्यांत सर्व हि तें' असें पाठांतर. १५. हवन करून, अर्पून. १६. तपोरूपी अग्नींत. १७. सर्व तपस्व्यांहून. १८. सिद्धि=दैवी शक्ति. ह्या आठ आहेतः—अणिमा, महिमा, गरिमा, लघिमा, प्राप्ति, प्राकाम्य, ईशित्व व वशित्व. १९. हे रात्रि ! ( क्षण=उत्सव, आनंद, विश्रांति, ती देणारी ती क्षणदा ). २०. अग्नीच्या स्त्रीचें नांव. २१. हे सूर्यस्त्रिये ! हे सूर्यविकासिनि कमलिनि ! ह्या गीतींत **'परोक्षजन-संबोधनोक्ति'** नामक अलंकार आहे. २२. जसें हा तपोनिधि क्षण ( क्षणांत, अत्यंत अल्प वेळांत ) सुख दे ( देतो ) [ तसें तुमचे पति तुम्हांला ] सुख न [ देती ]—असा अन्वय.

[1]ब्रह्मर्षिता वरी त्या [2]पतिसे म्हणे, 'तूं हि [3]अच्छ विप्र खरा, ।
रवि [4]भावी, कीं [5]भुलली [6]निर्जरुचि, [7]अन्यत्र न [8]छवि प्रखरा.' ॥ ३९
झाला नृपति वसिष्ठस्पर्धेनें विप्र, तें असो आतां. ।
विस्तर भय दे, नाहीं तरि काळाचें हि भय नसे [9]गातां. ॥ ४०
[10]त्यां मुनिनें सिद्धि[11]बळें [12]मोहुन [13]सौदासनृपतिच्या मतितें, ।
केला वसिष्ठ [14]सुतशतशोकार्त, किजे जसें [15]महापतितें. ॥ ४१
ज्येष्ठ सुत वसिष्ठाचा शक्तिमुनि [16]पथीं वनांत आढळला. ।
[17]कल्माषपाद मागे पथ, परि कवि तो [18]न सर्वथा [18]ढळला. ॥ ४२
[19]संकुचित पथ न सोडी म्हणुनि नृपें ताडिला [20]कशा-पातें. ।
'धर्मघ्ना ! राक्षस हो' दे मुनि या [21]उग्र-पाक-शापातें. ॥ ४३

---

१. विश्वामित्र राजर्षि ( क्षत्रिय ) होता, पण तपःप्रभावानें ब्रह्मर्षि ( ब्राह्मण ) झाला अशी कथा आहे. २. विश्वामित्रास. [ ज्या ] ब्रह्मर्षिता वरी त्या पतिस म्हणे–असा अन्वय. [ पण 'म्हणे' याचा कर्ता ? वशिष्ठ म्हणे ? ] ३. शुद्ध; स्वच्छ. ४. मानी. ५. मोहित झाली. ६. आपली कांति. ७. विश्वामित्राखेरीज इतरांच्या ठायीं. 'तपानें सिद्धि मिळविल्यावर तिन्ही लोकांना आपल्या तेजानें व्यापून त्या उज्ज्वल तेजाच्या विश्वामित्रानें सर्वांना ताप दिला' असें मूळांत आहे. ( अध्याय १७५ श्लोक ४७।४८ ). ८. कांति. ९. येथें मूळांतील १७५ वा अध्याय संपतो. १०. कौशिकानें. ११. तपःप्राप्त सिद्धीच्या प्रभावानें. १२. विश्वामित्रानें किंकरनामक राक्षसाची प्रेरणा कल्माषपादराजाच्या शरीरांत करवून त्याच्या बुद्धीस मोहित केलें, आणि त्या राजाकरवीं वशिष्ठाचे शक्ति आदि शतपुत्र मारविले. ( मूळ अध्याय १७६ श्लोक २१–४२ ). १३. कल्माषपादराजाच्या. ऋतुपर्णपुत्र सुदास, त्याचा पुत्र सौदास. हाच कल्माषपाद. १४. शंभर पुत्रांच्या ( मरणजनित ) शोकानें पीडित. १५. मोठ्या पातक्यानें. १६. मार्गांत. १७. सौदास राजाचें नांव कल्माषपाद पडण्याचें कारणः–हा एकदां एका राक्षसाच्या पाठीस लागला असतां थकून परत आला. तेव्हां त्या राक्षसानें याचा सूड उगविण्याचा बेत केला. नंतर तो वसिष्ठमुनीचें रूप धारण करून राजाकडे आला आणि त्यास म्हणाला कीं, 'भोजनार्थ सामिष अन्न सिद्ध कर.' नंतर गुप्तरूपें स्वयंपाकांतील मांस उचलून त्या जागीं नरमांस ठेवून तो राक्षस निघून गेला. भोजनसमयीं खऱ्या वसिष्ठानें तें कपट जाणून राजास 'तूं राक्षस होशील' असा शाप दिला. तेव्हां क्रोधसंतप्त होऊन राजा वसिष्ठास प्रतिशाप देण्यास तयार झाला. त्यानें शाप देण्यासाठीं हातांत उदक घेऊन अभिमंत्रित केलें आणि शापोच्चार करणार इतक्यांत त्याच्या बायकोनें ( मदयंतीनें ) त्यास खरा वृत्तांत कळवून बोध केला कीं, 'गुरूस शाप देणें उचित नाहीं.' तेव्हां राजानें तें उदक आपल्याच पायांवर टाकलें. त्यामुळें त्याचे पाय कल्माष ( कृष्णवर्ण ) झाले, म्हणून कल्माषपाद असें त्याचें नांव पडलें. १८. हालला नाहीं. शक्तीनें मार्ग दिला नाहीं–असा भाव. १९. संकोच पावलेला, अरुंद ). २०. चाबकाच्या प्रहारानें. २१. ज्याचा परिणाम भयंकर आहे अशा त्या शापातें.

भेटे [१]राक्षस मंत्री गाधिसुताज्ञेंकरूनि शापाला. ।
ग्रासी मोह नृपाला, राहु महाग्रह जसा नि[२]शापाला. ॥ ४४
[३]मृगमांसभोजनार्थी त्यावरि भेटे द्विज[४] क्षमा-पतिला, ।
मान्य करुनि तें विसरे[५], कीं शापें मोह जाहला मतिला, ॥ ४५
[६]रात्रौ स्मरलें, सरलें[७], होतें यद्यपि उदंड परि पळ[८] तें. ।
**दैव प्रसन्न नसतां, वस्तु सकल भें[९] दिल्या चि परि पळतें[१०].** ॥ ४६
'नरमांस द्यों'[११] म्हणे नृप, 'कोठुनि आणूं तदर्थ[१२] हरिणा मीं ?' ।
[१३]नुमजे मोहें कीं हें कर्म मला तापवील परिणामीं[१४]. ॥ ४७
करितां तसें[१५] चि सूदें[१६], उमजे, नुमजेल काय हो! मुनितें[१७] ? ।
पेटे जें अति शुष्क क्रोध-ज्वलनांत[१८] काय होमुनि तें. ॥ ४८
विप्र म्हणे, 'हा ! दुष्टा ! ब्राह्मण नरमांस काय रे ! खाती ? ।
[१९]श्रुतिकृतमर्यादेची जी पुसिली[२०] आजि काय रेखा[२१] ती ? ॥ ४९
मी विप्र, नव्हें राक्षस; राज्यमदांधें न नीट वळखावें ! ।
[२२]हें; त्वां चि आजिपासुनि राक्षस होउनि मनुष्यपळ[२३] खावें.' ॥ ५०
हे दोन[२४] शाप, राक्षस[२५], गाधिज, एका मतें चि गुरु[२६] चवघे. ।

---

१. किंकरनामक राक्षस विश्वामित्राच्या आज्ञेनें त्या शापाला मंत्री ( मसलत देणारा ) भेटे. २. चंद्राला. ३. मृगाचें मांस भोजनासाठीं मागणारा. ४. क्षुधाविष्ट विप्र राजाला भेटला. ५. मृगमांसयुक्त भोजन देतों असें मान्य करून नंतर ती गोष्ट मोहामुळें राजा विसरला. ६. घरीं आल्यावर अर्धरात्रीं वचन दिल्याचें राजास स्मरण झालें. ७. ( मांस ) संपलें. ८. मांस. ९. भय. १०. दैव अनुकूल नसलें, तर इष्ट वस्तु जणूं काय आपल्याजवळून भिऊन पळून जातात–असा भाव. 'वस्तु' हा शब्द संस्कृतांत नपुंसकलिंगी आहे. ११. असें आपल्या सूदाला ( आचाऱ्याला ) म्हणे. १२. त्या द्विजासाठीं. ( हें सूदाचें भाषण ). १३. न+उमजे= जाणेना, समजेना. येथें 'न' शब्दांतील 'अ' ला परसवर्ण आदेश झाला आहे. नसणें, नुघडी, नुरणें अशीं उदाहरणें वारंवार आढळतात. १४. शेवटीं, अंतीं. १५. नरमांस वाढिलें असतां. १६. स्वयंपाक करणाऱ्यानें. १७. त्या क्षुधित ब्राह्मणाला. ( गीति ४५ पहा ). १८. 'क्रोधें ज्वलनांत' असें पाठांतर. ज्वलन=अग्नी. जें अति शुष्क काय तें क्रोधज्वलनांत होमुनि [ तो मुनि ] पेटे–असा अन्वय. तो भुकेच्या योगानें क्षीण झालेला ब्राह्मण रागानें संतप्त झाला–असा भावार्थ. १९. वेदांनीं घालून दिलेल्या मर्यादेची. २०. पुसून नाहींशी केली. २१. रेघ, ओळ. २२. हें ( मी ब्राह्मण आहें, राक्षस नाहीं, हें ) राज्यमदांधें [ त्वां ] नीट न वळखावें [ हें योग्यच आहे ! ]–असा अन्वय. २३. मनुष्याचें मांस. २४. 'राक्षस हो' हा एक शाप ( गीति

पढवुनि मित्र[1]सहकरें मारविती श्रीवसिष्ठसुत अवघे. ॥ ५१
सेवि द्विजे[2]-रक्त-रसा नृपति, वसिष्ठ हि नव्यां[3] चि शोक-रसा. ।
सेवन करवी, भरवी, विधि[4] त्याचा शाप, भूप तो करसा[5]. ॥ ५२
होय विफलयत्न मुनि स्वतनु[6]त्यागीं धरूनि कामातें. ।
मेर्वग्न्यब्धींस[7] म्हणे, 'म्हणतां कां हो ! मरूं नका मातें[8] ?' ॥ ५३
बद्ध करूनि कर-चरण[9] बुडतां, तोडी महानदी पाशा. ।
कोणा नको सुतेजां[10] ? काय पतंगीं[11] लहान दीपाशा[12] ? ॥ ५४
तोडी पाश, न बुडवी जी स[13]करुणमानसा धुनी[14], तीस ।
ठेवुनि नाम विपाशा[15] गाति सबहुमान साधु नीतीसें[16]. ॥ ५५
जैसा यत्न न सोडी, जरि धन न मिळे, तथापि धनकामी[17] ।
निधनार्थी[18] मुनि हि म्हणे, 'यत्नीं फळ[19], आवरूं स्वमन कां मी ?' ॥ ५६

---

४३ ), आणि 'राक्षस होऊनि मनुष्यपळ खावें' हा दुसरा शाप ( गीति ५० ), असे दोन शाप. २५. किंकर राक्षस. २६. एकाच मताचे चार गुरु ( उपदेशक ) राजास मिळाले.

१. कल्माषपाद राजाच्या हातानें. (मित्रसह आणि वीर्यसह हीं कल्माषपादाचींच दुसरीं नांवें). २. ब्राह्मणाचें रक्त हाच रस त्यातें. ३. नव्या=प्रत्येक दिवशीं नवीन नवीन अशा. राजानें शक्तिमुनीला खाल्ल्यानंतर, तो पुन्हां पुन्हां वशिष्ठाकडे गेला व त्यानें त्याचे शंभर पुत्र मारून खाल्ले. ( अध्याय १७६ श्लोक ३८–४२ ). ४. दैव. विधि ( दैव ) त्याचा शाप ( राजाला मिळालेला शाप ) [ राजाला ] भरवी [ व राजाकडून ] सेवन करवी. तो भूप करसा ( हाताप्रमाणें ) [ होय ]–असा अन्वय. राजा स्वप्रेरणेनें कांहीं न करितां दैवयोगानें हातून जें कांहीं घडेल तें घडूं देत असे–असा भाव. ५. 'विधि त्याचा शापभूत तो करसा' असा पाठभेद. ६. स्वदेहनाशाची इच्छा धरून वसिष्ठानें मेरुकूटावरून आपल्याला ढकलून दिलें, परंतु तो मरण पावला नाहीं ह्मणून, 'विफलयत्न' असें ह्मटलें आहे. ७. मेरु, अग्नि, व अब्धि यांस. तो मेरूवरून उडी टाकून मेला नाहीं. म्हणून त्यानें पेटलेल्या अग्नींत उडी टाकली, तों तो अग्नि शीत झाला. नंतर त्यानें गळ्यांत धोंडा बांधून समुद्रांत उडी टाकली, तों लाटांनीं त्यास बाहेर आणिलें. याप्रमाणें तिघांपासून सुटका झाली ह्मणून 'ह्मणतां कां हो मरूं नका मातें' असें त्यांस संबोधून म्हटलें आहे. ८. येथें मूळांतील १७६ वा अध्याय संपतो. ९. हातपाय बांधून वसिष्ठ नदींत बुडूं लागला तों तिनें त्याचे पाश तोडिले. १०. ज्याचें तेज ( पराक्रम, सामर्थ्य ) उत्तम आहे असा. ११. पतंगाच्या ठायीं. १२. दीपाविषयीं आशा पतंगाला लहान असते काय ? अर्थात् आशा प्रबळ असते. १३. दयायुक्त अंतःकरण जीचें अशी. १४. नदी. १५. पाशच्छेद करणारी नदी. १६. नीति=( त्या नदीचें ) न्याय्य वर्तन, योजना, युक्ति. १७. धनेच्छु पुरुष. १८. मरण इच्छिणारा. १९. यत्नीं फळ ( मिळतें ). 'प्रयत्नांतीं परमेश्वर' ही म्हण प्रसिद्धच आहे.

शक्तिस्त्री[1] न विसंबे[2] श्वशुरासि, वनीं फिरे तयामागें, ।
गुरुसेवनें भुलविलें मन कुळजाचें, तसें न हेमागें[3]. ॥ ५७
भरि[4] एकदा श्रुतिरवें, तद्गर्भाचें हि, कानना तुंड. ।
तें[5] कुल[6]-लय-शोक-तमीं धरिल हिमकरत्व[7] कां न नातुंड[8] ? ॥ ५८
ब्रह्मर्षि पुसे, 'वत्से ! शक्ति तसा वेद कोण गे ! म्हणतो ? ।
वाटे आलिंगावा कडकडुनि, मला दिसे चि ना पण तो.' ॥ ५९
ती साश्रु[9] अदृश्यंती[10] बोले जोडूनि हात, 'मामाजी ! ।
गर्भ मदुदरीं[11] म्हणतो मज घालायासि हा तमोमाजी[12].' ॥ ६०
मुनिपति म्हणे, 'अगा ! कुळतंतो[13] ! संतोषदान[14] नातूंनीं[15] ।
न दिलें, असें अमृत तव गळतें संतोषदाननांतूनी[16]. ॥ ६१
ऐसें मद्व्यसनशमन[17] कवण दयित[18] सोयरा शिशो ! करिता ? ।
तव वेदध्वनिघटजें[19] केला विषतोयराशिशोक[20] रिता[21] ' ॥ ६२
सोडुनि मरणोद्यम[22] शमधन[23] अनघ[24] नलिनभवप्रभव[25] परते; ।
चित्तीं म्हणे, 'अकूपसे गमले मेर्वादि, सदयतम[26] परि[27] ते[28].' ॥ ६३

---

१. शक्तीची भार्या, वसिष्ठाची सून; हिचें नांव अदृश्यन्ती, ही पराशराची माता. २. न सोडी. ३. मेरुपर्वतानें. ४. तद्गर्भाचें हि ( त्या शक्तिऋषीच्या गर्भस्थ बालकाचें ) तुंड ( तोंड ) श्रुतिरवें ( वेदघोषानें ) एकदा ( कोण्या एका काळीं ) कानना ( अरण्या ) भरि ( भरून टाकी )—असा अन्वय. ५. तें नातुंड कुललयशोकतमीं हिमकरत्व कां न धरिल ?—असा अन्वय. ६. वसिष्ठ-वंशसंहारानिमित्त जो शोक हाच अंधकार ( तम ) त्यांत. ७. चंद्रत्व. चंद्र जसा अंधाराचा नाश करितो, तसा हा नातू शोकाचा नाश करितो—असा भाव. ८. नातू. ९. स+अश्रु=बाष्पाकुळा. १०. वसिष्ठपुत्र जो शक्ति त्याची स्त्री. ११. मत्+उदरीं=माझ्या पोटीं. १२. मोहांत. १३. कुळाची वृद्धि करणाऱ्या बाळा ! १४. संतोषाचें देणें. १५. जगांतील इतर कोणत्याही नातवांनीं. १६. संतोष देणाऱ्या मुखांतून. १७. माझ्या संकटांचें निरसन. १८. आवडता, प्रिय. १९. तुझ्या वेदपठनाचा शब्द हाच अगस्त्यमुनि, त्यानें. २०. वस्तुतः येथें 'शोक-विष-तोय-राशि' असें पद असावयास पाहिजे होतें. परंतु पंतांनीं येथें यमकसुखार्थ पदक्रम बदलला आहे. २१. रिकामा. नातवाच्या तोंडचा वेदघोष ऐकून वशिष्ठाचा शोक नाहींसा झाला—असा भाव. २२. मरणाचा उद्योग. २३. शांति हेंच धन ज्याचें, तो ( वशिष्ठ ). २४. निष्पाप. २५. कमलोद्भव ब्रह्मदेवापासून उत्पत्ति ज्याची असा, ब्रह्मदेवपुत्र ( वसिष्ठ ). २६. अत्यंत दयाळु. २७. परंतु ( मागें पृष्ठ १०२ टीप ५ पहा ). २८. मेरु, अग्नि आणि समुद्र.

तों मार्गीं भक्षाया मुनिसह तत्कुलकरा[1] हि उर्वरिता[2] ।
तो भूप[3] ये सुहृत्त्व[4] त्यजुनि विधिबळें धरूनि उर्वरिता[5]. ॥ ६४
गुरुशापदुरिंधनहततेजा[6] राजर्षि, वन्हि तो याज्य[7], ।
व्हाया पुन्हा प्रकाशित सिंची मुनि मंत्रपूत[8] तोयाज्य[9]. ॥ ६५
मलिन कुगंधि कुरूप क्रूर कठिन शुष्क रांक्षसत्वानें[10], ।
तो नृप केला स्मरसा[11] सहसा[12] त्या पुष्कराक्षसत्वानें[13]. ॥ ६६
जी निज[14] सत्कीर्ति तिली[15] होऊं दे न वितथा[16], पिशा[17] पावे. ।
यद्यपि शापार्ह तिघे, न म्हणे तो कवि तथापि शापावे. ॥ ६७
तारुनि नृपासि कुळकर[18] पुत्र[19] हि दे, न सुकृतासि[20] मुनि वेची. ।
तत्कीर्तिला[21] नमी श्री[22] शरदृतुच्या लक्ष वेळ पुनिवेची[23]. ॥ ६८

---

१. त्या वसिष्ठाची कुलवृद्धि करणारा जो पराशर, त्यास. २. उरलेल्या. ३. कल्माषपाद. ४. मित्रत्व. ५. उरु+अरिता=पुष्कळ+शत्रुत्व=मोठें शत्रुत्व, हाडवैर. ६. गुरुशापरूप दुष्ट काष्ठांनीं दग्ध झालें आहे तेज ज्याचें असा. ७. यजमान. ८. मंत्रानें पवित्र केलेलें. **परंपरित-रूपक.** ९. उदकरूप तूप. १०. राक्षस होऊन राहिल्यामुळें. ११. कामदेवासमान. १२. अकस्मात्, एकदम. १३. कमलाक्ष विष्णूप्रमाणें सत्व ( प्रभाव ) ज्याचें, त्या वशिष्ठानें. १४. जी निज सत्कीर्ति ( शांति, क्षमाशीलता इत्यादि गुणांविषयीं प्रसिद्धि ) [ ती ] तिला ( त्याच्या शांतीला ) वितथा होऊं न दे. [ ती ] पिशा ( वेड्या कल्माषपादाला ) पावे ( पावली. गीति ६६ व ६८ पहा ). यद्यपि [ ते ] तिघे ( विश्वामित्र, कल्माषपादराजा व राक्षस ) शापार्ह [ होते ], तथापि [ ते ] न शापावे [ असें ] तो कवि ( तो ज्ञाता वशिष्ठ ) म्हणे–असा अन्वय. १५. 'निज सत्कीर्ति तिलाही' असें पाठांतर. १६. व्यर्थ. १७. वेड्याला ( राक्षसाला ). १८. वंशवृद्धि करणारा. मित्रसहराजानें ( कल्माषपादानें ) राक्षसावस्थेंत एका ब्राह्मणास खाऊन टाकिलें. तेव्हां त्याच्या स्त्रीनें 'तूं मदयंतीशीं संग करितांच मरशील' असा त्यास शाप दिला. त्यामुळें त्याला स्वस्त्रीसंग करतां येईना, तेव्हां त्यानें वशिष्ठाची आराधना करून पुत्र मागितला. मुनीनें प्रसन्न होऊन राजस्त्रीशीं दिव्य विधीनें संग करून पुत्र उत्पन्न केला. ( मूळ अध्याय १७७।४५ ) १९. अश्मक हें पुत्राचें नांव. हा गर्भांत बारा वर्षें राहूनही बाहेर निघेना, तेव्हां मदयंतीनें अश्मा ( दगड ) घेऊन त्यानें कुक्षिविदारण करून त्या गर्भास बाहेर काढलें, म्हणून त्यास 'अश्मक' असें नांव पडलें. यानें 'पौदन्य' नामक शहर वसविलें. येथें मूळांतील १७७ वा अध्याय संपतो. २०. पुण्याला. वशिष्ठानें आपलें पुण्य खर्च केलें नाहीं. कारण नृपपत्नीशीं मैथुन न करतां पुत्र उत्पन्न केला, तेव्हां परस्त्रीसंमपातकानें होणारा पुण्यक्षय झाला नाहीं. २१. वशिष्ठाच्या कीर्तीला. २२. शोभा. शरदृतुच्या पुनिवेची श्री लक्ष वेळ तत्कीर्तिला ( वशिष्ठाच्या कीर्तीला ) नमी–असा अन्वय. शरदृतूंतील पौर्णिमेचें चांदणें फार स्वच्छ ( शुभ्र )

व्हावा अद्भुत जैसा प्रध्वस्ततमःपराश[1] रविस रवी ।
मुनिला सुतशोक तसा होउनि शक्तिज पराशर विसरवी. ॥ ६९
तो आजाला चि म्हणे 'तात'; किजे अधिक कोय[2] हो तातें ? ।
खेद अदृश्यंतीतें दे, श्वशुरा 'तात' म्हणत होता तें. ॥ ७०
ती एकदा म्हणे, 'बा म्हणसि असें चि पसरूनि आ ज्याला[3] ।
म्हणुनि तुवां निववावें तें कैंचें ? म्हणसि 'तात' आज्याला. ॥ ७१
मामाजींस म्हणसि, तें[4] न म्हण; म्हण तयांसि 'आर्य[5] आजाबा[6].' ।
आजा 'बा[7]' न म्हणावें, गहिवर येतो तयां[8] हि मांजा[9] बां ! ॥ ७२
राहु निशेच्या, माझ्या राक्षस, करि रोष, नंदना ! तिलकीं[10], ।
काय वदावें ? दावें[11] गिळिला अल्पद्रु[12] नंदनांतिल[13] कीं[14]. ॥ ७३
ज्यांस[15] म्हणत होती कर जोडुन विद्या, कळा, सभा, 'वो ! जी' ।

---

असतें, पण वशिष्ठाचें यश त्या चांदण्यापेक्षांही शुभ्र होतें–असा भाव. कल्पनासादृश्यः—जगद्गुरुमहेश्वरप्रभुशिरीं जिच्चें नांदणें । तिच्या जळमळें तुळे न शरदिंदुचें चांदणें. ॥ ( केकावली, श्लोक १०९ ). २३. पौर्णिमेची.

१. नाशिली आहे तमोरूप म्हणजे राहुरूप शत्रूची आशा ज्यानें असा; ( पक्षीं ) नाशिली आहे तमोगुणरूपी शत्रूची आशा ज्यानें असा. येथें 'तम' शब्दावर **श्लेष** आहे. २. बाप जीवंत असता, तर त्यानें अधिक काय केलें असतें ?–असा भाव. ३. आ पसरूनि ज्याला 'बा' असें चि म्हणसि [ त्याला ] तुवां तें ( बा=बाबा असें ) म्हणुनि निववावें, [ तें ] कैचें ? ( त्याला बाबा म्हटल्यानें त्याच्या मनाचें शांतवन कसें होईल ? ). [ अरे बाबा ! तूं ] आज्याला 'तात' म्हणसि–असा अन्वय. ४. तें='बाबा' असें म्हणणें. ५. आर्य=अज्ज=आजा–अशी ही परंपरा आहे. ६. आजोबा. येथें पंतांना यमकासाठीं थोडी ओढाताण करावी लागली आहे. नुकतींच बोलावयास लागलेलीं मुलें 'आजोबा' असा स्पष्ट उच्चार करूं शकत नाहींत. यामुळें तीं प्रथम 'अजबा' किंवा 'आजाबा' असें म्हणतात, म्हणून कदाचित् पंतांनीं 'आजाबा' असाच शब्द योजिला असावा. ७. बाप. **दामयमक.** ८. त्यांना ( वशिष्ठांना ). 'तयासि' असें पाठान्तर. ९. माझ्या बाबा ! बाळा ! १०. तिलकीं ( निशेच्या )=चंद्रीं; ( पक्षीं ) तिलकीं ( माझ्या )–कपाळावरील कुंकवाच्या तिलकीं. 'तिलक' ह्या शब्दावर **श्लेष** आहे. ११. वणव्यानें. १२. लहान रोप ( अर्थात् तरुण पति ). द्रु=द्रुम=वृक्ष, झाड. १३. नंदनवनांतील. १४. कीं=जणूं काय. **उत्प्रेक्षा**लंकार. १५. ज्यांस विद्या ( चौदा विद्या ), कळा ( चौसष्ट कळा ) [ व ] सभा ( सज्जनांचा समुदाय ) 'वो ! जी' [ असें ] कर जोडुन म्हणत होती, [ ते ] नव्याण्णव भावोजी (अदृश्यंतीचे दीर) त्या खळासि ( त्या दुष्ट कल्माषपादास ), हरिस ( सिंहाला ) हरिणसे

हरिस हरिणसे झाले नव्याणव त्या खळासि भावोजी.’ ॥ ७४
पितृघातवृत्त कळतां सर्वा लोकांसि दोष [1]तो लावी, ।
कीं [2]शक्तोपेक्षकमति ती [3]अघकृन्मतिसवें चि तोलावी. ॥ ७५
जैसें सुटों न द्यावें [4]प्राणक्षयतत्परा शराशि, कवी ।
[5]ब्रह्मर्षि तसें चि करी, [6]निजशांतिकळा पराशरा शिकवी. ॥ ७६
‘धरिति [7]शिवेच्छु क्षत्रियजन जिंकाया [8]परा [9]शरालीला, ।
संत [10]क्षमेसि धरिती, तुज हे चि रुचो पराशरा ! लीला. ॥ ७७
व्याघ्र-वृक-हरि-व्याळ-प्रभृतींचा जो समूह हानिकर, ।
त्याहूनि कामकोपप्रमुखांचा [11]निपट दुष्ट हा [12]निकर. ॥ ७८
[13]बा ! सादर अभयाच्या तापस दानीं च; हा निकर विखरी ।
धृतिला [14]धुळींत; देउनि ताप सदा नीच हानि करवि [15]खरी. ॥ ७९
जी [16]शीतागाधजळा [17]सरिता, शिरतां निवे [18]करी तींत, ।
निवतो प्रवेशतां जन सर्व हि तैसा विवेकरीतींत. ॥ ८०
नाशी [19]स्वसेवनकरा, अन्यजना ही, म्हणोन कोपानें ।
बहु [20]अहित होय, तैसें अहित विषाच्या म्हणों नको [21]पानें. ॥ ८१
[22]भृगुकुळज [23]और्वमुनि ही पूर्वीं ऐसा चि कोपला होता, ।

---

( हरिणासारखे, अर्थात् भक्ष्य ) झाले–असा अन्वय. माझे नव्याण्णव दीर कल्माषपादाच्या भक्ष्यस्थानीं पडले, असा अदृश्यंतीच्या म्हणण्याचा भावार्थ.

१. पराशरऋषि. २. दुःख घालविण्याविषयीं समर्थ असून जे उपेक्षा करतात, त्यांची बुद्धि. ३. पाप करणाऱ्याच्या बुद्धीशीं. ४. प्राणांचा नाश करण्यास उत्सुक अशा बाणाला. ५. वशिष्ठ. ६. आपली क्षांतिरूप कला. ७. कल्याण इच्छिणारे. ८. शत्रूला. ९. शर+आली= बाणपंक्ती. १०. दयेस. ११. केवळ. १२. समूह. १३. बा ! तापस अभयाच्या दानीं च सादर [ असतो ]. हा निकर ( मोठा अनर्थ ) धृतिला ( धैर्याला ) धुळींत विखरी ( मातींत पसरी, नष्ट करी, मातीस मिळवितो ). नीच [ क्रोध ] सदा ताप देउनि खरी ( खरोखरीची, काल्पनिक नव्हे ) हानि करवि–असा अन्वय. १४. ‘धुळींत नेउनि’ असें पाठांतर. १५. ह्या गीतींत **संदष्टक**नामक यमकालंकार आहे. ( मागें पृष्ठ १०४ टीप ७ पहा ). १६. शीत+अगाध+ जळा=थंड व खोल पाणी जिचें अशी. १७. नदी. १८. हत्ती. १९. आपला अंगीकार करणाऱ्यास. २०. अकल्याण. २१. प्राशनानें. २२. भृगुऋषीच्या कुळांत जन्मलेला. २३. और्वनामक ऋषीदेखील. ( ऊरू म्हणजे मांडी तीपासून झालेला तो और्व ). भार्गवकुळांतील स्त्रीपुरुषांस कृतवीर्य राजाच्या वंशांतील राजांनीं द्रव्यानिमित्त बहुत पीडा दिली. परंतु त्यांचें

पितृवचनें परि टाकी स्वक्रोधाग्नीस सागरीं, पोता ! ॥ ८२
दे मज हें, लोकांचें भस्म क्रोधें करूं नको, पावें. ।
कथिला, धरूनि हनु, नय; अनुनय किति बा ! करूं? न कोपावें. ॥ ८३
कोपें कुळज जरि, तमें तरि फुगवुनि गल्ल भानु गांठावा. ।
महिमा क्षमारताचा बहु तो श्रीवल्लभानुगां ठावा. ॥ ८४
नंदनशीळ म्हणति त्या तापाकुळ नंदनाप्रति ज्ञाते. ।
सोडावी मद्वचनें बापा ! कुळनंदना ! प्रतिज्ञा ते.' ॥ ८५
लोकक्षयसंकल्प त्यागुनि, सुखवुनि मनांत आजोबा, ।
राक्षससत्र करी, कीं भाव्यजसुतसा सुरांत साजो बा. ॥ ८६
जैं भस्मसात् पराशर करि मंत्रबळें पुलस्त्यसंततितें, ।

---

कोणींही निवारण केलें नाहीं; यास्तव या और्वमुनीला फार कोप आला व सर्व लोकांचा विनाश करावा म्हणून यानें उग्र तप केलें. त्याच्या प्रभावानें सर्वांस पीडा करण्यास समर्थ असा भयंकर अग्नि उत्पन्न झाला. तो सर्वांस जाळूं लागला, ह्मणून ते सर्व लोक याच्या पितरांस शरण गेले. तेव्हां त्यांनीं येऊन और्वास उपदेश केला, आणि त्याचा कोपानल त्याकरवीं समुद्रांत टाकविला. ( अध्याय १७९-१८० ).

१. आपल्या कोपानलास. हाच वडवाग्नि म्हणून प्रसिद्ध झाला. २. अरे ! बाळा. ह्या शब्दावर रा० पराडकर यांच्या प्रतींत 'बाळाला' अशी टीप आहे. ३. हनुवटी. हनु ( हनुवटी ) धरणें= दाढी धरणें, विनवणी करणें, काकुळतीनें प्रार्थना करणें. ४. सन्मार्ग, शास्त्र, दूरदर्शित्व. ५. आर्जव, प्रार्थना. ६. कोपें ( कोपानें ) जरि कुळज ( कुलीन ) [ ग्रासिला ], तरि तमें ( अंधकारानें ) गल्ल फुगवुनि ( गाल फुगवून ) भानु ( सूर्य ) गांठावा–असा अन्वय. कुलीन मनुष्याला राग आला, तर अंधकार सुद्धां सूर्याला जाऊन भेटेल. म्हणजे कुलीनाला राग येणें ही गोष्ट असंभवनीय आहे–असा भाव. येथें **'मिथ्याध्यवसिति'** नामक अलंकार आहे. **'संभावना'** नामक अलंकार आहे, असेंही म्हणतां येईल. ह्या दोन्ही अलंकारांचा समावेश **अतिशयोक्तीं**तच करितात. ७. गाल. गाल फुगविणें=बढाई मारणें, शेखी मिरविणें. ८. क्षमाशील पुरुषाचा, क्षमापराचा. ९. लक्ष्मीपति विष्णूच्या सेवकांना. १०. आनंदप्रद शील ( स्वभाव ) ज्याचें तो. ११. दुःखानें पीडित. १२. पुत्राला. तापाकुळ ज्ञाते त्या नंदनाप्रति ( नंदन=आनंददायक–असा अर्थ आहे ) नंदनशीळ [ असें ] म्हणति–असा अन्वय. १३. मी सांगतों म्हणून. १४. कुळाला ( घराण्याला ) आनंद देणाऱ्या ! **परिकरा**लंकार. १५. सर्वलोक-नाशाची प्रतिज्ञा. १६. भक्तियुक्त नारदमुनीप्रमाणें. भाविन्=निष्ठायुक्त, ब्रह्मनिष्ठ. १७. बाप ( शक्तिमुनि ). १८. भस्माधीन. 'सात्' हा प्रत्यय साकल्यार्थीं आणि अधीनतार्थीं होतो:–जसें– राजसात्, अग्निसात्, विप्रसात्. १९. राक्षसांना.

आले संरक्षाया [1]क्रत्वत्रिपुलस्त्यपुलह संत तितें. ॥ ८७
त्यासि पुलस्त्य म्हणे, 'बा ! तुज पाहुनि सर्व ताप हरपावे, ।
[2]सद्यः साधुसमागम, तेंवि न, नाशूनि ताप, हर पावे. ॥ ८८
तेज [3]प्रमाण, आम्हां तत्त्वज्ञांस [4]प्रमाण न वय जनीं. ।
तें अद्भुत तेज तुझें दिसलें कोणास या न नैव [5]यजनीं. ॥ ८९
हा [6]आर्य हि न [7]क्षान्ति क्षण दूर [8]करून कोपला शान्त. ।
काळ चि निमित्त करितो भलत्यास, करूं नको [9]पलाशान्त. ॥ ९०
पावे [10]क्षमी सुकृत, सुख, यश, जें पावे चि ना [11]अमर्षी तें, ।
विधुतें [12]लक्ष्म तसें हें [13]अकृपपण नसो [14]भवत्समर्षीतें. ॥ ९१
साहे न कोपवेगा जो, कीं जो कांपरा शरास रणीं, ।
त्याची रुचेल शांतिस, कीं कीर्तिस कां पराशरा ! [15]सरणी ? ॥ ९२

---

१. क्रतु, अत्रि, पुलस्त्य आणि पुलह हे सृष्टिकर्ते ब्रह्ममानसपुत्र महर्षि होत. २. साधु-समागम सद्यः ( तत्क्षणीं, लगेच ) पावे, तेंवि ताप नाशूनि हर ( शंकर ) [ देखील ] न [ पावे ]– असा अन्वय. येथें पुढील सुभाषित लक्ष्यांत ठेवण्यासारखें आहे:–गङ्गा पापं शशी तापं दैन्यं कल्पतरुस्तथा । पापं तापं च दैन्यं च सद्यः साधुसमागमात्. ॥ ( निबंधमाला, अंक २२, सुभाषित ). ॥ ३. यथार्थ ज्ञानाचें साधन, निर्णायक आधार. तेज=पराक्रम. 'तेजःप्रमाण आत्मा' असें पाठांतर. ४. 'तेजसां हि न वयः समीक्ष्यते' ( रघुवंश, सर्ग ११ श्लोक १ ) हें कालिदासाचें वचन ह्या आर्येशीं समानार्थक दिसतें. 'गुणाः पूजास्थानं गुणिषु न च लिङ्गं न च वयः' हें भवभूतीचें वचनही त्याच अर्थाचें द्योतक होय. अशीं वचनें पंतांच्या काव्यांत अन्यत्र आढळतात:–न वय प्रमाण तेजस्विजनीं म्हणती कवी, न तें लटिकें । ( विराटपर्व, अध्याय ६।७१ ); कर्णपर्व, अध्याय ४१।१७; आदिपर्व, अध्याय २६।६२, इत्यादि पहा. ५. नवीन सुरू केलेल्या यज्ञांत, अर्थात् राक्षससत्रांत. राक्षसांविषयीं देखील पराशरानें क्षमाशील असावें, असा ऋषींच्या भाषणाचा इत्यर्थ. रा० पराडकर यांच्या प्रतींत ह्या गीत्यर्धाच्या शेवटीं प्रश्नचिन्ह दिलेलें आहे. यजन=यज्ञ, हवन. ६. हा शांत आर्य क्षान्ति दूर करून क्षण हि ( एक क्षण देखील ) न कोपला– असा अन्वय. ७. सहनशीलता. ८. 'क्षण दूर करूं न कोपला शांत' असा रा० पराडकर यांच्या प्रतींत पाठ आहे. ९. राक्षसनाश. ( मांसभक्षकांचा, राक्षसांचा अंत ). १०. क्षमाशील. ११. क्रोधाविष्ट. हें गीत्यर्ध सुभाषितवत् आहे. १२. लांच्छन, कलंक. १३. निर्दयपणा, दयेचा अभाव. १४. भवत्+सम+ऋषीतें=तुजसारख्या ऋषीतें. १५. जो कोपवेगा न साहे, कीं ( किंवा ) जो रणीं ( युद्धामध्यें ) शरास कांपरा ( बाण पाहातांच भीतीनें कांपणारा ) [ आहे ] त्याची सरणी ( रीति ) [ अनुक्रमें ] शांतिस कीं ( किंवा ) कीर्तिस कां रुचेल ?–असा अन्वय. रुचणार नाहीं–हा इत्यर्थ.

कामाची क्रोधाची ज्यांहीं केली[1] जपोनि[2] आज्ञा, ते ।
चुकले, स्वहिता मुकले, त्यांतें पाहोनि म्हणति 'हा !' ज्ञाते. ॥ ९३
हितें[3] इतर न धन शमसम[4], यावरि तुज हें न कार्य[5] सत्र[6], पहा; ।
कवि रविरुचि[7] शुचिभव[8] तव व्हावा येणें न आर्य[9] स-त्रप[10] हा.' ॥ ९४
शक्तिज सत्र पुरें करि, सद्वचनाच्या निवे चि तो पानें. ।
हो पानें[11] सुखद अमृत, परि सद्वचनें[12] चि शांतिसोपानें[13]. ॥ ९५
[14]गंधर्वोक्तवसिष्ठप्रभुचरितें जिष्णु[15] तो निवाला हो ! ।
प्रेमें म्हणे, 'जसा मी सर्व हि जन पात्र या शिवाला[16] हो[17].' ॥ ९६
पुसतां पुरोहित[18], म्हणे, "आचार्यत्वेंकरूनि सौम्यातें[19] ।
उत्कोचनामतीर्थीं क्षिप्र वरा, जा, नमूनि धौम्यातें[20]. ॥ ९७
जाणे तो गुण, जाणे जे तत्पूर्वज मुनींद्र देवल[21] ते. ।
तत्पदयुगुली[22] म्हणत्ये, 'न सुख स्पर्धेंत बाइ ! देव-लते !'-" ॥ ९८
देउनि अग्न्यस्त्रातें[23], ठेवुनि चित्तीं तदुक्तमंत्रास[24], ।

---

१. आज्ञा केली=आज्ञा पाळिली. २. जपोनि=जपून, काळजीपूर्वक. ३. [ बा पराशरा ! ] शमसम इतर धन ( अत्यंत प्रिय वस्तु ) हित ( हितकारक ) न ( नाहीं ). [ तसेंच ] येणें ( ह्या सत्राच्या योगानें ] रविरुचि, शुचिभव [ आणि ] कवि [ असा ] हा तव आर्य स-त्रप ( ज्याला मान खालीं घालावी लागेल असा ) न व्हावा [ म्हणून ] यावरि ( यानंतर, यापुढें ) तुज हें सत्र कार्य न ( करण्यास योग्य नाहीं ). पहा ( या सर्व गोष्टींकडे नीट लक्ष दे )—असा अन्वय. ४. शांतिसमान. ५. करावयास योग्य. ६. यज्ञ ( राक्षसयज्ञ ). ७. सूर्यासारखी कांति ज्याची तो. ८. शुद्ध जन्म ज्याचा तो. ९. वसिष्ठ. १०. सलज्ज. ११. प्यालें असतां. १२. 'सद्वचनीं च' असें पाठांतर. १३. शांतीच्या पायऱ्या [ होत ]. १४. चित्ररथ गंधर्वानें सांगितलेल्या वशिष्ठप्रभूच्या चरितानें. १५. अर्जुन. १६. कल्याणाला. १७. होवो. १८. पुरोहित ( कोण करावा असें ) पुसतां. १९. सौम्य=अनुग्र, ज्याचें अंतःकरण कोमल आहे असा. २०. हा पांडवांचा पुरोहित, देवलऋषीचा कनिष्ठ भ्राता. २१. ऋषिविशेष. जे तत्पूर्वज ते मुनींद्र देवल जाणे [ व ] तो [ त्यांचे ] गुण [ देखील ] जाणे—असा अन्वय. मुनिश्रेष्ठ देवलाला आपल्या पूर्वजांसंबंधीं व त्यांच्या आंगच्या अलौकिक गुणांसंबंधीं पूर्ण माहिती होती—असा भाव. २२. त्याच्या पदांची जोडी म्हणते:—हे देववल्ली ! ( कल्पलते ! ) माझ्याशीं स्पर्धा करून तुला कांहीं सुख मिळणार नाहीं. २३. अर्जुनानें आग्नेयास्त्र यथाविधि गंधर्वाला दिलें. ( अध्याय १८३।३ ). २४. त्या चित्ररथानें चाक्षुषीविद्येविषयीं सांगितलेल्या मंत्रास. ( मागें अध्याय ३३।२५ पहा ).

[1]धौम्याप्रति जातां दे कुदशेसि पदोपदीं हि संत्रास. ॥ ९९
तीर्थीं [2]स्वानुजरूपें जी होती तप करीत [3]देवल-ता ।
तीनें बहु लाजविली पांडु[4]सुतेच्छित करूनि देव-[5]लता. ॥ १००
'[6]यद्ध्रुवमाश्रिततारकमनलसमुरुभवपयोनिधौ म्यां तें, ।
हें [7]यानपात्र वरिलें,' धर्म म्हणे पद धरूनि [8]धौम्यातें. ॥ १०१

---

## अध्याय पस्तिसावा.

गेले धन्य कराया पंडूचे नंदन द्रुपदराजा; ।
तो गुरु हि जाय, समुचित पसराया [9]नंदनद्रु पदरा ज्या. ॥ १
राजसुतांसि रहाया त्या द्रुपदपुरीं [10]कुलाल दे [11]शाला. ।
काळगति पहा बुध हो ! बा ! एखादे भुलाल देशाला. ॥ २
मिरवायासि न उरला स्वमहत्त्वाचा [12]कुला लव [13]सतींत, ।
[14]रत्नगृहोचित पृथ्वीपतिसुत वसले [15]कुलाल-वसतींत ! ॥ ३
सेवुनि भिक्षान्न सुखें [16]रत होते देव-विप्र-भजनांत, ।
कोण्ही हि न ओळखिले, [17]कीं ते दाटूनि [18]विप्रभ जनांत. ॥ ४

---

१. धौम्याप्रति [ पांडव ] जातां [ तो ] पदोपदीं हि कुदशेसि संत्रास दे–असा अन्वय. धौम्यऋषीकडे पांडव गेले तेव्हां पावलोपावलीं कुदशेला भीति वाटूं लागली, म्हणजे पांडवांची कुदशा संपून त्यांना सुदशा प्राप्त होऊं लागली–असा भाव. संत्रास=भीति. २. आपला कनिष्ठ भ्राता धौम्य, याच्या रूपानें. ३. देवलत्व, देवलमुनीचा भाव. धौम्य हा दुसरा देवलच होता–असा भाव. ४. पांडवांचें चिंतित. ५. कल्पलता, देववल्ली. ६. यत्+ध्रुवम्+आश्रिततारकम्+अनलसम्+उरुभवपयोनिधौ=उरुभवपयोनिधौ यत् अनलसं, ध्रुवं आश्रिततारकं=विशाल भवसागरामध्यें जें आलस्यरहित होऊन निश्चयानें आश्रितांस तारणारें तें ( पद ). ७. नौका. ८. पंतांनीं ह्या अध्यायाच्या १०१ गीतींत मूळांतील १७४ ते १८३ अध्यायांतील २९७ पद्यांचा मथितार्थ ग्रथित केला आहे. ९. ज्या ( गुरुधौम्याला ) नंदनद्रु ( कल्पवृक्ष ) पदरा पसराया समुचित ( योग्य ) [ असे ], तो गुरु हि ( धौम्यही ) जाय–असा अन्वय. कल्पतरूपेक्षांही धौम्यऋषी श्रेष्ठ होय–असा भाव. १०. कुंभार. ११. मातीचीं भांडीं घडण्याची जागा, गोठा. १२. पृथ्वीला. १३. ( पांडवांना गोठ्यांत राहाण्याचा प्रसंग आल्यामुळें ) कुला ( पृथ्वीला ) सतींत ( साध्वी स्त्रियांमध्यें ) मिरवायासि स्वमहत्त्वाचा ( आपल्या मोठेपणाचा ) लव ( थोडा अंश देखील ) न उरला–असा अन्वय. कु=पृथ्वी. १४. रत्नखचित घरांत राहाण्यास योग्य. १५. कुंभाराच्या घरांत. १६. निमग्न. १७. 'झाले' असें पाठान्तर. १८. तेजरहित.

बहु विप्र, बहु क्षितिपति, बहु मागध[1], सूत[2], बंदिजन[3] आले. ।
कृष्णास्वयंवरोत्सवदर्शनभाग्येच्छु[4] देव ही झाले. ॥ ५
वरबुद्धि[5] अर्जुनीं च स्थिर होती सर्वदा, परि पुरा[6] जे ।
आले, ते आदरिले द्रुपदें, पहिले जरि स्वरिपु राजे. ॥ ६
झालें जतुगृहदाहश्रवण, परि मना न साच वाटे तें. ।
वांच्छित-सिद्ध्यर्थ धरी तो राजा[7] युक्तिच्या च वाटेतें. ॥ ७
करवी लक्ष्य[8] व्योमीं पार्थास चि शक्य भेद[9] त्याचा कीं, ।
चळचक्र[10] तळीं भेदनसाधन, तें सूक्ष्म रंध्र त्या चाकीं. ॥ ८
शर पांच मात्र, धनु हि त्र्यंबककोदंडमित्र[11] कठिणपणें, ।
करवुनि ऐसें भिववी बहुतांच्या ही मनास कठिण पणें[12]. ॥ ९
घोषविलें[13] कीं, 'चढवुनि धनुला पांचां शरांत लक्ष्यातें ।
भेदील जो कृती[14], त्या माझी कन्या वरील दक्षातें[15].' ॥ १०
सर्व मिळाले रंगीं[16] विप्रनृपांहीं सुमंच[17] शोभविले. ।
रंगीं ते लोक तसे कमळवनीं जेंवि भृंग[18] लोभविले. ॥ ११
बसले होते पांडव विप्रांच्या शिवमया[19] समाजांत. ।

---

१. राजांची वंशपरंपरा वर्णन करणारे, वंशसूचक. २. पौराणिक. ३. स्तुतिपाठक, भाट. ४. कृष्णेचा (द्रौपदीचा) स्वयंवरोत्सव पाहण्याचें भाग्य इच्छिणारे. ५. वर (नवरदेव) निश्चित करण्याचा विचार. 'द्रुपदाची इच्छा अर्जुनालाच द्रौपदी द्यावी, अशी होती; परंतु ती तो प्रकट करीत नसे'–असें मूळांत आहे (अध्याय १८५।८). ६. द्रुपदराजाच्या नगरास. ७. द्रुपद. ८. शरव्य, निशाण, लक्ष. ९. विदारण, भोंक पाडणें. १०. चलयंत्र. (यालाच छिद्र होतें). ह्याला 'राधायंत्र' असें नांव अन्यत्र आढळतें. (बालभारत, आदिपर्व, सर्ग ५।९२ पहा). ह्या यंत्राचें सुस्पष्ट वर्णन मूळांत नाहीं. तेथें 'द्रुपदराजानें वांकविण्यास अशक्य असें एक मजबूत धनुष्य करविलें, आणि आकाशांत उभें केलेलें एक कृत्रिम (फिरणारें) यंत्रही करविलें. त्या यंत्राशीं जोडलेली निशाणाची वस्तु त्या राजानें ठेविली.'–असें वर्णन मूळांत आहे (अध्याय १८५।९–१०). ११. शंकराच्या धनुष्याचा मित्र. १२. घोर प्रतिज्ञेनें. १३. प्रसिद्ध केलें. १४. कुशल, कृतकृत्य, दैववान. १५. चतुराला. १६. सभामंडपांत. १७. उत्तम पलंग. सध्यां नाटकगृहांत Box म्हणून जशा बैठका असतात, तशाच प्रकारचे हे 'मंच' असावे, असें दिसतें. १८. भुंगे, भ्रमर. येथील **उपमा** देखील मोठी लोभनीय आहे. १९. कल्याणरूप, हितकारक. 'मय' ह्या प्रत्ययाचा अर्थ 'विशिष्ट', 'युक्त', 'परिपूर्ण' असा आहे.

कोण न होतील तदा[1]श्रित, शान्ति दया सुधासमा ज्यांत ? ॥ १२
रंगीं धृष्टद्युम्नें धरुनि करीं आणिली स्वसा[2] रमणी ।
जाणों[3] भुजगें[4] प्रेक्षकजननयनमनोहर[5] स्वसार[6] मणी. ॥ १३
तद्रूपें[7] मोहे सुरजन हि, धरिल धैर्य तो कसा रंग[8] ? ।
मूर्तिमती गीति[9] गमे ती, भुलले ते हि लोकं[10]-सारंग. ॥ १४
वरिलें उमापण तिणें पाववुनि[11] स्वं[12] च्छवि प्रकाशाला. ।
तसि नसती तरि मिळते बहु सुज्ञ स्वच्छ विप्र कशाला[13] ? ॥ १५
कर वळविला अजें[14] जें विष्णुधृतस्त्रीस्वरूप[15] कित्ता तें, ।
चित्र तसें चि उतरिलें चतुरें, वाटे कवींद्र-चित्तातें. ॥ १६
रंगीं धृष्टद्युम्न स्वभुज उभारुनि म्हणे, 'अहो ! परिसा ।
भेदील लक्ष्य तो या मद्भगिनीला वरूनि हो हरिसा[16]'. ॥ १७
कृष्णेसि म्हणे, 'वत्से ! दे माळा लक्ष्यभेद करित्यातें, ।
कुळ, शीळ, रूप, सद्गुण असतील स्वानुरूप[17] जरि त्यातें. ॥ १८
हा दुर्योधन नृप, हे व्यासवरें बंधु जन्मले शत गे ! ।
हा कर्ण, ज्यापुढें पर[18]चापश्रुतिकुशळता न लेश तगे[19]. ॥ १९
हा शल्य मद्रपति, हा चेदिपं[20] शिशुपाळ, हा जरासंध, ।

---

१. 'तदाश्रित शांत' असें पाठान्तर. २. भगिनी ( द्रौपदी ). ३. उत्प्रेक्षालंकार. ४. सर्पानें. ५. पाहाणाऱ्या जनांचे नेत्र व मन हरण करणारा. ६. आपलें धनसर्वस्व. ७. तिच्या सौंदर्यामुळें. ८. येथें लक्षणेनें 'रंग' म्हणजे रंगस्थळांतील ( सभास्थानांतील ) मंडळी–असा अर्थ समजावयाचा. ९. गायनकला. उत्प्रेक्षालंकार. १०. लोकरूप हरिण. हरिण आणि नागादिक इतर प्राण्यांची गानलोलुपता सुप्रसिद्ध आहे. ११. पोंचवून, बरोबरी करून. १२. स्व च्छवि ( आपली कांती ) प्रकाशाला पाववुनि तिणें ( द्रौपदीनें ) उमापण ( गौरीत्व ) वरिलें ( तिनें पार्वतीप्रमाणें तेज धारण केलें )–असा अन्वय. द्रौपदी उमेसारखी तेजस्वी होती–हा इत्यर्थ. १३. कशाकरितां. १४. ब्रह्मदेवानें. १५. जें विष्णुधृतस्त्रीस्वरूप ( विष्णूनें समुद्रमंथनसमयीं धारण केलेलें मोहिनीचें रूप ) तें कित्ता [ असें समजून ] अजें ( ब्रह्मदेवानें ) कर ( हात ) वळविला–असा अन्वय. अक्षर वळविण्याचे कामीं कित्त्याची गरज असते, त्याप्रमाणें द्रौपदीची मूर्ति घडविण्याच्या बाबतींत ब्रह्मदेवानें मोहिनीचें रूप हें कित्ता ( नमुना ) म्हणून आपल्यापुढें ठेविलें होतें, असें दिसतें–असा भावार्थ. ह्या गीतीस मूळांत आधार नाहीं. ही पंतप्रतिभानिर्मित आहे. १६. इंद्राप्रमाणें. १७. तुला साजतील ( शोभतील ) असे. येथें मूळांतील अध्याय १८५ वा संपतो. १८. दुसऱ्याचें धनुर्वेदकौशल्य. १९. टिके. २०. चैद्यदेशाचा पति. 'चैद्यप' असें पाठांतर.

[1]गंधद्विपगंध तसा दुःसह [2]यांचा हि शत्रुला [3]गंध. ॥ २०
हे राम कृष्ण यदुपति, हे दोघे साधु उद्धवाक्रूर, ।
[4]गमले रिपु गोपस्त्रीहृदया, जे परम शुद्ध [5]वाक्क्रूर.' ॥ २१
ऐसें [6]समागतांचें कळवी कुळशीळकर्मजन्म तिला. ।
कीं, लक्ष्यभेदकर ही [7]अकुळज कोणी रुचो न सन्मतिला. ॥ २२
दुर्योधनादिकांची कन्यारत्नीं च वेधली दृष्टी, ।
वृष्टि जसि चातकांला, त्यांला तसि ती [8]विरंचिची [9]सृष्टी. ॥ २३
कृष्णेकडे जनाची तसि दृष्टि, [10]श्रीकडे जसी [11]सृष्टी. ।
भक्ताकडे चि हरिची दृष्टि, जसी वासुराकडे [12]गृष्टी. ॥ २४
[13]बळदेवासि म्हणे [14]प्रभु, 'आर्या ! त्या ब्राह्मणांत तो धर्म. ।
तो भीम, तो धनंजय, ते [15]यम, म्यां वळखिले, नव्हे [16]नर्म. ॥ २५
ब्राह्मणवेष असों द्या, [17]तेजें पहा, चातका सदा [18]दाते ।
[19]घनसे निवविति, मज [20]वश झाले चि; न घातकास दादा ! ते. ॥ २६
'नवल [21]इटांत मिळाल्या [22]कनकाच्या [23]इष्टका, मला [24]भाचे ।
गुरुचे [25]बहु, यांहुनि [26]शतहर्ष उणे इष्टकामलाभाचे.' ॥ २७

---

१. मदोन्मत्त हत्तीचा गंध. [गंधद्विपासंबंधीं पुढील वचन प्रसिद्ध आहे:—यस्य गन्धं समाघ्राय न तिष्ठन्ति प्रतिद्विपाः । तं गन्धहस्तिनं प्राहुर्नृपतेर्विजयावहम्. ॥] २. उपरिनिर्दिष्ट राजांचा. ३. वास; किंवा गर्व, दर्प. ४. गोपींच्या मनाला शत्रूंसारखे वाटले. ५. वाणीनें भयंकर. कंसानें कृष्णास मथुरेस नेलें तेव्हांचें अक्रूराचें भाषण आणि उद्धवाचें गोपीसांत्वनपर भाषण त्यांस क्रूर वाटलें, हा भागवतकथासंदर्भ. ६. मिळालेल्यांचें, जमलेल्यांचें. ७. कुळहीन, हीनकुलोत्पन्न. येथें 'अकुळज कोणी रुचो न तन्मतिला' असा पाठ विशेष अर्थपोषक झाला असता. ८. ब्रह्मदेवाची. ९. [द्रौपदीरूप] संतान. पर्जन्यवृष्टीमुळें चातकाला जसा आनंद वाटतो, त्याप्रमाणें दुर्योधनादिकांना द्रौपदीस पाहून फार आनंद झाला—असा भाव. १०. लक्ष्मीकडे, अर्थात् संपत्तीकडे, द्रव्याकडे. ११. सृष्टी—जग, सर्व लोक. १२. एकवार प्रसूत झालेली गाय. १३. बळरामास. १४. कृष्ण. १५. जुळे भाऊ—नकुळ व सहदेव. १६. थट्टा, खोटें. १७. यांचें तेजावरून. १८. देणारे. १९. मेघाप्रमाणें. २०. ते माझ्या ताब्यांत आले. त्यांचा घात करूं इच्छिणाऱ्यांचें आतां कांहीं चालूं शकणार नाहीं, असा भाव. २१. मातीच्या विटांत. २२. सुवर्णाच्या. २३. विटा. २४. पृथा ही वसुदेवाची बहीण; हीं दोघेंही यदुकुलोत्पन्न शूरनामक राजाचीं अपत्यें, तेव्हां पांडव हे वसुदेवाचे (गुरूचे—बापाचे) भाचे होते. २५. गुरूचे (वसुदेवाचे) भाचे (पांडव) मला बहु (मान्य) [आहेत]—असा अन्वय. २६. शेंकडों हर्ष, हर्षातिशय.

ऐसें बळभद्र म्हणे, वर्णी त्या [1]विश्वसाक्षिदृष्टीतें, ।
सृष्टीतें जी [2]रेचि ती, यश न जिचें ये [3]सुधाब्दवृष्टीतें. ॥ २८
[4]देशींदेशींचे नृप झटले, परि [5]परशुरामसा चाप ।
न वळे, लवे [6]भुजबळें, [7]तत्ताडित बहुत पावले ताप. ॥ २९
चोळुनि [8]कर, करकर [9]रद खाउनि [10]दष्टोष्ठ, [11]मोघचापल ते ।
[12]हतदर्प भूप म्हणती, '[13]हंत ! [14]हताः स्म [15]त्वयाद्य [16]चापलते !' ॥ ३०
तेव्हां [17]स्वात्युत्साहें, [18]हृष्टमना [19]तात [20]उष्णकर करुनी, ।
[21]रविसमवर्णें कर्णें चाप चढविलें क्षणांत करकरुनी. ॥ ३१
स्वमनीं पांडव म्हणती, '[22]हा ! हा ! या [23]दुष्कुळप्रसूतानें ।
नेलें चि लक्ष्य भेदुनि [24]सहकन्यारत्न यश हि [25]सूतानें !' ॥ ३२
जों कर्ण म्हणे, 'न शिवों देईन इला दुज्या [26]नवरया मी.' ।
तों चि म्हणे ती [27]कृष्णा, '[28]सूतमहं जातुचिन्न वरयामि.' ॥ ३३
कर्ण [29]विगुण धनु टाकुनि, पाहुनि रविला, चुरूनि हातातें ।

---

१. कृष्णातें. (सकल जगताला पाहणारी आहे दृष्टि ज्याची, त्याला). २. उत्पन्न करी. ३. अमृतरूप मेघाच्या वृष्टीला. ४. 'देशोदेशींचे' असें पाठांतर. ५. परशुरामाच्या धनुष्यासारखें प्रचंड धनुष्य. 'चाप' हा शब्द संस्कृतांत पुल्लिंगी व नपुंसकलिंगी आहे. ६. बाहुबळानें. येथें काकाक्षिगोलकन्यायानें 'न' चा अन्वय 'न वळे, न लवे' असा करणें इष्ट आहे. ७. त्या चापानें ताडिलेले (राजे). ८. हात. ९. दंत. १०. चावले ओष्ठ ज्यांहीं असे (भूप). 'ओत्वोष्ठयोः समासे वा' या नियमानें समासामध्यें अवर्णापुढें 'ओतु' (मांजर) किंवा 'ओष्ठ' शब्द असतां विकल्पेंकरून पररूप होतें यावरून 'दष्टोष्ठ' असें रूप झालें. ११. ज्यांचें चपलत्व व्यर्थ असे (राजे). १२. गतगर्व. १३. हाय हाय ! १४. मारले गेलों. १५. त्वां आज. १६. हे चापलते ! तूं आज आह्मांस ठार बुडविलेंस. १७. आपल्या अत्यंत उत्साहानें. १८. हृष्ट (आनंदित) आहे मन ज्याचें तो. १९. बाप. तेव्हां स्वात्युत्साहें उष्णकर तात (रवि) हृष्टमना करुनी कर्णें चाप चढविलें—इत्यादि अन्वय. २०. ज्याचे किरण उष्ण आहेत तो (सूर्य). कर्ण हा सूर्यपुत्र होय. (मागें अध्याय १७ गीति ४–१८). २१. सूर्याप्रमाणें अंगकांति ज्याची अशा. २२. हाय हाय ! २३. अधमवंशोत्पन्नानें, नीचकुलोत्पन्नानें. २४. द्रौपदीरूप रत्नासह. हा '**सहोक्ति**' नामक अलंकार होय. '**रत्नं** स्वजातिश्रेष्ठेऽपि मणावपि नपुंसकम्' इति मेदिनी. २५. सारथ्य करणाऱ्या कर्णानें. २६. नवऱ्याला. २७. द्रौपदी. २८. अहं जातुचित् सूतं न वरयामि=मी सूताला (अर्थात् कर्णाला) कधींही वरणार नाहीं. मूळांत 'नाहं वरयामि सूतम्' असें आहे. (अध्याय १८७ श्लोक २३ पहा.) २९. दोरीनें रहित असें धनुष्य.

चित्तीं म्हणे, 'कशाला केला निर्माण पुत्र हा तातें ? ॥ ३४
[१]वैतरणी [२]सुतरा, [३]ऱ्ही बुडवी, निंदोत पाप सु-तरेतें; ।
केला कां बुडवाया [४]दुस्तरलज्जानदींत सुत रेतें ?' ॥ ३५
[५]शिशुपाल [६]यत्न करि, परि बोले स्वमनांत [७]चापदैवत, 'मी ।
[८]न कठिन, तुला बुडवितें, आठवुनि तुझें चि पाप, दैव तमीं.' ॥ ३६
[९]मागधराजसुत म्हणे, 'कृष्णा होईल आजि [१०]मर्ज्जाया.' ।
त्यासि म्हणे [११]चापलता, '[१२]लज्जापंकीं तुम्ही हि [१३]मज्जा, [१४]या.' ॥ ३७
[१५]शल्य हि पडला, [१६]झडला मंद; न [१७]प्रकटूनि शक्तिला जे तें ।
कौतुक पाहत होते, सांपडले ते च [१८]कवि न लाजेतें. ॥ ३८
पाहति उगे चि दूरुनि [१९]न शिवों दे चाप त्या अ-हीन-[२०]कुळां. ।
[२१]लेखी [२२]तृणतुच्छ जसा [२३]अबळां बाळां बळी, [२४]अही [२५]नकुळां. ॥ ३९

---

१. यमलोकीं जातांना मार्गांत जी भयंकर नदी लागते, ती. २. तरण्यास सोपी. वैतरणी सुतरा [ आहे ]. [ ह्या ] सु-तरेतें ( जींतून सहज तरून जातां येतें अशा त्या नदीला ) पाप ( पापी लोक ) निंदोत. [ पण वैतरणी खरोखरच सुतरा आहे. ती प्राण्याला बुडवीत नाहीं, तर ] ऱ्ही ( लज्जा-रूपी नदी ) बुडवी–असा अन्वय. या तरून जाण्यास सोप्या अशा नदीतें 'ही लोकांना बुडविते' असें पापी जन खुशाल म्हणोत. पण लज्जानदीच खरोखर दुस्तर आहे, तशी वैतरणी नाहीं, असा भावार्थ. ३. ऱ्ही=लज्जा. 'ही बुडवी' असें पाठांतर. ४. तरून जाण्यास कठीण अशा लज्जारूप नदीमध्यें. ५. हा सोमवंशीय दमघोष राजाचा पुत्र. वसुदेवाचा भाचा आणि कृष्णाचा आतेभाऊ. हा हिरण्यकशिपूचा अंशावतार असून यास 'चैद्य' असेंही नांव आहे. ६. लक्ष्यभेद करण्याची खटपट. ७. चापरूप दैवत. ८. मी कठिन न, दैव तुझें चि पाप आठवुनि तुला तमीं ( दुःखांत, अंधकारांत, ) बुडवितें ( असें ) चापदैवत स्वमनांत बोले–असा अन्वय. ९. जरासंध, मगधदेशाचा राजा बृहद्रथ याचा पुत्र. १०. माझी स्त्री. ११. धनुष्याला लवचीकपणावरून लतासादृश्य कल्पिण्याचा कविसंप्रदाय आहे. ( मागें पृष्ठ २०० टीप २ पहा ). १२. लज्जारूप चिखलांत. १३. बुडा. १४. चला. १५. मद्रराज. १६. गर्व उतरला. येथें मूळांतील १८७ वा अध्याय संपतो. १७. शक्तिला न प्रकटूनि जे तें कौतुक पाहत होते, ते च कवि ( तेवढेच दूरदर्शी लोक ) लाजेतें न सांपडले–असा अन्वय. १८. शहाणे, चतुर नर. जे पराक्रम करावयास गेले नाहींत, त्यांनाच फक्त लाजेनें मान खालीं घालण्याची पाळी आली नाहीं–असा भाव. १९. शिवों न दे=जणूं काय तें चाप स्पर्श करूं देत नव्हतें. २०. उत्तमकुलोत्पन्नांना. २१. मानी, गणी. ह्याचा कर्ता–'चाप'. २२. तृणासारखा क्षुद्र, तुच्छ. २३. निर्बळ ( बलरहित ) अशा बाळां ( बालकांना ). २४. सर्प. २५. मुंगसांना.

जाणों [1]तत्तेज म्हणे त्यांला, '[2]वश चित्तवृत्ति कामा जी ।
ती न भली, सावध व्हा; कां करितां निपट [3]मृत्तिका [4]मांजी?' ॥ ४०
'न बुडो क्षत्रयश' म्हणुनि उठवी [5]उत्साहदायि मन पार्थी; ।
धर्म हि म्हणे, 'असो गुरु[6]लब्धा शिक्षा सदैव [7]अनपार्था.' ॥ ४१
जैं धनुकडे निघे [8]द्विजवृंदांतुनि विप्र एकला जाया, ।
[9]सांधूंसि तो चि शिकवी [10]साधूत्साहातिरेक [11]लाजाया. ॥ ४२
कोणी म्हणति, '[12]निवारा, आम्हां [13]क्षत्रियकृतोपहासाचें ।
पात्रत्व नवें द्याया सुचपळ [14]बटु जोडितो पहा! साचें.' ॥ ४३
[15]किति म्हणती, 'जाऊं द्या, होउं न देईल कर्म [16]कुत्सा हें; ।
[17]पूर्वी श्रीराम जसा, उठलासे [18]हा तसा चि उत्साहें. ॥ ४४
प्याला [19]अगस्त्यनामा ब्राह्मण निःशेष [20]नंद-नदीपातें, ।
विस्मरलां [21]रामातें कां त्या [22]भृगुवंशसदनदीपातें? ॥ ४५
[23]ब्रह्मतपःकेलिगृह ब्राह्मण [24]न करील काय? हो! बोला ।

---

१. त्या धनुष्याचें तेज. उत्प्रेक्षालंकार. त्यांला=राजे लोकांना. २. जी चित्तवृत्ति कामा वश (होते) ती भली न–असा अन्वय. ३. माती. ४. माझी. (तेजाची). ५. उत्साह देणारें. ६. गुरु(द्रोणा)पासून प्राप्त झालेली. शिक्षा=शिक्षण, अभ्यास, उपदेश. ७. अन्+अप+अर्थ=न+न+अर्थ=सार्थ, सफळ. दोन 'न'कार मिळून एक 'हो'कार होतो, ह्या नियमाचें हें उदाहरण आहे. ८. ब्राह्मणसमुदायांतून. ९. 'साधूंसि तोंचि शिकवी' असें पाठांतर. १०. साधु जो अर्जुन, त्याच्या उत्साहाचा अतिशय. ११. साधूंसि लाजाया शिकवी–असा अन्वय. तो अर्जुनाचा उत्साह साधूंना लाजाया शिकवी, म्हणजे–त्याचा तो उत्साह पाहून साधूंना स्वतःबद्दल लाज वाटली–असा अर्थ. १२. या विप्राचें निवारण करा. १३. क्षत्रियांनीं केलेल्या थट्टेचें. सुचपळ बटु क्षत्रियकृतोपहासाचें साचें [आणि] नवें पात्रत्व आम्हां द्याया जोडितो (मिळवितो). पहा (सर्व ब्राह्मण हो! इकडे लक्ष द्या)–असा अन्वय. १४. बालक, मुलगा. १५. कित्येक ब्राह्मण. १६. निंदा. १७. सीतास्वयंवरसमयीं जनकाच्या मंडपांत. १८. पार्थ. १९. कालकेय नामक असुर लोकांस त्रास देऊं लागले, तेव्हां मुनींच्या प्रार्थनेवरून अगस्त्यऋषीनें तपोबलानें समुद्रोदकाचें शोषण करून त्यांत लपून राहिलेल्या कालकेयांचा नाश केला. (महाभारत, वनपर्व, अ० १०२–१०५) या कथेकडे येथें लक्ष आहे. २०. नद आणि नद्या यांचें पालन करणाऱ्यातें, अर्थात् समुद्राला. २१. परशुरामाला. २२. भृगुऋषींचा वंश हेंच घर, त्यांतील दीपच अशा परशुरामाला. २३. ब्रह्मरूप तपश्चर्येच्या क्रीडेचें स्थानच असा. २४. काय न करील=काय करणार नाहीं? अर्थात् ब्राह्मण सर्व कांहीं करील, ब्राह्मणाला सर्व कांहीं साध्य करितां येतें–असा भाव.

[1]'विजयोऽस्तु' म्हणा, चढला [2]विप्राशीनें न कोण तो [3]मोला? ॥ ४६
पावे तत्काळ [4]महावृद्धिप्रति पार्थ [5]तोकें, [6]विप्राशी ।
[7]त्याँ माता [8]कामदुघा, कारुण्य [9]स्तन्य, तो [10]कवि प्राशी. ॥ ४७
नमिला आधीं पार्थें [11]विश्वप्रियसुहृद[12]कृत्रिम [13]पिनाकी, ।
म्हणती [14]यद्यश सेवुनि, 'अमृतीं गोडी नसे [15]किमपि' [16]नाकी. ॥ ४८
मग हृदयीं आठविला [17]कुशळकर [18]कुशेशयाक्ष [19]कंसारी, ।
[20]यत्स्मरणें [21]शुचिमतियतिपतिगतिला योग्य होय [22]संसारी. ॥ ४९
करुनि प्रदक्षिणा, धनु उचलोनि, [23]ख्याति तो करी मोटी, ।
चापाच्या चि न केवळ नरवीरांच्या हि [24]वांकवी [25]कोटी. ॥ ५०
यंत्रच्छिद्रद्वारें पांच हि शर एकदां चि सोडोनी ।
पाडी पळांत पृथ्वीवरि [26]पुरुषप्रवर लक्ष्य [27]तोडोनी. ॥ ५१
प्रीति [28]मुनिगणांच्या, ऱ्ही राजांच्या, कीर्ति [29]सोमवंशाच्या, ।
घाली कंठीं माळा, [30]कृष्णा त्या [31]श्रीमरुत्वदंशाच्या. ॥ ५२

---

१. 'जय असो' असें. २. ब्राह्मणाच्या आशीर्वादानें. ३. महात्म्याला, मोठेपणाला. 'विप्राशीनें मोला न चढला तो कोण?' अशा काक्वर्थाचें ग्रहण येथें इष्ट आहे. ४. 'महाऋद्धीप्रति' असें पाठान्तर. वृद्धि=समृद्धि, उत्कर्ष. ऋद्धि=भरभराट, वृद्धिवैभव. ५. बालक. ६. ब्राह्मणाचे आशीर्वाद. ७. त्या विप्राशी कामदुघा माता–असा अन्वय. **रूपकालंकार.** ८. मनोरथ पूर्ण करणाऱ्या कामधेनु. ९. दुग्ध १०. ज्ञाता (अर्जुन). ११. विश्वाचा प्रिय मित्र आणि स्वतःसिद्ध असा शंकर. १२. अकृत्रिम=स्वयंभू, स्वतःसिद्ध, नैसर्गिक. १३. महादेव. (पिनाक हें आयुध आहे ज्याचें तो.) १४. ज्या महादेवाचें यश. १५. अल्प देखील. १६. स्वर्गीं राहणारे (देव). १७. कल्याण करणारा. १८. कमलनेत्र. कुशेशय=तांबडें कमल. १९. कृष्ण (कंसाचा शत्रु). २०. ज्या कृष्णाच्या स्मरणानें. २१. शुद्ध आहे बुद्धि ज्यांची अशा संन्यासिश्रेष्ठांच्या गतीला. (शुचि=वासनादि दोषरहित; कारण यतीची ऐहिक सुखवासना लुप्तप्राय असते). २२. संसार (प्रपंच) करणारा मनुष्य. २३. कीर्ति, नांवलौकिक. २४. लववी, नम्र करी. २५. धनुष्याचीं टोंकें; (पक्षीं) कोटिसंख्या. **श्लेषालंकार.** २६. नरश्रेष्ठ अर्जुन. २७. विद्ध करून. २८. (अर्जुनानें लक्ष्याचा भेद केल्यामुळें) प्रीति मुनिगणांच्या कंठीं माळा घाली (मुनिसमुदायाला अर्जुनाविषयीं प्रेम वाटूं लागलें), राजांच्या गळां ऱ्ही माळा घाली (स्वयंवरासाठीं आलेल्या राजांना लाज वाटली), सोमवंशाच्या गळां कीर्ति माळा घाली (सोमवंशीय राजांचा नांव-लौकिक झाला) [आणि] कृष्णा (द्रौपदी) त्या श्रीमरुत्वदंशाच्या कंठीं माळा घाली (अर्जुनाला वरिती झाली)–असा अन्वय. २९. चंद्रकुलोत्पन्न. ३०. द्रौपदी. ३१. इंद्राचा अंश (पुत्र) जो अर्जुन त्याच्या. मरुत्वत्=इंद्र.

आशीर्वादांच्या द्विज, पुष्पांच्या करिति सुर हि वृष्टीतें, ।
द्रुपदपुरी [1]जनकपुरीसम सुखदा होय [2]साधुदृष्टीतें. ॥ ५३
ब्राह्मण नाचति रंगीं आनंदें [3]उडविती [4]स्वचैलातें; ।
तें [5]तोयें होय हो ! यश [6]खळजननृपचित्ततप्ततैलातें. ॥ ५४
[7]सत्कांतलाभचिंता उत्साहें उचलितां चि धनु [8]सरली, ।
[9]सद्गुणरक्ता कृष्णा [10]कृष्णाजिनधारका हि [11]अनुसरली. ॥ ५५
कोपोनि कर्णशल्यप्रमुख नृपति म्हणति, 'हा द्रुपद खोटा, ।
आम्हां [12]मानधनांचा केला अपमान, [13]घात हा मोटा. ॥ ५६
मुख्य स्वयंवरीं अधिकारी [14]क्षत्रिय, न विप्र, हें कळतें; ।
भलतें चि बळें [15]करितो, [16]श्रुतियश ऐशा खळामुळें मळतें. ॥ ५७
विप्र नव्हे वध्य, वधा द्रुपदा, न करो दुजा अशा [17]अनया. ।
चढवा [18]गुण, घ्या शर, हूं, [19]धर्मार्थ [20]मुहूर्त दृढ करा मन, या. ॥ ५८
आम्हां नृपांत भलत्या एका स्वमतें वरील नवरी ती. ।
विप्र [21]स्वयंवरवधूवर, हे स्थिति [22]नाशहेतु, नव रीती. ॥ ५९

---

१. सीतास्वयंवरप्रसंगीं जनकाची नगरी जशी होती, तशी. २. सज्जनांच्या नेत्रांना. ३. मूळांतही असेंच वर्णन आहे. (अध्याय १८८।२३). ४. स्ववस्त्रातें. नाचते वेळीं किंवा आनंदाचे भरांत रुमाल किंवा इतर वस्त्रें उडविण्याची चाल सर्वत्र रूढ असल्याचें दिसतें. कल्पनासादृश्य:—(१) तो उत्तरीयवस्त्र प्रेमभरें उडवुनी करी नृत्य. । (पंतकृत कृष्णविजय, अध्याय ८७।४३); (२) अंबरांतुनि पितांबराचे रुमाल उडविती. (अमृतराय). ५. तें [यश] तोय होय—असा अन्वय. ६. दुष्टजन जे नृपति, त्यांचें चित्त हेंच तापलेलें तेल, त्याला. तापलेल्या तेलावर पाणी टाकलें, तर तें तेल ज्यास्तच भडकतें. त्याप्रमाणें अर्जुन यशस्वी झाल्यामुळें त्याचा मत्सर करणारे दुष्ट लोक अत्यंत क्रोधाविष्ट झाले-असा. ७. चांगला नवरा मिळावा ही काळजी. ८. संपली, दूर झाली. ९. उत्तम गुणांच्या ठायीं प्रीति करणारी. १०. हरिणाचें कातडें (अजिन) धारण करणारा जो अर्जुन त्यास. कृष्ण=कृष्णमृग, काळवीट. ११. (अर्जुनाच्या) पाठीमागून गेली. येथें मूळांतील १८८ वा अध्याय संपतो. १२. मान हेंच धन ज्यांचें अशा राजांचा. १३. ठोंसा, तडाका. आपल्या कीर्तीला हा मोठाच धक्का बसला—असा भाव. १४. स्वयंवराचा अधिकार क्षत्रियालाच आहे. (अध्याय १८९ श्लोक ७). १५. ह्याचा कर्ता—द्रुपद. १६. वेदाचें यश. (विप्राला स्वयंवराचा अधिकार नाहीं, क्षत्रियालाच आहे, अशी श्रुति आहे (अध्याय १८९ श्लोक ७). तिचें उल्लंघन दुष्ट द्रुपदानें केलें म्हणून श्रुतीच्या यशाला डाग लागतो). १७. अन्यायाला. १८. धनुष्याची दोरी. १९. धर्मांचें रक्षण करण्यासाठीं. २०. थोडा वेळ. २१. स्वयंवरांतील वधूचा नवरा. २२. नाशास कारण. स्थिति=आचार, मर्यादा.

नवरी न वरील पैरा[1] जरि, तरि दीप्तानळांत[2] होमा[3] ती; ।
वारुनि तें[4], जें अनया[5] कारण, त्याची[6] पळांत हो माती.' ॥ ६०
युद्धोद्यतनृपचक्रत्रस्तमति[7] द्रुपद काळजी वाहे, ।
विप्रांसि म्हणे, 'माझ्या झाले चि नृपाळ काळ जीवा हे.' ॥ ६१
कमळवनावरि गजसे द्रुपदावरि धावले बळी पैर[8] ते; ।
त्यांवरि सज्य[9] करुनि धनु धन्वीश्वर[10] जिष्णु सिंहसा परते. ॥ ६२
सरळ सैंबळ[11] जवळ द्रुम[12] समयीं मिळतां कशास कोदंड[13] ? ।
वाटे, भीम परतला काळ[14], कवळिला न वृक्ष, तो दंड[15]. ॥ ६३
शरणागताभिमानी[16] समरोद्यत[17] सर्व विप्र पाहोनी, ।
अर्जुन बोले, डोले सुरगुरु[18] रोमांचभार[19] वाहोनी. ॥ ६४
'षडरिघ्न[20] तुम्ही गुरु हो ! षडरिजितमदासि[21] काय हरिना[22] मीं[23] ? ।

---

१. दुसऱ्यास ( दुसऱ्या एकाद्या क्षत्रियास ). २. प्रदीप्त झालेल्या अग्नींत. ३. जाळून टाका. ४. तें=ब्राह्मणास क्षत्रियकन्येनें स्वयंवरांत माळ घालणें. तें वारुनि, जें अनया कारण ( अर्थात् द्रौपदी ) त्याची पळांत माती हो ( ती मातीस मिळो, ती नाश पावो )–असा अन्वय. ५. 'वारुनि तेजें, अनया कारण' असा पाठ आहे. त्याचा स्वीकार केल्यास पुढीलप्रमाणें अन्वय करावाः– [ आपल्या ] तेजें अनया कारण [ जो=द्रुपद त्याला ] वारुनी, त्याची पळांत माती होवो. ६. द्रुपदाची; कीं द्रौपदीची (?). मूळांत 'जो हा आम्हांला मानीत नाहीं, त्या ह्या दुष्टाला (=द्रुपदराजाला ) आपण ठार मारूं' असें आहे ( अध्याय १८९।३ ). ७. युद्धास तयार झालेल्या नृपमंडळानें भयभीत केली आहे मति ज्याची असा. ( हें द्रुपदाचें विशेषण ). चक्र= समूह, सैन्य. ८. शत्रु. ९. ज्यासहित. ( ज्या=धनुष्याची दोरी ). १०. धनुर्धरांत अग्रणी. ११. बळकट. मोठमोठीं झाडें उपटून तीं आपल्या शत्रूंवर फेंकून त्यांची दाणादाण उडवावयाची– अशी भीमाची युद्ध करण्याची पद्धति होती. १२. वृक्ष. १३. धनुष्य. १४. यमराज. १५. यमदंड. **उत्प्रेक्षा**लंकार. हीच कल्पना मूळांत आहे. ( अध्याय १८९।१७ ). १६. जे शरण आले त्यांचा ज्याला अभिमान आहे असा. १७. युद्धास तयार झालेला. १८. देवांचा गुरु बृहस्पति. १९. अर्जुनाच्या भाषणानें रोमविकार पावून, आनंदानें रोमांचित तनु होऊन. २०. काम, क्रोध, लोभ, मोह, मद आणि मत्सर, या जिवाचें अनहित करणाऱ्या सहा विकारांचा घात करणारे. २१. कामादि सहा शत्रूंनीं जिंकिलेले जे जन, त्यांच्या गर्वाला. २२. हरण करणार नाहीं काय ? येथें 'हरिं ना मी' असा पाठ असणें व्याकरणदृष्ट्या इष्ट होतें. परंतु **पंत**लिखित पोथींत 'हरिना मीं' असा पाठ आहे. यमक साधण्याकरितां **पंत** कधीं कधीं अनुस्वारांच्या बाबतींत विशेष बारकाई करीत नाहींत. २३. मी=ब्राह्मणांना शिष्य शोभणारा यःकश्चित् मनुष्य.

अरि हरिनें नुचलावें अघदलनीं, बळ उदंडें हरिनामीं. ॥ ६५
युष्मदमय-वर आम्हांकरवीं करवील दुष्टमद-नाशा. ।
साधुपुढें अहिताशा, शंभुपुढें जेंवि दुष्ट मदनाशा.' ॥ ६६
भीमार्जुन शत्रूंवरि फिरतां, दावी मुकुंद रामातें; ।
ज्यां पाहे त्यासि म्हणे बळ, 'तूं बहु सुखद सुंदरा ! मातें.' ॥ ६७
कर्णासीं भीमानुज, शल्यासीं भीमसेन युद्ध करी. ।
तत्तेजस्तब्ध इतर नृप झाले, जेंवि पंकरुद्ध करी. ॥ ६८
रणविस्तर काशाला ? हेमाक्ष-रणीं महाकिरी टिकला, ।
कीं अर्जुन कर्णरणीं; अरिस हि बहु तोषवी किरीटिकला. ॥ ६९
कर्ण म्हणे, 'विप्रवरा ! आनंद दिला तुवां भला आजी; ।
ऐसी नसे चि पूर्वीं आढळली कामुका भला आजी. ॥ ७०
तूं चापवेद, किंवा भार्गव, कीं शक्र, कीं स्वयें विष्णु ? ।
कीं मजसीं झगडेसा होता सुत एक पांडुचा जिष्णु. ॥ ७१
या पांचांमध्यें तूं कोण ? वद स्पष्ट, जाणत्या कळतें ।
वरि गारसा हिरा परि, त्या कवचें तेज काय हो ! मळतें ?' ॥ ७२

---

१. चक्र. २. पापनाश करण्यास्तव. ३. पुष्कळ. पापाचा नाश करण्याकरितां विष्णूनें आपलें सुदर्शनचक्र हातांत घेण्याची गरज नाहीं, त्याच्या नांवाच्या उच्चारानेंच जळून जातात. त्याप्रमाणेंच [ अर्जुन म्हणतो, ] ब्राह्मणांनीं हातांत शस्त्रें घेण्याची आवश्यकता नाहीं. कामक्रोधादि षड्रिपूंच्या तडाक्यांत सांपडलेल्या लोकांची खोड मी मोडीन—असा भाव. ४. तुमचा अभय देणारा प्रसाद. ५. दुष्टांच्या गर्वाचा अंत. ६. अकल्याणेच्छा. ७. दुष्ट मदनाची इच्छा. शंभुपुढें दुष्ट मदनाशा [ जशी नष्ट झाली ] ( किंवा ) साधुपुढें [ जशी ] अहिताशा [ नष्ट होते ], तशी अर्जुनेतर सर्व राजांची आशा नष्ट झाली—असा भाव. ८. कृष्ण. ९. बळरामाला. १०. ज्या ( भीमाला अथवा अर्जुनाला ). ११. बळराम. १२. त्यांच्या पराक्रमानें निश्चल झालेले. १३. चिखलांत रुतलेले. १४. हत्ती. १५. पंतांना लांबलचक वर्णनें आवडत नसून ते संक्षेपानें वर्णन करण्याची शैली पसंत करतात, याचें हें एक उदाहरण आहे. १६. हिरण्याक्षाच्या युद्धांत. १७. महावराह. [ हेमाक्ष= ] हिरण्याक्ष; [ महाकिरी= ] आदिवराह—**पंत.** १८. किंवा. १९. कर्णाबरोबर झालेल्या युद्धांत. २०. अर्जुनाची युद्धकला. २१. चांगला, उत्तम. 'मला' असें पाठांतर. २२. युद्धाची इच्छा करणाऱ्या ( मला ). २३. संग्राम. २४. [ मूर्तिमंत ] धनुर्वेद. २५. परशुराम. २६. इंद्र. २७. चापदेव, भार्गव, शक्र, विष्णु आणि जिष्णु हे पांच. २८. वरून गारेसारखा. अर्थसादृश्य:—जरि उकिरड्यांत पडला, मळला न हिरा तथापि सामान्य। ( पंत ). २९. त्या गारेच्या आवरणानें, आच्छादनानें. ३०. हें गीत्यर्ध सुभाषितरूप आहे.

पार्थ म्हणे, 'मी कार्मुकवेद नव्हें, राम ही नव्हें, आहें ।
विप्र[१] गुरुप्रिय[२], अस्त्रीं, शस्त्रीं पटु[३], चित्र[४] म्हणसि कां गा! हें? ॥ ७३
गुरुचा प्रसाद ज्यावरि काळास हि तो कदापि आटेना[५]; ।
वाटे नारायणसा[६]. अजितपरा[७] तत्सुकीर्ति[८] बाटेना[९].' ॥ ७४
या विप्रवेषवासवि[१०]-मुखवर्णांहीं भरूनियां कर्ण[११] ।
परते[१२], पुरतें जाणे, 'जय्य[१३] नव्हे ब्राह्मतेज[१४]' हें कर्ण. ॥ ७५
त्या[१५] भीमानें हि सुचिर[१६] रुचिर[१७] समर[१८] अमरतोषकर[१९] केला; ।
यत्कीर्तिनें विरेसा दिल्हा जडात्मत्वदोष[२०] करकेला[२१]. ॥ ७६
भीमें शल्य क्षितिवरि कंदुकसा[२२] भुजरणांत[२३] आपटुनी, ।
हांसविले मुनि, न तसे शिशु हि कधीं हास्यरस[२४]कथापटुंनीं. ॥ ७७
शल्य-पराभव[२५] पाहुनि कर्णादिक सर्व शंकले, वरतें[२६] ।
दाविति, परि धैर्य उडे आधीं, मग मद्रपति[२७]कलेवर तें. ॥ ७८
नृप म्हणती, 'हे ब्राह्मण, आम्हांला भीड फार वेदाची, ।
मानधनांसि[२८] न साहे वार्ता अपमानजन्यखेदाची. ॥ ७९
कोठील ब्राह्मण हे? तेजस्वी भीमजिष्णुसे धीट, ।
शोधूं[२९], बरें करूं, करणें तें न विचारितां नव्हे नीट.' ॥ ८०

---

१. ब्राह्मण. २. गुरूचा आवडता. येथें 'विप्रगुरुप्रिय' असा सामासिक शब्द न घेतां 'विप्र गुरुप्रिय' असा पदच्छेद करावा हें बरें. कारण मूळ भारतांत 'ब्राह्मणोऽस्मि' असें आहे. (मूळ अध्याय १९० श्लोक २०). ३. कुशल, निष्णात. ४. आश्चर्य. ५. जेरीस यावयाचा नाहीं. ६. सर्वव्यापी आदिदेवासारखा. ७. पराभव न पावणारी. हें कीर्तीचें विशेषण. ८. गुरूचा प्रसाद ज्याच्यावर आहे, त्याची चांगली कीर्ति. ९. बाटेना=कमीपणा (बट्टा) लावून घेईना. बाट=डाग, दोष, लांछन. १०. ब्राह्मणवेषधारी वासवीच्या (अर्जुनाच्या) तोंडच्या अक्षरांनीं. ११. कान. १२. युद्ध न करतां परत जाई. १३. जिंकण्यास शक्य. १४. ब्राह्मणाचें तेज. 'ब्रह्मतेज' असें पाठांतर. १५. 'त्या भीमानें ही सुर-रुचिर समर' असा पाठभेद. १६. फार वेळ. १७. मनोहर. १८. युद्ध. 'समर' हा शब्द संस्कृतांत पुल्लिंगी व नपुंसकलिंगी आहे. १९. अमरांना (देवांना) संतोषजनक. २०. चेतनाशून्य देहत्वाचा दोष, चेतनारहित देह आहे हा दोष. ह्या गीत्यर्धाचा अर्थ नीटसा लक्षांत येत नाहीं. २१. गारेला. २२. चेंडूसारखा. २३. बाहुयुद्धांत. २४. हास्यरस उत्पन्न करणाऱ्या कथा सांगण्यांत कुशल अशा जनांनीं. २५. पाडाव, मोड. २६. वरवर, वरून. [धैर्य] वरतें दाविति—असा अन्वय. 'पर तें' असें पाठान्तर. २७. शल्याचें शरीर. २८. हें गीत्यर्ध सुभाषितरूप आहे. २९. शोधूं (ब्राह्मणां-

ऐसें वदोनि गेले नृप निजशिबिरांसि[1] कीर्ति हारवुनी, ।
झाले म्लानश्री[2] ते द्विजतेजें, जेंवि पुष्पहार[3] उंनीं[4]. ॥ ८१
साग्रज[5] जिष्णु हि मग त्या द्रुपदसुरद्रुप्रसूनमाळेला,[6] ।
सांभाळुनि स्ववस्त्रच्छायेंत[7] क्षिप्र जाय शाळेला[8]. ॥ ८२
वदले, 'भिक्षा घेउनि आलों, ये जननि ! घे' असें कवि ते ।
तच्चिंतातिमिरहृदयपद्माचे[9][10] प्रेक्षणीय[11] जे सविते[12]. ॥ ८३
शालेंत पृथा बोले, 'भिक्षा माझ्यासमीप ती ठेवा, ।
हो तृप्तिदा सुधासी[13], सर्व भ्राते मिळा, सुखें सेवा.' ॥ ८४
नमितां द्रुपदसुतेतें पाहुनि कुंती म्हणे, "अहा ! देवा ! ।
वदल्यें असें कसें ? कीं, 'सर्व भ्राते मिळा, सुखें सेवा.'-" ॥ ८५
भलतें चि वदे सासू, सासूया[14] जाहली न परि सून; ।
कुंती अधर्मभीता[15] मुदिता[16] ही होय वृत्त परिसून. ॥ ८६
गौरवुनि[17] धरूनि करीं नेउनि धर्माकडे सुने[18], त्या तें ।
सांगोनि, पुसे अनृताधर्महर[19] सुयुक्ति त्या सुनेत्यातें[20]. ॥ ८७
मातेला समजावुनि धर्म म्हणे, 'अर्जुना ! इचा विधिनें[21] ।
पाणि[22] स्वीकारावा आतां त्वां[23] शक्तिकीर्तिच्या निधिनें[23].' ॥ ८८

संबंधीं चौकशी करूं). बरें (जें योग्य दिसेल तें) करूं. न विचारितां (विचार न करितां) करणें (कोणतीही गोष्ट करणें) तें नीट (योग्य, शिस्तीस धरून) नव्हे (नाहीं)–असा अन्वय.

१. शिबिर=सेनेचा तळ, सेनानिवेशस्थान, राहण्याची जागा. २. तेजोहीन. ३. फुलांची माळा. ४. उन्हांत. पंत 'उ' आणि 'वु' यांत अभेद मानितात. ५. भीमासह. ६. द्रुपदरूप कल्पवृक्षाच्या पुष्पांची माळाच अशी जी (द्रौपदी) तिला. ७. आपल्या अंगवस्त्राच्या सांवलींत. (ह्यावरून त्या वेळीं कडक ऊन्ह पडलें होतें, असें दिसतें. मूळांत ह्यासंबंधीं स्पष्ट उल्लेख आढळत नाहीं). ८. कुंभाराच्या घराला, कुलालगृहाला. येथें मूळांतील १९० वा अध्याय संपतो. ९. तिच्या (कुंतीच्या) चिंतारूप तिमिरानें (अंधकारानें) भरलेलें जें हृदय, हेंच पद्म (कमळ) त्याचे. १०. '°पद्मांचे' असा रा० पराडकर यांच्या प्रतींत पाठ आहे. ११. पाहण्यास योग्य. १२. सूर्य. (सूर्यकिरणांनीं पद्में विकसित होतात, या गोष्टीस अनुलक्षून हें वर्णन आहे). १३. अमृतासारखी. १४. दोषदृष्टि, समत्सर. १५. बहुभर्तृतारूप अधर्मामुळें भ्यालेली असूनही. १६. आनंदित. १७. आदर करून. १८. सुनेला. १९. असत्यरूप अधर्म नाहींसा करणारी (आपणास खोटें बोलण्याच्या दोषापासून सोडवील अशी). २०. उत्तम मार्ग दाखविणारा जो धर्म, त्याला. २१. शास्त्रोक्त मार्गानें. २२. हस्त. २३. शक्तिमान आणि कीर्तिमान अशा त्वां.

जिष्णु म्हणे, 'गुरुलंघन[1] अज्ञ जन करो, करी न परि वेत्ता[2], ।
मी तों न आपणाला जाणत जाणत करीन परिवेत्ता[3]. ॥ ८९
त्वां, भीमें, म्यां, नकुळें सहदेवें कार्य[4] पाणिपीडन[5] तें ।
व्हावें क्रमें चि, धर्म्यव्यवहारीं धरुं नये चि भीड नतें[6].' ॥ ९०
धर्म विचार करी, तों अनुजांच्या आपुल्या हि नयना तें ।
रुचलें स्त्रीरत्न, मनें एक चि धरिलें, त्यजूनि नय[7], नातें[8]. ॥ ९१
जनकें[9] हि चुंबिली, जी चुंबावी नंदनें[10] हि नलिनी[11], ती, ।
धरिली त्या कृष्णा-रत-मतिंनीं[12] अति नीचसी च अलि-नीती[13]. ॥ ९२
गज गंगेंत निवाया म्हणति, न चिंतूनि शुद्धि, 'मज्जन[14] हो[15].' ।
तैसे चि पांडुसुत त्या लावण्यनदींत, बुद्धिमज्जन[16] हो ! ॥ ९३
धर्म म्हणे, 'ज्या ध्येयांना[17] अनुसरले हे स्वबंधु चवघे, तें ।
धरिलें माझ्या हि मनें, कोणास हि न पुसतां चि चव घेतें. ॥ ९४
झालें वश निर्जतनया[18] मन, या अनया न यत्न, होगलितें[19] ।
जैं भेदे[20] कटक[21], किजे तैं रायें[22] युद्ध काय हो गलितें ? ॥ ९५
व्यासोक्ति[23] पृथोक्ति[24] जसी अस्मद्वृत्ति हि पहा तसी च वेरें[25], ।

---

१. वडिलांचा अतिक्रम, त्यांचा अनादर. २. ज्ञाता. ३. ज्येष्ठ बंधूपूर्वी विवाह करणारा, लग्न न झालेल्या वडील बंधूचा लग्न झालेला कनिष्ठ बंधु, परिवेदिक. ४. करावें. ५. पाणिग्रहण; वधूचा हात वराच्या हातीं देणें आणि वराचा हात वधूच्या हातीं देणें इत्यादि शास्त्रोक्त विधि. (पाणिपीडन–हा शब्द कालिदासकृत कुमारसंभव सर्ग ८ श्लोक १ मध्यें आढळतो). ६. नम्रानें. ७. नीति सोडून सर्वांच्या मनानें द्रौपदीच्या ठायीं एकच नातें (भार्यारूप) धरिलें. ८. स्त्रीत्वाचें नातें. ९. बापानें. 'जनकेंचि' असें पाठांतर. १०. मुलानें. ११. कमलिनी, कमळाचें झाड. १२. कृष्णेच्या (द्रौपदीच्या) ठायीं रमली आहे मति (मन) ज्यांची, त्यांनीं (पांच पांडवांनीं). १३. भ्रमराची रीति. १४. स्नान. १५. होओ, होवो. (येवो, येओ, होवो, होओ, यांबद्दल यो, हो, अशीं रूपें कवितेंत आढळतात). १६. बुद्धिमान् लोक. १७. ध्यानास्पद वस्तु, ध्यानाचा विषय जो पदार्थ त्याला. १८. मदनास. मनापासून मदन उत्पन्न होतो म्हणून त्यास निजतनय (मनाचा पुत्र) असें येथें म्हटलें आहे. १९. हांकून लावणारें. २०. पराभव पावे. येथें 'भेदें' असा पाठ रा० पराडकर यांच्या प्रतींत आहे. पण तो हस्तदोष किंवा मुद्रणदोष असावा. २१. सैन्य. २२. ज्याचें धैर्य खचलें आहे अशा राजानें. २३. व्यासाची उक्ति. (अध्याय ३३ गीति १–८ पहा). २४. पृथेची उक्ति. (मागची ८४ वी गीति पहा).

प्रभुच्या कोण न सन्मत[1] देतो दासांसि कीर्तिचीं चंवरें[2] ?' ॥ ९६
ज्याची हे स्त्री होइल होतिल रिपु त्या स्वबंधुचे अन्य[3]; ।
जो वासिता[4]सहचर द्विप[5], होती तदरि[6] मद[7]करी वन्य[8]. ॥ ९७
धर्म भ्रात्यांसि म्हणे, 'पांचांची हे सती असो भार्या; ।
श्रुतिची मातेची सम आज्ञा, आम्हां नव्हे चि परिहार्या[9].' ॥ ९८

---

## अध्याय छत्तिसावा.

प्रभु राम कृष्ण दोघे गेले शाळेसि[10] त्या कुलाला[11]च्या. ।
तद्भस[12]भाग्य, भाळीं[13] न बुक्याच्या तें न वा[14] गुलालाच्या. ॥ १
सांगुनि[15] नाम, युधिष्ठिर नमिला यमि[16]-लालसा-कर-यशांनीं; ।
भ्यावें श्रिता[17]शिवांहीं ज्यांप्रति, जैसें हरि[18]प्रति शशांनीं[19], ॥ २
म्हणति पृथेला, 'आत्याबाई ! नमिताति हे तुला भाचे.' ।
यत्पद[20]रजांहुनि उणे इष्टाच्या सर्व हेतु[21] लाभाचे. ॥ ३
हरि भीमासि नमी, दे आलिंगन जिष्णुला, तया यमल[22] ।

---

२५. व्यास व कुंति यांच्या तोंडून जे द्रौपदीच्या स्वीकारासंबंधीं उद्गार बाहेर पडले, तेच वर; त्यांच्या योगानें. वर=अभीष्ट, इच्छा, देणगी.

१. सज्जनांस मान्य. ( हें पद 'दासांसि' याचें विशेषण आहे ). २. चामरें. हें गीत्यर्ध सुभाषितरूप आहे. ३. इतर बंधु त्याचे वैरी होतील. ४. हत्तिणीचा सोबती. ( वासिता=स्त्री, हत्तीण ). ५. हत्ती. ६. त्याचे शत्रु. ७. ज्यांच्या गंडस्थळांतून मदाचा स्राव होत आहे असे हत्ती. ८. जंगली, रानटी. ९. उल्लंघन करण्यासारखी, अमान्य. येथें मूळांतील अध्याय १९१ श्लोक १६ येथपर्यंतचा कथाभाग संपतो. १०. गृहांत. ११. कुंभाराच्या. १२. त्याच्या घरांतील राखेचें भाग्य. १३. कपाळीं. तद्भसभाग्य बुक्याच्या भाळीं न, वा तें ( भाग्य ) गुलालाच्या ( भाळीं ) न–असा अन्वय. १४. किंवा. १५. भलत्याच ठिकाणीं व पूर्वीं कांहीं कल्पना नसतां कृष्ण व बळराम हे पांडवांस भेटले. तेव्हां आपली ओळख झटपट पटावी, म्हणून त्यांनीं आपलीं नांवें पांडवांस सांगितलीं–असा भाव. १६. योग्यांनीं इच्छा करण्याजोगीं यशें ज्यांचीं त्यांनीं. १७. आश्रितांच्या अकल्याणांनीं. १८. सिंहाप्रत. १९. शश=ससा. २०. ज्यांच्या चरणाच्या धुळीहून. २१. इष्टाच्या लाभाचे सर्व हेतु यत्पदरजांहुनि उणे–असा अन्वय. इष्ट वस्तूचा लाभ होण्यास कारणीभूत होणारीं सर्व कारणें ज्यांच्या पदरजाहून कनिष्ठ आहेत, म्हणजे ज्यांच्या पदरजापुढें हीं कारणें तुच्छ आहेत ( सर्व लाभाला कारण हे रजच होत )–असा अर्थ. २२. नकुल व सहदेव.

नमिति; वृकोदर[1] भेटे रामा[2], यच्चिंतनें[3] चि जाय मैल[4]. ॥ ४
कुंती म्हणे, 'असे तों ताप न अमृताब्धिची[5] हरी[6] लहरी[7], ।
झालें चि म्हणत होत्यें मी, जें कीं 'व्यसन हें हरील हरी.' ॥ ५
या दिन[8]तुळेसि पावे न दिवाळी, पाडवा हि न, न दसरा, ।
आम्हांसि भेटलां, हें तेंवि, जसा वाळतां चि वनद[9] सरा[10]. ॥ ६
हे द्वारका, न भार्गवशाळा[11], मज भेटलें चि माहेर; ।
आहे रक्षाव्रतरुचि[12] करुणा तुमच्या चि आंत बाहेर.' ॥ ७
ज्याच्या स्वरोमकूपीं[13] सतत सुखस्वस्थ[14] सत्यपांड[15] वसे, ।
धर्म म्हणे त्या प्रभुला, 'कळलों[16] हे केंवि सत्य पांडवसे?' ॥ ८
कृष्ण म्हणे, 'असतां ही गूढ[17] कसा अग्नि भारता! कळतो? ।
आकळिला[18] मृगमद[19] जरि बहुयत्नें वास काय आकळतो[20]? ॥ ९
लोपे कवि[21] न कुवासें[22], पावे ख्यातीस मंद न सुवासें[23], ।

---

१. भीम. (याचा जठराग्नि अतिशय प्रदीप्त असल्यामुळें हा लांडग्याप्रमाणें पुष्कळ अन्न खाऊन पचवी, ह्मणून त्यास वृकोदर हें नांव पडलें असावें. शब्दार्थ पाहिला तर लांडग्याप्रमाणें याचें पोट होतें इतकाच आहे). २. बळरामाला. ३. ज्या बळरामाच्या स्मरणानें. ४. पाप. ५. सुधासागराची. ६. कृष्ण. ७. लाट. अमृताब्धिची लहरी (लाटच असा) हरी असे (आम्हास अनुकूळ असे) तों (तोंपर्यंत) [आम्हांस] ताप न (दुःख होणार नाहीं)–असा अन्वय. येथें 'कुंती म्हणे असे तो ताप'–असा पाठ आहे. त्यास अनुसरून पुढीलप्रमाणें अर्थ करावाः–कुंती म्हणे, 'मी जें म्हणत होतें कीं, [जो] ताप असे तो अमृतसिंधुची लहरी न हरी; हरी हें व्यसन हरील. [तें आज खरें] झालेंचि. ह्या अर्थास पुढील गीति पोषकच आहे. ८. या दिवसाच्या साम्याला. ९. मेघ. वन (उदक)+द (देणारा). १०. सरोवराला. सरोवर आटून शुष्क झालें असतां अकस्मात् पर्जन्यवृष्टि व्हावी, तसाच हा प्रकार घडला–असा भाव. ११. कुंभाराची मडकीं घडण्याची जागा. १२. रक्षणरूप व्रताची आवड. १३. रोमरंध्रांचे ठायीं. येथें 'स्वरोमकूपीं' यांतील 'स्व' निरर्थक दिसतो. १४. सुखी आणि निःशंक. १५. सत्य (सत्यलोक)+प (पति)=ब्रह्मा; ब्रह्मा+अण्ड=ब्रह्मांड=सत्य-लोकाचा पालनकर्ता ब्रह्मा, त्याचें अंड=ब्रह्मांड. १६. आम्ही खरोखर पांडवच आहों, हें तुम्हांला कसें कळलें?–असा भाव. '[आम्ही] केंवि कळलों?'–हा प्रयोग चिंतनीय आहे. 'कळले' असें पाठांतर. १७. गुप्त. हाच दृष्टांत मूळ ग्रंथांत आहे. (अध्याय १९१. श्लोक २३). १८. आंवरिला. १९. कस्तूरी समानार्थक सुभाषितः—यदि सन्ति गुणाः पुसां विकसन्त्येव ते स्वयम्। नहि कस्तूरिकामोदः शपथेन निवार्यते.॥ २०. आंवरतो. हें अर्ध उत्तम सुभाषित आहे. २१. ज्ञानी, पंडित. २२. घाणेरड्या वस्त्रानें. २३. उत्तम वस्त्रानें.

कळतो चि जाणत्याला सर्वतरुश्रेष्ठ चंदन सुवासें.[1] ॥ १०
आहेत वीर बहु जरि, परि भेदाया[2] पणा असाध्या या ।
निपुण तुम्ही च, मज इतर नाहीं जी ! आपणाअसा[3] ध्याया[4]. ॥ ११
व्यसन चुकविलें, पहिला लोकीं हा लाभ साजिरा, ज्यो[5] जी ।
प्रथम असावी ती ही कीर्ति मिळाली च आजि, राजाजी[6] ! ॥ १२
वाटे[7], म्हणेल त्यांची मति त्यांला कीं, 'तुम्ही नभा उखळा'. ।
मूर्ख भलतें चि करिती, सज्जन ही आवडे न भाउ खळा ! ॥ १३
वृद्धि असावी तुमची, शत्रूचे सर्व गर्व हरपावे[8]. ।
व्यसनीं बुडवूं पाहति खळ ज्यां[9], त्या सज्जनांसि हर पांवे[10]. ॥ १४
द्यावा निरोप आम्हां, झालों भेटोनि आजि सानंद. ।
धर्में[11] तुम्हांला व्यसनीं रक्षक, मज सोग्रजा[12] जसा नंदें[13]. ॥ १५
प्रिय आमुचे बहिश्चर[14] पंच[15] प्राण चि तुम्ही, न असुहित[16] ।
कोणी ही होवूं दे, भवदवन[17] स्वहित, अन्य अ-स्वहित[18].' ॥ १६
ऐसें वदोनि ते प्रभु[19] करिती कोणांसि न कळतां गमन; ।

---

१. उत्तम परिमलामुळें, ही गीति सुभाषितांत गणण्यालायक आहे. २. द्रुपदानें केलेल्या पणाला. ३. आपणासारखा. ४. ध्यान कराया, चिंतन कराया. ५. 'ज्याची' असें पाठांतर. ६. 'राजाची' असें पाठांतर. ७. त्यांची ( दुर्योधनादिकांची ) मति त्यांला म्हणेल ( स्पष्टपणें सांगेल ) कीं, 'तुम्ही ( पांडव ) नभा उखळा' (आकाशाला देखील उखळाल ). [ पण ते ] मूर्ख भलतें च्चि करिती. सज्जन भाउ ही ( देखील ) खळा ( दुष्टाला ) न आवडे–[ असें मला ] वाटे–असा अन्वय. कृष्ण म्हणतोः–मला वाटतें कीं, जर कौरव जरा विचार करितील, तर त्यांचें त्यांनाच कळून येईल कीं पांडव मोठे बलाढ्य आहेत. पण ते मूर्ख भलतेंच करितात ! दुष्टच ते ! ( मत्सरामुळें ) त्यांना त्यांचे सज्जन भाऊ देखील आवडत नाहींत ! ८. हरण व्हावे, नाहींतसे व्हावे. ९. '°खळ ज्या त्या सज्जनासि' असें पाठांतर. १०. प्रसन्न होई, इष्टकामना पूर्ण करी. ११. युधिष्ठिर, ( पक्षीं ) धर्माचरण. 'धर्म' ह्या शब्दावर **श्लेष** आहे. अशीच श्लिष्ट योजना **पं**तांनीं अन्यत्र केली आहे. ( कर्णपर्व, अध्याय ३५।६२ व ४९।१६ ). १२. माझा वडील भाऊ जो बलराम त्यासह मला. अग्रज=ज्येष्ठ बंधु. १३. हा गोकुळांतील संपूर्ण गोपालांचा स्वामी आणि कृष्ण व बलराम यांचा पिता जो वसुदेव त्याचा परम मित्र होता. १४. शरीराबाहेर फिरणारे पांच प्राण. १५. प्राण, अपान, व्यान, उदान आणि समान हे शरीरांतील पांच वायु होत, त्याप्रमाणें शरीराबाहेरचे पांच पांडव हे पांच प्राण. १६. प्राणाचें अहित. ( असु+अहित ). १७. तुमचें रक्षण. १८. स्वहित नव्हे असें, अर्थात् परहित. १९. कृष्ण आणि बलराम.

मग भिक्षान्नें केलें रात्रौ त्या साधुंनीं क्षुधाशमन. ॥ १७
राहोनि गुप्त धृष्टद्युम्नें तच्छोध[1] लाविला आंगें[2]. ।
त्यातें द्रुपदनृप पुसे, 'वत्सेची[3] गति कशी? सुता! सांगें.' ॥ १८
धृष्टद्युम्न म्हणे, 'ज्या पुरुषें नेली स्वसा[4] महाभागें[5] ।
गेलों कुलालशालेप्रति शोध करावया तयामागें. ॥ १९
ते पांच बंधु, आहे माता त्यांची जशी सुरी[6], तीतें ।
त्यांतें पाहुनि झालों हृष्ट विलोकूनि ही सु-रीतीतें[7]. ॥ २०
त्यांचें विलोकिलें म्यां तैसें कोठें हि दिव्य तेज नसे; ।
आश्चर्यरूप पांच हि न पहावे ते धरापते[8]! जनसे[9]. ॥ २१
भिक्षान्न त्यांसि वाढुनि, मग कृष्णा तें चि जेविली नमुनी, ।
गमलें नसेल तैसें सुख त्यां, ब्रह्मीं हि जे विलीनें[10] मुनी. ॥ २२
त्यांच्या चि पायथां ती निजली; ते[11] राशि रत्नहेमाचे[12], ।
गणिले कुशशयनोन[13] चि कृष्णेनें हे[14] पलंग, हे[14] मांचे[15]. ॥ २३
मज त्यांच्या शब्दादि[16]व्यवहारीं क्षत्रियत्व आढळलें, ।
जरि भिक्षुवेष[17] शिव[18] तरि, तेज तया[19] त्यजुनि काय गा! ढळलें[20]? ॥ २४
न जळाले पांडव ते, होईन चि सत्यतर्क[21] बहुधा मीं; ।
न विशेष[22] विप्रवेषीं त्यांच्या[23] दिसतो, विशेष बहु धामीं[24].' ॥ २५
राजा म्हणे, 'असो हा वत्सा! तव सत्य तर्क रे! तें हो, ।

---

१. तत्+शोध=त्यांच्या ( कुलशीला ) विषयीं शोध ( तपास ). २. स्वतः, जातीनें. ३. बाळेची ( द्रौपदीची ). ४. भगिनी. ५. महाभाग्यशाली पुरुषानें. ६. देवस्त्री, जणूं काय देवताच. ७. सदाचारातें. ८. हे पृथ्वीपते द्रुपदा! ९. प्राकृत जनांप्रमाणें, सामान्य लोकांसारखे. १०. गढून गेलेले. येथें रा० पराडकर यांच्या प्रतींत 'विलिन' असा शब्द आहे. पण तो हस्तदोष किंवा मुद्रणदोष असावा, हें उघडच आहे. ११. पांडव. ते रत्नहेमाचे राशि [ गणिले ]=असा अन्वय. १२. रत्नांचे आणि सुवर्णाचे १३. दर्भशयनाहून उणे, कमी योग्यतेचे. १४. हे=द्रुपदराजाच्या मंदिरांतील. १५. बाजा, खाटा. १६. त्यांच्या सेना, अस्त्रें, शस्त्रें, गदा, रथ इत्यादिकांच्या संबंधानें झालेल्या गोष्टींवरून. १७. भिकाऱ्याचा वेष धारण करणारा. १८. ईश्वर-पंत. १९. शंकराला. 'तेज तयां त्यजुनि' असें पाठांतर. २०. ढळणें=चलन पावणें, कमी होणें. २१. खरा आहे तर्क ज्याचा असा. २२. विशिष्ट गुण, विशिष्ट कर्म. २३. अर्जुनादिकांच्या. 'त्याचा' असें पाठांतर. २४. तेजामध्यें.

जें [1]दमयंतीजनका सुख, मुख हें पात्र [2]शर्करेतें हो.' ॥ २६
प्रातःकाळीं धाडी मग [3]पार्षद त्यांकडे [4]पुरोध्यास. ।
'देवद्विजप्रसादें' तो हि म्हणे, 'नृपतिचा [5]पुरो [6]ध्यास.' ॥ २७
[7]त्यांसि [8]उपाध्याय म्हणे, '[9]स्वयशोर्थ करा कृपा; सकळ [10]वांहो ।
आधि महा[11]सुख-पूरें, कुळ नाम तुम्ही नृपास कळवा हो ! ॥ २८
झाला द्रुपद बहु सुखी, आजि तुम्हां [12]न्हाणणार, [13]कनकानें ।
पूजील, पूजिले ते जैसे दशरथकुमार जनकानें. ॥ २९
[14]वांटे होता अर्जुन [15]वर व्हावा, तो चि काम पुरला हो ! ।
बुध हो ! निजकुळ कळवा, हें [16]मिथिलेच्या यशासि पुर लाहो.' ॥ ३०
[17]पूजुनि धर्म म्हणे, 'कां नृप करितो खेद ? जें [18]गत न ये तें. ।
हा पण, कीं लक्ष्याचा भेदक जो, तो चि योग्य तनयेतें. ॥ ३१
झालें तें चि, मनोरथ पुरला असतां किमर्थ हा शोध ? ।
समजा मनीं, कसें यश मेळविता [19]अकुळ भलतसा [20]योधें ?' ॥ ३२
यापरि धर्म वदे, तों द्रुपदें [21]प्रेषूनि [22]आप्त 'जेवा या' ।
ऐसें [23]प्रार्थुनि नेले, गेले [24]सुरथीं बसोनि जेवाया. ॥ ३३

१. दमयंतीचा पिता जो विदर्भ देशाचा भीमराजा त्याला. नलदमयंतीस्वयंवरास उद्देशून येथील वर्णन आहे ( पंतकृत वनपर्व, अध्याय ४ पहा ). २. साखरेतें. तुझ्या तोंडांत साखर पडो, म्हणजे–तुझें भाषण खरें होवो–असा भाव. ३. द्रुपद ( पृषतराजाचा पुत्र ). ४. उपाध्यायास, पुरोहिताला. ५. परिपूर्ण होवो. ६. इच्छा. ७. पांडवांस. ८. ज्याच्या घरीं जाऊन विद्यार्थी यथाशास्त्र अध्ययन करतात तो उपाध्याय. ९. आपली कीर्ति व्हावी यास्तव. १०. सकळ आधि ( मनोव्यथा ) महासुख-पूरें ( मोठ्या सुखाच्या पुरानें ) वाहो ( वाहून जावो )–असा अन्वय. ११. 'आधीं महासुख पुढें' असा पाठ आहे, तो स्वीकारल्यास पुढीलप्रमाणें अन्वय करावा:—आधीं तुम्ही नृपास [ आपलें ] कुळ [ व ] नाम कळवा. [ मग ] पुढें सकळ महासुख वाहो ( वाहून जाईल इतकें विपुल सुख प्राप्त होवो ). १२. स्नान घालणार. १३. सुवर्णानें. कनक=सोनचांफा, सोनकमळ, धोत्रा. १४. मला वाटतें ( हें पुरोहिताचें भाषण ). १५. द्रौपदीचा पति. १६. मिथिलानगरी ही जनकाची राजधानी. १७. पुरोहिताचा आदरसत्कार करून. १८. गेलेलें, घडलेलें. 'गतशोको न कर्तव्यः', 'गतस्य शोचनं नास्ति' इत्यादि वचनें हाच अर्थ ध्वनित करितात. १९. कुलहीन, नीचकुलोत्पन्न. २०. वीर, योद्धा. २१. पाठवून. २२. विश्वासू मनुष्य. येथें मूळांतील १९३ वा अध्याय संपतो. २३. 'विनवुनि' असें पाठान्तर.

ऐकुनि धर्मोक्त[1] पुरोहितवदनें[2] हृष्ट होय तो लेशं[3], ।
चिंताब्धिमग्नमतिभूद्धारा[4] योजी उपाय-कोलेश[5]. ॥ ३४
ज्या ज्या वर्णा[6] जें जें व्यवहारा योग्य वस्तु सर्व हि तें, ।
तद्दृष्टीस पडेसें मांडविलें पार्षतें सुधी-महितें[7]. ॥ ३५
वर्णपरीक्षार्थ[8] असें केलें कीं वस्तु जें तयां इष्ट ।
त्यावरुनि जाति त्यांची जाणावी ते अशिष्ट कीं शिष्ट[9]. ॥ ३६
पाहुनि त्यांसि जन म्हणति, 'अहा ! पहा हो ! अहो ! अजिन-रहितें[10] ।
उडविति सुरत्व रूपें, करितिल हे[11] काय कीं अजि नरहितें[12] !' ॥ ३७
द्रुपदातें द्रुप[13] दाते स्वर्गींहुनि वाटले गृहा आले; ।
आधींतें[14] आधीं तें तद्दर्शन नुरवि, सर्व ही धाले[15]. ॥ ३८
बसतां वरासनीं[16] कीं भोजन करितां न शंकले चुकले. ।
श्रीमद्गुणवत्त्वें[17] ते पांडुतनय जिष्णुविष्णुसीं[18] तुकले[19]. ॥ ३९

---

२४. उत्तम रथांत. 'स्वरथी' असा रा० पराडकर यांच्या प्रतींत पाठ आहे. स्व=( ? ). त्या प्रसगीं पांडवांजवळ स्वतःचा रथ नव्हता, हें सर्वांस माहीतच आहे.

१. धर्माचें भाषण. 'धर्मोक्ति' असें पाठांतर. २. उपाध्यायाच्या मुखानें. ३. अल्पांश, कण. ( ? ). लेश=क्षण. क्षणभर (?). ४. चिंता+अब्धि+मग्न+मति+भू+उद्धारा=चिंतारूप समुद्रांत बुडालेली जी बुद्धिरूप पृथ्वी तिच्या उद्धाराला. **रूपका**लंकार. ५. ( उपायरूप ) महावराह-**पंत.** कोल=वराह. ६. जातीला. ७. सुज्ञ जनांस मान्य अशा द्रुपदानें. ८. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र या चार वर्णांपैकीं कोणत्या वर्णाचे ते आहेत ही परीक्षा करावी म्हणून. ९. सभ्य, सुसंस्कृत, सुशिक्षित. १०. अजिनरहितें रूपें ( अंगावरील काळविटाचें कातडें दूर केलेल्या रूपानें, उघड्या अंगानें ) सुरत्व ( अर्थात् भूसुरत्व=ब्राह्मणत्व ) उडविति-असा अन्वय. ते उघड्या अंगाचे पाहिल्यावर ते ब्राह्मण आहेत, असें वाटलें नाहीं-असा भाव. येथें 'अजि ! नरहि तें' अशीं पदें पाडून पुढीलप्रमाणें अन्वय करितां येईल:—नरहि [ आपल्या ] रूपें तें सुरत्व उडविती; म्हणजे हे पांडव मनुष्य असून [ आपल्या ] रूपानें देवपणाचा ( देवांचा ) तिरस्कार करितात. अर्थात्-हे पांडव देवांपेक्षां देखील सौंदर्यानें ज्यास्त आहेत-असा भाव. ११. 'करितील ते' असें पाठान्तर. १२. ते मनुष्यमात्राचें कल्याण करण्यासाठींच अवतरले आहेत कीं काय असें वाटतें-असा भाव. १३. द्रु ( वृक्ष )+प ( पति )=वृक्षश्रेष्ठ. दाते द्रुम=कल्पवृक्ष. ह्या गीतींत **उत्प्रेक्षा**लंकार असून दोन्ही अर्धांच्या प्रारंभीं **लाटानुप्रास** आहे. १४. मनोव्यथांना. १५. तृप्त झाले. १६. श्रेष्ठ आसनावर. १७. श्रीमंतांच्या गुणांनीं संपन्न असल्यामुळें. १८. इंद्र आणि विष्णु यांशीं. १९. तुलना पावले.

त्या विविधवस्तुमध्यें जें जें धनुरादि वस्तु समर-हित[1] ।
तिकडे च ते पहाती[2], जैसे विषयांकडे चि शमरहित[3]. ॥ ४०
असकृत्[4] भागवत[5] जसें मुमुक्षुहीं[6] धीरजनकृतस्तुतिहीं[7], ।
अवलोकिलें, धरुनियां बहु आदर संगरार्ह[8] वस्तु तिहीं. ॥ ४१
नृप[9] तच्चेष्टित[10] पाहुनि, विप्र न ते, पांडुसुत असें समजे. ।
सुज्ञासि[11] झांकिले ही कळति गुण ख्यात[12] मृगमदासम[13] जे[14]. ॥ ४२
धर्मासि मग ह्मणे[15], 'हो पूर्ण करा सर्व कामना[16], मातें ।
सांगा स्वनाम, सांगति जैसे गुरुराज[17] रामनामातें. ॥ ४३
माझें मानस[18] आहे तुमच्या बहु साभिलाष[19] कुल-नामीं, ।
पावेन श्रवण करुनि पीतामृततुष्टपुष्टतुलना[20] मीं. ॥ ४४
विधिनें[21] करीन कन्यादानमहोत्सव म्हणून कामातें ।
पुरवा हो ! पुरें[22] वाहो सुखपूरीं, परें[23] म्हणूं नका मातें.' ॥ ४५
धर्म म्हणे, 'नृपनाथा ! युष्मत्कृत[24] तर्क जे न ते लटिके, ।
तज्ज्ञातज्ज्ञपरीक्षेमाजि[25] पळ हि घृतपणें[26] न तेल टिके. ॥ ४६
भूदेव[27] नहों[28], क्षत्रिय आम्ही श्रीपांडुराजसुत, राया ! ।

---

१. युद्धोपयोगी. २. येथें रा० पराडकर यांच्या प्रतींत 'पहाति' असा शब्द आहे. ३. मनोनिग्रहरहित, अर्थात् विषयी लोक. ४. वारंवार. ५. पुराण, श्रीमद्भागवतग्रंथ. ६. मुक्ति इच्छिणाऱ्या जनांनीं, मोक्षार्थी जनांनीं. ७. सुज्ञ लोकांनीं केली आहे स्तुति ज्यांची त्यांनीं. ( हें 'मुमुक्षु' याचें विशेषण. ) जसें भागवत धीरजनकृतस्तुतिहीं मुमुक्षुहीं असकृत् [ अवलोकावें तसें ] तिहीं संगरार्ह वस्तु बहु आदर धरुनियां अवलोकिलें–असा अन्वय. ८. संगर+अर्ह=युद्धाच्या कामीं योग्य असे पदार्थ. 'वस्तु' हा शब्द संस्कृतांत नपुंसकलिंगी आहे. ९. द्रुपद. १०. त्यांचें आचरण, कृति. येथें मूळांतील १९४ वा अध्याय संपतो. ११. 'सुज्ञांसि' असें पाठांतर. १२. प्रसिद्ध. १३. कस्तूरीसारखे. १४. हें अर्धसुभाषितरूप आहे. ( मागें गीति ९ व ती वरील टीपा पहा ). १५. याचा कर्ता 'द्रुपद' ( अध्याहृत ). १६. इच्छा. १७. तशीच आवश्यकता असेल, तर आपलें नांव कानांत सांगा–असा भाव. गुरु आपल्या शिष्याला जो मंत्र देतो तो त्याच्या कानांत सांगतो–हें प्रसिद्धच आहे. १८. अंतःकरण. १९. इच्छान्वित, उत्सुक. २०. अमृतपानानें जो तुष्ट आणि पुष्ट झाला आहे, त्याची बरोबरी. २१. यथाशास्त्र. २२. नगर. येथें **लाटानुप्रास** आहे. २३. परका. २४. तुम्हीं केलेले. २५. तज्ज्ञ+अतज्ज्ञ+परीक्षेमाजी=तें जाणणारे व न जाणणारे यांच्या परीक्षेंत. २६. तूप म्हणून. २७. विप्र, ब्राह्मण. २८. नहों=न+आहों. 'नव्हों' असें पाठान्तर.

हा [1]विप्रवेषसेत्ववलंब [2]व्यसनार्णवासि उतराया. ॥ ४७

[3]वोळख गा ! [4]वोळ [5]खगावरि घनसा, राजसत्तमा ! राया ! ।

हे ते चि, जपत होता ज्यां [6]तो [7]मंदमद्यमत्त माराया.' ॥ ४८

[8]द्रुपद म्हणे, 'मी च सुखी, न [9]असा पावोनि अन्य कामातें, ।

झाली ताराया [10]शतपुत्रवरा [11]धन्य कन्यका मातें. ॥ ४९

व्यसनीं सहाय [12]झाला रामाला [13]काननांत वानर ही, ।

होइल सहाय मग तुज भीष्माच्या कां न नातवा नर ही ? ॥ ५०

[14]विहित चि [15]सत्कार्यार्थ स्वप्राणांचा विनाश [16]पथकरितां ।

दैवाधीन सकळ, परि मज [17]तें भय दाविना शपथ करितां.' ॥ ५१

करुनि समाधान असें [18]पंचायतनापरी च तो [19]भावें ।

पूजी पांडुकुटुंबा, सुज्ञें पूज्यासि कां न [20]लोभावें ? ॥ ५२

'पाणिग्रहण करावें कृष्णेचें अर्जुनें [21]विधानानें' ।

हें धर्माप्रति म्हणतां द्रुपदानें [22]प्रीतिच्या [22]निधानानें, ॥ ५३

धर्म म्हणे, 'मी आधीं, मग भीमप्रभृति बंधु हे तीतें ।

विधिनें धरितील [23]करीं, धरिति जसे वीर एक [24]हेतीतें. ॥ ५४

---

१. ब्राह्मणवेषरूप सेतूचा आश्रय. २. संकटरूप सागरास. **रूपका**लंकार. ३. ओळख. येथें **लाटानुप्रास** आहे. ४. प्रसन्न हो, वळून पहा, प्रीति कर. ५. पक्ष्यावर ( चातकावर ). ६. दुर्योधन. ७. गर्वरूप मद्यानें माजलेला. ८. 'भूप म्हणे' असें पाठांतर. ९. कामातें पावोनि [ जगांत ] मी च सुखी [ असें. ] असा ( सुखी ) अन्य ( कोणीही ) न ( नसे )–असा अन्वय. माझी मनकामना पूर्ण झाल्यामुळें माझ्यासारखा धन्य मीच–असा इत्यर्थ. १०. शंभर पुत्रांहून श्रेष्ठ. ११. पुण्यवान्, भाग्यशाली. १२. ज्या अर्थी रामाला संकटकाळीं वानर ( पशु ) साहाय्य झाले, त्या अर्थी धर्मराजाला नर ( सामान्य मनुष्य, पशु नव्हे असा प्राणी ) ही ( देखील ) साहाय्य कां होणार नाहीं ?–असा अन्वय. पूर्वार्धातील 'ही'=ज्या अर्थी, जर कां व उत्तरार्धातील 'ही'=देखील–असा अर्थ करावा. १३. वनांत. १४. योग्य. १५. साधूंच्या कार्यासाठीं. १६. स्वीकारितां. १७. तें=साहाय्य करण्याची शपथ घेणें. तुम्हास साहाय्य करणें हें सत्कार्य आहे. या कामीं आपले प्राण गेले तरी तें योग्य आहे. म्हणून तुम्हांस साहाय्य करण्याच्या कामीं, सर्व गोष्टी दैवाधीन असतात तरी, न भीतां शपथ घेतों–असा द्रुपदाच्या भाषणाचा मथितार्थ. १८. शिव, विष्णु, सूर्य, गणपति, आणि देवी यांच्या समूहास 'पंचायतन' म्हणतात. या पांच दैवतांप्रमाणें. १९. भक्तीनें. २०. लोभ करावा, प्रेम करावें. 'सुज्ञें पूज्यांसि' असें

द्रुपद म्हणे, '[1]धर्मज्ञा ! सविधि वरावी तुवां चि, अथवा हे ।
एकें चि [2]युष्मदनुजें, म्हणसी-[3]ऐसा जगीं न [4]पंथ वाहे.' ॥ ५५
धर्म म्हणे, 'मातेची आज्ञा आम्हां नृपा ! [5]श्रुतिसमान; ।
**[6]धर्मज्ञ साधु देती मान गुरूक्तिस, जसा [7]श्रुतिस मान.** ॥ ५६
बहुतां ऋषींस भजली [8]जटिलाख्या **गौ**तमी, तथैव [9]सती ।
[10]वार्क्षी [11]दशप्रचेतःस्त्री, यत्कीर्तीस [12]सत्सभा [13]वसती.' ॥ ५७
**ध**र्मोक्तिं वक्ता परि केवळ **पां**चाळ [14]कोंडला, गावें ।
[15]तत्कालागतशुकगुरुसद्यश, तेथें चि [16]तोंड लागावें. ॥ ५८
द्रुपदातें एकांतीं नेउनियां [17]देवगुह्य सांगाया, ।
**व्यास** म्हणे, 'धर्माचें शुचि मत, होसी न मान्य कां गा ! या ? ॥ ५९
पूर्वी सत्रीं [18]दीक्षित **यम** असतां राहिलें [19]प्रजाशमन, ।
त्यास्तव [20]**सेंद्र**सुरांचें इच्छी [21]अमरप्रजाविनाश मन. ॥ ६०

---

पाठान्तर. २१. यथाविधि. २२. प्रीतीचें भांडारच असा जो द्रुपद त्यानें. २३. करीं धरितील=पाणिग्रहण करितील. २४. तरवारीतें.

१. तुमच्या धाकट्या बंधूनें. २. धर्म जाणणाऱ्या धर्मराजा ! येथें 'धर्मज्ञ' ह्या विशेषणाची योजना सहेतुक असल्यामुळें येथें **परिकरा**लंकार आहे. ३. तूं म्हणतोस तसा, म्हणजे–पांचांनीं एकीला वरावें असा. ४. रीति, चाल. ५. वेदासारखी, अर्थात् प्रमाण, मान्य. ६. धर्म जाणणारे. ७. वेदास. ८. जटिला ही गौतम ऋषीची कन्या. ती सर्व धर्मसंरक्षकांमध्यें श्रेष्ठ असून सात ऋषींची भार्या होती. ( मूळ अध्याय १९६ श्लोक १४ ). ९. पतिव्रता. १०. वृक्षापासून उत्पन्न झालेली मारीषासंज्ञक कन्या ती. ११. प्राचीनबर्हिराजाचे समुद्रकन्या सवर्णा हिच्या ठायीं झालेले जे प्रचेतःसंज्ञक दहा पुत्र त्यांची स्त्री. ( मूळ अध्याय १९६ श्लोक १५ ). १२. सज्जनांचा समुदाय. १३. राहाण्याचें स्थान. जिची कीर्ति सज्जनांच्या समुदायांत राहाते, म्हणजे जिची कीर्ति सज्जन वर्णन करितात, अशी ( वार्क्षी ). १४. कुंठित झाला. १५. तत्+काल+आगत+शुक+गुरु+सत्+यश=त्याच वेळीं ( तेथें ) आलेल्या व्यासांचें उत्तम यश. शुकगुरु=शुकाचा पिता ( व्यास ). १६. तोंड लागणें=आरंभ होणें. व्यास आल्यावर सदर्हू विषयासंबंधीं चर्चेस आरंभ होवो–असा **पं**तांच्या म्हणण्याचा भाव. येथें मूळांतील १९६ वा अध्याय संपतो. १७. देवाच्या मनांतील गुप्त हेतु, रहस्य. १८. सत्रामध्यें जे यजमान असतात, त्यांनीं दीक्षा घेतली पाहिजे असें आहे दीक्षा घेतल्यावर यज्ञकर्माव्यतिरिक्त कर्म करावयाचें नाहीं, असा नियम आहे. १९. प्रजा मारण्याचें काम. २०. इंद्रासह देवांचें. २१. अमर ( न मरणाऱ्या–मृत्युरहित ) झालेल्या प्रजांचा नाश. यम दीक्षित असल्यामुळें प्रजानाशाचें काम बंद पडलें होतें.

विधि[1] विनविला[2] तिहीं[3], तो सांगे सत्रीं[4] यमाकडे[5] जाया, ।
येतां विलोकिली श्रीगंगास्रोतांत[6] ऐश्वरी[7] माया. ॥ ६१
हेमाब्ज[8] येत होतें वाहत त्याचा करावया शोध, ।
एकाकी[9] शक्र[10] निघे अवलंबुनि[11] देवसिंधुचें[12] रोध[13]. ॥ ६२
गंगेत पावकद्युति[14] योषा[15] दूरूनि देखिली रडती. ।
तीचे[16], होती कांचनपद्म[17], जळीं अश्रुबिंदु जे पडती. ॥ ६३
शक्र म्हणे, 'कोणाची तूं, दुःखा पात्र दुःसहा या जी ?' ।
ती 'सांगूं काय ?' म्हणे 'पुसतां चि तरि स्वयें पहा यां[18] जी[19]!' ॥ ६४
स्त्रीसह जातां हरि[20] गिरिवरशिखरीं[21] अशनिला[22] करीं वाहे. ।
सिद्धासनस्थ[23] अक्षक्रीडारत[24] दिव्य दंपती[25] पाहे. ॥ ६५
दावी प्रभुत्व[26] शब्दें[27] तों त्या पुरुषें[28] विलोकिला मात्र, ।
झाला स्तंभितगात्र[29] च्छात्र[30] गुरूचा[31] भयाब्धिला[32] पात्र. ॥ ६६

---

१. प्रजापति, ब्रह्मदेव. २. पृथ्वीवर मनुष्यांची वृद्धि झाली आहे, यामुळे आम्हांस मोठें भय आहे; अमर आणि मनुष्य यांमध्यें कांहीं अंतर नाहीं, तर देवांना मनुष्यांपेक्षां कांहीं विशेष असावा—याप्रमाणें प्रार्थना केली. ३. इंद्रासहित सोम, वरुण, कुबेर, वसु, इत्यादि देवांनीं. ४. यज्ञांत. ५. यमधर्माकडे. ६. गंगाप्रवाहांत. ७. ईश्वराची अद्भुत कृति. ८. सुवर्ण-कमळ. ९. एकटाच. १०. इंद्र. ११. आधार घेऊन, आश्रय करून. इंद्र गंगेच्या कांठाकांठानें शोध करावयास निघाला—असा भाव. १२. गंगेचें. १३. तीर. १४. अग्नीसारखी तेजस्वी. १५. स्त्री. १६. 'त्यांचे' असें पाठांतर. त्यांचे=त्या अश्रुबिंदूंचे. १७. सुवर्णकमळें. 'पद्म' हा शब्द संस्कृतांत पुल्लिंगी व नपुंसकलिंगी आहे. १८. चला, माझ्याबरोबर स्वतः चला आणि पहा. १९. अजि. २०. इंद्र. २१. श्रेष्ठ पर्वताच्या शिखरावर, हिमालयशिखरावर. २२. वज्राला. २३. 'सिंहासनस्थ' असें पाठान्तर. २४. फांशांच्या खेळांत निमग्न. २५. जोडपें, स्त्रीपुरुष ( शंकर व पार्वती ). २६. सत्ता, अधिकार. २७. मला जाणत नाहींस काय? हें भुवन माझ्या ताब्यांत आहे. मी सकल देवांचा स्वामी आहें, तूं अक्षक्रीडेमध्यें निमग्न होऊन प्रमत्त झालास काय?—इत्यादि शब्दांनीं. २८. शंकरानें. २९. निश्चळ, ज्याचें शरीर स्तब्ध झालें आहे असा, ज्याची हालचाल बंद झाली आहे असा. अशाच एका प्रसंगाचें वर्णन कालिदासकृत रघुवंशांत आढळतें. दिलीपराजा वशिष्ठऋषीच्या कामधेनूचें वनांत रक्षण करीत असतां, त्याची परीक्षा पाहाण्याच्या हेतूनें शंकराचा गण कुंभोदर ह्यानें सिंहाचें रूप घेऊन तिच्यावर झडप घातली. त्या वेळीं राजानें सिंहावर बाण सोडून तिचें संरक्षण करण्याचा प्रयत्न केला, पण त्याचा हात स्तंभित झाला. ( सर्ग २ श्लोक ३१ ). अशाच आणखी एका प्रसंगाचा उल्लेख द्रोणपर्वांत

त्या स्त्रीस म्हणे तो [1]प्रभु, 'आण पुढें, फार दावितो बल हा.' ।
स्त्री स्पर्शतां चि पडला [2]छिन्नांघ्रिद्रुम जसा तसा [3]बलहा. ॥ ६७
आज्ञा करूनि करवी [4]त्या हातीं दूर अद्रिच्या शिखरा. ।
तेव्हां शक्र समजला कीं, हा चि प्रभु [5]बळांबुराशि खरा. ॥ ६८
[6]शिखरपिधानापनयन करितां चि, गुहेंत [7]तो पुरुष [8]चवघे ।
पाहे बहुतेजस्वी, [9]मंजूषेमाजि [10]मणि तसे अवघे. ॥ ६९
'चौघांत पांचवा हो' म्हणतां, हरि त्या [11]महेश्वरा कुपिता ।
नमुनि म्हणे, 'विश्वगुरो! होताति [12]कुपुत्र, परि नव्हे [13]कु-पिता.' ॥ ७०
देव म्हणे, 'रे! [14]यांवरि [15]मदमत्त तुम्ही कदापि [16]व्हा ना कीं? ।
जा, होउनि [17]नरें, [18]भूभर हरुनि, पुन्हा [19]वासयोग्य व्हा [20]नाकीं. ॥ ७१
[21]बहुभोगासक्त तुम्ही, नव्हतां चि [22]मदर्चनीं बरे [23]जागे, ।
पांचांस दिली [24]स्वःश्री [25]हे स्त्री, मुलि! तूं हि जन्म घे जा गे!' ॥ ७२
ती कृष्णा हे, पांडव झाले ते पांच इंद्र [26]मानव रे! ।

आढळतो ( पंतकृत द्रोणपर्व, अध्याय २४ गीति १७–१९ ). ३०. शिष्य ( इंद्र ). ३१. बृहस्पतीचा. ३२. भयाच्या सागराला. भीतिग्रस्त झाला, घाबरला–असा भाव. येथें रा० पराडकर यांच्या प्रतींत 'भयधिला' असा पाठ असून त्यावर 'भीतीच्या समृद्धीला ( अतिशय भीतीला )'–अशी टीप दिलेली आहे.

१. शंकर. ( अक्षक्रीडा समाप्त झाल्यावर शंकर म्हणे. ) २. ज्याचीं मुळें तुटलीं आहेत असा वृक्ष. 'छिन्नाद्रि–द्रुम' असें पाठान्तर. ३. इंद्र. ( बलनामक असुराचा हंता ). ४. इंद्राच्या हातानें. गुहेचें द्वार झांकणारें जें अद्रिशिखर तें इंद्राकरवीं शंकर दूर करवी. ५. बलसागर. ६. शिखर हेंच पिधान ( झांकण ) त्याचें अपनयन ( दूरीकरण ). ७. इंद्र. ८. हे चार पुरुष पूर्वींचे इंद्र होत. ९. पेटींत. १०. रत्नें. 'फणि' असें पाठान्तर. फणि=सर्प. हा पाठ स्वीकारिल्यास मंजूषा=पेटारी, करंडी असा अर्थ. ११. शंकराला. १२. वाईट पुत्र. १३. वाईट बाप. कल्पनासादृश्य:–न निष्ठुर पिता, म्हणे मनिं, 'न हो प्रजा टोणपी' ( केकावली–८९ ). संस्कृतांत 'कुपुत्रो जायेत क्वचिदपि कुमाता न भवति' असें वचन आहे. त्यांत प्रसंगास साजेसा फेरफार करून हें गीत्यर्ध पंतांनीं रचिलें असावें, असें वाटतें. ह्या अर्धास मूळांत आधार नाहीं. १४. याच्यानंतर. १५. गर्वानें उन्मत्त. १६. होणार नाहीं ना?–असा भाव. १७. मनुष्य. १८. पृथ्वीचा भार. १९. वसतीस योग्य ( पूर्वार्जित कर्माच्या योगानें ). २०. स्वर्गीं. २१. सुखोपभोगांत अत्यंत निमग्न. २२. माझ्या पूजेविषयीं. २३. जागृत, सावध. २४. स्वर्गश्री, स्वर्गलक्ष्मी. 'स्वश्री' असा रा० पराडकर यांच्या प्रतींत पाठ आहे. २५. ही ( इंद्रास घेऊन शंकराकडे गेलेली स्त्री. ) २६. 'इंद्र ही नव रे!' असें पाठान्तर.

त्वत्कन्येचे पांच हि होणार चि ते नरोत्तमा ! नवरे. ॥ ७३
तसे चि भूमिभरपरिहारार्थ[1] सहाय यांसि लोकेशें[2] ।
सित[3] असित कच[4] दिले[5], बळ[6] शुक्कें, कृष्णें हि कृष्ण तो केशें. ॥ ७४
सांगोनि देवगुह्य[7] व्यास स्वकमंडलुस्थ तीर्थ-जळ ।
लावुनि नयनीं देता झाला द्रुपदासि दिव्यदृष्टि पळ[8]. ॥ ७५
शक्रांश एक[9], पहिले चार, असे इंद्र पांच त्या रूपें ।
अवलोकिले प्रसादें मुनिच्या तत्काळ पार्षतें भूपें. ॥ ७६
मुनिला नमुंनि[10] विमोह-द्रुपदें[11] स्वीकारिली तदाज्ञा ते. ।
कन्या[12] पांचांसि दिली; झाले बहुहृष्टधी[13] तदा ज्ञाते. ॥ ७७
द्रुपद पृथेसि म्हणे, 'म्यां वरिले कुरुकीर्तिहेतु[14] जामाते, ।
परिपाळावी, दिधली कन्या सेवेसि हे तुजा[15], माते !' ॥ ७८

---

१. पृथ्वीचा भार उतरण्याकरितां. २. लोकपति जो भगवान् नारायण त्यानें. ३. सित म्हणजे पांढरा आणि असित म्हणजे काळा. याविषयीं आधार—'स चापि केशौ हरिरुद्बबर्ह शुक्लमेकमपरं चापि कृष्णम् । तौ चापि केशौ निविशेतां यदूनां कुले स्त्रियौ रोहिणीं देवकीं च ॥ तयोरेको बलभद्रो बभूव योऽसौ श्वेतस्तस्य देवस्य केशः । कृष्णो द्वितीयः केशवः संबभूव केशो योऽसौ वर्णतः कृष्ण उक्तः ॥' (महाभारत, आदिपर्व, अध्याय १९७ श्लोक ३२-३४). भावार्थः–भगवान् नारायणानें आपला सित (पांढरा) आणि असित (काळा) असे दोन केश उपटून यदुकुळांत टाकिले; त्यांत श्वेत केंसाचा अवतार रोहिणीचे ठायीं बळराम झाला आणि कृष्ण केंसाचा अवतार देवकीच्या ठायीं श्रीकृष्ण झाला. ४. केश. ५. भगवान् नारायण यानें दिले. पांच इंद्रांस बरोबर घेऊन उमापति नारायणाकडे गेला, त्यानेंही या पांच इंद्रांस मनुष्यलोकीं जन्म घेण्यास आज्ञा दिली; (मूळ अध्याय १९७ श्लोक ३१). ६. बळराम. ७. देवांची गुप्त गोष्ट; पांच इंद्र हेच पांच पांडव आणि स्वर्गश्री ही लक्ष्मी इत्यादि रहस्य. ८. पळभर, थोडा वेळ. ९. अर्जुन हा इंद्राचा अंश. इंद्र स्वपदाधिष्ठित असल्यामुळें त्यानें जन्म न घेतां आपल्या वीर्यानें उत्पन्न झालेला असा अंशभूत पांचवा पुरुष दिला तो अर्जुन. (मूळ अध्याय १९७ श्लोक २८). १०. 'मुनिसि नमूनि' असें पाठान्तर. ११. पांच पांडवांशीं एका कन्येचा विवाह कसा लावावा याविषयींचा मोह ज्याचा दूर झाला आहे, अशा द्रुपदानें. विमोह=मोहरहित. १२. पंतांनीं द्रौपदीच्या विवाहसमारंभाचें वर्णन करावयाचें कां टाळिलें नकळे. मूळ अध्याय १९८ श्लोक १–१८ यांत हें वर्णन आहे. या १८ श्लोकांचा सारांश पंतांनीं फक्त ७७ व्या गीतींत आणिला आहे! १३. अत्यंत संतुष्ट आहे मन ज्यांचें असे. १४. कुरुकुलाच्या कीर्तीस कारणीभूत असे. १५. तुजा=तुझ्या. रा० पराडकर यांच्या प्रतींत 'तुज्या' असा शब्द आहे.

कृष्णें पांडव गज-रथ-हय-दासी-दास-रत्न-धन-दानें ।
गौरविले, ऐसे ज्यां पाहुनि [1]व्हावें सलज्ज [2]धनदानें. ॥ ७९
पांडववृत्तश्रवणीं [3]स्वें [3]उर क्षाळुनि [4]उदश्रुबिंदूंनीं ।
गेले [5]स्वयंवरागत नृप, भीष्मास हि मनांत निंदूनी. ॥ ८०
दुर्योधन कर्ण शकुनि बहु निंदुनि त्या [6]पुरोचना यवना ।
[7]भवना गेले, लावुनि वैर, [8]हरीसीं [9]करी जसे [10]स्वंवना. ॥ ८१

## अध्याय सदतिसावा.

विदुर म्हणे, '[11]राजाजी ! [12]कौरव उदयासि पावले जाणा.' ।
धृतराष्ट्र म्हणे, 'कृष्णेसह [13]मन्नमना [14]सुयोधना आणा.' ॥ १
[15]क्षत्ता म्हणे, 'नृपाळा ! नमना आतां चि आणितों, पण ती ।
पांडवभार्या कृष्णा आहे [16]निजपितृपुरीं, असें म्हणती'. ॥ २
अंध म्हणे, 'गा ! विदुरा ! झालें हें वृत्त अमृत कानांतें. ।
जें द्रुपदासीं [17]घडलें तें न यशस्कर गमेल कां [18]नातें ? ॥ ३

१. मान खालीं घालावी. येथें मूळांतील १९९ वा अध्याय संपतो. ह्या अध्यायांत १९ श्लोक आहेत. त्यांचा सारांश पंतांनीं गीति ७८–७९ मध्यें आणिला आहे. २. कुबेरानें. ३. आपलें वक्षस्थळ. ४. नेत्रांतून जे अश्रुबिंदु निघाले त्यांनीं. ५. स्वयंवरासाठीं आलेले. स्वयंवरास आलेल्या राजांनीं परत जातांना भीष्म आणि धृतराष्ट्र यांचा पुरोचनानें केलेल्या अत्यंत दुष्ट कर्माबद्दल धिक्कार केला–असें मूळांत आहे ( अध्याय २००।७ ) ६. ज्याला कौरवांनीं पूर्वीं लाक्षागृह करून पांडवांस मारण्याविषयीं इंद्रप्रस्थास पाठविलें होतें तो. ७. गृहाला. ८. सिंहासीं. ९. हत्ती. १०. आपल्या अरण्याला. ११. हे राजा धृतराष्ट्रा. १२. ( विदुरमतें ) कुरुकुलोद्भव पांडव, ( पक्षीं, धृतराष्ट्रमतें ) दुर्योधनादि पुत्र. यास आधारः—'मन्यते स वृतं पुत्रं ज्येष्ठं द्रुपदकन्यया । दुर्योधनमविज्ञानात्प्रज्ञाचक्षुर्नरेश्वरः ॥' ( मूळ अध्याय २०० श्लोक १९ ). भावार्थः–आपला ज्येष्ठ पुत्र दुर्योधन यासच द्रुपदकन्येनें वरिलें, असें अज्ञानामुळें त्या प्रज्ञाचक्षु नृपतीला वाटलें. विदुरानें 'कौरव' हा शब्द योजिल्यामुळें धृतराष्ट्राचा गैरसमज झाला, कारण कौरव म्हणजे कुरुवंशोत्पन्न कोणीही. वस्तुतः 'कौरव' व 'पांडव' हे कुरुकुलोत्पन्न असल्यामुळें ते दोघेही 'कौरव' च होते. १३. मला नमन करण्याकरितां. १४. दुर्योधनाला. १५. सुत, विदुर. १६. आपल्या बापाच्या नगरींत. १७. जें नातें द्रुपदासीं घडलें ( जडलें, जुळलें ) तें [ मला ] यशस्कर कां न गमेल ( वाटेल )?–असा अन्वय. १८. रा० पराडकर यांच्या प्रतींत 'नांतें' असा शब्द आहे.

यांच्या त्यांच्या[1] ठायीं समता ममता, न तातता[2] दुसरी, ।
तत्सुख मत्सुख, हे तनु होत चि होती तदाधिनें[3] उसरी[4].' ॥ ४

विदुर म्हणे, 'गा ! बापा[5] ! बुद्धि असावी असी च आर्याची; ।
या लोकीं परलोकीं संपत्तीहूनि हे चि कार्याची[6].' ॥ ५

असतां[7] विदुर, सुयोधन धृतराष्ट्राला म्हणे, 'अहो ! तात ! ।
मज बहु दुःखद तुमचे आतांचे मंत्रवर्ण[8] होतात. ॥ ६

करिसि[9] सपत्नगुणस्तुति. मानिसि रिपुवृद्धिला स्ववृद्धि नृपा ! ।
व्यर्थ अपत्यें[10] कां हीं ? कांहीं यांवरि कसी नसे चि कृपा[11] ?' ॥ ७

प्रज्ञाचक्षु[12] म्हणे, 'मज पडतो संकोच फार विदुराचा, ।
पूर्व[13] हि हेतु सुखाचा स्वापत्यांच्या तसा न विधुराचा[14]. ॥ ८

पांडवगुणवर्णन तें विदुरमनोधारणार्थ, हें साचें, ।
वरि सरस, आंत नीरस मद्भाषण मित्र[15] होय फेंसाचें. ॥ ९

इनकांत[16] काय[17] येतो मंदाक्षाच्या, त्यजून काच, मना[18] ? ।
मज हित तूं चि, न धर्म, प्राणांच्या तो करील आचमना[19]. ॥ १०

दुष्कर हि करीन, वेंदा[20] धरिला स्वमनांत निजहितोपाय[21]; ।

---

१. पांडवांच्या आणि धार्तराष्ट्रांच्या ठायीं. २. पितृत्व. पांडव व कौरव यांच्याविषयीं माझ्या मनांत 'मी त्यांचा तात' हीच एक भावना वसत आहे–असा भाव. ३. त्या पांडवांच्या दुःखानें. ४. पळवा. उसरी=वांगीं, अळूं इत्यादि पदार्थ कापून सुकवून ठेवितात ती. (म्हणजे–माझी तनु दुःखामुळें वाळून शुष्क होत होती, असा भाव). ५. 'शत वर्षे' असें पाठान्तर. ६. कामाची, उपयोगाची. ७. विदुर स्वगृहीं निघून गेल्यावर. ८. पूर्वगत विदुरधृतराष्ट्रसंवादांतील अक्षरें. ९. शत्रूंच्या गुणांचें स्तवन. १०. मुलें. (अपत्यें म्हणजे ज्यांच्या योगें पितर पतन पावत नाहींत तीं). ११. येथें मूळांतील २०० वा अध्याय संपतो. १२. धृतराष्ट्र. प्रज्ञा (बुद्धि) हाच आहे चक्षु नेत्र ज्याला; ज्याला चर्मचक्षु नाहींत तो. १३. पित्रादि-**पंत.** १४. संकटाचा, कष्टाचा. 'विदुराचा' असें पाठांतर. विदुर=पंडित, ज्ञाता. १५. फेंसाचें मित्र म्हणजे फेंसासारखें बाहेरून सरस पण आंत रसहीन. १६. सूर्यकांत. १७. 'इनकांत काय होतो' असें पाठांतर. १८. काच (कांच) त्यजून मंदाक्षाच्या (ज्याची दृष्टि मंद आहे त्याच्या) मना इनकांत येतो काय ?–असा अन्वय. ज्याला नीट दिसत नाहीं, त्याला सूर्यकांतमणि व कांच यांतील फरक कसा दिसणार ?– असा भाव. हें गीत्यर्ध सुभाषितरूप आहे. १९. आचमन=तळहातावर पाणी घेऊन पिणें. आचमन करणें=पिणें, गिळणें. प्राणांच्या आचमना करील=तो माझे प्राण घेईल–असा भाव. २०. धृतराष्ट्र एकट्या दुर्योधनाशीं बोलत आहे. पण तें भाषण सर्व कौरवांस उद्देशून असल्या-

छेदावा गति[1]हेतु हि जो विषरु[2]ग्दुष्ट निज हि तो पाय.' ॥ ११
स्वमत सुयोधन सांगे, 'भेदावा[3] द्रुपद भूरि[4]धनदानें, ।
येणें[5] कोण चळेना ? काय महातरु चळेल म नदानें[6] ? ॥ १२
कीं जें अन्योन्य[7] असे पावेल प्रेम अंत, राया ! तें, ।
जेणें योजावें त्या पांचांत स्त्र्यादि[8]अंतरायातें. ॥ १३
कीं भीम मारवावा देववुनि क्ष्वेड[9] हें चि भंद्र[10] हित, ।
मरतील चि, वांचोनि हि काय ? शव[11] चि ते समस्त तंद्रहित[12].' ॥ १४
ऐशा सांगे तो खळ मूर्ख पित्याजवळि नैकॅकूपाया[13], ।
सुविचारहंस भेटति कैसे कुविचारभेक[14]-कूपा[15] या ? ॥ १५
कर्ण म्हणे, 'राया ! हें[16] व्यर्थ, जसें बुद्धिहीन मृग[17]-पोर. ।
योजावें पढवुनि वधयुक्ति विदारावयासि मृगपोर[18]. ॥ १६
तों वणवा विझवावा, जों भेटि तया दिली नसे वार्ते; ।
यदुबळ न भेटतां अरि मारा, जें अन्य मत न सेवा तें. ॥ १७
ऐसें स्वमत तुम्हांला कथितों मी आप्त म्हणुनि मायेनें[19]. ।
मज आजि आजिनें[20] फळसिद्धि दिसे जसि, तसी न मायेनें[21].' ॥ १८
धृतराष्ट्र म्हणे, 'कर्णा ! कथितो शक्रासि जीव[22] जेंवि हित[23], ।

---

मुळें येथें 'वदा' असें अनेकवचनी क्रियापद योजिलें आहे. धरिला=धरिलेला, योजिलेला. २१. आपल्या हिताचा उपाय.

१. चालण्याच्या कार्मी उपयोगी असा. २. विषरूप रोगानें दूषित झालेला. हें गीत्यर्ध सुभाषितरूप आहे. ३. भेद पाडावा, फितूर करावा. ४. पुष्कळ द्रव्याच्या देणगीनें. ५. पुष्कळ द्रव्य देऊन. 'द्रव्येण सर्वे वशाः', 'धनं सर्वप्रयोजनम्' हीं सुभाषितवचनें प्रसिद्धच आहेत. ६. मोठ्या नदीच्या पाण्याच्या धडाक्यांनीं. ७. [ परस्पर ] जें अन्योन्य प्रेम असे, तें राया ! अंत पावेल–असा अन्वय. ८. स्त्री+आदि+अंतरायातें=स्त्रियादिक विघ्नातें. ९. विष. १०. सुख. ११. प्रेत. १२. त्या भीमारहित. येथें मूळ २०१ वा अध्याय संपतो. १३. न+एक+कु+उपाया=अनेक दुष्ट उपायांना. १४. भेक=बेडूक. रूपकालंकार. १५. दुष्ट विचाररूप भेक (बेडूक) ज्यांत आहेत अशा कूपाला (दुर्योधनाला) सुविचाररूप हंस कोठून भेटणार ? १६. हें=गीति १२ ते १४ मधील दुर्योधनाचें भाषण. १७. हरिणाचें बालक. १८. मृग+प (मृगप)+उर=सिंहाचें (मृगपाचें) वक्षस्थळ (उर). सिंहहृदय–पंत. १९. ममतेनें. २०. युद्धानें. २१. कपटानें. २२. बृहस्पति. २३. कल्याण.

कीं[1] यदुवरासि[2] उद्धव, सांगसि मज तूं तसें चि जें विहितें[3].' ॥ १९
मग भीष्मद्रोणविदुर संमत[4] घ्याया समीप आणविले[5]. ।
त्यांला वृद्ध[6]-सुयोधन-कर्णांनीं निजविचार जाणविले. ॥ २०
गांगेय म्हणे, 'वत्सा ! गांधारीनंदना[7] ! स्वभावांसीं[8] ।
न बरा विरोध दुष्टांसीं हि; करिल कोण सु-स्वभावांसीं[9] ? ॥ २१
मज ते तुम्ही सम, जसा धृतराष्ट्र, तसा चि पांडुराजा गा ! ।
कुरुवंश हा जयास्तव सुयशा डिंडीरपांडुरा[10] जागा[11]. ॥ २२
तुमचें तसें चि त्यांचें[12] राज्य, तयां भाग द्या सम[13]; न्यूनें[14] ।
अंशें[15] अनिष्ट, धरितां धन्व[16] करीं अर्जुनें सम-न्यूनें[17]. ॥ २३
वैरें भस्म करावें न कुरुकुळा, जेंवि काननां[18] दावें[19], ।
यश सुख पुण्य मिळे, मग बंधूंनीं नीट कां न नांदावें[20] ? ॥ २४
सामजळें[21] प्रक्षाळा, व्याकुळ करितें महापयश[22] मातें ।
तप्त[23] हि सन्मन धरितें पुनरपि वरितें महा पय शमातें[24]. ॥ २५

---

१. श्रीकृष्णाला. २. हा कृष्णाचा चुलत भाऊ. याच्या बापाचें नांव देवभाग (वसुदेवाचा कनिष्ठ भ्राता) आणि आईचें नांव कंसा. हा परमबुद्धिमान्, नीतिमान् व मसलत सांगण्यांत कुशल होता. यास पुसल्यावांचून कृष्ण कोणतीही मसलत करीत नसे. हा मोठा मुत्सद्दी सचिव होता आणि याजवर कृष्णाचें प्रेम होतें. ३. योग्य. ४. संमति, रुकार. ५. येथें मूळांतील २०२ वा अध्याय संपतो. ६. धृतराष्ट्र. ७. गांधारीच्या पुत्रा ! दुर्योधना ! ८. दुष्टांसीं हि स्वभावांसीं विरोध न बरा, (मग) सुस्वभावांसीं (भावांसीं) कोण (विरोध) करील-असा अन्वय. ९. ज्यांचा स्वभाव चांगला आहे त्यांशीं. हें अर्ध सुभाषितरूप आहे. १०. फेंसासारख्या शुभ्र अशा सुयशाला. डिंडीर=समुद्रफेंस, फेंस. ११. पात्र, स्थान. १२. त्या पांडवांचें. १३. सारखा. १४. उणें, कमी. (हें 'अंशें' याचें विशेषण.) न्यूनें अंशें समन्यूनें अर्जुनें धन्व करीं धरितां अनिष्ट (होईल)-असा अन्वय; कमी राज्यांशानें क्रुद्ध झालेल्या अर्जुनानें हातांत धनुष्य धरिलें असतां अनिष्ट होईल-असा भावार्थ. महाभारतांतही 'अर्धभूमिं राज्यस्यार्धम्' असाच उल्लेख आहे. (मूळ अध्याय २०३ श्लोक ४-८). १५. अहित (होईल). १६. धनुष्य. १७. सक्रोध अशा अर्जुनानें. मन्यु=क्रोध. १८. वनाला. १९. वणव्यानें. २०. हें गीत्यर्ध सुभाषित होय. २१. सख्यरूप उदकानें. २२. मोठी अपकीर्ति. २३. संतापलेलें (पक्षीं) कढलेलें. येथें 'तप्त' ह्या शब्दावर श्लेष आहे. कल्पनासादृश्य:—जल ज्वलनसंगमें त्यजि न शैत्य तें आपलें. । (केकावली-पद्य ८८). २४. शांतीतें, (पक्षीं) शीतत्वातें. पय= दूध, किंवा पाणी.

[1]साधील [2]हरिमुखीं ही कोणी घालुनि हात [3]कवळा हो ! ।
दुर्मिळ [4]पांडुसुतामिष, न तुम्ही व्हा आत्मघातक, [5]वेळा हो !' ॥ २६
द्रोण म्हणे, 'धृतराष्ट्रा ! पुसतां, जें युक्त तें चि सांगावें; ।
सुजनीं, सुजनें त्यागुनि हरिगीत, [6]ग्राम्यगीत कां गावें ? ॥ २७
तिकडे [7]सामपटु पुरुष शीघ्र तुम्हांकडुन आत्मसम जावा, ।
द्या अर्धराज्य त्यांला, आणा, चित्तीं शिरोनि, [8]समजावा. ॥ २८
धाडा उत्तम वस्त्रें रत्नालंकार हार अथवा जी ।
हे संपत्ति [9]समर्पा, [10]प्रेषा [11]पत्ति [12]द्विपेंद्र रथ [13]वाजी.' ॥ २९
कर्ण [14]म्हणे, 'मेळवुनि [15]प्रभुपासूनी [16]प्रभूत धन मान ।
बहु [17]अंतरंग होउनि, [18]करिति [19]स्वार्थार्जनीं न [20]अनमान. ॥ ३०
प्रभुचें न [21]कथिति, आपण यद्यपि [22]नयधर्मपटु, तथापि हित, ।
[23]अद्भुत [24]हितशत्रुत्व न उमजे [25]सद्रीतिसत्कथापिहित ! ॥ ३१
**[26]शठमित्रमंत्रपान [27]प्राज्ञमतें परम [28]विषम रायाला, ।**
हें घडतां नलगे चि प्राशावें इतर विष मरायाला. ॥ ३२
शिष्ट म्हणति, '[29]दिष्ट खरें सुखदुःखद [30]विष्टपीं,' जसें इष्ट ।

---

१. मिळवील. २. सिंहाच्या तोंडांत. 'सिंहमुखींच्या' असें पाठांतर. ३. ग्रासाला ( घांसाला ). हें सुभाषित आहे. ४. पांडव हेंच आमिष ( मांस ). ५. माझें म्हणणें मान्य करा. येथें मूळांतील २०३ वा अध्याय संपतो. ६. गांवढळ, हलकट गाणें. ( अश्लील किंवा बीभत्स लावण्या इत्यादि ). ७. सख्य घडवून आणण्यांत कुशल. ८. समजूत घाला. 'चित्तीं धरोनि समजावा' असें पाठान्तर. समजावा=समंजसपणा, समजूतदारपणा. ९. अर्पण करा, द्या. १०. पाठवा. ११. पायदळ. १२. गजश्रेष्ठ. १३. घोडे. १४. मूळ अध्याय २०४ श्लोक १३ पहा. १५. राजा धृतराष्ट्रापासून. १६. पुष्कळ. १७. सुपरिचित, प्रियतम, जीवलग. १८. याचा कर्ता 'भीष्म, द्रोण'. १९. स्व+अर्थ+अर्जनीं=आपला इष्ट अर्थ संपादण्यांत. २०. उपेक्षा, हयगय. २१. यद्यपि आपण ( भीष्म, द्रोण ) नयधर्मपटु, तथापि प्रभुचें हित न कथिति-असा अन्वय. २२. नीति व धर्म यांत निष्णात. २३. धृतराष्ट्राला भीष्म व द्रोण ह्यांचें खरें स्वरूप कळत नाहीं, हें मोठें आश्चर्य आहे-असा कर्णाच्या भाषणाचा मथितार्थ. २४. बाहेरून मित्रत्व दाखवून आंतून वैर करणें. २५. उत्तम रीति आणि उत्तम कथा यांनीं आच्छादित ( झांकलेलें ) असें ( हितशत्रुत्व ). २६. लबाड मित्रांच्या उपदेशाचें सेवन ( त्यांच्या मसलतीप्रमाणें वागणें ). २७. सुज्ञांच्या मतानें. २८. दुःखद, भयंकर. २९. दैव. ३०. जगांत. [ विष्टप= ] जगत्-**पंत.**

किंवा अनिष्ट करितें[1], मित्र तसें; अन्य कल्पन[2] क्लिष्ट[3]. ॥ ३३
लोकांत सावधपणें शब्दें[4] हितें[5] अहित[6] ओळखा, वागा, ।
दुर्योधना ! सख्या ! बहु बोलुनि म्यां काय बोळ[7] खावा ? गा !' ॥ ३४
द्रोण म्हणे, 'आम्ही हितशत्रु[8], न तूं, सुप्तसर्प[9] तुडवाया ।
सांगसि जो दाटूनि व्यसनविषमहार्णवांत[10] बुडवाया ! ॥ ३५
रे कर्ण ! दीर्घदर्शी[11] जो तो चि मनुष्य, अन्यथा नरसा ।
दिसला, तरि पशु, ज्या दे, मातेचें त्या न अन्य थान रसा[12]. ॥ ३६
सेवितया[13] वृद्धाचें मंत्रित हित, हित तसें न तरुणाचें, ।
विष म्हणसि कसें त्याला ? अमृताधिक उक्त[14] जें सकरुणाचें. ॥ ३७
झाला असतां प्राप्त क्षयनामा[15] काळवल्लभ[16] व्याधी[17] ।
क्षीणायुला[18] चि वाटे वैद्याची स्वाहिता[19] चि भव्या[20] धी.' ॥ ३८
विदुर म्हणे, 'दादाजी ! करिताहे ज्यांसि[21] आ पतित[22] ऊन्हीं[23] ।

---

१. जसें [ दिष्ट ] इष्ट किंवा अनिष्ट करितें, तसें मित्र [ देखील इष्ट किंवा अनिष्ट करितें ]–असा अन्वय. येथें रा० पराडकर यांच्या प्रतींत 'किंवा अनिष्ट करितें मित्र नसें' असा पाठ असून, 'करितें=करणारें'–अशी टीप दिलेली आहे. २. कल्पना, तर्क. ३. अयुक्तिक, असंगत, व्यर्थ. ४. ( त्यांच्या ) भाषणावरून. ५. मित्र. ६. शत्रु. ७. बोळ=एका झाडाचा चीक. हा कडू असतो. हा खाल्ला असतां तोंड कडू होणें साहाजिकच आहे, तेव्हां 'उगीच ज्यास्त बोलून तोंड कशाला कडू करून घेऊं ?' किंवा 'तुमच्यामध्यें ज्यास्त कडूपणा कशाला उत्पन्न करूं ?' असा कर्णाच्या भाषणाचा भाव दिसतो. ८. कपटी मित्र. ९. निजलेला साप. १०. संकट हेंच विष, त्याच्या मोठ्या समुद्रांत. 'जो तूं निजलेल्या सापाला तुडवायला सांगतोस तो तूं हितशत्रु नव्हेस आणि आम्ही मात्र हितशत्रु आहों; नाहीं का ?–असा भाव. हें द्रोणाचार्यांचें भाषण औपरोधिक आहे. ११. दूरवर विचार करणारा, धोरणी. १२. गोडी, चव. जो दीर्घदर्शी तोचि मनुष्य [ होय ]. ज्या मातेचें थान अन्य रसा न दे ( दुग्धच देई ) त्या ( नरा ) तो अन्यथा ( निराळ्या रीतीनें ) नरसा ( मनुष्यासारखा दिसला, तरि [ तो ] पशु [ च समजावा ]–असा अन्वय. १३. सेवन करणाराला. वृद्धाचें मंत्रित सेवितया हित, तसें तरुणाचें ( मंत्रित सेवितया ) हित न–असा अन्वय. १४. भाषण, वचन. १५. क्षय आहे नांव ज्याचें तो. १६. काळाचा मित्र. १७. शरीरव्यथा, रोग. १८. ज्याचें आयुष्य क्षीण ( कमी ) झालें आहे, त्याला. १९. आपल्या अकल्याणाची. २०. शुभ, मंगल. धी=विचार, कल्पना. वैद्याची भव्या धी क्षीणायुला चि स्वाहिता ( स्व+अहिता ) चि वाटे–असा अन्वय. कल्पनासादृश्यः–( १ ) युक्तचि मरणाराला हितपरिणामहि न सोसवे काढा. । ( मागें अध्याय ९।३९ ); ( २ ) मरणाऱ्या रोग्याला काय करिल जाणता भला वैद्य ? । ( पंतकृत सभापर्व, अध्याय २।३७ ). २१. ज्या उदकास्तव. २२. पडलेला. २३. उन्हांत.

पाजिलिया हि धरावें तिळभरि हि न [1]तें चि [2]आप [3]तितऊंनीं. ॥ ३९
[4]तैसें चि हें; गुरूक्ता [5]तापत्रयतप्त सुज्ञ [6]आ पसरी, ।
[7]जड चि न घे, ज्याची करि अमृत न [8]सुरसिंधुचें हि आप [9]सरी. ॥ ४०
भीष्मोक्तासि न देसी मन, देउनि काय [10]त्यांविना [11]कर्ण? ।
[12]गुरुसूक्तास हि तुमचा [13]हितकरवर [14]सूक्त [15]मानिना कर्ण. ॥ ४१
काय न [16]हितवाक् गुरु हे? हितवाक् [17]गुरुहूनि काय गा! [18]बाळ? ।
टाकूनि [19]सार सुज्ञा! गोळा करितोसि काय [20]गांबाळ? ॥ ४२
दुर्योधनकर्णशकुनि[21]मंत्रें महाघातकर अगा! राया! ।
[22]बाळोक्ता वश होउनि लाविसि शोकाग्नि कां [23]अगारा या? ॥ ४३
[24]**पूर्वजसंपादित जें करितो ज्ञाता भला जतन यश तें,** ।
तुझिया तों [25]लोभहतज्ञानें त्यजिली च लाज [26]तनयशतें. ॥ ४४

---

१. 'जेंवि' असें पाठान्तर. २. उदक. ऊनीं पतित ज्यासि आ करिताहे, तेंचि आप तितऊंनीं पाजिलिया तिळभरिहि न धरावें !–असा अन्वय. धृतराष्ट्रा ! तुम्ही चाळणीसारखे असल्यामुळें तुम्हाला उपदेश करणें म्हणजे पालथ्या घड्यावर पाणी ओतण्यासारखें आहे. तुम्हाला केलेला उपदेश तुम्ही एका कानानें ऐकाल व दुसऱ्या कानानें सोडाल म्हणून तुम्हाला उपदेश करणें व्यर्थ आहे—असा विदुराच्या ह्मणण्याचा मथितार्थ दिसतो. ३. चाळणींनीं. [ तितउ= ] चालनी–**पंत.** येथें रा० **परा**डकर यांच्या प्रतींत 'तितवूनीं' असा शब्द आहे. ४. 'तैसे चि हे' असें पाठान्तर. ५. आधिभौतिक ताप ( पंचमहाभूतांपासून होणारा ताप-धरणीकंप, अग्निपीडा, समुद्रानें मर्यादा सोडणें, पाण्यांत बुडणें ); आध्यात्मिक ताप ( शरीरास होणारा ताप–रोग, खरुज ); आधिदैविक ताप ( देवापासून होणारा ताप–विद्युत्पतन, अनावृष्टि, अतिवृष्टि ); या तीन तापांनीं तप्त झालेला. ६. गुरूक्त स्वीकारी. ७. मूर्ख. ८. गंगेचें. ज्याची ( ज्या गुरूक्ताची ) सरी अमृत न करि, सुरसिंधुचें हि आप ( ज्याची सरी न करी ),–[ तें गुरूक्त ] जड चि ( जो मूर्ख असेल तोच ) न घे ( मान्य न करी )-असा अन्वय. ९. बरोबरी. १०. मनावांचून. ११. कान. १२. गुरु द्रोणाच्या हितवचनास सुद्धां. १३. हित करणाऱ्यांमध्यें प्रमुख. १४. सु+उक्त=हितवचन. १५. मानीना. १६. हितवचन बोलणारे. १७. रा० **परा**डकर यांच्या प्रतींत येथें 'हितवाग्गुरु' असे शब्द आहेत. १८. मूल, बालक. १९. उत्तमांश. २०. निरुपयोगी, निरर्थक अंश, निःसार. हा शब्द **पं**तांच्या काव्यांत अन्यत्र आढळतो:–( १ ) सभापर्व, अध्याय ४।१२ व ५।६२. २१. विचार, मसलत. २२. मूर्खांच्या भाषणाला. २३. घराला. २४. पूर्वजांनीं ( वडिलांनीं ) मिळविलेलें ( यश. ) २५. लोभानें नष्ट झालें आहे ज्ञान ज्याचें त्या ( तनयशतें ). २६. शंभर पुत्रांनीं. धृतराष्ट्राला गांधारीपासून शतपुत्र व एक कन्या ( दुःशीला ) अशी संतति झाली. याशिवाय दासीपासून झालेला एक युयुत्सु नामक पुत्र होता. याची गणना पुत्रशतांत नाहीं. ( मागें अध्याय १८ पद्य ).

पांच न ते, पांचशतें, पांडुतनय वीर[1]धीरहीरमणी, ।
हे[2] कांच साच, नाचति, परि राज्यश्री[3] न मंद[4]धी-रमणी. ॥ ४५
धर्मी युधिष्ठिर[5] निरत[6], युधिष्ठिरीं सबळ[7] वृष्णिवर[8] शौरी[9], ।
त्या शौरिच्या चि ठायीं विजयश्री[10], जेंवि शंकरीं गौरी[11]. ॥ ४६
यदुसिंह[12] सहाय जयां, त्यांला वधितील बाळ[13] हे ? राया ! ।
न समर्थ वक्रनेत्रें[14] पांडुकुमारांसि काळ हेराया[15]. ॥ ४७
तैं या कुळाहिताच्या[16] त्वां केलें दृढ न मानस त्यागा, ।
अद्यापि तरी राया ! ती माझी उक्ति[17] मान सत्या गा !' ॥ ४८
धृतराष्ट्र म्हणे, 'विदुरा ! सर्वज्ञा ! भरतकुळहिता ! भ्रात्या ! ।
युष्मद्वचना[18] भजतों मी, जेंवि भजे शिखी[19] हिताभ्रा[20] त्या. ॥ ४९
ज्यास्तव मज लावितसे आचार्य द्रोण बोल[21] तात[22] हि तें ।
कर्म कशास ? अगा ! **जे हितें[23] वचनें[24] ते चि बोलतात हितें[24].** ॥ ५०
माझे चि पुत्र पांडव, त्यांचें, यांचें हि होय सम राज्य, ।
वैराग्नि पेटवाया दादुनि सिंचील कोण समराज्य[25] ? ॥ ५१
जा, पांडव घेउनि ये, जें लागेल प्रभूत[26] वसु[27], ने तें. ।
पाहोत तूर्ण[28] विदुरा ! भीष्म-द्रोण-प्रभू तव सुनेतें. ॥ ५२
मान्य बृहस्पतिला[29] तूं, वक्त्यांचा साधुराय, काव्या[30] ही, ।

---

१. शूर व सुशील अशा पुरुषांमध्यें हिरे. २. हे तुझे पुत्र दुर्योधनादि खरोखर कांचेप्रमाणें होत. ३. राज्यलक्ष्मी. ४. मूर्खांची स्त्री. ५. पांडवाग्रज. ( युधि+स्थिर=युद्धांत जो अचल तो. ) ६. निमग्न. ७. बळरामासहित. ८. यादवांत श्रेष्ठ. ९. श्रीकृष्ण. ( शूरकुलोत्पन्नत्वामुळें कृष्णाला हें नांव पडलें ). १०. ह्या गीतींत **'एकावली'** नामक अलंकार आहे. ११. पार्वती. १२. यादववर ( श्रीकृष्ण ). १३. मूर्ख ( दुर्योधनादि धार्तराष्ट्र ). **'बालः** कचे शिशौ मूर्खे ऱ्हीबेरेऽश्वेभपुच्छयोः' इति विश्वः. १४. वांकडा डोळा करून. १५. पाहण्यास. कल्पना-सादृश्यः–समर्थाचिया सेवका वक्र पाहे । असा सर्व भूमंडळीं कोण आहे ? ॥ ( **रा**मदास ). १६. कुळाचा अहित जो दुर्योधनरूप शत्रु, त्याच्या त्यागाविषयीं. १७. मागें अध्याय १८ गीति १७–१९ पहा. १८. तुमच्या भाषणाला. १९. मोर. २०. हितकारक अशा अभ्राला ( मेघाला ). २१. शब्द, दोष. २२. भीष्म. २३. हितकर्ते, मित्र. २४. हितकारक वचनें. २५. समर+आज्य=युद्धरूप तूप. २६. पुष्कळ. २७. धन. २८. शीघ्र, लौकर. २९. देवांच्या गुरूला. ३०. शुक्राचार्याला देखील मान्य–असा भाव.

आम्हांवरी प्रसन्नस्वांत[1] करीं बंधुनायका[2] ! त्याही[3].' ॥ ५३
राजाज्ञेनें[4] भेटे विदुर द्रुपदा नृपा संदिष्टातें[5], ।
मग पांडवबळभद्रप्रभुसहिता सांवळ्या संदिष्टातें[6]. ॥ ५४
वस्त्रालंकारांहीं द्रुपदप्रमुखांसि कवि[7] अलंकारी ।
विदुरप्रियार्थ सर्वांसह घे तो भोजकुळकलंकारी[8]. ॥ ५५
विदुर म्हणे द्रुपदातें, 'तुज म्हणतो या[9] मुखें असें त्याही[10] ।
नातें तुझें मधुर हें, न रसा[11] मधुरत्व देवसेव्या[12] ही. ॥ ५६
नंदननाम[13] सुतीं ऋत[14] केलें त्वां हें करूनि नव नातें ।
श्रवणें जसी सुखदता[15] या[16] आजि, सुरांचिया हि न वनातें[17]. ॥ ५७
सीतेस्तव अर्कातें[18] कृष्णेस्तव[19] कीं स्ववंश सोमांतें[20] ।
बहु मान्य आजि, राया ! यावरि सुतविरह हा नसो मातें. ॥ ५८
या मागें न तसें, मज आजि जसें दुःख एक गा ! राया ! ।
कृष्णाविलोकनसुखा पात्र न गारा[21] नसोनि गारा[22] या[23]. ॥ ५९
ज्यांहीं साकेतींचें[24] श्रुत केलें कुतुक, नरवरा ! ते तें ।
या गजपुरीं[25] स्मरोत प्रेक्षुनि सस्त्रीक[26] नर वरातेतें[27]'. ॥ ६०

---

१. प्रसन्न अंतःकरण ज्याचें असा. २. बंधुवर्या ! ३. द्रुपदराजा. ४. धृतराष्ट्राच्या आज्ञेनें. ५. भाग्यशाली जो द्रुपद त्यास. दिष्ट=दैव, भाग्य. [ सदिष्ट= ] दैवयुक्त-**पंत.** ६. संतांस इष्ट असा जो कृष्ण त्यातें. ७. पंडित ( विदुर ). ८. भोजकुलास कलंक ( डाग ) लावणारा जो कंस, त्याचा अरि श्रीकृष्ण. कंसशत्रु-**पंत.** ( कंस हा भोजकुलोत्पन्न होय ). ९. या ( माझ्या-विदुराच्या ) मुखानें. १०. धृतराष्ट्र-**पंत.** ११. अमृतास. १२. देवांनीं सेवन करण्यास योग्य असें जें अमृत ( रस ) त्याला देखील. देवसेव्या ही रसा [ असें ] मधुरत्व न-असा अन्वय. १३. नंदन म्हणजे आनंदजनक. 'नंदन' हा शब्द पुत्रार्थीं आणि इंद्राच्या उद्यानार्थीं योजतात. त्वां ( द्रुपदें ) हें नव नातें ( व्याहीपणाचें नातें ) करूनि ( जोडून ) सुतीं ( पुत्राला दिलेलें ) नंदन [ हें ] नाम ऋत ( सत्य ) केलें-असा अन्वय. १४. सत्य-**पंत.** 'नंदन नाम सुत सुकृत' असें पाठांतर. सुकृत=कृतार्थ, सफळ. १५. सुख देण्याचा गुण. १६. या ( पुत्रवाचक ) नंदन नामाला. १७. देवांच्या नंदन नामक बागेला. १८. सूर्याला. १९. द्रौपदीसाठीं. २०. चंद्राला. २१. खांचा. २२. या गारा ( डोळ्यांच्या खांचा ) नसोनि [ तो ] कृष्णाविलोकनसुखा पात्र न ( नाहीं ) [ म्हणून ] [ त्या ] गारा [ होत ]-असा अन्वय. २३. असन्नेत्रयोः-**पंत.** ( ह्या गीत्यर्धाचा अर्थ नीटसा लक्षांत येत नाहीं ). २४. अयोध्येचें. 'साकेतः स्यादयोध्यायां कोशला नंदिनी तथा' इति यादवः. २५. हस्तिनापुरीं. अत्रिपुत्र सोम यानें या ठिकाणीं एका हत्तीला एका

द्रुपद म्हणे, 'विदुरा ! म्यां काय वदावें ? तुला सकळ कळतें. ।
प्रेक्षकमन[1] बहु चरणें[2] चुरितां वंद्या[3] फुलास कळकळतें[4]. ॥ ६१
वर्तेन तसें चि, जसें विहितें[5] तुम्ही परम आप्त सांगाल, ।
अमृत भरवितां सत्कृपें[6] फुगवील स्वहितकाम[7] कां गाल[8] ?' ॥ ६२
धर्म म्हणे, 'ताता[9] ! तूं, द्रुपदनृपति, रामकृष्ण परमहित ।
सांगाल तसें चि करूं, आम्हां न तुम्हांपरीस पर[10] महितें[11].' ॥ ६३
कृष्ण म्हणे, 'धर्मा ! जा कीं, आला न्यावया स्वयें चुलता, ।
धृतराष्ट्र वांचला त्वत्कुशळें[12], नाहीं तरी उरीं उलता[13] ! ॥ ६४
कोणें हि पाविजेल स्वप्नीं हि विनाश न विदुराधीनें[14]. ।
व्याकुळ होऊं देइल न तुम्हां हा साधु कवि दुराधीनें[15].' ॥ ६५
प्रणतां[16] देतें ज्याच्या पदपद्माचें[17] सदा रज गतीतें[18], ।
त्या प्रभुमतें[19] परततां, बहु सुखविति ते सदार[20] जगतीतें. ॥ ६६

---

पक्ष्यानें अचानक उचलून नेलें असें पाहिलें. तेव्हां त्यानें या चमत्काराचें स्मारक म्हणून या ठिकाणीं एक शहर वसविलें, आणि त्यास हस्तिनापुर असें नांव दिलें. हस्ती म्हणजे गज, नाग; यास्तव या नगराला 'गजपुर' 'नागपुर' इत्यादिही नांवें आढळतात. हें शहर गंगेच्या तीरीं प्रस्तुतच्या मिरत शहराच्या पूर्वेस असावें, असा विद्वानांचा अभिप्राय आहे. २६. स्त्रियांसह. २७. विवाह झाल्यानंतर वधूसह वर आपल्या घरीं मिरवत जातो, असा जो समारंभ, त्यास वरात म्हणतात.

१. पहाणाराचें मन. २. पायानें. ३. वंदन करण्यास योग्य अशा. ४. हळहळतें, कष्टी होतें. हें गीत्यर्ध सुभाषितरूप आहे. ५. योग्य. ६. सदय ( दयाळू ) मनुष्यानें. ७. निज-कल्याणेच्छु. ८. ज्याला आपलें कल्याण करून घ्यावयाचें असेल तो रागावून बसेल काय ?— असा भाव. गाल फुगविणें हें रागाचें, आनंदाचें व गर्वाचें एक लक्षण आहे. हा शब्दसमुच्चय पंतांच्या काव्यांत पुष्कळ ठिकाणीं आढळतो. ( नामरसायन गीति १०९; द्रोणपर्व, अध्याय १५।६० व २४।८; आदिपर्व, अध्याय ३५।८४; स्त्रीपर्व, अध्याय ४।२० व अनुशासनपर्व, अध्याय ६।६५ पहा ). हें अर्ध सुभाषितरूप समजावयाचें. ९. बापा विदुरा ! १०. अन्य, इतर. ११. मान्य. १२. तूं कुशल ( सुखरूप ) असल्यामुळें. १३. उरीं उलता=छाती फुटली असती, छाती फुटून मेला असता. हा टोमणा पंतांनीं आपल्या पदरचाच मारिला आहे. मूळांतील 'पांडवांचें धृतराष्ट्राकडे जाणें मला पटतें' ( अध्याय २०७।६ ) ह्या कृष्णाच्या साध्या भाषणाच्या ठिकाणीं पंतांनीं दोन गीति रचिल्या आहेत. १४. विदुराच्या स्वाधीनानें, विदुराच्या तंत्रानें चालणाऱ्या ( मनुष्यानें ). १५. दुष्ट मनोव्यथेनें. १६. नम्र झालेल्या जनांस, शरणागतांस. १७. चरणकमलाचें. १८. उत्तम पदाला, मोक्षाला. १९. कृष्णाच्या विचारानें. २०. स्त्रीसह-वर्तमान, द्रौपदीसह.

कृष्णाग्रजावरज[1] बेळकृष्णाश्रित[2] करुनि कीर्तिला जतन ।
कृष्णात्मजकुळनंदन[3] कृष्णापति[4] वीर पावले वतन[5]. ॥ ६७
धृतराष्ट्रनृपप्रहित[6]द्रोणकृपविकर्ण[7]चित्रसेनां[8]हीं, ।
नगरांत आणिले ते पांडव वेष्टूनि चित्रें[9] सेनांहीं[10]. ॥ ६८
पौर म्हणति[11], 'जसि द्यावी येउनि गहना[12] प्रभा[13] वसंतानें ।
तसि पांडुच्या दिली या नगरा अतुळप्रभाव[14] संतानें[15].' ॥ ६९
म्हणति स्त्रिया[16], 'पुरश्री[17] जाउनि समजावुनि, स्वयें भार्या ।
होउनि, घेउनि आली[18], वाटे द्रुपदात्मजा नव्हे आर्या[19]. ॥ ७०
पांडव[20] नव्हेत, हे घन, यांची हे सहचरी[21] सुतनु[22] शंपा[23], ।
या स्वविरहदवहतपुरविपिनीं[24] केली उदंड[25] अनुकंपा[26]. ॥ ७१
सितकाक[27] मानसश्रीकर[28] नोहे करुनियां अंध[29] मराळा[30], ।

---

१. अर्जुन, धर्मराज, भीमसेन, नकुळ, सहदेव. ( कृष्ण=अर्जुन, अग्रज=ज्येष्ठ बंधु, अवरज= कनिष्ठ बंधु ). २. बलराम व कृष्ण यांचे आश्रित. ह्या गीतींत अयुतावृत्ति **आदिपदयमक** आहे. ३. कृष्ण ( व्यास ) त्याचा आत्मज ( पांडु ) त्याच्या वंशांतील नंदन ( पुत्र ) म्हणजे पांडव. व्यासनंदन पांडु-**पंत.** कृष्णद्वैपायन व्यासापासून विचित्रवीर्याची भार्या अंबालिका हिच्या ठायीं पांडूचा जन्म झाला होता. ( मागें अध्याय १५ पहा ). ४. द्रौपदीचे पति. ५. वतन= पूर्वजार्जित हक्काची जागा. 'वतन' हा शब्द आरबी भाषेंतील आहे आणि **पं**तांच्या काव्यांत याचा प्रयोग अनेक स्थळीं आढळतो. ६. प्रहित=पाठविलेले. ७. धृतराष्ट्राच्या शतपुत्रांतील एक. हा मोठा नीतिमान् आणि सत्पक्षानुयायी होता, म्हणून तो दुर्योधनादिकांस अप्रिय आणि पांडवांस प्रिय होता. हा पापभीरु आणि सत्यवादी होता. ८. धृतराष्ट्रपुत्रांपैकीं एक. ( मूळ अध्याय २०७, श्लोक १२-१३. ) ९. चित्रविचित्र, नानाविध. १०. 'हीं' हा तृतीया विभक्तीचा बहुवचनी प्रत्यय कवितेंत फार आढळतो. ११. हें रूप जरी वर्तमानकाळाचें आहे, तरी त्याचा प्रयोग कवितेंत पुष्कळदां भूतकाळीं करतात. १२. अरण्याला. १३. शोभा. १४. अतुळ ( अनुपम ) आहे प्रभाव ( पराक्रम ) ज्याचा, त्या. १५. अपत्यानें ( पुत्रानें ). १६. पुरवासिनी स्त्रिया. १७. हस्तिनापुरलक्ष्मी. १८. पांडवांस घेऊन आली-असा भाव. **उत्प्रेक्षा**लंकार. १९. पार्वती. [ ही ] द्रुपदात्मजा नव्हे, [ तर ] आर्या ( प्रत्यक्ष पार्वतीच आहे, असें ) वाटे ( भासे )-असा अन्वय. येथें **अपन्हुति** नामक अलंकार आहे. २०. येथें **अपन्हुति** नामक अलंकार आहे. २१. सखी. २२. चारुगात्री, लावण्यवती. २३. विद्युल्लता. २४. स्व+विरह+ दव+हत+पुर+विपिनीं=आपल्या वियोगरूप वणव्यानें दग्ध झालेलें जें नगररूप अरण्य, त्याच्या ठायीं. २५. पुष्कळ. २६. दया, कृपा. २७. पांढरा कावळा. २८. मानससरोवराला शोभा देणारा. ( हिमालयाच्या गंधमादन नामक शिखराच्या उत्तरेस प्रख्यात मानससरोवर आहे ).

शालि[1] कनकपात्रोचित[2] न धरुनि हि सुवृत्तता[3], अधम[4] राळा[5]. ॥ ७२
प्रभु रामकृष्ण हे तों चिंतामणिचे[6] श्रिता[7] जना वाडे, ।
आपत्सरिदुत्तारक[8] धर्माचे आप्तराज[9] नांवाडे[10].' ॥ ७३
ऐसें श्रवण करीत, प्रियजनहृन्नीरजांसि[11] फुलवीत, ।
उलवीत[12] असदुरांतें[13], कुरुराज्यश्रीमनासि[14] भुलवीत, ॥ ७४
जाउनि पांडव भीष्मप्रमुखगुरुजनाचिया पदीं नमनें ।
करुनि, निजप्रासादामाजि[15] सुखें राहिले अदीनमनें[16]. ॥ ७५
कांहीं[17] काळ कुरुपुरीं[18] होते, सामें[19] तयांसि मग राजा ।
अंध म्हणे, 'राज्यार्ध स्वीकारा, या त्यजूनि नगरा, जा. ॥ ७६
राज्य करा, नगर रचा, वसवा वासार्ह[20] खांडवप्रस्थ[21]. ।
चांदाची[22] वृद्धि असो, नांदा सानंद[23] सानुग[24] स्वस्थ. ॥ ७७
भ्रात्यांत पुन्हा विग्रह[25] न प्रगटावा, न पूर्व[26] तापावे, ।
कुलजविरोधें[27] संतत ताप[28] गुरु-मनीं[29] अपूर्वता[30] पावे.' ॥ ७८

---

२९. खालीं. ( तिरस्कार करून—असा भाव. ) 'अधः' असें ह्या अव्ययाचें विसर्गान्तरूप असूनही येथें त्याचा पंतांनीं 'अ'कारान्त उपयोग केला आहे. ३०. हंसाला.

१. शालीनामक धान्यविशेष. २. सुवर्णपात्रीं असण्यास योग्य. ३. उत्तम वाटोळेपणा, वर्तुलाकारता. ४. नीच, हलकट. हें अर्ध सुभाषित समजावें. ५. धान्यविशेष. ६. चिंतामणि=चिंतित मनःकामना परिपूर्ण करणारा मणि. ७. आश्रित लोकांना. ८. विपत्तिरूप नदीच्या परतीरास नेणारे. ९. आप्तजनांमध्यें थोर. १०. नौका चालविणारे. ११. प्रिय+जन+हृत्+नीरज=प्रियजनांच्या हृदयरूप कमलांस. १२. फोडीत. १३. दुष्टांच्या वक्षस्थलांतें. १४. कौरवांच्या राज्यरूप लक्ष्मीच्या चित्ताला. १५. आपल्या वाड्यांत. १६. उदार ( मोकळ्या ) मनानें. १७. येथें रा० पराडकर यांच्या प्रतींत 'कांही' असा शब्द आहे. १८. हस्तिनापुरीं. १९. सौम्यपणानें, सलोख्यानें. २०. राहण्यास योग्य. २१. इंद्रप्रस्थ ( दिल्ली ) नामक नगराच्या सभोंवार जें अरण्य होतें, त्याला खांडवप्रस्थ असें नांव होतें. या अरण्यांत धृतराष्ट्राच्या आज्ञेवरून पांडवांनीं शहर वसविलें; तें अत्यंत सुशोभित होतें ह्मणून त्यांस 'इंद्रप्रस्थ' 'शक्रप्रस्थ' असें ह्मणूं लागले. २२. चंद्राची वृद्धि तुह्मांला असो, म्हणजे चंद्र जसा दररोज थोडथोडा वाढतो त्याप्रमाणें. द्वितीयाचंद्रवत्—पंत. २३. आनंदानें. २४. सेवकांसह. २५. विरोध. २६. पूर्वज, वाडवडील. २७. स्वकुलोत्पन्नांशीं कलह केल्यानें. २८. ताप गुरु-मनीं अपूर्वता पावे—असा अन्वय. २९. वडिलांच्या मनांत. भाऊबंदकी उत्पन्न झाल्यास पूर्वजांस दुःख होतें—असा भाव. 'तापगुण मनीं अपूर्वता पावे' असें पाठांतर. ३०. जो पूर्व नव्हे तो अपूर्व. यावरून अपूर्व ह्मणजे पश्चात्, पाठीमागचा; तेव्हां 'ताप' या शब्दाला 'पश्चात्' ह्या शब्दाचा योग होई; सारांश पश्चात्ताप उत्पन्न होतो.

वंदुनि पित्यासि [1]साच्युत पांडव हि [2]चतुर्मुखांडवप्रस्था ।
[3]स्वयशासि घालवाया [3]बाहिर, गेले [4]स्वखांडवप्रस्था. ॥ ७९
तेथें [5]त्रिभुवनशिल्पी प्रभु आपण कथुनि युक्तिला, [6]पुर तें, ।
जें रचवी धर्माचें, निरुपम झालें नसेल कां पुरतें ? ॥ ८०
प्रभु पुर असें रची कीं, [7]हरिसा [8]सानंद [9]धर्मसुत राहो, ।
[10]सर्व जनास हि [11]दुस्तर [12]सुरभोगेच्छापगा हि [13]सुतरा हो. ॥ ८१
जें प्रभुदर्शन दुर्लभ [14]कामित [15]नाकीं हि तें हि तें पुर [16]वी, ।
मग कोणतीं न [17]संश्रितलोकांचीं [18]कामितें हि तें [19]पुरवी ? ॥ ८२
[20]तें न पुर, प्रभुनें रसपूर्ण स्वजनासि वाढिलें पात्र. ।
चोळिति [21]निजगुणें कर बहु [22]मलिनप्रकृति [23]मक्षिका [23]मात्र. ॥ ८३
स्थापुनि [24]सन्मणिकनकप्रासादीं पांडवांसि, राम-हरी ।
गेले [25]द्वारवतीतें [26]गात्यांचा [27]श्रम [28]यदीय नाम [29]हरी. ॥ ८४

---

१. श्रीकृष्णासह. २. ब्रह्मांडाच्या तटावर राहणाऱ्या अशा. ( वप्र=तट ). ३. आपली कीर्ति सर्वत्र पसरावी म्हणून. यश बाहेर घालविणें म्हणजे यश बुडविणें—असा अर्थ नव्हे. पंतकृत वनपर्व, अध्याय ४ गीति २५ मधील 'यश सोडणें' ह्याचा अर्थ 'यश पाठविणें' असा असतां कांहीं लोक त्याचा भलताच अर्थ करितात ! ४. स्वकीय खांडवप्रस्थास. ५. त्रिभुवन रचणारा कारागीर. ६. इंद्रप्रस्थ. ७. इंद्रासारखा. ८. आनंदानें. ९. यमपुत्र ( धर्मराज ). १०. 'सर्व जनांसहि' असें पाठांतर. ११. तरून जाण्यास कठीण. १२. सुर+भोग+इच्छा+आपगा=देवांस प्राप्त होणाऱ्या उपभोगांची इच्छा हीच कोणी नदी ती. लोकांनीं देवांसारखे उपभोग आपणास प्राप्त व्हावे अशी इच्छा केली, तर ती त्यांस दुस्तर आहे. पण धर्मराजाला ती सुतर होवो. सारांश, इंद्रप्रस्थांत धर्मराजाला स्वर्गांतील सर्व सुखोपभोग प्राप्त होवोत—असा भाव. १३. तरण्यास सुलभ. १४. इच्छित. १५. स्वर्गांत. १६. प्रसवे. १७. आश्रित जनांचीं. १८. मनोगतें, मनोरथ. १९. रा० पराडकर यांच्या प्रतींत ह्या गीतीच्या पूर्वार्धांत 'नाकीं हि तें हि तें पुरवी' व उत्तरार्धांत 'कामितें हितें पुर वी' अशीं पदें पाडलेलीं आहेत. २०. येथें **'अपन्हुति'** नामक अलंकार आहे. २१. आपल्या दुर्गुणानें. २२. ज्यांचा स्वभाव अपवित्र ( अधम, नीच ) आहे, असे लोक. २३. केवळ माशाच असे. २४. उत्तम रत्नें आणि सुवर्ण यांनीं खचित अशा राजवाड्यांत. २५. द्वारकेस. ही आनर्त देशाची राजधानी असून येथें सकल यादव राहत असत. ही नगरी प्रथमतः भूमीवर होती, परंतु असुरांच्या त्रासामुळें कृष्णानें विश्वकर्म्याकडून हिची स्थापना समुद्रांत करविली. हिला 'द्वारावती', 'कुशस्थली' अशीं अन्य नांवें आहेत. २६. राम-कृष्णांची किंवा पांडवांची कीर्ति वर्णन करणाऱ्या जनांचा. २७. थकवा, कष्ट. येथें मूळांतील २०७ वा अध्याय संपतो. २८. ज्यांचें. २९. हरण करी.

# अध्याय अडतिसावा.[1]

इंद्रप्रस्थीं[2] राया धर्माला म्हणति लोक, 'हा राम[3], ।
साधु, विवेकी, [4]कामद; अधिक न [5]जड [6]कल्पभूरुहाराम.' ॥ १
न पराचें, आवडलें धर्माचें त्या प्रजेसि [7]नव राज्य ।
[8]रसनेसि [9]वराज्य जसें [10]गव्य चि, [11]माहिष गमेल न [12]वैराज्य. ॥ २
तेथें नारद आला, [13]पूजुनियां त्यासि धर्म [14]तन्नमना ।
कृष्णेसि आणवी, ती वंदी, मुनि होय [15]सुप्रसन्नमना. ॥ ३
तीस म्हणे, 'सति ! [16]पतिमतिरतिदा हो, राज्ञि ! [17]पुत्रि ! हा राजा ।
[18]सानुज नांदो तुजसीं चिर, विरह नसो, करा विहारा, जा.' ॥ ४
कृष्णा जाय, मग म्हणे श्रीनारद पांडवांसि, '[19]पौरवें हो ! ।
[20]नयशीलधर्मरक्षाप्राप्त तुम्हां सत्सभेंत गौरव [21]हो. ॥ ५
एक स्त्री, पांच तुम्ही, भेद घडेना असी करा नीती, ।
[22]प्रीतिक्षतिकरविषयांपासुन बहु [23]साधुमानसीं [24]भीती. ॥ ६
धर्मा ! [25]एकस्त्रीच्छु भ्राते [26]भेदासि पावले [27]मागें, ।

---

१. ह्या अध्यायांत पंतांनीं मूळ २०८–२३४ अध्यायांतील कथाभाग वर्णिला आहे. त्यांच्या विस्तारभीरुत्वाचें हें एक मोठें उदाहरण आहे. २. हें भारतीय युद्धांतील प्रसिद्ध शहर हल्लींच्या दिल्ली शहराच्या ठिकाणीं होतें. हें कुरुदेशाच्या राजधानीचें शहर असून येथेंच मयासुरसभा होती. याच ठिकाणीं पांडवांनीं राजसूययज्ञ केला. ३. प्रजाजनाला धर्म हा रामच आहे, असें वाटलें. म्हणजे तेथें राज्यकर्ता राम आहे व तें रामराज्य आहे असें प्रजेला वाटलें–असा भाव. ४. इच्छा पूर्ण करणारा. ५. अचेतन. ६. कल्पवृक्षांचे बाग. कल्प+भूरुह+आराम=कल्पवृक्षाचा बाग. भूरुह=वृक्ष, झाड. मनःकामना पूर्ण करण्याच्या बाबतींत धर्म व कल्पवृक्ष हे दोघेही सारखेच, पण कल्पवृक्ष अचेतन म्हणून तो धर्मराजापेक्षां अधिक नाहीं–असा भाव. ७. नवीनच स्थापिलेलें. ८. जिव्हेस. ९. वर+आज्य=उत्तम तूप. १०. गाईचें. ११. म्हशीचें. १२. हें गीत्यर्ध सुभाषित होय. १३. 'पूजूनि तयासि' असें पाठान्तर. १४. त्या नारदास नमस्कार करण्यासाठीं. १५. सुप्रसन्न आहे मन ज्याचें तो, प्रीतमनस्क. १६. पतीच्या मनाला आनंद देणारी. १७. बाळे ! कन्ये ! १८. कनिष्ठ भावांसह. १९. पुरुकुलोत्पन्न पांडव हो ! २०. नीति (नय) आणि सदाचार (शील) यांनीं केलेलें जें धर्मरक्षण त्याजपासून मिळालेलें (गौरव). २१. होवो. २२. प्रीतीची हानि करणाऱ्या विषयांपासून. २३. सज्जनांच्या मनांत. २४. भीति

[1]एकात्मे ही मेले, ऐकावें तें तुवां [2]महाभागें. ॥ ७
[3]कनककशिपुकुळसंभव होते [4]सुंदोपसुंद, ते देहें ।
कीं नामें भिन्न, मनें एक चि, [5]विख्यात अद्भुतस्नेहें. ॥ ८
ब्रह्मांडाचा [6]स्वतपस्तेजें अतितप्त करुनि ते मध्य, ।
[7]परमेष्ठिवरें झाले [8]अतुळबळें [9]स्वेतराखिलावध्य. ॥ ९
[10]त्रस्ततरसुरप्रार्थितविधिवचनें चतुर [11]विश्वकर्मा तें ।
[12]व्यसन हराया, द्याया निजकौशल्यें सुरांसि [13]शर्मातें, ॥ १०
[14]लोकत्रयस्थ तिळ तिळ उत्तम लावण्य मेळवुनि यत्नें ।
स्त्रीरत्न रची, [15]जाणों अवयव ते न, खचिलीं च तीं रत्नें. ॥ ११
नामें [16]तिलोत्तमा ती, लावण्य तिचें नृपा! अपार चि तें, ।

---

उत्पन्न होते–असा भाव. हें गीत्यर्ध सुभाषितरूप होय. २५. एकाच स्त्रीची इच्छा करणारे. २६. भेद=फुटाफूट, बिघाड, तूट. २७. येथें मूळांतील २०८ वा अध्याय संपतो.

१. जीवलग, एकचित्ताचे. २. दैवशाली अशानें, भाग्यवंतानें. ३. हिरण्यकशिपूच्या वंशांत ज्यांचा जन्म (संभव) ते. ४. सुंद आणि उपसुंद. हे निकुंभ नामक दैत्याचे पुत्र. ५. प्रसिद्ध. ६. आपल्या तपाच्या प्रभावानें. ७. ब्रह्मदेवाच्या वरानें; 'तुह्मां उभयतांखेरीज या तीन लोकांत जें कांहीं स्थावरजंगमात्मक आहे त्याच्यापासून तुमचा वध होणार नाहीं' असा वर ब्रह्मदेवानें यांस दिला होता. (मूळ अध्याय २०९, श्लोक २३–२४). ८. अनुपम सामर्थ्यानें. ९. स्व+इतर+अखिल+अवध्य=स्वतःशिवाय इतर सर्वांकडून वध पावण्यास अशक्य. १०. अतिशय पीडित अशा देवांनीं प्रार्थिलेला जो विधि (ब्रह्मदेव) त्याच्या आज्ञेनें. ११. देवांचा शिल्पी; यास 'त्वष्टा' असेंही नांव आहे. १२. संकट. १३. सुखातें. १४. स्वर्ग, मृत्यु, पाताळ या तीन लोकांतील. १५. येथें '**अपन्हुति**' अलंकार आहे. १६. हें तिचें नांव. मूळांत असें आहे:—'तिलं तिलं समानीय रत्नानां यद्विनिर्मिता । तिलोत्तमेति तत्तस्या नाम चक्रे पितामहः ॥' (आदिपर्व, अध्याय २११, श्लोक १८.) कल्पनासादृश्यः—

"Full many a lady
I have eyed with best regard, and many a time
The harmony of their tongues hath unto bondage
Drawn my too diligent ears.
*But you, Oh! you*
*So perfect and so peerless, are create*
*Of every creature's best."*

*Shakspeare.*

जेणें वेधावें[1] चि क्षण तरि, जें मन महातपा[2] रचितें. ॥ १२
तीस म्हणे द्रुहिण[3], ‘अये[4] ! देवि ! त्रैलोक्यसुंदरि ! पुनीते[5] ! ।
वारीं[6] ताप, जगा जे दिधले[7] सुंदोपसुंदरिपुंनीं[8] ते’. ॥ १३
ती भुलले[9] सुर[10]-हरिहर पाहुनि लोकैकसुंदरा[11], ज्याला ।
ब्रह्मनियोगें[12] दावी तें मोहक वदन सुंदराजाला[13]. ॥ १४
विंध्यवनीं[14] ललनाजनपरिवृत[15] ते दैत्यराज पीतसुर[16], ।
स्वर्गाधिपत्य[17] साधुनि होते स्वबळेंकरूनि भीतसुर[18]. ॥ १५
पुष्पावचयव्याजें[19], जैसी चपळा[20] घनीं, वनीं चपळ ।
फिरतां तिला पहाती, स्थिर पाहुनि बैसती न नीच पळ. ॥ १६
अवलोकितां चि चित्तें तद्रूपीं जेंवि सुंद रमला हो ! ।
उपसुंद ही म्हणे, ‘हें प्राप्त स्त्रीरत्न सुंदर मला हो.’ ॥ १७

---

१. आकृष्ट करावें, भुलवावें. २. मोठ्या तपश्चर्येला. जें मन महातपा रचितें, [ तें ] जेणें ( ज्या लावण्यानें ) क्षण तरि वेधावें चि–असा अन्वय. तिलोत्तमेचें लावण्य पाहून मोठमोठ्या तपस्वीजनांचेंही मन मोहित होई–असा भाव. ३. ब्रह्मदेव. ४. हे ( संबोधन ). ५. पवित्रे ! ‘पुनीते’ या शब्दावरून ‘**मो**रोपंत जर वैय्याकरण असता, तर असें रूप तो न लिहिता,’ असा कै० **वि**ष्णु **कृ**ष्ण **चि**पळूणकर यांचा **पं**तांवर आक्षेप आहे. ( निबंधमाला, अंक ५७, पृष्ठ १० पहा ) पण ‘पुनीत’ हा एक मराठीच शब्द आहे, असें समजलें म्हणजे ह्या आक्षेपाचें निरसन होतें. कारण पुनीत म्हणजे पवित्र, पूत या अर्थीं हा शब्द प्रचारांत अतिशय आहे. तेव्हां ‘पुनीते’ हें संबोधनरूप व्याकरणरीत्या सदोष आहे, असें आम्हांला वाटत नाहीं. ह्या आमच्या विधानाच्या पुष्टीकरणार्थ **पं**तांच्या पूर्वीं होऊन गेलेले व आपल्या मोठ्या विद्वत्तेविषयीं प्रसिद्ध असलेले कवि **वा**मनपंडित यांची पुढील उक्ति पहावी:–असा मी त्या मातें ‘पुनित’ करिशी तूं जननिये ! । जगीं पापघ्नांच्या हरसि गुरुगर्वास सदये ! ॥ ( गंगालहरी ). ६. निवारीं, दूर कर. ७. हें रूप कवितेंत मात्र आढळतें. ८. सुंद व उपसुंद या शत्रूंनीं. ९. काममोहित झाले. १०. देव, इंद्र आणि महेश्वर. ११. त्रिभुवनैकसुंदरी. १२. ब्रह्मदेवाच्या आज्ञेनें. १३. ज्याला ( ज्या वदनाला ) पाहुनि सुर–हरिहर भुलले तें मोहक वदन, ती लोकैकसुंदरा, ब्रह्मनियोगें सुंदराजाला दावी–असा अन्वय. १४. विंध्यपर्वतावरील वनांत. १५. स्त्रीजनांनीं वेष्टित. १६. प्राशिलें आहे मद्य ( सुरा ) ज्यांनीं असे. १७. स्वर्गाचें स्वामित्व. १८. भय पावले आहेत देव ज्यांपासून असे. १९. फुलें वेंचण्याच्या मिषानें. २०. वीज. जैसी घनीं चपळा [ तैसी ] ती चपळ ( तिलोत्तमा ) पुष्पावचयव्याजें वनीं फिरतां तिला [ सुंदोपसुंद ] पहाती [ आणि ] ( तिला ) पाहुनि ( ते ) नीच पळ ( पळभरही ) स्थिर न बैसती–असा अन्वय. ‘**चपला** कमलाविद्युत्पुंश्चलीपिप्पलीषु च’ इति मेदिनी.

धावुनि, धरिति कर तिचे, सोडुनि[1] सुंदोपसुंद रीतीतें, ।
दोघांचें हि कटाक्षें अनुमोदी कृत्य सुंदरी ती तें. ॥ १८
सुंद म्हणे, 'म्यां वरिली, सर परता, त्यजुनि हात तो डावा, ।
गुरुदारधर्षणोद्यत[2] जो, तो लागेल हात तोडावा.'[3] ॥ १९
उपसुंद म्हणे, 'मांझी[4], न करावी धर्महानि, करकरुनी ।
कां धरिला मृदु कर? सरें[5], हर! हर! मरसील हा निकर[6] करुनी.' ॥ २०
सुंद जसा, उपसुंद हि दे, देल्यां[7] दे[8] जसें गगन[9] गाळी[10], ।
ज्यासि अमर्ष[11] रुचे, तो अंध विवेकासि कां मग न गाळी[12]? ॥ २१
सुंदीं जैसा काम क्रोध उठे, तदनुजीं तसा चि तदा. ।
बिंबप्रतिबिंब चि तें[13]; घे ज्येष्ठ, कनिष्ठ ही तसी च गदा. ॥ २२
सुंदाची उपसुंदीं, उपसुंदाची गदा पडे सुंदीं, ।
तन्मरणमुदुद्धासें[14] **गणपतिच्या** केंळ[15] नुठेल कां तुंदीं[16]? ॥ २३
परम सखे होते, परि एकस्त्रीरत्नभोगकामुक ते ।
मेले चि, जरि न ऐसें करिते, तरि जीवनासि कां मुकते? ॥ २४
म्हणुनि तुम्ही स्वस्नेहप्राणयशोव्यय[17] न होय, सुख वाढे, ।
ऐसें वर्ता बुध हो! **कटु हि सदुपदेश हित, जसे काढे.'**[18] ॥ २५
पांडव म्हणति, 'गुरुवरें हित कथिलें, अमृत पाजिलें कानीं, ।
अवलोकिला बहुदिसां राजर्षी पांडु[19] आजि लेंकांनीं. ॥ २६
आम्हांत जो द्रुपदजासहिता पाहेल केलिच्यां[20] भेंवनीं[21] ।

---

१. सोडून. 'धरुनि' असा पाठभेद आहे. २. गुरुजनाच्या ( पूज्यजनाच्या ) स्त्रियेचें धर्षण ( अपमान ) करण्यास सिद्ध झालेला. ३. हें गीत्यर्ध सुभाषितरूप आहे. ४. माझी=ही स्त्री माझी आहे—असा भाव. ५. दूर हो. ६. अनर्थ, हलकेपणा, नीचपणा. ७. गगनास गाळी देणाराला ( गगन ) जसें उलटून गाळी देतें ह्मणजे प्रतिध्वनि करतें त्याप्रमाणें. ८. 'देल्यातें' असें पाठान्तर. ९. आकाश. १०. शिव्या. ११. क्रोध. १२. टाकी. हें गीत्यर्ध सुभाषित होय. १३. तें=त्यांचें वर्तन. 'ते' असें पाठान्तर. १४. तत्+मरण+उत्+हासें=त्यांच्या मरणाच्या आनंदानें आलेल्या हास्यानें. १५. तिडीक. १६. पोटांत. १७. आपला स्नेह, जीव आणि कीर्ति यांचा नाश. १८. हा चतुर्थ पाद सुभाषितरूप होय. १९. पांडवांस नारद भेटले नाहींत, तर जणूं काय त्यांचा पिता पांडूच त्यांस भेटला—असा भाव. येथें उत्प्रेक्षादर्शक शब्द दिलेला नाहीं म्हणून ही **व्यंग्योत्प्रेक्षा** होय. २०. क्रीडेच्या. २१. क्रीडागृहांत, मंदिरांत.

तो ब्रह्मचारिधर्में वर्तेल द्वादशाब्दकाळ[1] वनीं.' ॥ २७
समय[2] असा करवुनि मुनि गेल्यावरि एकदां असें घडलें:– ।
गोधन[3] कोणा एका विप्राचें दस्युच्या[4] करीं पडलें. ॥ २८
तो द्विज शक्रप्रस्थीं[5] हाका मारी म्हणे, 'अगा राया ! ।
संरक्षितोसि राष्ट्राप्रति, कीं तूं आपुल्या अगारा[6] या ? ॥ २९
दुष्टविनाशें यश बहु वाढो म्हणती, न तें खचो[7], राजे, ।
ते साधु[8] भूप, देती सुख साधुजनासि, दुःख चोरा जे.[9] ॥ ३०
चोरापहृतब्राह्मणगोधन[10] निजकीर्ति-धन, उठा, राखा, ।
न म्हणो पुनरपि भगवान् राम[11], 'क्षत्रियकुळा कुठारा[12] ! खा.' ॥ ३१
न द्विजगोधन केवळ नेलें, तुमचें हि सुयश, धांवा हो ! ।
धांवा रे ! पांडव हो ! म्हणतां रक्षार्ह[13] वस्तु कां वाहो[14] ?' ॥ ३२
तें ऐकतां चि, 'मा भैर्विप्र[15] !' म्हणे सद्वनैकरस[16] कृष्ण[17]. ।
परि तैं शस्त्रागारीं[18] होता श्रीधर्मभूवर[19] सकृष्ण[20]. ॥ ३३
वासवि[21] पडे विचारीं, 'कैसा हा स्वकृतनियम मोडावा ? ।
रक्षण न करुनि कैसा विप्राचा अप्रसाद जोडावा ? ॥ ३४
विप्रार्थ[22] चि रक्षावा; लागो निजनियमलंघनें शब्द. ।
बारा सारावे वनवासीं, बुध शत हि सारिती, अब्द[23].' ॥ ३५
निश्चय करुनि असा तो शस्त्रागारीं शिरे, नमूनि नृपा, ।

---

१. बारा वर्षेपर्यंत. २. नियम, प्रतिज्ञा. ३. गाई. ४. चोराच्या. ५. इंद्रप्रस्थीं. ६. घराला. हें पंतांचें मोठें आवडतें यमक आहे. ( शल्यपर्व, अध्याय ३।४५, आश्रमवासिक पर्व, अध्याय १।५८; हरिवंश, अध्याय २२।१०६ इत्यादि पहा ). ७. नष्ट होवो. ८. चांगले. ९. हें अर्ध सुभाषितरूप आहे. १०. चोर+अपहृत+ब्राह्मण+गोधन=चोरांनीं हरण केलेलें ब्राह्मणाचें गोधन ( गाई ). ११. परशुरामानें एकवीस वेळां पृथ्वी निःक्षत्रिय केली–अशी कथा आहे. १२. हे परशो ! येथें '**चेतनधर्मारोपोक्ति**' नामक अलंकार आहे. ( मागें पृष्ठ १७ टीप ८ पहा ). १३. रक्षण करण्यास योग्य अशी. १४. वाहून जावो ( नाश पावो ); किंवा वाहो=नेवो. चोर गाई घेऊन जावोत–असा भाव. १५. हे ब्राह्मणा ! भिऊं नको. ६. साधूंच्या रक्षणाविषयीं मोठी गोडी ज्याला तो. १७. अर्जुन. ( मागें पृष्ठ २११ टीप ४ पहा ). १८. शस्त्रगृहांत. १९. तेजस्वी धर्मराजा. २०. द्रौपदीसह. २१. वासवाचा ( इंद्राचा ) पुत्र, अर्जुन. २२. द्विजाचा गोरूप अर्थ. २३. संवत्सर.

धनु घेउनि, चोर वधुनि, संपादी कार्य, करुनि विप्रकृपा. ॥ ३६
मग बहुकष्टें धर्में आज्ञा दिधली, सुखें न, वनवासा, ।
तीर्थाटनीं धनंजय उत्सव[1] पावे सदा नवनवासा. ॥ ३७
त्या तीर्थपरा[2] प्रभुला बहु मानवती[3] सुरर्षि[4] नाकर्षी[5]; ।
कामाकुला[6] उलूपी[7] गंगाद्वारीं जळांत आकर्षी. ॥ ३८
ती ऐरावतनागपवंशजकौरव्यकन्यका[8] आर्या ।
नेऊनि नागलोकीं पितृगेहीं होय जिष्णुची भार्या. ॥ ३९
चित्रांगदा हि वरिली मणिपूराधीशचित्रवाहनजा[9] ।
ज्ञात्यासि न व्रतच्युति[10], विषयांचा वाहवि प्रवाह न जो[11]. ॥ ४०
तैशा च पावल्या ज्या होत्या ग्राहत्व[12] अप्सरा[13] शापें, ।
त्या पांच हि उद्धरिल्या, तीर्थीं पार्थें हरूनियां पापें. ॥ ४१
तीर्थें पाहत पाहत गेला तो वासवि प्रभासा[14] जों, ।
भेटुनि कृष्ण म्हणे, 'ये[15] दोघे सुखवूनि यदुसभा साजों.' ॥ ४२
जो देवाश्रयगर्वित[16]मणिसानु[17]प्रति हि रैवतक[18] दीपी[19]; ।

---

१. आनंद. २. तीर्थाटन करण्यास तत्पर अशा धनंजयाला. ३. मान देती, त्याच्याविषयीं पूज्यबुद्धि दर्शविती. ४. देवर्षी. ५. स्वर्गीं राहणारे ऋषि. ६. मदनव्यथेनें पीडित अशी. ७. नागकन्याविशेष. ८. ऐरावताच्या कुळांत झालेला जो नागश्रेष्ठ कौरव्य त्याची दुहिता. ( आदिपर्व, अध्याय २१४ ). ही उलूपी अर्जुनाची भार्या होय. ९. मणिपुर नगरचा राजा जो चित्रवाहन, त्याची कन्या. ( आदिपर्व, अध्याय २१५ ). १०. व्रतापासून पतन, व्रतभंग ११. जा=( ज्या= ) ज्याला. हें गीत्यर्ध सुभाषितरूप होय. १२. नक्राचा जन्म. १३. देववेश्या; वर्गा, सौरभेयी, समीची, बुद्बुदा आणि लता अशा पांच अप्सरा मैत्रिणी होत्या. कुबेराच्या वनांत विहार करीत असतां यांनीं एका तपस्वी विप्रास पाहिलें व काममोहित होऊन पांचही जणींनीं त्याचा तपोभंग करण्याचा उद्योग चालविला; तेव्हां त्यानें क्रोधानें यांस शाप दिला कीं, 'तुम्ही शंभर वर्षें जलामध्यें नक्र होऊन राहाल.' नंतर त्या शापानें भय पावून तपोधनाला शरण गेल्या, व त्यांनीं त्याची परोपरीनें मनधरणी केली. तेव्हां त्यास दया आली, आणि 'कोणीएक उत्तम पुरुष शतवर्षांच्या अखेरीस येऊन तुमचा उद्धार करील,' असा त्यानें त्यांस उःशाप दिला. त्याप्रमाणें अगस्त्य, सौभद्र, पौलोम, कारंधम आणि भारद्वाज या पांच तीर्थांत वास करणाऱ्या पांच देवांगनांस अर्जुनानें ग्राहदशेंतून मुक्त केलें. ( आदिपर्व, अध्याय २१५–२१६ ). १४. द्वारके-जवळच्या एका तीर्थाला. १५. ये ( चल, आपण यदुसभेंत जाऊं ) [ व ] दोघे ( तूं व मी ) यदुसभा सुखवूनि साजों ( शोभूं )–असा अन्वय. १६. देव+आश्रय+गर्वित+मणिसानु+प्रति=

तेथें ने, न विसंबे क्षण ही तें इष्ट देवत कदापी. ॥ ४३
मिरवीत स्वपुरींत प्रभुनें नेला **सितांश्व**[१] **वासवसा**[२]. ।
वृष्णि म्हणति, 'अर्जुनजी ! येथें चि पुरे करा प्रवास, वसा.' ॥ ४४
वसुदेवें आदरिला बहु करुनि तदात्मरंजना भाचा[३]; ।
**सर्वत्र मान पावे साधु सखा भक्त कंजनाभाचा[४].** ४५
कुंतीसुतें सुभद्रा नवरी वसुदेवकन्यका सु-रुची[५] ।
देखिलि अनुजा[६] मनुजाकारधरा[७] त्या **विरंचिच्या**[८] गुरुची[९]. ॥ ४६
अमृतांशुची[१०] अहंकृति[११] सर्व जिच्या नाशिली मुखानें ती ।
तद्धृतिस[१२] होय, हृदयीं हाणुनि नयना शिलीमुखा[१३], नेती. ॥ ४७
जाणोनि भाव[१४] भक्तप्रियकर हांसे, म्हणे, 'मन कुलीनें[१५] ।
त्वां न दिलें, परि नेलें करुनि बळ पहा कसें पटु[१६] मुलीनें. !' ॥ ४८
**पार्थ** म्हणे, 'तूं चेतश्चोर[१७], तसी च स्वसा[१८] तुझी देवा ! ।
मोहावा स्मरहर[१९] ! हर ! हर ! तेथें आमुचा किती केवीं[२०] ?' ॥ ४९
करुनि कृपा कृष्ण म्हणे, 'अर्जुनजी तरि मुलीसें[२१] पळवा हो ! ।
पळें[२२] वाहो कोपें बळ[२३], हे तनु[२४] अतनुज्वरें[२५] न पळवा[२६] हो[२७].' ॥ ५०

---

देवांच्या आश्रया ( वासा ) मुळें गर्व पावलेला असा जो ( मेरुपर्वत ) त्यालाही. १७. रत्नसानु= मेरुपर्वत. १८. हा एक द्वारकासमीपवर्ती पर्वत आहे. १९. दडपी. रैवतकपर्वत मेरुपर्वतापेक्षां श्रेष्ठ–असा भाव.

१. ज्याच्या रथाचे अश्व ( घोडे ) सित ( पांढरे ) आहेत तो ( अर्जुन ). २. इंद्रासारखा. ३. अर्जुन. वसुदेव हा यदुकुलोत्पन्न शूरराजाच्या दशपुत्रांतील एक, व कुंती ही त्याची भगिनी, म्हणून अर्जुन हा वसुदेवाचा भाचा. ४. कमलनाभ जो कृष्ण त्याचा. ५. सुंदर, चांगली आहे कांति ( रुचि ) जिची अशी. ६. धाकटी बहीण. ७. मनुष्यदेहधारिणी. ८. ब्रह्मदेवाच्या. ९. बापाची ( कृष्णाची ). १०. चंद्राची. ११. अहंकार. १२. त्याच्या ( अर्जुनाच्या ) धैर्याला. १३. नेत्ररूप बाणाला. १४. ( अर्जुनाची ) मनोवृत्ति, मनोविकार. १५. हे अर्जुना ! तूं कुलीन असल्यामुळें आपलें मन सुभद्रेसारख्या लावण्यवती युवतीकडे जाऊं दिलें नाहींस–असा भाव. येथें 'कुलीन' ह्या विशेषणाची योजना सहेतुक असल्यामुळें **परिकरा**लंकार झाला आहे. १६. चतुर. १७. चित्त चोरणारा. 'राधाहृच्चोर' ( कर्णपर्व, अध्याय ४८।५२ ) व 'शिनळ' ( वनपर्व, अध्याय ४।२५ ) इत्यादि कृष्णाचीं विशेषणें प्रसिद्धच आहेत. १८. भगिनी, सुभद्रा. १९. शंकर. २०. गणना, पाड. २१. नवऱ्या मुलीस ( सुभद्रेस ). २२. **दामयमक.** २३. बळराम. २४. शरीर. २५. काम ज्वरानें, अनंगपीडेनें. [ अतनु= ] काम–**पंत.** २६. वाळवून ठेवलेली पालेभाजी. २७. होवो.

शीघ्रचर[1] चर[2] प्रेषुनि[3], धर्माज्ञा आणवूनि, मग तीतें ।
पळवी[4]; पळ वीशानें[5] हरिलीसें वाटवूनि[6] जगतीतें. ॥ ५१
रैवतनगोत्सवीं[7] ती हरिली, ऐकोनि राम[8] कर चोळी[9], ।
नुरवी[10] रिपुदारजनीं[11] जो तच्छोभाविरामकर[12] चोळी[13]. ॥ ५२
यादव सर्व हि झाले सिद्ध, परि हरि स्वयें न लेश वदे. ।
बळभद्र म्हणे, 'ऐका यादव हो! न मन यांत केशव दे. ॥ ५३
बसला उगा चि मौनव्रत धरुनि, स्वस्थ कुतुक[14] पाहतसे, ।
थांबा, यासि पुसों द्या, कां हा स्वातिक्रमासि[15] साहतसे.' ॥ ५४
ऐसें म्हणूनि, बळ[16], बळ[17] पळभर तें स्थिर करूनि, भावाला ।
आपण पुसे, 'उगा कां? वद, जाणों दे त्वदीय[18] भावाला. ॥ ५५
माझ्या मतें वधावें त्या यदुकुरुकीर्तिनाशका[19] पापा[20], ।
जेणें[21] भलें म्हणविलें पाजुनि पय पाळिल्या खळा सापा. ॥ ५६
आम्हीं, तुझा सखा, या भावें तो पूजिला सदा सुर-सा[22], ।
सर्पा अर्पावें जें, विषपण येतें तया पया सु-रसा[23]. ॥ ५७

---

१. लौकर चालणारा. २. दूत. ३. पाठवून. ( आदिपर्व, अध्याय २१९ श्लोक २४–२५ ). ४. श्रीमद्भागवताच्या दशम स्कंधाच्या ८६ व्या अध्यायांत अर्जुनानें त्रिदंडी संन्यास घेऊन सुभद्राहरण केलें इत्यादि जी कथा आहे, तिचा अनुवाद पंतांनीं आपल्या बृहद्दशम ( कृष्णविजय ) नामक काव्याच्या ८६ अध्यायांत केला आहे. परंतु येथील वर्णन व भागवतांतील वर्णन यांत थोडा फरक आढळतो. ५. [ वि+ईश=पक्षी+श्रेष्ठ= ] गरुड–पंत. गरुडानें पळवून नेली, असें थोडा वेळ लोकांना वाटावें, अशा रीतीनें–असा भाव. ६. भासवून. ७. रैवतपर्वतावरील उत्सवांत. ८. बळराम. ९. हात चोळणें–हें संतापाचें लक्षण आहे. १०. उरविली नाहीं. ११. शत्रूंच्या स्त्रीजनांच्या ठायीं. १२. त्या रिपुस्त्रियांच्या शोभेचा नाश करणारा. १३. कंचुकी. महाभारतकाळीं स्त्रिया चोळी घालीत नसत, असें विद्वानांचें अनुमान आहे. महाभारतकाळानंतर कित्येक शतकें भारतीय स्त्रिया चोळी घालीत नसत, असें दिसतें. पंतांनीं तत्कालीन प्रघातास अनुलक्षून हें वर्णन केलेलें आहे. १४. कौतुक. १५. आपल्या अपमानाला, व्यतिक्रमाला १६. बळराम. १७. सैन्य. १८. तुझ्या अभिप्रायास. १९. यादवांची आणि कौरवांची कीर्ति नष्ट करणारा जो ( सुभद्राहर, अर्जुन ) त्याला. २०. दुष्टाला. २१. जेणें पय पाजुनि पाळिल्या खळा सापा भलें म्हणविलें–असा अन्वय. अर्जुनानें सापाला देखील भलें म्हणविलें, अर्जुनापेक्षां साप देखील बरा, असें म्हणावयास लाविलें–असा भाव. सारांश–अर्जुन सापापेक्षांही दुष्ट होय–असा स्पष्टार्थ. २२. देवासारखा. २३. जें ( पय ) सर्पा अर्पावें ( द्यावें ) तया सुरसा

**ज्यांत[1] सदन्नें[2] जेवी, भंगी[3] हाणोनि दुष्ट लत्ता तें, ।**
**न कृतघ्न उपेक्षावा, शीघ्र वधावें अशा प्रमत्तातें[4]. ॥** ५८
स्वयशोघ्न[5] जो, वधावा, तुज आजि उपेक्षणीय[6] कां गमला? ।
करिसी काय विचार? स्पष्टतर[7] स्वमत शीघ्र सांग मला.' ॥ ५९
कृष्ण म्हणे, 'दादाजी! पडला आहे असा विचार मला, ।
कीं भगिनीहरणास्तव **जिष्णु** तुम्हां दुष्ट वध्यसा गमला! ॥ ६०
कन्येच्या[8] लाभाचा निश्चय नाहीं स्वयंवरीं स्पष्ट, ।
घ्यावें दान, दिलें तरि, हें कर्म हि मानधन[9]जना कष्ट[10]. ॥ ६१
धन देउन घ्यावी, तरि न अपत्याचा भला[11] करी विकरा[12], ।
चित्तीं या दोषांच्यां आणुनि त्या पंडितोत्तमें[14] निकरा[13], ॥ ६२
युक्त प्रसह्यहरण[15] क्षत्रप्रभवांसि[16] याचि भावानें[17], ।
**यदुकुरुकुळकीर्तिकरें नवरी हरिली महाप्रभावानें[18]. ॥** ६३

---

(मधुर) पया (दुधाला) विषपण येतें—असा अन्वय. सापाला पाजलेलें दूध विषरूप होतें—असा भाव. समानार्थक सुभाषित:—उपकारोऽपि नीचानामपकारो हि जायते । पयःपानं भुजंगानां केवलं विषवर्धनम्. ॥

१. ज्या पात्रांत. (आदिपर्व, अध्याय २२० श्लोक २७). २. उत्तम अन्नें. ३. नाशी. ४. उन्मत्ताला. ही गीति सुभाषितरूप आहे. ५. आपल्या यशाचा नाश करणारा. ६. उपेक्षा (हयगय, दुर्लक्ष) करण्यास योग्य. ७. अगदीं स्पष्टपणानें. ८. अर्जुनानें सुभद्रेचें हरण कोणत्या हेतूनें केलें त्याचें स्पष्टीकरण श्रीकृष्णानें गीति ६० व ६१ मध्यें केलें आहे. ९. मान हेंच धन ज्यांचें अशा पुरुषांना. १०. कष्टदायक, अपमानकारक. हें सुभाषित आहे. ११. भला मनुष्य, सत्कुलोत्पन्न पुरुष. (आदिपर्व, अध्याय २२१ श्लोक ४). १२. ह्यासंबंधीं मनुस्मृतींतही असेंच सांगितलेलें आहे:—न कन्यायाः पिता विद्वान्गृह्णीयाच्छुल्कमण्वपि । गृह्णंश्छुल्कं हि लोभेन स्यान्नरोऽपत्यविक्रयी ॥ (अध्याय ३।५१). ह्याचा अर्थ:—कन्यादानाच्या वेळीं वरापासून द्रव्य घेणें हें मोठें पाप आहे, असें जाणणारानें कधींही द्रव्य घेऊं नये. कारण लोभानें द्रव्य घेणारा मनुष्य अपत्यविक्रयी होतो. तुकाराममहाराज देखील असेंच सांगतात:—कन्येचा जे नर करिती वीकरा । ते जाती अघोरा नरकपाता. ॥ १३. दोषांच्या समुदायास. १४. त्या परमविचारशील (अर्जुनानें). १५. बलात्कारानें हरण करणें. क्षत्रियांस राक्षसविवाह प्रशस्त होय, असें मनुस्मृतींत सांगितलेलें आहे (अध्याय ३।२३–२४). १६. क्षत्रियकुळांत जन्मलेल्या पुरुषांना. १७. हेतूनें. १८. मोठा आहे प्रभाव (पराक्रम) ज्याचा त्यानें (अर्जुनानें). येथें गीति ६२–६३ यांचा अन्वय आहे, म्हणून हें **'युग्मका'**चें उदाहरण होय. 'द्वाभ्यां युग्ममिति प्रोक्तं त्रिभिः श्लोकैर्विशेषकम् । कलापकं चतुर्भिः स्यात्तदूर्ध्वं कुलकं स्मृतम्.' ॥ अर्थ:—दोन पद्यांचा अन्वया

मज तों असें चि दिसतें, कीं जो धर्मज्ञ, शुद्ध कुळ ज्याचें, ।
तो अन्याय करीना, **धर्मीं च मन प्रसन्न[1] कुळजाचें[2].** ॥ ६४
किं च[3] न पराभव त्याचा श्रीकंठ[4] करूं म्हणेल, तरि त्याला ।
नाहीं अशक्य कांहीं, दृक्पातें[5] भुवन भस्म करित्याला[6]. ॥ ६५
शक्ति पुरहरावांचुनि[7] पार्थपरिभवीं[8] नसे चि अन्यास, ।
**पण[9] न घडतां[10] मरण, कीं मानधनजनास युक्त संन्यास[11].** ॥ ६६
न सुचे[12], कन्या अन्या धन्यां[13] कवणा वरासि अर्पावी. ।
क्षितिधरें[14] एक चि, न दुजा, कद्रू[15] हि तशा दुज्या न सर्पा वी[16]. ॥ ६७
यास्तव मज वाटतसे सुज्ञ प्रेषूनि **पार्थ** फिरवावा, ।
जिरवावा कोप मनीं, भगिनीसह तो पुरांत मिरवावा.' ॥ ६८
केलें तसें चि **रामें,** वृष्णिपुरीं लग्नकार्य सांधूनी[17], ।
**पार्थ** स्वपुरा[18] आला, गौरविला बंधुपौरसाधूंनीं. ॥ ६९
**कुंतीतें** नमुनि, तिची आज्ञा घेऊनि, फार शंकितसा[19] ।
**कृष्णेकडे** हळूहळु[20] एकाकी **जिष्णु** जाय अंकितसा[21]. ॥ ७०

---

एकत्र असला म्हणजे त्या पद्यद्वयास 'युग्म,' तीन पद्यांचा असल्यास 'विशेषक,' चारांचा असेल तर 'कलापक' आणि पांच किंवा त्यांहून ज्यास्त पद्यांचा असेल तर त्यास 'कुलक' असें म्हणतात.

१. संतुष्ट, आनंदित. हा चतुर्थपाद सुभाषितरूप होय. २. कुलीनाचें. ३. आणखी असें कीं. 'कीं न पराभव त्याचा' असें पाठान्तर. ४. भगवान् नीलकंठ, शंकर. ५. दृष्टि फेंकण्यानें. ६. करणाऱ्याला. ७. शंकरावांचून. ( त्रिपुराचा संहार करणाऱ्या विरूपाक्षावांचून ). ८. अर्जुनाचा पराभव करण्यास. ९. प्रतिज्ञा. हें अर्ध सुभाषितरूप समजावें. १०. प्रतिज्ञा शेवटास गेली नाहीं तर—असा भाव. ११. प्रपंचाचा त्याग करणें, वानप्रस्थाश्रम स्वीकारणें. रा. **प**राडकर यांच्या प्रतींत 'सन्यास' असा शब्द आहे. १२. सुचत नाहीं. 'न चुके' असें पाठान्तर. न चुके=कन्यादान हें करावें लागणारच, तें कांहीं टाळतां येत नाहीं—असा भाव. १३. मागें पृष्ठ ९१ टीप ३ पहा. १४. शेष–**पंत.** शेषाच्या मस्तकावर पृथ्वी आहे, अशी समजूत आहे. क्षितिधर=पृथ्वी धारण करणारा. १५. नागमाता–**पंत.** सकल सर्पांची माता. ही प्राचेतस दक्षाची कन्या आणि कश्यप ऋषीच्या तेरा स्त्रियांतील एक. ( मागें अध्याय ४ पहा ). १६. प्रसवे. १७. संपादून. १८. बारा वर्षें भरल्यावर इंद्रप्रस्थाला परत आला. १९. सुभद्रेशीं लग्न केल्यामुळें द्रौपदी आपल्यावर रागावेल, अशी शंका ज्याला आली आहे असा. २०. 'हळुहळू' असें पाठान्तर. २१. सेवकसा, पराधीन मनुष्यासारखा.

प्रणयें[1] प्रिया[2] प्रियातें[3] स्मित[4] करुनि म्हणे तया नरमणीतें[5], ।
'दृष्टि निवविली, जा[6], जी ! स्ववियोगें[7] ह्या भया न रमणीतें[8]. ॥ ७१
हा[9] प्रेमबंध पहिला, दुसरा तो[10] प्रेमबंध, दृढ अन्य, ।
भाराचा[11] ही बंध प्रथम श्लथ[12] होय जाणती वन्य[13]. ॥ ७२
मधुप[14] नव्या नलिनीला[15] सोडुन पहिलीस काय सेवील ? ।
कां सद्यः[16] पक्वान्न त्यजुनि रसिक[17] यातयाम[18] जेवील ?' ॥ ७३
जिष्णु म्हणे, 'तद्रचितें[19] मज मिळतिल हे न गोडवे[20] दास्यें[21] ।
लागति तुझ्या मुखें हे बोल, जसे शब्द गोड वेदास्यें[22]. ॥ ७४
दास्यें तुझी सुमति[23] हे सुखविल, सुरसिंधु[24] जेंवि गौरीची; ।
मूर्ति धरूनि तुजकडे आली ही[25] प्रीति जाण शौरीची[26].' ॥ ७५
बहु रंजवी प्रियेच्या करुनि परोपरि सुसांत्वन[27] मनातें. ।
गोपीवेषें[28] प्रेषी सुशिवेला[29] द्रुपदजा[30]ङ्घ्रिनमनातें. ॥ ७६

---

१. प्रेमानें. २. द्रौपदी. ३. अर्जुनाला. ४. हास्य. ५. त्या नरवर्यातें. ६. जा=जिकडे ती सुभद्रा आहे तिकडे जा ( मूळ अध्याय २२१।१७ ). 'आजी' असें पाठान्तर. ७. आपल्या विरहानें. ८. सुभद्रेला. रमणी=सुंदर तरुण स्त्री, पत्नी. ९. हा=माझा प्रेमबंध. १०. तो= सुभद्रेचा प्रेमबंध. ( आदिपर्व, अध्याय २२१ श्लोक १७ ). ११. भारा कितीही चांगला बांधलेला असला, तरी त्याला दुसरा बंध पडल्यानंतर पहिला बंध सैल होतो–असा भाव. १२. सैल, ढिला. १३. रानटी लोक. गीति ७२ आणि ७३ ह्या सुभाषितरूप होत. यांतील पहिल्या गीतीस मूळांत आधार आहे ( अध्याय २२१ श्लोक १७ ). पण दुसरी गीति पंतांनीं आपल्या प्रतिभेच्या बळानेंच निर्मिलेली आहे. १४. भ्रमर. १५. कमलिनीस. १६. ताजें. १७. रसज्ञ पुरुष. १८. गतरस–पंत. यातयाम=प्रहर उलटून गेलेलें, निवालेलें, शिळें. 'गतरसास' असें पाठान्तर. गतरस=नीरस, शुष्क, शिळें. १९. तिनें ( सुभद्रेनें ) केलेल्या दास्यानें. 'त्वद्रचितें' असें पाठान्तर. २०. एकाद्याचें प्रेम आपणावर असून तो तें विसरला असतां जे उद्गार त्याच्या संबंधानें आपल्या मुखांतून निघतात, त्यांस 'गोडवे' म्हणतात. पंतांचें 'गोपीगोडवा' म्हणून एक लहानसें स्फुट काव्य आहे, त्यांत गोपींचे पूर्वोक्त प्रकारचेच उद्गार आहेत. २१. सुभद्रा तुझें दास्य करील व अशा रीतीनें माझे गोडवे गाण्याचा प्रसंग तुझ्यावर येणार नाहीं–असा भाव. २२. वेदांच्या मुखानें. २३. चांगली बुद्धि. २४. गंगा. हे ( सुभद्रा ) दास्यें ( सेवा करून ) तुझी सुमति सुखविल, जेंवि सुरसिंधु गौरीची [ सुमति सुखवी ]–असा अन्वय. २५. सुभद्रारूप. २६. कृष्णाची ( शूरकुलोत्पन्नाची. ) २७. चांगलें समाधान. २८. गौळणीचा पोषाक घालून. अर्जुनानें सुभद्रेला गौळणीचा वेष देऊन प्रथम कुंतीला भेटण्यास पाठवून नंतर द्रौपदी-

कृष्णेसि [१]पट्टमहिषीवेषें यावा न कोप या भावें, ।
वेष तसा करवी, कीं, [२]आवृत लावण्य तें तिचें व्हावें. ॥ ७७
परि ती फार चि शोभे, [३]गुंजाशिखिपिच्छधातुधर तीचे ।
भ्राते झाले चेतो[४]हर सांगा कोणत्या न [५]गरतीचे ? ॥ ७८
'देवि ! तुझी [६]प्रेष्या मी' नमुनि असें ती म्हणे स्व सवतीतें. ।
[७]कृष्णा बहु [८]मानवली त्या नम्रपणें तिच्या [९]प्रसवतीतें. ॥ ७९
[१०]कृष्णा भेटोनि म्हणे, 'नित्य असो निः[११]सपत्न तव नवरा, ।
नव नव राज्यसुख पहा, पाव [१२]सुताद्यखिलभव्यभवनवरा.' ॥ ८०
[१३]साक्रूरोद्धवसात्यकिवृष्णिकटकयुक्त रामकृष्ण मग ।
आले आंदण घेउनि, भक्तांचे मूर्तिमंत देव[१४]नग. ॥ ८१
भरिलें तिहीं धनें पुर, राष्ट्र हि बहु, धर्मगृह न केवळ तें; ।
चातकमुख चि भरी कीं [१५]अभ्र भरायासि भूमिके वळतें ? ॥ ८२
[१६]बळ जाय, कृष्ण राहे, ठेवी न सुत, न [१७]वधू, न सेना, कीं ।

---

कडे पाठविलें. २९. सुभद्रेला. ( शिव=भद्र ). 'सेविल न' असें पाठांतर. ३०. द्रुपदजा ( द्रौपदी )+अंघ्रि ( चरण )+नमनातें=द्रौपदीच्या पायां पडावयास.

१. अभिषिक्त राणीच्या वेषामुळें. २. आच्छादित. ३. गुंजा, मयूरपिच्छें आणि गैरिकादि धातु धारण करणारे ( राम, कृष्ण ). ४. मनोहर, चित्त हरण करणारे. ५. कुलीन स्त्रीचे. ( गृहरत= घरामध्यें-आपल्या संसारांत-रत जी ती. गृहरत=गरत ). सुभद्रेच्या भावांनीं कोणत्या गरतीचें मन हरण केलें नाहीं ? सर्व गरतींचीं मनें त्यांनीं हरण केलीं-असा भाव. सारांश-गरतींचीं देखील मनें हरण करण्यासारखे ते सुंदर होते. तेव्हां त्यांची बहीणही सुंदर होती-हा इत्यर्थ. गरत=कुलीन स्त्री. ६. दासी. ७. द्रौपदी. रा. पराडकर यांच्या प्रतींत ह्या शब्दावर 'सुभद्रा' अशी टीप आहे. ८. त्या नम्रपणें ( सुभद्रेनें दाखविलेल्या नम्रपणामुळें ) कृष्णा ( द्रौपदी ) तिच्या प्रसवतीतें ( माता जी देवकी तिला ) बहु मानवली ( मान डोलवती झाली )-असा अन्वय. सुभद्रेला इतक्या लीनतेनें वागण्याचें शिकविल्याबद्दल द्रौपदीनें तिच्या मातेचें कौतुक केलें, व सुभद्रेच्या वागणुकीसंबंधीं आनंद व्यक्त केला-असा भाव. ९. मातेतें ( देवकीला ). १०. द्रौपदी. ११. शत्रुरहित. १२. सुत+आदि+अखिल+भव्य+भवन+वरा=पुत्रादि सर्व श्रेष्ठ सुखांचें घरच अशा वराला ( आशीर्वादाला ). १३. अक्रूर, उद्धव, सात्यकि, यादव आणि सैन्य यांसहित. १४. कल्पतरु. १५. मेघ. अभ्र चातकमुख चि भरी कीं भूमिके भरायासि वळतें ?-असा अन्वय. मेघ काय केवळ चातकाच्या मुखांत जलबिंदु पडावे म्हणून पडतो ? कीं सर्व पृथ्वीवर पर्जन्यवृष्टि व्हावी म्हणून पडतो ?-असा अर्थ. वळणें=प्रसन्न होणें. १६. बळराम. १७. नवरी मुलगी, सून, पत्नी-असे अर्थ आहेत. 'नवोढायां स्नुषायां च जायायां युवतौ वधूः' इति लिंगाभट्टः ।

जें सुख भक्तगृहीं या हरिस, [1]तया हरिस तें नसे [2]नाकीं. ॥ ८३
शक्रप्रस्थीं असतां झाला [3]नरवेष विष्णुला [4]भाचा. ।
फार चि [5]कामुक होता [6]स्वसख्यासह [7]त्या चि जिष्णु लाभाचा. ॥ ८४
म्हणति, '[8]पितृकृतध्यानें झाला तो [9]बाळ कृष्ण साच' कवी. ।
[10]आजंवळीं निजचित्रें जो भासे बाळकृष्णसा, चकवी. ॥ ८५
धरिली [11]प्रभुनें, बहु निजरूपनिरत जिष्णु [12]म्हणुनियां, [13]तनु ती, ।
हा तर्क फार बरवा, एक [14]असो दोष, फार यांत [15]नुती. ॥ ८६
तो [16]अभिमन्यु [17]बहिश्चर साक्षात् स्वप्राण [18]पद्मनाभाचा, ।
[19]आत्मा हि तसा [20]त्याचा वल्लभ न गमे, जसा मना भाचा. ॥ ८७
प्रसवे [21]कृष्णा पांचांपासुनि सुत पांच, त्यांत जो ज्येष्ठ ।
तो [22]प्रतिविंध्य [23]महात्मा, दुसरा सुतसोम [24]गुरुजनप्रेष्ठ. ॥ ८८
श्रुतकर्मा आणि शतानीक श्रुतसेननाम [25]एवं च ।
धर्मज भीमज जिष्णुज नकुलज सहदेवज क्रमें पंच. ॥ ८९
[26]दोघां [26]कृष्णांसि जसा आवडला, [27]तद्गुणांस ही फार, ।

---

१. त्या इंद्रास. २. स्वर्गात. ३. मानवदेहधारी. ४. बहिणीचा पुत्र. ५. सस्पृह, इच्छा करणारा. 'फार चि कामुक हो त्या' असाही पाठ आहे. ६. श्रीकृष्णासह. ७. त्या पुत्रलाभाचा. ८. बापानें ( अर्जुनानें ) केलेल्या कृष्णाच्या ध्यानानें. ९. पुत्र–पंत. सौभद्र, अभिमन्यु. १०. आजोळीं, सुभद्रेच्या माहेरीं. ११. कृष्णानें. १२. 'म्हणवुनी' असें पाठांतर. १३. शरीर ( सौभद्ररूपी ). १४. येथें 'एक असे दोष' असा पाठ असता तर बरें झालें असतें. यांत ( ह्या वर्णनांत ) फार नुती ( स्तुति ) [ केलेली आहे हा ] एक दोष [ असेल तर तो ] असो–असा अन्वय करावा. १५. स्तुति. गीति ८५ व ८६ यांस मुळांत आधार नाहीं. त्या पंतप्रतिभानिर्मित आहेत. १६. हा ( अभि ) निर्भय आणि मन्युमान् ( क्रोधवान् ) होता म्हणून त्याला 'अभिमन्यु' असें नांव पडलें. ( आदिपर्व, अध्याय २२१ श्लोक ६७ ). १७. देहाबाहेर फिरणारा. १८. श्रीकृष्णाचा. ( पद्मं नाभौ यस्य सः ). १९. जसा भाचा ( कृष्णाचा ) मना वल्लभ ( प्रिय ) गमे, तसा त्याचा ( स्वतःचा ) आत्मा [ हि ] वल्लभ न [ गमे ]–असा अन्वय. २०. येथें रा० पराडकर यांच्या प्रतींत 'त्याच्या' असा पाठ आहे. त्याच्या=त्याच्या मनाला. २१. द्रौपदी. २२. प्रतिविंध्य ( धर्मज ), सुतसोम ( भीमज ), श्रुतकर्मा ( अर्जुनज ), शतानीक ( नाकुलि ), श्रुतसेन (सहदेवज) असे पांच पुत्र एकेक वर्षाच्या अंतरानें झाले. ( आदिपर्व, अध्याय २२१, श्लोक ७९-८६ ). २३. उदारधी, महानुभाव. २४. गुरुजनांस प्रिय. २५. याप्रमाणें. २६. अर्जुन आणि कृष्ण यांना. २७. त्या दोघांच्या गुणांस.

विद्या कळा मग न कां [1]सौभद्रगळ्यांत घालिती हार? ॥ ९०
प्रतिविंध्यादि कुमार स्वपितृसम ज्ञानशौर्यरूपगुणें, ।
[2]अत्याग्रहें पहातां, दिसलें वय एक मात्र त्यांत उणें. ॥ ९१
[3]एके समयीं [4]ससुहृज्जन [5]ते [6]सद्दैवतरु [7]निके लीला ।
दाविति [8]विषयिजनाच्या, त्या श्रीयमुनेंत करुनि [9]केलीला. ॥ ९२
[10]तेथें [11]द्विजरूप [12]अनल एकांतीं त्या [13]प्रभूंसि भेटूनी, ।
मागे खांडववन तो व्हाया नीरोगें[14] त्यांत पेटूनी. ॥ ९३
[15]श्वेतकिनृप [16]घृतधारा [17]द्वादशवर्षें [18]मुखीं सतत ओती, ।

---

१. येथें रा० पराडकर यांच्या प्रतींत 'सौभद्रगळांत' असा पाठ आहे. २. अतिशय चिकाटीनें, अगदीं हट्टानें. ३. उष्णकाळांत. ( अध्याय २२२ वा पहा. ) ४. मित्रजनांसह. ५. कृष्णार्जुन-पंत. ६. साधुजनाचे कल्पवृक्ष. ७. खरे, चांगले. ८. विषयासक्त जनांच्या, सांसारिक जनांच्या. ९. क्रीडेला. १०. यमुनेजवळच्या सुमनोहर स्थानांत. ११. ब्राह्मणाचा वेष घेतलेला. १२. अग्नि. १३. कृष्णार्जुनांस. १४. रोगरहित ( निर्+रोग=नीरोग. र्‌च्यापुढें र्‌ आला तर पहिल्या र्‌चा लोप होतो आणि त्याचा पूर्व स्वर ऱ्हस्व असल्यास दीर्घ होतो, असा नियम आहे ). १५. श्वेतकी नामक एका प्रख्यात राजानें असंख्य यज्ञ केले; शेवटीं शतसंवत्सरात्मक यज्ञ दुर्वास ऋषीच्या आश्रयानें केला. या अनेक यज्ञांत हविर्भक्षण केल्यामुळें अग्नीला इतकें जाड्य आलें कीं, 'त्याचा प्रतिकार कसा करावा?' असें विचारण्यासाठीं त्याला ब्रह्मदेवाकडे जावें लागलें. अनेक वर्षें घृतधारा सेवन केल्यानें अग्नि निस्तेज आणि म्लान झाला होता. 'खांडववन भक्षण करून अग्नीनें आपलें जाड्य निरस्त करावें' असा उपाय पितामहानें सांगितला. पण हें वन इंद्ररक्षित होतें म्हणून तें अग्नीस सुप्राप्य नव्हतें. तेव्हां पितामहाच्या अनुमतानें अग्नि विप्रवेष घेऊन मनुष्यलोकीं कृष्णार्जुनांस शरण आला. त्या उभयतांनीं खांडववन भक्षणार्थ देण्याचें कबूल केलें, पण अर्जुनापाशीं रथादियुद्धसाहित्याची कांहींशी उणीव असल्यामुळें अग्नीनें वरुणापासून मागून घेऊन अर्जुनाला गांडीव धनुष्य, अक्षय्य भाते, कपिध्वजयुक्त दिव्य रथ, इत्यादि सामुग्री दिली आणि कृष्णास वज्रनाभ नामक चक्र आणि कौमोदकी नामक गदा देऊन उभयतांस संतुष्ट केलें. नंतर अग्नि तें वन भक्षण करूं लागला, आणि कृष्णार्जुन रथारूढ होऊन वनाच्या दोन्ही बाजूंस सर्व प्राणिमात्राचा नाश करूं लागले. हें वर्तमान कळतांच इंद्र अग्नीचें निवारण करण्यासाठीं सकल देवांसह आकाशांत येऊन जलवृष्टि करूं लागला. तेव्हां कृष्णार्जुनांनीं त्याचा पाडाव करून त्यास परत लाविलें. नंतर अग्नि तें वन पंधरा दिवस यथेच्छ भक्षण करून व्याधिनिर्मुक्त झाला. ( आदिपर्व, अध्याय २२३-२२५ ). १६. तुपाची धार ( यज्ञांत. ) १७. बारा वर्षें ( द्वादशसंवत्सरात्मक यज्ञ केला म्हणून ). १८. अग्नीच्या तोंडांत.

‘बहु [1]धा’ म्हणों न देती झाली निजसेवनीं हळु हि ‘ओ’ [2]ती. ॥ ९४
श्वेतकिची ब्रह्मांडीं [3]अप्रतिमा कीर्ति हे; तुपा प्याला ।
झाला [4]रुग्ण अनळ; असि न [5]दुजी [6]पूतत्वहेतु पाप्याला. ॥ ९५
[7]चक्र दिलें [8]गुरु कृष्णा, [9]कुरुकृष्णा [10]अक्षयेषुधर भाते, ।
गांडीवधनु, [11]कपिध्वजरथ; हय जे हरिति [12]शीतकरभा ते. ॥ ९६
दिव्यरथीं बैसुनि [13]ते [13]कृष्ण ह्मणति, ‘भय तुला न वाटावें, ।
आरोग्यार्थ [14]ज्वलना! खांडववन-[15]भेषजासि [16]चाटावें.’ ॥ ९७
रक्षिति [17]दहना [18]गहनासह [19]नानाजातिसत्वरस खात्या, ।
होतां सहाय ईश्वर, भेटे धांवोनि सत्वर [20]सखा त्या. ॥ ९८
[21]माधवपांडव [22]खांडवगहना [17]दहनासि देति भक्षाया. ।
यत्न करी परि [23]सामर शक्र न झाला समर्थ [24]रक्षाया. ॥ ९९

---

१. तृप्त हो. ‘बहु धा म्हणोनि देती झाली’ असें पाठांतर. २. घृतधारा-**पंत.** ती (घृतधारा) निजसेवनीं (अग्नि तिचें सेवन करीत असतां) हळु हि (हळूच, फार मोठ्यानें नव्हे) ओ (ओकारी) [देती झाली]. ‘बहु धा’ (अगदीं तृप्त हो) [असें] म्हणों न देती झाली (ती म्हणूं देईना, तिच्यानें म्हणवेना)-असा अन्वय. सारांश-श्वेतकिराजानें अग्नीला इतकें तूप पाजलें, कीं त्याला त्याची ओकारी आली व आतां ‘आणखी तूप पिऊन अगदीं तृप्त हो’ असें म्हणण्याची सोयच राहिली नाहीं-असा ह्या गीतीचा इत्यर्थ दिसतो. ३. अनुपम, अद्वितीय. ४. रोगी. ५. अशा प्रकारची दुसऱ्या कोणाची कीर्ति. ६. पवित्रतेस कारण. ७. वज्रनाभ नांवाचें चक्र अग्नीनें कृष्णास दिलें. ८. प्रभु, सर्वोत्तम. ९. कुरुवंशज अर्जुनाला. १०. अक्षय+इषु+धर=अक्षय बाण धारण करणारे. ११. कपि (वानर, मारुति) आहे ध्वजावर ज्याच्या असा (रथ). हा रथ भुवनाधिपति भौमनानें (विश्वकर्म्यानें) मोठ्या तपश्चर्येच्या योगानें निर्मिला होता. त्याचें रूप सूर्यासारखें अवर्णनीय होतें व त्यांत बसून प्रभु सोमानें दानवांचा पराभव केला होता. (मूळ अध्याय २२५ श्लोक १२-१३). १२. शीत (थंड)+कर (किरण)=चंद्र, त्याची भा (कांति)=चंद्राची कांति. अर्थात् अत्यंत शुभ्र असे घोडे. १३. कृष्णार्जुन. १४. हे अग्ने! १५. खांडववनरूपी औषधास. १६. हें औषध म्हणजे जणूं काय एक चाटणच (लेह्य) होतें! खाण्याचे पदार्थ चार प्रकारचे असतातः-(१) भक्ष्य म्हणजे चावून खाण्याचे, (२) चोष्य म्हणजे चोखून खाण्याचे, (३) लेह्य म्हणजे चाटून खाण्याचे, व (४) पेय म्हणजे पिण्याचे. १७. अग्नीला. १८. अरण्यासह. येथें **अश्वधाटी यमक** आहे. १९. अनेकविध प्राण्यांस आणि रसांस. २०. वायु-**पंत.** वायु हा अग्नीचा मित्र होय. २१. कृष्णार्जुन. २२. खांडववनाला. तें वन अग्नि पंधरा दिवस जाळीत होता (मूळ अध्याय २२८।४६). २३. अमरांसहित. २४. खांडव वनाचें रक्षण करण्यास.

आला सर्वांचा ही प्राणघ्न[1] महोग्र[2] एकदा समय[3], ।
खग[4] चार[5], पांचवा अहि[6], वांचे तैसा चि एक दास मय[7]. ॥ १००
मातेनें[8] वांचविला तक्षकसुत अश्वसेन[9], जनकानें[10] ।
शार्ङ्गकपक्षी, पार्थें मय[11], हें परिसो हितार्थि[12] जन[13] कानें. ॥ १०१
शरणागतासि हे चि व्यसनीं देणार शर्म[14] परम तिघे[15], ।

---

१. प्राणसंहारक. २. मोठा भयंकर. ३. ( खांडववनभक्षणरूप ) वेळ. ४. शार्ङ्गपक्ष्याचीं चार पिलें. ५. त्यांचीं नांवें येणेंप्रमाणें:–जरितारि, सारिसृक्क, स्तंबमित्र आणि द्रोण. ( मूळ अध्याय २३० श्लोक ८-९ ). ६. साप, तक्षकाचा पुत्र अश्वसेन. ७. मयासुर. या अग्निप्रलयापासून अर्जुनानें नमुचीचा बंधु मयासुर याचें संरक्षण केलें. हे उपकार फेडण्यासाठीं मयासुरानें मोठ्या कौशल्यानें पांडवांकरितां एक उत्तम सभागृह बांधिलें. ( पंतकृत सभापर्व, अध्याय १, गीति १–५ पहा ). ८. तक्षकाची भार्या स्वपुत्राचें ( अश्वसेनाचें ) मुख व पुच्छ आपल्या मुखांत धरून अग्निप्रलयांतून बाहेर जात असतां, अर्जुनानें बाणानें तिचा शिरच्छेद केला, तेव्हां इंद्रानें अश्वसेनास मुक्त केलें. ( आदिपर्व, अध्याय २२७ श्लोक ६–८ ). मातेनें आपले प्राण जाऊं दिले व आपल्या मुलाचें रक्षण केलें–हें ह्या कथेंतील तात्पर्य. ९. अर्जुनानें आपल्या मातेचा वध केला व तो आपणासही मारण्याचा प्रयत्न करीत होता. ह्या गोष्टीचें वैर मनांत धरून अर्जुनाचें कर्णाशीं युद्ध चाललें असतां हा कर्णाच्या बाणावर अर्जुनास मारण्याकरितां गुप्तपणें जाऊन बसला होता. परंतु कृष्णानें तें त्याचें कपट जाणून अश्वसेनयुक्त बाण सुटण्याच्या संधीस अर्जुनाच्या रथाच्या घोड्यांस इतकें दाबलें, कीं त्यांनीं आपले गुडघे जमिनीसच टेंकले ! तेणें-करून तो बाण अर्जुनाच्या वक्षःस्थळीं न लागतां मुकुटासच लागला व मुकुट तत्काळ भस्म झाला. अशा रीतीनें अर्जुनाचा बचाव झाला व त्यानें अश्वसेनाचा वध केला–अशी कथा आहे. ( पंतकृत कर्णपर्व, अध्याय ४७–४८ पहा ). १०. मंदपालानें–पंत. मंदपाल नामक एक मोठा जितेंद्रिय ऋषि होता, त्याच्या पोटीं पुत्रसंतान नसल्यामुळें त्याला पितृलोकसंबंधी फळ मिळालें नाहीं. तेव्हां त्यानें पक्षियोनींत जरिता नामक पक्षिणीशीं संग करून प्रजोत्पत्ति केली. ती जरिता आपल्या चार बालकांसह खांडववनांत राहत असे. अग्नि हें वन दहन करण्यास आला, तेव्हां मंदपालानें त्याची आराधना करून 'माझ्या मुलांस दग्ध करूं नको,' अशी प्रार्थना केली. ती अग्नीनें प्रसन्न होऊन मान्य केली आणि त्याप्रमाणें चार शार्ङ्गक पक्ष्यांस दग्ध केलें नाहीं. ११. 'पार्थें मय ही' असें पाठान्तर. १२. आपलें कल्याण इच्छिणारा. 'हितार्थ' असें पाठांतर. १३. पंतांनीं या ( ९२–१०१ ) दहा पद्यांत मूळ ग्रंथाच्या २२२ ते २३४ ह्या तेरा अध्यायांतील विषयांचा समावेश केला आहे. सारांश येथें पंतांनीं वर्णनसंकोचाची कमालच केली आहे ! पंतांना सामान्यतः युद्धाचें वर्णन करण्याची आवड फार, पण कृष्णार्जुनांनीं खांडववनांतील प्राणिमात्रांचा नाश करण्यासाठीं केलेलें युद्ध हें त्यांच्या खऱ्या पराक्रमाचें द्योतक नसल्यामुळें पंतांनीं त्यास फांटा दिला असावा, हें संभवनीय आहे. १४. सुख. १५. श्रीकृष्ण, अर्जुन आणि अग्नि.

या तत्त्वातें येथें मूर्ख न घे, स्वहित-धर्मपर-मति घे. ॥ १०२

श्रीरामनामगुरुपद सुनिपुणवादक, मयूरमुख वाद्य, ।
श्रीरामदया गाती, गीत जयग्रंथ, पर्व हें आद्य. ॥ १०३

---

१. (खांडववनदहनकथेंतील) तात्पर्य, मर्म. २. स्वहित व स्वधर्म यांच्या ठायीं आसक्त आहे बुद्धि ज्याची तो, स्वहितधर्मपरायण. [तत्व] घे (घेतो)–असा अन्वय. ३. श्रीरामाचें नाम हाच गुरु त्याचें पद. ४. गुरुपद हेंच कुशल वादक (वाद्य वाजविणारा). ५. मयूरकवीचें मुख हेंच वाद्य. ६. श्रीरामदया हीच गाणारी. या गीतींत वादक, वाद्य, गाणारी आणि गीत या सर्व संगीतसाहित्याचा समावेश केला आहे. ७. जयग्रंथ हेंच गाणें. ह्या गीतींत **सांग समस्त-वस्तुविषय-रूपक** आहे. ८. महाभारतग्रंथास 'जय' हा एक पर्यायशब्द आहे. 'जयो नामेतिहासोऽयं श्रोतव्यो विजिगीषुणा' (आदिपर्व, अध्याय ६२, श्लोक २०), [म्हणजे–हा जयनामक इतिहास शत्रूंस जिंकूं इच्छिणाऱ्या पुरुषानें ऐकावा]. या पद्यभागावरून आणि 'नारायणं नमस्कृत्य नरं चैव नरोत्तमम्। देवीं सरस्वतीं चैव ततो जयमुदीरयेत्॥' [म्हणजे–(भगवान्) नारायण, नरश्रेष्ठ अर्जुन आणि देवी सरस्वती यांस नमस्कार करून 'जय' नामक ग्रंथ (अर्थात् महाभारत) वाचावा]. या महाभारताच्या प्रत्येक पर्वाच्या प्रारंभीं असणाऱ्या श्लोकावरून 'जय' हा शब्द भारतनामक इतिहासाचाच वाचक आहे, हें सुव्यक्त आहे. 'जय' हा ग्रंथ व 'अठरा' ही संख्या ह्यांचा संबंध मोठा चमत्कृतिजनक आहे. 'ज-य' ह्या अक्षरांवरून १८ ही संख्या उत्पन्न होते. ती अशीः–रूपात् कटपयपूर्वा वर्णा वर्णक्रमाद् भवन्त्यङ्काः। ञ्नौ शून्ये प्रथमार्थे स्याच्छून्यं शरतृतीयार्थे॥ (लघु आर्यसिद्धान्त, अध्याय १।२). म्हणजे–'क' पासून 'ञ' ह्या अक्षरांस अनुक्रमें १ ते ९ व शून्य अशा संज्ञा सांगितल्या आहेत. तसेंच 'ट' पासून 'न' ह्या व 'य' पासून 'ञ' ह्या अक्षरांसही त्याच संज्ञा सांगितल्या आहेत, आणि प, फ, ब, भ व म ह्या पांच अक्षरांस अनुक्रमें १, २, ३, ४ व ५ ह्या संज्ञा सांगितल्या आहेत. ह्या रीतीनें पाहिलें असतां 'जय' ह्या शब्दापैकीं 'ज' हें अक्षर ८ ह्या संख्येचें व 'य' हें अक्षर १ ह्या संख्येचें वाचक आहे. संस्कृत गणितग्रंथांत 'अंकानां वामतो गतिः' ह्या नियमास अनुसरून अंक उजवीकडून डावीकडे मांडितात. तेव्हां 'जय' ह्या शब्दांतील 'ज' ह्या अक्षरावरून बोध होणारा जो ८ चा आंकडा तो प्रथम लिहून त्याच्या डावीकडे 'य' ह्या अक्षरावरून सिद्ध होणारा १ हा आंकडा लिहिला म्हणजे १८ ही संख्या उत्पन्न होते. सारांश, 'जय' हा शब्द १८ ही संख्या दर्शवितो. तसेंच प्रस्तुत ग्रंथांत मुख्य पर्वें १८ आहेत; भारतीय युद्ध १८ दिवस चालू होतें; सदरहू युद्धांत कौरव व पांडव ह्या दोन्ही पक्षांचें मिळून सैन्य १८ अक्षौहिणी होतें; प्रस्तुत ग्रंथांतील अत्यंत महत्वाचें प्रकरण जें 'भगवद्गीता' त्याचे अध्याय १८ आहेत; भारतीय युद्धाच्या समाप्तीनंतर धृतराष्ट्र १८ वर्षेंच जीवंत होता; व धर्मराजानें आपल्या राज्याभिषेकापासून स्वर्गारोहणापर्यंत १८ च्या दुप्पट म्हणजे छत्तीस वर्षेंच राज्य केलें. ह्याप्रमाणें 'जय' (भारत) हा ग्रंथ व १८ ही संख्या यांचा संबंध असा मननीय आहे. हा प्रकार केवळ काकतालीयन्यायानें घडून आला, कीं **व्यास**ांनीं ही योजना जाणूनबुजून केली, ह्याचा उलगडा होणें शक्य वाटत नाहीं. ९. पहिलें (आदिपर्व.)

## उपसंहार[1].

ऐका[2] सज्जन हो ! भवद्वच[3] खरें, आश्चर्य म्यां पाहिलें,
वाल्मीकिप्रभृतिस्वबंदिनिकरीं[4] दीना मला बाहिलें[5]. ।
केलें प्राकृत[6] काव्य, ईश्वरपदीं धत्तूरसें[7] वाहिलें[8],
सांगूं काय वरप्रसाद ? अजि ! तें व्यासें[9] हि कीं साहिलें[10]! ॥ १०४

॥ इति श्रीमहाभारते श्रीरामनंदनमयूरेश्वरविरचित आदिपर्व संपूर्णम् ॥

॥ श्रीरामचंद्रार्पणमस्तु ॥

---

१. 'वरदानस्य उक्तिर्या सा काव्य उपसंहृतिः' म्हणजे–ज्या पद्यांत वरदानाचा उल्लेख असतो, त्याला 'उपसंहार' असें म्हणतात. या न्यायानें प्रस्तुत श्लोकाच्या चतुर्थ चरणांत वरदानाचा उल्लेख आहे. तें वरदान म्हणजे प्राकृत काव्यरचनेला मान्यता हें होय. २. संस्कृत कविजनांचा असा संप्रदाय आहे कीं, सर्गाच्या शेवटील एक दोन पद्यें सर्गवृत्ताहून भिन्न वृत्ताचीं असावयाचीं; या नियमास अनुसरून **आदिपर्वा**च्या या चरम पद्याचें वृत्त **शार्दूलविक्रीडित** आहे. त्याचें लक्षणः— मसजैः सततैर्गेन युक्तमेकोनविंशवत् । शार्दूलक्रीडितं प्राहुश्छिन्नं द्वादश-सप्तभिः ॥ (सुवृत्ततिलक–प्रथम विन्यास, श्लोक ३६) ह्याचा अर्थः—ज्या वृत्ताच्या प्रत्येक चरणांत १९ अक्षरें असतात, आणि बाराव्या आणि त्यानंतर सातव्या अक्षरावर यति असतो आणि ज्यांत म–गण, स–गण, ज–गण, स–गण, त–गण, त–गण आणि एक गुरु अक्षर अशी रचना असते, त्याला शार्दूलविक्रीडित वृत्त म्हणावें. पंतांनीं आपल्या काव्याविषयीं कोठें कोठें श्लाघा अथवा गर्वोक्ति ध्वनित करून, ज्या परमेश्वराच्या 'वरप्रसादा'नें अथवा 'सत्प्रसादामृता'नें तें प्रसन्न आणि सरस उतरलें, त्याच्या पदीं लीन होऊन, तदुपकारस्मरणपूर्वक आनंदभरानें स्वकृतीचें वर्णन केलें आहे; तसा प्रकार या पद्यांतही त्यांनीं जाणविला आहे. ३. तुमचें वचन. तुमचें सांगणें खरें झालें–असा भाव. ४. वाल्मीकिप्रमुख जे आपले (ईश्वराचे) बंदिजन (स्तुतिपाठक) यांच्या निकरीं (समूहांत). येथें वाल्मीकीचाच प्रामुख्यानें उल्लेख केलेला आहे यावरून पंतांनीं नुकतेंच 'रामायण' रचिलें होतें, असें दिसतें. अर्थात् पुढील चरणांतील 'प्राकृत काव्य' ह्या शब्दांवरून तें काव्य मराठी होतें, संस्कृत नव्हतें, हें स्पष्ट होतें. सारांश, महाभारतास आरंभ करण्यापूर्वीं पंतांनीं नुकतेंच मराठी 'मंत्ररामायण' रचून पूर्ण केलें होतें, असें म्हणावयास हरकत नाहीं. ५. बोलाविलें. त्यांच्यामध्यें आपली गणना झाली–असा भाव. ६. मराठी. यद्यपि या ग्रंथास 'प्राकृत काव्य' असें म्हटलें आहे, तथापि यांत पंतांनीं संस्कृताचें अतिशयित मिश्रण केलें आहे, असें पदोपदीं दिसून येईल. ७. धोतऱ्याच्या फुलासारखें. 'धत्तूरे कांचनारे च कालीये चम्पकेऽपि च' इति मेदिनी. ८. समर्पण केलें. ९. 'महाभारत' ग्रंथकार जो व्यास त्यानें वेदांचे विभाग केले म्हणून त्याला व्यास किंवा 'वेदव्यास' असें नांव पडलें. त्याचें सगळें नांव म्हटलें तर 'सत्यवतीसुत पाराशर्य कृष्णद्वैपायन वेदव्यास' असें आहे. त्यानें सुद्धां पंतांची कृति सहन केली. येथें 'रामायण'प्रणेता वाल्मीकि आणि 'भारत'प्रणेता व्यास यांशीं आपली समता पंतांनीं व्यंग्योक्तीनें सुचविली आहे. १०. सहन केलें. व्यासांनीं सुद्धां माझें काव्य मान्य केलें, मराठी भाषेंत काव्यरचना केल्याबद्दल मला त्यांनीं कोणत्याही प्रकारें दोष दिला नाहीं–हा इत्यर्थ.

*

# परिशिष्टें.

## १. पंतांची कविता भाषांतररूप आहे काय?

सुमारें ५०।६० वर्षांपूर्वी आपल्या सर्वेच प्राचीन कवींच्या व विशेषतः **मोरोपंतांच्या** योग्यतेविषयीं तत्कालीन आंग्लविद्याविभूषित विद्वानांचें मत अगदींच प्रतिकूल होतें. अर्थात् तें पूर्वग्रहदूषित व सदहू कवींचे ग्रंथ बारकाईनें न वाचतां किंवा मुळींच न वाचतां बनलेलें होतें. परंतु कै. **विष्णु कृष्णशास्त्री चिपळूणकर** यांनीं **'निबंधमालें'**त **मोरोपंतां**वर निबंध लिहून पंत हे 'कवि' ह्या संज्ञेस पात्र होते किंवा नाहीं, पात्र असल्यास त्यांच्या ग्रंथांत कोणकोणते कवित्वगुण दृष्टीस पडतात, त्यांच्या काव्यांतील वैशिष्ट्य कोणतें, इत्यादि प्रश्नांची चर्चा केली आहे, व अशा रीतीनें पंतांच्या काव्याचें महत्त्व महाराष्ट्रीयांस पटवून दिलें आहे.

**मोरोपंतां**संबंधानें किंवा सामान्यतः सर्वेच महाराष्ट्रकवींसंबंधानें पहिला मोठा आक्षेप असा होता, कीं त्यांचे काव्यग्रंथ म्हणजे संस्कृतांतील रामायण-भारतादि ग्रंथांचीं किंवा त्यांतील प्रकरणांचीं भाषांतरें होत. परंतु हा आक्षेप किती निराधार आहे ह्यासंबंधीं 'निबंधमालाकारां'नीं पंतकृत आदिपर्वांतील सुंदोपसुंदोपाख्यानाची मूळांतील व **मुक्तेश्वर**कृत आदिपर्वांतील सदहू प्रकरणाशीं तुलना करून जें मार्मिक विवेचन केलें आहे, तें पुढें दिलें आहे:—

(१)

  

२. "**मोरोपंता**विषयीं व एकंदर मराठी कवींविषयीं विद्वन्मंडळाचा पहिला मोठा आक्षेप हा आहे कीं, त्यांची कविता स्वतंत्र रचलेली नव्हे, तर केवळ भाषांतररूप होय. आतां निवळ भाषांतर असल्यानेंही काव्याची शोभा व कवीची योग्यता कितपत कमी होते, हा एक स्वतंत्रच विचार आहे.

  

३. 'भाषांतर' या शब्दाचा अर्थ काय हें कोणासही सांगावयास नको. कोणत्याही पदार्थाचें प्रतिबिंब आरशांत, स्थिर उदकप्रवाहांत, वगैरे पडलें असतां मूळ पदार्थाची सावयव प्रतिमा जशी स्थलांतरीं दृष्टिगोचर होते, त्याप्रमाणें एका भाषेंतील अर्थ दुसरींत यथास्थित व्यक्त झाला

असतां त्याचें भाषांतर झालें असें म्हणतात. अशीं भाषांतरें आपल्या भाषेंत व दरएक भाषेंत अनेक आहेत. जगद्विख्यात कवि होमर व व्हर्जिल यांचीं भाषांतरें अनुक्रमेंकरून पोप व ड्रायडन् यांनीं केलीं आहेत. वरच्यांच्या जोडीस बसविण्यासारखा जो आमचा 'कविकुलगुरु', त्याच्या अप्रतिम नाटकाचें भाषांतर सर विल्यम जोन्स यानें केलें आहे. आमच्या भाषेंत वामनपंडित वगैरे कवींनीं भर्तृहरीचीं शतकें, जगन्नाथरायांची गंगालहरी, तशीच भगवद्गीता यांचीं भाषांतरें रचिलीं आहेत; व मोरोपंतांनीं 'सप्तशती' व 'गीता' यांवर प्राकृत टीका केल्या आहेत. अलीकडे दहावीस वर्षांत तशींच संस्कृत नाटकांचीं व मेघदूतादि काव्यांचीं भाषांतरें होऊन गेलीं आहेत. तर हीं सर्व पद्यात्मक भाषांतरांचीं उदाहरणें होत. आतां अशाच तऱ्हेचे वामन, मोरोपंत, मुक्तेश्वर इत्यादिकांचे ग्रंथ आहेत कीं काय हें पाहूं.

४. वरील गोष्टीविषयीं निर्णय प्रत्यक्ष प्रमाणावरून म्हणजे मूळ रामायण, महाभारत, भागवत यांशीं वरील कवींचे ग्रंथ ताडून पाहिले असतां तर होणार आहेच; पण एरवीही सामान्य अनुमानावरून तिजविषयीं बराच निकाल होण्यासारखा आहे, तो येणेंप्रमाणें—एक तर ग्रंथविस्तारावरून रामायणाची ग्रंथसंख्या २४००० व भागवताची १८००० आहे, आणि महाभारत तर लक्ष ग्रंथ म्हणून प्रसिद्धच आहे. मग यावरूनही उघड दिसणार आहे कीं, सदरील मराठी ग्रंथांस या प्रचंड ग्रंथांचीं भाषांतरें म्हणणें अगदीच शोभणार नाहीं. मोरोपंतांच्या 'भारता'-वरील आर्या पुरत्या वीस हजारही नाहींत. 'मंत्रभागवत'[1] तर सरासरी साडेतीन हजार आहे व 'मंत्ररामायण'[2] तर [ दोन ] हजार सुद्धां असेल नसेल!......असो; तर ग्रंथविस्ताराचें हें एक प्रमाण झालें. दुसरें प्रमाण कविताविषयावरून. बहुतेक महाराष्ट्रकवींची कविता जर पाहिली, तर तिचे विषय स्वतंत्र म्हणजे संस्कृतांतून न घेतलेले असे आहेत, हें तेव्हांच लक्षांत येईल. उदाहरणार्थ—वामन, आनंदतनय व रघुनाथपंडित घ्या. यांनीं निरनिराळ्या विषयांवर जीं आख्यानें रचिलीं आहेत, त्यांत केवळ कथानकाखेरीज दुसरा कोणताही मूळ संस्कृतांतला आधार नाहीं. त्यांतील विचार, कल्पना, अलंकार, वगैरे सर्व त्या त्या कवींचीं स्वतःचीं होत. तिसरें प्रमाण यमकादि शब्दालंकार—हें महाराष्ट्र कवितेंत वामनांनीं प्रथमतः आणिलें व त्यावरून त्यांस 'यमक्या वामन' असें नांव प्राप्त झालें होतें. मोरोपंतांनीं तर हें यमकाचें प्रकरण कोठपर्यंत वाढविलें तें सर्वप्रसिद्धच आहे. आनंदतनय, रघुनाथपंडित यांनींही आपल्या कवितेस प्रासानुप्रासांनीं जागोजाग अत्यंत शोभा आणिली आहे, हें सर्वांस माहीत आहेच. तर यावरूनही वरील आक्षेपाचें बरेंच निरसन होतें; कां कीं, जें निवळ भाषांतर आहे, त्यांतून संस्कृतासारख्या अत्यंत अभियुक्त भाषेंतून मराठीसारख्या भाषेंत, त्यांत भाषांतरकारास लांब लांब यमकें व प्रासांवर प्रास ही गर्दी कधींही साधतां येणार नाहीं, हें कोणासही सकृद्दर्शनीं सुद्धां स्पष्ट दिसणार आहे.

---

१. पंतकृत मंत्रभागवताची पद्यसंख्या ३५७५ आहे. म्हणजे मूळांतील $3\frac{3}{4}$ पद्यांस पंतांची एक गीति पडते!

२. पंतकृत मंत्ररामायणाच्या एकंदर गीति १९१३ असून त्यांचें मूळग्रंथाशीं प्रमाण $\frac{1}{12}$ पडतें!

पण ही केवळ चार पांच मराठी कवींची व त्यांच्याही कांहीं ग्रंथांचीच काय ती गोष्ट झाली. त्यांस सोडून बाकींच्याविषयीं विचार केला म्हणजे तर वरील मतास कांहींच थारा राहात नाहीं.

  

५. वरील अवांतर प्रमाणांवरूनही प्रस्तुत वादाचा बराच निकाल होणार आहे. आतां वर सांगितलेलें प्रत्यक्ष प्रमाण वाचकांस सादर करतों. 'महाभारता'च्या आदिपर्वाच्या शेवटीं शेवटीं 'सुंदोपसुंदोपाख्यान' म्हणून एक कथानक आहे. तें व मुक्तेश्वर आणि मोरोपंत यांचीं प्राकृत ओंख्यानें अशीं तिन्ही पुढें देतों:—

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| (१) मूळ आदिपर्व, | अध्याय | २०९ | श्लोक | ३४ |
| ,, | ,, | ,, | २१० | ,, | २७ |
| ,, | ,, | ,, | २११ | ,, | ३२ |
| ,, | ,, | ,, | २१२ | ,, | ३१ |

एकंदर श्लोक—१२४

(२) मुक्तेश्वरकृत आदिपर्व, अध्याय ४६
ओंव्या ४८–९१=४३

(३) मोरोपंतकृत आदिपर्व, अध्याय ३८
गीति ८–२३=१५

वरील तिन्ही आख्यानें परस्पर ताडून पाहिलीं असतां सदरील मतास कितपत बळकटी येते, हें वाचकांस कळून येईलच. तिन्ही आख्यानांची पद्यसंख्याच नुसती पाहिली, तर त्यांचें प्रमाण सरासरी १, $\frac{1}{2}$, $\frac{1}{4}$ इतकें पडेल. आंतील अर्थ पाहिला तरी मुक्तेश्वराच्या ओंव्यांतही पुष्कळ फेर केलेला आढळेल आणि मोरोपंतांच्या आर्यांत तर मूळच्या कथासूत्राखेरीज थोडेंच सादृश्य सांपडेल.

वरील सादृश्य तरी 'भारतां'तील विवक्षित कथानक घेतलें म्हणून इतकें आढळलें. एकंदर इतिहासाच्या संबंधानें जर वरील तिन्ही ग्रंथ परस्परांशीं ताडून पाहिले, तर तें याहूनही थोडें आढळेल. तेव्हां एकंदरींत भारत, रामायण वगैरे ग्रंथांचा सरासरी आधार घेऊन वरील दोघां महाराष्ट्रकवींनीं स्वतंत्रपणेंच काव्यरचना केली आहे, असें म्हणावयास हरकत नाहीं. वामनादि कवींचीं स्फुट आख्यानें तर बहुधा 'रघुकिराता'दि काव्यांप्रमाणेंच स्वतंत्र होत!"

[ निबंधमाला—अंक ४६, फेब्रुआरी १८७८ ]

---

१. येथें विस्तरभयास्तव हे उतारे दिले नाहींत. जिज्ञासु वाचकांनीं ते त्या त्या ग्रंथांतूनच पहावे, अशी त्यांस विनंति आहे.

२. हें प्रमाण वस्तुतः १, $\frac{1}{3}$ व $\frac{1}{8}$ असें आहे, हें स्पष्टच आहे. 'निबन्धमाले'तील लेखांत मुद्रणदोष घुसलेला दिसतो!

# ( २ )

पंत हे खरोखर भाषांतरकार होते कीं काय त्यासंबंधीं महाराष्ट्रांतील एक प्रसिद्ध लेखक कै० प्रो० शिवराम महादेव परांजपे, एम्. ए. 'काळ' पत्राचे संपादक, यांचें काय मत होतें तें पुढें दिलें आहे. त्यावरून पंत हे एक प्रतिभासंपन्न कवि होते, भाषांतरकार नव्हते, हें स्पष्ट दिसून येतें:—

  

"पंतांनीं आर्याभारत लिहितांना महाभारताचा आश्रय घेतला होता, यामुळें महाभारतांतील रसनिष्पत्तीचा फायदा त्यांना आयताच मिळाला. परंतु त्याबरोबर त्यांच्याकडे कांहीं टीकाकारांच्या मतें एक कमीपणाही आला. तो असा कीं, पंत हे त्यामुळें एक भाषांतरकार म्हणून गणले जाऊं लागले. **पंतांनीं आर्याभारतामध्यें ज्या [ कथा ] लिहिल्या, त्या मूळ संस्कृत महाभारतामध्यें आहेत, एवढीच गोष्ट ज्यांनीं वरवर पाहिली, त्यांनींच फक्त मोरोपंतांवरती भाषांतरकर्तृत्वाचा आक्षेप उत्थापित केलेला आहे. परंतु तो अगदीं निराधार आहे.** मोरोपंतांनीं महाभारतांतील मूळ कथा आधारापुरती घेतली, हें खरें; परंतु त्यामध्यें आपल्या चातुर्यानें, सहृदयतेनें, आणि कवित्वानें नवीन कल्पनांची, नवीन अलंकारांची आणि नवीन मोहकपणाची नवीन भर किती घातली आहे, हें महाभारत आणि आर्याभारत यांची तुलना केल्यानेंच लक्षांत येण्यासारखें आहे. अशी थोडीशी तुलना [ 'काव्यसंग्रहा'चे संपादक ] कै० ना० चिं० केळकर यांनीं शल्यपर्वापासून करून दाखविलेली आहे. ती जरी थोडीशीच आहे, तरी वरील मुद्यासंबंधानें कोणाचीही खात्री पटवून देण्याला ती पुष्कळ आहे, यांत शंका नाहीं. यावरून हें स्पष्ट दिसून येईल कीं, पंतांनीं फक्त कथाभागाचाच काय तो आधार महाभारतापासून घेतलेला आहे आणि असे आधार कोणी घेतलेले नाहींत ? संस्कृतमधील कविकुलगुरु जो कालिदास, त्याचीं 'रघुवंश' आणि 'कुमारसंभव' हीं दोन उत्तम काव्येंही जुन्या कथांच्या आधारावरच रचलेलीं आहेत. संस्कृतमधील उत्तम नाटककार जो भवभूति त्याचीं 'महावीरचरित' आणि 'उत्तररामचरित' हीं नाटकेंही जुन्या कथांच्या आधारावरच लिहिलीं आहेत. असलीं आपल्यामधील उदाहरणें आणखी किती तरी दाखवितां येतील. किंबहुना, आपलें बहुतेक जुनें वाङ्मय अशाच तऱ्हेचें आहे. परंतु याच्यापेक्षांही विशेष आश्चर्य करण्यासारखी गोष्ट म्हटली म्हणजे इंग्रजीमधील सुप्रसिद्ध कवि शेक्सिपअर याची आहे. हा कवि स्वतंत्र कल्पनेचा होता, याबद्दल कोणी शंका सुद्धां घेण्याला धजणार नाहीं. तरी पण शेक्सिपअरनें जुन्या रोमन आणि इंग्लिश इतिहासाच्या आधारावर जीं नाटकें लिहिलीं आहेत, त्यांतील कित्येक भाषणें 'प्लुटार्क'च्या चरित्रांतून आणि 'हॉलिन्शेड'च्या बखरींतून जशीं आहेत, तशींच्या तशींच शेक्सिपअरनें दिलेलीं आहेत. आणि तरीही त्याच्या उत्तमपणांत यत्किंचित्‌ही कमीपणा आलेला नाहीं, किंवा तें भाषांतर आहे म्हणून त्याला कोणी दूषणही दिलेलें नाहीं. सारांश, स्वतंत्र कल्पनेच्या कवीनें आपला कथाभाग कोठून घेतला आहे, हा वास्तविक खऱ्या महत्त्वाचा प्रश्न नसून, त्यानें आपल्या कार्याकरितां घेतलेला कथाभाग कशा रीतीनें रंगविला आहे, आणि त्या योगानें तो आपल्या वाचकांना किती तल्लीन करून सोडीत आहे, या गोष्टी टीकाकारांनीं मुख्यतः लक्षांत घेतल्या पाहिजेत." [ पराडकर यांनीं प्रसिद्ध केलेल्या आर्याभारताचा उपोद्घात. ]

---

# २. ग्राम्य शब्दांचा प्रयोग.



मोरोपंतांच्या कवित्वाविषयीं किलेकांस शंका होती, ती नाहींशी करण्याकरितां कै. विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनीं आपल्या 'मालें'त त्यांच्या कवितेंतील गुणदोषांचें परीक्षण करून, ते एक उत्कृष्ट कवि होते हें पुष्कळ प्रमाणांनीं सिद्ध करून दाखविलें आहे. त्यावरून काव्यनिरीक्षणांत त्यांची किती सूक्ष्म दृष्टि होती हें दिसून येतें.

पंतांच्या कवितेंत 'ग्राम्य' शब्दांचा क्वचित् उपयोग केलेला आहे, असें 'माला'कारांनीं विधान करून, अशीं कांहीं स्थळेंही दाखवून दिलीं. पंतांची योग्यता कमी करण्याच्या उद्देशानें त्यांनीं हा दोष दाखविला नव्हता, हें उघडच आहे. तथापि 'ग्राम्य' ह्या शब्दाच्या अर्थासंबंधीं मतभेद असल्यामुळें 'माला'कारांनीं दाखविलेल्या दोषास पंत कितपत पात्र आहेत, ही शंकाच आहे. म्हणून पंतांवरील आक्षेप व त्याचें कै. गणेशशास्त्री लेले यांनीं केलेलें निरसन हीं पुढें दिलीं आहेतः—

  

"[ मोरोपंतकवीच्या ] कृतींत आढळणाऱ्या एका मोठ्या दोषाचें निरूपण......करतों. हा दोष अश्लीलत्व होय. अश्लीलत्व म्हणजे चावटपणा नव्हे; हा दोष मोरोपंताच्या काव्यांत मुळींच आढळत नाहीं. अश्लीलत्व म्हणजे प्रौढ काव्यांत न खपण्यासारख्या ग्राम्य शब्दांचा प्रयोग व केवळ व्यावहारिक दाखले हे होत. सत्कवींची शब्दपद्धति व अर्थपद्धति लक्षपूर्वक पाहिली असतां ही गोष्ट सहज लक्षांत येण्यासारखी आहे, कीं दोहोंमध्यें ग्राम्यतेचा लेशही खपत नसतो; नुसती वाक्यरचनाही कवितेंत व्यावहारिक भाषेहून निराळी असावी लागते, आणि त्यांतून शब्द व दृष्टांत हे तर प्राकृत व्यवहारांतले व ग्राम्य भाषेंतले मुळींच उपयोगी नाहींत. काव्याचा उद्देश मनोरंजन हा असल्यामुळें, व जे विषय नेहमींच्या व्यवहारांतले व अत्यंत परिचित त्यांच्यापासून वरील उद्देश साध्य होत नसल्यामुळें, त्यांचे वाचक शब्द व त्यांचे दृष्टांत हे मनास आल्हाद देत नाहींत; उलटें असें सुद्धां होतें कीं, एकादें पद्य सुंदर साधलें असून त्यांत मोठा प्रौढ अर्थ संगृहीत केलेला असतो, पण वरच्या प्रकारच्या एका शब्दानें किंवा दाखल्यानें दुधांत मिठाचा खडा टाकल्याप्रमाणें होऊन जातें.......यास्तव त्याच्या स्पष्टीकरणार्थ कांहीं उदाहरणें देतोंः—

  

( २ ) धृतराष्ट्रासि रुचेसी सांगे अत्युग्र नीति तो कणिक. ।
वणिक ग्राहकहस्तीं देतो विषसर्पिशर्कराकणिक. ॥ आदिपर्व—अध्याय २८।५

  

( ७ ) गेला स्वर्गासि अमित सुकृतें जोडोनि राय; तें नाकीं ।
होय सुदुःसह शक्रा, जैसें बाळासि रायतें नाकीं. ॥ आदिपर्व—अध्याय ११।७५

  

दुसऱ्या...आर्येतील प्रसंगास वाण्याच्या दुकानाचा दाखला अगदीं अप्रयोजक दिसतो...... [ सातव्या ] आर्येतील रायत्याचा दृष्टांत वाचून तर थोडेच वाचक हांसल्याशिवाय राहतील. इंद्र कोणीकडे आणि रायतें तें काय!!" [ निबंधमाला, अंक ६३ पृष्ठें १४-१५ ]

वरील आक्षेपांचें निरसन कै० गणेशशास्त्री लेले यांनीं मोठ्या मार्मिकपणें केलें आहे, तें रसिकांस खात्रीनें पटेल असें वाटतें:—

"तुम्ही मोरोपंताच्या कवितेवर मुख्यत्वें ग्राम्यत्वाचा दोष दिला. परंतु ग्राम्य म्हणजे नांगर-हांके वगैरे हलके लोक यांच्याच मात्र भाषणांत येणारे जे शब्द, त्यांचा प्रयोग केला असतां हा दोष होतो. पण तसें मोरोपंताच्या कवितेंत आढळत नाहीं. त्या कवितेंत ज्या शब्दांचा प्रयोग केला आहे, ते शब्द सभ्यांच्याही भाषणांत येणारे असे आढळतात, म्हणून तो ग्राम्यत्व-रूप दोष आहे, असें म्हणतां येत नाहीं. तसेंच सभ्य लोकांच्या व्यवहारांत येणाऱ्या गोष्टी दृष्टांतत्वेंकरून सांगितल्या असतां तोही ग्राम्यत्वरूप दोष नव्हे. तर उलटा अर्थसौलभ्यरूपानें गुणच होय, असें म्हणण्यास बाध दिसत नाहीं.

तुम्ही ग्राम्यत्वदोषाच्या उदाहरणार्थ सात आर्या लिहिल्या, त्यांतील......दुसरी 'धृतराष्ट्रासि रुचे' इत्यादि आर्या आहे. हींत 'कणिक' या तीन अक्षरांचें यमक साधलें आहे आणि कण-कीच्या संबंधानें वणिकाचा (वाण्याचा) दृष्टांत दिला आहे. पण तो पंतांनीं किती समर्पकपणें योजिला आहे तो पहा! वणिकापाशीं तूप, साखर, कणिक व असे अनेक प्रकारचे जिन्नस असतात; त्यांतून गिऱ्हाइकास पाहिजे असेल तो जिन्नस तो काढून देतो; त्याप्रमाणें कणिकऋषीच्या जवळ अनेकविध नीतींचें जणूं पोतडेंच भरलें होतें. त्यांतून धृतराष्ट्रास आवडण्याजोगीच नीति त्यानें त्यास सांगितली—हा अर्थ वणिकाचे दृष्टांतानें सुव्यक्त झाला!

  

आतां शेवटील सातवी आर्या 'गेला स्वर्गासि' ही होय. हींत 'रायतें नाकीं' या पांच अक्षरांचें यमक साधिलें आहे आणि त्यासंबंधानें 'रायतें' हा शब्द आणावा लागला आहे. यांत 'इंद्र कोणीकडे आणि रायतें कोणीकडे!' असें तुम्ही उपहासरूपानें लिहिलें, परंतु आम्हांस तसें वाटत नाहीं. कारण येथें इंद्रानें रायतें भक्षिलें, किंवा त्याचा त्याशीं कांहीं संबंध वर्णिला, असें मुळींच नाहीं. माथ्यांत तिडीक जाण्याविषयीं हा दृष्टांत दिला आहे. रायत्यांत मोहऱ्या वांटून घातलेल्या असतात आणि तें रायतें फार मुखप्रिय असतें. म्हणून बाळकें तें एकदम पुष्कळच खाऊं लागलीं असतां त्यांचे नाकांत फणफणाट होऊन मस्तकांत तिडीक जाते, ती त्यांस सहन होत नाहीं. तसें त्याच राजाचें स्वर्गास जाणें इंद्रास अत्यंत दुःसह झालें, असा अर्थ उघड आहे. यांत 'इंद्र कोणीकडे आणि रायतें कोणीकडे!' असली अननुरूपता मानण्यास जागा दिसत नाहीं!"

[ निबंधमाला, अंक ७०, पृष्ठें २६-२७ ]

---

# ३. श्लेषाचें औचित्य.

कै० कृष्णशास्त्री चिपळूणकर यांचा पंतांवर शेवटपर्यंत मोठा कटाक्ष असे. 'जुन्या व नव्या पंडितांचें बिचाऱ्या मयूरकवीविषयींचें अप्रेम त्यांच्या ठायीं एकवटलेलें होतें. मोरोपंत मुळीं कवीच नव्हे, तर पुराणांतील अर्थ घेऊन तो शुद्ध प्राकृत भाषेंत त्यानें आर्यारूपानें ग्रथित केला, एवढीच काय ती त्याची करामत हें त्यांचें ठरींव मत होतें.' (निबंधमाला—अंक ५९ पृष्ठ १८ टीप पहा). त्यांनीं 'अनेकविद्यामूलतत्त्वसंग्रह' नामक एक ग्रंथ लिहिला आहे. त्यांतील उतारा व 'निबंधमालाकार' कै० विष्णु कृष्णशास्त्री चिपळूणकर यांचें त्यावरील मार्मिक विवेचन हीं पुढें दिलीं आहेत. त्यांवरून पंतांच्या खऱ्या योग्यतेविषयीं वाचकांस कल्पना सहज करितां येईलः—

## (१)

"-'अनेकविद्यामूलतत्त्वसंग्रहां'त एके ठिकाणीं असा लेख आहेः—

"वाक्याचा किंवा त्यांतील शब्दांचा अर्थ दोहींकडे लागत असला म्हणजे श्लेष नामक अलंकार होतो. जसेंः—

तूं मलिन कुटिल नीरस जड हि पुनर्भवपणें हि कचसा च ।
धरिला शिरीं हि न स्वप्रकृतिगुण त्यजिसि नाम कच साच. ॥

[ आदिपर्व—अध्याय १०।९ ]

ह्या स्थळीं कच नामक ब्राह्मणास जीं विशेषणें दिलीं आहेत, तीं केंसासही लागतात. साधारण कवि ह्या अलंकाराचा हवा तेथें प्रयोग करून आपल्या काव्यांस दुर्बोधता आणितात, व त्यांच्या ग्रंथांत एका शब्दाचे दोन अर्थ होत असतात, एवढ्यानेंच त्यांस व कित्तीएक अरसिकांस ते ग्रंथ मोठे चांगले वाटतात; पण सहृदय पुरुष तसले लेख पसंत करीत नाहींत. हें आमचेंच मत आहे असें वाचणाऱ्यांनीं समजूं नये; तर मोठमोठ्या सुज्ञ ग्रंथकारांचेंही मत असेंच आहे."

❀ ❀ ❀

सदरील उताऱ्यांतील मुख्य गोष्ट 'हवा तेथें प्रयोग' ही होय. म्हणजे मोरोपंतानें ज्या प्रसंगीं वरील आर्येंत श्लेषाची योजना केली आहे, तो प्रसंग श्लेषरचनेस उचित नव्हे, हा त्यावर आक्षेप होय. आतां वरील श्लेष अप्रासंगिक कां याचा जर विचार केला, तर एवढेंच कारण दिसतें कीं, देवयानीचें बोलणें रोषाचें आहे, यास्तव चित्तवृत्ति कलुष झाली असतां श्लेषाची स्फूर्ति कोठून होणार? मिरवणुकीच्या वेळची घोड्याची ऐटदार चाल जशी रणांगणावर अप्रासंगिक होईल, त्याप्रमाणेंच क्रोधाच्या, शोकाच्या वगैरे भाषणांत श्लेष तर काय, पण सामान्यतः कोणताही अलंकार शोभणार नाहीं! पण असें असतां सर्वमान्य महाकवींच्या ग्रंथांतून पाहिलें असतांही शोकाच्या, क्रोधाच्या, वगैरे आवेशांत केलेलीं भाषणेंही केवळ अलंकारविरहित असतात असें नाहीं. काव्याचा मुख्य हेतु मनोरंजन

असल्यामुळें अलंकाराचा थोडाबहुत प्रयोग वरील प्रसंगीं केलेला आढळतो. उदाहरणार्थ पुढील श्लोक पहाः—

स्वप्नान्तरेऽपि खलु भामिनि पत्युरन्यं ।
या दृष्टवत्यसि न कंचन साभिलाषम् ॥
सा संप्रति प्रचलितासि गुणैर्विहीनं ।
प्राप्तुं कथं कथय हंत परं पुमांसम्. ॥
निर्दूषणा गुणवती रसभावपूर्णा ।
सालंकृतिः श्रवणकोमलवर्णराजिः ॥
सा मामकीन कवितेव मनोभिरामा ।
रामा कदापि हृदयान्मम नापयाति. ॥

वरील हीं पद्यें जगन्नाथकृत 'भामिनीविलासा'च्या 'करुण' नामक तृतीय विलासांतील आहेत. पहिल्या पद्यांत 'गुण' आणि 'परं पुमान्' हे शब्द श्लिष्ट आहेत, व दुसऱ्याचा तर सगळाच अर्थ श्लेषमय आहे.

तेव्हां वादविषयक आर्येंत श्लेषाच्या प्रयोगाबद्दल जर आमच्या कवीवर दूषण आलेंच, तर तें वरील महारसिकावर व महाकवीवरही तितक्याच मानानें येणार आहे !

शिवाय हेंही लक्षांत आणलें पाहिजे कीं, निर्भर्त्सनेच्या भाषणांत नामाच्या यथार्थत्वाविषयींचा किंवा अयथार्थत्वाविषयींचा उल्लेख येणें हें अगदीं साहजिक आहे. कोणी गोरा असतां त्यास उद्देशून रागानें बोलतांना 'तूं बाहेर जितका गोरा आहेस तितका आंतून काळा आहेस'; किंवा तो वर्णानें काळा असल्यास 'तूं आंतबाहेर सारखाच काळा आहेस' अशी बोलण्याची प्रवृत्ति लोकव्यवहारांत सुद्धां आढळते. मग काव्यांत तर हा प्रकार आढळेलच आढळेल. 'गीतगोविंदां'त विप्रलब्धा नायिका नायकास रोषपूर्वक म्हणतेः—

बहिरिव मलिनतरं तव कृष्ण मनोऽपि भविष्यति नूनं ।
कथमथ वंचयसे जनमनुगतमसमशरज्वरदूनम्. ॥

"हे कृष्णा ! तूं बाहेरून जसा अत्यंत मलिन (काळा) आहेस, त्याप्रमाणेंच तुझें मनही आहेसें वाटतें; एरवीं मदनसंतापानें पीडलेल्या अशा स्वानुरक्त जनाचें वंचन तुझ्या हातून कसें होईल?"

---

१. न पाही स्वप्नींही पतिविण कधीं जी नर दुजा ।
स्पृहायुक्तें चित्तें जितकमलनालोत्तम भुजा ॥
सुशीला तूं ऐशी पर पुरुष जो निर्गुण तया ।
कशी पाहूं जासी हरिणनयने सत्वरतया. ॥
गुणांनीं जी पूर्णा अणुसम नसे दोषहि जिला ।
अलंकारीं साजे रस वसतसे जींत पहिला ॥
मृदू जीचे वर्ण श्रवणसुख देती परिसतां ।
वसे ती पद्माक्षी मम हृदयिं जेंवी सुकविता. ॥ पद्यरत्नावली.

कृष्णास व बलरामास धनुर्यागप्रेक्षणार्थ बोलवावयास कंसाकडून अक्रूर आला असतां गोपी भग्नमनोरथ होत्साझ्या अक्रूरास शिव्या देतातः—

यमदूतशतक्रूर हि समुखें अक्रूर म्हणविती मेला ।
आला गांव बधाया परि बाई! हा न लेश कोमेला. ॥

तेव्हां वरील प्रमाणांवरून पाहतां वादविषयक आर्येतील श्लेषावर अप्रासंगिकत्वाचा जो दोषारोप केला आहे, तो दूर होईल असें वाटतें.

  

श्लेषाचा प्रयोग आमच्या कवीस कितीसा प्रिय होता व तो त्याच्या कवितेंत कितीसा आढळतो, तसेंच जीं थोडींबहुत अशीं स्थळें आहेत त्यांस श्लेषरचनेच्या योगानें दुर्बोधत्व कितीसें आलें आहे, याविषयीं येथें कांहीं निराळें लिहिणें नकोच. वरील सर्व गोष्टींचा विचार झाला असतां प्रस्तुत महाराष्ट्रकवीची 'साधारण कवि' या पदांनीं जी अवगणना केली आहे, तीही सहजच निराधार होणार आहे!"

[ निबंधमाला, अंक ५९ ]

## (२)

उपरिनिर्दिष्ट वादविषयक गीतींतील श्लेषालंकाराच्या औचित्याविषयीं व प्रासंगिकत्वासंबंधीं अलंकारशास्त्रज्ञ लेखक व रसिक कवि कै० गणेशशास्त्री लेले यांचें काय मत होतें तें पुढें दिलें आहे. तें व 'निबंधमाला'-कार यांनीं केलेलें विवेचन हीं वाचून कै० कृष्णशास्त्री चिपळूणकर यांच्या लेखाच्या अयथार्थत्वासंबंधीं वाचकांची खात्री पटेल, असें वाटतेंः—

  

"मोरोपंतावरील फार दिवसांपासून तुम्हीं आरंभलेला निबंध [ नुकताच ] समाप्त झाला. त्यांत या कवीचे गुण मोठ्या मार्मिकपणानें व यथार्थपणानें वर्णिले, ते पाहून बहुत समाधान वाटलें. या कवीच्या गुणांस न जाणणारे असे अरसिक लोक त्याचे कवितेवर पुष्कळ दोष देतात. परंतु हा कवि मोठा मार्मिक, अत्यंत रसिक, आणि संस्कृत भाषेंत गाढा व्युत्पन्न असून छंद व व्याकरण यांच्या नियमास बिनचूक धरून चालणारा असा होता. हें त्याची कविता पाहून रसज्ञ व मार्मिक परीक्षकांचे सहज ध्यानांत येईल. याची कविता पंडितमान्य आहे, ही गोष्ट प्रसिद्ध आहे. परंतु ती केवळ प्राकृत जनांस न समजल्यामुळें ती त्यांस आवडत नाहीं, हेंही खरें आहे. ही प्रौढ असल्यामुळें रसास्वाद समजण्यास संस्कृत व प्राकृत या दोनही भाषांतील व्युत्पत्ति उत्तम असून अंगीं रसज्ञताही असली पाहिजे. नाहींतर 'कोंबड्यास रत्न' या न्यायानें अनधिकारी पुरुषास या कवीची कविता उपहासास्पद होते. देवयानीनें कचास म्हटलें, ती आर्या पहा कशी सुंदर आहे!

"तूं मलिन कुटिल नीरस जडहि पुनर्भवपणेंहि कच साच ।

धरिला शिरींहि न स्वप्रकृतिगुण त्यजिसि नाम कच साच" ॥ १ ॥

या आर्येंत कचाचें कचत्व या कवीनें, मलिन, कुटिल, नीरस इत्यादि पदांनीं, व "धरिला शिरींहि न स्वप्रकृतिगुण त्यजिसि" या वाक्यानें, कसें उत्कृष्टपणें वर्णिलें आहे! या रसाचा स्वाद केवळ प्राकृत व अरसज्ञ जनास कोठून समजणार? असो, तुम्हीं या पंडितमान्य रसिक कवीचें गुणवर्णन केलें तें योग्य होय."

[ निबंधमाला–अंक ७० ]

# ४. शिष्योत्तम उत्तंक.

उत्तंककृत कुंडलाहरणाची कथा व्यासकृत आदिपर्व, अध्याय ३ यांत दिलेली आहे. तिचा अनुवाद पंतांनीं स्वकृत आदिपर्व, अध्याय २ गीति ६६-१३५ यांत केला आहे. परंतु हीच कथा व्यासकृत आश्वमेधिकपर्व, अध्याय ५६-५८ मध्यें बऱ्याच निराळ्या रीतीनें दिलेली आढळली, म्हणून जिज्ञासु वाचकांसाठीं तिचा सारांश पुढें दिला आहेः—

गौतमऋषींस अनेक शिष्य होते. पण त्यांत उत्तंक हा गुरुभक्ति, मनोनिग्रह, शुचिर्भूतपणा व मनाचा मोठेपणा या गुणांत सर्वांहून वरचढ होता. गौतमांनीं ज्यांची विद्या पूर्ण झाली होती अशा अनेक शिष्यांस आपापल्या घरीं जाण्याची अनुज्ञा दिली. उत्तंकाच्या पाठीमागून आलेले शिष्यही विद्या संपवून परत गेले. पण उत्तंकावर गुरुजींचें विशेष प्रेम असल्यामुळें त्यांनीं त्यास परत जाण्याची आज्ञा दिली नाहीं. याप्रमाणें चाललें असतां इतका काळ लोटला कीं, उत्तंकास गुरुगृहीं गुरुसेवा करीत असतांनाच वार्धक्य आलें. वस्तुतः याची त्यास वार्ताही नव्हती! परंतु एके दिवशीं डोकीवरून आणलेला लांकडांचा भारा, अतिशय थकल्यामुळें, उत्तंकानें एकदम आश्रमाच्या आंगणांतच झुगारून दिला. त्याच्याबरोबर त्यास अडकलेली त्याची पांढऱ्या जटेची एक बटही तुटून आली. ती पाहतांच उत्तंकास फार वाईट वाटलें. 'आपणास म्हातारपण आलें, तरी आपली गुरुसेवा अजून संपत नाहीं व गुरूही आपणास अद्याप गृहस्थाश्रम करण्याची आज्ञा देत नाहींत; आपणास आतां वैवाहिक सुख कसचें मिळणार?' असा विचार मनांत येऊन उत्तंकास मोठें दुःख झालें व त्यानें अश्रु ढाळण्यास सुरवात केली. तेव्हां गौतमांच्या आज्ञेवरून त्यांच्या कन्येनें उत्तंकाचे अश्रु आपल्या ओंजळींत धरले. ही गुरुकन्या मोठी सौंदर्यसंपन्न असून तिचे डोळे फारच पाणीदार होते. उत्तंकाच्या तोंडून त्याच्या शोकाचें कारण कळल्यावर गौतमांनीं त्यास घरीं जाण्याची अनुज्ञा दिली. येवढेंच नव्हे, तर त्यास बल, शील, तारुण्य व आपली सुंदर कन्या हीं देऊन कृतार्थ केलें. गौतम व त्याची पत्नी अहल्या यांस उत्तंक 'गुरुदक्षिणा काय देऊं?' असें आग्रहानें विचारूं लागला. पण 'शिष्यानें आपल्या सेवेनें व वर्तनानें गुरूस संतुष्ट व सुप्रसन्न करणें हीच खरी गुरुदक्षिणा आहे; निराळ्या दक्षिणेची गरज नाहीं' असें उभयतांनीं त्यास परोपरीनें सांगितलें. पण उत्तंक आपला हट्ट सोडीना. तेव्हां अहल्येनें स्त्रीस्वभावसुलभ अशा इच्छेनें प्रेरित होऊन त्यास सांगितलें कीं, 'सौदासराजाची पत्नी मदयंती जीं रत्नकुंडलें धारण करीत आहे, तीं गुरुदक्षिणा म्हणून मला आणून दे.' गुरुपत्नीच्या ह्या आज्ञेप्रमाणें उत्तंक सौदासराजाकडे गेला. पण तो एका ब्राह्मणाच्या शापामुळें राक्षस होऊन नरमांस भक्षण करीत वनांत हिंडत असे. राक्षसांच्या भोजनाची वेळ सायंकाळीं असते. त्या वेळीं उत्तंक जवळ येतांच सौदासराजाच्या तोंडास पाणी सुटलें. पण उत्तंक त्यास म्हणालाः—'गुरुकार्याकरितां मी तुझ्याकडे आलों आहें; तुझ्या पत्नीचीं रत्नकुंडलें मला देऊन हें माझें कार्य सफल कर. मी गुरुपत्नीस तीं देऊन पुन्हां तुजकडे परत येईन. मग तूं मला खुशाल खा. पण गुरुकार्य पार पडेपर्यंत तूं माझे प्राण घेऊं नकोस'. उत्तंकाचें हें म्हणणें मान्य करून सौदासराजानें त्यास मदयंतीकडे पाठविलें. तिच्याजवळचीं हीं रत्नकुंडलें

दिव्य असून त्यांतून सदोदित सोनें बाहेर पडत असे व तीं रात्रीं नक्षत्रांप्रमाणें झळकत! हीं धारण करणारास तहान-भूक किंवा कसलेंही भय यांची बाधा होत नसे. तसेंच हीं धारण करणाराचें वय जसें लहानमोठें असेल, त्याप्रमाणें तीं लहानमोठीं होत! असलीं हीं कुंडलें मदयंतीपासून हिरावून घेण्यास देव, यक्ष, राक्षस व नाग हे टपलेले होते. हीं कुंडलें जमिनीवर ठेवलीं तर नाग, जेवून आंचवलेल्या हातानें घेतलीं तर यक्ष, व तीं घेऊन कोणी निजला तर देव, तीं हिरावून नेणार होते! मदयंती हीं कुंडलें उत्तंकाचे हवालीं करण्यास कबूल झाली. पण तिनें आपल्या पतीची पटण्यासारखी खूण मागितली. उत्तंक पुनः सौदासाकडे परत आला; तेव्हां त्यास त्यानें एक खुणेचा श्लोक सांगितला. उत्तंकानें मदयंतीकडे जाऊन तो श्लोक म्हणून दाखवितांच तिनें कुंडलें त्याच्या स्वाधीन केलीं. तीं घेऊन उत्तंकानें पुन्हां सौदासाकडे येऊन त्यास विचारलें कीं, 'तुझी माझी आतां मैत्री झाली आहे. तर तूं मला मित्रास योग्य असा सल्ला दे. माझें आतां इष्टकार्य झालें आहे व तूंही नरमांसभक्षक आहेस. अशा स्थितींत मी तुजकडे परत यावें कीं नाहीं, हें मला खरेंखरें सांग!' यावर सौदास म्हणाला कीं, 'खरें सांगावयाचें तर तूं मजकडे पुन्हां न येणें हेंच श्रेयस्कर आहे; येशील तर खास प्राणास मुकशील!' सौदासाचें हें म्हणणें मान्य करून मदयंतीनें सांगितल्याप्रमाणें आपल्या कृष्णाजिनांत दिव्य कुंडलें बंदोबस्तानें बांधून घेऊन उत्तंक चालूं लागला. चालतां चालतां वाटेंत त्यास भूक लागली. तेव्हां तें गांठोडें बिल्ववृक्षाच्या फांदीस बांधून तो वर चढला व बेलफळें काढून खालीं टाकूं लागला, पण त्यानें टाकलेलीं कांहीं बेलफळें त्याच्या गांठोड्यावर जोरानें पडल्यामुळें तें कुंडलांसह खालीं पडलें. लागलींच ऐरावत कुळांतल्या एका नागानें तीं कुंडलें घेऊन तोंडांत घातलीं व तो बिळांत पळून गेला! उत्तंकानें खालीं येऊन हातांत एक दांडकें घेतलें व त्यानें तें बीळ तो एकसारखें खणूं लागला. पस्तीस दिवसपर्यंत त्यानें असें केलें, तरी त्यास कुंडलें पळवून नेणाऱ्या नागाचा पत्ता लागला नाहीं. 'कांहीं झालें तरी कुंडलें परत मिळेपर्यंत उद्योग सोडावयाचा नाहीं. मग त्यांत मरण आलें तरी बेहत्तर' असें त्यानें ठरविलें, तेव्हां त्याचा असा निर्धार पाहून इंद्रानें आपल्या वज्राची सर्व शक्ति उत्तंकाचे दांडक्यांत घातली. तेणेंकरून त्याच्या प्रहारानें पृथ्वी विदीर्ण होऊन नागलोकाचा रस्ता त्यास खुला झाला. तेथील घरें सोनें, मोतीं व रत्नें यांचीं बनविलेलीं असून स्फटिकाच्या पायऱ्यांच्या विहिरीही होत्या. या नागलोकाचें महाद्वार तर शंभर योजनें लांब व पांच योजनें रुंद होतें! नागलोकांत आपण आलों, तरी आपलीं कुंडलें कोणत्या नागानें नेलीं, हें आपणांस कसें कळणार? अशी विवंचना उत्तंक करीत आहे, तोंच तेथें एक पांढऱ्या शेपटीचा काळा घोडा आला. त्याचें तोंड व डोळे हे लाल असून तो अत्यंत तेजस्वी होता. हा त्याच्या गुरुजींनींच प्रज्वलित केलेला पवित्र अग्नि असून तोच घोड्याच्या रूपानें त्याच्या साहाय्यार्थ तेथें आला होता. त्याच्या सांगण्यावरून उत्तंकानें त्याच्या अपानद्वारांत फुंकावयास आरंभ केला. तेव्हां तो अग्नि अतिशय भडकला व घोड्याच्या रोमरंध्रांतून धुक्याप्रमाणें अतिशय दाट असा धूर निघूं लागला. हा धूर सर्व नागलोकभर पसरून नागांना कांहींच दिसेनासें झालें! तेव्हां ते सर्व उत्तंकास शरण आले आणि त्याचीं कुंडलें त्यास परत देऊन त्यांनीं त्यास प्रसन्न केलें. उत्तंकानेंही परत येऊन तीं दिव्य कुंडलें गुरुपत्नीस मोठ्या आनंदानें अर्पण केलीं.

---

# ५. अपरिचित शब्दांची सूचि.[1]





---

१. ह्या व पुढील परिशिष्टांतील प्रत्येक शब्दापुढचा पहिला अंक अध्याय व दुसरा अंक गीति यांचा दर्शक आहे.

# ६. संस्कृत व्याकरणानुसार शब्दयोजना.

# ७. श्लेषयुक्त स्थलांचा निर्देश.

# ८. एका गीतीच्या अर्थासंबंधीं चर्चा.

पंतांच्या काव्याच्या अनेकार्थत्वाविषयीं समजूत त्यांच्या हयातीपासूनच प्रचलित असून तिच्या संबधीं एक दंतकथाही प्रसिद्ध आहे, ती अशीः—पंतांच्या उपदेशावरून रामजोशीबोवांनीं आपल्या हातांतील डफ टाकून देऊन कीर्तन करण्यास सुरुवात केली. पुढें एकदां जोशीबोवांच्या अत्यंत आग्रहावरून पंत त्यांच्या कीर्तनास हजर होते. तेव्हां त्यांनीं पंतांच्या भारतांतील एका आख्यानावर कीर्तन चालविलें असतां एका गीतीचा एक कथानकपर व एक वेदान्तपर असे दोन अर्थ सांगितले व चटकन् पंतांच्या उदराकडे बोट करून म्हणाले, कीं माझ्या अल्पमतीस जे दोन अर्थ सुचले ते मीं सांगितले, पण ह्या विशाळ उदरांत आणखी किती अर्थ भरलेले असतील तें त्यांचें त्यांसच ठाऊक! अशा रीतीनें जोशीबोवांनीं पंतांच्या दोंदीलपणासंबंधीं विनोद करून त्यांच्या कवितेंत अर्थबाहुल्य असतें हें ध्वनित केलें, हें उघडच आहे.

आतां अगदीं बारकाईनें पाहिलें तर पंतांच्या कवितेंत श्लेषप्रयोगांचीं उदाहरणें अगदींच नाहींत असें नाहीं. परंतु जेथें श्लेष उत्तम प्रकारें साधून अर्थबाहुल्य साधलें आहे अशीं पद्यें फारच थोडीं आहेत. प्रस्तुत पर्वांत आम्हांस असें फक्त एकच पद्य (अध्याय ९।६३) आढळलें. ह्याखेरीज आणखी कांहीं पद्यांत श्लेष आढळतो, पण तो एकाद्या दुसऱ्याच शब्दावर आहे (परिशिष्ट ७ पहा). ह्यावरून पंतांची अर्थबाहुल्यासंबंधीं झालेली प्रसिद्धी ही केवळ अज्ञानानें व अंधपरंपरेनें झालेली आहे, हें स्पष्टच आहे.

वस्तुस्थिति जरी अशी आहे, तरी क्वचित् प्रसंगीं उपरिनिर्दिष्ट समजूत दृढ होण्यास कारणेंही घडतात व त्यामुळें १२५।१५० वर्षांपासून प्रचारांत असलेल्या समजुतीचा निरास न होतां वाचकांच्या मनोभूमींत तिची पुन्हां वाढ होऊं लागते. पुण्यपत्तनस्थ कांहीं पंतभक्तांनीं प्रस्तुत पर्वाच्या २५ व्या अध्यायाच्या ३५ व्या गीतीच्या उत्तरार्धाच्या अर्थासंबंधीं जी चर्चा केली आहे, ती अशा प्रकारच्या समजुतीस बळकटी आणणारी आहे. यासाठीं ती चर्चा आमच्या वाचकांच्या सोयीसाठीं येथें उद्धृत करीत आहों. ती त्यांस बरीच उद्बोधक होईल, असें आम्हांस वाटतें.

सदर्हू गीति अशी आहेः—

येउनि पुरासि अर्जुन, एकांतीं स्वगुरुला म्हणे, 'गुरुजी!।
स्मरती स्वरोक्ति तुम्हां मत्पंचप्राणपन्नगा! गुरु जी.?॥

(अ.) ह्या गीतीच्या अर्थासंबंधानें रा. **गो. कृ. मोडक** लिहितातः—

  

३. **संदर्भः**—द्रोणाजवळ अर्जुनाचा शस्त्राभ्यास चालू असतांना त्यानें वनामध्यें एकलव्य नांवाच्या भिल्लाची अपूर्व करामत पाहिली. या भिल्लानें द्रोणास गुरु मानिलें होतें. अर्जुनास

शस्त्रविद्येंत अद्वितीय होण्याची ईर्ष्या होती. तदनुरूप तो प्रयत्नशील असून, द्रोणानेंही त्यावर संतुष्ट होऊन त्याची इच्छा पुरविणारा असा वरही त्यास दिला होता. या वराचें स्वरूप [गीति] ३६ मध्यें [पुढें] सांगितलें आहे.

४. **वादविषयक आर्येचा सामान्य अर्थः**—अरण्यांतून परत येऊन अर्जुनानें एकांतांत द्रोणाचार्यांस विचारिलें, "तुम्हीं मला दिलेला वर तुम्हांला आठवतो ना?" इत्यादि. या आर्येंत 'मत्पंच–प्राण–पन्नगा–गुरु' अशी रचना आहे. ['काव्यसंग्रहां'तील व रा० पराडकर यांच्या] छापील प्रतींत **गुरु** हें पद व्यस्त लिहिलें आहे. पण हा असा पदच्छेद प्रमाण मानण्याचें कारण नाहीं. हा पदच्छेद पंतकृत नसून केवळ संपादकनिर्मित आहे. करितां अर्थसौष्ठवास्तव कोणासही तो बदलण्यास अधिकार आहे.

५. **दोन पदच्छेदः**—(क) 'मत्पंच-प्राण-पन्नगा ! गुरु' व (ख) 'मत्पंच-प्राण-पन्नगागुरु,' यांतील (क) पहिल्या पदच्छेदानुसार अर्थ–माझ्या पंचप्राण-वायूंना सर्पासारख्या भक्षण करणाऱ्या शिक्षका. (ख) दुसऱ्या पदच्छेदानुसार अर्थ–माझे पंचप्राण हाच (किंवा) हेच कोणी सर्प त्यांस अगुरु–चंदनाप्रमाणें असलेल्या. पहिल्या अर्थामध्यें द्रोणाचार्यांस अर्जुनाच्या प्राणांचा स्वाहाकार करणारा म्हणून वर्णिलें आहे. अर्थात् गुरुजींस शिष्याचा घातक म्हणून वर्णन करणें अत्यंत अप्रयोजक आहे. करितां हा अर्थ सर्वस्वी त्याज्य होय. दुसऱ्या अर्थामध्यें शिष्याच्या पंचप्राणांस सर्पांची उपमा दिली आहे व त्याच वेळीं गुरुजींस अगुरु (चंदनाची) उपमा दिली आहे. अगुरु हा उच्चप्रतीचा चंदन गणला जातो. सर्पजाति गंधप्रिय असल्यानें सर्पांनीं अगुरूचा आश्रय करणें सर्वथा योग्य आहे. करितां या दुसऱ्या अर्थांत शिष्यप्राणांस आधार म्हणून गुरुजींचें वर्णन असल्यानें, हाच अर्थ समर्पक ठरतो. प्राणपन्नगागुरु हें वर्णन कदाचित् 'स्ववरोक्ति' यासही लागूं शकेल. स्ववरोक्ति म्हणजे 'तुम्हीं दिलेला–बोललेला–आशीर्वाद.' येथें अर्जुन म्हणतो, "तुम्हीं दिलेला आशीर्वाद–तूं अद्वितीय योद्धा होशील–हा माझ्या प्राणांस आधारभूत आहे. माझ्या इर्ष्येस हा पोषक असल्यानें यावर माझ्या प्राणांची मदार आहे. अशा रीतीनें अगुरु-चें रूपक स्ववरोक्ति किंवा गुरुजी यांपैकीं कोणावरही यथारुचि कल्पावें. आर्यातींचें 'जी' हें पद संबंधी-सर्वनाम किंवा संबोधनार्थक अव्यय मानावें.

६. **अर्थनिष्कर्ष**—अर्जुनानें रानांतून परत येऊन द्रोणाचार्यांस एकांतांत म्हटलें, '(जी) अहो गुरुजी, सर्पाला अगुरुवृक्ष जसा आश्रय असतो. तसे तुम्ही माझ्या प्राणांना आहां. तुम्हींच मला दिलेला वर आठवतो ना? (तो खरा करण्याकरितां तुम्हीं एकलव्यास मजहून शस्त्रकौशल्यांत कमीच ठेविलें पाहिजे).

७. **अर्थविकल्पः**—अगुरूचें रूपक द्रोणावर किंवा वरोक्तीवर करावें, तसेंच 'जी' हें पद सर्वनाम किंवा अव्यय घ्यावें. अशा रीतीनें **येथें चार अर्थ संभवतील.** पैकीं 'जी स्ववरोक्ति ती तुम्हां सरती.' असा अन्वय **जी** सर्वनाम मानल्यास करावा लागेल. पण हा अन्वय योग्य नाहीं. कारण तेथील विशेषणवाक्यानें स्ववरोक्तीचे अर्थांत भर मुळींच पडत नाहीं. 'राम जो आहे तो लंकेस गेला' या वाक्यांत 'जो आहे तो' हे शब्द जसे निरर्थक तसेंच ते वरील वाक्यांत होत. तसेंच वरोक्तीस आधारभूत वर देणारी व्यक्ति असल्यानें वरोक्तीहून ती व्यक्तीच महत्तर

ठरणार; त्यामुळें अगुरूचें रूपक द्रोणावर करणेंच प्रशस्ततर होय. सारांश–अगुरूचें रूपक गुरुजींवर करावें व 'जी' हें अव्यय मानावें हेंच योग्य दिसतें.

( मतिविकास—वर्ष १ अंक ११, फेब्रुआरी १९३३ )

**( आ. ) रा. द. प. सहस्रबुद्धे यांनीं वर उद्धृत केलेल्या रा० मोडक यांच्या लेखावर केलेली चर्चाः—**

❀ ❀ ❀

वर शिरोभागीं उद्धृत केलेल्या आर्येंत वादाचा जो महत्वाचा मुद्दा आहे तो "मत्पञ्चप्राणपन्नगा-गुरु जी" या शब्दसमूहावर आहे. पराडकरप्रत–कीं जी सर्व प्रतींत श्रेष्ठ गणली जाते–त्यांत याचा 'मत्पञ्चप्राणपन्नगा गुरुजी' असा पदच्छेद केला आहे. कै० ज. बा. मोडक व वा० दा० ओक यांच्या प्रतींत व आणखी एक दोन प्रतींत हाच पदच्छेद आढळतो. या आर्येचा सर्वसाधारण अर्थ "माझ्या वायुरूपी पंचप्राणांना सर्पाप्रमाणें भक्षण करणाऱ्या शिक्षका !" असा केला जातो. हा अर्थ म्हणजे त्या त्या संपादकांनीं ओढून ताणून आणलेलें चंद्रबलच होय. हा अर्थ म्हणजे त्या आर्येची थट्टाच होय. एकतर गुरु व जी यांचा विनियोग अर्थसौष्ठवदृष्ट्या नीट होत नाहीं व दुसरें म्हणजे गुरुशिष्यांचें जें येवढें प्रेम, त्यास एकदम तिलांजली देऊन "शिष्याच्या नाशास कारणीभूत" असें गुरुजींचें वर्णन करणें हें केव्हांही गैरवाजवीच दिसणार आहे. हा अर्थबोध रा. मोडक त्याज्य ठरवितात हें सयुक्तिकच आहे; तरी देखील जर एकाद्यानें द्वितीय अर्धांत असलेल्या "गुरुजी" या पदाचा 'गुरु' म्हणजे मोठी, व 'जी' हें संबंधी सर्वनाम घेऊन, हें सर्व अर्जुनानें गुरुजींवर रुष्ट होऊन, 'जी मला अति महत्त्वाची वाटते ती आपली आशीर्वादवाणी आपणांस आठवते का' असा अर्थ केला तर "मत्पञ्चप्राणपन्नगा" याचा अर्थ "माझ्या पंचप्राणांना सर्पाप्रमाणें भक्षण करणाऱ्या" असा योग्यच होईल. कारण गुरूनें एकलव्यास अर्जुनाहून श्रेष्ठ करणें म्हणजे अर्जुनाचें एकप्रकारें प्राणहरण करणेंच होय. असा अर्थ केल्यास तो सार्थच होईल.

श्री. मोडक यांनीं "मत्पंचप्राणपन्नगागुरु" याचा पदच्छेद 'मत्पंचप्राणपन्नग' 'अगुरु' असा करून अगुरु ( म्हणजे उच्च प्रतीच्या चंदनाचा वृक्ष ) याचें रूपक द्रोणाचार्यांवर अगर वरोक्तीवर करावें व त्याप्रमाणेंच 'जी' हें संबंधी सर्वनाम अगर संबोधनार्थी अव्यय मानावें असें प्रतिपादिलें आहे. शेवटीं अर्थविकल्पांत ते म्हणतात कीं, 'जी' सर्वनाम घेतल्यानें "जी स्ववरोक्ती ती तुम्हांस स्मरती ?" असें 'जो राम आहे तो लंकेस गेला' याप्रमाणें निरर्थक सर्वनाम होईल. त्याचप्रमाणें अगुरूचें रूपक वरोक्ती किंवा द्रोणाचार्य यांजवर करावयाचें तेव्हां वरोक्तींस आधारभूत व्यक्तीच असल्यामुळें ती महत्तर ठरणार. तेव्हां अगुरूचें रूपक द्रोणाचार्यांवरच करावें हें योग्य होय. असें म्हणून विकल्पामुळें उत्पन्न झालेल्या चार अर्थांपैकीं अर्जुनानें रानांतून परत येऊन गुरुजींस एकांतांत म्हटलें ( जी ) अहो गुरुजी, सर्पाला अगुरु वृक्ष जसा आश्रय असतो तसे तुम्हीं माझ्या प्राणांना आहां. तुम्हीच मला दिलेला वर आठवतो, हा अर्थ कायम ठेवला आहे.

अगुरूचें रूपक योग्य कसें तें सांगतांना ज्याप्रमाणें अगुरु हा सर्पाचा आधार त्याप्रमाणें शिष्य–प्राणांस आधार असें गुरुजीचें वर्णन करणें योग्य होईल असें ते म्हणतात. वरोक्तीवर

रूपक करतांना तुम्ही दिलेला आशीर्वाद माझ्या प्राणांस आधारभूत आहे. माझ्या ईर्ष्येस तो पोषक असल्यामुळें यावर माझ्या प्राणांची ( ज्याप्रमाणें सर्पांची अगरूवर त्याप्रमाणें ) मदार आहे." असा युक्तिवाद त्यांनीं केला आहे.

**या अर्थावरील आक्षेपः—**

( १ ) द्वितीय आर्यार्धातील शेवटचें पद 'जी' याचा उपयोग संबोधनार्थी अव्यय असा केल्यानें वरील अर्थातील 'गुरुजी' याचें काय करावयाचें? अर्जुनानें वर स्पष्ट "गुरुजी" म्हणून द्रोणास हांक मारली असतां 'जी' यास संबोधनार्थी अव्यय मानून पुनरुक्तीचा दोष कां प्राप्त करून घ्या?

( २ ) असा साधा अर्थ घेतल्यास "एकांतीं" या शब्दाची जरूरी काय? एकलव्यास पाहून अर्जुनास विषाद, दुःख व गुरूचा राग आला होता. हा राग मोरोपंतांनींच ३७ व्या आर्येत 'सत्य असावा जगांत बोल तुजा' या वचनानें व्यक्त केला आहे. शिष्यानें—नव्हे प्रियशिष्यानें गुरुजीस हें टाकून बोलण्यासारखेंच आहे, हे शब्द त्यास राग अनावर झाल्यामुळेंच त्याच्या तोंडून बाहेर पडले आहेत. तेव्हां हे अपमानकारक शब्द इतर शिष्यांनीं ऐकूं नयेत म्हणूनच अर्जुन गुरूस एकांतांत बोलला असला पाहिजे. श्री. मोडक यांच्या अर्थानें 'एकांतीं' चें अर्थसौष्ठवदृष्ट्या काय महत्व उरतें?

( ३ ) १ मध्यें जी 'जी'ची ओढाताण होत आहे ती अगुरूचें द्रोण अथवा वरोक्ति यावर रूपक करण्याच्या हेतूनेंच. सर्प चंदनावर सुवासाच्या मधुमोहानें बसतात, त्यांना तो वृक्ष 'आधार-प्राणाधार' असतो काय? तेव्हां गुरुजीवर अर्जुनाचे प्राण आधारभूत नव्हते, किंवा असले तरी "गुरुजींचा फायदेशीर आशीर्वाद" यामुळेंच असा अर्थ धरून अर्जुनाचा स्वार्थ प्रेरित करावयाचा काय?

( ४ ) अर्जुनास गुरूचा राग आला होता हें स्पष्ट असतां या अर्थानें त्याचा क्षत्रियललामभूत बाणेदारपणा खुलून दिसावयाच्या ऐवजीं नेभळटपणा दिसून येतो.

तिसरा अर्थ जो मी दाखविणार आहें त्यांत 'गुरु जी' असे दोन छेद करून गुरु हें वरोक्तीचें विशेषण समजावयाचें. गुरूची वराबद्दलची उक्ती शिष्यास महत्वाची वाटणें हें श्रेयस्करच आहे. "जी" हें संबंधी सर्वनाम घेतल्यानें येथें उक्तीचा 'गुरु' या विशेषणानें गुणच दाखविला असल्या मुळें 'जो राम आहे तो लंकेस गेला' याप्रमाणें 'जी' चा विनियोग येथें निरर्थक ठरणार नाहीं. तेव्हां येथपर्यंत जी वरोक्ति मला महत्वाची आहे ती तुम्हांस आठवते काय? असा अर्थ होईल. आतां 'मत्पंचप्राणपन्नगा' याचा अर्थ कसा करावयाचा तें पाहूं. पन्नग म्हणजे सर्प. येथें अर्जुन 'मत्पंचप्राणपन्नगा' म्हणून संबोधीत आहे आणि याचा अर्थ 'माझ्या पंचप्राणरूपी ठेव्यास जपणाऱ्या सर्पा' असा होतो. द्रोणाचार्यांस अर्जुनानें सर्पाची व आपणास ठेव्याची उपमा दिली आहे. तेव्हां शेवटीं—

"अर्जुनानें नगरांत येऊन गुरुजीस एकांतांत 'गुरुजी' म्हणून हांक मारून म्हटलें, 'ज्याप्रमाणें एकादा भुजंग जमिनींत पुरून ठेवलेल्या ठेव्याचें रक्षण करतो त्याप्रमाणें आपण माझें रक्षण करीत आहां; त्या तुम्हांस मला जी महत्वाची ती आपली वरवाणी आठवते काय?" असा अर्थ निष्कर्ष

होतो. यांत व्याकरणदृष्ट्या दोष नाहीं. त्याचप्रमाणें कोणत्याही शब्दाची विनाकारण पुनरुक्ति नाहीं; 'मत्पञ्चप्राणपन्नगा' हें जरी द्रोणाचार्यास संबोधून म्हटलें असलें तरी तें अर्थपरिप्लुतच आहे. एकलव्यास आपणाहून श्रेष्ठतर पाहून त्याचा मत्सर, आपणाविषयीं अनुकंपा व गुरुजींबद्दल क्षोभ वाटणें त्यास साहजिक आहे; व या सर्वांस जबाबदार द्रोणाचार्य म्हणून सर्वांचें खापर त्यानें त्यांच्याच डोक्यावर फोडलें हें न्याय्यच आहे. त्यांतच 'मत्पञ्चप्राणपन्नगा' यांतील गुरूस सर्पाची व आपणास ठेव्याची उपमा किती सार्थकतेनें दिली आहे! द्रुपदानें केलेला अपमान द्रोणाचार्यांस सारखा बोंचत होता. त्यांनीं द्रुपदावर सर्पाप्रमाणें दंश धरला होता; व या अपमानाचें शल्य त्यांस अर्जुनाकडून काढावयाचें होतें. (गीति ४४-४५) तेव्हां अर्जुन हा त्यांचा सूडाचा केवळ आधार म्हणून त्यांनीं त्यास एकादा नाग जमिनींत असणाऱ्या संपत्तीचा दक्षतेनें सांभाळ करतो त्याप्रमाणें सांभाळावें हें योग्यच होय. तेव्हां अर्जुनानें द्रोणास "मत्पञ्चप्राणपन्नगा" असें म्हटलें त्यांत कितीतरी स्वारस्य आहे. "अहो गुरुजी, ज्या अर्जुनाकडून आपण सर्पाप्रमाणें दंश धरलेल्या द्रुपदाचें पारिपत्य करणार आहांत, तो अर्जुन जर नाहींसा झाला, तर "युष्माच्चिंतित कार्य आपण सिद्धीप्रत कसें नेणार?" असा समयोचित व वीरास साजेल असाच खोंचदार प्रश्न अर्जुनानें द्रोणाचार्यांस विचारला आहे व गुरु-शिष्य ह्या नात्यानें या प्रश्नास एकांताची जरूरी पाहिजे हें उघडच आहे. तेव्हां वाचकांनीं अर्थसौष्ठवदृष्ट्या वरील अर्थ सरस कीं नीरस याचा विचार करावा. (साप्ताहिक ज्ञानप्रकाश, तारीख १०-९-३३).

**(इ.) वरील चर्चेस रा० गो. कृ. मोडक यांचें प्रत्युत्तरः—**

  

आदिपर्व अ. २५ आ. ३५ या आर्येचा अर्थ (क) मत्पञ्चप्राणपन्नगा गुरु असा पदच्छेद घेऊन 'माझ्या जीवितास सर्पाप्रमाणें असलेल्या (गुरो)' असा करण्यांत येतो. हा अर्थ मीं अयुक्त मानून पुढीलप्रमाणें नवीन अर्थ सुचविला. (ख) 'माझ्या जीवितरूप सर्पास चंदनाप्रमाणें आधारभूत (असलेल्या गुरो)' (अगुरु=चंदनवृक्ष) या अर्थास अनुसरून केलेला पदच्छेद आर्येंत दिलाच आहे. यावर १०-९-३३ च्या ज्ञानप्रकाशांत रा. द. प. सहस्रबुद्धे यांनीं मुद्रित पुस्तकांतील पदच्छेदानुरूप 'गुरु' हें पद पृथक् घेऊन अर्थ केला आहे. तो असाः—'मत्प्राणरूपी ठेव्याला सर्पाप्रमाणें जपणाऱ्या गुरो!' या त्रिविध अर्थांतील गुरुलाघवाविषयीं विचार येथें करूं. रा. सहस्रबुद्धे यांनीं रा. मोडकांच्या अर्थावर घेतलेले **आक्षेप व त्यांचें खंडनः**-(१) **जी** गुरुजी-हा प्रयोग द्विरुक्तिदूषित आहे. 'जी' हें संबोधनार्थक अव्यय नको. **खंडनः**-'अहो गुरुजी' हा प्रयोग निर्दोष आहे. अहो याचे स्थानीं **जी** येऊन 'जी गुरुजी' असा प्रयोग उत्पन्न होतो. गुरुजी यांतील 'जी' **प्रत्यय** आहे. अर्थातच स्वतंत्र शब्द अव्यय नाहीं. करितां **जी गुरुजी** या प्रयोगांत 'जी' या अव्ययाची द्विरुक्ति नाहीं. म्हणून पुनरुक्तिदोष येत आहे. (२) अर्जुनानें गुरूची गांठ एकांतीं घेतली. त्यांत रा. मोडकांचा अर्थ घेतल्यास **एकांतीं** पद व्यर्थ ठरतें. **खंडनः**-अर्जुनास दुसऱ्या शिष्याबद्दल, अर्थात मत्सरयुक्त बोलावयाचें असल्यानें त्यास एकांत अवश्य होता. (३) रा. मोडकांच्या अर्थात **जी** या पदाची ओढाताण होते. **खंडनः**-पहिल्या आक्षेपाचें खंडन पहावें. (४) रा. मोडकांच्या अर्थात अर्जुनाचे अंगीं नेभळटपणा चिकटतो. **खंडनः**-वीर कितीही बाणेदार

असला तरी पूज्यतम अशा गुरूशीं बोलत असतांना त्याच्या तोंडची नम्र भाषा अधिकच खुलून दिसते. विनय शिष्याच्या तेजस्वितेस विरोधी नाहीं.

३. **अर्थान्तरावर आक्षेपः**—मत्पञ्चप्राण **निधिपन्नगा** या पदाचा अर्थ 'माझ्या जीवितरूपीं निधीस सर्पाप्रमाणें ( असलेल्या ).' निधीशीं सर्पाचें नातें कोणतें? रक्षकाचें. अर्थात 'माझें जीवित' यास जर निधी मानलें, तर तुम्ही त्याचे सर्प म्हणजे रक्षक ठरणार; येथील हा समासाचा अर्थ रा. सहस्रबुद्धे यांस विवक्षित आहे व निर्दोषी आहे. मात्र एकच वैगुण्य कीं, यांतील 'निधि' हें पद मूळ आर्येंत नाहीं. त्यामुळें 'पन्नग' चा अर्थ रक्षक ठरत नाहीं. प्रचलित अर्थ त्याज्य आहे हें उघडच आहे. **उक्तानुक्त रूपकः—कथासरित्सागर** याचा अर्थ कथारूपी नद्यांस सागराप्रमाणें; नद्यांस सागर काय असतो? एकत्र मिळण्याचें ठिकाण. अर्थात विवक्षित ग्रंथ कथांचें एकत्र येण्याचें स्थान आहे असा अर्थ येथें निघतो. एकत्र मिळण्याचें स्थान म्हणजे संग्रह. **कथांचा संग्रह** असें सरळ न म्हणतां 'कथांचा तो संग्रह होय, कीं जो नद्यांचा समुद्र.' कथांवर नदीचें रूपक. 'तो'वर समुद्राचें रूपक. अशा रीतीनें रूपकाचा आश्रय करून एका वस्तूचें दुसरीशीं नातें कवी वारंवार व्यक्त करितात. 'दुर्जनसंगति शीलाचा नाश करणारी आहे' अशी विवक्षा असतां, निसर्गातील नाश्यनाशकांची जोडी कवी घेतात व एका वस्तूवर नाश्याचें व दुसरीवर नाशकाचें रूपक करितात. मस्त हत्ती झाड मोडितो, हें प्रसिद्धच आहे. ही गोष्ट लक्ष्यांत घेऊन दुर्जनसंगतीचें वर्णन शीलशाखिमदद्विपः असें कवी करितात. यांत मदद्विपः असा नाशक असा स्वतंत्र नाहीं; वृक्षासंबंधानें तो नाशक आहे. म्हणून अशा ठिकाणीं शाखिन्‌चा आरोप 'शील'वर करणें अवश्य आहे. शीलमदद्विपः एवढ्या समासानें निर्वाह व्हावयाचा नाहीं. याचप्रमाणें रा. दत्तोपंतांचा अर्थ व्यक्त होण्यास 'प्राण—निधिपन्नग' असा समास पाहिजे. यांत 'निधि' पद नसल्यास प्राण आणि सर्प यांचें सरळ नातें मनांत येणारें हें नातें कोणतें? प्राण वायुरूप असतो एवढेंच नव्हे. प्राण म्हणजे वायूच असा, व सर्पास पन्नगाशन हा शब्द लावण्यांत येतो; अर्थात प्राणपन्नग म्हणजे 'प्राण पिणारा', त्याचा घात करणारा हा अर्थ येथें संभवणार. प्रचलित अर्थाहून निराळा अर्थ लेखक काढूं पाहतात; पण तो अर्थ निधिपदाभावीं शक्य दिसत नाहीं.

५. **रूपक शब्दविचारः**—पुष्कळ ठिकाणीं एकादा शब्द वारंवार रूपकांत येत असल्यानें त्यासंबंधीं रूपक अनुरूप असतें. अत्यंत बुद्धिमान अशा प्रधानास बुद्धिजलसागर असें म्हणतां येईल. सागर हा सांठा खरा, पण जलाचा. वाटेल त्या वस्तूचा नव्हे. तेव्हां एकाद्या वस्तूचा मोठा सांठा कवीच्या भाषेंत सांगावयाचा असल्यास त्या वस्तूवर पाण्याचें रूपक करावें व सांठ्यावर सागराचें; परंतु सागर हा शब्द मध्यगत जलरूपकद्वारा सांठ्याचा वाचक अनेकवार योजण्यांत येतो. त्यामुळें सागर शब्द उच्चारतांक्षणींच संदर्भानुरूप **समुद्र** ही कल्पना मनांत न येतां संचय एवढीच कल्पना मनांत येते. म्हणूनच **बुद्धिसागर**, ( यस्य ) **ज्ञानदयासिन्धोः** इत्यादि प्रयोग करण्यांत येतात. सर्प निधीस जपतो तशी माता मुलास जपते हें साम्य लक्षांत आणून मध्यगत रूपक गाळून ( म्हणजे-शिशुनिधिपन्नगी माता असें न म्हणतां ) **शिशुपन्नगी माता** एवढेंच म्हटल्यास त्याचा अर्थ पोरांना खाणारी, दंश करणारी, घातक माता असाच मनांत येईल. कारण पन्नग शब्दाचा अर्थ रक्षक असा होण्यास एतदर्थानें युक्त अशीं रूपकें,

भार्येत असल्यास, फारच विरळा असतील. सागर शब्द प्रभूत प्रयोगामुळें संग्रहाचा वाचक बनला आहे; पण अशा प्रयोगाचे अभावीं 'पन्नग' शब्द 'रक्षक' असा अर्थ व्यक्त करूं शकत नाहीं. एकाद्या शब्दास लाक्षणिकअर्थ प्राप्त होण्यास प्रयोगबाहुल्य आवश्यक आहे. अशा रीतीनें लेखकाचा अर्थ वर्तमानपदांतून निघत नाहीं. माझ्या प्राणाचा पन्नग म्हणजे माझ्या प्राणाचा रक्षक असा अर्थ ज्यांच्या मनांत पठनसमकालीं स्फुरेल त्यांनीं लेखकाचा अर्थ ग्राह्य मानावा.

( साप्ताहिक ज्ञानप्रकाश, तारीख १७-९-३३ )

**(ई.) रा. दामोदर विनायक जोशी यांनीं रा. मोडक व रा. सहस्रबुद्धे यांनीं प्रदर्शित केलेल्या अर्थांचें समालोचन करून स्वतःचें मत प्रकट केलें आहे तें:—**

  

आर्याभारत आदिपर्व २५-३५ या आर्येंत वादाचें वादळ 'मत्पञ्चप्राणपन्नगा' व 'गुरु' या दोन शब्दांवरून उठलें आहे. तेव्हां आपण रा. मोडक व रा. सहस्रबुद्धे या दोघांचें याविषयीं म्हणणें पाहूं.

**रा. मोडक यांचें म्हणणें:**—( १ ) 'मत्पञ्चप्राणपन्नगागुरु' असा एक सामासिक शब्द मानावा, व त्याचा पदच्छेद 'पन्नग+अगुरु ( चंदन )' असा करून तो सबंध शब्दसमूह 'गुरुजी'चें संबोधन समजावा किंवा 'स्ववरोक्ति'चें विशेषण मानावा. ( २ ) द्वितीयार्धांतील 'जी' हें गुरुजीचें संबोधन वा 'स्ववरोक्ति'चें संबंधीसर्वनाम समजावें. परंतु यांपैकीं रा. मोडक यांनीं 'मत्पञ्चप्राणपन्नगागुरु' हा सबंध शब्दसमूह व 'जी' हीं 'गुरुजी' या शब्दाचीं संबोधनें समजावीं असेंच आपलें व्यक्तिशः मत दिलें आहे.

**रा. सहस्रबुद्धे यांचें म्हणणें:**—'मत्पञ्चप्राणपन्नगा' हें 'गुरुजी'चें संबोधन मानावें. 'गुरु' व 'जी' हीं 'स्ववरोक्ति'चीं अनुक्रमें विशेषणें व संबंधीसर्वनामें मानावीं. म्हणजे अर्जुनाच्या कविताबद्ध बोलण्याचा अन्वय—

'मत्पञ्चप्राणपन्नगा ! गुरुजी ! जी गुरु स्ववरोक्ति ( ती ) तुम्हां स्मरती ? ॥ ( स्मरते काय )' असा होतो.

**निष्कर्ष:**—पंतांचें कथाकथनचातुर्य व संभाषणग्रथनकौशल्य अप्रतिम होतीं. त्यांनीं दिलेलीं संभाषणें वाचतांना वाचकांच्या नेत्रांसमोर त्या व्यक्ति प्रत्यक्ष उभ्या राहतात. त्यांच्या इतर कवितांतील संभाषणवर्णनावरून पाहतां रा. सहस्रबुद्धे यांनीं दिलेला अर्थच जास्त समर्पक वाटतो. रा. मोडकांच्या म्हणण्याप्रमाणें अर्थ लावावयाचा म्हणजे **'केकावलीं'**तील केकांचा **'शंकरपर'** अर्थ लावण्यासारखें आहे. **पंतांच्या ध्यानीं मनीं नसतील असे अर्थ लावणें यापरता अनर्थ नाहीं.** रा. मोडकांच्या म्हणण्याप्रमाणें वर उल्लेखिलेल्या एकाच आर्येंत तीन संबोधनें मानावीं लागतील. त्यापेक्षां 'मत्पञ्चप्राणपन्नगा गुरुजी' याचा अर्थ-माझ्या पञ्चप्राणांचें **भक्षण** करणाऱ्या गुरो, असा न करतां 'माझ्या पञ्चप्राणांचें **रक्षण** करणाऱ्या गुरो' असा करावा म्हणजे झालें. अर्थात् पराडकरी प्रतींत **'भक्षण** करणाऱ्या गुरो' असा अर्थ दिला आहे, तो चुकीचाच आहे.

अर्जुनानें स्वतांच्या पञ्चप्राणांना ठेव्याची उपमा व त्याचें रक्षण करणाऱ्या द्रोणास सर्पाची उपमा दिली आहे, असें मानलें तरी हरकत नाहीं. पंतांनीं हीच उपमा आदिपर्वाच्या अठ्ठाविसाव्या अध्यायांतील अठ्ठाविसाव्या आर्येंत उपयोजिली आहे. ती आर्या अशी:—

परि जाणे द्रोणविदुरभीष्मकृपव्याळसन्निधानातें ।
बहु भी अंध खणाया त्या पांडुकुमारसन्निधानातें ॥

कणिकानें दुष्ट नीति सांगितल्यावर धृतराष्ट्राच्या मनांत पांडवांच्या नाशाची कल्पना आली. पण तो द्रोण, भीष्म, विदुर इत्यादिकांस भीत होता. वरील आर्येत द्रव्याच्या ठेव्याची उपमा पांडवांस व त्याचें रक्षण करण्यास सदैव तत्पर असणाऱ्या सर्पाची उपमा द्रोण इत्यादींस दिली आहे. यावरून सर्पासारख्या क्रूर प्राण्याची उपमा द्रोणादिकांस पंतांनीं दिली असली, तरी वाईट वाटण्याचें कारण नाहीं. एवंच पराडकरी प्रतींतील अर्थविषयक टीपेंत 'भक्षण'च्या ऐवजीं 'रक्षण' असा बदल करून घ्यावा म्हणजे झालें. ( साप्ताहिक ज्ञानप्रकाश, तारीख ८–१०–१९३३ ).

**( उ. ) 'पंतांचा एक अनन्य भक्त' या टोपण नांवानें प्रसिद्ध झालेला आणखी एक लेखः—**

  

रा. मोडकांच्या म्हणण्याप्रमाणें या आर्येचा अर्थ केल्यास 'गुरुजी,' 'मत्पञ्चप्राणपन्नगागुरु' असा एक सामासिक शब्द आणि 'जी' हीं तीन संबोधनें एकाच व्यक्तीस उद्देशून मानावीं लागतील.

'गुरुजी' हें एक संबोधन एका पदांत वापरून लगेच दुसऱ्या पदांतच केवळ यमक जुळविण्यासाठींच त्यांचे '( अ ) गुरु' व 'जी' असे समानार्थक भाग पाडून आर्या पुरी करतील इतके आर्यापति मोरोपंत यमकदरिद्री होते काय ? मुळींच नाहीं. पंत साधारणतः संस्कृत धर्तीवरच संबोधनाचीं रूपें वापरतात. तेव्हां त्या दृष्टीनें 'अगुरो' असें रूप असावयास पाहिजे होतें. पंतांनीं 'गुरुजी' हें यमक साधून पुढील गीति कशी लिहिली आहे ती पहाः—

'हाय' म्हणत दुर्योधन जाय द्रोणाकडे म्हणे, "गुरुजी ! ।
पार्थें खरी प्रतिज्ञा केली कीं, आजि ती तसी गुरुजी." ॥

( द्रोणपर्व, अध्याय १५ गीति ८६ )

पंतांनीं वापरलेल्या यमकांची पुनरावृत्ति कोठेंना कोठें तरी झालेली आढळते, तशी ती रा. मोडकांनीं कल्पिलेल्या यमकांची पंतांच्या काव्यांत कोठें झाली आहे तें त्यांनींच दाखवावें. रा. सहस्रबुद्धे व रा. जोशी यांचें म्हणणें जवळजवळ जुळतें आहे. प्रश्न एवढाच आहे कीं, 'प्राणपन्नगा' म्हणजे 'प्राणसर्पा' हें दुष्ट संबोधन द्रोणाचार्यास गौरवार्थीं लावावें कीं नाहीं. पण त्याचा विचार मी येथें करीत नाहीं. सदरहू गीतीचा निराळा अर्थ मला वाटतो तो असाः—

**माझें मत**–'मत्पञ्चप्राणपन्नगा' हें द्वितीया विभक्त्यंत नाम मानून त्याचा अर्थ 'माझ्या पञ्चप्राणरूपी सर्पाला' असा करावा, व 'गुरु' याचा अर्थ 'मोठी' किंवा 'महत्त्वाची ( स्ववरोक्ति )' असा समजावा. येथें अर्जुनानें स्वप्राणांस सर्पाची उपमा दिली आहे, ती त्याच्या मनांतील अर्थावर ज्यास्तच प्रकाश पाडणारी झाली आहे. कारण द्रुपदाबद्दल द्रोणाचे मनांत असलेला द्वेष अर्जुनाला माहीत असला पाहिजे. आपल्या शत्रूचा सूड घेण्यास हा शिष्य योग्य आहे, या भावनेनेंच द्रोणानें अर्जुनास धनुर्विद्येंत पारंगत केलें होतें. असें असतां द्रोणाच्या मनांत डांचत असलेली सूडाची भावना जागृत करण्यासाठीं व एकलव्य आपल्याहून वरचढ होणें चांगलें नाहीं हें सुचविण्यासाठींच अर्जुनानें वरील वाक्य उच्चारिलें होतें. सर्प सूड घेण्यासाठीं पुष्कळ वर्षें ( कांहींच्या

मतें १२ वर्षें ) टपून बसतो, अशी समजूत आहे. तेव्हां त्याची उपमा अर्जुनानें स्वप्राणांस दिली यांत कांहींच वावगें नाहीं, असें मला वाटतें. (साप्ताहिक ज्ञानप्रकाश, तारीख २९-१०-१९३३)

वर दर्शविलेल्या निरनिराळया अर्थांपैकीं कोणता अर्थ सरस आणि स्वाभाविक आहे, हें वाचकांनीं त्यांचें नीट मनन आणि परिशीलन करून स्वतःच ठरविणें इष्ट आहे.

प्रस्तुत पर्वांतील अध्याय २५ गीति २६ च्या पूर्वार्धाचा पदच्छेद पुढें दर्शविल्याप्रमाणें केल्यास अर्थनिष्पत्ति थोडी निराळी होते:—

पुरवी इष्ट सकळ ही न गुरु, ध्यानप्रभा, वनाचारीं ।
इच्छाफळें न तैसी कल्पलता जेंवि भावना चारी. ॥

**अन्वयः**—वनाचारीं सकळ इष्ट ही ध्यानप्रभा पुरवी, गुरु न [ पुरवी ].

**अर्थः**—वनाचार ( रानवट, रानटी ) जो निषादपुत्र एकलव्य त्याच्या ध्यानप्रभेनें त्याला सकळ इष्टप्राप्ति झाली, ती ( इष्टप्राप्ति ) गुरूची प्रत्यक्ष शरीरधारी मूर्ति देखील पुरवूं शकली नाहीं. हाच भाव अर्थान्तरन्यासानें उत्तरार्धांत स्पष्ट केला आहे:—जेंवि भावना अभ्यर्थी [ जनाला ] इच्छाफळें चारी ( चाखण्यास, आस्वादण्यास देई ) तैसी कल्पलता ( कल्पवृक्ष-येथें तत्सम गुरु देखील ) न [ चारी ] ( उपभोगार्थ देत नाहीं ).

वर दर्शविल्याप्रमाणें 'वनाचारीं' असा पाठभेद स्वीकारून पदच्छेद केल्यास अनुस्वार-व्यत्ययदोष उत्पन्न होतो, पण हा दोष पंतांच्या काव्यांत अन्यत्रही आढळतो. तेव्हां अर्थ सरस व सरळ होतो म्हणून तो दोष पतकरणें इष्ट आहे किंवा नाहीं, यासंबंधीं विद्वान वाचकांनीं विचार करावा.

अशा रीतीनें निरनिराळे पदच्छेद करून अर्थबाहुल्य साधतां आल्यास कोणत्या रसिक वाचकास आनंद वाटणार नाहीं ? पण सत्कवींच्या कृति छिन्नभिन्न करणें व त्यांचा ओढून ताणून कांहीं तरी अर्थ करणें हें समंजसपणाचें नव्हे. अशा प्रकारचे अर्थ करितांना कवीचा मूळ अभिप्राय किंवा अभिप्रेत अर्थ कोणता ह्या गोष्टीकडे दुर्लक्ष होतां कामा नये. तसेंच कवींच्या काव्यांत आपल्या शब्दयोजनेमुळें वा पदच्छेदामुळें व्याकरणविषयक दोष राहातां कामा नयेत. नाहीं तर—

[1]कृष्णानुजा सुभद्रा लग्नाला योग्य जाहली आहे ।
तीतें स्वमतें हलधर धृतराष्ट्रसुतासि द्यावया पाहे. ॥
( कृष्णविजय, अध्याय ८६ गीति २ )

ह्या पंतांच्या सोप्या पद्याची जशी ओढाताण झाली, तसा प्रसंग यावयाचा ! ह्या गीतीचे जे निरनिराळे अर्थ केले जातात ते पंतांचे हृद्गत अर्थ खात्रीनें नव्हेत.

कोणत्याही पद्याचे निरनिराळे अर्थ करितांना ते संदर्भानुसार असून स्वाभाविक असले पाहिजेत, हें सांगावयास नकोच.

---

१. ही गीति अगदीं सुगम असून तिच्या अर्थाविषयीं अत्यंत ओढाताण व्हावी हा मोठा चमत्कार होय. ह्या गीतीविषयीं निबंधमाला, अंक ५३ पृष्ठें ३०-३१, अंक ५८ पृष्ठें १६-१७ व अंक ५९ पृष्ठें ३१-३२ यांत पुष्कळ विवेचन केलेलें आहे, तें वाचकांनीं अवश्य पहावें.

# ९. अधिक टीपा.

| अध्याय | गीति | अर्थ | स्पष्टीकरण. | पृष्ठांक |
|---|---|---|---|---|
| १ | ३ | उ. | वेद हे परमेश्वराच्या श्वासापासून उत्पन्न झालेले, पण गणपति हा प्रत्यक्ष शंकराचा पुत्र. तेव्हां तो वेदांपेक्षां ज्यास्त बोलका असणें साहजिकच आहे. बोलका=वक्ता, वाग्मी. सांप्रत 'बोलका' ह्या शब्दांत थोडी निंदेची छटा मारिते, परंतु ती पंतांच्या वेळीं नसावी, असें वाटतें. 'बोल कानांहीं-बोलका नाहीं' हें पंताचें आवडतें यमक आहे ( वनपर्व, अध्याय ६।४९ व उद्योगपर्व, अध्याय ३।८९ पहा ). | २ |
| १ | २२ | उ. | ज्या शतसहस्र संहिता त्या त्या सुगुणें-करूनि ( त्यांतील प्रत्येकीच्या ठायीं असणाऱ्या उत्कृष्ट गुणांच्या योगानें ) श्रुति-गंगा-सुरभींच्या सौती ( सवती, प्रतिस्पर्धा करणाऱ्या ) [ होत्या, त्या ] सौती मुनीश्वरांला सांगे ( सांगता झाला )- असा अन्वय. वेद, गंगा व सुरभि यांच्या अंगीं असणाऱ्या गुणांहून संहितांच्या ठायीं गुणांचा प्रकर्ष विशेष आहे, असा ध्वनितार्थ. सारांश—संहिता ह्या श्रुतिगंगासुरभींच्या सवती होत अशी कल्पना करून त्यांचें श्रेष्ठत्व दर्शविलें आहे. वेद श्रवणपूत, गंगा निमज्जनपूत व सुरभि संकल्पपूत आहे. म्हणजे, हीं तीन्ही अनुक्रमें श्रवणद्वारा, स्पर्शद्वारा व मनोरथद्वारा मुमुक्षूस अभिप्रेत इष्टप्राप्ति करून देणारीं आहेत. महाभारताच्या संहिता देखील अशाच मोक्षद आहेत व परमेश्वरास स्वगुणोत्कर्षानें व गुणविशेषसमुच्चयत्वानें पहिल्या तीन सवतींस हार जाणाऱ्या नाहींत. कारण त्या तिहींचें सार-सर्वस्व संहितेंत आलें आहे-असा भाव. | ४ |
| २ | ११ | पू. | मूळ अध्याय ३ श्लोक १७ पहा. मूळांत 'पापकृत्याः' असाच शब्द आहे व त्याचा 'शाप' असा अर्थ नीलकंठानें टीकेंत दिलेला आहे. तो स्वीकारिल्यास 'हा तुला सर्व शापांतून मुक्त करील, परंतु फक्त शंकरानें दिलेल्या शापापासून तुझा बचाव करूं शकणार नाहीं'—असा अर्थ होईल. परंतु पापकृत्या=पापापासून उत्पन्न होणारी कृत्या, तामसी देवता, भयंकर आपत्ति-असा अर्थ घ्यावयास हरकत नाहीं. | |

| अध्याय | गीति | अर्थ | स्पष्टीकरण. | पृष्ठांक |
|---|---|---|---|---|
| | | | शंभूची कृत्या ( तामसी देवता ) जशी पापकृत्यपरिमार्जन-क्षम आहे, तसा माझा पुत्र ( सोमश्रवा ) तुझ्या अखिल पापकृत्यांचा परिहार करणारा आहे—असा सरळ अर्थ करावा. | ६ |
| २ | ४६ | उ. | 'पूर्वी'—गीति ४२ मध्यें जेव्हां धौम्यानें उपमन्यूस अश्विनीकुमारांची स्तुति करण्याची आज्ञा दिली, तेव्हां त्यांतच त्यांच्या निदेशानुपालनाची संमति अंतर्भूत झाली होती, असा ध्वनि 'पूर्वी' ह्या पदानें व्यक्त होतो. | १० |
| २ | ७१ | उ. | मूळांतील कथेस अनुसरून ह्या अर्धाचा पाठ पुढें दर्शविल्याप्रमाणें असणें इष्ट आहेः—<br>उत्तंकासि मुनिसत्या 'स्वीकारीं' म्हणति 'निजगुरु-स्त्रीतें'।<br>कारण—वेदगुरुजींकडे जनमेजय व पौष्य हे दोन राजे गेले व त्यांनीं गुरुजींस आपले उपाध्याय होण्याविषयीं विनवून व त्या बाबतींत त्यांची संमति घेऊन ते त्यांस आपल्याकडे घेऊन गेले. परगांवीं जातांना गुरुजींनीं उत्तंकाची अग्निकार्यादिकांकडे योजना केली आणि 'आपल्या घरीं जी कांहीं न्यूनता पडेल ती तूं पूर्ण करीत जा' अशी त्यास आज्ञा केली व ते परगांवीं निघून गेले. उत्तंक गुरुजींच्या आज्ञेस अनुसरून सेवा करीत गुरुकुलांत राहिला. ह्याप्रमाणें तेथें तो राहत असतां आश्रमांतील स्त्रियांनीं एकत्र जमून त्यास म्हटलें, कीं 'तुझी गुरुपत्नी ऋतुमती आहे आणि गुरुजी तर येथें नाहींत. तेव्हां तिचा ऋतु व्यर्थ जाणार नाहीं, असें कर. ती फार दुःख करीत आहे.' हें असलें भाषण ऐकून त्यास फार राग आला व त्यानें त्या स्त्रियांस सांगितलें, कीं 'मी असलें पापकृत्य करणार नाहीं. कारण, तूं अयोग्य कृत्य सुद्धां कर, असें गुरुजींनीं खात्रीनें मला सांगितलें नाहीं.' पुढें गुरुजी घरीं परत आल्यावर त्यांस हें वर्तमान कळलें. तें ऐकून त्यांस परम संतोष झाला. ( मूळ अध्याय ३ श्लोक ८२–८८ पहा ). | १३ |
| २ | १०० | पू. | क्षपणक=बुद्ध किंवा जैन भिक्षु. बौद्ध संन्यासी नागवे राहात असल्याचा कोठें उल्लेख आढळत नाहीं, पण जैनांचा पहिला धर्मोपदेशक नग्नदिगंबर मताचा उपदेश करीत असे. म्हणून क्षपणक म्हणजे जैनभिक्षु—असा अर्थ घेणें इष्ट आहे. | १६ |

| अध्याय | गीति | अर्थ | स्पष्टीकरण. | पृष्ठांक |
|---|---|---|---|---|
| ४ | १३० | पू. | अंगुष्ठोदरमितवपु–ते वालखिल्य इतके सूक्ष्मदेही होते, कीं त्यांची काया आंगठ्याच्या अंतर्भागानें ( उदर=आंतील गाभा, आंगठ्याचें तळहाताच्या बाजूनें दिसणारें उदरसदृश पेर ) मोजतां येत असे. | ४२ |
| ५ | ९८ | उ. | तो अवयव=मांडी. ह्या गीतीशीं कालिदासकृत 'विक्रमोर्वशीय' नाटकांतील पुरूरव्याची उक्ति ताडून पाहाण्यासारखी आहेः—<br>यदिदं रथसंक्षोभादंगेनांगं निपीडितम् ।<br>एकं कृती शरीरेऽस्मिन् शेषमंगं भुवो भरः ॥<br>( अंक ३–११ )<br>ह्याचा अर्थः–रथ वेगानें चालला असतां माझें जें अंग वरचेवर तिच्या ( उर्वशीच्या ) अंगास लागत होतें, तेंच एक या शरीरावयवांत धन्य होय; बाकीचीं केवळ भूमीस भारभूत होत ! | ५८ |
| ५ | १०७ | उ. | 'द्विजराज' व 'अंक' ह्या पदांवर श्लेष आहे. द्विजराज=( १ ) चंद्र; ( २ ) ब्राह्मणश्रेष्ठ. अंक=( १ ) डाग; ( २ ) लांच्छन, दोष. जरत्कारी म्हणतेः–तुम्ही ह्या अपवादाच्या योगानें चंद्रास हर्ष देणार, असें दिसतें–म्हणजे चंद्र कलंकयुक्त आहे, त्याच्याच जोडीस तुम्हीही बसणार ! | ५९ |
| ७ | ३३ | – | कल्पनासादृश्यः—<br>'.......... O wise and up-right judge ! How much more elder art thou than thy looks !<br>( Shakespeare–Merchant of Venice. ) | ६६ |
| ७ | ५७ | पू. | स्तवन करणाऱ्या 'वाग्दत्त' स्तुतिरूपी कन्येचें ग्रहण ( स्वीकार ) 'मनानें' अभिभावित होणारें असल्यामुळें तें पाणिग्रहण मानसिक म्हणजे मनानें स्वीकृत ( प्राप्त ) करून घ्यावें लागतें–स्तुति करणाऱ्याची वाणी जेव्हां अभिमत होते ( मनास रुचते ), तेव्हांच तिचा स्वीकार झाला असें म्हणतां येईल. सारांश–स्तुतीचा नवरा हो म्हणजे स्तुतीचा स्वीकार कर. स्तुति करणाऱ्याचें म्हणणें मान्य कर–असा भाव. | ६९ |

| अध्याय | गीति | अर्थ | स्पष्टीकरण. | पृष्ठांक |
|---|---|---|---|---|
| ८ | ३८ | – | मूळांतील पाठापेक्षां टीपेंतील पाठांतर ज्यास्त सरस व श्रवणसुभग दिसतें व पंतांच्या धाटणीस तें विशेष जुळतें. मूळ पाठांतील 'उतरण्याची कल्पना' ही हृद्य नाहीं. पाठान्तराचा अर्थः–मुनीनें दुःख जाणलें व नाहींसें केलें, इतकेंच नव्हे, तर तेथें कल्पद्रुमबीज पेरून भावी अभ्युदयाची व भविष्यकालीन 'भवाध्वश्रांतां'च्या दुःखनिवारणाची तरतूद लावून दिली. 'रे ! तें' व 'रेतें' असे शब्द दोन्ही अर्धांच्या शेवटीं समजावे. | ७४ |
| ९ | ३२ | – | कल्पनासादृश्याच्या दृष्टीनें ही गीति पंतांच्या उद्योगपर्वाच्या दुसऱ्या अध्यायाच्या ३१ व्या गीतीशीं ताडून पाहण्यासारखी आहे. | ८१ |
| ९ | ५१ | उ. | 'रिपु' याचा संबंध गीति ५० मधील 'ब्रह्मद्वेष्टा' ह्या पदाशीं आहे व 'ब्रह्मद्वेष्टा राक्षस' हा अर्थ येथें अभिप्रेत आहे. | ८४ |
| १० | ३३ | उ. | रागेली=रागेजलेली, रागानें व्याप्त झालेली. 'रागेजणें' हा शब्द रागाचें (क्रोधाचें) प्रकर्षत्व दाखवितो व त्याचा उपयोग विशेषणाप्रमाणें केला जातो. | ८९ |
| ११ | ८५ | उ. | 'सुदर्शन' ह्या शब्दावर श्लेष आहे. सुदर्शन=शुभ दर्शन; (२) विष्णूचें सुदर्शन नामक चक्र. | १०८ |
| १२ | ३९ | उ. | 'देव' ह्या शब्दावर श्लेष आहे. देव=(१) राजा; (२) देवता; (३) नवर–देव.<br><br>ह्या गीतीसंबंधीं ह. भ. प. रा० ल. रा. पांगारकर यांनीं केलेलें विवेचन मोठें मार्मिक आहेः—<br><br>"शकुंतला म्हणते, 'कण्वाच्या कारुण्यजळांत वाढलेलें मी कमळ आहें!' येणेंकरून तिनें कण्वाची वत्सलता व आपलें अनन्यपितृप्रेम व्यक्त केलें आहे. 'प्रार्थावें प्रणतपारिजातातें'–येणेंकरून 'मी स्वाधीन नाहीं, आपण खुद्द कण्वाशींच ही गोष्ट काढावी' असें शकुंतलेनें सुचविलें आहे व आपण कण्वाची प्रार्थना केली तर ती निष्फळ होणार नाहीं, असेंही 'प्रणतपारिजात' ह्या कण्वास लाविलेल्या विशेषणावरून ध्वनित केलें आहे! कण्व प्रणतांना कल्पवृक्षासा- | |

| अध्याय | गीति | अर्थ | स्पष्टीकरण. | पृष्ठांक |
|---|---|---|---|---|
| | | | रखे आहेत, ते आपली 'याञ्चा मोघ' होऊं देणार नाहींत. परपुरुष राजा विवाहाची गोष्ट काढणारा, तेव्हां शकुंतलेनें त्याच्या नाजुक प्रश्नास 'हांसुनि' उत्तर दिलें. यावरून तिची शालीनता व्यक्तच होत आहे. पण कण्वानें जर 'हें कमळ आपणास स्वयें वाहिलें' तर त्यांत मलाही आनंदच होणार आहे, असाही गर्भितार्थ 'हांसुनि' ह्या पदांत निघतो असें मला वाटतें ! कन्यादानांत 'देवा !' 'वारिज' 'वहावें' ह्या शब्दांत काय व्यंगयोक्ति आहे, हें कुलीन हिंदु कुटुंबीयांसच कळणार आहे. हें ध्वनिकाव्य असून यांत शब्दार्थाचें मांजुल्य अत्यंत आहे. उत्तम पद्य म्हणजे एक दिव्य सुमन आहे, त्याचा परिमळ सर्वेंद्रियांच्या द्वारें एकदम डोक्यांत शिरला, की रसज्ञ पुरुष आनंदानें वेडा होतो ! **पंतांचें भारत मूळाचें केवळ भाषांतर आहे कीं स्वतंत्र आहे याचा विचार करतांना पंतप्रतिभानिर्मित अशीं शेंकडों स्थळें [ त्यांत ] आहेत तीं आधीं पहावीं.** [ ह्या पद्यांतील ] पवित्र भावना मूळांत नाहीं व कालिदासाच्या जगत्प्रसिद्ध नाटकांतही नाहीं. पंतांची काव्यवाटिका अशा सहस्रावधि सुमनांच्या पवित्र परिमळानें दरवळली आहे." ( मोरोपंतांचें चरित्र, पृष्ठें ३१८–१९ ). | |
| | | | ह्या गीतींतील मूलभूत कल्पना 'या वारिजा तातें देवा ( देवतेस, पक्षीं–नवरदेवास ) स्वयें वहावें' अशी आहे. कन्या ही देया अर्थात् पितृहस्तें दान करण्यास योग्य असत्यामुळें तिचें दान अधिकृत व्यक्तीकडूनच झालें पाहिजे. कारण यजमानानें देवास फूल वाहिलें, तरच पूजेची विहित सिद्धि होते, त्याप्रमाणें कन्या ही नवरदेवास तातहस्तेंच अर्पण होणें उचित होय–हा इत्यर्थ. | ११५ |
| १२ | ४७ | उ. | तुझी माझी काया बाह्यतः जरी वेगळी दिसली तरी ती एकच आहे व त्यामुळें एकाच कायेच्या अंगप्रत्यंगांस परस्परांचा विसर पडणें अशक्य असतें, तद्वत् आपणा उभयतांना परस्परांचा विसर पडणें अशक्य आहे–असा भाव. | ११६ |

| अध्याय | गीति | अर्थ | स्पष्टीकरण. | पृष्ठांक |
|---|---|---|---|---|
| १२ | ५८ | पू. | राज्योचित=यौवराज्योचित, युवराजपद ग्रहण करण्यास समर्थ असा. "त्या कुमारास व त्यानें मनुष्याच्या आटोक्याबाहेर केलेल्या कृत्यांस पाहून कण्वऋषीनें शकुंतलेस म्हटलें, 'युवराज होण्याची याची वेळ आली'-" असें मूळांत आहे ( अध्याय ७४।८-१० )<br>दुष्यंतानें सभाप्रसंगीं शकुंतलेचा स्वीकार केल्यावर भरतास यौवराज्याभिषेक केला ( गीति ८९ ) त्या वेळीं त्याचें वय केवळ सहा वर्षांचें होतें, असें दिसतें. ( मूळ अध्याय ७४ श्लोक ५ व १२९ पहा ). | ११७ |
| १२ | ८५, ८६ व ८७ | – | ह्या तीन गीति एकत्र घेऊन त्यांचा अर्थ केला असतां तो अधिक खुलून दिसतो. मागें गीति ७९-८० मध्यें ज्या आकाशवाणीचा उल्लेख केला आहे, तींत दुष्यंतास शकुंतलेचा क्रोध शांत करण्यास सांगितलें आहे. तो कोप अनावर झाल्यास ती तुझें राष्ट्र भस्म करील, म्हणून तूं त्या पुत्रवतीला अनुरागयुक्त भाषणानें शांत कर ( गीति ८० ) असा इशाराही दिला आहे. गीति ८५ मध्यें दुष्यंत आपली तुलना कापसाशीं करून 'हे भीरु! तुझ्या कोपाग्नीस मी भ्यालों' अशी कबुली देतो, तेव्हां त्याच्या तोंडचें 'भीरु' हें शकुंतलेला लावलेलें विशेषण पाहून मोठी मजा वाटते. पुढें गीति ८६ मध्यें तिला पुन्हां 'भीरु, सुमुखि, सती' ह्या विशेषणांनीं गोंजारून ती 'विगतरागचेतसा' व्हावी ह्या उद्देशानें नलिनी व मित्र ( सूर्य ) यांचा संबंध कल्पून मित्राच्या आचरणामुळें ( उदय किंवा अस्त यांमुळें ) तिचें जें निमीलोन्मीलन ( मिटणें व उघडणें ) घडतें तें जणूं काय तिचा तो रुसवा किंवा प्रेमाच होय अशी कल्पना केली आहे. सारांश-दुष्यंत म्हणतो, कीं सूर्य हा नलिनीला वारंवार ( प्रतिदिनीं ) विरह घडविणारा व ताप देणारा असला तरी ती जेव्हां सूर्यावर रुसते तेव्हां तिच्या अंतर्यामीं 'स्वप्रेमभंग-भी' नसते काय? असा मार्मिक प्रश्न शकुंतलेला उद्देशून दुष्यंत करीत आहे. या प्रश्नाचें उत्तर अस्तिपक्षीं असून तो राग क्षणिक असतो, त्यांत मानखंडना गर्भित असते, | |

| अध्याय | गीति | अर्थ | स्पष्टीकरण. | पृष्ठांक |
|---|---|---|---|---|
| | | | पण त्या रागाच्या मागें वैयक्तिक अधिक्षेपयुक्त घृणा (वीट) उत्पन्न झालेली नसते, असा तो सतीचा सात्विक स्वरूपाचा आपल्या आवडत्या पतीवरील प्रणयकोप असतो. अर्थात् दुष्यंताच्या म्हणण्याचा आशय इतकाच, कीं सतींना आपल्या पतींवर रुसण्याचा विवाहप्राप्त हक्क आहे व तो त्यांनीं बजावण्यांत कांहींच अप्रयोजकपणा नाहीं, पण 'सुप्रेमभंग-भी' मनांत ठेवून, आपल्यावरील प्रेम कायम राहील अशा स्वरूपाचा तो आविर्भाव असावा, अशी खबरदारी मात्र घ्यावी. नाहींतर 'फुटलें मोतीं, तुटलें मन । सांधूं न शके विधाता' असा प्रसंग यावयाचा! गीति ८७ मध्यें शकुंतलेचा कंठ दाटून आला आहे, हें पाहून दुष्यंत त्या तिच्या मनःस्थितीचें इंगित जाणून तिला जवळ करीत आहे, हें योग्यच आहे. त्या ठिकाणची पंतांची शब्दयोजना व वर्णनशैली चेतोहर नाहीं, असें कोण म्हणेल? | १२१ |
| १२ | ९० | – | जेव्हां दुष्यंत राज्य करीत होता, तेव्हां त्याचे शत्रुपक्षीय राजे चंद्राच्या तेजापुढें नक्षत्रें क्षीणतेज होतात, त्याप्रमाणें उपेक्षणीय व डोळयांत न भरणारे वाटत. पण जेव्हां भरत राज्य करूं लागला तेव्हां सूर्योदयीं जसें नक्षत्रांचें अस्तित्व देखील नाहींसें होतें, त्याप्रमाणें त्याचे शत्रुपक्षीय राजे अस्तास गेले-असा भाव. दुष्यंतापेक्षां त्याचा पुत्र भरत ज्यास्त पराक्रमी होऊन गेला-हा इत्यर्थ. त्या गीतींत 'राजा' त्या शब्दावर **श्लेष** असल्यामुळें पुढील **रूपकें** परंपरेनें यावीं लागलीं आहेत, म्हणून हें **श्लिष्ट परंपरितरूपक** होय. | १२१ |
| १२ | ९१ | उ. | सूर्याची 'छवि' जेथें शिरूं शकत नाहीं अशा प्रदेशांत (पाताळांत) भरताचा प्रताप तळपत होता-असा ध्वन्यर्थ. | १२२ |
| १३ | २८ | उ. | विधि म्हणजे जपतपादिक विध्युक्त आचरण-असा अर्थ घेणें इष्ट आहे. [गीति १८-जप, गीति २७-यज्ञ आणि तप, व गीति २८-उग्र तप इत्यादि उल्लेख पहा]. विध्युक्त तपाचरणाचें फळ प्रतीपराजास मिळालें व वृद्धपणीं शांतनु नामक पुत्र जन्मास आला-असा भाव. | १२६ |

| अध्याय | गीति | अर्ध | स्पष्टीकरण. | पृष्ठांक |
|---|---|---|---|---|
| १३ | ६५ | — | गंगेचें दर्शन नूतन सुधेसारखें होतें. कारण अमृतसेवन मानवांस अमर करितें व स्वर्गास नेतें. म्हणून 'वसुधा सहसा न दिसों दे' हें विधान जसें विजेला तसेंच सुधेलाही लागू पडतें व कविचातुर्याची चमक आल्हादकारी वाटते. | १३१ |
| १३ | ८० | पू. | कल्पनासादृश्यः—'कर्मचांडाळापसि जातचांडाळ चांग' असें श्री[१]चक्रधरोक्त सूत्र आहे; व निषिद्ध कर्माचरणामुळें भ्रष्ट झालेल्या पुरुषापेक्षां जन्मचांडाळ बरा—असा त्याचा आशय आहे. | १३३ |
| १५ | १५ | — | येथील कथाभागाचा उल्लेख श्रीमद्भागवत, स्कंध ९ अध्याय २० श्लोक ३६–३९ यांतही आढळतो. | १४० |
| १५. | २३ | | कानीन पुत्र=कन्याया अनूढाया अपत्यं कानीनः=कन्यकाजात सुत. 'कानीनः कन्यकासुते कर्णे व्यासे'-इति हेमचन्द्रः। | १४५ |
| १७ | १३ | — | शाळापत्रक, पुस्तक ३ अंक ९ ( सप्टेंबर १८९२ ) यांत एका वाचकानें पंतांचीं कांहीं पद्यें 'शंका' ह्या सदराखालीं प्रसिद्ध केलीं आहेत. त्यांत ही गीति असून तिचा 'सुबोध व स्पष्टार्थ' त्यांस पाहिजे होता. तेथें ह्या गीतीच्या उत्तरार्धाचा पाठ पुढीलप्रमाणें दिलेला आहे:—<br>'जन करि बहु कर होतो, कां जाणसि आमुची न कोमलता.'<br>त्यानंतर सदर्हु मासिकाच्या चौथ्या पुस्तकाच्या पांचव्या अंकांत ( मे १८९३ ) 'शंकासमाधान' ह्या सदराखालीं रा. श. दा. आठल्ये यांच्या सहीनें जो मजकूर प्रसिद्ध झाला आहे, त्यांत प्रस्तुत पद्यासंबंधीं विवेचन केलेलें आहे तें असें:—'[ ह्या ] पद्यामध्यें "करि" असा पाठ आहे त्या ठिकाणीं 'कारिं' असा सानुस्वार शब्द पाहिजे व 'कर' शब्दाचा अर्थ 'किरण' मानिला म्हणजे कांहीं नड राहात नाहीं.'<br>परंतु हें स्पष्टीकरण आम्हांस समजलें नाहीं. सदर्हू पाठांत चुकून 'तरि' बद्दल 'करि' असें पडलें असावें. कारण | |

१ महानुभावपंथाचे प्रणेते श्रीचक्रधरस्वामीकृत आचारमालिकापाठ–संन्यासस्थळ यांतील हें सूत्र आहे. हा ग्रंथ अद्याप अप्रसिद्ध आहे.

| अध्याय | गीति | अर्ध | स्पष्टीकरण. | पृष्ठांक |
| --- | --- | --- | --- | --- |
| | | | 'करा'ची द्विरुक्ति करण्यांत कांहीं स्वारस्य दिसत नाहीं. गीति ११ मध्यें 'दुर्वासाचा वर अपयशानें कधींही मळत नाहीं' असें सूर्याच्या भाषणांत दिलें आहे व त्या दोषारोपजन्य मलिनत्वावर सूर्याचें उत्तर गीति १३ मध्यें दिलें आहे. सूर्य म्हणतोः—माझे कर ( किरण ) हे बंधुजनाच्या करस्पर्शासमान आहेत, मी विश्वबंधु आहें व जरी त्या करांची ( किरणांची ) चंडता व ताप हीं प्रसिद्ध असलीं तरी मी प्रणतजनांस कोमलस्वरूपी असतों. जर सर्वांस पावन करण्याचा गुण माझ्यामध्यें नसता, तर मी सहस्रहस्त कसा झालों असतों ? म्हणून माझ्याकडून मलिन कर्म होईल, अशी वृथा भीति तूं सोडून दे व जी माझी कोमलता अद्यापि तुला कळली नाहीं तिचा प्रत्यय तुला येऊं दे. सूर्याचे किरण प्रखर असले तरी तो मनाचा किती कोमल आहे, हें त्याच्या भाषणावरूनच सिद्ध होत आहे. | १५२ |
| १७ | ३१ | उ. | ज्याप्रमाणें हठयोगी योगसामर्थ्याच्या बळावर प्राण आकर्षण करून मरणसमय चुकवितात, पण यमास नमत नाहींत ( शरण जात नाहींत ) व लोकांत प्रथितयश होतात, त्याप्रमाणें हटी ( हट्टी, दुराग्रही ) शत्रु पांडूला वश न होतां मरण पतकरून कीर्ति संपादन करितात. एकांत मरण चुकविणें व दुसऱ्यांत शरणागति चुकविणें ह्या गोष्टी लक्ष्य समजाव्या व दोघांसही इष्ट अशी 'महितळीं महित' सिद्धि प्राप्त झाली, असा कवीचा भाव जाणावा. | १५४ |
| १७ | ३१ | – | ह्या गीतींत **अयुतावृत्ति आदिपदयमकें** आहेत. | १५४ |
| १९ | ११ | पू. | ह्या अर्धांत 'शापवचन' हें उपमेय, 'कज्जल' हें उपमान, 'मलिन करणें' हा सामान्यधर्म आणि 'जेविं' हें वाचकपद हीं उक्त आहेत, म्हणून ही **पूर्णोपमा** होय. | १६० |
| १९<br>,, | ९६ }<br>९७ } | –<br>– | गीति ९६ मध्यें अश्विनीकुमारांनीं माद्रीची 'हेमाद्री'शीं प्रशंसायुक्त तुलना केली व तिच्या संपूर्ण अंगप्रत्यंगींच्या 'सुवर्णत्वा'चें [ सुवर्ण=सोनें; सु-वर्ण=उत्तम कांति, सौंदर्य ] मापन केल्यास ती राशी हेमाद्रीस लाजवील, असा साभि- | |

| अध्याय | गीति | अर्ध | स्पष्टीकरण. | पृष्ठांक |
|---|---|---|---|---|
| | | | प्राय विनोद केला व गीति ९७ मध्यें माद्रीनें याकर जी उत्तरादाखल प्रतिकोटी केली, तिच्या योगानें तिनें अश्विनीकुमारांस प्रत्युत्तरानें जिंकलें व एकपरी त्यांच्यावर मात केली. हेमाद्री देऊनही हृद्रोग दूर होत नाहीं, तो ज्या औषधोपायानें जाईल, अशी योजना तुम्हीं देववैद्यांनीं करणें इष्ट आहे, असा माद्रीनें हांसून आपला भाव व्यक्त केला आहे.<br>ह्या गीतीस मूळांत आधार नाहीं (अध्याय १२४ पहा) पंतांच्या काव्यांत मार्दव, प्रसंगानुरूप्य आणि प्रागल्भ्य हीं ठिकठिकाणीं कशीं आढळतात, त्याचें प्रस्तुत स्थळ हें एक उत्तम उदाहरण आहे. | १६९ |
| २१ | १७ | उ. | पंकजांतरांत लीन झालेल्या भृंगाचा घात सूर्यास्तीं आपलीं दळें मिटून घेऊन व भृंगास निबद्ध करून ( आंत कोंडून ठेवून ) दुर्जात ( दुष्ट, द्वाड ) कमळें करितात, त्याच प्रकारें दुर्जात दुर्योधनानें विषाकुळ भीमास वल्लींनीं बांधून त्याचा घात केला. लीन भृंग तो भीम, दुर्जात पंकज तो दुर्योधन आणि निबंधन व निमज्जन तो घात होय. | १७५ |
| २३ | १९ | उ. | 'केला स्वरूपचि' ही कल्पना पंतांना तुकाराममहाराजांच्या पुढील उक्तीवरून सुचली असावी:—<br>"सद्गुरुवांचोनि सांपडेना सोय ।<br>धरावे ते पाय आधीं त्याचे ॥<br>आपणासारिखे करिती तत्काळ ।<br>कांहीं काळवेळ नलगे त्यांसी". ॥ | १८२ |
| २४ | ४ | उ. | येथें 'कापुस' ह्याचा लक्षणेनें 'कार्पासवस्त्र' असा अर्थ घेतल्यास उचित होईल व 'गतरंगसुगंध' हें विशेषण सयुक्तिकपणें जुळेल. | १८३ |
| २५ | ६ | — | तर्कशतें अगम्य असें स्वगुरूचें गमीरतर मनोगत अर्जुनाचें मन जाणत असे, कारण तें अर्जुन–मन गुरुचरणविरहानें लवही कर्कश झालें नव्हतें, तें आपला स्निग्धपणा राखून गुरूच्या मनोगताचें इंगित निसर्गप्राप्त हृदयग्राहकतेच्या बळावर आकर्षून घेत असे. तें हृदय 'कर्षक' होतें, 'कर्कश' | |

| अध्याय | गीति | अर्ध | स्पष्टीकरण. | पृष्ठांक |
|---|---|---|---|---|
| | | | नव्हतें, हें लगेच पुढील दोन गीतींत दाखवून अर्जुन कसा शहाणपणानें गुरूच्या मनांत शिरला, हें स्पष्ट केलें आहे. | १८९ |
| २५ | २० | उ. | कल्पनासादृश्यः—<br>संत उदार उदार । भरलें अनंत भांडार ॥<br>घातलें दुकान । देती आलियासी दान. ॥(तुकाराम)<br>पंत स्वकृत 'तुकारामस्तुतीं'त म्हणतातः—<br>विष्णुयशाचें घाली याया अमृता त्रपा दुकान तुका. ॥ | १९० |
| २६ | ८ | उ. | यांसि=भीम व दुर्योधन ह्या दोघांस.<br>गदाभ्रमणकालीं जीं तेजोवलयें भीमाच्या आणि दुर्योधनाच्या भोंवतीं प्रेक्षकांना दिसत, त्यांमुळें, त्यांचे पोषाख विष्णूच्या पोषाखाहून भिन्न होतें, तरी ते सूर्यध्यानसदृश दिसत—असा भाव. सूर्याचें ध्यानः—<br>ध्येयः सदा सवितृमंडलमध्यवर्ती<br>नारायणः सरसिजासनसन्निविष्टः ।<br>केयूरवान् मकरकुंडलवान् किरीटी<br>हारी हिरण्मयवपुर्धृतशंखचक्रः ॥ | १९६ |
| २६<br>,, | २५<br>३१ | –<br>– | येथील 'पृथाप्रियपुत्र' व 'पार्थ' ( पृथेचा पुत्र ) हे शब्द सहेतुक आहेत, असें दिसतें. कर्णानें मातृनामाच्या उल्लेखानें अर्जुनाचें कोमलत्व व रणभीरुत्व दर्शविलें आहे. | १९९ |
| २६ | ३३ | उ. | कोट्यवधि ( असंख्य ) मूर्ख लोकांस 'वांटून' ( अनेक मूर्खांचा मूर्खपणा वांटून एकत्र केला ) व त्या लगद्याचा जो एक पुतळा ब्रह्मदेवानें 'घडविला' तो तूं आहेस, असें अर्जुन कर्णास उद्देशून म्हणत आहे. | १९९ |
| २६ | ७७ | उ. | सूर्यानें अगदीं वेळेवर समयोचितपणें अस्तास जाऊन सर्वांचें कुशल केलें, पण आपल्या पुत्राची ( कर्णाची ) ओळख पटलेल्या कुंतीस मात्र सूर्यानें कुशल दिलें नाहीं. एकाद्या मिष्टान्नांत साखरच तेवढी घालावयाची राहिल्यास त्या मिष्टान्नाची जशी अवस्था होते ( तें नीरस किंवा बेचव लागतें ) त्याप्रमाणें तें रंगवृत्त तिला वाटलें. सूर्य हा कर्णाचा खरा पिता व कुंती ही खरी माता, पण परिस्थितीमुळें ही | |

| अध्याय | गीति | अर्ध | स्पष्टीकरण. | पृष्ठांक |
|---|---|---|---|---|
| | | | गोष्ट प्रकट केली गेलेली नसल्यामुळें तिचें (कर्णाच्या जन्मदात्या मातेचें) समाधान प्रत्यक्ष सूर्यही करूं शकला नाहीं; तिच्या हृदयांतील 'क्षत' तसेंच डिंवचत राहिलें व तें सूर्यास दूर करितां येईना-असा ध्वन्यर्थ. | २०५ |
| २७<br>,, | ५<br>६ | –<br>– | आपणच पुढाकार घेऊन द्रुपदास कर्णाच्या मदतीनें जिंकूं अशा धोरणानें पुढें सरसावून दुर्योधन द्रुपदनगरींत शिरला व त्याला जरी द्रुपद हा काळाप्रमाणें वाटला, तरी स्वसैन्याचा प्रवेश जयमूळासारखा (आगामी विजयसूचक) वाटला. अर्जुनानें दुर्योधनाच्या युक्तीस (गीति ४ पहा) अनुलक्षून द्रोणाचार्यांस म्हटलें, कीं माझें धनुष्य व कर्णादिकांचीं धनुष्यें हीं अत्यंत असदृश आहेत. अर्थात् शंकराचा नंदी व पृथ्वीवरील इतर बैल यांमध्यें योग्यतेच्या व प्रभावाच्या दृष्टीनें जसा फरक आहे, तसाच माझ्या व कर्णादिकांच्या धनुष्यांच्या प्रभावांत आहे. त्यामुळें द्रुपदाच्या पराजयाचें श्रेय माझ्या चापासच मिळणार, हें निश्चित आहे-असा भाव. या शिष्याचाचि एक शुचि चाप शुचि यशःपात्र [ आहे ]-असा अन्वय. | २०६ |
| २८ | १७ | उ. | ज्योतिष्यांचा उत्तरध्रुव म्हणजेच पुराणांतील मेरुपर्वत होय. | २१३ |
| २८ | २५ | | पंचतंत्रांतही हेंच राजकारणाचें तत्त्व सांगितलेलें आहेः—<br>येनकेनाप्युपायेन शुभेनाप्यशुभेन वा ।<br>उद्धरेद्दीनमात्मानं समर्थो धर्ममाचरेत्. ॥ | २१४ |
| २९ | २ | पू. | द्विपारिजातातें=सिंहाच्या कुळांत जन्म झाला आहे ज्याचा त्याला-असा अर्थ केला तरी चालेल. | २१४ |
| ३० | १० | पू. | 'पाथर' हा 'प्रस्तर' ह्या शब्दाचा अपभ्रंश होय. हा शब्द पंतांच्या वनपर्वांतही आढळतो (अध्याय ८।६ पहा). | २२६ |
| ३० | ५० | – | गीति ४९-५० यांचें 'युग्म' आहे. | |
| ,, | ,, | उ. | अर्जुन भीमास म्हणतोः-पथीं श्रमलासी (तुला प्रवासाचे श्रम झाले आहेत) [ म्हणून ] असदाश्रया तूतें बहु श्रम न | |

| अध्याय | गीति | अर्ध | स्पष्टीकरण. | पृष्ठांक |
| --- | --- | --- | --- | --- |
| | | | व्हाया ( न व्हावे म्हणून ) तुझियाचि दयेकरूनि यातूतें वधितों, तरि आज्ञा दे–असा अन्वय. | २३१ |
| ३१ | २ | पू. | हें अर्ध व्याकरणदृष्ट्या अशुद्ध आहे. रा. पराडकर यांच्या प्रतींत देखील असाच पाठ आहे. | |
| | | | जो ( व्यास )......चिंती, त्या तापहा व्यासें दर्शन देऊनि......निववला–असा अन्वय सरळ दिसतो. पण 'तापहा' बद्दल 'तापह' व 'निववला' बद्दल 'निववले' असें पाहिजे, कारण 'निववला' ह्याचा संबंध पांडुपुत्रांशीं आहे ( गीति १ पहा ) व व्यासांनीं त्या सर्वांनाच दर्शन दिलें होतें. तेव्हां हा पंतांचा किंवा त्यांच्या लेखकाचा हस्तदोष असावा. 'तापह' च्या ठिकाणीं 'तापहा' असें पंतांनीं यमक-पोषणार्थ केलें असावें, असें वाटतें. | २३३ |
| ३१ | ६ | – | खानदेशांतील एरंडोल हीच एकचक्रानगरी होय. अशी समजूत आहे. पण ती चुकीची आहे. ही नगरी मथुरेच्या आसपास असली पाहिजे. एरंडोलाजवळ पांडववाडा, भीम-कुंड इत्यादि पूर्वकालीन ठिकाणें आहेत. पण तीं पांडव वनवासांत असतां त्यांनीं तेथें केलेल्या वसतीचीं निदर्शक असावीं, हें संभवनीय आहे. | २३४ |
| ३१ | ३३ | उ. | ह्या अर्धांत **'आद्यंतयमक'** आहे. चरणाच्या किंवा अर्धाच्या आरंभीं व शेवटीं यमक साधिलेलें असलें, तर त्याला 'आद्यंतयमक' म्हणतात. | २३८ |
| ३१ | ५७ | पू. | कुंतीनें मोठी महत्वाची सल्लामसलत दिली म्हणून धर्मानें तिचें वर्णन केलें, तर त्यांत कांहीं आश्चर्य वाटावयास नको. परंतु कामधेनु सुद्धां कुंतीची प्रशंसा करील. कारण कामधेनु केवळ इच्छित वस्तु मात्र देते. क्षणिक उपयोगाच्या वस्तूं-पेक्षां चिरकालीन उपयोगाचें मार्गदर्शित्व श्रेष्ठ होय–हा ध्वन्यर्थ. | २४१ |
| ,, | ,, | उ. | जयांसि सुर भीती ( भयभीत होतात ) [ असे ] खळ ( दुर्जन ) तत्पुत्रांनीं ( कुंतीच्या मुलांनीं ) तरिच ( कुंतीच्या शिकवणीमुळें व तेजस्वीपणामुळें ) वधिले–असा अन्वय. | २४१ |

| अध्याय | गीति | अर्ध | स्पष्टीकरण. | पृष्ठांक |
|---|---|---|---|---|
| ३१ | ६० | उ. | भूक निवारण्याची त्वरा व अभिवृद्धी जशी बकासुराच्या बुक्यांमुळें झाली, तशीच ती कुरुकीर्तीच्या अभिवृद्धीस पोषक झाली–हा ध्वन्यर्थ. | २४२ |
| ३१ | ७२ | उ. | सदा=निरंतर, नित्य. राष्ट्राचा पालक बकराक्षस होता व त्याचें वेतन नित्याचें ठरलेलें होतें. म्हणून ही राष्ट्रापत्ति कायमचीच निवारावयास पाहिजे होती ( मागें गीति ३६ पहा ). | २४४ |
| ३३ | १७ | पू. | ‘थान’ ह्या शब्दाच्या ठिकाणीं ‘स्तन्य’ हा वृत्तानुकूल शब्द पंतांनीं योजिला असता, तर ग्राम्यत्वदोष दूर झाला असता, असें कोणासही वाटण्याचा संभव आहे. परंतु मातेचें दूध पिण्याच्या बाबतींत बालकास असलेलें स्वातंत्र्य हिरावून घेण्याचा अधिकार कोणासही नाहीं, हें मुख्यतः येथें दाखवावयाचें असल्यामुळें मातेची मूर्ति मनांत ठस-ण्यासाठीं दुधास आईच्या शरीरापासून वेगळें करणें इष्ट नाहीं कारण ‘स्तन्य’ हें वाटींत भरून ठेविलें असतां तें घरीं दारीं, रात्रीं–अपरात्रीं–केव्हांही सेवन करितां येईल, पण त्यामुळें दुग्धस्थानावर बालकाला जो हक्क सदैव बजा-वतां यावयास पाहिजे, त्यास अडथळा उत्पन्न होतो, म्हणून पंतांची शब्दयोजना समुचित मानावी लागते. | २५० |
| ३३ | ३३ | उ. | हरिसा=इंद्रासारखा–असा अर्थ करणें बरें. | २५२ |
| ३४ | ८ | पू. | अकृतान्ययत्न–ह्या पदांत ‘अविमृष्ट–विधेयांशत्व’ नामक दोष आहे. ‘एकाद्या पदांत विधेयाचा अंश जेव्हां अप्रधान असतो तेव्हां अविमृष्टविधेयांशत्व ( विधेयाच्या अंशाचा प्राधान्येंकरून निर्देश न करणें ) दोष होतो.’ ( काव्यदोष-दीपिका ). | २५७ |
| ३४ | २३ | पू. | मतंगज व गज हे शब्द एकाच अर्थाचे वाचक आहेत. ‘मतंगजो गजो नागः कुंजरो वारणः करी’ इत्यमरः । ‘वारणं प्रतिषेधे स्याद्वारणस्तु मतंगजे’ इति विश्वः । | २५९ |
| ३४ | ३० | – | ह्या गीतींतील यवन व ‘पाण्यांत दिसणें’ ह्या शब्दांच्या सान्निध्यामुळें महाराष्ट्राच्या इतिहासांतील पुढील गोष्टीचें | |

| अध्याय | गीति | अर्ध | स्पष्टीकरण. | पृष्ठांक |
|---|---|---|---|---|
| | | | स्मरण होतें:-अवरंगजेबानें संभाजीमहाराजांचा वध केला व राजाराममहाराज सिंहगडावर मरण पावले. यामुळें जेव्हां मराठ्यांचा पुरस्कर्ता कोणी नाहींसा झाला, तेव्हां संताजी घोरपडे व धनाजी जाधव या दोघां मराठे सरदारांनीं भगव्या झेंड्याचा अभिमान बाळगून अवरंगजेबाचा अंमल कोठें बसूं दिला नाहीं व त्यांनीं मोंगलांच्या लष्कराची पाठ पुरवून त्यांस अगदीं 'त्राहि त्राहि' करून सोडलें. तें इतकें, कीं जर एकादे वेळेस एकाद्या मोंगल सरदाराचा घोडा पाणी पिईनासा झाला, तर तो त्यास म्हणे, 'अरे! तुला पाण्यांत धनाजी दिसतो कीं काय?' | |
| | | | कदाचित् ही गीति रचितांना पंतांच्या मनांत मराठ्यांच्या पराक्रमाची ही गोष्ट घोळत असावी. | २६० |
| ३४ | ५४ | — | स्वतःचे हातपाय बांधून घेऊन प्राणत्याग करण्याच्या हेतूनें वशिष्ठ आपणांस मोठ्या नदींत (विपाशा नामक) बुडवून घेऊं लागला असतां त्याचें महत्तेज पाहून नदीच्या मनांत करुणा उत्पन्न होऊन तिनें त्याचे पाश तोडिले. ह्या कृत्यास उद्देशून पंत उत्तरार्धांत अर्थान्तरन्यासानें म्हणतात:-सुतेजा (तेजस्वी, प्रभावशील पुरुष) कोणास नकोसा वाटतो काय? त्याची प्राप्ति व्हावी म्हणून हृदयांत आशा धरून त्याच्या संरक्षणार्थ कोण उद्युक्त होत नाहीं? पतंगाच्या मनांत जी दीपाशा (तेजासक्ति किंवा दीप हस्तगत करून घेण्याची इच्छा) असते ती काय क्षुद्र समजावी? अर्थात् नाहीं. कारण तत्प्रीत्यर्थ पतंग अग्नीच्या ज्योतीवर मोठ्या धाडसानें उडी घालावयास तयार असतो. सारांश, थोर व्यक्ति किंवा महत्त्वाची वस्तु नकोशी कोणासही होत नाहीं. तिची प्राप्ति व्हावी म्हणून प्रत्येक व्यक्ति झटत असते-असा भाव. | २६४ |
| ३४ | ६९ | पू. | रविस रवी=सूर्याला प्रतिसूर्य. राहूनें पूर्णपणें ग्रासलेल्या सूर्याला त्या राहूचा नाश करणारा असा अद्भुत नवा रवी (प्रतिसूर्य) साह्यार्थ उत्पन्न व्हावा, तसा पुत्रशोकानें व्यापिलेल्या त्या वशिष्ठाच्या शोकाचा विनाश करणारा असा | |

| अध्याय | गीति | अर्ध | स्पष्टीकरण. | पृष्ठांक |
|---|---|---|---|---|
| | | | अपर पुत्रच शक्तिज पराशर (नातू) जन्मास येऊन वशिष्ठाच्या पुत्रशोकाला विसर पाडूं लागला—असा अर्थ. | २६७ |
| ३५ | २ | उ. | पांडवांस कुंभाराच्या छपरींत राहावें लागलें याबद्दल आश्चर्य प्रकट करून, पंत विमर्शयुक्त होऊन म्हणतातः— बुध हो! काळगतीकडे अवधान असूं द्या, तिच्या तडाक्यांतून कोणताही देश सुटला नाहीं. पृथ्वीवर असें एकही स्थान नाहीं, कीं जेथें 'रत्नगृहोचित पृथ्वीपतिसुत' ( पुढें गीति ३ पहा ) निरंतर समुचित गृहींच वास करितील. असा एकादा देश असेल अशी कल्पना मनांत आणून उगाच आपल्या मनाची फसवणूक करून घेऊं नका. | २७२ |
| ३५ | ८ | | कन्येच्या स्वयंवरानिमित्त मत्स्यभेदपण करण्याचा प्रघात प्राचीन काळीं बराच लोकसंमत होता, असें दिसतें. श्रीकृष्णाच्या अष्टनायिकांपैकीं एक श्रीलक्ष्मणा हिच्या स्वयंवरप्रसंगीं तिच्या पित्यानें हाच पण केला होता. ( पंतकृत कृष्णविजय, अध्याय ८३ गीति १७९–८० पहा ). ह्या पणासंबंधीं कांहीं कल्पना श्रीकृष्णदयार्णवस्वामीकृत श्रीहरिवरदा नामक श्रीमद्भागवताच्या टीकेंतील पुढील उताऱ्यावरून होईल.<br><br>श्रीलक्ष्मणा स्वस्वयंवरकथा द्रौपदीस सांगत आहेः—<br>अवो! पांचालराजतनये! । तव स्वयंवरीं जैसा माये ।<br>पार्थप्राप्तीचा उपाये । लक्षूनि यंत्र उभविलें. ॥ १ ॥<br>गगनचुंबित रोवूनि स्तंभ । तयाचे मूळीं स्थापूनि कुंभ ।<br>स्तंभावरी अत्यंत लांब । वंश स्वयंभ उभारिला. ॥ २ ॥<br>तया वंशाचिया अग्रभागीं । मत्स्याभास पार्थालागीं ।<br>अभेद्य पार्थाविण जो त्रिजगीं । स्वयें शार्ङ्गी निर्मवी. ॥ ३ ॥<br>बाह्यवस्त्राची जवनिला । यास्तव न लक्षे इतरां लोकां ।<br>यंत्रभेदनीं आवांका । नुपजे सकळिकां भूपाळां. ॥ ४ ॥<br>यंत्र भेदूनि पार्थवीरें । तुज जिंकिलें चमत्कारें ।<br>याहूनि दुर्घटि बहु प्रकारें । माझेनि जनकें निर्मियलें. ॥ ५ ॥<br>हें ऐकूनि तुझिया चित्तें । क्षणें मानिजेल पांचालसुते! ।<br>जें नृपांमाजी अर्जुन तेथें । पातला नव्हता कीं काय? ॥ ६ ॥ | |

| अध्याय | गीति | अर्ध | स्पष्टीकरण. | पृष्ठांक |
|---|---|---|---|---|
| | | | अर्जुनें तेंही भेदूनि यंत्र । कां न केलें तुज कलत्र ? ।<br>तरी अर्जुनासही अभेद्यतर। तोही प्रकार अवधारीं. ॥ ७ ॥<br>तुझिये स्वयंवरींचा मत्स । बाह्य न लक्षे प्राकृतांस ।<br>परि स्तंभमूळीं ऊर्ध्व लक्ष । धरितां नेत्रास गोचर तो. ॥ ८ ॥<br>तैसा नोहे येथींचा मत्स्य । सबाह्य गूढलें अनिच्छ ।<br>यास्तव भूभुज झाले तुच्छ । श्रीवत्सांकावांचूनी. ॥ ९ ॥<br>स्तंभमूळीं सजल कुंभा-। माजि लक्षूनि ऊर्ध्व नभा ।<br>मत्स्यभेदना भूपति उभा। पंकजनाभाविण न ठाके. ॥ १० ॥<br>तो एक सर्वज्ञ सर्वद्रष्टा । अभेद्यभेदनीं न मनी कष्टा ।<br>अपर भूपति रहित चेष्टा। कोण्ही प्रतिष्ठा न भोगिती. ॥ ११ ॥<br>(दशमस्कंध, अध्याय ८३) | २७३ |
| ३५ | ७६ | उ. | यत्कीर्तीनें (ज्या भीमाच्या शुभ्र यशानें) करकेला (गारेला) विरेसा जडात्मत्वदोष दिल्हा–असा अन्वय. येथें भीमाची कीर्ति व गार यांची तुलना करून पंतांनीं भीमाची कीर्ति श्रेष्ठ असें ध्वनित केलें आहे. गार पांढरी असते, थंड असते, खाणाऱ्याच्या मनास निववून आराम देणारी असते. परंतु ती अंतरंगांत जडात्मतादोष व्यापून असते, म्हणजे ती पाषाणवत् कठीण व त्यांतच आत्मीयता मान-णारी असते, म्हणून ती हलकी–कमी दर्जाची–होय. तशीच ती विरणारी (हळूहळू क्षीणतनु होणारी) आहे. हा देखील तिचा आणखी एक दोषच आहे. 'डलयोरभेदः' ह्या सूत्रानें 'जडात्मत्व' म्हणजे 'जलात्मत्व' समजावें. सारांश, ती गार झटपट विरून जाऊन केवळ पाणीच होऊन जाते व आपली शुभ्रकीर्तिसदृश काया हारवून बसते–हेंही ध्वनित होतें.<br><br>ह्या सर्व गोष्टी विचारांत घेतां भीमाच्या कीर्तीची तुलना गारेशीं करणें अरसिकपणाचें होईल–असा धिःकारगर्भ भाव जाणावा. कारण भीमाची कीर्ति सदैव शुभ्र, उज्वल व जडवत् नव्हे अशी, अर्थात् चैतन्यपूर्ण व अक्षय्यस्वरूपाची (न विरणारी) अशी होती. | २८३ |
| ३५ | ९५ | पू. | नय=नीति, सन्मार्ग. अनय=अनीति (गीति ९२ पहा). | |

| अध्याय | गीति | अर्थ | स्पष्टीकरण. | पृष्ठांक |
|---|---|---|---|---|
| | | | होगलित–हा शब्द पंतांच्या सभापर्वांतही आढळतो ( अध्याय ५।७२ पहा ). | २८५ |
| ३६ | ३४ | पू. | लेश=लेशतः, अंशतः. द्रुपदानें आपला उपाध्याय विप्रवेषधारी कुमारांकडे पाठवून त्यांच्या कुळाची व नांवांची चौकशी करावयास सांगितलें होतें ( गीति २८ ), पण त्या बाबतींत समाधानकारक माहिती कळली नव्हती ( गीति ३२ ), त्यामुळें त्यांची 'वर्णपरीक्षा' भोजनप्रसंगीं करावयाची, व अशा रीतीनें आपल्या संशयाची निवृत्ति करून घ्यावयाची असें द्रुपदानें ठरविलें होतें ( गीति ३६ ). म्हणून द्रुपद अंशतः हृष्ट झाला होता. असें जें त्या गीतींत म्हटलें आहे तें योग्यच होय. | २९१ |
| ३६ | ६६ | उ. | आपल्या शत्रूला स्तंभितगात्र करण्याचा प्रघात प्राचीन काळीं बराच रूढ होता असें दिसतें. शर्यातिराजानें केलेल्या यज्ञांत च्यवनऋषींनीं आश्विनीकुमारांस सोमरस दिला, म्हणून इंद्र संतापला व त्यानें ऋषीस मारण्यासाठीं वज्र उगारिला. परंतु ऋषीनें त्याचा हातच वज्रासह हालेनासा केला–अशी कथा आहे. ( श्रीमद्भागवत, स्कंद ९, अध्याय ३ श्लोक २४–२६ पहा ). | २९५ |
| ३७ | ३६ | पू. | रे कर्ण! जो दीर्घदर्शी तोचि मनुष्य [ होय ]. [ तो ] अन्यथा नरसा दिसला तरि तो पशु [ होय ]–असा अन्वय. जो दीर्घदर्शी असतो तोच खरोखर मनुष्य होय. जो तसा नसतो तो मनुष्याकृति असला तरी तो पशुच म्हटला पाहिजे–असा भाव. | ३०३ |
| ३७ | ३६ | उ. | ज्या मातेचें थान रसा दे त्या [ मनुष्य म्हणती ], अन्य न [ म्हणती ]–असा अन्वय. ज्याला आईनें आपलें स्वतःचें दूध पाजून वाढविलें व तेणेंकरून मनुष्यजातीस शोभणारे गुण ज्याच्या अंगीं आले तोच खरा मनुष्य होय. त्यालाच मनुष्य म्हणावें, त्याला दुसरें कोणतेंही नांव देणें योग्य होणार नाहीं–असा भाव.<br>कर्ण आपल्या जन्मदात्या मातेचें दूध प्याला नाही. दुसऱ्याच स्त्रीचें ( राधेचें ) दूध प्याला, त्यामुळें तो असा | |

| अध्याय | गीति | अर्ध | स्पष्टीकरण. | पृष्ठांक |
|---|---|---|---|---|
| | | | हीन मनोवृत्तीचा बनला—हें द्रोणाच्या भाषणाचें सार असावें, असें वाटतें. | ३०३ |
| ३७ | ३७ | पू. | 'सेवितया'च्या ठिकाणीं 'सेवि तया' असा पदच्छेद करणें बरें. [ जो ] वृद्धाचें मंत्रित सेवि ( सेवी ) तया हित [ होय ], तसें तरुणाचें [ मंत्रित सेवी तया ] हित न [ होय ]—असा अन्वय. | ३०३ |
| ३७ | ४० | — | गीति ३९ व ४० ह्या परस्पर-अर्थपूरक असल्यामुळें 'युग्म' समजाव्या ( पृष्ठ ३१९ टीप १८ पहा ).<br><br>ह्या दोन गीतींत चाळणी व तापत्रयतप्त यांची तुलना पिपासु जीवनग्रहणोत्सुकाशीं करून जीवन ( पाणी ) व उपदेश यांच्या ग्रहणाग्रहणबुद्धीचा परिणाम व्यक्त केला आहे. | ३०४ |
| ३७ | ५९ | — | गा ! राया ! ( राजा द्रुपदा ! ) मज आजि ( आज ) जसें एक दुःख [ आहे ] तसें [ तें ] यामागें ( ह्या काळा-पूर्वीं ) न ( नव्हतें )—असा अन्वय. आज मला एका गोष्टीबद्दल दुःख वाटत आहे, तसें ह्यापूर्वी मला कधीं वाटलें नव्हतें. तें दुःख हें, कीं—या गारा नसोनी ( ह्या माझ्या डोळ्यांच्या खांचा नसूनही—धृतराष्ट्राचे डोळे बाह्यतः अव्यंग होते, असें असून देखील ) कृष्णाविलोकनसुखा [ ते डोळे ] पात्र न [ म्हणून ] या गारा ( यांस खांचाच म्हणणें युक्त होय ) [ होत ]—असा अन्वय. सारांश—पुत्रांच्या ( पांडवांच्या ) 'नंदनत्व'गुणामध्यें हेंच तेवढें एक वैगुण्य दाखवितां येईल—असा ध्वनि. | ३०६ |
| ३७ | ६१ | उ. | ह्या अर्धातील कल्पना पंतांस भवभूतीच्या पुढील उक्ती-वरून सुचली असावीः—<br><br>नैसर्गिकी सुरभिणः कुसुमस्य सिद्धा ।<br>मूर्ध्नि स्थितिर्न चरणैरवताडनानि. ॥<br>( उत्तररामचरित्र, अंक १ श्लोक २१ )<br><br>ह्या पादद्वयांचें कै० परशरामपंत तात्या गोडबोले—कृत भाषांतरः— | |

| अध्याय | गीति | अर्ध | स्पष्टीकरण. | पृष्ठांक |
|---|---|---|---|---|
| | | | जें नित्य सुंदर सुगंधि शिरीं धरावें । तें पुष्प काय चतुरें चरणें चुरावें ? ॥ | ३०७ |
| ३७ | ७२ | – | मागील गीतींत पौरजनांनीं पांडवांची तुलना विद्युत्समागत मेघमालेशीं करून वणव्यानें जळून गेलेल्या अरण्याशीं आपलें समानत्व दाखविलें आहे. त्यावर अशी शंका सहज येईल, कीं दुर्योधनादि राज्यकारभार पहात असतां नागरिकांस असें कां वाटावें ? त्यावर उत्तरच म्हणून कीं काय, कौरव हे सितकाक, पांडव हे मराळ व त्यांना अवमानिलें तरी तेच मानसश्रीकर होत, हें स्पष्ट करण्याकरितां सुवृत्त राळा ( एक हलक्या प्रतीचें धान्य ) हा कनकपात्रोचित नसून शालीच ( धान ) मात्र कनकपात्रोचित आहे, असें दर्शविलें आहे. काक व राळा हे उत्तम विशेषणांनीं युक्त असले, तरी ते हीन होत, हंस व धान ( ज्याच्यापासून तांदुळ करितात तें धान्य ) यांची बरोबरी ते करूं शकत नाहींत. तोच न्याय पांडव व कौरव यांच्या बाबतींत लागू आहे–हा भाव. | ३०९ |
| ३७ | ८२ | पू. | जें प्रभुदर्शन ( रूपी ) नाकींही दुर्लभ [ असें ] जें कामित तेंही तें पुर ( इंद्रप्रस्थ ) वी ( प्रसवे, प्राप्त करून देई )–असा अन्वय.<br>विणें=प्रसवणें, शारीरधर्मानें उत्पन्न करणें. ह्या शब्दाचा उपयोग सांप्रत पशुजननासंबंधींच केला जातो. परंतु पंतांनीं मूळच्या सामान्य अर्थावर दृष्टि देऊन हा शब्द अनेक ठिकाणीं योजिला आहे. ( मागें अध्याय २४।३९ व केकावली–श्लोक ४ पहा ). तुकाराममहाराजांनीं तर मनुष्यजननाच्या अर्थीं ह्या क्रियेचा उपयोग एके ठिकाणीं केला आहेः–मग ते काशाची माउली। जाण काशासाठीं 'व्याली.' ॥ | ३१० |
| ३७ | ८३ | – | प्रभु श्रीकृष्णानें ज्यांना आपले 'स्वजन' म्हटलें, त्या पांडवांस इंद्रप्रस्थरूपी पात्र रसपूर्ण करून उपभोगार्थ दिलें होतें. [ पण ही गोष्ट सहन न झाल्यामुळें ] मक्षिकासमुदायाप्रमाणें क्षुद्र व मलिनमति जे कौरव ते स्वभावतः मत्सरपूर्ण असल्यामुळें व्यर्थ हात चोळीत बसले–असा भाव. 'मात्र' हा शब्द तुच्छता दर्शविण्यासाठीं योजिलेला आहे. | ३१० |
| ३८ | ३२ | उ. | रक्षार्ह वस्तु=ब्राह्मणधन किंवा स्वकीर्तिधन. | ३१५ |

| अध्याय | गीति | अर्ध | स्पष्टीकरण. | पृष्ठांक |
|---|---|---|---|---|
| ३८ | ७१ | उ. | जी ! दृष्टि निवविली, जा; स्ववियोगें रमणीतें भया न द्या–असा अन्वय. हें अर्जुनास उद्देशून द्रौपदीचें भाषण आहे. आपण आलां, मला भेटलां व त्यामुळें माझे डोळे निवले ! पण आपल्या अ-दर्शनानें जी रमणी विरहदशा भोगीत भीतिग्रस्त झाली असेल तिच्या भेटीला आपण आतां जा व बिचारीला अभय द्या–असा आशय. ह्या गीतींत अत्यंत गूढ पण हृदयग्राही अशा प्रगल्भेच्या गाढ प्रेमावेगाचा जो वळसा आहे, तो फारच सुंदरपणें व्यक्त केला आहे. हा सर्वच प्रसंग पंतांनीं अत्यंत हृदयंगम व नाजूकपणें रंगविला आहे. | ३२१ |
| ३८ | ८२ | उ. | मेघ हा जरी चातकाच्या आक्रोशानें त्याची तहान निवविण्यासाठीं करुणायुक्त होऊन वळतो, तरी तो प्रसन्न झाल्यावर केवळ चातकाच्या तोंडांतच पाण्याचे थेंब पाडीत नाहीं, तर सारी पृथ्वी देखील जलपूर्ण करीत असतो–असा आशय. | ३२२ |
| ३८ | ९१ | उ. | अत्याग्रहें=अत्यंत चौकसपणानें, बारकाईनें छडा लावण्याच्या बुद्धीनें. | ३२४ |
| ३८ | ९४ | उ. | येथें 'बहु धा' असा पदच्छेद न करितां 'बहुधा' असा पंतांचा पाठ असणें शक्य आहे, कारण त्यांनीं स्वतः लिहिलेल्या पोथींत शब्द तोडलेले नाहींत. श्वेतकिनृपानें बारा वर्षें अग्नीला इतकें तूप पाजलें, कीं त्याला अग्निमांद्य झालें. अशी त्याची स्थिति झाली होती, तरीही बहुतकरून त्या घृतधारेनें अग्नीला 'ओ' म्हणूं दिलें नाहीं. ( ती घृतधारा इतकी मधुर आणि रुचकर होती, कीं अग्नीला मांद्य आलें होतें, तरी तिनें ओकारी येऊं दिली नाहीं. जणूं काय घृतधारा सेवन करण्याची त्याची इच्छा अतृप्तच होती–असा आशय. ) किंवा–( टीपेंतील पाठास अनुसरून ) 'बहु धा' ( अगदीं तृप्त हो ) [ असें ] म्हणोनि ( म्हणून, बोलून ) ती ( घृतधारा ) निजसेवनीं हळुहि ( अगदीं हळूच ) 'ओ' ( ओकारी ) देती झाली–असा अन्वय. 'ओ' म्हणजे हांकेस उत्तर देणें किंवा ओकारी येणें–असे अर्थ आहेत. त्यांतील दुसरा अर्थच येथें अभिप्रेत असावा, असें दिसतें. | ३२५ |

## १०. मूळ आदिपर्व व पंतकृत आदिपर्व यांची तुलना.

| मूळांतील अध्याय. | अध्यायांतील विषय. | ग्रंथसंख्या | पंतकृत अध्याय | ग्रंथसंख्या |
|---|---|---|---|---|
| | **१. अनुक्रमणीपर्व.** | | | |
| १ | सौतीस ऋषींचा प्रश्न, त्याचें उत्तर, जगाची उत्पत्ति, भारतग्रंथाची योग्यता, व्यास व ब्रह्मदेव यांचा संवाद, भारतनिर्माणकथन, अनुक्रमणिका, फलश्रुति. | २७५ | १ | २२ |
| | | २७५ | | २२ |
| | **२. पर्वसंग्रहपर्व.** | | यांतील सर्व विषय पंतांनीं गाळिला आहे. | |
| २ | समंतपंचकाची उत्पत्ति, अक्षौहिणींची संख्या, शंभर पर्वांची अनुक्रमणिका, मुख्य अठरा पर्वांचा गोषवारा, अध्यायसंख्या, श्लोक-संख्या व अध्यायाची फलश्रुति. | ३९६ | | |
| | | ३९६ | | ...... |
| | **३. पौष्यपर्व.** | | | |
| ३ | जनमेजयाचें दीर्घसत्र, त्यांत त्यास कुत्रीचा शाप, उपाध्यायवरण, गुरुभक्त उपमन्यु, आरुणि व वेद यांचीं उपाख्यानें, उत्तंकाची गुरुभक्ति, सर्पसत्राचा उपक्रम. | १८८ | २ | |
| | | १८८ | | १३८ |
| | **४. पौलोमपर्व.** | | | |
| ४ | भारतकथाप्रवेश. | १२ | ३ | |
| ५ | भृगुवंशाचें वर्णन, भृगूची पत्नी पुलोमा हिच्याविषयीं पुलोमा राक्षसाची अभिलाषा, पुलोम्याचा अग्नीला प्रश्न व त्यानें दिलेलें उत्तर. | ३४ | | |
| ६ | पुलोमाहरण, पुलोमा राक्षसाचें मरण, च्यवन ऋषीचा जन्म, अग्नीला भृगूचा शाप. | १४ | | |
| ७ | भृगुशापित अग्नीस वरप्रदान. | २९ | | |
| ८ | प्रमद्वरेचा जन्म, तिचा सर्पदंशानें मृत्यु व तिच्याबद्दल रुरूचा शोक. | २७ | | |
| ९ | प्रमद्वरेचें जीवंत होणें व रुरूकडून सर्पवधाची प्रतिज्ञा. | २३ | | |
| १० | सहस्रपादऋषीची कथा व त्याची शापमुक्तता. | ८ | | |

| मूळांतील अध्याय. | अध्यायांतील विषय. | ग्रंथसंख्या | पंतकृत अध्याय | ग्रंथसंख्या |
|---|---|---|---|---|
| ६० | भारतकथेस सुरुवात. | २४ | ८ | |
| ६१ | भारताचें सूत्र. | ५३ | | |
| ६२ | भारतश्रवणाबद्दल जनमेजयाचा प्रश्न व भारतश्रवणाची फलश्रुति. | ५३ | | |
| ६३ | उपरिचरराजाचें चरित्र व व्यासप्रभृतींची उत्पत्ति. | १२८ | | |
| ६४ | देवांच्या अंशावताराचा हेतु व विचार. | ५४ | | ६५ |
| | | ३२२ | | ६५ |
| | **७. संभवपर्व.** | | | |
| ६५ | अदितिप्रभृति दक्षकन्यांच्या संततीचें वर्णन. | ५७ | ९ | |
| ६६ | श्रेष्ठभूतांची उत्पत्ति. | ७५ | | |
| ६७ | देवदानवादिकांची मनुष्ययोनींत उत्पत्ति. | १६६ | | |
| ७५ | ययातिराजाचें उपाख्यान, पुरूरव्याचा बुद्धिभ्रंश, ययातीला वैराग्यप्राप्ति व पुरूला राज्याभिषेक. | ५८ | | |
| ७६ | कचोपाख्यान, संजीवनीविद्या प्राप्त करून घेण्यासाठीं कचाचें शुक्राचार्यांकडे जाणें, कचाचें मरण व त्याचा पुनर्जन्म, त्यास संजीवनीविद्येची प्राप्ति व ब्राह्मणांस सुरापानाचा निषेध. | ७२ | | ५४ |
| | | ४२८ | | ५४ |
| ७७ | कच व देवयानी यांचें भाषण व त्यांचे परस्परांस शाप. | २४ | १० | |
| ७८ | ययातीचें आख्यान, देवयानी व शर्मिष्ठा यांचा कलह, ययातीनें देवयानीला कूपांतून बाहेर काढिलें, देवयानी व शुक्र यांचा संवाद. | ४१ | | |
| ७९ | शुक्र व देवयानी यांचा संवाद. | १३ | | |
| ८० | देवयानीचा दासीपणा स्वीकारून शर्मिष्ठा तिच्याबरोबर जाते. | २८ | | |
| ८१ | ययाति व देवयानी यांचा संवाद व त्यांचा विवाह. | ३९ | | ९६ |
| | | १४५ | | ९६ |
| ८२ | ययाति व शर्मिष्ठा यांचा संवाद, अनृत हें कोणकोणत्या प्रसंगीं क्षम्य आहे, त्या दोघांचा समागम व त्यांस पुत्रप्राप्ति. | २७ | ११ | |
| ८३ | देवयानीचा राग, शुक्राचा ययातीला शाप व उश्शाप. | ४२ | | |

| मूळांतील अध्याय. | अध्यायांतील विषय. | ग्रंथसंख्या | पंतकृत अध्याय | ग्रंथसंख्या |
|---|---|---|---|---|
| ८४ | ययातीचे आपल्या पुत्रांस शाप व पूरूला राज्यप्राप्ति. | ३५ | | |
| ८५ | ययातीला वैराग्यप्राप्ति, प्रजेच्या संमतीनें पूरूला राज्यावर बसवून त्याचें वनांत गमन. | ३५ | | |
| ८६ | ययातीचें तप व त्याचें स्वर्गारोहण. | १७ | | |
| ८७ | इंद्र व ययाति यांचा संवाद, ययातीनें पूरूस केलेला उपदेश. | १३ | | |
| ८८ | ययातीचें स्वर्गांतून पतन, ययाति व अष्टक यांची भेट व त्यांचा संवाद. | १३ | ११ | |
| ८९ | ययाति अष्टकाला स्वर्गांतील वृत्तांत विस्तारानें सांगतो. | २४ | | |
| ९० | ययाति स्वर्गभ्रष्ट होण्याचीं कारणें. | २७ | | |
| ९१ | अष्टक व ययाति यांचा संवाद, सिद्धिप्राप्तीचीं व मुनीचीं लक्षणें. | १८ | | |
| ९२ | ययाति, अष्टक व प्रतर्दन यांचा संवाद. | १९ | | |
| ९३ | अष्टक, प्रतर्दन, शिबि व वसुमान यांसह ययातीचें पुन्हां स्वर्गारोहण. | २८ | | ८६ |
| | | २९८ | | ८६ |
| ६८ | दुष्यंतराजाचें वर्णन. | १४ | | |
| ६९ | दुष्यंताची मृगया. | ३२ | | |
| ७० | कण्वऋषीचा आश्रम व त्यांत दुष्यंताचा प्रवेश. | ५१ | | |
| ७१ | शकुंतलेचें वृत्त. | ४२ | | |
| ७२ | मेनका व विश्वामित्र यांची भेट व शकुंतलेचा जन्म. | १९ | | |
| ७३ | आठ प्रकारच्या विवाहांचें वर्णन, दुष्यंत व शकुंतला यांचा गांधर्वविवाह. | ३४ | १२ | |
| ७४ | दुष्यंत व शकुंतला यांचा संवाद, शकुंतला व भरत यांचा स्वीकार, भरताच्या कीर्तीचें वर्णन. | १३७ | | |
| ९४ | पूरूचा वंशविस्तार. | ६५ | | |
| ९५ | पूरूची सविस्तर वंशावळ, पांडूला शाप, पांडवांची उत्पत्ति, पांडवांचें संक्षिप्त चरित्र व पूरुवंशश्रवणाची फलश्रुति. | ९० | | ९८ |
| | | ४८४ | | ९८ |
| ९६ | महाभिषराजाला व गंगेला ब्रह्मदेवाचा शाप व गंगेचा अष्टवसूंशीं ठराव. | २४ | १३ | |

| मूळांतील अध्याय. | अध्यायांतील विषय. | ग्रंथसंख्या | पंतकृत अध्याय | ग्रंथसंख्या |
|---|---|---|---|---|
| ९७ | गंगा व राजा प्रतीप यांचा संवाद, शांतनूचा जन्म, त्याला उपदेश व गंगेची भेट. | ३२ | १३ | |
| ९८ | गंगेचा शांतनूशीं लग्नासंबंधीं करार, भीष्माचा जन्म व पुत्रांस बुडविण्याचें कारण. | २४ | | |
| ९९ | कामधेनूची उत्पत्ति व तिचे गुण, वसूंनीं केलेली कामधेनूची चोरी, वशिष्ठाचा अष्टवसूंस शाप व गंगेकडून शांतनूचा त्याग. | ४९ | | |
| १०० | शांतनूचे सद्गुण, त्याला देवव्रत नामक पुत्राची प्राप्ति, त्याचें गुणवर्णन, मत्स्यगंधा व शांतनु यांची भेट, शांतनु व देवव्रत यांचा संवाद, त्यानें बापाकरितां केलेली वधूची मागणी, त्याची भीष्मप्रतिज्ञा व शांतनूचा सत्यवतीशीं विवाह. | १०३ | | १०० |
| | | ३८७ | | १०० |
| १०१ | शांतनूचे पुत्र चित्रांगद व विचित्रवीर्य यांचा वृत्तांत. | १४ | १४ | |
| १०२ | विचित्रवीर्याच्या विवाहाचा विचार, अंबा, अंबालिका व अंबिका यांचा स्वयंवर, अंबिका व अंबालिका यांचा विचित्रवीर्याशीं विवाह व त्याचा क्षयरोगानें मृत्यु. | ७४ | | १९ |
| | | ८८ | | १९ |
| १०३ | सत्यवती आणि भीष्म यांचा वंशवृद्धी कशी होईल ह्यासंबधीं विचार व त्यांचा संवाद. | २७ | १५ | |
| १०४ | दीर्घतमा ऋषीचें उपाख्यान. | ५६ | | |
| १०५ | व्यासांचें आगमन, व्यास व सत्यवती यांचा संवाद, आणि तिचा सुनेस उपदेश. | ५५ | | |
| १०६ | धृतराष्ट्र, पांडु व विदुर यांचा जन्म. | ३३ | | |
| १०७ | मांडव्यऋषीचें उपाख्यान. | १७ | | |
| १०८ | मांडव्यऋषीचें नांव ‘अणीमांडव्य’ असें पडण्याचें कारण. | १९ | | ७८ |
| | | २०७ | | ७८ |
| १०९ | कुरुदेशाच्या वैभवाचें वर्णन, राजपुत्रांचें शिक्षण व पांडूला राज्यप्राप्ति. | २६ | १६ | |
| ११० | धृतराष्ट्र व गांधारी यांचा विवाह. | २० | | १५ |
| | | ४६ | | १५ |

| मूळांतील अध्याय. | अध्यायांतील विषय. | ग्रंथसंख्या. | पंतकृत अध्याय | ग्रंथसंख्या. |
|---|---|---|---|---|
| १११ | कुंतीला मंत्रप्राप्ति, कर्णाचा जन्म, त्याचें औदार्य व त्याला शक्तीची प्राप्ति. | ३१ | १७ | |
| ११२ | कुंतीचा स्वयंवर आणि तिचा पांडूशीं विवाह. | १४ | | |
| ११३ | माद्रीशीं पांडूचा दुसरा विवाह व त्यानें केलेला दिग्विजय. | ४६ | | |
| ११४ | पांडुराजाचा वनविहार व विदुराचा विवाह. | १५ | | ३९ |
| | | १०६ | | ३९ |
| ११५ | दुर्योधनादि शंभर गांधारीपुत्र आणि धर्म यांची उत्पत्ति. | ४४ | १८ | |
| ११६ | दुश्शलेची उत्पत्ति. | १८ | | |
| ११७ | धृतराष्ट्राच्या शंभर पुत्रांचीं नांवें व दुश्शलेचा जयद्रथाशीं विवाह. | १८ | | २६ |
| | | ८० | | २६ |
| ११८ | पांडुराजाला किंदमऋषीचा शाप. | ३५ | १९ | |
| ११९ | शापोद्विग्न पांडूचे विचार, कुंती व माद्री यांचा पतीबरोबर राहाण्याचा निश्चय. | ५० | | |
| १२० | पांडु व ऋषि यांचा संवाद, पुत्रप्राप्तीसंबंधीं पांडु व पृथा यांचा संवाद, बारा प्रकारचे पुत्र व शरदण्डायनाची कथा. | ४२ | | |
| १२१ | व्युषिताश्वराजाची कथा, त्याच्या भद्रा नामक राणीला त्याच्या शवापासून पुत्रप्राप्ति. | ३८ | | |
| १२२ | उद्दालक व श्वेतकेतु यांची कथा, श्वेतकेतूनें घातलेली व्यभिचारासंबंधीं मर्यादा व पुत्रोत्पत्तीसाठीं कुंतीला पतीची आज्ञा. | ४५ | | |
| १२३ | धर्म, भीम व अर्जुन यांचा जन्म. | ७९ | | |
| १२४ | माद्रीपासून नकुळ व सहदेव यांची उत्पत्ति. | ३२ | | १०० |
| | | ३२१ | | १०० |
| १२५ | पांडुराजाचा मृत्यु, कुंती व माद्री यांचा शोक, माद्रीचें सहगमन. | ३१ | २० | |
| १२६ | ऋषींनीं पांडवांस हस्तिनापुरीं आणिलें. | ३६ | | |
| १२७ | पांडूची उत्तरक्रिया. | ३२ | | |
| १२८ | व्यासांचें पुढील काळाविषयीं घोर भविष्य व सत्यवतीचें सुनांसह वनांत गमन. | १३ | | २६ |
| | | ११२ | | २६ |

| मूळांतील अध्याय. | अध्यायांतील विषय. | ग्रंथसंख्या | पंतकृत अध्याय | ग्रंथसंख्या |
|---|---|---|---|---|
| १२८ (चालू) | कौरव-पांडवांच्या बाललीला, दुर्योधनाचें कौटिल्य, भीमास विषप्रयोग, भीमाचें पाताळांत जाणें व तेथें पौष्टिक रस पिणें. | ५९ | २१ | |
| १२९ | पाताळांतून भीमाचें हस्तिनापुरीं आगमन व दुर्योधनाचे पांडवांना मारण्याचे उपाय. | ४३ | | ४४ |
| | | १०२ | | ४४ |
| १३० | कृप, कृपी व द्रोण यांचें जन्मवृत्त, द्रोणाचा कृपीशीं विवाह, अश्वत्थाम्याचा जन्म, पांडवांस धनुर्वेदाचें शिक्षण व द्रोणाला परशुरामापासून अस्त्रप्राप्ति. | ६७ | २२ व २३ | १२<br>१९ |
| | | ६७ | | ३१ |
| १३१ | द्रुपदाकडून द्रोणाचा अपमान, भीष्म व द्रोण यांची भेट, द्रोणाचें पूर्ववृत्त व भीष्मानें केलेली द्रोणाचार्यांची संभावना. | ७९ | २४ | ४६ |
| | | ७९ | | ४६ |
| १३२ | कौरवपांडवांचें द्रोणाचार्यांजवळ युद्धकलाविषयक शिक्षण, एकलव्याची कथा, त्यानें दिलेली गुरुदक्षिणा व शिष्यांची परीक्षा. | ८० | २५ | |
| १३३ | अर्जुनाची परीक्षा, अर्जुनानें द्रोणाची नक्रापासून केलेली सुटका व त्यानें अर्जुनास दिलेलें ब्रह्मशिरोस्त्र. | २३ | | ५६ |
| | | १०३ | | ५६ |
| १३४ | रंगयुद्धांत कौरवपांडवांचें युद्धविषयक नैपुण्य, भीम व दुर्योधन यांचें गदायुद्ध. | ३५ | २६ | |
| १३५ | अर्जुनाच्या सद्गुणांचें व पराक्रमाचें वर्णन आणि कर्णाचें आगमन. | ३२ | | |
| १३६ | कर्णाची अर्जुनाशीं युद्ध करण्याची इच्छा, त्या गोष्टीला कर्ण 'कुलज' नसल्यामुळें अर्जुनाचा 'न'कार, दुर्योधन त्याला अंगदेशाचें राज्य देतो. | ४१ | | |
| १३७ | अधिरथाचें आगमन, दुर्योधनकृत कर्णसमर्थन व सूर्यास्तामुळें अस्त्रकौशल्यप्रदर्शनाची समाप्ति. | २५ | | ७७ |
| | | १३३ | | ७७ |

| मुळांतील अध्याय. | अध्यायांतील विषय. | ग्रंथसंख्या | पंतकृत अध्याय | ग्रंथसंख्या |
|---|---|---|---|---|
| १३८ | द्रोणाची गुरुदक्षिणा, अर्जुनानें द्रुपदाला जिंकून द्रोणापाशीं आणिलें व द्रोणानें द्रुपदाचें अर्धें राज्य घेऊन त्यास सोडून दिलें. | ७७ | २७ | ३५ |
| | | ७७ | | ३५ |
| १३९ | अर्जुनादि पांडवांचा पराक्रम. | २८ | २८ | |
| १४० | कणिकनीति; कोल्हा, वाघ, उंदीर, मुंगूस व लांडगा यांची गोष्ट. | ९४ | | २८ |
| | | १२२ | | २८ |
| | **८. जतुगृहपर्व.** | | | |
| १४१ | पांडवगुणवर्णन, धर्माला राज्य द्यावें अशी प्रजेची इच्छा असल्यामुळें दुर्योधनाचा जळफळाट; दुर्योधन व धृतराष्ट्र यांचा संवाद. | ३८ | २९ | |
| १४२ | पांडवांना वारणावतास पाठविण्यासंबंधीं धृतराष्ट्र व दुर्योधन यांची एकान्तांत वाटाघाट. | २४ | | |
| १४३ | पांडवांचें त्या नगरास प्रयाण. | १९ | | |
| १४४ | ज्वालाग्राही जतुगृह तयार करण्यासाठीं पुरोचनाचें वारणावतास गमन. | १९ | | |
| १४५ | विदुरानें गूढ भाषेंत धर्माला धोक्याची सूचना दिली व ती धर्मास समजली. | ३४ | | |
| १४६ | धर्मानें जतुगृहाचा उद्देश ताडला. | ३१ | | |
| १४७ | विदुरानें विश्वासू माणूस पाठविला व त्यानें गुप्तपणानें लाक्षागृहाखालून भुयार तयार केलें. | २१ | | |
| १४८ | जतुगृहाचा दाह व पांडवांचें मातेसह भुयारांतून अरण्यांत गमन. | २२ | | |
| १४९ | विदुराचा मनुष्य पांडवांस नावेंतून गंगेच्या पलीकडे नेतो. | १५ | | ७६ |
| | | २२३ | | ७६ |
| १५० | धृतराष्ट्रानें शोक करून पांडवांचीं उत्तरकार्यें करविलीं. भीम मातेसह व भावांसह महावनांत शिरला. | २६ | ३० | |
| १५१ | भीम झाडाखालीं सर्वांस ठेवून पाणी आणण्यासाठीं गेला. भीमाचें अचाट सामर्थ्य. दरिद्रावस्थेंत निजलेल्या मातेस व भावांस पाहून भीमाचा शोक. | ४५ | | |

| मूळांतील अध्याय. | अध्यायांतील विषय. | ग्रंथसंख्या | पंतकृत अध्याय | ग्रंथसंख्या |
|---|---|---|---|---|
| १६७ | धृष्टद्युम्न व द्रौपदी यांची उत्पत्ति. | ५६ | ३२ | |
| १६८ | पांडवांचें पांचाल देशाप्रत प्रयाण. | ११ | | २७ |
| | | १०८ | | २७ |
| १६९ | व्यासांची पुनश्च भेट. द्रौपदीचा पूर्वजन्मींचा वृत्तांत. | १७ | ३३ | |
| १७० | पांडवांची चित्ररथाशीं गांठ व त्याचा अर्जुनाकडून पराजय, त्याची भार्या कुंभीनसी अर्जुनास शरण जाते, अर्जुनास अस्त्रप्राप्ति, गंधर्वानें पांडवांचा रस्ता अडविण्याचें कारण व पांडवांस पुरोहिताची आवश्यकता. | ८१ | | |
| १७१ | संवरणराजाला तपतीचें दर्शन व तो तिच्या दर्शनानें मोहित होतो. | ४४ | | |
| १७२ | संवरण व सूर्यकन्या तपती यांचा संवाद. | २६ | | |
| १७३ | काममोहित होऊन पडलेल्या संवरणाची व त्याच्या प्रधानाची भेट, तपतीकरितां वशिष्ठानें केलेली सूर्याची प्रार्थना, तपतीशीं संवरणाचा विवाह व संवरणानें केलेलें दुष्काळनिवारण. पांडवांस 'तापत्य' असें म्हणण्याचें कारण. | ५० | | ५३ |
| | | २१८ | | ५९ |
| १७४ | वशिष्ठाचें माहात्म्य व पांडवांस पुरोहिताची आवश्यकता. | १६ | ३४ | |
| १७५ | विश्वामित्राचें संक्षिप्त पूर्ववृत्त, कामधेनूचें माहात्म्य, वशिष्ठ व विश्वामित्र यांच्या वैराचें कारण, वशिष्ठाचा व कामधेनूचा संवाद, विश्वामित्राच्या सैन्याचा पराजय. | ४८ | | |
| १७६ | कल्माषपादराजास शाप, विश्वामित्रानें करविलेला वशिष्ठाच्या शंभर पुत्रांचा वध व वशिष्ठाचा शोक. | ४९ | | |
| १७७ | वशिष्ठाचें आत्महत्येपासून परावर्तन, कल्माषपादाची शापांतून मुक्ति, त्याच्या वंशाची वशिष्ठाकडून वृद्धि. | ४८ | | |
| १७८ | पराशरऋषीचा जन्म, और्वऋषीची उत्पत्ति. | २९ | | |
| १७९ | पितरांनीं केलेलें और्वऋषीच्या क्रोधाचें शमन. | २२ | | |
| १८० | और्व किंवा वाडव नामक अग्नीची उत्पत्ति. | २३ | | |
| १८१ | पराशराचें राक्षससत्र व त्यास पुलस्त्य ऋषीचा उपदेश. | २३ | | |

| मूळांतील अध्याय. | अध्यायांतील विषय. | ग्रंथसंख्या | पंतकृत अध्याय | ग्रंथसंख्या |
|---|---|---|---|---|
| १८२ | कल्माषपादराजाला तिसरा शाप मिळण्याचें कारण; वशिष्ठापासून नियोगानें पुत्रोत्पत्ति. | २६ | ३४ | |
| १८३ | पांडव धौम्याला पुरोहित करितात. | १३ | | १०१ |
| | | २८७ | | १०१ |
| | **१२. स्वयंवरपर्व.** | | | |
| १८४ | पांडवांचें द्रौपदीच्या स्वयंवराकरितां प्रयाण, ब्राह्मणांची भेट व स्वयंवरोत्सवाचें वर्णन. | २० | | |
| १८५ | मंडपाचें वर्णन व महोत्सवाचा आरंभ. | ३८ | | |
| १८६ | स्वयंवरास आलेल्या राजांचें वर्णन. | २४ | | |
| १८७ | द्रौपदीस्वयंवराचा पण जिंकावयाचे कामीं राजांची असमर्थता, कृष्ण व बळराम पांडवांस ओळखतात, कर्णाचा अपमान. | २९ | ३५ | |
| १८८ | अर्जुन हा ब्राह्मण आहे असें समजून ब्राह्मणांचे तर्कवितर्क व अर्जुनकृत लक्ष्यभेद. | २८ | | |
| १८९ | स्वयंवरास आलेल्या राजांचें व भीमार्जुनांचें युद्ध. | २४ | | |
| १९० | कर्ण व अर्जुन यांचें युद्ध, कर्णाचा पराजय, शल्य व भीम यांचें युद्ध. कृष्णाच्या सांगण्यावरून युद्धाची समाप्ति. | ४७ | | |
| १९१ | द्रौपदीचें पांडवांसह कुलालशाळेंत गमन, कुंतीचें भाषण व द्रौपदीविषयीं धर्मानें केलेला निर्णय. | १६ | | ९८ |
| | | २२६ | | ९८ |
| १९१ (चालू) | पांडवांची व कृष्ण बळरामांची भेट. | १० | | |
| १९२ | धृष्टद्युम्न द्रौपदीस जिंकणाऱ्यांची वर्तणूक पाहतो. | १८ | | |
| | **१३. वैवाहिकपर्व.** | | | |
| १९३ | द्रुपदाकडून धर्मास निरोप व त्याचें पांडवांकडून उत्तर. | २९ | ३६ | |
| १९४ | द्रुपदानें केलेली पांडवांची परीक्षा. | १५ | | |
| १९५ | द्रौपदीच्या विवाहाविषयीं द्रुपद व धर्म यांचा संवाद व द्रौपदीस कोणी वरावें याविषयीं विचार. | ३३ | | |
| १९६ | व्यासासमोर बहुपतित्वाविषयीं भिन्नभिन्न मतप्रतिपादन. | २३ | | |

